[illegible]त खालील पुस्तकें इत्यादि बांधलीं आहेत:

१ विचारभ्रमण. २ श्रीरामदास सपर्य. ३ रामदास
४ मुक्तेश्वर. ५ वामनपंडित. ६ जनीजनार्दन
७ देवदास व मुकुंद. ८ शिवदिनकेसरी. ९ दासो[illegible]
१० मुधेशाचा गा - कृष्ण याज्ञवल्कि व जयरामसुत
११ तुकाराम. १२ तुकोबाराय देहूकर.
१३ श्रीरंगानुजकृत संतस्तवन. १४ धाकटा शिवाजी व
धाकटा रामराजा. १५ मुकुंदराज. १६ रघुनाथ[illegible]
१७ शके १२८९ तील यादवांचा एक शिलालेख.
१८ आनंदतनय. १९ एकनाथी संतमालिका २० गाथ[illegible]
२१ जयपूरच्या राजांची आधुनिक वंशावळ.
२२ मंगळवेढें येथील एक मराठी शिलालेख.
२३ शिवगण येथील सेंगर राजांची वंशावळ.
२४ माढें येथील विठोबाच्या हृदयावरील लेख - शुंडम.
अनंतपंडितकृत टीका - एकचक्रा नगरींतील राजांची[illegible]
२५ पंढरपूर येथील देवळांतील शिलालेख. २६ पंढरपू[र]
येथील शक १२३३ तील शिलालेख - व गिरजेच्या
किल्ल्याचा तामपट. २७ गंगाधर.
२८ सोनगीरच्या किल्ल्यावरील शिलालेख.
२९ लक्ष्मीनारायण कल्याण नाटक.
३० एक जुनें मानभावी काव्य.
३१ ज्ञानाचीं सहा द्वारें.
३२ पुनर्विवाह प्रवर्तकाचा वृत्तांत.

# ग्रंथमाला



मासिक पुस्तकांत छापलेलें प्रकरण

---

# विचारभ्रमण

---

हा निबंध

प्रो० मोरो केशव दामले, एम्. ए.,
ोफेसर ऑफ् लॉजिक व मॉरल फिलॉसफी,
माधव कॉलेज, उज्जयनी.

यांनीं लिहिला

तो

विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.,

संपादक ग्रंथमाला

यांणीं

श्रीसमर्थप्रसाद' छापखान्यांत छापविला.

---

किंमत १८३.

# अनुक्रमणिका.







माहिती अजून सर्व
स्त मुलें येऊं,
अभ्यास फार
यामले दाख-
गवरून
गून
हे.
न
ं

# किंडरगार्टन्

## उर्फ

# बालोद्यानशिक्षणपद्धति.

अलीकडे प्रसिद्धीस येत चाललेल्या किंडरगार्टन् उर्फ बालोद्यान-शिक्षणपद्धतीसंबंधीं कांहीं माहिती मिळविण्याचा, व त्याप्रमाणें शिक्षणपद्धति आमचे येथील सरस्वतीमंदिरांत सुरू करण्याचा विचार आमचे नांत येण्यास, मुंबई येथील खानबहादर दाराशा रतनजी चिचगार यांनीं तेथें जी एक ' शापुरी बंगाली गर्लस्कूल ' ह्मणून शाळा सुरू केली ती शाळा कारणीभूत होय. आमचे मित्र मि० नागपूरकर ती पाहण्यास गेले होते, व त्या ठिकाणीं बालोद्यानशिक्षणपद्धतीवर अभ्यास, लहानापासून थोर वयाच्या मुलींसही शिकविण्यांत येतात, शिक्षणापासून त्यांस अतोनात फायदा होत आहे, असें त्यांस न आलें. ह्मणजे इतर शाळांप्रमाणें घोकंपट्टी न करितां, सर्व प्रका विषयाची माहिती तेथें पदार्थ किंवा त्यांचे नमुने दाखवून [ Object esoons ] करून देण्याची त्या ठिकाणीं पद्धति सुरू आहे. व त्याचा रिणाम असा झाला आहे कीं, त्या शाळेतील लहान लहान मुलींसही इतर ाळांतील मोठमोठ्या वयाच्या मुलींपेक्षांही जास्त माहिती असलेली दिसून आली आहे. याचें कारण काय ह्मणून शोध करितां, त्याठिणीं किंडरगार्टन् उर्फ बालोद्यानशिक्षणपद्धतीवर सर्व शिक्षण देण्यांत तें, असें त्यांस कळून आलें, व त्यामुळें ही शिक्षणपद्धति येथें सुरू रून पहावी ह्मणून आमचे मनांत आलें.

आमच्या मनांत ही गोष्ट आल्यावर ती गोष्ट साध्य करण्यास काय पाय करावे, ह्याकडे आमचें लक्ष्य गेलें. कोल्हापूर येथें बालोद्यान-

...गात, ह्मणचे बी. ए. पर्यंत अभ्यास करून पास झालेल्या ...डिगबाई यांची आह्मी गांठ घेतली, व त्यांचेकडून या शिक्षणाबद्दल कांहीं त्रोटक माहिती व शिक्षणास लागणारीं उपकरणें ( Apparatus ) जाऊन पाहिलीं. त्याचप्रमाणें आमच्या मंदिरांतील मास्तरीण बाईस मुंबई येथील शाळेंत पाठवून आह्मीं किंडरगार्टन्संबंधीं माहिती मिळवून आणली. या विषयावर जर्मन व इंग्रजी भाषेंत पुष्कळ ग्रंथ झालेले आहेत, व त्यांपैकीं काहींचीं गुजराथींत भाषांतरेंही झालेलीं आहेत. परंतु मराठी भाषेंत या विषयावर फारसे ग्रंथ निघालेले नाहींत. नाहीं ह्मणतां पंडिता रमाबाई व मि० महादेव कृष्ण पाध्ये यांनीं या शिक्षणपद्धतीवर १।२ निबंध लिहिल्याचें आह्मांस आढळून आलें. ते वाचूनही आह्मास या विषयाचा फारसा बोध झाला नाहीं. त्यावरून इंग्रजी भाषेंत झालेले तीन ग्रंथ-१ मि० फ्रोबेल साहेबाचें बालोद्यानशिक्षणपद्धति (Education by development), २ मि० हंफ्रे साहेबाचे 'लाफ् लर्न' (हासतखेळत शिका) व ३ मि० एडवर्ड उईब साहेबाचे 'पारेडाईस चाईल्डहुड' ( बालांचें इंद्रभुवन ) हीं पुस्तकें आह्मीं आणवून वाचून पा... त्यापैकीं मि० फ्रोबेल यांनीं किंडरगार्टन् शिक्षणपद्धति या विषयावर जो ग्रंथ लिहिला आहे, त्याचा थोडक्यांत सारांश काढण्याच्या आह्मीं खटपट लागतों. परंतु तो ग्रंथ फार शास्त्रीय व गहन असल्यामुळें, आह्म... भाषांतर करण्यास मोठी अडचण भासूं लागली. तथापि आमचे विद्वान मित्र रा. रा. जगन्नाथ मोरेश्वर सावंत बी. ए. एल्एल्. बी. वकील यानीं सदर पुस्तक व दुसरीं कांहीं पुस्तकें वाचून एक निबंध लिहिला तो आह्मीं आज सर्व मंडळीस सादर करीत आहों.

या विषयाचे बालोद्यानशिक्षणमीमांसा व बालोद्यानशिक्षणपद्ध... असे दोन विभाग करून, त्यांपैकीं पहिल्या भागाचा सारांश दे... त्यानंतर दुसरे भागाबद्दलही थोडक्यांत माहिती देण्याचा आमचा ... विचार आहे. वरीलप्रमाणें साहित्य जुळवून गेल्या जून महिन्याप... रून त्या पद्धतीवर सरस्वतीमंदिरांत एक वर्ग सुरू करण्यांत आल...

मास्तरीण एकटीच असल्यामुळें, व मंदिराबद्दलची माहिती अजून सर्व लोकांस नसल्यामुळें, त्या ठिकाणीं हल्लीं १२।१५ पेक्षां जास्त मुलें येऊं लागलीं नाहींत, परंतु जीं नियमानें येतात, त्यांचा अभ्यास फार चांगल्या रीतीनें चालला आहे, हें बालोद्यानासंबंधानें कांहीं मासले दाखवून आज आह्मी सर्व मंडळीस सिद्ध करून दाखवणार आहों. यावरून इतर मुलींच्या शाळेंतील शिक्षणपद्धतीपेक्षां या शिक्षणपद्धतीपासून किती फायदा होण्याजोगा आहे हें सर्वांस सहज दिसून येणार आहे. आमच्या मनांतून ही शाळा सुधारून येथें ६ इयत्तेपर्यंत बालोद्यान शिक्षणपद्धतीवर अभ्यास सुरू करण्याचा विचार आहे. परंतु तसें करणें लोकाश्रयावर अवलंबून आहे, इतकें सांगून आह्मीं मुख्य विषयाकडे वळतों.

## बालोद्यानशिक्षणमीमांसा.

बालोद्यानशिक्षण हा शब्द पुष्कळाच्या ऐकण्यांत आहे. परंतु इतर शिक्षणपद्धती अधिक फायदेशीर, सर्वथैव दोषरहित व साहजिक आहे, ही गोष्ट बालोद्यानशिक्षणाची पद्धति आपलेकडे फारशी प्रचारांत नसल्यामुळें, पुष्कळांस ठाऊक नसण्याचा संभव आहे. एकाद्या वस्तूची खरी योग्यता, व उपयुक्तता आपणास ठाऊक नसल्यामुळें, वस्तूचा अपरिचितपणा व नवेपणा [ ह्मणजे वस्तुतः आपलें अज्ञान ] त्या वस्तूविषयीं आपले मनांत तिटकारा व द्वेष उत्पन्न करितो, व त्या वस्तूचें यथार्थ ज्ञान करून घेण्यास आपण होऊन आह्मीं क्वचित्‌च प्रवृत्त होतो. परंतु त्या वस्तूकडे दुरून दुरून अथवा डोळे मिटून न पाहतां, जवळून व डोळे उघडून पाहिलें असतां, द्वेष व तिटकारा यांचे स्थळीं प्रीति व आदर उत्पन्न होतील. ह्मणून बालोद्यानशिक्षणासंबंधानें या निबंधांत त्रोटक माहिती देण्याचा विचार आहे.

शिक्षणाचा उद्देश हा आहे कीं, प्रत्येक मनुष्यानें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें करावें, व आपलें व समाजाचें हित साधावें. परंतु

समाजाचें हित तर एकीकडेसच राहो, पण स्वतःच्या सुखाला अवश्य असे सदाचार, बुद्धिमत्ता, विद्याव्यासंग, उद्योग, दृढनिश्चय, स्वाभिमान, विनय, दूरदर्शीपणा, चौकसपणा, स्वावलंबन, कर्तबगारी इत्यादि सद्गुण विद्यापीठांतून निघालेल्या बऱ्याच लोकांचे अंगीं दृष्टीस पडत नाहींत! याचें कारण प्रचलित शिक्षणपद्धतीचे मुळाशीं बरीच गोम असली पाहिजे, हें होय.

पद्धतशीर शिक्षण कसें द्यावें, यासंबंधानें जर्मनींत प्रथम विचार सुरू झाला; व मनुष्याचें व विशेषतः बालस्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण करून, जर्मन पंडित फ्रोबेल यांनीं बालोद्यानशिक्षणपद्धति प्रचारांत आणली; व दिवसेंदिवस युरोपांत व अमेरिकेंत या शिक्षणपद्धतींत सुधारणा करण्याकडे विचारी लोकांचें लक्ष्य लागत चालल्यामुळें, या बालोद्यान शिक्षणाची सामान्य कल्पना तरी सर्वांच्या कानीं पडावी, व डोक्यांत कल्पना आल्यावर व या पद्धतीची उपयुक्तता पाहिल्यावर, कालांतरानें तरी ही शिक्षणपद्धती आपल्यामध्यें प्रसृत होईल, या आशेनें खालील निबंध लिहिला आहे.

उपयुक्त शिक्षणाचा संबंध व त्याची वाढ हीं, मग तें शिक्षण लहान मुलाचें असो किंवा मोठ्याचें असो, दृश्य वस्तूंवर अवलंबून असतात एवढेंच नव्हे, परंतु एकाच वेळीं दृश्य व दर्शक वस्तूंचा उपयोग करावा हें शिक्षणापासून कळतें. अदृश्य परंतु चिरस्थायी अशा प्रकारचा सर्वत्र भरलेला सारांश दर्शकाचे द्वारें जड सृष्टीचे ठिकाणीं ओळखला जातो, व जड व चित् यांचा निकट संबंध कळून येतो. या परस्परांचा संबंध दाखवणारी वस्तु, ह्मणजे शब्दांशीं संबंध असलेली वाणी होय, व लिहिणेंवाचणें होय.

लहान मुलांची लिहिणेंवाचणें शिकण्याची इच्छा ही उद्योग व जिज्ञासा यांचें दर्शक होय. मुलांना ही इच्छा चळवळ व जिज्ञासा ह्यांपासून उत्पन्न होते. आपले वडील नातलग चोहोंकडे लक्ष्य देतात, हें पाहून आपणही सर्वत्र असलेल्या वस्तूंपैकीं एक आहों, अशा विचा-

रांची ही इच्छा दर्शक होय. ही इच्छा मुलांचे ठायीं कमी अधिक स्वाभिमान असेल, त्या प्रमाणें कमीजास्ती असते. याच इच्छेच्या योगानें आपला बाप व विशेषतः आपली आई कांहीं काम करीत असली, ह्मणजे त्यांस आपण हातभार लावून आपणही कांहीं करावें असें त्यांस वाटतें. मुलांना दोन कारणांमुळें असें वाटतें. हीं कारणें ह्मटलीं ह्मणजे एकाच वेळीं आपण पूर्णपणें स्वतंत्र व्यक्ति, व आपण सभोंवार पाहत असलेल्या सृष्टीपैकीं, एक भाग आहोंत असें वाटणें होय. आपण सृष्टीचा भाग असला तरी स्वतंत्र व पूर्ण व्यक्ति आहों, हा विचार प्रत्येक मुलांत थोड्याबहुत प्रमाणानें बीजावस्थेंत असतोच. मुलांमध्यें असलेल्या या विचाराचें अस्तित्व सूक्ष्म रीतीनें पाहणें, कबूल करणें, व या विचारास योग्य रीतीचें वळण देणें, हें मनुष्याच्या खऱ्या शिक्षणाचा पाया ह्मणजे आरंभ व वाढ होय.

मुलांच्या या मनोवृत्तीकडे दुर्लक्ष्य करून त्यांशीं वागल्यास शिक्षणाचा परिणाम चांगला होत नाहीं. आपण पूर्ण व आपण सृष्टीचा भाग ( घटकावयव ) आहों, असें नेहमीं प्रत्येक गोष्टीमध्यें मुलांस वाटतें. इतर वस्तूंशीं तुलना केली असतां, ( विशेपतः वडील माणसें आपणाहून भिन्न आहेत असें मुलांस तेव्हांच दिसतें. ) आपण पूर्ण व स्वतंत्र व्यक्ति आहों, असें मुलांस वाटतें. जेव्हां वडील माणसें जवळ बसून मुलाची बुद्धी वाढवणाऱ्या खेळाकडे त्याचें मन वळवितात, तेव्हां ही सर्व साध्य करणारी बुद्धि विशेप जागृत होते. अशा वेळीं सर्व वस्तूंला ज्ञानभांडारांत एकत्र करणाऱ्या बुद्धिरूपी अदृश्य संबंधाचें अस्तित्व मुलांचे मनावर न समजतां ठसतें. याशिवाय अतिशय जवळचे व अतिशय दूरचे यांचा संबंध दाखवणारी, एक दृश्य व मनावर तात्काळ परिणाम करणारी अशी वस्तु ह्मणजे, लिहिण्यावाचण्याची कला होय, असें त्यांस दिसून येतें. जी कला मुकी असून बोलणारी, मनुष्याचे मनावर नानाप्रकारचें चित्रविचित्र परिणाम करणारी, व जी मनुष्यांस सुख, दुःख आनंद व शोक देणारी, व जिचे ठिकाणीं मनुष्यास हास-

विण्याची व रडवण्याची शक्ती आहे त्या लेखनवाचन कलेकडे मुलांचें लक्ष जातें. लिहिणें व वाचणें हीं विशेषाचा सामान्याशीं, व भागांचा इतर भागांशीं संबंध जोडणारीं साधनें आहेत, हें पाहून आपला सृष्टीशीं दोन प्रकारचा संबंध आहे, हें मुलांच्या सामान्येंकरून लक्ष्यांत येतें. मुलांच्या पत्र लिहिण्याच्या उत्कट हौसेंत हा दोन प्रकारचा संबंध अगदीं स्पष्ट दिसतो. कागदावर कांहीं तरी वेड्यावांकड्या रेघा ओढून, अथवा कागदाच्या कशावशा घड्या करून, आपण कोणास तरी पत्र पाठवित आहों, अशीं मुलें समजूत करून घेतात. अथवा परगांवचें आपल्या नातलगाचें पत्र ह्मणून कांहीं तरी कागद घेऊन मजकूर वाचीत असतात. अशा या मुलांच्या कृती सकारण आहेत. पहिलें कारण ह्मणजे आपण स्वतंत्र व पूर्ण व्यक्ति आहों, असें मुलांस वाटतें. दुसरें कारण सर्व सृष्टीचा आपण भाग असल्यामुळें, आपली वाढ सृष्टीशीं तादात्म्यसंबंधानेंच होणार आहे असें वाटतें. तिसरें कारण ह्मटलें ह्मणजे एकसमयावच्छेदेंकरून आपण पूर्ण व्यक्ति व भाग आहों, हें दाखवण्याकरितां त्यांची इच्छा व प्रयत्न चाललेला असतो. चौथें कारण ह्मटलें ह्मणजे ज्याप्रमाणें रोपाचें झाड होण्यास सूर्यकिरणें, जमिनीची उष्णता, हवा, व पाणी हीं अवश्य आहेत, त्याप्रमाणें मुलांच्या सर्व तऱ्हेनें पूर्ण वाढीस आईची ममताळू वागणूक, बापाची योग्य विचारपूस, व इतर आप्तांची सहानुभूति अवश्य आहेत. तेव्हां मुलांस शिक्षण देणाऱ्यांनीं लक्ष्यांत ठेवावें कीं, मूल हें सर्वव्यापी चैतन्यसमाजाचा एक सभासद होय, हें लक्ष्यांत धरूनच त्याची सर्व तऱ्हेनें वाढ होईल असें शिक्षण त्यास दिलें पाहिजे. मुलांच्या इच्छा व कृती व बोलणें यांकडे लक्ष्य दिलें असतां, मुलांविषयींचें वरील वर्णन बरोबर आहे असें लक्ष्यांत येईल व मला लिहायास वाचायास शिकवा असें मुलाचें ह्मणण्याचें बीजही यांतच आहे असें दिसून येईल. लिहिण्याची इच्छा मुलांस कां उत्पन्न होते हें वर सांगितलेंच आहे. व ही इच्छा उत्पन्न होतांच मुलांचे समोर साध्य दिसूं लागतें, व त्या योगानें त्यांस आनंद होतो. परंतु योग्य क्रमानें न जातां, इच्छा

उत्पन्न झाल्याबरोबर साध्याकडे उडी मारणें मोठें धोक्याचें आहे. यामुळें व्यक्तीचें, समाजाचें व राष्ट्राचें अहित होतें, व सर्वांस वाईट परिणाम भोगावा लागतो. परंतु ही चुकी शिक्षण देणाऱ्यांच्या लक्ष्यांत अद्याप आलेली दिसत नाहीं. या चुकीची दुरुस्ती करणें फार सोपें आहे. ज्या शिक्षणाचा परिणाम कायम राहील अशा प्रकारचें शिक्षण असलें पाहिजे. प्रचलित मानवी शिक्षणाहून भिन्न असणारें निसर्ग शिक्षण, ह्मणजे सृष्ट पदार्थांच्या ज्ञानाची क्रमशः अदृश्य रीतीनें होणारी वाढ, यापासून बरेंच शिकण्याजोगें आहे. मुलांस साधारण समजूं लागतांच, कोणतीही गोष्ट साध्य करून घेण्यास त्यांच्या शक्तीचा विकास झाला पाहिजे, व योग्य साधनांचा उपयोग योग्य रीतीनें केला पाहिजे, इत्यादि गोष्टी मुलांच्या लक्ष्यांत भरण्याजोग्या कृती, आईबापानीं किंवा शिक्षकांनीं मुलांकरितां वारंवार त्यांसमोर कराव्या, ह्मणजे पुढें कांहीं ज्ञान होण्याकरितां आपण हल्लीं कांहीं तरी करीत आहों, असा कंटाळवाणा विचार त्यांचे मनांत येणार नाहीं. मुलांची सृष्टींतील पदार्थांकडे स्वाभाविक ओढ असते. या प्रवृत्तीस आईबापांनीं साहाय्य केलें पाहिजे. नुसते पदार्थ पहाण्यानेंच मुलांची तृप्ति होत नाहीं, तर त्यांना कारणें जाणण्याची इच्छा होते, व ही इच्छा पुरी केली पाहिजे. साध्य व साधनें अगदीं जवळ जवळ असावीं, ह्मणजे त्यांचा कार्यकारणसंबंध मुलांचे सहज लक्ष्यांत येईल. व साधनें मुलांच्या शक्तीप्रमाणें कमजास्त आकारांचीं व वजनाचीं असावीं. मुलानें एखादी कृति सहज केली ह्मणजे ती त्याचे सहज लक्ष्यांत येते. इतर कलांप्रमाणें लिहिण्याच्या कलेंतही परस्पर विरुद्ध अशा गोष्टींचा मिलाफ करावयाचा असतो, ह्मणजे सजीव असा शब्द व निर्जीव अशी लेखणी यांचा संयोग, मुलांची इच्छा व कार्यक्षम लेखणी यांचा संयोग, हा जड व चैतन्य यांचा संयोग होय. मुलांस लिहिण्याची इच्छा उत्पन्न झाली ह्मणजे आपण लिहिलेलें दुसऱ्यांनीं वाचावें असें त्यांस वाटतें. याही इच्छेचा आईबापानीं व शिक्षकांनीं फायदा घेतला पाहिजे. व पदार्थ समोर ठेऊन

त्यासंबंधाची माहिती शब्दांनीं दिली पाहिजे. खऱ्या शिक्षणाची इमारत मुलांच्या इच्छारूप पायावर उभारलेली असते. मुलांची इच्छा व प्रवृत्ती पाहून त्या इच्छा भागविणें, व त्या प्रवृत्तीस योग्य वळण देणें, हेंच खरें शिक्षण होय. मुलांस आपण पूर्ण व स्वतंत्र व्यक्ति आहों, असें जें वाटत असतें, त्या वाटण्याचा फायदा घेऊन शिक्षण दिलें पाहिजे. मुलांच्या आप्तांचीं नांवें आपणांपासून ते भिन्न आहेत असें मुलांस दाखवितात, परंतु मुलांस त्याचें स्वतःचें नांव ठाऊक झाल्यावर आपण स्वतंत्र व पूर्ण व्यक्ती आहों, असें त्या नांवानें त्यास हाक मारतांच त्यास समजतें. तेव्हां शिक्षणाची सुरवात, वाढ व पर्यवसान, इतर वस्तूंचा मुलांबरोबर (स्वतःशीं) काय संबंध आहे, हें मुलांचे लक्ष्यांत सहज आणणें हें होय. आईबापांच्या ही गोष्ट लक्ष्यांत आल्यास, मुलांची इच्छा व कृती आईबापांच्या इच्छेविरुद्ध होत नाहीं. मुलांची इच्छा व प्रवृत्ती जाणून शिक्षण दिलें असतां मुलांमध्यें जोमदारपणा व स्वावलंबनादि सद्गुण लहानपणापासून येतात. मुलांच्या शिक्षणाशीं आईबापांचा संबंध, बियांचें झाड होण्यास सूर्याच्या व पाण्याच्या संबंधासारखा आहे, ह्मणजे बीजरूपानें असलेल्या ज्ञानादि शक्तींची वाढ करण्यास आईबापांनीं मदत करणें एवढेंच त्यांचें काम होय.

शिक्षण ह्मणजे कांहीं बाह्य पदार्थ आहे असें मुलांस कधींही वाटूं देऊं नये. हल्लींची शिक्षणपद्धति मुलांस अहितकारक आहे, व जरी हल्लींच्या शिकवल्या जाणाऱ्या शिक्षणांतील कांहीं गोष्टींचा पुढें कांहीं उपयोग होण्याजोगा असतो, तरी मुलांची नजर इतकी दूरवर पोहोंचणें साहजिक नाहीं; व लहानपणीं त्यांस दिलेल्या हल्लींच्या शिक्षणांत रम्यपणा व उपयुक्तता कांहींच न दिसल्यामुळें, शिक्षण ह्मणजे त्यांस ओझें वाटतें. हल्लींची शिक्षणपद्धति प्रथमपासूनच लहान तोंडीं मोठा घास घेऊं पहाते, ह्मणजे अगदीं धुळाक्षर शिकवण्यापासून तों तहत उच्च प्रतीचे शिक्षणापर्यंत एकाच पद्धतीचें अवलंबन करते; ह्मणजे मुलांस

केव्हांच सोडून दिला असता. तेव्हां ' दुःख पहातां जवापाडें सुख पर्वतायेवढें ' हें खरें. कीर्तनामध्यें, भजनाचे वेळीं किंवा चैनीखातर आलाप घेण्याचे वेळीं वाटेल तर शुद्रकवीची गी लोक ओढोत, किंवा उद्दिष्ट कार्य सफल झालें नाहीं म्हणजे निराशा होऊन जें औदासिन्य प्राप्त होतें त्याच्या भरांत किंवा स्मशानवैराग्याच्या तडाक्यांत वरील वचनास माना डोलवोत, इतर सर्व प्रसंगीं व्यवहारामध्यें तरी त्यांस ' सुखसागर-वाद 'च मान्य आहे हें निर्विवाद आहे. तेव्हां सुख म्हणजे काय व तें प्राप्त करून घेण्यासाठीं मनुष्यमात्र कोणते प्रयत्न करीत आहे व त्यांत त्यास कितपत यश येत आहे, हे प्रश्न फार महत्वाचे होत. त्यांच्या विचारापासून काय निष्पन्न होतें तें पहावें.

सुखाचें लक्षण सांगणें फारच कठिण आहे. सुखाचें न्यायशास्त्रोक्त लक्षण बहुतेक दुरापास्तच आहे. तेव्हां त्याचें साधारण अनुभवास पटेल असें वर्णन करण्याचा प्रयत्न करणें बरें. जो मनोविकार किंवा जी मनाची वृत्ति आपणास प्रिय वाटते आणि जी अशीच पुढें चालेल तर बरें म्हणजे जिचें सतत वास्तव्य आपणास इष्ट असतें आणि जिच्या प्राप्तीसाठीं व प्राप्तीनंतर जिच्या चिरस्थायित्वासाठीं प्रयत्न करण्यास आपण तयार असतों त्या मनाच्या वृत्तीस सुख म्हणतात. अर्थात्च ह्याच्या उलट दुःख. ज्या वृत्तीस दुःख म्हणतात ती आपणास सर्वथैव अप्रिय असते; ती प्राप्त व्हावी म्हणून आमची कधींच इच्छा नसते व त्यामुळें तत्प्राप्त्यर्थ कोणाचा कधींच प्रयत्न होत नाहीं. असें असतांही जर तिचा दुर्दैवानें आपणावर पगडा बसलाच, तर तिची व्याद कधीं एकदांची दूर होईल म्हणून आपले निरंतर उपाय चाल-तात हें उघडच आहे. हीं प्रिय मनोवृत्ति म्हणजे सुख कशी उत्पन्न होतें तें पाहूं. प्रथम मला अमुक एक असावें अशी इच्छा उत्पन्न होते. ती इच्छा तृप्त झाली म्हणजे मला सुख किंवा हर्ष होतो. मला भूक लागली म्हणजे कांहीं खावयास पाहिजे अशी इच्छा झाल्यानंतर खाण्यास मिळून भूक शांत झाली म्हणजे मला सुख होतें. तेंच

खाण्यास मिळालें नाहीं ह्मणजे दुःख होतें. ह्याचप्रमाणें तहानेची गोष्ट आहे; आणि ह्याचप्रमाणें सर्वप्रकारचा कपडा, दागिने, संसारोपयोगी वस्तू, पैसा, संतति, संपत्ति, मान, सत्ता, विद्वत्ता इत्यादि विविध विषयांच्या इच्छांची गोष्ट आहे. कोणतीही इच्छा तृप्त झाली अर्थात् तिचा उद्दिष्ट विषय तिला मिळाला ह्मणजे सुख होतें; नाहीं तर दुःख होतें. इष्टवस्तूची प्राप्ति ही ज्याप्रमाणें सुखकारक आहे त्याचप्रमाणें पूर्वानुभूत सुखांची स्मृतिसुद्धां सुखकारक आहे. लहानपणीं आपण जे साधे निरुपद्रवी खेळ खेळलों व ज्या मौजा मारिल्या, त्याचप्रमाणें विद्यार्थिदशेंत नवीन नवीन गोष्टी शिकत असतां आपणास जो आनंद झाला, जगाची कोणत्याही प्रकारची काळजी किंवा पर्वा न करितां सर्वमान्य ग्रंथांच्या परिशीलनांत व विद्वान् अध्यापकांचे सहवासांत आपला जो काळ मोठ्या मौजेनें गेला, त्याची आठवण होऊन कोणास आनंद होत नाहीं? शरीरास व मनास व्यापून दोहोंसही उचंबळून सोडणाऱ्या प्रत्यक्ष अनुभवास येतअसलेल्या वर्तमान आनंदापेक्षांही प्रागनुभूत सुखांच्या स्मृतीपासून उत्पन्न होणाऱ्या शांत व सौम्य आनंदाची मातबरी पुष्कळांस अधिक वाटते. ह्या दोहोंशिवाय तिसराही एक आनंदाचा झरा आहे. ज्या विषयांच्या प्राप्तीसाठीं आपले प्रयत्न सतत चालले आहेत, ते विषय आपणास प्राप्त झाल्यानें पुढें प्रत्ययास येणाऱ्या सुखाची आजची कल्पनासुद्धां आल्हादकारक असते. ह्मणजे भूतकालीन सुखांचें स्मरण जसें सुखकारक असतें, त्याचप्रमाणें भविष्यमाण सुखांचें चित्रही अथवा ज्यास साधारणपणें मनोराज्य ह्मणतात तेंही मोदजनक असतें हें उघड आहे. प्रत्यक्ष अनुभव, स्मृति आणि इष्टप्राप्तीची कल्पना हे सुखाचे तीन मोहक प्रवाह एकत्र झाल्यानें मनुष्याच्या आनंदास भरतें येतें हें खरें. परंतु तशाच प्रकारच्या दुःखाच्या तीन अप्रिय ओघांनीं त्याच्या सुखसंचयांत माती मिसळून तो गढूळ होत आहे. कोणतीही इष्ट वस्तु प्राप्त झाली नाहीं ह्मणजे दुःख होतें हें वर सांगितलेंच आहे. ह्याशिवाय शेंकडों शारीरिक व्याधींपासून कसा त्रास भोगावा लागतो हें सर्वांच्या अनुभवास

येतच आहे. कायमच्या लहान मोठ्या शारीरिक व्याधींचें टुमणें पाठी-मागें नाहीं असा कदाचित् एकही मनुष्य सांपडणें विरळा. व्याधींच्या अभावापासून ह्मणजे आरोग्यापासून मोठासा आनंद होतो असें नाहीं; तथापि त्यांचें आगमन अत्यंत दुःखकारक असतें हें निर्विवाद आहे, त्याच-प्रमाणें आकस्मिक दुःखें किंवा अपघात ह्मणजे एकाएकीं उंच ठिकाणा-वरून पडणें, ठेंच किंवा ठोकर लागणें, घोड्याविड्याची लाथ लागणें, ह्मणजे ज्यांचा उद्भव बाह्य वस्तूंच्या आघातापासून किंवा अपायकारक स्पर्शापासून आहे अशीं दुःखें वेगळींच. ह्मणजे प्रत्यक्ष वर्तमान काळचें सुख जर केवळ इष्ट प्राप्तीनेंच अनुभवास येतें; तर प्रत्यक्ष वर्तमान दुःख निराशेनें, शरीरान्तर्गत अव्यवस्थेनें व बाह्य वस्तूंच्या आघातादिकांनें उत्पन्न होतें. दुःखाचा दुसरा झरा ह्मटला ह्मणजे स्मृति. पूर्वसुखांची स्मृति जशी आल्हादजनक असतें, त्याचप्रमाणें पूर्वीं अनुभविलेल्या दुःखांच्या स्मरणानें प्रत्यक्ष सुखाचा उपभोग घेत असतांनाही कोणाच्या मनास चटका बसत नाहीं!

बाई दुःखें सुखेंही चरित परिसतां आमुचा काय कोंदे!

मोरोपंत.

सीतेच्या वनवास दुःखांचें वर्णन ऐकत असतांना तिच्या भावजयांनीं काढिलेल्या या उद्गारास कोणाचें अनुमोदन मिळणार नाहीं? कालगतीनें दुःखाचा चटका किंवा तडाखा, सह्य होतो, ह्मणजे त्याचा तीक्ष्ण कांटा बोथट होऊन त्याच्या स्मरणापासून आपणास असह्य वेदना होत नाहींत व अखेरीस कांहींच वेदना होत नाहींशा होतात हें खरें; तथापि त्यायोगें स्मृतिजन्य दुःख मुद्लींच लोप पावत नाहीं. एखाद्या विशेष दुःखाचें स्मरण अगदीं सह्य अथवा निरुपद्रवी होण्यास जो काळ लोटावा लागतो तितक्या काळांत दुसरीं संकटें, अरिष्टें, किंवा दुःखें उत्पन्न होतात. एकंदरींत स्मृतिजन्य दुःखाचा अनुभव घेण्यास नको असा काळ मनुष्याच्या आयुष्यांत क्वचित्च येत असेल; आणि जरी तसा काळ येत असला, तरी स्मृति हा एक दुःखाचा उगम आहे ह्या

विधानास त्यानें कांहींच बाध येत नाहीं. सुखाप्रमाणेंच पुढें उत्पन्न होणाऱ्या संभवनीय दुःखांच्या आजच्या कल्पनेनें किंवा चित्रानेंही मन वारंवार उद्विग्न होतें. आणि ह्या भविष्य कालविषयक संदिग्ध दृष्टीनें उत्पन्न होणारें दुःख मनुष्याच्या आयुष्यांतील एकंदर दुःखाचा बराच मोठा भाग आहे. हा दुःखनिर्झर मनुष्यमात्राचाच विशेष आहे. इतर प्राण्यांस अशी दूरदृष्टि नसल्यामुळें त्यांस हें कल्पनाजन्य दुःख भोगावें लागत नाहीं. असो; तात्पर्य इतकेंच कीं सुखाच्या शुभ्र गंगेस दुःखयमुनेचा जो कृष्ण प्रवाह मिळत आहे, तो कांहीं कमी दांडगा आहे असें नाहीं.

येथपर्यंत सुखें म्हणजे काय व तीं साधारणतः कशीं प्राप्त होतात ह्या मुद्यांचें विवेचन झालें. आतां सुखप्राप्तीसाठीं मनुष्याचे कसकसे प्रयत्न चालले आहेत व त्यांस कितपत यश येत आहे ह्याचा विचार करूं.

प्रथम शारीरिक सुखासंबंधानें शरीरवृद्धीस व शरीरपोषणास अन्न, पाणी आणि हवा ह्यांची फार आवश्यकता आहे. तीं जितकीं चांगलीं व स्वच्छ मिळतील तितकीं मिळविण्याचा इलाज चाललाच आहे. अर्थात् वैद्यशास्त्रदृष्ट्या आम्हीं शरीरपोषण व वृद्धि ह्यांचा विचार करीत नाहीं, तर केवळ सुखदृष्ट्या होय. अर्थात् चांगलें अन्न, चांगलें पाणी व चांगली हवा मिळाल्यानें शरीरास सुख होतें. अन्नासंबंधानें त्याच्या कसावरच आपली दृष्टि नाहीं, तर त्याच्या विविधतेवरही आमचें पूर्ण लक्ष आहे. नेहमींच्या जेवणांतही नानाप्रकारच्या भाज्या, चटण्या, कोशिंबिरी ह्यांची आपण योजना केली आहे व त्याचप्रमाणें पक्वान्नांच्या परोपरी निघाल्या आहेत व निघत आहेत. पाण्याविषयीं आजपर्यंत आमची दृष्टि केवळ स्वच्छता व मधुरता यांकडेच विशेष होती. आणि पाण्याशिवाय इतर कांहीं पेय रसांची जरी आह्मांस माहिती होती तरी मुसलमान व इंग्रज ह्यांच्याच परिचयापासून पेयांच्या परोपरीकडे आमचें विशेष लक्ष लागलें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. निरनिराळीं सरबतें, सोडा, लेमनेड, जिंजर,

रास्पबेरी, कोल्डड्रिंक, चहा, काफी, कोको इत्यादि विविध पेयांचा आमच्या रसनेस परिचय होत चालल्यामुळें त्यांचाही आह्मांस शोक लागत आहे. हवेच्या स्वच्छतेसंबंधानेंही दिवसेंदिवस अधिक काळजी घेतली जात आहे. शहरोशहरीं म्युनिसिप्यालिट्यांची स्थापना होऊन त्यांजकडून शहराची सफाई होत चालली असून पाश्चात्य पद्धतींनीं मलमूत्रादिक घाणींच्या निकासाचाही योग्य बंदोबस्त अमलांत येत आहे. ह्याप्रमाणें अन्न, पाणी, हवा ह्या मुख्य आवश्यक गोष्टींच्या संबंधानें सुखदृष्ट्या आह्मीं कोणती सुधारणा करीत आहों ह्याचें थोडक्यांत निदर्शन झालें. त्याचप्रमाणें शरीररक्षणास साधारणपणें आवश्यक अशी जी आणखी एक बाब वस्त्र तिच्याविषयींही सुखदृष्ट्या आह्मी मागें पडलों नाहीं. साधारण नेहमींच्या पोषाखापासून कोणासही जरी सुख किंवा आनंद झाला नाहीं, तरी त्यापासून शीतोष्णांच्या अतिरेकानें होणाऱ्या दुःखाचें निवारण होतें ह्यांत संशय नाहीं. परंतु केवळ दुःखनिवारणाकडेच पोषाखाच्या बाबतींत आमचें लक्ष नसून प्रत्यक्ष सुखाच्या वृद्धीचाही आह्मीं योग्य विचार करीत आहों. पूर्वीं बाराबंदी व आंगरखा वगैरे थोड्याशा प्रचारांत असणाऱ्या कपड्यांचे ऐवजीं आतां सदरा, शर्ट, जाकिट, पेटी, नानातऱ्हेचे कोट, फरगोल इत्यादि ज्या अनेक कपड्यांची आह्मांस परकीयांच्या संसर्गानें ओळख होत चालली आहे, त्यांचा आह्मी उदार मनानें स्वीकार करीत आहों. याशिवाय डोकें व पाय ह्यांच्या आच्छादनांतही सुखकारक फरक कोणते करावे ह्या प्रश्नाचा आह्मी मोठ्या बारकाईनें खल करीत आहों. परिधान करण्याच्या वस्त्रांची संख्याच वाढविण्यांत केवळ आह्मीं गुंग झालों आहों असें नाहीं, तर त्यांचें सौंदर्य व स्पर्श ह्यांच्याकडेही आह्मी कानाडोळा करीत नाहीं. शिवाय दागिन्यांचीही आमची प्राचीन रुचि कमी होत चालली आहे असें वाटत नाहीं. आणि दागिन्यांनीं जरी शरीरास प्रत्यक्ष आराम झाला नाहीं, तरी त्यांनीं मनास सुख होत नाहीं असें कोण ह्मणेल? एऱ्हवीं स्त्रीजातीचा अलंकारविषयक एवढा जबरदस्त ओढा कसा बरें चिरस्थायी झाला असता? तेव्हां सुखाच्या दृष्टीनें अलं-

कारांचें महत्व कांहीं कमी नाहीं. ह्या विवेचनांत रस, रूप, व स्पर्श ह्या, रसना, चक्षु व त्वचा ह्या इंद्रियांच्या विषयांचा सुखदृष्ट्या विचार आलाच आहे. शब्द व गंध ह्यापासूनही सुखोत्पत्तीची वृद्धि आह्मी करून घेत आहों. निरनिराळ्या तऱ्हेचीं जुनीं नवीं वाद्यें आणि तेलें, अर्क, अत्तरें इत्यादि काळीं, सेंट्स्, परफ्यूमस इत्यादि गोरी सुवासिक द्रव्यें ह्यांचाही प्रसार वाढत चालला आहे. ह्याप्रमाणें इंद्रियजन्य सुखाची वृद्धि व्हावी ह्मणून इंद्रियप्रिय विषयांच्या विविधतेचा विस्तार वाढविण्यांत आह्मी कायावाचामनानें दीर्घ प्रयत्न करित आहों आणि इंद्रियजन्य सुखांतच आह्मी केवळ मग्न होऊन राहिलों नाहीं, तर मानसिक सुखाकडेही आमचें पूर्ण लक्ष आहे. इंद्रियजन्यसुख व मानसिक सुख ह्यांमधील भेद जरी न्यायशास्त्रदृष्ट्या शुद्ध नसला तरी तो वास्तविक आहे. दारूकाम पाहिल्यानें व कादंबरी वाचल्यानें मला सुख होतें. दोन्ही प्रसंगीं डोळे व मन ह्यांचा समकालीन व्यापार चालला पाहिजे. मन जर ठिकाणावर नसेल तर निवळ डोळ्यांच्या द्वारें दारूकाम पाहण्याचें सुख किंवा कादंबरी वाचनाचें सुख प्राप्त होणार नाहीं; त्याचप्रमाणें मनाची उत्सुकता असतांहीं इंद्रियव्यापाराचे अभावीं कोणतेंच सुख अनुभवास येत नाहीं हें उघड आहे. असें असतां ह्मणजे दोहोंसही डोळ्यांची व मनाची आवश्यकता असतां, दारूकाम पाहिल्यापासून होणाऱ्या सुखास इंद्रियजन्यसुख व कादंबरी वाचल्या-पासून होणाऱ्या सुखास मानसिक सुख कां ह्मणावें हा प्रश्न उपस्थित होतो. त्याचें थोडक्यांत उत्तर असें कीं, जरी दोन्ही सुखांस इंद्रि-याची व मनाची गरज आहे, तरी त्यांस त्यांची सारखीच गरज नाहीं. पहिल्यास मनापेक्षां इंद्रियाची आवश्यकता अधिक आहे व दुसऱ्यास इंद्रियापेक्षां मनाची जरूर अधिक आहे. दारूकाम पहात असतां मनामध्यें इतर विचार जरी थोडेसे आले, तरी समोरील देखाव्यापासून होणाऱ्या सुखांत कांहीं विशेष कमतरता होते असें वाटत नाहीं. ह्यामुळें अशा वेळीं प्रेक्षक लोक कधीं कधीं इतर सुलभ व स्वल्प विषयावरील संभाषणांत गुंतलेले असतात; अथवा असे विचार त्यांच्या मनांत येत असतांही ते त्यांस दवडण्याचा प्रयत्न करीत नाहींत.

परंतु तेंच कादंबरीवाचन जरी डोळ्यांशिवाय व्हावयाचें नाहीं, तरी डोळ्यांपेक्षां तत्सुखानुभवास मनाचीच आवश्यकता अधिक आहे. मनांत जर अन्य विचार येत असले तर डोळ्यांनीं कितीही वाचलें तरी वाचनसुखाचा अल्पांशही अनुभवास यावयाचा नाहीं. ह्मणून इंद्रियापासून किंवा इंद्रियद्वारा होणारें जें सुख तें इंद्रियजन्यसुख व मनाच्या द्वारें होणारें जें सुख तें मानसिक सुख असा जो त्या पदांचा सकृद्दर्शनीं अर्थ मनांत येतो तो ठीक नाहीं. तर ज्या सुखांत इंद्रियव्यापाराचा अंश मनोव्यापारापेक्षां जास्त आहे त्यास इंद्रियजन्यसुख ह्मणतात आणि ह्याच्या उलट ज्यामध्यें मनोव्यापाराचा अंश इंद्रियव्यापाराहून अधिक असतो त्या सुखास मानसिक सुख ह्मणतात. हा दोहोंमधील फरक वरील विवेचनावरून उघडच आहे. एवंच मानसिक सुखाची वृद्धि करण्याचेही आमचे सतत प्रयत्न चालले आहेत. नाटकें, कादंबऱ्या, चरित्रें, प्रवासवर्णनें, इतिहास, काव्यें इत्यादि साधारण विषयक पुस्तकांचा संग्रह वाढता असून लोकांमध्येंही वाचनाची अभिरुचि प्रसार पावत आहे इतकेंच नव्हे, तर शास्त्रीय शिक्षणानें व शोधानेंही आमच्या मानसिक सुखाची वृद्धि होत आहे. बहुजनसमाजास जरी शास्त्रीय वाचनाची गोडी अद्यापि कमीच आहे तथापि शास्त्रीय विषयांच्या अध्ययनाची व वाचनाची गोडी अनुभवणारा वर्ग शिक्षणप्रसाराबरोबर प्रस्तुत होत चालला आहे आणि त्यामुळें मनुष्याच्या सुखसंपत्तीचा विकास होत आहे हें उघड आहे. मानसिक सुखाचें विवेचन बुद्धिसंबंधाचें आहे. ह्मणजे हीं सुखें प्राप्त करून घेण्यास बुद्धीस व्यायाम मिळून ती उच्चपदाप्रत पोंचली असली पाहिजे. अर्थात् सर्वच मानसिक सुखांच्या अनुभवास बुद्धीची सारखीच वाढ लागत नाहीं. कादंबरीवाचनाचें सुख प्राप्त करून घेण्यास बुद्धीची जितकी वाढ व्हावी लागते तिच्यापेक्षां शास्त्रीयवाचनाची मधुरता प्रत्ययास येण्यास फारच जास्त वाढीची आवश्यकता आहे हें उघड आहे. मनास एकंदर तीन बाजू आहेत; अथवा त्याचें स्वरूप तीन प्रकारचें आहे; बुद्धि, विकार आणि प्रवृत्ति. ह्या तीन स्वरूपांस अनुसरून

मानसिक सुखांचेही तीन प्रकार आहेत. त्यांपैकीं बुद्धीच्या सुखांचें वर दिग्दर्शन केलेंच आहे. ह्या बुद्धीच्या सुखांप्रमाणेंच प्रीति, दया, अभिमान इत्यादि जे उच्च प्रतीचे मनोविकार आहेत, तत्संबंधाचीं सुखेंही आमच्या दृष्टीआड नाहींत. भूतदया, देशाभिमान इत्यादि विकारांची मर्यादा सार्वजनिक कर्तव्यमर्यादेबरोबर वृद्धिंगत होत आहे, त्यामुळें सदहू उच्च वृत्तींचें उज्वल स्वरूप पाहिल्यानें होणारा सुखानुभव अधिक परिचित होत चालला आहे. त्याचप्रमाणें सद्वर्तनाकडे प्रवृत्ति व अनीतीपासून निवृत्ति ह्यांपासूनही उत्पन्न होणाऱ्या सुखाकडे आमचें दुर्लक्ष नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, शारीरिक किंवा इंद्रियजन्य आणि मानसिक जीं एकंदर सुखें आहेत तीं झाडून सारीं प्राप्त करून घेण्याचा आमचा सतत कट्टा प्रयत्न चाललाच आहे. ह्मणजे तत्प्राप्त्यर्थ आह्मीं नेहमीं नवीन नवीन मार्ग शोधून काढीत असून त्यांचा सर्वत्र प्रसार करीत आहों.

अशा प्रकारें सुखप्राप्तीचे जे मनुष्याचे भगीरथ प्रयत्न जगाच्या आरंभापासून आजपावेतों सारखे सुरू आहेत, त्यांत कितपत यश येत आहे हाच काय तो सर्वांत अत्यंत महत्वाचा प्रश्न आहे. ह्याच्या निकालावर मनुष्याच्या एकंदर बहुतेक कृत्यांची, धडपडीची व व्यवहाराची योग्यता अवलंबून आहे. ह्मणून ह्या प्रश्नाचा निर्णय मोठ्या दक्षतेनें व निःपक्षपातानें झाला पाहिजे. साधारण लोकांचें ह्या प्रश्नासंबंधानें काय मत आहे किंवा काय मत असणार हें उघडच दिसत आहे. परंतु सुशिक्षित ह्मणविणाऱ्या लोकांचें आणि तत्त्ववेत्त्यांचें, त्यांतही विशेषेंकरून पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांचें, मत तसेंच असून ते लोकमताचाच अनुवाद करीत आहेत, व एकंदर सर्व प्राच्य राष्ट्रें, ज्यांनीं आज भूगोलावरील सर्व राष्ट्रांमध्यें आपला अम्मल थोडा बहुत बसविला आहे, व ज्यांच्या संमतीवांचून राजकीय वातावरणांत कोणताही महत्वाचा बदल कोठेंही होऊं शकत नाहीं, तीं सर्व प्राच्य राष्ट्रें आपल्या शब्दानें व कृतीनें त्याच मताचा प्रसार सर्वत्र करीत आहेत. तेव्हां बहुजनसमाजाच्या मताविरुद्धच नव्हे, तर सुशिक्षित लोकांच्या

व सुधारणागिरीच्या अत्युच्च शिखरावर चढलेल्या प्राच्य राष्ट्रांच्या मताविरुद्ध मत देण्याचें धाडस करणें ह्मणजे मूर्खपणाच होय. तथापि प्रस्तुत लेखकास आपलें वास्तविक मत लपवून ठेवण्यापेक्षां वरील मूर्खपणाच पदरांत घेणें अधिक बरें असें वाटत असल्यामुळें त्यानें वाचकांस त्रास देण्याचें पतकरिलें आहे. असो. सुखप्राप्तीसाठीं मनुष्याचे निरनिराळ्या दिशेनें जे प्रयत्न चालले आहेत असें वर निर्दिष्ट केलें आहे त्या एकंदर सर्व प्रयत्नांचा रोंख सुखसाधनांची वृद्धि करण्याचा आहे. सुख कसें उत्पन्न होतें ह्याची मीमांसा वर केलीच आहे शारीरिक सुख असो कीं मानसिक सुख असो, त्यास साधनाची जरूर आहे. हीं बाह्य साधनें वाढविण्याचे मार्गास मनुष्यमात्र लागला आहे. साधन जोंपावेतों आपल्या स्वाधीन असतें किंवा टिकतें तोंपर्यंतच तज्जन्य सुखाचा अनुभव आपणास प्राप्त होतो. साधन ज्या मानानें कमीजास्त चिरस्थायि असतें त्याच मानानें त्यापासून निष्पन्न होणारें सुखही कमीजास्त चिरस्थायि असतें. घ्राणेंद्रिय, रसनेंद्रिय आणि त्वगिंद्रिय ह्यांचे विषय गंध, रस व स्पर्श हे एतदिंद्रियद्वारा प्राप्त होणाऱ्या सुखाचीं साधनें होत. परंतु हीं साधनें उपभोगानेंच नष्ट होत असल्यामुळें त्यांचीं सुखें चक्षुरिंद्रिय व कर्णेंद्रिय ह्यांच्या सुखाच्या मानानें कमी दर्जाचीं होत; व त्यांतही रसनेंद्रियद्वारा प्राप्त होणारें सुख अत्यंत नीच प्रतीचें होय. कारण कीं, पेयें किंवा अन्नें उपभोगानें नष्ट होतात, व त्यांजपासून निष्पन्न होणारें सुख केवळ क्षणिक असतें. जिलबी किंवा सरबत जोंपर्यंत जिभेवर आहे तोंपर्यंतच रसनेंद्रियाचें सुख असतें; तेच पदार्थ गळ्याखालीं गेले कीं तें नाहींसें होतें. शिवाय जी जिलबी खाऊन ह्या क्षणीं मला सुखानुभव आला, ती जिलबी दुसऱ्या वेळीं मला किंवा कोणत्याही वेळीं दुसऱ्यास खावयास मिळावयाची नाहीं. अशा रीतीनें रसनेंद्रियाचा विषय एकदांच, क्षणभरच व एकासच उपभोगितां येत असल्यामुळें रसनेंद्रियद्वारा प्राप्त होणारें सुख अत्यंत नीच प्रतीचें होय. घ्राणेंद्रियाची पायरी वरची आहे. कारण कीं अत्तराचा एकच बिंदु जरी मीं आपल्याच हातास लाविला तरी त्याचा

उपभोग मला व इतरांसही कांहीं मिनिटेंपर्यंत सारखा मिळत असतो. ह्मणजे तो बिंदु मीं एकदांच वास घेतल्यानें नष्ट होत नसल्यामुळें त्याचा अनेक वेळां मला सुवास घेतां येतो आणि शिवाय त्याचा वास सभोंवतालच्या इतर मनुष्यांसही थोडाबहुत मिळतो. तथापि तो त्यांस पूर्ण समाधानकारक नसल्यामुळें व वाटेल त्या क्षणीं त्याचा त्यांस उपभोग घेतां येत नसल्यामुळें मंडळींमध्यें अत्तरानें भरलेली अत्तरदाणी आणून ठेविल्यानेंच मंडळींचें समाधान होत नाहीं, तर प्रत्येकास अत्तराचा अंश द्यावा लागतो. ह्याप्रमाणें गंध हा रसापेक्षां अधिक चिरस्थायि असून एकदांच हुंगण्यानें नष्ट होत नसल्यामुळें घ्राणेंद्रियद्वारा प्राप्त होणारें सुख रसनेंद्रियजन्य सुखाच्या वरच्या पायरीचें होय. ह्याच दृष्टीनें त्वगिंद्रियाचा नंबर घ्राणेंद्रियाचे वर लाविला पाहिजे. कारण वस्तूचा स्पर्श उपभोगानें नष्ट होत नाहीं; ह्यामुळें स्पर्शसुखाचा अनुभव मला किंवा दुसऱ्यासही अनेक वेळा मिळण्यास हरकत नाहीं. 'उपभोगानें प्रत्येक वस्तु खराब होते' अशी एक इंग्रजींत ह्मण आहे. ह्या ह्मणीस अनुसरून गादी, गिर्दी, तक्क्या इत्यादि प्रिय स्पर्शवस्तु जरी उपभोगानें नष्ट झाल्या नाहींत तरी त्या खराब होतात; व त्यांचा प्रिय स्पर्श तरी कालगतीनें नष्ट होतो हें उघड आहे. रस, गंध व स्पर्श ह्यांच्या सुखांत जरी वर सांगितलेली नंबरवारी लागते, तरी हीं तिन्ही सुखें शब्द व रूप ह्यांच्या सुखापेक्षां फारच हलक्या प्रतीचीं होत. कर्णेंद्रियानें प्राप्त होणारें सुख इतक्या कांहीं उच्च प्रतीचें आहे कीं, तत्त्ववेत्ते त्याची वरील तिहींपेक्षां निराळ्याच वर्गांत गणना करितात. गायन व वादन, चित्रें व मनोरम देखावे ह्यांनीं मिळणारें सुख, रस, गंध व स्पर्श ह्यांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे. कारण कीं, रस, गंध व स्पर्श ह्या विषयांपेक्षां शब्द व रूप हे विषय अधिक चिरस्थायि आहेत असें जरी निःसंशय ह्मणतां येत नाहीं, तरी ते विषय एकाच काळीं अनेकांस उपभोगितां येतात. शब्द हा उच्चार होत आहे तोंपर्यंतच टिकतो. गाणें किंवा बजावणें थांबलें कीं त्याचा उपभोगही संपलाच. ह्या दृष्टीनें शब्द हा

रसाप्रमाणेंच क्षणभंगुर होय. तथापि रसांत व शब्दांत अंतर आहे. रसाचा उपभोग घेतला ह्मणजे तो रस ज्या साधनांनीं ह्मणजे द्रव्यांनीं तयार झालेला असतो, त्या द्रव्यांचा पुन्हा त्या कामीं उपयोग करितां येत नाहीं. त्यांचाही उपभोगांतच नाश होतो. एक जिलबी खाल्ली ह्मणजे ज्या तूपसाखरेची ती बनली होती ती तूपसाखरही तिच्याबरोबरच नष्ट झाली. परंतु जी चीज ह्मटलेली किंवा वाजविलेली मीं ऐकिली. ती जरी गेली तथापि ती ह्मणणारा कंठ किंवा ती ज्यावर वाजविली होती तें वाद्य हीं जरी जगांतील सर्व वस्तूंप्रमाणें विनाशी असलीं तरी अक्षरशः क्षणभंगुर नाहींत; तीं बराच काळ टिकणारीं असून त्यांचा गायनवादनाचे कामीं पुन्हा उपयोग करितां येतो. ह्या दृष्टीनें शब्दसुद्धां चिरस्थायि आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. अथवा कर्णेंद्रियाच्या विषयाचीं द्रव्यें अधिक चिरस्थायि असल्यामुळें कर्णेंद्रियाचा विषय जो शब्द त्यास रसादिकांपेक्षां अधिक महत्व आहे. चित्रें, सुवस्तु, व रमणीय देखावे नैसर्गिक व कृत्रिम, हे नयनाल्हाददायक पदार्थ केवळ क्षणभंगुर नसून रसादिकांचे मानानें फारच दीर्घायुषी आहेत हें उघडच आहे. तसेंच शब्द व सौंदर्य हे विषय अनेक लोकांच्या समकालीन उपभोगास योग्य आहेत. समकालीन उपभोगाचे दृष्टीनें रसाचा नंबर ज्वेकडून पहिला आहे हें वर सांगितलेंच आहे. स्पर्श व गंध जरा वरच्या पायरीचे होत. तथापि शब्द व सौंदर्य ह्यांच्या मानानें त्यांची प्रत खालच्याच दरजाची होय. अत्तराचा घमघमाट व सुवास जरी एकाच वेळीं अनेकांस घेतां आला तरी शब्द व सौंदर्य ह्यांचा उपभोग फारच मोठ्या जनसमूहास एकसमयावच्छेदानें घेतां येतो हें उघड आहे. नाहींतर नाटकगृहांप्रमाणेंच मोठमोठीं सुगंधगृहें अस्तित्वांत येण्यास काय प्रत्यवाय होता. ज्याप्रमाणें शेंकडों लोक एकत्र जमून एकाच काळीं संगीतांत मग्न होऊन जातात किंवा बागबगीचे, प्रदर्शनें, वनश्री व इतर देखावे पहाण्यांत रममाण होतात. त्याप्रमाणें सुगंधाचा उपभोग जर शेंकडों लोकांस तितक्याच खर्चानें त्याच वेळीं प्राप्त होण्यासारखा असता, तर सार्वजनिक असरखाने,

सुवासगृहें किंवा सुगंधसमाज ह्यांची स्थापना इकडे नाहीं तरी पाश्चिमात्य देशांत तेव्हांच होऊन गेली असती. गंधापेक्षां शब्द व सौंदर्य हे विषय ह्याप्रमाणें जास्त काळ टिकणारे व समोपभोगास अधिक योग्य असल्यामुळें जनहितवादाचा जयघोष होत असलेल्या वर्तमान काळीं जिकडे तिकडे नाटकगृहें, संगीतसमाज, प्रदर्शनें, सार्वजनिक बागबगीचे, शृंगारलेले सार्वजनिक हॉल्स्, म्यूझिअम्स्, पार्क्स्, भव्य भव्य सार्वजनिक इमारती, डोंगर, नद्या, धबधबे ह्यांचे कृत्रिम देखावे, चित्रें आणि तसबिरा ह्यांची सार्वजनिक स्थळीं मांडणी, ब्यांड इत्यादि अनेक संस्थांचा एकसारखा प्रसार होत चालला आहे. शब्द व सौंदर्य ह्यांच्या समोपभोग्यत्वाचें इतकें महत्व वाटण्याचें कारण असें आहे कीं त्याचेयोगानें स्पर्धा, द्वेष व कलह ह्यांस थाराच मिळत नाहीं. अन्न व पेय हीं एकाच काळीं अनेकांस उपभोगितां येत नसल्यामुळें तीं बेताचींच असून त्यांची इच्छा करणारे किंवा त्यांची जरूर भासणारे त्यांचे मानानें अधिक लोक असले ह्मणजे ‘ भिक्षुको भिक्षुकं दृष्ट्वा श्वानवत् गुर्गुरायते ’ असा अनिष्ट प्रकार सुरू होऊन रणें माजण्याचाही प्रसंग कसा येतो हें अलीकडील दुष्काळांत आमच्या चांगलेंच प्रत्ययास आलें आहे. शिवाय शब्द व सौंदर्य ह्यांच्या उपभोगाचे अतिरेकापासून मनावर किंवा शरीरावर कोणताही वाईट परिणाम घडत नाहीं. हे विषय अगदीं निरुपद्रवी आहेत. शब्द व सौंदर्य ह्यांचें दीर्घायुष्य, समोपभोगत्व, निरुपद्रवित्व इत्यादि गुणांचे आधिक्यानें त्यांस इंद्रियविषयांमध्यें जें अग्रस्थान मिळत आहे तें योग्यच आहे. ह्याप्रमाणें इंद्रियजन्यसुखांच्या सूक्ष्म निरीक्षणानें त्यांची जी नंबरवारी लाविली आहे, तिजपासून काय निष्पन्न होतें तें पहा. हीं सर्व सुखें बाह्य गोष्टींवर अवलंबून आहेत. पंचेंद्रिजे पांच विषय ते त्या सुखांचीं साधनें आहेत. त्यांच्या प्राप्ती शिवाय सुखाचा अनुभव मिळावयाचा नाहीं. आणि जरी हे विषय कमि अधिक टिकाऊ असले तरी त्यांपैकीं कोणताच अविनाशी नसल्यामुळें सुखाकरितां त्यांची प्राप्ती पुनः पुनः करून घेण्याची आवश्यकता आहे. आणि जरी प्रत्येक मनुष्याची तत्प्रात्यर्थ सारखी धडपड खटपट

चालली आहे, तरी तीं दुष्प्राप्य व विनाशी पडल्यामुळें कोणासच शाश्वत सुखाचा अनुभव मिळत नाहीं.

आतां वर ज्यांस मानसिक सुखें असें ह्मटलें आहे त्यांजकडे वळूं. नाटकें, कादंबऱ्या, इतिहास, चरित्रें, पुराणें, प्रवासवर्णनें व स्थलवर्णनें, सुरस गोष्टी, आख्यायिका, व्याख्यानें, काव्यें, वर्तमानपत्रें इत्यादि सुलभ ग्रंथभांडाराचें वाचन शास्त्रीय व दुर्गम विषयांचा व्यासंग, वादग्रस्त प्रश्नांचा समाधानकारक निकाल लावणें, नवीन नवीन शोध करणें, निरनिराळ्या विषयांवर पुस्तकें लिहिणें व व्याख्यानें देणें इत्यादि प्रकार बुद्धिसंबंधाच्या सुखांचीं मुख्य साधनें होत. बुद्धिसंबंधाच्या सुखांचा एक विशेष आहे तो पूर्वी दर्शविलाच आहे. त्यांचीं साधनें जरी आपल्या स्वाधीन झालीं तरी त्यांचा उपभोग घेतां येण्यास अधिकार लागतो. त्यांस शिक्षणाची आवश्यकता आहे. नाटकादि सुलभ-ग्रंथ-भांडाराचें वाचन प्रत्येकाचे आटोक्यांत आहे असें जरी घेऊन चाललें, तरी शास्त्रीय वाचनाची अभिरुचि प्राप्त होण्यास मोठाच अधिकार लागतो. त्याचप्रमाणें वादग्रस्त प्रश्नांचा निकाल लावण्यापासून किंवा नूतन शोध केल्यापासून जें असामान्य व असाधारण सुख प्राप्त होतें, त्याचाही अनुभव घेण्यास वरच्यापेक्षांही अधिक योग्यतेच्या अधिकाराची आवश्यकता आहे हें उघड आहे. ह्या बुद्धिसंबंधाच्या सुखांशिवाय उच्च मनोवृत्ति व नैतिक व धार्मिक प्रवृत्ति ह्यांसंबंधाच्या सुखांचीही मानसिक सुखांतच गणना केली पाहिजे. दया, स्नेह, शांति, प्रीति, इत्यादि उदात्त व श्रेष्ठ मनोवृत्तींचा प्रादुर्भाव स्वतःचे ठायीं अगर दुसऱ्या कोणाही मनुष्याचे ठायीं दृष्टीस पडला असतां कोणास आनंद होत नाहीं? त्याचप्रमाणें सद्वर्तनानें व स्वकर्तव्यसंपादनार्थ अश्रांत परिश्रम केल्यानें व ईश्वराचें भजन पूजन व आराधन केल्यानें नास्तिकांवाचून दुसऱ्या कोणास आनंद होत नाहीं? ह्याप्रमाणें मानसिक सुखांमध्यें बुद्धिसंबंधाचीं सुखें कमी-अधिक शिक्षणावर अवलंबून असल्यामुळें ह्मणजे शिक्षण हें त्यांचें बाह्य साधन असल्यामुळें तीं सर्वांसच सारखीं प्राप्त होणें नाहीं. तथापि हीं सुखें इंद्रियजन्य सुखांपेक्षां अधिक चिरस्थायि व

बाह्य साधनांवर कमी अवलंबून असल्यामुळें तीं इंद्रियजन्य सुखांपेक्षां अधिक महत्वाचीं ह्मणून जिकडे तिकडे गणलीं जात आहेत. परंतु हीं बुद्धिसंबंधाचीं सुखेंसुद्धां बाह्य विनाशी साधनांवर अवलंबून असल्यामुळें कमी अधिक क्षणभंगुरच होत. परंतु उच्च मनोवृत्तींची व नैतिक व धार्मिक आचरणाच्या सुखांची गोष्ट निराळी आहे. दया, क्षमा, शांति, प्रीति इत्यादि मनोवृत्तींचा अनुभव व सद्वर्तन व धर्माचरण ह्यांस बाह्य साधनांची गरज नसल्यामुळें तत्संबंधाचींच सुखें श्रेष्ठ होत हें उघड आहे. वरील मनोवृत्तींची लागवड करणें, त्यांची उत्तम जोपासना करून त्यांस वाढीस लावणें व त्यांस पूर्णत्वास पोंचविणें व त्याचप्रमाणें नीति व धर्म ह्यांकडे मनाची प्रवृत्ती करून तद्विषयक आचरणाची दृढ अभिरुचि मनामध्यें उत्पन्न करणें फारच कठिण आहे हें खरें. तथापि जर मनुष्यमात्राचे ठायीं सुखाची तृष्णा दृष्टीस पडत आहे, तर श्रेष्ठतम सुख कोणास नकोसें होणार आहे ? ह्मणून श्रेष्ठतम सुखाची हाव असल्यास बाह्य साधनांवर अवलंबून असणारीं जीं इंद्रियसुखें व बुद्धिसंबंधाचीं मानसिक सुखें या हलक्या सुखांच्या पाठलागांतच चूर होऊन आयुष्य कंठणें कधींही योग्य होणार नाहीं. परंतु आह्मी सुखप्राप्त्यर्थ जे नानाविध अश्रांत परिश्रम करितों ह्मणून वर सांगितलें आहे, ते सर्व प्रयत्न सुखाचीं बाह्य साधनें वाढविण्याच्या दिशेनेंच होत आहेत. त्यांचे मानानें उच्च मनोवृत्तींच्या फलप्राप्त्यर्थ व सद्वर्तन व धर्माचरण ह्यांच्या प्रसारार्थ आमच्या हातून कांहींच होत नाहीं असें ह्मणण्यास विशेष हरकत दिसत नाहीं.

उच्च मनोवृत्तींची, नीतीची व धर्माची जी ही हेळसांड होत आहे, इंद्रियसुख व बुद्धिसुख ह्यांच्या प्राप्त्यर्थच पाश्चिमात्य राष्ट्रांची व त्यांनीं पादाक्रांत केलेल्या व त्यांचें अंधपणें एकजात अनुकरण करणाऱ्या जगावरील बहुतेक सर्व राष्ट्रांची जी सतत धडपड चालली आहे ती केवळ अज्ञानमूलक होय. आपणास कशाची जरूर आहे हेंच मुळीं पुर्तेपणें आपणास समजत नाहीं. आपणास सुखाची इच्छा आहे

इतकेंच आपणास कळतें. परंतु तें सुख कोणत्या प्रकारचें असलें पाहिजे, सुखामध्यें कांहीं प्रती आहेत कीं काय, त्यांपैकीं श्रेष्ठ कोणत्या व कां, आपण ज्या सुखाच्या पाठीस लागलों आहों तें कोणत्या प्रकारचें आहे, बाह्य साधनांपासून उत्पन्न होणारें सुख जरी उच्च मनोवृत्तींच्या सुखापेक्षां अधिक सुलभ असलें, तरी तें क्षणभंगुर असल्यामुळें त्यांचीं साधनें वारंवार संपादन करण्याची मेहनत करणें कसें आवश्यक आहे इत्यादि गोष्टींचाच मुळीं कधीं कोणी शांतपणें व स्वतंत्रपणें विचार करीत नाहीं. क्षणभंगुर सुलभ सुखासाठीं सतत प्रयत्न करण्यापेक्षां दुर्लभ परंतु शाश्वत सुखासाठीं परिश्रम करणें अधिक श्रेयस्कर नाहीं काय? परंतु हे विचार बाजूस ठेवून पाश्चिमात्य राष्ट्रें व त्यांचे अनुयायी आम्ही जगाचें कल्याण करण्यास प्रवृत्त झालों आहों. बाह्य साधनांची वृद्धी केल्यानें सुखाची वृद्धि होते असें घटकाभर घेऊन चाललें तरी ह्या मार्गानें प्राप्त होणारें सुख हलक्या प्रतीचें होय हें येथपर्यंत विस्तारपूर्वक स्पष्ट करून दाखविलेंच आहे. तेव्हां केवळ ह्या मार्गाचें अवलंबन करणें अज्ञानमूलकच होय. शिवाय बाह्यसाधनांबरोबर सुखाचीही वाढ होते ही समजूतसुद्धां भ्रममूलकच होय. असें असतें तर राजे लोक व धनाढ्य लोक केवळ खाऊन पिऊन सुखी लोकांपेक्षां नेहमींच अधिक सुखी असावयास पाहिजे होते. परंतु uneasy lies the head that wears a crown 'मुकुट धारण करणारें डोकें अस्वस्थ असतें खरें' असे, जगाचें व मानवप्रकृतीचें खरें हृद्गत जाणणाऱ्या श्रेष्ठ आंग्ल कवीचे उद्गार आहेत. आणि ह्मणूनच नेटिव्ह शिपायापेक्षां, नेटिव्ह हमालापेक्षां, नेटिव्ह नोकरापेक्षां, नेटिव्ह गृहस्थापेक्षां त्याच दर्जाच्या इंग्रज शिपायास, इंग्रज हमालास, इंग्रज नोकरास अथवा इंग्रज गृहस्थास जरी दुप्पट किंवा तिप्पट बाह्य सुखसाधनें प्राप्त होत असलीं तरी तो नेटिव्हापेक्षां अधिक सुखी नसतो इतकेंच नव्हे, तर बहुतकरून कमीच सुखी असतो. आणि ही गोष्ट आपणांस पगार नेटिव्हांपेक्षां कां जास्त असावा ह्या प्रश्नाचे वादविवादांत इंग्रजलोक आपण होऊनच जरी पुढें आणण्यास मागेंपुढें पहात नाहींत, तरी त्या गोष्टींतील तत्व त्यांचे दृष्टीस पडलें आहे किंवा

तें त्यांस पसंत आहे अथवा तें त्यांचे मनांत ठसलें आहे असें त्यांच्या सुखविषयक धडपडीवरून दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांच्या नीतिशास्त्रावरील व धर्मविषयक ग्रंथांतसुद्धां बाह्यसाधनें व सुख समप्रमाणांत आहे हीच समजूत जिकडे तिकडे झळकत असून तिचेंच त्यांच्या नीतिशास्त्रास व धर्मासही पूर्ण वळण लागलेलें आहे असें नजरेस येतें. भौतिक शास्त्रांत एकोणीसाव्या शतकांत प्रचंड प्रगति झाल्यामुळें त्यांचें सर्व लक्ष शरीरसुखाकडे व तितक्याच पुरतें मानसिक सुखाकडे ह्मणजे बुद्धिसुखाकडे अव्याहत लागून राहिलें आहे. ह्मणजे त्यांच्या दृष्टीनें मानवी शरीर व बुद्धि इतकींच काय तीं मानवी प्राण्याचे प्रकृतींतील विशेष महत्वाचीं अंगें होत. मनोवृत्ति व प्रवृत्ति ह्यांकडे ते लक्ष देत नाहींत असें नाहीं. तर त्यांकडे जें लक्ष द्यावयाचें तें केवळ गौण होय. त्यांचा शरीरसुख व बुद्धिसुख ह्यांस उपयोग होतो ह्मणून त्यांजकडे पूर्ण दुर्लक्ष करणें त्यांच्यानें होत नाहीं. तेंच, मनोवृत्ती व प्रवृत्ती ह्या मनाच्या दुसऱ्या दोन बाजूंचा शरीरसुखाशीं व बुद्धिसुखाशीं जर अर्थाअर्थीं कांहीं संबंध नसता तर त्या दोन बाजूंचें अस्तित्वसुद्धां पाश्चात्यांचे नजरेस आलें नसतें. तेव्हां ह्या दोन बाजू शरीर-सुखास व बुद्धिसुखास अंगभूत ह्मणून त्यांजकडे अवश्य तेवढें लक्ष द्यावयाचें. त्यापलीकडे त्यांची त्यांस जरूर नाहीं. या ठिकाणीं पाश्चात्यांचे कैवारी असा आक्षेप घेतील कीं, त्यांचें मानसशास्त्र जर आपण पाहिलें असतें तर आपण असें विधान करण्याचें धाडस करण्यास तयार झाला नसतां; परंतु प्रस्तुत लेखक असें धाडस जाणून बुजूनच करीत आहे. पाश्चिमात्य लोकांनीं मानसशास्त्रांत चांगले शोध लाविले आहेत; आह्मांला तर स्वतंत्र मानसशास्त्राची कल्पनाही नाहीं; मानसशास्त्र हा शब्द-सुद्धां आह्मांस त्यांच्याच सहवासापासून मिळाला आहे हें उघडच आहे. त्याचप्रमाणें स्वतंत्र मानसशास्त्राची स्थापना करून त्या विषयांत निरीक्षण व प्रयोग ह्या शास्त्रीय साधनांहीं त्यांनीं अनेक सामान्य नियम स्थापित केले आहेत; आणि जरी त्या शास्त्राची अद्याप मानस क्षेत्रांतील गोष्टींच्या स्पष्टीकरणांत फारशी गति झाली आहे असें ह्मणतां येत नाहीं

तरी त्या दिशेनें होत असलेले पाश्चात्यांचे प्रयत्न फारच स्तुत्य आहेत हेंही निर्विवाद आहे. तथापि विचार व आचार ह्यांमध्यें महदंतर आहे. बुद्धि, मनोवृत्ति, व प्रवृत्ति ह्या ज्या मनाच्या तीन बाजू किंवा जीं तीन अंगें सांगितलीं, त्यांपैकीं पाश्चात्यांचा सर्व भर काय तो बुद्धीवर आहे. ह्याचें कारण कांहींही असो, तथापि अशी स्थिति आहे हें खास. ह्यामुळें त्यांनीं निरनिराळ्या अनेक शास्त्रांची—कीं ज्यांची आपणास काडीभरही कल्पना नव्हती—इमारत भव्य व भक्कम पायावर रचून सुशोभित केली आहे; आणि ह्या निरनिराळ्या दिशांनीं त्यांचे इतके कांहीं अश्रांत व अविच्छिन्न परिश्रम चालले आहेत कीं, कांहींना कांहीं तरी नवीन शोध लावल्याशिवाय त्यांचें एकही वर्ष सुनें जात नाहीं. परंतु भाषाशास्त्र, गणितशास्त्र, अर्थशास्त्र, न्यायशास्त्र, यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, ज्योतिःशास्त्र, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, वैद्यशास्त्र, शारीरशास्त्र, इंद्रियविज्ञानशास्त्र, मानसशास्त्र, इत्यादि ज्या अनेक शास्त्रांत ते प्रावीण्य संपादन करीत आहेत, त्या झाडून साऱ्या शास्त्रांच्या व्यासंगानें बुद्धीचीच तीव्रता वाढत आहे. आणि त्यामुळें बुद्धिसुखाचीं व त्या शास्त्रांच्या व्यावहारिक उपयोगापासून केवळ शरीरसुखाचींच बाह्य साधनें त्यांस अधिकाधिक प्राप्त होत आहेत. आतां नीतिशास्त्र, राज्यनीति, समाजशास्त्र, व धर्मशास्त्र हींच काय तीं राहिलीं. आणि ह्यांचाच मनोवृत्ति व प्रवृत्ति ह्या दुसऱ्या दोन मानसिक अंगांशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध आहे; मनोवृत्तींचें दमन करणें, त्यांस योग्य वळण लावणें, त्यांची काळजीपूर्वक जोपासना करणें, व त्यांचा परस्परांशीं उत्तम मेळ बसविणें आणि प्रवृत्तींना नीतीची व धर्माची दिशा दाखविणें ह्या गोष्टींकडे इतक्याच शास्त्रांचें लक्ष आहे. परंतु ह्या सर्व शास्त्रांचें जर सूक्ष्म निरीक्षण केलें तर असें दिसून येईल कीं, जरी ह्या प्रत्येक शास्त्रावर पाश्चात्यांनीं बडे बडे असंख्य ग्रंथ लिहिले आहेत, तरी त्यांपैकीं बहुतेकांत ' उपयुक्ततेचें तत्व ' प्रधान आहे. ह्या शास्त्रांत सुद्धां पाश्चात्यांस उपयुक्ततेशिवाय दुसरें कांहीं एक दिसत नाहीं. कदाचित् राज्यनीतिशास्त्रांत व समाजशास्त्रांत उपयुक्ततेचा प्रभाव सुयुक्तिक व अवश्य असेल, परंतु नीतिशास्त्रांत व धर्मशास्त्रांतसुद्धां तेंच तत्व

अधिकारापन्न व्हावें, त्यासच अग्रेसरत्व मिळावें, अथवा त्याच्याशिवाय त्यांस दुसरा कोणीही मार्गदर्शक मिळूं नये, हें आश्चर्यकारक नाहीं काय? आतां ' उपयुक्तता ' हा शब्द फारच गोड व समाधानकारक असून अर्थानें ओतप्रोत भरलेला आहे असें वाटून, त्यामुळें कदाचित् स्थूलदृष्टीस त्याचा वास्तविक अर्थ एकाएकीं कळत नाहीं. तथापि सूक्ष्म विचारांतीं असें दिसून येईल कीं, उपयुक्तता ह्मणजे शरीरसुख व बुद्धिसुख ह्यांपैकीं कोणत्या तरी सुखाचीं बाह्य साधनें उत्पन्न करण्याची योग्यता. ह्याशिवाय त्याचा दुसरा अर्थ नाहीं. आणि ह्मणूनच नीतिशास्त्र व धर्मशास्त्र ह्यांमध्यें-सुद्धां जेव्हां उपयुक्तता देवीचेंच अप्रतिबंध राज्य दृष्टीस पडतें, तेव्हां मनोवृत्ति व प्रवृत्ति ह्या दोन मानसिक अंगांकडे पाश्चात्यांचें मुद्लींच लक्ष नाहीं किंवा असल्यास तें केवळ गौण होय किंवा कामापुरतेंच होय असें ह्मणण्यास काय हरकत आहे? अशा रीतीनें मनोवृत्ति व प्रवृत्ति ह्यांची वर निर्दिष्ट केलेल्या उपयुक्तता देवीचे राज्यांत हेळसांड विटंबना, दैना, व पायमल्ली होत असल्यामुळें, आणि ह्या उपयुक्तता देवीचें जुलमी राज्य पाश्चात्य राष्ट्रांच्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अमलाबरो-बर व प्रभावाबरोबरच शिक्षण व उदाहरण ह्यांचे द्वारें एकसारखें सर्व भूगोलावर विस्तार पावत असल्यामुळें, आजकालचें बहुतेक सर्व जगच मनोवृत्तींच्या व प्रवृत्तींच्या अंतःसाधनांनीं प्राप्त होणाऱ्या उत्तम सुखास बहुतांशीं आंचवत चाललें आहे, असें मोठ्या दुःखानें ह्मणावें लागत आहे. पाश्चात्य लोकांवर हा जो आरोप ह्या लेखांत केला आहे, तो जाणून बुजूनच केला आहे असें जें वर ह्मटलें आहे, त्याच्या पुराव्याचें सबंध माप पदरांत घालण्याची ही वेळ नव्हे. तथापि तो आरोप केवळ क्षुल्लक, पोकळ, किंवा सर्वस्वी निराधार नसून त्यांत निदान कांहीं तरी तथ्य आहे, तो कोर्टांतून एकदमच काढून टाकितां येत नाहीं, तर त्याची योग्य चौकशी करून तत्संबंधाचा शांतपणें विचार करण्यास तो लायक आहे, इतकें तरी दाखविण्याचा वरील स्पष्टीकरणाचा हेतु आहे. ह्या दिशेनें जर शांतपणें व स्वतंत्रपणें परप्रत्ययनेयबुद्धि न होतां सूक्ष्म विचार केला तर उपयुक्ततेच्या राज्यांत आमचें श्रेष्ठतम सुख नष्ट होत आहे, आह्मी त्यास कायमचे पराङ्मुख होत आहों, असें लक्षांत आल्यावांचून

रहाणार नाहीं. 'पण लक्षांत कोण घेतो' अशी जिकडे तिकडे अत्यंत शोचनीय स्थिति होत चालली आहे, तेव्हां मनोवृत्ति व प्रवृत्ति ह्यांच्या क्षेत्रांत सुद्धां उपयुक्तता देवीचें जुलमी राज्य जें पसरत चाललें आहे, त्यास आळा घालून 'केवळ स्वराज्यासाठीं' मनोवृत्तींस तनमनधनानें मदत करणें प्रत्येकाचें काम आहे.

येथें साधारण दृष्टीचा सुखदुःखाचा विचार संपलाच ह्मणावयाचा. बाह्यसाधननिरपेक्ष, अत्यंत चिरस्थायी व अत्यंत समोपभोगयोग्य अशा सुखाचा आपण शोध लाविला आहे, आणि त्याचाच पाठलाग करण्याचा सर्वांनीं निश्चय व प्रयत्न करावा हेंही स्पष्टच झालें आहे. ह्यापेक्षां अधिक तें काय राहिलें? इतक्यानें समजूतदार साधारण लोकांचें समाधान होण्यासारखें आहे हें निर्विवाद आहे. तथापि ज्याचें डोकें भ्रमण करावयास लागल्यामुळेंच 'विचारभ्रमण' अस्तित्वांत आलें आहे, अशा माथेफिरू विक्षिप्त मनुष्याचें इतक्यानें समाधान न होणें हेंही तितकेंच साहजिक आहे. अशा श्रेष्ठतम सुखाच्या प्राप्तीनेंही जर त्याची तृप्ति होत नाहीं तर त्यास आणखी पाहिजे तरी काय, त्यास आणखी कशाची अपेक्षा आहे हा प्रश्न स्वाभाविकच उत्पन्न होतो. त्याचें थोडक्यांत उत्तर असें. मनोवृत्ति व प्रवृत्ति ह्यांचीं सुखें, इंद्रियसुखें व बुद्धिसुखें ह्यापेक्षां वरिष्ठ दर्जाचीं होत हें निःसंशय आहे. आणि जरी पहिलीं दुसऱ्यांपेक्षां अधिक चिरस्थायी किंवा अधिक दीर्घायुषी आहेत; तथापि दुसरीं काय किंवा पहिलीं काय एकाच जातीचीं असून त्यांत केवळ अंशासंबंधाचाच फरक आहे. ह्मणजे श्रीमंत व गरीब ह्या जशा मनुष्यांच्या दोन निरनिराळ्या जाती नसून हे भेद संपत्तीच्या केवळ न्यूनाधिक्यानें अस्तित्वांत आले आहेत, त्याचप्रमाणें मनोवृत्तींचीं सुखें आणि इंद्रियसुखें व बुद्धिसुखें ह्यामधील फरक चिरस्थायित्वाच्या न्यूनाधिक्यापासूनच उत्पन्न झाला आहे. अशा दृष्टीनें सर्वच एका माळेंतील मणी आहेत. इंद्रियसुख क्षुल्लक, नीच किंवा त्याज्य होय असें जें आपण ह्मणतों, तें कां तर तें क्षणभंगुर, विनाशी आहे; तें अक्षय अविनाशी किंवा शाश्वत नाहीं. तसेंच बुद्धीचें सुखसुद्धां जरी अधिक चिर-

स्थायि असलें तरी तेंही विनाशी आहे ह्मणजे अक्षय्य, अविनाशी, अप्रतिबंध, किंवा शाश्वत नाहीं; ह्मणून तेंही त्याज्यच असें आपण ठरविलें आहे. त्याच दृष्टीनें मनोवृत्तांचें व प्रवृत्तीचें सुखसुद्धां त्याज्यच नाहीं काय? दया, क्षमा, शांति इत्यादि मनोवृत्ती तरी क्षणभंगुर व विनाशीच नाहींत काय? त्याचप्रमाणें नीत्याचरणाची व धर्माचरणाची प्रवृत्ति तरी विनाशीच नाहीं काय? जरी अनीतीकडे किंवा अधर्माकडे विशेष कल झाला नाहीं तरी वाचेनें व मनानें अनेक प्रसंगीं नीतीच्या व धर्माच्या बंधनांचें उल्लंघन होत नाहीं काय? असा कोण प्राणी आहे कीं ज्याचे मनांत दयाक्षमादि उच्च मनोवृत्ती अप्रतिहत प्रतिक्षणीं वास करीत आहेत व ज्याच्या हातून कायिक, वाचिक व मानसिक पाप कोणतेंच कधींही होत नाहीं व तेणेंकरून ज्यास श्रेष्ठतम सुख सतत मिळत आहे किंवा ज्याचें सुख अक्षय्य, अविनाशी व शाश्वत आहे? ह्या प्रश्नांचीं उत्तरें जर माझ्या मनीषेप्रमाणेंच दिलीं पाहिजेत, तर मनोवृत्तींचीं सुखेंसुद्धां पूर्ण समाधानकारक आहेत असें कसें ह्मणतां येईल? नीत्याचरणापासून व धर्माचरणापासून होणाऱ्या सुखासही हे आतां त्याज्य ह्मणूं लागले, तेव्हां ह्यांस कुलाब्याचे दांडीचाच रस्ता दाखविला पाहिजे असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे; आणि वरील विधान इतकें नवीन व चमत्कारिक आहे कीं, त्यानें सर्वमान्य व दृढ समजुतींस फारच जबरदस्त धक्का बसत असल्यामुळें पुष्कळांची प्रकृति खवळून जाऊन उठणाऱ्या लाटांचे जोरानें त्यांनीं मला कुलाब्याचे दांडीकडे ढकलण्याचा प्रयत्न करावा हेंही साहाजिक आहे. परंतु उठलेल्या लहरींनीं उत्पन्न झालेली क्षणिक क्षुब्धता नाहींशी होऊन प्रकृति शांत झाली ह्मणजे, त्यांनीं माझ्या ह्मणण्याचें विचारपूर्वक पुनरपि मनन करावें. प्राणिमात्रास निदान मनुष्यमात्रास तरी सुख पाहिजे आहे. दुःखाचा स्वीकार कोणीही राजीखुषीनें करीत नाहीं. सुखानंतर दुःख आलें ह्मणजे तें अनिवार्य होऊन बसतें ह्मणूनच जो तो तें भोगितो आहे. त्याचें निवारण करून पुनः सुखप्राप्ति व्हावी हाच आमच्या सर्व प्रयत्नांचा उद्देश आहे. ह्मणजे आपल्या आयुष्यांत सुखाची रेघ दुःखानें जी कापली जात आहे, ती

तशी कापली जाऊं नये हाच आपणा सर्वांचा प्रधान हेतु नाहीं काय? ह्मणजे सुखाचा ओघ संतत व अप्रतिबंधपणें वहावा अशी अशी आपली इच्छा नाहीं काय? आणि इंद्रियसुख व बुद्धिसुख हीं क्षणभंगुर व विनाशी, आहेत व त्यांची ओळ जागजागीं दुःखानें वारंवार तुटली जात असून ती वाढविण्याचा पुनःपुन्हा आपणास आयास व त्रास पडतो, ह्या दृष्टीनें तीं सुखें जर आपणास क्षुद्र व असमाधानकारक वाटतात तर त्याच दृष्टीनें, ह्मणजे मनोवृत्तींचीं व प्रवृत्तींचीं सुखें अविनाशी व संतत धारेनें वहाणारीं नसल्यामुळें तींही कांहींकांस पूर्ण समाधानकारक न वाटल्यास त्यांत त्यांची काय चूक आहे तें आह्मांस समजत नाहीं. आतां मनोवृत्तींचीं व प्रवृत्तींचीं सुखें इतर सुखांपेक्षां अधिक चिरस्थायी आहेत, त्यांची धार अधिक काळ टिकते ह्मणून तीं अधिक समाधानकारक आहेत हें कोणासही नाकबूल नाहीं. परंतु आपणास अक्षय्य, अविनाशी, शाश्वत असें सुख पाहिजे असतां आह्मांस ह्या क्षय्य, विनाशी व अशाश्वत सुखाकडे बोट दाखविणें व त्यानेंच आपलें पूर्ण समाधान करून घ्या असें ह्मणणें ह्मणजे क्षुधितास जरी धोंडा देण्यासारखें नसलें, तरी अर्वाचीन पद्धतीनें चहापाणी देण्यासारखेंच नाहीं काय? ह्मणून संतत, शाश्वत, अक्षय्य सुख प्राप्त झाल्यावांचून मनाचें पूर्ण समाधान कसें व्हावें? कांहीं वेळ सुखाची सपाटी, मग ही सपाटी बरीचशी कां विस्तृत असेना, नंतर पुन्हा दुःखाचा डोंगर, पुन्हा सपाटी, पुन्हा डोंगर, फिरून मनोहर माळ, पुनरपि भयंकर दरी अशा उच्चनीच, डोंगराळ व खडतर प्रदेशांत संचार करण्यापेक्षां निरंतर खुल्या मैदानांतून सुखकर प्रवास करणें कोणास अवडणार नाहीं?

अहो! हें सर्व आह्मांस कबुल आहे. परंतु ह्या जगतीतलावर तुह्मास पाहिजे असा एकसारखा सपाट निष्कंटक प्रदेशच जर बगत नाहीं, जिकडे तिकडे डोंगर, दऱ्या; व सपाटी असलीच तरी ती कंटकमय. अशा प्रकारचा नाशिक कोंकणप्रांतच जर पसरलेला आहे, घांटमाथ्यावरील एकजात सपाट 'देशा' चें नांवसुद्धां जर ह्या मृत्युलोकच्या संसारयात्रेंत आपणास ऐकूं येत नाहीं, तर तुमच्या कल्पनेस घेऊन

काय करावयाचें आहे? ती जरी कितीही संगतवार, सुयुक्तिक व न्यायशास्त्र शुद्ध असली, तरी केवळ कल्पनासृष्टींतील हृदयंगम मनोराज्यांतच वास करीत असल्यामुळें तिच्या पाठीमागें लागणें ह्मणजे निवळ वेडेपणा होय. असो सुख व दुःख ह्यांची जोडी जडलेली आहे; ती कधींही तुटावयाची नाहीं; त्यांची सांगड अभेद्य आहे. सुख व दुःख हीं एका काठीचीं दोन टोंकें होत असें प्लेटोनें ह्मटलें आहे, त्यांत किती तथ्य आहे बरें! काठीचें जसें एक टोंक सोडून दुसरें तेवढेंच आपणाकडे ओढितां येत नाहीं, त्याच्या बरोबर पहिलेंही अपरिहार्यपणें आपणाकडे यावयाचेंच त्याचप्रमाणें दुःखावांचून केवळ सुखच आपणास पाहिजे अशी जर कोणी इच्छा करूं लागला तर ती व्यर्थ होय. सुखाबरोबर दुःखही आलेंच पाहिजे. फार तर काय सुख व दुख हीं पदेंच संबंधीपदें होत. संबंधीपदें हीं अर्थाच्या दृष्टीनें परस्परावलंबी असतात. राजाशिवाय प्रजा शब्दास अर्थ नाहीं; व प्रजेशिवाय राजाही व्यर्थच होय; अथवा मुलाशिवाय बापास अर्थ नाहीं; आणि काळोखावांचून उजेडाची कल्पनाच करितां येत नाहीं. त्याचप्रमाणें दुःखावांचून सुखाची कल्पनाच मुळीं होणें नाहीं. असें असतां आह्मांस नुसतें सुखच पाहिजे असें ह्मणणें किंवा अक्षय्य सुखाची अपेक्षा करणें, हें पढतमूर्खत्वाचें लक्षण नाहीं काय?

ही विचारसरणी अगदीं बिनतोड असून, ज्याचें डोकें ठिकाणावर आहे त्यास सर्वथा निरुत्तर करून सोडील ह्यांत शंका नाहीं. परंतु माथेफिरूचें डोकें त्यामुळें भ्रमण करण्याचें थांबत नाहीं. त्याच्या भ्रमणास त्यानें कांहीं एक अडथळा होत नाहीं. तो ह्मणतो कीं, ‘ एकसारखा सपाट निष्कंटक प्रदेश अस्तित्वांतच नाहीं. ’ हें ह्मणणें फाजील धाडसाचें आहे. ज्याचें सर्व आयुष्य खडकाळ डोंगराळ कोंकणांतच गेलेलें आहे, व ज्यानें ‘ घाटमाथ्यावरील ’ देशाचें नांवही ऐकलेलें नाहीं त्यानें सुद्धां ‘ असा प्रदेश वसत नाहीं ’ असें विचारशून्य, फाजील, व पंडितमन्यत्वाचें दर्शक असें विधान करूं नये. त्यानें फार तर ‘ असा प्रदेश मला माहीत नाहीं. ’ किंवा ‘ मी कधीं ऐकिलाही नाहीं. ’ इतकेंच ह्मणून स्तब्ध बसणें त्याच्या विनयास व शालीनत्वास शोभण्यासारखें नाहीं काय? ‘ बहुरत्ना वसुंधरा ’ ही ह्मण अलीकडे सर्वत्रांस माहित

झालेली आहे. त्याचप्रमाणें 'माझें ज्ञान हें अफाट वाळवंटांतील रेतीच्या एका कणाइतकें आहे' हें न्यूटनचें वचनही आजकाल सर्वतोमुखी झालें आहे. असें असतां अमुक गोष्ट सृष्टींत नाहींच, अमुक एक अगदीं अशक्य आहे अशा तऱ्हेचे न अडखळतां एकसारखे शेरे मारीत सुटणें विद्वत्तेस शोभत नाहीं. दुःखाशिवाय केवळ सुख आपणास अद्याप मिळालें नाहीं, किंवा असें सुख मिळालेला कोणी प्राणी आमच्या आढळण्यांत किंवा ऐकिवांत नाहीं ह्मणून अक्षय्य सुख मुदलींच अस्तित्वांत नाहीं, त्यास शशशृंगाचीच उपमा योग्य आहे असें ह्मणणें निवळ साहस होय. शिवाय सुख व दुःख हीं राजा व प्रजा किंवा अंधार व प्रकाश ह्यांप्रमाणें परस्परावलंबी संबंधीपदें होत; एकाच्या अर्थाची कल्पना दुसऱ्यावांचून होणेंच नाहीं; ह्मणून अंधारावांचून सुख असणें संभवतच नाहीं, असें जें विरुद्धपक्षीं न्यायशास्त्राचे भाषेनें सांगण्यांत आलें आहे, तेंही केवळ अप्रत्यवाय किंवा निरपवादक नाहीं. अंधारावांचून प्रकाशाची कल्पना होत नाहीं किंवा व्हावयाची नाहीं. हें अगदीं निरपवादक आहे, त्यांत तिळमात्रही संदेह नाहीं. परंतु तेवढ्यावरून अंधाराचे अडथळ्याशिवाय प्रकाशाचें सतत अस्तित्व अशक्य होय असें सिद्ध होत नाहीं. हें न्यायशास्त्रज्ञांस स्पष्ट करून दाखविण्याची जरूर पडणें ह्मणजे मोठी दिलगिरीची गोष्ट आहे. दिवसानंतर रात्र रात्रीनंतर दिवस हें रहाटगाडगें सदोदित चाललें आहे आणि जसजसें ध्रुवाकडे जावें तसतसा दिवस जरी मोठा होत गेला आणि खुद्द ध्रुवावर जरी सहा महिन्यांचा सतत दिवस असला तरी त्याचे मागून रात्र ही आहेच. दिवसरात्रीचें रहाटगाडगें तेथेंही चाललेंच आहे हें भूगोलासंबंधानें अक्षरशः सत्य आहे. परंतु तेवढ्यावरून सकळ विश्वामध्यें अंधारावांचून प्रकाश सांपडावयाचाच नाहीं हें विधान धाडशी, साहसाचें व अज्ञानमूलकच होय. अंधाराच्या अडथळ्याशिवाय सतत प्रकाशाचा अनुभव किंवा उपभोग आह्मांस मिळेल कीं नाहीं किंवा लाभ आह्मांस होणें शक्य आहे कीं नाहीं हा प्रश्न वेगळा. तथापि खुद्द सूर्य ह्या गोलावर सदोदित प्रकाशच असला पाहिजे. तेथें अंधाराचें नांवही मिळावयाचें नाहीं ही गोष्ट विचारांतीं बहुतेकांस मान्य झाल्यावांचून

रहाणार नाहीं. प्रकाशाची कल्पना अंधारसापेक्ष आहे हें खरें, परंतु ती एकदां भूगोलावरील रात्रदिवसांच्या परंपरेच्या अनुभवानें प्राप्त झाली ह्मणजे सूर्यावरील सतत प्रकाशाचें अस्तित्व समजण्यास अडचण पडत नाहीं हें उघड आहे. आणि जर सुदैवानें सूर्यावर जाऊन पोंचण्याचा मार्ग आपणास खुला असता व तेथें रहाणें जर आपणास शक्य असतें तर निरंतर प्रकाशाची नुसती कल्पना करूनच न रहातां त्याचा प्रत्यक्ष अनुभवही आपणास मिळाला असता. त्याचप्रमाणें दुःखाशिवाय सुखाची कल्पना समजावयाची नाहीं हें ठीक आहे, परंतु तेवढ्यावरून निरंतर, अक्षय्य सुख मुळीं अस्तित्वांतच नाहीं हें ह्मणणें निराधार होय. सुख ह्मणजे काय हें दुःखाचे अनुभवानें एकदां प्रत्ययास आलें ह्मणजे दुःखावांचून निरंतर अक्षय्य सुखाची कल्पना करण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं. एवंच निरंतर अक्षय्य सुख अगदीं पोकळ, निरर्थक, व अशक्य आहे असें न्यायशास्त्रशुद्ध अनुमान निघत नाहीं हें उघड आहे-

आतां असें निरंतर, अविनाशी, शाश्वत, अक्षय्य सुख असल्यास आहे कोठें व तें आपणास कसें प्राप्त होईल हा प्रश्न लागला आहे. अशा प्रकारचें सुख अस्तित्वांत असण्यास कांहीं हरकत नाहीं; त्याची गोष्ट चौकोनी वर्तुळासारखी सर्वथा अशक्य नाहीं इतकें तरी येथपर्यंत सिद्ध झालें आहे. तेव्हां अशा प्रकारच्या सुखाची इच्छा करून जर कोणी तत्प्राप्तीचा मार्ग शोधून काढण्याचे भरीस पडला तर त्याची कुलधाच्या दांडीवर रवानगी करण्याच्या तयारीस लागण्याचें कांहीं एक कारण नाहीं. चंद्रावर जाऊन पोंचणें अत्यंत दुर्घट आहे व कदाचित् तशा प्रकारचा यत्न निष्फळ होण्याचाच फार संभव असेल. तथापि अशा कल्पना कांहीं विक्षिप्त लोकांच्या डोक्यांत येत असून ते त्या शोधांत आहेत असें ऐकून तरी माहित असेल. त्या विक्षिप्त माथेफिरू ज्योतिःशास्त्रज्ञाप्रमाणेंच कांहीं विक्षिप्त माथेफिरू तत्वज्ञ अक्षय्य सुखाच्या शोधार्थ भटकूं लागले तर काय हरकत आहे? इंद्रियसुख, बुद्धिसुख आणि मनोवृत्तींचें सुखसुद्धां समाधानकारक न वाटून अक्षय्य व केवल सुखाची आस धरून त्याच्या शोधार्थ कांहीं विक्षिप्त लोकांनीं तरी आपलें आयुष्य वहाणें, हें निदान चौकोनी वर्तुळाच्या शोधांत भटकण्यासारखें तरी नाहीं हें उघड आहे.

---

# विचारभ्रमण.

## स्वातंत्र्यास्वातंत्र्य.

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवं ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥
भगवद्गीता.

दुसऱ्याचे हातानें पाणी पिणें कोणासही आवडत नाहीं. जर भांडें उचलून तोंडास लावण्याची शक्तीच मनुष्यास नसली तर गोष्ट वेगळी. परंतु जोंपर्यंत तितकी शक्ति त्याचे ठायीं आहे तोंपर्यंत या लहानशा क्षुल्लक बाबतींतसुद्धां त्याला स्वातंत्र्याचा उपभोग पाहिजे आहे. वास्तविक ह्मटलें असतां आपल्याच हातानें पाणी पिणें काय किंवा दुसऱ्याच्या हातानें पिणें काय, सारखेंच. तहान भागण्यांत त्याचेयोगानें कांहीं फरक पडतो असें नाहीं. दुसऱ्यानें मला, शब्दार्थानें पाणी पाजलें ह्मणजे माझ्या वशांत नीटपणें पाणी ओतलें व मी तें गिळलें आणि माझी तृषा जरी पूर्णपणें शांत झाली तरी तें मला प्रिय नाहीं. एवंच तृषेनें शमन हाच जरी पाणी पिण्यांत माझा मुख्य उद्देश आहे, तरी पाण्याचें भांडें दुसऱ्यानें माझ्या तोंडास लावलेलें मला खपत नाहीं; कारण त्यांतसुद्धां मला पारतंत्र्याचें दुःख अनुभवास येतें. आणि ह्या सर्वसाधारण निर्विवाद अनुभवामुळेंच ‘ दुसऱ्याचे हातानें पाणी पिणें ’ ही कमीपणा दाखविणारी —पारतंत्र्यद्योतक—ह्मण प्रचारांत आली आहे. असल्या क्षुद्र कृत्यांतही जर मनुष्याची स्वातंत्र्याची इच्छा पूर्ण स्पष्टपणें दृग्गोचर होत आहे, तर इतर लहानमोठ्या सर्व कृत्यांतही त्यास स्वातंत्र्य मिळाल्यास पाहिजे आहे, ह्मणजे मनुष्य हा स्वभावतःच स्वातंत्र्यप्रिय प्राणी आहे असें ह्मणण्यास काय हरकत आहे? शिवाय स्वातंत्र्य ही गोष्टही कांहीं अंशीं

अनिष्ट, घातक, दुष्ट किंवा अनीतीची दिसत नाहीं, कीं जरी ती मनुष्यास आवडली तरी ती त्यास मिळतां कामा नये. उलट नित्याचारास स्वतंत्रतेची आवश्यकताच आहे. जर मनुष्य स्वतंत्र नसेल तर त्याच्या कृत्यांबद्दल त्याला जबाबदार कसें धरितां येईल? प्राणनाशाच्या भीतीनें जर मी परोपकार केला, ह्मणजे तो न केला असतां प्राणावर येऊन बेतण्याचा प्रसंग असतां जर तें सत्कृत्य माझ्या हातून घडलें, तर त्याचें श्रेय मला काय? किंवा त्याजबद्दल मी स्तुतीस कसा पात्र होईन? त्याचप्रमाणें दुसऱ्यानें माझ्या हातून जर तिसऱ्यास निरर्थक मार देवविला तर त्याजबद्दल मला दोष तरी कसा देतां येईल? स्तुतीस किंवा दोषास पात्र होण्यास तीं कृत्यें माझीं स्वतःचींच ह्मणजे स्वेच्छेनें केलेलींच असलीं पाहिजेत. ह्मणजे मी त्या कामीं स्वतंत्र असलें पाहिजे. ह्मणजे स्वतंत्रतेशिवाय जबाबदारी लागू होत नाहीं, व तोंपर्यंत नीति अनीति उत्पन्न होत नाहीं; तोंपर्यंत सुगुण व दुर्गुण, सत्कृत्य व दुष्कृत्य ही भाषाच वापरतां यावयाची नाहीं. पारतंत्र्याखालीं झालेलीं सर्व कृत्यें नीतिशास्त्राचे मर्यादेबाहेर आहेत. ह्यामुळें नीतीचे दृष्टीनें स्वातंत्र्याची आवश्यकता आहे हें उघड आहे. स्वातंत्र्य नीतीचे विरुद्ध नसून त्याचा तिला आधार आहे. तात्पर्य, जरी मनुष्य स्वातंत्र्यप्रिय असला तरी स्वातंत्र्य ही गोष्ट अनिष्ट, घातक किंवा नीतिविरुद्ध असल्यामुळें त्यास ती प्राप्त होतां कामा नये असें ह्मणतां यावयाचें नाहीं. उलट स्वातंत्र्य अभिनंदनीयच आहे. ह्यामुळेंच स्वातंत्र्यार्थ रणें माजून राहिलीं आहेत. आणि ' हें स्वातंत्र्ययुग आहे ' ' पारतंत्र्याचे किंवा दास्याचे दिवस संपून स्वातंत्र्ययुगास आरंभ झाला आहे ' असें आनंदानें, शेखीनें, अहंपणानें ह्मटलेलें अलीकडे आपल्या कानीं पडूं लागलें आहे; जणूं काय सत्ययुग, त्रेतायुग, द्वापारयुग व कलियुग ह्या पूर्वीं माहीत असलेल्या चार युगांहून आणखी एका निराळ्याच नवीन युगाचा अर्वाचीन सुधारलेल्या काळीं प्रथमच शोध लागला आहे; आणि जणूं काय निदान हिंदुस्थानांत तरी, नुकत्याच संपलेल्या एकोणिसाव्या शतकाचे उत्तरार्धांत ह्या स्वातंत्र्ययुगास दयाळू इंग्रजी राज्याचे तंत्राखालीं आरंभ

होण्यापूर्वी पहिलीं तिन्हीं युगें व गतकलीचा तोंपर्यंतचा काल हीं केवळ स्वातंत्र्यहीन असून ' परवशतेची तिखट सुरी उरा लागल्यामुळें ' घायाळ होऊन निचेष्ट पडलीं होतीं व मुद्दाम विलायतेहून नवीन मागविलेलें इंग्रजी तलरूपी रामबाण औषध हिंदुस्थानास वेळींच पोंचल्यामुळें त्यास दयाळू इंग्रज सरकारच्या राज्यछत्राखालीं चैतन्य प्राप्त होऊन स्वातंत्र्याचा उपभोग सुदैवानें मिळूं लागला आहे! पण असेंही नसेल कशावरून? नाहीं कोणीं ह्मणावें? आधींच आमचा इतिहास तुटपुंजा; पहिल्या तीन युगांबद्दल त्यांच्या नांवापलीकडे एक अक्षरसुद्धां आह्मांस उपलब्ध नाहीं; आणि गतकलीच्या सरासरी पांच हजार वर्षांपैकीं तरी नांव घेण्यासारखा किती वर्षांचा इतिहास आपणास उपलब्ध आहे? एवंच पूर्वीचीं तीन युगें व कलीचा पूर्वभाग ह्यांच्या स्वातंत्र्यपारतंत्र्याचा प्रश्न इतिहासाचे अभावीं समाधानकारक रीतीनें सुटणें कठीण आहे. तेव्हां चालू असलेलें जें ' स्वातंत्र्ययुग ' तें तरी कितपत अन्वर्थक आहे तें पाहूं. स्वातंत्र्य मनुष्यास निसर्गतःच प्रिय असून तें त्याचे हातीं लागण्यास विशेष महत्वाचा आक्षेपही नसल्यामुळें स्वातंत्र्यशोधार्थ व त्यानंतर स्वातंत्र्यप्राप्त्यर्थ त्यानें खटपट करणें कांहीं वावगें नाहीं. स्वातंत्र्याचा प्रश्न एकंदरींत मनोरंजक असून महत्वाचाही आहे. तेव्हां त्याजकडे वर सांगितलेल्या मर्यादित दृष्टीनें पहाण्यास कांहीं हरकत नाहीं.

स्वातंत्र्याचा विचार समाज व व्यक्ति ह्या दोहोंच्या दृष्टीनें केला पाहिजे. ह्मणजे स्वातंत्र्याचे दोन प्रकार आहेत—समाजस्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य—असें ह्मटलें असतां चालेल. ह्यांपैकीं निदान पहिलें तरी ह्मणजे समाजस्वातंत्र्य आपणास आहे असें ह्मणतां येत नाहीं. परकी अमलाखालीं कोणताही समाज स्वतंत्र असणें शक्य नाहीं. समाजस्वातंत्र्य व परराज्य ह्या दोन गोष्टी परस्पर विरुद्धच होत; अथवा त्यांस परस्परनिषेधक किंवा परस्परविघातक ह्मटलें तरी चालेल. अथवा साधारण बोलण्यांत त्यांनें विळ्याभोंपळ्याएवढें उजू आहे; त्यांत

अंधार व उजेड इतका मेळ आहे. तात्पर्य परराज्य ह्मणजे समाज-स्वातंत्र्याचीच हानि किंवा समाजाचें पारतंत्र्य होय. तेव्हां समाजाचे दृष्टीनें तरी आह्मीं सध्या स्वतंत्र नाहीं, मग आमचे राज्यकर्ते कितीही सुधारलेले, उदात्त, परोपकारी, अथवा स्वार्थत्यागी असोत, त्यांचा हिंदुस्थानांतील वास आमच्या स्वातंत्र्यास विघातक आहे हें दृष्टीस पड-ण्यास सूर्यप्रकाशाची जरूर नाहीं; हें सत्य सूर्याप्रमाणेंच स्वयंप्रकाश आहे ह्यामुळें त्याविषयीं विशेष लिहिण्याची जरूर नाहीं. तथापि कदाचित् असें वाटण्याचा संभव आहे कीं, आपण परराज्याचे तंत्राखालीं असल्या-मुळें जरी आमच्या समाजास राजकीय विषयांत स्वतंत्र संचार करितां येत नाहीं तरी त्यास ‘ सामाजिक ’ धार्मिक, व्यापारिक व शिक्षण-विषयक बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य आहे ह्मणून आमच्या समाजास हल्लीं-सुद्धां सर्वथैव परतंत्र ह्मणतां येत नाहीं. आह्मांस लढाई, तह, कायदे-कानू, राज्यव्यवस्था ह्या गोष्टी करितां येत नसल्या ह्मणजे ह्या करण्याचें स्वातंत्र्य नसलें ह्मणून काय झालें? ‘ सामाजिक सुधारणा ’ धार्मिक सुधारणा ह्मणजे बालविवाहप्रतिबंध, विधवापुनर्विवाह, रोटीबेटीचा अप्रतिबंध व्यवहार, प्रार्थनासमाज, इत्यादि गोष्टी, तसेंच आयात व निर्गत मालाची देवघेव, ने आण, औद्योगिक संस्था, शाळा, ग्रंथालयें, सार्वजनिक व्याख्यानें इत्यादि अनेक गोष्टींत आमच्या कल्पनांप्रमाणें वागण्याची आह्मांस पूर्ण मुभा नाहीं काय? जर असेल तर परराज्याची तलवार किंवा बंदुक आमच्या समाजस्वातंत्र्यास सर्वस्वी घायाळ करीत नाहीं असेंच ह्मटलें पाहिजे. ह्या ह्मणण्यांत बरेंच तथ्य आहे असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे. आणि ज्याच्या स्वातंत्र्याच्या कल्पनाच संकुचित झाल्या आहेत आणि ज्याना राज्यकर्त्यांचे भाषणावर पूर्ण भरवसा असून ज्यास त्यांच्या भाषणांत व कृतींत आणि कायद्यांत व अंमलबजावणींत कांहीं फरक दिसत नाहीं, त्यास वरील विधान सत्यमयच ह्मणजे निवळ सत्यानें ओथंबलेलें आहे असें वाटेल ह्यांत संशय नाहीं. परंतु ज्याची स्वातंत्र्यकल्पना जिवंत आहे आणि ज्याची दृष्टि अंधक झाली नाहीं त्यास निराळाच प्रकार आढळून आल्याशिवाय रहाणार

नाहीं. सामाजिक सुधारणा समाजाचे हातांत आहे हें खरें; तथापि जर एखादी गोष्ट राज्यकर्त्यांचे मताप्रमाणें वाईट असेल तर ती आह्मांस कितपत चालू करितां येईल किंवा पूर्वीची चालू असलेली पुढें चालवितां येईल ह्याचा वानवाच आहे. त्याच-प्रमाणें धर्माचे बाबींत हात घालावयाचा नाहीं असें जरी राज्यकर्ते ह्मणत असले तरी अप्रत्यक्ष व प्रत्यक्षही वर्तनानें ते आपल्या शब्दास हरताळ लावीत आहेत असें, मिशनरी लोकांच्या संस्था, आमचीं देव-स्थानें व त्यांच्या देणग्या, इत्यादि गोष्टींचा जो बारकाईनें शोध करील त्याचे स्पष्टपणें नजरेस आल्यावांचून रहाणार नाहीं. व्यापारांत आमचें स्वातंत्र्य लहान मुलाप्रमाणेंच होय. समाजाचे दृष्टीनें व्यापार व उद्योग ह्मणजे समाजासमाजांतील स्पर्धा होय. ह्मणजे ह्या गोष्टींत हिंदुस्थानास इतर राष्ट्रांशीं टक्कर द्यावयाची आहे. परंतु इतर राष्ट्रें बरींच वर्षें तालीम व कसरत करून तयार झालेल्या मल्लाप्रमाणें ह्या बाबतींत असून हिंदु-स्थानची स्थिति तालमींतील नवशिक्या लहान उमेदवाराप्रमाणें आहे; ह्यामुळें ह्या लहान मुलाला कसलेल्या मल्लाशीं कुस्ती करण्याचें स्वातंत्र्य आहे असें ह्मणणें ह्मणजे त्यास आपणा स्वतःस जमीनदोस्त करण्याचें स्वातंत्र्य आहे असेंच ह्मणण्याप्रमाणें नाहीं काय? शिवाय ह्या व्यापाराचे व उद्योगाचे स्पर्धारूपी कुस्तीमध्यें जेव्हां जेव्हां इंग्लिश व्यापाऱ्यांचे पदरास चट्टा लागण्याचा किंवा त्यांच्या हितास अल्पही धक्का लागण्याचा संभव येतो, तेव्हां तेव्हां बकाप्रमाणें तटस्थ बसलेले आमचे निःपक्षपाती, न्यायी, भूतदयावान् राज्यकर्ते आपल्या जातभाईस हळूच पाठीमागून जोर देत नाहींत काय? फयाक्टरी लॉज् ह्मणजे गिरण्यांबद्दलचे कायदे, निर्गतमालावरील कर इत्यादि गोष्टीनीं वरील विधानाची सत्यता स्थापित होण्यासारखी नाहीं काय? शिक्षणविषयांतसुद्धां आपणास असलेल्या स्वातंत्र्याचा भोपळा नुकत्याच उठून गेलेल्या 'युनिव्हर्सिटीज् कमिशन'नें बराचसा फोडला नाहीं काय? तात्पर्य ह्या राज्येतर बाबतींतीलही आमचें समाजस्वातंत्र्य केवळ भ्रममूलकच असून त्यास पारतंत्र्य हेंच नांव विशेष शोभेल. आमची ह्या निबंधांतील दृष्टि राजकीय नसल्यामुळें ह्या संक्षे-

पानेंच दिलेल्या स्पष्टीकरणापलीकडे जाणें विषयांतर होणार आहे. तथापि तेवढें स्पष्टीकरण स्थूलदृष्टीचा आक्षेप दूर करण्यास अवश्य व पुरें आहे. तेव्हां समाजाचे दृष्टीनें तरी स्वातंत्र्ययुगास आरंभ झालेला नसून त्याचा अद्याप बहुतेक अभावच आहे असेंच ह्मणणें वस्तुस्थितीस जास्त धरून आहे हें उघड आहे.

परंतु आह्मीं जेव्हां 'हें स्वातंत्र्ययुग आहे' किंवा 'स्वातंत्र्युगास आरंभ झाला आहे' असें ह्मणतों तेव्हां तें समाजाचे दृष्टीनें नसून व्यक्तीचे दृष्टीनें होय. परराज्याचे वेळीं राष्ट्रास समाजस्वातंत्र्य राजकीय विषयांत तरी नसतेंच; आणि इतर सार्वजनिक बाबतींतही त्याचे हातपाय जरी प्रत्यक्ष जखडलेले नसले तरी परराज्यरूपी पक्षघातानें ते बहुतेक लुळेच पडल्यासारखे आहेत हें खरें. तथापि व्यक्तीचे दृष्टीनें आमचें स्वातंत्र्य हल्लीं वास्तविक आहे इतकेंच नव्हे, तर त्यास इंग्रजी राज्याखालींच आरंभ झाला आहे असें ह्मटलें पाहिजे. कारण कीं, प्राचीनकाळीं जरी हिंदुस्थानांत कधीं काळीं स्वराज्य असलें तरी राज्यव्यवस्था अनियंत्रितच असल्यामुळें ह्मणजे राजा करील ती पूर्वदिशा, हाच न्याय सर्व बाबतींत चालू असल्यामुळें सर्व प्रजाजनांना एका प्रकारची गुलामगिरीच करावी लागत असे. तात्पर्य, राजा हा धनी व प्रत्येक मनुष्य श्रीमंत, गरीब, विद्वान्, अविद्वान्, स्त्री, पुरुष, लहान, मोठा, हा राजाचा केवळ दास असे. तशी हल्लीं स्थिति नाहीं. हल्लीं प्रत्येक व्यक्तीस स्वतःपुरतें पूर्ण स्वातंत्र्य आहे. ह्याच दृष्टीनें स्वातंत्र्ययुगाचा महिमा समजला पाहिजे.

ह्या ह्मणण्यांत बरेंच सत्य आहे असें वाटण्याचा संभव आहे. शिवाय असा पुष्कळांचा अलीकडे समज आहे असें मानण्यास आधार आहे; आणि व्यक्तिस्वातंत्र्य हा विषय समाजस्वातंत्र्याप्रमाणें फारसा नाजुकही नाहीं. तेव्हां त्याचा जरासा जास्त खुलासा करणें जरूर आहे. वरील पूर्वपक्षाचे विधानांत सत्य आहे असें जरी क्षणभर घेऊन चाललें तरी तें इतक्या अतिशयोक्तीनें निर्दिष्ट केलें आहे कीं त्याचें बहुतेक असत्यांतच रूपांतर झालें आहे. स्वराज्याचे वेळच्या व्यक्तिदास्या-

त्याकडे विकासक ( Magnifying ) चष्म्यानें पाहिलें आहे; आणि अलीकडील व्यक्तिद्वास्याकडे संकोचक (*Parvifying) चष्म्यानें पाहिलें आहे. अशा प्रकारें दुबार अतिशयोक्ति झाल्यामुळें वस्तुस्थिति व वर्णन ह्यांमध्यें फाजिल अंतर पडलें आहे; ह्मणून वरील विधानास निदान फाजिल, अचरट ह्मणजे जवळ जवळ टाकाऊच असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं असें कोणासही तेव्हांच कळून येणार आहे. आणि त्या विधानांत कांहीं थोडासा सत्यांश आहे असें जें वाटतें त्याचें कारणही उघड आहे. तें असेः--स्वतःचें शरीर व स्वतःची मालमत्ता ह्यांचें इंग्रजी राज्यांत पूर्वीपेक्षां अधिक समाधानकारक रीतीनें योग्य संरक्षण होत असून लढाई व दंगाधोपा ह्यांस अतिसंक्षेपरूप मिळाल्यामुळें प्रत्येकास स्वास्थ्य व शांतता ह्यांचा जास्त उपभोग मिळूं लागला आहे. वाटेल त्यास वाटेल त्यावेळीं काठीस सोनें बांधून काशीपासून रामेश्वरापर्यंत निर्धास्त फिरण्याची सोय झाल्यामुळें प्रत्येकास व्यक्तिस्वातंत्र्य पूर्वीपेक्षां वाढत्या प्रमाणावर आहे असें वाटणें साहजिक आहे; परंतु हा समज व सत्य ह्यांत महदंतर आहे. ह्या समजास आधारभूत वाटणारें कारण वर दिलें आहे; तथापि तें भुताप्रमाणेंच मनुष्याची दृष्टि चकविणारें आहे, तें केवळ मृगजला-प्रमाणें भासमान होय असें सूक्ष्मदृष्टीस प्रत्ययास आल्यावांचून राहणार नाहीं. इंग्रजी राज्यांत शरीर व मालमत्ता ह्यांचें रक्षण होत आहे हें खरें; तथापि शरीर दिवसेंदिवस कृश व निरुपयोगी होत चाललें आहे आणि संपत्तीनें राज्यकर्त्यांस माळ घालण्यासाठींच जणूं काय विलायतची वाट धरल्यामुळें ती दिवसेंदिवस संपुष्टांत येत आहे; आणि काठीस सोनें बांधून एकट्यासही, याला नाहीं तरी, चैनीखातर देशपर्यटण करण्याची सोय झाली आहे हें खरें, तथापि काठीस सोनें बांधण्यासच दुर्मिळ झालें आहे, आणि काठी धरणारा कोडी पहिलवान् होत चालल्या-मुळें तिनेंही काठीच्या ऐवजीं छडीचें रूप धारण केलें आहे; आणि पोट व डोकें ह्यांचा परिघ स्वास्थ्य व शांतता ह्यांचे उपभोगानें वाढत्या

---

* अशा तऱ्हेच्या चष्म्याची जरूर पडली नाहीं ह्मणून, त्या अर्थाचा द्योतक शब्दही इंग्रजांनीं केला नाहीं.

प्रमाणावर असल्यामुळें निदान पायांस त्यांचें ओझें देशभर हिंडविण्याची शक्ति न राहिल्यामुळेंच जणूं काय आगगाड्या अस्तित्वांत आल्या आहेत. ह्यांकडे मात्र सुखवस्तु प्राण्यांची नजर जात नाहीं हीच शोचनीय स्थिति आहे. संपत्तीनें मनुष्यास दिसेनासें होतें अशी पूर्वापार समजूत आहे; त्याचप्रमाणें तालिमबाज लोकही उताणे चालत असल्यामुळें त्यांसही आपल्या पायांखालचें दिसत नाहीं हेंही ठीकच आहे. परंतु अलीकडे जे नवीन नवीन अनेक शास्त्रीय शोध लागत आहेत तसलाच एक साधा शोध लागण्याचे बेतांत आहे असें वाटतें. तो असा कीं संपत्ति व शरीर हीं जरी एकसारखीं आटत जात चाललीं तरी त्यांच्या आटण्यानेंही दृष्टीस अंधत्व प्राप्त होण्यास हरकत नाहीं. आणि असें होणेंही कांहीं अशक्य नाहीं. कधीं कधीं एकच परिणाम निरनिराळ्या दोन परस्पर विरोधी कारणांनीं घडून येतो. अग्नीनें अंगास चटका बसतो व अति थंडीनेंही अंगास चटका बसतो. आणि उष्णताधिक्यानें जसें पदार्थाचें आकारमान वाढतें त्याचप्रमाणें उष्णता कमी केल्यानेंही तें कधीं कधीं वाढतें. पाण्याचें उदाहरण रसायनशास्त्रवेत्त्यांस ह्या ठिकाणीं सुचल्याशिवाय रहाणार नाहीं. आकारवृद्धीप्रमाणेंच अंधत्वाची गोष्ट असावी; जर तें संपत्तीची भरती व शरीरपुष्टि ह्यांनीं जसें उत्पन्न होतें तसेंच संपत्तीची ओहटी व शरीरकार्श्य ह्यांनींही उत्पन्न होऊं लागलें, तर पाण्याच्या 'रासायनिक वैलक्षण्या' प्रमाणेंच दृष्टीच्या वैलक्षण्याचा नूतन अपूर्व शोध लागला असें ह्मणण्यास काय हरकत आहे? परंतु हें निरूपण केवळ अलंकारिक शब्दाडंबर असून त्यानें व्यक्तिस्वातंत्र्याची शुष्कता स्थापित होत नाहीं; तुह्मीं अस्थिपंजर किंवा निदान पेद्रु बनत चाललात व तुमची संपत्ति परलोकवासार्थ तुह्मांस सोडून जाऊं लागली, आणि 'ह्यातपाय झाले लुळे आणि जीभ चुरु चुरु हाले' अशी तुमची जर स्थिति होत चालली असली तर त्यास इंग्रज सरकार काय करणार? ह्या गोष्टींनीं सरकारनें व्यक्तीस जें स्वातंत्र्य दिलें आहे तें कसें नाहींसें होतें? एवंच ह्या गोष्टी जरी सत्य असल्या तरी त्या व्यक्तिस्वातंत्र्याचे दृष्टीनें अप्रकृतच होत हें निर्विवाद आहे असें क्षणभर वाटण्याचा संभव आहे; परंतु आमची

निर्बळता व अकिंचनता ह्यांचा व्यक्तिस्वातंत्र्याशीं जो संबंध आहे तो, जरी ढोबळ चर्मचक्षूंस गोचर नसला तरी वास्तविक नाहीं काय? काय ह्मणे 'आह्मी निर्बळ झालों ह्मणून काय झालें आह्मांस इकडे तिकडे हिंडण्याचें स्वातंत्र्य आहे; आणि आह्मी दरिद्री जरी असलों तरी आह्मांस आमची संपत्ति लपवून किंवा पुरून ठेवण्याचें कारण नाहीं.' परंतु एखाद्याचे हातपाय बांधल्यावर तो कुरकुरूं लागला असतां त्यास जर कोणी असें सांगूं लागला कीं, 'अरे तुला काय कोणी खोलींत कोंडून ठेविलें आहे थोडेंच; तूं अगदीं मोकळ्यावर असून तुझ्या मनास वाटेल तिकडे जाण्याची स्वतंत्रता आहे'; किंवा एखाद्या पालकानें जर अज्ञान मुलगा वयांत आल्यावरही त्याची मालमत्ता आपल्याच स्वाधीन ठेवून त्यास फक्त तो खर्चापुरतेंच देऊं लागला आणि ह्मणूं लागला कीं, 'अरे तुला इतर गोष्टींची उठाठेव पाहिजे कशास? तुला पोटभर अन्न व अंगभर वस्त्र मिळालें ह्मणजे झालें. स्वस्थ बसून खाण्यांतच मजा आहे. तुला सध्यां चोराची भीति बाळगण्याचें कारण नाहीं कीं कसलीही काळजी करण्याची जरूर नाहीं. खुशाल खावें प्यावें व स्वतंत्रपणें हिंडावें' असें जर कोणी दुसऱ्यास स्वातंत्र्याचें यथार्थत्व दर्शवूं लागला तर तें त्यास कितपत रुचेल किंवा कितपत पटेल? ह्यापेक्षां आमच्या मनगटांत ताकद असतांना आमच्यावर कोणी हात टाकिला तरी पुरवेल; परंतु आह्मांस जिवंत मुडद्याचें स्वातंत्र्य नको; तसेंच आमच्यापाशीं कांहीं माया असली पाहिजे, मग आह्मी चोराच्या भीतीस जुमानणार नाहीं; परंतु तुमचें आह्मांस निर्धास्त व स्वातंत्र्यदायक अठरा विश्वे दारिद्र्य पतकरत नाहीं असें कोण विचारी मनुष्य कबूल करणार नाहीं? सदा मऱ्या परंतु श्रीमंत मनुष्यास ज्याप्रमाणें ही श्रीमंती नको, त्यापेक्षां धडधाकड गरीबी बरी असें वाटतें; त्याचप्रमाणें आह्मांस हें निर्बळी स्वातंत्र्य व दरिद्री स्वास्थ्य नको, कारण तें असून नसून सारखेंच, त्यापेक्षां जोरदार गुलामगिरी व श्रीमंतीची काळजी बरी; तात्पर्य असल्या पोकळ नामधारी स्वातंत्र्यापेक्षां निव्वळ पारतंत्र्यच काय वाईट; असल्या पुळपुळित सौभाग्यापेक्षां झळझळित वैधव्य पतकरलें असें कोणास बरें वाटणार नाहीं?

अहो, पण तुह्मीं व्यक्तिस्वातंत्र्याचा हा भलताच अर्थ केलात. निदान आमच्या तरी मनांत हा अर्थ नव्हता. आह्मीं जेव्हां व्यक्तिस्वातंत्र्य आह्मांस उपभोगावयास मिळूं लागलें आहे असें ह्मणतों- तेव्हां आमची दृष्टि तुमच्यासारखी असल्या कुतर्कांमध्यें संचार करीत नसते; आमचा अर्थ साधा, सरळ व स्पष्ट आहे. तो तुह्मीं बाजूस ठेवून असल्या आडरानांत नेऊन आह्मांस तुह्मीं चकवूं पहातां हें बरें नव्हे. अहो, आमचें ह्मणणें इतकेंच कीं, हल्लीं प्रत्येकास वाटेल तें शिक्षण प्राप्त करून घेतां येतें, वाटेल तो धंदा करितां येतो, वाटेल तर नोकरी धरावी, नाहीं तर स्वतंत्र धंदा पतकरावा; नोकरींतही कोणाची खुशामत करावयास नको किंवा कोणाची पायधरणी नको, आपण बरें कीं आपलें काम बरें. त्याचप्रमाणें वाटेल त्या विद्येचा जन्मभरपर्यंत व्यासंग करणें, लेख लिहिणें, किंवा व्याख्यानें देणें, ह्या कामीं आह्मांस पूर्ण स्वातंत्र्य आहे. तसेंच लोकांच्या मुरवतीखातर कोणतीही धार्मिक किंवा सामाजिक गोष्ट करण्याची आतां आह्मांस जरूर राहिली नाहीं. विचार व आचार ह्यांमध्यें मेळ घालण्यास पूर्ण सवलत आह्मांस प्राप्त झाली आहे. एवंच जन्मास आल्यापासून लहानपणच्या शिक्षणांत, तरुणपणच्या धंद्यांत व ह्मातारपणच्या स्वास्थ्यांत आह्मांस कांहीं अडचण राहिली नाहीं.

ह्या विधानांचा फारसा खोल विचार करण्याची जरूर नाहीं. प्रत्येक व्यवहारकुशल मनुष्यास त्यांची सत्यासत्यता अनुभवानें ठरविण्यास हरकत नाहीं. कोणत्याही प्रकारच्या शाळेंत शिरण्यास कोणासही आडकाठी नाहीं आणि कोणत्याही परीक्षेस बसण्यास कोणासही प्रतिबंध नाहीं. शिक्षणाचे सर्व दरवाजे सर्वांस खुले असून प्रत्येकानें वाटेल त्या दरवाजानें विद्यामंदिरांत प्रवेश करावा. ही झाली उपपत्ति Theory; आतां प्रचार pratice कसा आहे पहा! ज्या शाळा आहेत त्या बहुतेक लेखनवाचन, गणित, इतिहास, भूगोल, इत्यादि विषय शिकविण्याच्या; मग त्या मराठी शाळा, ट्रेनिंग कॉलेजें, हायस्कुलें, किंवा कॉलेजें. वैद्यक, चित्रकला, ऐंजिनिअरिंग, सुतारकाम इत्यादि विषय

शिकविण्याचीही कुठें कुठें एखाद दुसरी संस्था आहे. परंतु ज्यास धंदेशिक्षण असें अलीकडे ह्मणतात त्याच्या पाठशाळा बहुतेक नाहींतच, असें ह्मटलें असतां चालेल. आणि वरसुद्धां ज्या शिक्षणसंस्था सांगितल्या त्यांतील शिक्षण दिवसेंदिवस महाग होत चाललें आहे. एवंच विद्यामंदिराचे बरेच मोठमोठे दरवाजे अजीच बंद ठेविलेले असून जे कांहीं थोडेसे उघडे आहेत त्यांतून तिकीट विकत घेतल्याशिवाय मंदिरांत प्रवेश करणारास मज्जाव आहे. बरें तिकीट तरी सवंग आहे काय? नाहीं, तर तें आधींच पुष्कळांचे आटोक्याबाहेरील असून तें अधिक दुर्मिळ करण्याची खलबतें व खटपटी चालू आहेत. शिक्षणस्वातंत्र्याची अशा प्रकारची थोडक्यांत रडकथा आहे. आतां तरुणपणांतील धंद्यांकडे पहा! प्रथम जर धंदेशिक्षणच नाहीं तर वाटेल तो धंदा करण्याचे स्वातंत्र्यांत काय अर्थ राहिला! आणि वर ज्या कांहीं धंदे शिकविण्याच्या संस्था दाखल केल्या आहेत त्यांतील कांहीं फारच महाग ह्मणजे केवळ श्रीमंतांस उघड्या आहेत व बाकीच्या अगदीं मुळाक्षरीच Elementary असल्यामुळें बहुतेक निरुपयोगीच होत. नोकरीसंबंधानें पहातां हीच शोचनीय स्थिति नजरेस पडते. नोकरी मिळविण्यासाठीं काय प्रयास पडतो, किती जोडे फाडावे लागतात ह्याचा अनुभव हल्लीं बरोबर झाला असल्यामुळें त्याचें विशेष वर्णन करण्याची जरूर नाहीं. शिवाय कांहीं खात्यांत नेटिवांस नोकरीच मिळत नाहीं, ब्राह्मणांस जिकडे तिकडेच थोडथोडा मज्जाव आणि कोणत्याही खात्यांतील उच्च प्रतीच्या जाग्यांची वरणी फक्त गोऱ्या कातडीसच मिळावयाची; लेख लिहिणें व व्याख्यान देणें तेंसुद्धां मागेंपुढें खांचखळगे पाहून; इत्यादि गोष्टींनीं इंग्रजींतील व्यक्तिस्वातंत्र्याची चांगलीच मिरवणूक निघत नाहीं काय? वृद्धपणीं मात्र स्वस्थपणें मरण्याचें स्वातंत्र्य आहे. परंतु वृद्धपणच मात्र कोणास पहाण्यास मिळत नाहीं. परंतु वार्धक्य ही थोडीच अभिनंदनीय गोष्ट आहे— तथापि साठ, सत्तर, इत्यादि वर्षांचे वाढदिवस साजरे होत आहेत—तेव्हां वृद्धपणचे हाल न भोगतां मरणें काय वाईट? आणि वृद्धपण दैवयोगानें प्राप्त झालें तरी मरणाचें स्वातंत्र्य आहेच ह्यांत संशय नाहीं. पण तेंही

अलीकडील प्लेगच्या व्यवस्थेनें लयास गेलें आहे! असो. वृद्धाण ह्मणजेच कमजास्त परावलंबन; तेव्हां त्यावेळीं इंग्रजींत व्यक्तीला स्वातंत्र्य आहे कीं नाहीं हा फारसा महत्वाचा मुद्दा नाहीं. तात्पर्य, व्यक्तिस्वातंत्र्यावर जी स्वातंत्र्यमंडनार्थ कांहींकांची भिस्त येऊन पडली होती तीही अस्थानींच होय असें ह्मटल्यावांचून गत्यंतर नाहीं.

येथपर्यंत इंग्रजींत सुरू झालेल्या स्वातंत्र्ययुगाची शहानिशा झाली. तिजवरून असें दिसतें कीं समाजस्वातंत्र्यासंबंधानें तर बोलावयासच नको; आणि व्यक्तिस्वातंत्र्यासंबंधानें जरी अगदींच मौन धरण्याचें कारण नाहीं तरी त्याजविषयीं बोलतांना शेखी, अहंभाव, किंवा धन्यता मानण्यास अवकाश नाहीं, तर केवळ कांहीं तरी फार तर मुळमुळ रडत रडत पुटपुटण्यास हरकत नाहीं येवढेंच; आणि कांहीं दिवसांनीं, हल्लींचीच स्थिति चालू राहिल्यास, तेंही तोंडांत बोळा बसल्यानें किंवा गळा दाबला गेल्यानें बंद करावें लागेल.

ह्यावरून व्यक्तिस्वातंत्र्य काय कीं समाजस्वातंत्र्य काय, स्वराज्याशिवाय व्यर्थ. ह्याचा अर्थ असा नाहीं कीं परराज्याखालीं स्वातंत्र्याचा आह्मांस अल्पांशही उपभोगण्यास मिळत नाहीं. तर जो थोडासा अंश प्रजाजनांचे वांट्यास येतो त्यानें पोषण नीट होत नसल्यामुळें त्याचा विकास होत नाहीं; आणि यदाकदाचित् तसा विकास होऊं लागला तर त्यास अवकाश मिळत नाहीं, त्याची लागलीच खच्ची व्हावयाची किंवा त्याजवर टोळधाड येऊन पडावयाची. आणि ह्यामुळेंच 'एकीं एकीं एक' ह्याचे पलीकडे कधींच मजल जावयाची नाहीं. पुन्हा येरे गाड्या मागल्या असें चालावयाचें. हाच हिंदुस्थान व जपान ह्यांमध्यें फरक आहे. ह्मणूनच जपानास मागल्या तीस वर्षांत ज्या गोष्टी स्वातंत्र्याचे जोरावर करितां आल्या त्या हिंदुस्थानास एका शतकांतही शक्य अशा वाटूं लागल्या नाहींत. तेव्हां आतां आमच्या नूतन स्वातंत्र्ययुगाचे नांवानें हंसावें कीं रडावें हें तुमचें तुह्मींच ठरवा. त्यांत वेळ घालविण्याची आमची इच्छा नाहीं. आह्मांस स्वातंत्र्याचा शोध करावा-

याना आहे. हल्लींच्या आमच्या स्थितींत स्वातंत्र्य नाहीं हा निकाल लागल्यावर आह्मांस पुढचा रस्ता काढिला पाहिजे. आमच्या दृष्टीनें समाजस्वातंत्र्याची मदती व्यक्तिस्वातंत्र्यावरच आहे. ह्मणजे समाजास स्वातंत्र्य जें पाहिजे तें व्यक्तींसाठींच होय. ह्मणजे समाजस्वातंत्र्य किंवा राष्ट्रस्वातंत्र्य हें व्यक्तिस्वातंत्र्याचें साधन होय. ह्मणजे परतंत्र राष्ट्रापेक्षां स्वतंत्र राष्ट्रांतच व्यक्तीला अधिक स्वातंत्र्य असतें. असें नसतें तर समाजस्वातंत्र्याचा कोणीही फारसा पाठलाग केला नसता. शिवाय मनुष्य हा स्वातंत्र्यप्रिय प्राणी आहे असें जेव्हां आपण ह्मणतों तेव्हां आपली दृष्टि व्यक्तिसंबंधाचीच असते. ह्यामुळें व्यक्तीच्याच दृष्टीनें स्वातंत्र्याचा शोध केला पाहिजे. कोणत्या ठिकाणीं कोणत्या अवस्थेंत स्वातंत्र्य आहे कीं ज्याच्या प्राप्तीनें मनुष्याचें पूर्ण समाधान होईल? हा प्रश्न मुख्य होय. हल्लींचीच स्थिति अशा प्रकारची आहे असें जर कोणास वाटत असेल तर त्याचे डोळ्यांत येथपर्यंत अंजन घालण्याचा प्रयत्न झाला. तेव्हां आतां स्वराज्यांत किंवा परराज्यांत असें पूर्ण समाधानकारक स्वातंत्र्य कोठें सांपडेल ह्याच्या शोधार्थ पर्यटन किंवा भ्रमण करण्याचा विचार आहे. परराज्यांत असें स्वातंत्र्य नाहीं स्वराज्यांतच आहे, तेव्हां त्याचे प्राप्त्यर्थ यत्न केला ह्मणजे झालें हें उत्तर ठीक आहे. परंतु त्याची तरी शहानिशा झालीच पाहिजे कीं नाहीं? तेव्हां मनुष्याच्या एकंदर साधारण स्थितीचा विचार केल्यानें ह्या प्रश्नाचा निकाल लागेल असें वाटतें. स्वराज्य किंवा परराज्य ह्यांजकडे विशेष दृष्टि न देतां ह्या शोधार्थ इतस्ततः संचार करणें इष्ट आहे. ह्मणजे परराज्याचे ऐवजीं सध्या स्वराज्य आहे असें घेऊन चालून त्या परिस्थितींत पूर्ण समाधानकारक स्वातंत्र्याचा शोध झाला पाहिजे. ह्या कामीं आमच्या एका मित्रानें बराच शोध केला आहे. आजचा विषयसुद्धां आह्मांस त्याच्याच उदाहरणानें सुचला आहे. तेव्हां त्यानें ह्या विषयासंबंधानें काय ह्मणणें आहे तें पाहिलें ह्मणजे झालें. आपणास वाटेल तर तें ग्राह्य करावें, नाहीं तर त्याज्य समजावें. आमच्या मित्राचे ह्मणण्याचा इत्यर्थ पुढें दिला आहे.

'पहिल्या चार पांच वर्षांची मला मुळींच आठवण नाहीं ह्मटलें तरी चालेल. त्यावेळीं मी स्वतंत्र होतों कीं परतंत्र होतों हें मला सांगतां येत नाहीं. त्यावेळीं हा प्रश्नही माझ्या मनांत उभा राहिला नाहीं; किंवा तो मला तेव्हां समजलाही नसता. तथापि त्या वयांत स्त्रीपुरुष, श्रीमंतगरीब, राजाप्रजा, धनीचाकर, शहाणावेडा ह्या भेदांमुळें मुलांच्या वर्तनांत--पण त्यावेळीं वर्तन तरी कसलें, ह्मणून मुलांच्या हालचालींत व भाषणांत असें ह्मणणें बरें--फरक पडत नसल्यामुळें साधारणपणें कोणत्याही मुलाच्या त्या वयांतील स्थितीचें निरीक्षण केलें असतां मला स्वतःला त्या वयांतील स्थितीचा अंदाज करण्यास कांहींएक हरकत दिसत नाहीं. श्रीमंताचें मूल असलें तर त्यास उंची कपडे, मूल्यवान् दागिने, किंवा गाड्या घोडीं मिळतात; आणि नोकरचाकर त्या लहान वयांतसुद्धां त्यास राव, भय्या, साहेब वगैरे बहुमानार्थी पदव्या देऊन त्यांजपाशीं 'याहो जाहो' असें अनेकवचनीं बोलतात; आणि राजाचे मुलास श्रीमंतांचे मानानें ह्या गोष्टी अधिक प्रमाणानें मिळतात; परंतु गरीबाचे मुलास वरील डामडौलाच्या, बडिजावाच्या भपकेदार गोष्टींपैकीं जरी एकही नसली तरी श्रीमंताच्या किंवा राजाच्या मुलाप्रमाणेंच त्याला हातपाय हालविण्यास किंवा इकडे तिकडे थोडेंसें चालण्यास किंवा वाटेल तें बोलण्यास--किंवा अक्षरें व शब्द उच्चारण्यास--त्या वयांत कांहीं अधिक अडथळा असतो असें दिसत नाहीं. तेव्हां इतर बाबतींत निरनिराळ्या प्रापंचिक स्थितींतील मुलांमध्यें त्या त्या स्थितीमुळें कितीही फरक असो, स्वतंत्रतेच्या दृष्टीनें सर्वांची स्थिति बहुतेक सारखीच हें उघड आहे. कांहीं खाण्यापिण्याचे पदार्थ किंवा खेळ ह्यासंबंधाच्या श्रीमंत मुलाच्या इच्छा गरीबाचे मुलाच्या इच्छेपेक्षां प्रसंगवशात् अधिक मानानें कदाचित् तृप्त होत असतील, तथापि हालण्याचालण्याची मोकळीक गरीबाच्या मुलापेक्षां श्रीमंताचे मुलास अधिक असते असें दिसत नाहीं; उलट त्याची फाजिल काळजी घेण्यांत येत असल्यामुळें व त्याचे फाजिल लाड होत असल्यामुळें, आणि सभोंवतीं नोकराचाकरांचा परिवार असल्यामुळें त्यास सदरहू बाबतींत गरीब मुलापेक्षां कमीच मोकळीक मिळते हें

प्रत्ययास येतें. तात्पर्य, वयाच्या चार पांच वर्षांचेनीं सर्व मुलांस सारखेंच स्वातंत्र्य असतें. तेव्हां मला स्वतःस जरी त्या वयाचें चांगलेसें स्मरण नसलें तरी आपली स्थिति कशी असली पाहिजे ह्याची मला पूर्ण कल्पना करितां येते. त्यावरून आपणास त्यावेळीं अनेक प्रसंगीं परतंत्रानेंच चालावें लागत होतें ह्मणजे आपणास शक्तीच्या अभावानें किंवा दुसऱ्यांच्या प्रतिबंधामुळें--कोणत्या तरी कारणानें—स्वैरसंचार करितां येत नव्हता; आणि गरीबीमुळें, किंवा दुर्मिळतेनें, किंवा अकालिक मागणीमुळें—-कोणत्या तरी कारणानें—आपल्या इच्छेस येईल तो पदार्थ आपणास मिळत नव्हता. ह्मणून माझीं पहिलीं चार पांच वर्षें स्वतंत्रतेचीं गलीं असें कसें ह्मणतां येईल बरें? मुलास कोणाची पर्वा आहे किंवा कसली लाज आहे त्यास वाटेल तें, वाटेल त्या ठिकाणीं व वाटेल त्या वेळीं करितां व बोलतां येतें असे उद्गार अनेकांच्या तोंडून निघतात. आणि त्यांत जरी नैसर्गिक व्यापार, बहुतेक निरर्थक शब्दोच्चार ह्यांसंबंधानें बरेंच तथ्य आहे, तरी शरीरसंरक्षणासाठींसुद्धां ज्या स्थितींत सर्वस्वी दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागतें ती स्थिति इतर बाबतींत किंवा वडिलांच्या दृष्टीनें कितीही मनोहर असो, तें आपल्या जन्मांतील स्वातंत्र्ययुग होय असें निदान मला तरी वाटत नाहीं.

तेव्हा आतां विद्यार्थिदशेंत तरी आपणाला स्वातंत्र्य होतें काय हें पाहूं. ह्या कालापासून मला माझी चांगली आठवण आहे. तेव्हां दुसऱ्याचे स्थितीचें निरीक्षण करण्याची मला जरूर नाहीं. प्रथम प्रथम तर मला मारून मुटकूनच शिकवावें लागत होतें. कधीं कधीं उचलबांगडी करूनसुद्धां मला इतर मोठ्या मुलांनीं किंवा नोकरांनीं मुद्दाम शाळेंत पोंचविल्याचें मला स्मरतें. आणि पुढें कांहीं दिवसांनीं शाळेंत जाणें व अभ्यास करणें ही जरी मला बरींच आवडूं लागलीं तरी जर मला इतरांचा धाकदपटशा किंवा दहशत नसती तर तीं माझ्या हातून कितपत यथासांग झालीं असतीं ह्या प्रश्नाचें संशययुक्त उत्तर देण्याचें कांहींएक कारण नाहीं. अभ्यासाचीच गोष्ट कशाला? खाण्यापिण्यांत,

उठण्याबसण्यांत, बोलण्याचालण्यांत, करण्यासवरण्यांत, देण्याघेण्यांत, बहुतेक सर्व गोष्टींत मला दुसऱ्याचेच तंत्रानें वागावें लागत होतें. अशा प्रकारचें पारतंत्र्य चांगलें का वाईट, इष्ट कीं अनिष्ट, हितावह कीं हानिकारक हा प्रश्न वेगळा; प्रकृत विषय स्वातंत्र्यशोध हा पडल्यामुळें तो प्रश्न ह्या ठिकाणीं अप्रकृत व अयोग्य होय हें उघड आहे. ह्मणून त्या वयांत मला स्वातंत्र्याची जरी गोडी माहीत होती व त्याची उत्कट इच्छा जरी माझ्या मनांत उत्पन्न झाली होती, तरी त्याचा उपभोग मला फारच थोडा मिळत असेल असें वाटतें. माझें मराठी शिक्षण होईपर्यंत ह्मणजे माझ्या वयाच्या बारा तेरा वर्षांपर्यंत बहुतेक अशा प्रकारचाच क्रम चालला होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं. '

या ठिकाणीं आह्मीं आपल्या मित्रांस ह्मटलें कीं तुह्मीं स्वातंत्र्य-शोधक ह्मणवितां आणि आपल्या स्वतःच्याच इतिहासाकडे लक्ष देतां ह्यास काय ह्मणावें? सर्व स्थितींतील मुलांचा विचार करावयास नको काय? ह्यावर त्यांचें ह्मणणें असें पडलें कीं, माझ्या स्थितीचेंच अवलोकन ह्या ठिकाणीं पुरे आहे. कारण जरी कांहीं कांहीं क्षुल्लक गोष्टींत इतरांत व माझ्यांत अंतर होतें व आहे तरी तें फारसें महत्वाचें नाहीं. ह्मणजे विद्यार्थिदशेंत बाल्यावस्थेंतल्याप्रमाणेंच सर्व मुलांची बहुतेक एकच स्थिति असते असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मनुष्यांत विशेष महत्वाचा जो फरक पडतो तो विद्यार्थिदशा संपून धंदा सुरू होतो तेव्हां त्यावेळीं एकाच्याच इतिहासानें किंवा अनुभवानें भागणारें नाहीं. हें मलाही कबूल आहे. ह्मणून धंदा सुरू होईपर्यंत मी एकट्याचाच अनुभव दिला आहे. तो बहुतेक सर्वसाधारण असल्यामुळें इतरांकडे मुद्दाम लक्ष पुरविण्याची जरूर नाहीं. पुढेंसुद्धां मी आपलाच अनुभव पुढें चालविला आहे, आणि जेव्हां दुसऱ्यांच्या अनुभवाची पुरवणी जोडणें मला अवश्य व भाग पडलें तेव्हां तसेंही केलें आहे. एवंच तुमचा मुद्दा माझ्या लक्षांत आहे. तुह्मीं माझी सर्व हकीकत सावधान चित्तानें नीट ऐकून घ्या, आणि मग तुह्मांस जें काय मला विचारावयाचें असेल तें

खुशाल विचारा; परंतु असें करण्याची तुह्मांस फारशी पाळी येईल असेंच मला वाटत नाहीं. तात्पर्य मी ह्या विषयाचा सर्व बाजूंनीं यथामति यथायोग्य विचार केला आहे आणि तो मी आपल्यापुढें मांडीत आहे, तो आपण प्रथम ऐकावा व मग आपल्या सूचना व शंका मी साभार व सविनय ऐकेन. असें करण्यानें वेळ व श्रम ह्यांची बरीच काटकसरही होईल. असें आमच्या मित्रांचें ह्मणणें पडलें व तें सयुक्तिक व ग्राह्य असेंही वाटल्यावरून आह्मीं त्यांस आपलें आख्यान निर्वेध चालविण्यास मोकळिक दिली. ते ह्मणाले :—

'ह्याप्रमाणें मराठीचा अभ्यास संपल्यानंतर मी इंग्रजी शिकावयास लागलों, व नंतर लौकरच एका अनिष्ट प्रसंगामुळें मला घर सोडून जाऊन दूरच्या एका शहरांत बोर्डिंगांत राहून अभ्यास करण्याची पाळी आली. तेव्हां अर्थात्च परतंत्रतेचा मजवरील प्रत्यक्ष अंमल जरा कमती होऊन स्वतंत्रतेचा मंद मंद प्रकाश मजवर पडूं लागला. तथापि त्यावेळींसुद्धां मला परतंत्रच समजलें पाहिजे. कारण घरचे नाहींत तरी बोर्डिंगांतले त्यापेक्षांही कडक नियम पाळणें, शिक्षकांच्या मनाप्रमाणें वागणें ह्या हितावह व अवश्य गोष्टी जरी बाजूस ठेविल्या तरी कांहीं शिक्षकांच्या हानिकारक नव्हत तरी निदान अनवश्यक प्रचंड लहरींमध्यें केवळ अनाथ ह्मणून गटंगळ्या खाव्या लागल्यामुळें, पारतंत्र्याचा अनुभव चालूलाच होता. आणि ही गोष्ट जरी बाजूस ठेविली तरी स्वातंत्र्यास आळें घालणाऱ्या अनेक गोष्टी अस्तित्वांत होत्या. कारण जरी खाणेंपिणें, वस्त्रप्रावरण इत्यादि बाबी एकीकडे ठेविल्या तरी सृष्टिसौंदर्य पाहण्यास निरनिराळ्या ठिकाणीं जाणें, पुस्तकें विकत घेणें, प्रवास करणें, प्रसिद्ध प्रसिद्ध स्थलें पहाणें, आप्तइष्टांच्या भेटीसाठीं त्यांजकडे जाणें, शारिरिक व्यायामासाठीं अवश्य असणाऱ्या गोष्टी मिळविणें इत्यादि अनेक बाबतींत मन खट्ट होण्याची पाळी वारंवार आलेली मला आठवते. हीच स्थिति माझा विद्याभ्यास पुरा होऊन मी संसारांत पडेपर्यंत बहुतेक तशीच चालली होती, व बहुतेक सर्वांची कमी अधिक प्रमाणानें तशीच चालते

हें निर्विवाद आहे. असो. एवंच जरी मी सरासरी माझ्या पंचविसी-पर्यंत शिकत होतों तरी तोंपर्यंत मला वयांत न आलेल्या अज्ञान मुला-प्रमाणेंच पालकांचे तंत्रानें बहुतेक वागावें लागत होतें. अशी स्थिति असणें व्यावहारिक दृष्ट्या इष्ट कीं अनिष्ट, उपयुक्त कीं अनुपयुक्त आहे, फायदेशीर आहे कीं तोट्याचें आहे हा प्रश्न वेगळा. त्याचा आमच्या स्वातंत्र्यशोधाशीं संबंध नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें मनुष्यास स्वतंत्रतेचा पूर्ण उपभोग घ्यावयास मिळतो कीं काय आणि असल्यास केव्हां, हा आपल्यासमोरील प्रश्न असल्यामुळें विद्यार्थिदशेंत आरंभापासून अखेरपर्यंत आपले विचार, आपलीं मतें, आपले समज, आपली आवड-निवड बाजूस ठेवण्याचे प्रसंग मला वारंवार येत असत व त्यामुळें माझा अगदीं जरी संताप होत नव्हता तरी ती स्थिति मला अप्रिय वाटे. अशा स्थितींत स्वातंत्र्योपभोग तो काय मिळणार? त्यावेळीं पालकाच्या कचाटींतून व शिक्षकांच्या दाबांतून सुटून आपण केव्हां स्वतंत्र होऊं असें मला झालें होतें. ही एकदांची विद्यार्थिदशा संपली आणि आपण आपल्या स्वतःचेच पायांवर उभें राहिलों, ह्मणजे आपल्या उपजीविके-करितां स्वतः द्रव्यार्जन करूं लागलों ह्मणजे वाडवडील किंवा पालक ह्यांच्या पेंचांत रहाण्याचें आपणास कांहीं प्रयोजन उरणार नाहीं असें मला वाटूं लागलें. ह्याचा अर्थ त्यांच्या आज्ञा किंवा त्यांचा उपदेश ह्यांना आपण अगदींच मान देणार नाहीं असा नाहीं; तथापि ‘ आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ’ असा जो अलीकडील स्वतंत्रतेच्या युगास आरंभ होण्यापूर्वी पारतंत्र्याच्या अवस्थेंत प्राचीन अत्यंत विद्वान् लोकांचाही अप्रयोजक व अज्ञानमूलक समज होता, त्यास आपण अंधपरंपरेनें कधींही अनुसरणार नाहीं; ‘ बाबावाक्यं प्रमाणं ’चे दिवस ज्याप्रमाणें आचार-विचार, धर्माधर्म, पापपुण्य, रीतिभाति इत्यादि सामाजिक, राजकीय, धार्मिक व नैतिक गोष्टींसंबंधानें गतच झाले आहेत, त्याचप्रमाणें प्रकृत मर्यादित विषयासंबंधानेंही गतानुगतिकत्व व अमर्याद शिरसावंद्यत्व नष्ट होणें इष्ट नाहीं काय? ह्मणजे वाडवडिलांच्या काय कीं कोणाच्याही काय आज्ञा पाळण्या न पाळण्याचें स्वातंत्र्य आपणांस मिळालें पाहिजे.

त्यां आज्ञा पाळणें न पाळणें आपल्या स्वतःवर अवलंबून राहिलें पाहिजे. त्यांच्या सर्वच आज्ञा झुगारून देण्यांत स्वातंत्र्य आहे असें नाहीं. कारण जर त्यांची एखादी आज्ञा व आपली मर्जी एकच असली तर ती आज्ञा झुगारून देण्यांत अर्वाचीन गतानुगतिकत्व किंवा अंधस्वातंत्र्य पदरीं येणार; अर्थात् स्वातंत्र्यार्थ जे प्रयत्न चालणार त्यांनीं पारतंत्र्याचीच प्राप्ति होणार. सर्वच आज्ञा एकजात पाळण्यांत ज्याप्रमाणें एका प्रकारची गुलामगिरी आहे त्याचप्रमाणें सर्वच आज्ञा एकजात अंधपणें झुगारून देण्यांत दुसऱ्या प्रकारची गुलामगिरी आहे हें निर्विवाद आहे. अशा प्रकारच्या विचारांनीं स्वातंत्र्याची अंधुक परंतु मनोहर मूर्ति विद्यार्थिदशेच्या अखेरीस नजरेसमोर दिसूं लागल्यानें मला बराच आनंद झाला. तथापि हा आनंद शुद्ध नव्हता. त्यांत दुःखाचेही तरंग मधून मधून उठत असत. एकदां शिक्षण पुरें होऊन आपण पाठशाळेच्या बाहेर पडलों ह्मणजे उपजीविकेचे साधनांसाठीं प्रथम आपणास रुपेरी बेडीच पायांत अडकवून घेतली पाहिजे. वडिलोपार्जित संपत्तीचे नांवानें बहुतेक आंवळ्याएवढेंच असल्यामुळें आणि कुटुंबपरिवारही कांहीं लहान नसल्यानें स्वतंत्र उद्योगांत एकदम पडतां यावयाचें नाहीं; आणि जरी यदाकदाचित् कसेंही करून तसें करितां आलेंच तरी आयत्या पुंजीशिवाय प्रथम भागावयाचें नाहीं; ह्यामुळें आरंभीं तरी आपणास रौप्य शृंखला धारण करणें भाग आहे, अशा उत्साहभंजक विचारांनीं उत्पन्न होणारा उद्वेग वरील आनंदांत वारंवार मिसळत असे. तथापि सरकारी नोकरींतही बाल्यावस्था व विद्यार्थिदशा ह्यांपेक्षां अधिक स्वातंत्र्य अनुभविण्यास आपणास मिळाल्यावांचून रहाणार नाहीं. राजकीय विषय बाजूस ठेविले ह्मणजे बाकीच्या सर्व विषयांत आचार व विचार ह्यांचें स्वातंत्र्य उपभोगण्यास आपणास कांहींच अडथळा उरणार नाहीं. आपणांस आवडेल त्या विषयाचा अव्याहत व्यासंग करणें, आप्त व इष्टमित्र ह्यांच्या भेटीस जाणें येणें, निसर्गसौंदर्याचे भिन्न भिन्न देखावे व प्रेक्षणीय शहरें व स्थळें पाहणें, लोकोपयोगी कार्यांत बेताबातानें श्रम करणें व त्यांस अन्य अप्रत्यक्ष रीतींनीं मदत करणें इत्यादि गोष्टींत आपल्या कल्पनांप्रमाणें

वागण्यास सरकारी नोकरींतही बरीच सवड मिळण्याचा संभव आहे. तेव्हां जरी स्वातंत्र्याचा पूर्ण उपभोग घेण्याचें आरंभापासून आपल्या नशिबीं नसलें तरी प्रथम हल्लींच्यापेक्षां जास्त मोकळिक मिळण्यास हरकत नाहीं. सर्व भाकर मिळत नाहीं तर प्रथम अर्धीवरच निर्वाह करणें भाग आहे. आणि पुढें मिळणारी अर्धी ही हल्लीं मिळत असलेल्या चतकोर किंवा अर्ध चतकोर भाकरीपेक्षां जास्त आहे असें समजलें ह्मणजे त्या अर्धीनेंही कमी समाधान होतें असें नाहीं. अशा प्रकारच्या मिश्र तथापि बऱ्याच अंशीं मनोरम कल्पनासृष्टींत विद्यार्थिदशेंतील अखेरच्या दिवसांचा माझा रिकामा वेळ जात असे. अखेरीस एकदांचा विद्याभ्यास संपून सुदैवानें मला लौकरच नोकरी मिळाली, आणि स्वातंत्र्योपभोगाविषयींचीं आपलीं पूर्वींचीं स्वप्नें अंशतः तरी वास्तविकरणें अनुभविण्यास आतां आपणांस सांपडणार ह्या विचारानें मला बराच आनंद झाला. आतां आपण अज्ञान किंवा अप्रौढ विद्यार्थी नसून विद्वान्, संभावित व स्वतंत्र गृहस्थ झालों आहों ह्या विचारानें राजकीय विषय नोकरीमुळें वर्ज करून बाकीच्या प्रत्येक विषयाचा अगदीं स्वतंत्रपणें ऊहापोह करून मी आपलें मत बिनधोक देण्यास आरंभ केला. निरनिराळ्या सभांत जाऊन वादविवाद करणें व खासगी मित्रमंडळींतही अनेक प्रसंगीं विविध विषयांची मनमुराद चर्चा करणें ह्यांत माझा वेळ बराच जाऊं लागला. खालच्या प्रतीचें शिक्षण, उच्च शिक्षण, स्त्रीशिक्षण, मराठी भाषेचा पाठशाळेंत प्रवेश, आमच्या विद्यार्थ्यांचा शारीरिक व मानसिक ऱ्हास, केशवपन, पुनर्विवाह, हुंडा, स्त्रीस्वातंत्र्य, मूर्तिपूजा, जातिभेद, वर्णसंकर, ईश्वराचें अस्तित्व, ज्ञेयाज्ञेयमीमांसा, धर्माची उत्पत्ति, इत्यादि अनेक विषयांसंबंधानें लोकांच्या ज्या चुका होत होत्या असें मला वाटत होतें त्या सर्व कंठशोषानें सभांमधून व मित्रमंडळींत, आणि ' दौतीशोषानें ' वर्तमानपत्रांत व मासिकपुस्तकांतही व्यक्त करूं लागलों; आणि आतां लौकरच माझ्या विचारांचा प्रसार होऊन इष्ट सुधारणा घडून येण्यास सुरवात होईल असें मला वाटूं लागलें. परंतु हें सर्व स्वप्नच होतें असें शेवटीं माझे अनुभवास आलें.

आचारास विचारांचें वळण लावण्याची जर समाजास शक्ति असती तर माझ्या विचारांप्रमाणें लोकाचार तेव्हांच घडून आले असते. परंतु बहुजनसमाजावरच काय तर अत्यंत विद्वान् लोकाग्रणींवरही विचारापेक्षां मनोविकार, रीतिभाती, समाजस्थिति, लोकमत ह्यांचा अधिक जबरदस्त पगडा आहे असें मला आढळून आलें. आणि समाजाचे तंत्रानेंच अनेक प्रसंगीं आपणांस चाललें पाहिजे, आपल्याच विचाराप्रमाणें वागूं ह्मटल्यास मानसिक धैर्य व नैतिक धैर्य कितीही असलें तरी सदोदित चालत नाहीं असा कडु अनुभव मला मिळूं लागला, आणि त्यामुळें स्वातंत्र्याचा जो उपभोग मला मिळेल असें वाटत होतें तो प्रत्ययास येणें दुरापास्त झालें. तुह्मी भितरे, तुमच्यांत मानसिक व नैतिक धर्म कमी ह्मणून तुह्मांस असा अनुभव आला असें कोणी ह्मणेल; त्यास उत्तर इतकेंच कीं अशा धैर्यानें आपल्या विचारानुसार वर्तन आपल्या समाजांत कांहीं एक दोन प्रसंगीं करितां येईल; तथापि असाच स्वैरसंचार तुह्मीं चालविला तर समाजसुधारणेचा जो तुमचा उद्देश तो व्यर्थ जाईल, ह्मणजे समाज तुह्मांस बहिष्कृत समजून तुह्मांस कोणीच अनुसरणार नाहीं. शिवाय कांहीं बाबतींत आपल्या विचाराप्रमाणें वागणें, धैर्य असूनही अशक्य आहे असेंही अनुभवास आल्यावांचून रहाणार नाहीं. ज्या वर्तनांत दुसऱ्याशीं प्रसंग येतो तें वर्तन त्याचे संमतीशिवाय तुह्मीं आपल्याच विचारानें कसें करणार? एवंच आचारस्वातंत्र्याचा माझा भ्रम बराच दूर झाला. फार तर काय, राजकीयेतर बाबतींत विचारस्वातंत्र्य तरी पूर्णपणें अनुभवण्यास कांहीं हरकत नाहीं असें जें मला वाटत होतें तेंही कांहीं अंशीं स्वप्नवत् होय असें माझें मत होत चाललें. वाटेल ते विचार मनांत आणण्याचें स्वातंत्र्य कोणासच कधींही पूर्णपणें किंवा अंशतःही हिरावून घेतां यावयाचें नाहीं. तेव्हां आपले विचार प्रकट करण्याची मोकळिक ह्मणजे उच्चारस्वातंत्र्य अथवा विचारस्वातंत्र्याचा साधारण अर्थ समजला पाहिजे. इंग्रजी राज्यांतच हिंदुलोकांस विचारस्वातंत्र्य प्राप्त झालें आहे ह्या विधानांत जर कांहीं अर्थ असेल तर विचारस्वातंत्र्याचा शब्दशः अर्थ ह्या ठिकाणीं कधींच घेतां येणार नाहीं; त्याचा उच्चारस्वातंत्र्य

असाच अर्थ केला पाहिजे. असो. हें विचारस्वातंत्र्य किंवा उच्चारस्वातंत्र्य तरी आपणास पूर्ण अनुभविण्यास मिळतें काय? ह्या प्रश्नाचें उत्तरही कांहीं अंशीं शंकास्पदच दिलें पाहिजे. एखादें नवीन मत लोकांपुढें आलें आणि तें जर लोकांच्या साधारण व प्रचलित मतांशीं विसंगत असलें तर तें मत व तत्प्रतिपादक हास्यास्पद होतात. पुरुषास पुन्हां लग्न करितां येतें ह्मणून स्त्रीसही करितां आलें पाहिजे ह्या दिशेनें अर्वाचीन लोकमत वहात आहे. परंतु स्त्रीस पुन्हां लग्न करितां येत नाहीं ह्मणून पुरुषानेंही पुन्हां लग्न होऊं नये; स्त्रीस ज्याप्रमाणें सर्व जन्म वैधव्यांत काढावा लागतो, त्याचप्रमाणें पुरुषानेंही सर्व जन्म विधुरावस्थेंत काढण्यास काय हरकत आहे? कांहीं हरकत नाहीं, इतकेंच नव्हे तर उलट तसें झाल्यानें ज्या लोकहिताच्या व देशहिताच्या गोष्टींस लग्नाचा अडथळा होतो त्या संन्यासवृत्ति धारण करणाऱ्या विधुरांच्या हातून सहज उत्तम प्रकारें होण्याचा संभव आहे; तसें झाल्यानें त्या गोष्टींकरितां प्रथमपासूनच संन्यासवृत्ति पतकरण्याची कांहींस जी पाळी येते ती दूर होईल असें जेव्हां मी प्रतिपादन करूं लागलों तेव्हां माझी जी टर उडूं लागली त्यामुळें अशाच प्रकारचीं माझीं दुसरीं चमत्कारिक व पाहिजे असल्यास विक्षिप्त मतें प्रसिद्ध करण्याचें मला धैर्य होईना. अशा प्रकारें उच्चारस्वातंत्र्यसुद्धां मला बरेंच संकुचित भासूं लागावें ह्यांत नवल नाहीं. लोकांनीं वाटेल तर माझ्या मताचा स्वीकार करूं नये; परंतु त्याची व माझी कोणत्याही प्रकारें निंदा किंवा उपहास करणें उच्चारस्वातंत्र्यास अपायकारक आहे ह्यांत संशय नाहीं. स्त्रीकेशवपन सौंदर्यविघातक आहे ह्मणून त्यास आचारांतून फांटा मिळावा असें सुधारक ह्मणतात. त्याचप्रमाणें पुरुषांनींही हजामत न करितां स्त्रियांप्रमाणेंच आपला केशकलाप वाढूं दिला तर पुरुषांच्याही निसर्गसौंदर्यांत भर पडेल, तसेंच मुलाप्रमाणेंच मुलीची मुंज शास्त्रविहित आहे ह्मणून मुलीची मुंज करावी, आणि मुंजीच्या वेळीं मुलाप्रमाणेंच मुलीनेंही क्षौर करावें; पोषाखाचा नीतीशीं व धर्माशीं कांहीं संबंध नाहीं ह्मणून बूट, गळपट्टी किंवा इंग्रजी टोपीही घालण्यास कांहीं हरकत नाहीं, इतकेंच नव्हे तर

पुरुषांनीं लहान मुलींप्रमाणें पदराशिवाय लुगडें नेसण्यास काय हरकत आहे? कांहीं प्रसंगीं बायका पुरुषांनीं पांढरीं धोतरें पदर काढून नेसत नाहींत काय? कांहीं लोक स्त्रियांच्या कुंकवाप्रमाणेंच तांबड्या गंधाचा एक बारीक टिळा लावूं लागले आहेत; त्याचप्रमाणें सुवाशिणींनीं उभ्या गंधाप्रमाणें तांबडें कुंकूं लावण्यास काय हरकत आहे? कांहीं बायका आडवी चिरी लावतातच ती उभी करावयाची व तिच्या जोडीस दुसरी ओढावयाची इतकेंच. हे व अशाच कोटींतले अन्य विचार लोकमताची पर्वा न बाळगणारा मजपेक्षां अधिक धैर्यशाली एखादा विद्वान् बिनदिक्कत कदाचित् प्रकट करील. परंतु त्याचाही उपहास झाल्याशिवाय रहाणार नाहीं, इतकेंच नव्हे तर कदाचित् त्याची दयानंदाप्रमाणेंच सार्वजानिक मिरवणूक निघावयाची किंवा असें भाषण केल्याबद्दल जीभ डागून घेण्याचा अथवा असा लेख लिहिल्याबद्दल हात तोडून घेण्याचा किंवा सुधारकांतील एका लेखकाप्रमाणें शाई पिण्याचा भयंकर प्रसंग त्याजवर निःसंशय यावयाचा. आणि तसें झालें ह्मणजे तोही त्यानंतर वरील कोटींतील आपले अन्य विचार प्रकट करण्यास धजेल कीं नाहीं ह्याची मला शंकाच आहे. कोणी असें ह्मणेल कीं त्याला लोकांनीं त्रास दिला ह्मणून काय झालें त्याचें उच्चारस्वातंत्र्य कायम नाहीं काय? ह्या ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण कीं अशा प्रकारें उच्चारस्वातंत्र्यच काय पण आचारस्वातंत्र्यही कोणाचाच हिरावून घेतां यावयाचें नाहीं. राजकीय बाबतींतही तुह्मीं आपले विचार उच्चारण्यासच काय परंतु त्यांप्रमाणें वागण्यास आरंभ करण्यास अगदीं स्वतंत्र आहां; राजानें तुह्मांस अडथळा केला किंवा त्रास दिला किंवा शिक्षा केली ह्मणून काय झालें? त्यानें तुमचें स्वातंत्र्य थोडेंच नाहींसें होत आहे? किंवा तुह्मांस चोरी करण्यास किंवा दिवसा दरवडा घालण्याचेंसुद्धां स्वातंत्र्य आहे. पण त्यांत कांहीं राम नाहीं. एवंच राजकीय बाबी वर्ज केल्या तरीसुद्धां इतर विषयांत विचारस्वातंत्र्यास ह्मणजे उच्चारस्वातंत्र्यास लोकमताचा व लोकपीडेचाच अडथळा आहे असें ह्मटल्यावांचून गत्यंतर नाहीं हें निर्विवाद आहे.

ह्याप्रमाणेंच वाटेल त्या विषयाचा अव्याहत व्यासंग करणें इत्यादि बाबतींतही आपलें स्वातंत्र्य सप्रतिबंध किंवा मर्यादितच आहे असें माझ्या अनुभवास येत चाललें. अशा व्यासंगाचे कामीं प्राप्त होणारी पैशाच्या आवश्यकतेची नेहमींची अडचण जरी एका बाजूस टेविली तरी इतर परिस्थितिसुद्धां अनेक प्रसंगीं स्वातंत्र्याचे आड येते. मुंबई किंवा फार तर पुणें अशा ठिकाणीं कोणत्याही विषयाचा पूर्ण व्यासंग करण्यास जीं साधनें व जी मदत सहज मिळते, ती धारवाड, बेळगांव, किंवा नाशिक, धुळें, नगर अशा छोट्याखानी व कोपऱ्यांतल्या ठिकाणीं मोठ्या खर्चानेंही मिळत नाहीं. पुस्तकसंग्रह, विद्वान् लोकांचा सहवास, अजबखाने, शास्त्रीय वस्तूंचे संग्रह, छापखाने, इत्यादि गोष्टी व्यक्तिमात्राचे शक्तीच्या बाहेरील पडल्यामुळें आणि त्या वर सांगितलेल्या आजूबाजूच्या, अंधारांतील नव्हे, तरी अंधुक प्रकाशांतील प्रदेशांत बहुतेक दुर्लभच असल्यामुळें अनेक प्रसंगीं कशी निराशा होते ह्याची कल्पना तुह्मांस सहज करितां येईल. हीच गोष्ट बहुतेक सर्व बाबतींत कमी अधिक प्रमाणानें प्रत्ययास आल्यामुळें त्या त्या बाबतींत आपले हातपाय जितके मोकळे राहतील असा माझा पूर्वी अंदाज होता त्यापेक्षां ते जास्त जखडले आहेत असें माझ्या अनुभवास आलें. शिवाय सामाजिक, धार्मिक, नैतिक, शिक्षणाविषयक वगैरे विषयांचाही राजकीय विषयाशीं बादरायण संबंध जोडण्याचा सरकारचा कल दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे असें दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें तर नोकरींतही जितक्या विस्तीर्ण क्षेत्रांत स्वैरसंचार करितां येण्यास हरकत नाहीं असें मला विद्यार्थिदशेंत वाटत होतें तें क्षेत्र फारच संकुचित आहे असें प्रत्यक्ष अनुभवानें निःसंशय स्पष्ट झालें.

लहानपणापासून मला स्वातंत्र्याची फार हौस असल्यामुळें मोठेपणीं मी स्वातंत्र्याचा कट्टा अभिमानी व भोक्ता व्हावें यांत नवल नाहीं. त्यामुळें अशा परिस्थितींत फारसे दिवस माझ्या हातून निघणें जवळ जवळ अशक्यच होतें. तेव्हां ही रूपेरी बेडी झुगारून देऊन तरी

स्वातंत्र्यप्राप्ति करून घ्यावी असा माझा बेत झाला. त्याप्रमाणें मी आपल्या पुढील स्वतंत्र उद्योगाच्या साधनांची व उपकरणांची हळू हळू जुळवाजुळव करण्यास लागलों. आणि जेव्हां मला असें वाटलें कीं आतां स्वतंत्र उद्योगास कशीबशी सुरवात करण्यास हरकत नाहीं, त्यावेळीं मी आपल्या जागेचा राजीनामा दिला. झालें. आतां माझ्या पारतंत्र्याचे दिवस संपले; ज्या अवजड खणखणीत व चकाकित शृंखलांनीं मला अगदीं जखडून टाकलें होतें किंवा ज्या मीं आपण होऊनच स्वतःचे पायांत अडकवून घेतल्या होत्या त्यांचा तिरस्कारपूर्वक जेव्हां मीं छेद केला, त्यावेळीं कोंडवाड्यांतून एकाएकीं सुटलेल्या गुराप्रमाणें किंवा जाळ्यांतून अकस्मात् मुक्त झालेल्या हरिणाप्रमाणें किंवा पिंजऱ्यांतून सुटलेल्या पोपटाप्रमाणें जो मला आनंद झाला तो अवर्णनीय होय. आतां मला इतस्ततः स्वैरसंचार करण्याची कोणाचीही आडकाठी नाहीं; आपण व आपले विचार व त्यांप्रमाणें वागण्याची पूर्ण मुभा इतकीं असल्यावर स्वातंत्र्यास काय कमती, अशा प्रकारच्या विचारांनीं वृत्ती अगदीं उचंबळल्या व मी आतां अगदीं निराळाच प्राणी झालों असा मला क्षणमात्र भास झाला. आतां सरकारी नोकराप्रमाणें ‘ चला चला दहा वाजले, कचेरीस जाण्याची वेळ झाली; उशीर झाल्यास साहेब बहादुरांची मर्जी खप्पा व्हावयांची ’ अशा प्रकारचा लकडा पाठीमागें नको. तसेंच कचेरींतलें आपलें खरडेवांशाचें हमाली काम झाल्यानंतरही वरिष्ठ उठले नाहींत ह्मणून आपणास बाहेर जातां येत नाहीं; खासगी काम निघाल्यास आधीं रजा मिळणें कठिण, आणि मिळालीच तरी जेमतेम पुरेशी, ह्यामुळें कामाची अगदीं धांदल; अमक्या त्या सभेस जावयाचें मनांत आहे; परंतु तेथें विषय राजकीय आहे किंवा त्याचा राजकीय विषयाशीं प्रत्यक्ष नसला तरी अप्रत्यक्ष संबंध निघण्याचा संभव आहे किंवा व्याख्यानकार सरकारी मर्जींतून उतरलेला मनुष्य आहे किंवा कचेरीची वेळ आहे इत्यादि अनेक कारणांनीं व अडथळ्यांनीं आपणास तेथें जातां येत नाहीं; साहेब सांगेल त्याप्रमाणें करावयाचें किंवा लिहावयाचें, आपली अक्कल बिलकुल चालवायाची नाहीं; आपण

वरिष्ठाचे हातांतील केवळ एक लिहिण्याचें यंत्र ह्याप्रमाणें वागून आपल्या मनुष्यत्वास फांटा द्यावयाचा; अशा प्रकारें दास्यांत आयुष्य कंठण्याची आतां आपणास जरूर उरली नाहीं. इत्यादि अनेक कल्पनांनीं व विचारांनीं मन विकास पावलें व मोठ्या उल्हासानें मी आपल्या वकिलीच्या स्वतंत्र धंद्यास आरंभ केला. आरंभींच्या उत्साहानें व धंद्यांतही पैसा व नांवलौकिक मिळविण्याचे आशेनें मी जीवापाड श्रम केले ते मला कांहींच वाटले नाहींत. आणि नवीन परिस्थितीनें कांहीं दिवस माझें मन वेधून गेल्यामुळें स्वातंत्र्याचे माझ्या विचारांस फांटाच बसला होता. ह्याप्रमाणें बरेच दिवस किंवा बरेच महिने गेल्यानंतर स्वातंत्र्याच्या कल्पना पुन्हा जागृत झाल्या. इतक्या अवकाशांत धंद्यांत मला बरेंच यश प्राप्त झालें असल्यामुळें वर्षअखेर वकील लोक व्यापाऱ्यांप्रमाणें जसा स्वतःचा जमाखर्च पहातात तसा पैशाच्या जमाखर्चाबरोबरच स्वातंत्र्यविषयक जमाखर्चही काळजीपूर्वक तपासून त्याचा आढावा काढावा ह्मणजे तद्विषयक वास्तविक स्थिति काय आहे ती आपल्या स्पष्टपणें नजरेस येईल ह्या विचारानें मी आपल्या नूतन परिस्थितीकडे सूक्ष्म दृष्टि फेंकिली; आणि पहातों तों सर्वच विलक्षण प्रकार आढळण्यांत यावा असें झालें. राजकीय बाबतींत सरकारी नोकरींतल्यापेक्षां अर्थातच जास्त स्वातंत्र्य जमेस पडलें; परंतु खर्चाकडील रकमांचीही बरीच मोठी बेरीज झालेली दृष्टीस पडली. ह्या नवीन परिस्थितीच्या मोहक स्वरूपानें अंध झाल्यामुळें खर्चाची बाजू आजपर्यंत माझ्या नजरेसच कधीं पडलेली नव्हती. एक तर बरींच वर्षें विद्यार्थिदशेंत गेल्यानंतर लागलीच सेवाधर्म पतकरिल्यामुळें वकिलीच्या धंद्याच्या ह्या बाजूकडे दृष्टीही फेंकण्यास सवड नव्हती. आणि दुसरें जन्मापासूनच राजकीय पारतंत्र्यांत दिवस गेल्यामुळें संवयीनें आपलें स्वातंत्र्यदारिद्र्य आपणास साहजिकच सुसह्य होतें व त्या निकृष्टावस्थेंतच सुखासमाधानानें कालक्रमण करण्यास आपणास सुलभ जातें इतकेंच नव्हे तर इतिहासरूपी ज्ञानांजनानें राजकीय दृष्टि फांकून, सुधारणागिरिशिखरावर आरूढ होऊन स्वातंत्र्यसुखाची शीतल व आरोग्यावह हवा खात बसलेले अन्य देश व स्वदेश ह्यांच्या परस्पर तुलनेनें त्यांमधील जमीनअस्मानाचें

अंतर दृष्टोत्पत्तीस येऊन काळिज भडभडून आलें नसलें ह्मणजे वर सांगितल्याप्रमाणें स्वातंत्र्यदारिद्र्यावस्थेंतच त्या दारिद्र्याचे अज्ञानामुळें, श्रीमंतीच्या आनंदी वृत्तीनें रहाण्यांत मोठा डौल व अभिमान वाटतो. ह्या दोन कारणांनीं ह्यापूर्वी राजकीय खात्यांत स्वातंत्र्याच्या केवढाल्या व कशा रकमा खर्ची पडल्या होत्या हें मला दिसतच नव्हतें; परंतु तें जेव्हां स्पष्टपणें नजरेस आलें तेव्हां सरकारी नोकरी सोडल्यापासून जी थोडीशी रकम जमेस पडली ती खर्चाच्या मानानें अति क्षुल्लक वाटू लागली. ती इतकी कीं गणिताचे दृष्टीनें ती ' त्याज्य ' किंवा ' अगणणीय 'च होय. एकंदरींत मी आपल्या मनाशीं असा सिद्धांत ठरविला कीं, जोंपर्यंत स्वराज्याची स्थापना आपल्या देशांत झाली नाहीं तोंपर्यंत राजकीय विषयांतील आमचें स्वातंत्र्य केवळ दिखाऊ व थोतांड आहे व तोंपर्यंत खऱ्या स्वातंत्र्याचे आशेनेंच आपणास आयुष्य कंठिलें पाहिजे; परंतु ही आशा तृप्त होण्यास ईश्वरी कृपेशिवाय दुसरा उपाय नसल्यामुळें ह्या बाबतींत तरी हिरमुसलेंच बसल्याविना गत्यंतर नाहीं. असो. इतर बाबतींत तरी स्वातंत्र्याची रकम किती जमा झाली आहे ह्मणून त्या बाबीचीं खातीं उलटून पाहूं लागलों. तों तिकडेही विशेषसा समाधानाचा प्रकार दिसेना. दहा वाजले कीं कचेरीस जाण्याचें शुक्लकाष्ट मागें होतेंच; फरक इतकाच कीं एका साहेबाच्या मर्जीचे ऐवजीं आतां अनेक रोज नव्या पक्षकारांच्या मर्ज्या सांभाळणें प्राप्त झालें. वेळेवर जर कचेरींत गेलें नाहीं तर त्यांचे मुकदमे खारिज होऊन आपल्या प्राप्तीसही धक्का बसावयाचा. एवंच एकाचे ठिकाणीं अनेक व रोज नवे धनी उभे राहिले. रजेचा त्रास पाठीमागून गेला. जरूर लागेल त्यावेळीं वाटेल तितक्या दिवस घरीं रहाण्यास किंवा दुसरीकडे जाण्यास फारशी अडचण पडेनाशी झाली. परंतु पगारी हक्काची रजा, किरकोळ रजा एक दिवसही मिळेनाशी झाली. रजा ह्मणजे पदरास खार, ह्यामुळें बाजारांतील स्वतंत्र हमालाची व माझी एकच स्थिति झाली. होतां होईल तों रजा घ्यावयाचीच नाहीं आणि कदाचित् घेतलीच तरी अगदीं रमारमी होण्यापुरती घेऊन पुढें जरा

जास्त मेहनत करून जास्त प्राप्ति पाहिजे ह्मणजे झालें; अशी मनाची समजूत केली. परंतु ह्यांत स्वातंत्र्यप्राप्ति ती काय झाली? पक्षकारांची सेवा करून द्रव्यार्जन करावें, नाहीं तर स्वातंत्र्योपभोग घेऊन उपाशीं मरावें अशी पाळी आली. सकाळीं उठावें न उठावें तों पक्षकार उरावरच; त्यांची व्यवस्था लावून होते आहे नाहीं तों कोर्टांत जाण्याची वेळ झालीच; कोर्टांतून परत यावें तों गृहकृत्यांचा लकडा; तीं कशीं बशीं उरकून टाकावीं तों पुन्हा कांहीं पक्षकार आहेतच. एवंच सकाळपासून रात्रीं निदान दहा वाजेपर्यंत माझा मी नसून केवळ पक्षकारांचा ताबेदार झालों. ह्यामुळें एखाद्या आवडीच्या विषयाचा व्यासंग जो सरकारी नोकरींत असतां खुशाल करितां येत होता तोही बहुतेक सुटलाच आणि अखेरीस स्वातंत्र्याचे जमेच्या नांवानें ओरडच झाली. वाटेल त्या विषयाची थोडीशी सवड सांपडेल तेव्हां शाब्दिक चर्चा करण्याची मुभा, वाटेल त्या सभेस जाण्याची मोकळीक, वरिष्ठांच्या भीतीपासून सुटका इत्यादि कांहीं लहानसहान बारिकसारिक रकमा जमेस दिसूं लागल्या. परंतु दिवसेंदिवस माझी स्वातंत्र्याची हाव वाढत गेल्यामुळें, किंवा स्वातंत्र्याची माझी कल्पनाच कांहीं विलक्षण होत गेल्यामुळें असें तुह्मांस वाटेल तर ह्मणा, समाधानकारक अशी एकही रकम जमेस दिसेना. पूर्वीं नोकरीची बेडी ज्यावेळीं पायांत होती त्यावेळीं ती फेंकून देऊन तरी काय होतें हें पाहण्याची सवड होती. आतां तसा एकही उपाय दिसेना. सर्व जन्म वकिलींतच काढिला पाहिजे, किंवा बरेंचसें डबोलें जवळ झालें ह्मणजे धंदा सोडून स्वस्थ स्वतंत्रपणें बसावें ह्याशिवाय अन्य मार्ग दिसेना. परंतु धंदा सोडून स्वतंत्र होण्याचा मार्ग जवळ जवळ दुष्प्राप्यच होता; कारण धंद्यांत तशी कांहीं माझी ह्मणण्यासारखी असाधारण चलती नव्हती. ह्यामुळें धंद्याचा झरा बंद झाल्यानंतर माझ्या विहिरीचा तेव्हांच ठणठणाट उडावयाचा, आणि शिवाय जरी तशी चलती असती तरी धंदा सोडण्यास मनाची तयारी झाली असती कीं नाहीं ह्याची शंकाच आहे. 'एक पुती रडे आणि सात पुतीही रडे' ह्या ह्मणीप्रमाणें धनतृष्णा कधींही तृप्त होणारी नसल्यामुळें धंदा सोडणें कठिणच झालें असतें

हें इतरांच्या अनुभवावरून उघडच आहे. एवं ह्याच स्थितींत असमाधानानें रहाणें भाग आलें. आचारस्वातंत्र्यास तर ह्याप्रमाणें आंचवावेंच लागलें. तथापि विचारसृष्टींतील स्वातंत्र्याचे शोधास कसलाही अडथळा नसल्यामुळें तो शोध तरी कायम ठेवावा; यदाकदाचित् सुदैवानें जर त्याचा आपणास पत्ता लागला तर, स्वतःस जरी त्याचा तादृश उपयोग झाला नाहीं तरी मजसारखाच दुसरा कोणी हरीचा लाल स्वातंत्र्यशोधार्थ भटकत असल्यास त्यास त्याचा उपयोग होण्याचा संभव आहे. ह्या आशेनें मी ह्यानंतर स्वातंत्र्यशोधार्थ विचार-सृष्टींतील प्रवासास निघालों; परंतु ह्या प्रवासास आरंभ करण्यापूर्वी येथें इतकें सांगितलें पाहिजे कीं, जरी वरील सर्व वृत्तांतांत परराज्याच्या कल्पनेची झांक मारीत आहे, तरी स्वातंत्र्याभावाचें अनुमान कांहीं गैर नाहीं. कारण कीं एखाददुसरी क्षुल्लक गोष्ट शिवायकरून तें स्वराज्यांतील लहान मुलांस, विद्यार्थ्यांस, सरकारी नोकरांस व वकिलांस सारखेंच लागू आहे. तात्पर्य परराज्याखालींच माझा प्रत्यक्ष वास पडल्यामुळें वास्तविक स्थितीच्या वर्णनांत त्याचा संबंध थोडाबहुत तरी येणें साहजिक आहे; परंतु आपलें अनुमान त्याजवरच स्थापित केलें नसल्यामुळें स्वराज्यांतसुद्धां तेंच अनुमान ग्रहण करण्यास हरकत नाहीं. पुढील प्रवासवर्णनांतमुद्धां असा प्रकार अनेक ठिकाणीं झालेला दृष्टीस पडेल. त्या ठिकाणींही अशीच शंका उत्पन्न होण्याचा संभव असल्यामुळें तिचें अगोदर समाधान करून ठेवणें अवश्य दिसल्यावरून ही गोष्ट आपल्या नजरेस आणून दिली आहे. तेव्हां परराज्यांत काय कीं स्वराज्यांत काय वर वर्णन केलेली वस्तुस्थिति व पुढें दृष्टीस पडणारी वस्तुस्थिति बहुतांशीं एकच आहे ह्यांत संशय नाहीं. इतकें ध्यानांत ठेवून आपण माझें प्रवासवर्णन श्रवण करावें.

प्रथम मला असें वाटलें कीं वकिलापेक्षां वैद्याला स्वातंत्र्य अधिक असेल इतकेंच नव्हे तर तो कदाचित् पूर्णपणेंही स्वतंत्र असावा. एकदां सकाळीं दोन तीन तास व सायंकाळीं एक दोन तास रोगी पाहून

त्यास वाटेस लागलें कीं बाकीचा सर्व वेळ ज्याचा त्यास मिळतो. त्यांत तो काय वाटेल तें करण्यास मुखत्यार आहे. परंतु सूक्ष्म दृष्टीनें त्याची स्वतंत्रता मला भ्रममूलकच वाटली. कारण कीं चौकशीअंतीं माझ्या असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं सकाळचाच वेळ वैद्याचे कामास पुरेसा होत नाहीं. त्यास जेवणही वेळेवर मिळत नाहीं. बारा वाजण्याचे पूर्वीं त्यास क्वचितच पानावर बसण्यास सांपडतें. पुढें चार एक वाजेपर्यंत त्यास सरासरी मोकळीक असते; परंतु त्याचा कोणताच वेळ—फुरसतीचासुद्धां—व्यत्ययाशिवाय नसतो. कोठल्या रोग्याकडून केव्हां निमंत्रण येईल ह्याचा मुळींच नेम नसतो. ह्यामुळें रात्रींही त्यास सुखानें झोंप घेण्यास क्वचितच सांपडतें. वकिलास जसे पक्षकार तसे वैद्यास रोगी. दोघांसही अनेक धन्यांची मर्जी संपादन करावयाची असते. तेव्हां स्वातंत्र्याचे दृष्टीनें दोघांची स्थिति बहुतेक सारखीच. ह्मणून आतां व्यापाराकडे तरी दृष्टि फेकूंया ह्या विचारानें त्या प्रांताची वाट धरिली. त्यास वकिलाच्या पक्षकारांप्रमाणें किंवा वैद्याच्या रोग्यांप्रमाणें धंद्यासाठीं कोणाची सेवा पतकरण्याचें कारण नाहीं. हंगामाचे वेळीं खरेदी करून विक्रीसाठीं दुकानांत स्वस्थ पडून राहिलें ह्मणजे झालें; नुकसान होण्याची फारशी भीति नसते असाच बहुतेक सर्व प्रकारच्या व्यापाराचा बाहेरील देखावा दिसतो. परंतु जेव्हां त्या त्या व्यापारांत पडणाऱ्या गृहस्थांस भेटून चौकशी करावी तेव्हां कांहीं वेगळाच प्रकार नजरेस येतो. व्यापाऱ्यासमुद्धां नुसतें दुकान लावून स्वस्थ बसतां येत नाहीं. गिऱ्हाइकांस आपल्याकडे आकर्षून घेऊन त्यांस खुष केल्याशिवाय ते पुन्हा त्याजकडे कशास येताहेत? आणि जरी व्यापाऱ्यांस गिऱ्हाइकांची प्रत्यक्ष सेवाच करावी लागते असें जरी ह्मणतां येत नाहीं, तरी त्याविषयीं व्यापाऱ्यांस कधींच बेपर्वाई दाखवितां येत नाहीं. शिवाय व्यापाऱ्यास सकाळपासून रात्रीं दहा वाजेपर्यंत दुकानावर सारखें हजर असावें लागतें. जेवणाखाणाकरितां जावयाचें त्यानें ह्मटलें तर एक दुकान तरी बंद केलें पाहिजे नाहीं तर दुसऱ्या कोणास—खात्रीलायक मनुष्यास—तरी दुकानावर बसविलें पाहिजे. ज्यांस केवळ दुकानावरच बसावें लागत नाहीं

त्यांस व्यापारसंबंधाच्या इतर गोष्टी, खरेदी, वसूल, जमाखर्च इत्यादि गोष्टींकडे डोळ्यांत तेल घालून दक्षतेनें लक्ष द्यावें लागतें. त्यांचे मतें एकवार दुकानावर सारखें बसून रहाणें पतकरेल; परंतु ही जबाबदारीची दगदग नको. आतां हें खरें कीं, त्यांस ही गोष्ट करण्याची किंवा न करण्याची स्वतंत्रता असते; परंतु ती असून नसून सारखीच. कारण कीं, एक तर त्यांनीं ह्याप्रमाणें बद्ध होऊन रहावें, नाहीं तर स्वतंत्रपणें उपाशीं मरावें. एवंच कोणत्याही प्रकारच्या किंवा दर्जाच्या व्यापाऱ्यास समाधानकारक स्वतंत्रता मिळते असें वाटत नाहीं. सरकारी नोकर किंवा वकील किंवा वैद्य ह्यांचे धंद्यापेक्षां मोठ्या श्रीमंत व्यापाऱ्यास कांहींशीं बंधनें कमती; तथापि त्याची स्थितीही स्वातंत्र्याचे दृष्टीनें समाधानकारक नाहीं. व्यापारावर बसणारे निरनिराळे कर, भावाची अनिश्चित चढउतर, जिनसाचा पुरवठा, मागणी इत्यादि अनिश्चित गोष्टींनीं त्यास उत्पन्न होणारीं बंधनें जरी बाजूस ठेविलीं तरी वर निर्दिष्ट केलेलीं पारतंत्र्याचीं द्वारें असंतोष उत्पन्न करण्यास पुरेशीं आहेत. तेव्हां आतां खासगी शाळामास्तरांकडे किंवा प्रोफेसरांकडे तरी पाहूंया असें वाटलें. कारण कीं त्यांस नोकरीचें बंधन नाहीं. कांहीं नियमित पुस्तकें शिकविलीं म्हणजे झालें. परंतु अशा गृहस्थांस भेटून जेव्हां त्यांचा अनुभव पाहूं लागलों तेव्हां तेही स्वतंत्रतेच्या दृष्टीनें असंतुष्टच दिसले. आणि त्यांचें म्हणणेंही कांहीं गैर दिसेना. नियमित पुस्तकें शिकविल्यानेंच भागत नाहीं. त्यांचें सर्व यश विद्यार्थ्यांचे यशावर अवलंबून. एखाद्या वर्षीं बरेच विद्यार्थी चांगले मिळतात; परंतु एखाद्या सालीं दुर्दैवानें असे कांहीं रद्द, मठ्ठ, बुर्गुसबुद्धीचे विद्यार्थी पदरीं पडतात कीं त्यांस शिकविण्यापेक्षां ‘ गाढवापुढें वाचली गीता ’ बरी असें म्हणावें लागतें. एवंच विद्यार्थ्यांवरच शिक्षकांस अवलंबून रहावें लागतें. विद्यार्थ्यांस जर यश मिळालें नाहीं तर पुढें दुसरे विद्यार्थी त्यांच्या शिक्षकांकडे कशास जातील? शिवाय शिक्षकाचा धंदा इतर बहुतेक सर्व धंद्याचे मानानें अगदीं गरीबीचा पडल्यामुळें इतर अनेक बाबतींत त्यांचे हातपाय जखडलेले असतात तें वेगळेंच. आतां

येऊन जाऊन राहिला शेतकरी. त्याचीसुद्धां बहुतेक तीच अवस्था. नांगरणी, पेरणी, निंदाई, कापणी, मळणी, सांठवणी, विक्री इत्यादि सर्व गोष्टी अगदीं वेळेवर झाल्या पाहिजेत. त्यांत जर अंतर झालें, योग्य वेळ जर टळली—आणि अशी वेळ कधीं कधीं फारच थोडी असते हें अनुभवी शेतकऱ्यांस उमजेल--ह्मणजे एकदम सारेंच नुकसान होतें. कांहीं गोष्टी अशा असतात कीं त्या आजच्या उद्यांवर काय पण ह्या घटकेच्या त्या घटकेमही लांवणीवर टाकितां येत नाहींत. आणि जर एक काम वेळेवर झालें नाहीं तर सर्व बुडण्याची पाळी येते. शिवाय पशुपक्षी, चोर, सरकारचे खाबू नोकर ह्यांच्या नेहमींच्या टोळधाडींतूनही त्यास पार पडावयाचें असतें. आणि सर्वांत कठीण तें हें कीं पंचमहाभूतांवर त्याची सर्व भिस्त असते. त्यांपैकीं एकाची जरी वक्रदृष्टि झाली तरी ती त्याच्या नाशास पुरे आहे. त्यांच्या स्वाधीनच त्याचें सर्व जीवित असतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या कामीं शेतकरी केवळ अनाथ व दुर्बळ असतो, तेव्हां त्यास परतंत्र ह्मणूं नये तर काय ह्मणावें?

अशा प्रकारें धंद्याच्या मनुष्यास स्वातंत्र्याचा उपभोग मनासारखा मिळत नाहीं. तेव्हां जर एखाद्या मनुष्यास संसारासाठीं धंदा करण्याची जरूर नसेल ह्मणजे त्याजपाशीं वडिलोपार्जित किंवा दुसऱ्या कोणत्याही द्वारें प्राप्त झालेली संपत्ति त्याच्या जन्मभर पुरेशी असली तर त्याला मात्र वरील अडचणी, काळज्या, किंवा अडथळे अनुभवण्याची आवश्यकता नसल्यामुळें स्वातंत्र्याचा पूर्ण निरत्यय उपभोग मिळण्याचा संभव आहे. अशी स्थिति दुर्लभ आहे किंवा असा मनुष्य सांपडणें जवळ जवळ अशक्यच ही गोष्ट वेगळी; तथापि स्वातंत्र्यशोधकास ह्या ठिकाणीं तें दृष्टीस पडण्याचा संभव आहे असें मला वाटलें. परंतु किती संपत्ति जन्मभर पुरेशी आहे हें प्रथम ठरविणें दुर्घट आहे; आणि तें नक्की ठरण्यास स्वतःच्या आयुष्याची मर्यादाही समजली पाहिजे. परंतु ही अडचण जरी अपार संपत्तीनें दूर झाली, तरीही प्रथम जवळ असलेली संपत्ति जन्मभर त्याच मनुष्यापाशीं अविश्रांत

राहील ह्याचा काय नेम आहे? चोरी, लूट, भागटेगिरी, इत्यादि संपत्तीच्या गमनाचे अन्याय्य मार्ग जरी बाजूस ठेविले तरी दुर्दैवानें आग, पूर, धरणीकंप इत्यादि नैसर्गिक उत्पातांनीं किंवा दुसऱ्या अन्य रीतींनीं ती संपत्ति नष्ट होणार नाहीं ह्यास काय हमी आहे? उलट लक्ष्मी फार चंचल आहे असें अनुभवसिद्ध आहे; आणि 'निरुद्योगी पुरुषाची लक्ष्मी क्षीणतेस पावली' असेंच पहाण्याचा प्रसंग वारंवार येतो. ह्यामुळें अशी अमर्याद संपत्ति असूनसुद्धां तिच्या मालकास 'अर्थ मिळेल कसा मज राहिल तो जवळि मनिं हेंचि वसे' ह्या चरणांतील पहिली काळजी जरी नसली तरी दुसरी काळजी फारच त्रास देईल; आणि धंद्यानें स्वातंत्र्य संकुचित होतें ह्मणून तो जर निरुद्योगी बसेल तर त्या काळजीचा त्याजवर फारच जबरदस्त पगडा बसल्यावांचून राहणार नाहीं हें उघड आहे. आणि त्यामुळें त्याला स्वातंत्र्याचाच काय कसलाच उपभोग गोड वाटणार नाहीं. सारांश अपार संपत्तीनें धंद्याची जरूरी नाहींशी होऊन स्वातंत्र्यास संपुष्टांत आणणारीं कारणें जरी दूर झालीं असें धरून चाललें, तरी मन अस्वस्थच राहणार असल्यामुळें त्यास स्वातंत्र्याचा उपभोग मिळणार नाहीं हें उघड आहे.

येथपर्यंत सरकारी नोकरी, वकिली, व्यापार, खासगी किंवा स्वतंत्र मास्तरी किंवा प्रोफेसरी, शेती, व श्रीमंती निरुद्योगिता ह्यांपैकीं कोणत्याही स्थितींत पूर्ण समाधानकारक स्वातंत्र्य नाहीं हें खास ठरलें. प्रत्येक मनुष्य आपल्या स्थितींत असंतुष्ट असून दुसऱ्या स्थितींतील लोकांस अज्ञानानें धन्य मानतो; परंतु सर्वांचा अनुभव सारखाच ह्मणजे कोणीच स्वतःला धन्य समजत नाहीं. ह्या एका गोष्टीवरूनही वरील सिद्धांताची सत्यता दृष्टोत्पत्तीस येईल. वरील स्थितींत कमजास्त स्वातंत्र्याचा उपभोग मिळतो हें खरें. तथापि त्यांपैकीं कोणत्याच स्थितींत पूर्ण समाधानकारक किंवा अक्षय्य, अमर्याद, अपार स्वातंत्र्य प्राप्त होत नाहीं, इतकेंच नव्हे तर निदान माझ्यासारख्या स्वातंत्र्यशोकी मनुष्यास तरी समाधान प्राप्त करून देण्याइतका स्वातंत्र्याचा अंश मिळत नाहीं ह्यांत संदेह नाहीं.

अशाप्रकारें परराज्यांतील किंवा स्वराज्यांतीलही प्रजाजनांना समाधान-कारक स्वातंत्र्याचा एकही मार्ग खुला दिसत नाहीं. आणि होऊं ह्मट-ल्यानें कोणासच राजा होतां येत नाहीं; तेव्हां एकूणएक प्रजाजनांना पारतंत्र्यांतच दिवस काढणें भाग आहे असें मला वाटलें. आतां जरी राजपदप्राप्ति मनुष्येच्छेवर अवलंबून नाहीं, व त्यामुळें स्वातंत्र्योपभोग-सुद्धां बहुतेक मनुष्यांस अशक्यच झाला आहे, तरी आपण स्वातंत्र्यशोधक पडल्यामुळें राजाच्याही स्थितीचें त्या दृष्टीनें सूक्ष्म अवलोकन करणें अयोग्य होणार नाहीं. आणि शोधांतीं राजा हा खरा पूर्ण स्वतंत्र आहे किंवा निदान आपल्या स्वातंत्र्याशीं संतुष्ट आहे असें ठरलें तर अमुक स्थितींत पूर्ण किंवा समाधानकारक स्वातंत्र्याचा उपभोग मिळत असल्या-मुळें शिवाजी, बोनापार्ट ह्यांसारख्या अद्वितीय व अवतारी पुरुषांनीं तरी तत्प्राप्त्यर्थ राजपदाकडे आपली दृष्टि वळविणें गैर होणार नाहीं. तसेंच ह्या परीक्षणाचा मागल्याप्रमाणेंच जर असमाधानकारक व निराशाजनक निकाल लागला तर निदान स्वातंत्र्यशोक्यानें तरी राजपदप्राप्तीचा मार्ग चोखाळण्यांत अर्थ नाहीं, असें एकदां निश्चयात्मक ठरून जाईल. आणि ज्या असंख्य पृथक् जनांस राजपदप्राप्तीचा अणुमात्रही संभव नाहीं, त्यांस स्वातंत्र्याचे दृष्टीनें तरी राजाचा हेवा करण्याचें किंवा आपणास राजपद नाहीं ह्मणून त्याबद्दल वाईट वाटण्याचें कांहींच कारण उरणार नाहीं. असो राज्यामध्यें राजा हा श्रेष्ठ अधिकारी होय; त्यापेक्षां वरिष्ठ अधिकार दुसऱ्या कोणासच नसतो; तो केवळ कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं शक्तिच होय; त्यास वाटेल तें वाटेल त्यावेळीं प्राप्त होतें; त्यास कशाचीच उणीव नसते; त्यास कोणाचाही प्रतिबंध नसतो; सर्व त्याच्या हुकुमांत वागतात; इतकेंच नव्हे तर त्याचा एक एक शब्द झेलण्यास तयार असतात, तेव्हां त्याचें स्वातंत्र्य अमर्याद नाहीं काय? असें कोणी ह्मटल्यास स्थूल दृष्टीस तें योग्यच आहे; परंतु सूक्ष्म निरीक्षणांतीं प्रश्न निदान वादग्रस्त आहे इतकें तरी तेव्हांच कबूल करावें लागेल. इतिहासा-कडे जर दृष्टि दिली तर ह्या प्रश्नाचा निकाल लागण्यास उशीर लागणार नाहीं. इतिहासावरून आपणास दिसून येतें कीं राजे हे कांहीं स्वतंत्र

नाहींत. त्यांस अनेक प्रसंगीं आपल्या मंत्र्यांच्या व निदान सेनापतींच्या तंत्रानें वागावें लागतें; आणि इंग्लंडसारख्या बहुतेक प्रजासत्ताक राज्यांत तर राजास स्वतःचें तंत्रच नाहीं; त्याचा खर्चवेंच, जाणेंयेणें, मतें, लग्नकार्य, सर्व कांहीं प्रधानांचेच स्वाधीन; राजाचें भाषणमुद्धां प्रधानच करणार व त्यास फक्त ‘ राजभाषण ’ असें नांव देणार. राजसत्ताक राज्यांत राजास अधिक स्वातंत्र्य असतें हें खरें; तथापि त्यासही आपले प्रधान व मुख्यत्वेंकरून सेनापती ह्यांच्या ह्मणण्यास माना डोलविण्याचे अनेक प्रसंग येतात. आणि त्यानें तसें जर केलें नाहीं तर त्यास अनेक महत्वाकांक्षी लोकांच्या कृष्ण अगर शुक्ल कारस्थानांच्या धक्यानें प्राणास नाहीं तर निदान राज्यास मुकण्याची पाळी येते. असे प्रसंग इतिहासज्ञांस तेव्हांच स्मरतील. शिवाय दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर असें दिसेल कीं, राजापेक्षां प्रजाजनच जास्त स्वतंत्र असण्याचा संभव आहे. राजाचे पाठीमागें काय थोडीं शुक्लकाष्टें असतात? त्यास स्वस्थ झोंप घेण्यासमुद्धां फुरसत मिळत नाहीं. Uneasy lies the head that wears a Crown असें जें श्रेष्ठ आंग्ल कवीनें ह्मटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. राजाची सत्ता स्वराज्यांत जरी अमर्याद आहे असें घेऊन चाललें तरी त्याच्या राज्यास जशी दोवळ दृश्य मर्यादा आहे तशीच त्याच्या स्वातंत्र्यासही इतर राजसत्तांची चांगलीच मर्यादा आहे. एका राजास जेव्हां अन्य राजांशीं व्यवहार करण्याचा प्रसंग येतो, तेव्हां त्यास आपलें तंत्र अनेकदां गुंडाळून ठेवावें लागतें. त्यास जरी राज्यवृद्धि करण्याची तृष्णा नसली तरी स्वराज्याचें संरक्षणासाठींच अन्य राजांशीं व राष्ट्रांशीं व्यवहार ठेवणें भाग पडतें, व प्रसंगास अनुसरून त्यास आपली आवडनिवड बाजूस ठेवून दुसऱ्याच्या शब्दास मान द्यावा लागतो. ही अन्य राजांजवळच्या व्यवहाराची बाब कधीं कधीं इतकी विस्तृत, नाजुक व महत्वाची होते कीं, तिची मर्यादा व तिचा संबंध लग्नासारख्या निव्वळ खासगी बाबींपर्यंतही येऊन पोंचतो. तें असें:—अमुक एका राजापाशीं कांहीं कारणांनीं सलोखा केला पाहिजे किंवा त्याचें मित्रत्व संपादिलें पाहिजे असा एखाद्या राजावर प्रसंग

आल्यास त्यास त्या राजाची मुलगी स्वतःच्या इच्छेविरुद्धही स्वतः वरण्याचा प्रसंग येतो, किंवा आपल्या मुलामुलींचीं लग्नें मुद्दाम त्या राजाच्या घराण्यांतील मुलामुलींशीं करावीं लागतात. अशा प्रकारच्या अनेक गोष्टींत राजा हा स्वतःचा मुखत्यार नसल्यामुळें त्यास पूर्ण स्वतंत्र किंवा स्वातंत्र्यसंतुष्ट तरी कसें ह्मणतां येईल?

येथपर्यंत श्रीमंतांपासून गरीबापर्यंत, राजापासून रंकापर्यंत बहुतेक ठळक ठळक सर्व पायरीच्या लोकांचें सूक्ष्म निरीक्षण झालें. रंकाकडे मुद्दाम फारसें लक्ष देण्याची जरूर नाहीं, त्यास सर्वांत कमी स्वातंत्र्य असतें; आणि राजास सर्वांत जास्त स्वातंत्र्य असतें. सरकारी नोकर, वकील, व्यापारी, स्वतंत्र ह्मणजे खासगी मास्तर अथवा प्रोफेसर, आणि शेतकरी ह्यांसही स्वातंत्र्य आहे व त्यांस वरील क्रमानेंच अधिकाधिक स्वातंत्र्याचा वांटा मिळतो, ह्मणजे सरकारी नोकरास सर्वांत कमी स्वातंत्र्य आहे आणि शेतकऱ्यास सर्वांत अधिक स्वातंत्र्य आहे हें उघड आहे. आणि ह्यामुळेंच ' उत्तम शेती, मध्यम व्यापार, आणि व कनिष्ठ नोकरी ' ही पूर्वापार चालत आलेली ह्मण प्रथम प्रचारांत आली असावी. सध्यां बहुतेक सर्व लोक ह्या ह्मणीनें चकित होतात; त्यांस तिचा अर्थ समजत नाहीं. त्यांची दृष्टि पैशावर असते. ह्मणून त्यांच्या मतें वरील क्रम केवळ दुर्बोधच नसून असत्य व त्याज्य होय. ते त्याची सुधारून नवीन आवृत्ति काढितात ती अशीः—' उत्तम व्यापार, मध्यम नोकरी, आणि कनिष्ठ शेती '. ह्या आवृत्तीवरून अर्वाचीन लोकांचें लक्ष संपत्तीनें जास्त ग्रासून टाकिलें आहे असें दिसतें. आणि ज्याअर्थीं त्यांस प्रचलित क्रम अगम्य झाला आहे त्याअर्थीं त्यांचे मानससूर्यास संपत्तिराहूनें खग्रास ग्रहण लाविलें आहे असें ह्मणण्यास काय हरकत आहे? ह्मणजे ज्या आमच्या पूर्वजांनीं शेतीस उत्तम व नोकरीस कनिष्ठ ठरविलें व व्यापारास मधील पायरी दिली त्यांचें लक्ष स्वातंत्र्यावर अधिक होतें इतकेंच नव्हे तर त्यांची स्वातंत्र्यावर विलक्षण प्रीति होती, त्यांस स्वातंत्र्याचा पूर्ण शोक होता असेंच ह्मटलें पाहिजे; नाहीं तर अशी ह्मण

प्रचारांत आली नव्हती. अर्वाचीन लोकांस तिचा अर्थही समजत नाहीं ह्मणून जरी स्वातंत्र्याविषयीं ते कितीही बोलले अथवा त्यांनीं कितीही ओरड केली तरी त्यांस स्वातंत्र्याची हौस अथवा हाव नाहीं असेंच ह्मटलें पाहिजे. असो. तात्पर्य इतकेंच कीं निरनिराळ्या लोकांस त्यांच्या त्यांच्या स्थित्यनुरूप कमजास्त स्वातंत्र्य आहे; परंतु कोणासच स्वतःची स्थिति समाधानकारक वाटत नाहीं. जो तो अडथळ्यांचे नांवानें रडत असतो. ह्यामुळें प्रत्येक ज्याप्रमाणें थोडाबहुत स्वतंत्र आहे त्याचप्रमाणें प्रत्येक असामी थोडाबहुत परतंत्र आहे. एकंदर सर्वांचीच रडकथा असून कोणाचीच स्थिति स्पृहणीय नाहीं हें उघड आहे. आणि जरी प्रत्येकास दुसऱ्याची स्थिति अधिक समाधानकारक वाटत असली तरी ती अज्ञानमूलकच होय हें प्रत्यक्ष स्वानुभवानें व सूक्ष्म निरीक्षणांतीं मला समजलें. 'जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे' असें जें ह्मणतात तें कांहीं व्यर्थ नाहीं.

स्वातंत्र्याचा साधारण दृष्टीचा विचार येथें संपलाच ह्मणावयाचा परंतु समाजामध्यें निरनिराळ्या पायरीवरील लोकांस जरी कमजास्त मर्यादेंत स्वतंत्र संचार करितां येतो आणि जरी ही मर्यादा बहुतेक सर्वसाधारण लोकांस मान्य आहे, इतकेंच नव्हे तर कदाचित् त्या मर्यादेपलीकडे त्यांची दृष्टीही पोंचत नाहीं हें खरें आहे, तथापि स्वातंत्र्याची अधाशी हाव ज्यांस लागली आहे अशा थोड्याशा लोकांस, सर्व पृथ्वी जिंकल्या-नंतर आणखी जिंकण्यास कांहीं उरलें नाहीं ह्मणून अलेक्झांडरला जसें रडूं कोसळलें, किंवा कुबेराचें धन प्राप्त झालें तरी ज्याप्रमाणें कृपणाची धनतृष्णा तृप्त होत नाहीं, अथवा आयुष्याची मर्यादा कितीही लांबली तरी ज्याप्रमाणें मरण्यास कोणीही तयार होत नाहीं, जीविततृष्णा जशीच्या तशीच कायम असते, त्याप्रमाणें स्वातंत्र्याकरितां हपापलेल्या लोकांस उपलब्ध स्वातंत्र्यानें समाधान होऊं नये हें साहजिक आहे. परंतु पूर्ण स्वातंत्र्य ह्या स्वातंत्र्ययुगांत कोठेंच प्राप्य नाहीं, हा निकाल विश्वसनीय आहे असें तरी कशावरून ? तें आपल्या नजरेंतून चुकून

गेलें नाहीं ह्यास काय प्रमाण ? आपल्या मतें आपण जरी सूक्ष्म अवलो-कन केलें आहे तरी आपली नजरचूक झालीच नाहीं असें खात्रीपूर्वक कसें ह्मणतां येईल ? ह्मणून वरील निकाल किंवा उत्तर ज्या रीतीनें आलें आहे त्याचा दुसऱ्या रीतीनें ताळा पहाण्याची आवश्यकता आहे. ही रीति सोपी आहे. एकेका रांगेंत पांच पांच पत्ते ह्याप्रमाणें पत्त्यांच्या चार रांगा नीट व्यवस्थित रीतीनें एकाखालीं एक अशा लाविल्या; आणि अमुक एक पत्ता ह्या वीस पत्त्यांत आहे कीं नाहीं हें ठरवि-ण्यासाठीं चार रांगांपैकीं प्रत्येक रांग डावीकडून उजवीकडे ह्याप्रमाणें ह्मणजे आडव्या चारी रांगा तपासिल्या आणि प्रश्नविषयक पत्ता ह्या वीस पत्त्यांत नाहीं असें ठरविलें. परंतु हें खरें कशावरून, असा संशय उत्पन्न झाल्यास खात्री व्हावी ह्मणून उभ्या ज्या पांच रांगा त्या वरून खालीं अशा आपण तपासितों, आणि निकाल नकाराचाच जर आला तर ज्याप्रमाणें शंकेस कारण उरत नाहीं त्याचप्रमाणें आतां आपण करूंया असें मी मनांत आणिलें. एकंदर मानव जातींत सरकारी नोकर, वकील, वैद्य इत्यादि जे ठळक ठळक दरजे ते आपण सर्व तपासले. आतां दुसऱ्या रीतीनें लहान, मोठीं, ह्मातारीं हीं सर्व मनुष्यें तपासिलीं अथवा बाल्यावस्था, यौवनावस्था व वृद्धावस्था ह्यांचेंही पूर्वीप्रमाणें सूक्ष्म निरीक्षण केलें, ह्मणजे पूर्वींच्या रीतीचा ताळा पाहिल्या-सारखें होऊन संशय दूर होईल असें वाटल्यावरून तसें केलें.

मी आपल्या स्वतःचें अवलोकन करीत असतां साधारण सर्व लहान मुलांचें व विद्यार्थ्यांचें केलेलें अवलोकन आपणास पूर्वीं सांगितलेंच आहे; त्यावरून बाल्यावस्था व विद्यार्थिदशा ह्या परतंत्रच होत असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं असें आपल्या नजरेस येऊन चुकलेंच असेल. तेव्हां आतां फिरून तिकडे लक्ष देण्याची जरूर नाहीं. वृद्धावस्थेचें व बाल्या-वस्थेचें पुष्कळ साम्य आहे; शरीर व समज ह्यांत काय तो फरक. बाकी अवयवांची शिथिलता व निर्बलता सारखीच. त्यामुळें वृद्धासही बालाप्रमाणेंच खाणेंपिणें, उठणेंबसणें इत्यादि लहानसहान बाबतींतसुद्धां

परतंत्र रहावें लागतें; मग इतर व्यवसायांची गोष्टच कशाला? तात्पर्य शरीरच जर स्वाधीन नाहीं, तर बाल्यावस्था व वृद्धावस्था ह्या बहुतेक साख्याच परतंत्र होत हें उघड आहे. आतां तरुणावस्थेकडे पहा. ह्या अवस्थेंत तरी काय स्वातंत्र्य आहे? स्वकुटुंबाचलीकडे जरी दृष्टी दिली नाहीं तरी बायकापोरें, सोयरींधायरीं, ह्यांचें काय कमी गुलाम व्हावें लागतें आहे? तीं आपल्यावर अवलंबून; तीं परतंत्र होत हें निर्विवादच आहे; परंतु कुटुंबनायक तरी स्वतंत्र कसचा? त्यास नेहमीं त्यांच्या तंत्रानें वागावें लागतें अथवा त्याच्या स्वातंत्र्यास त्यांचा निदान उपसर्ग तरी पोंचतो. ह्मणजे त्यांच्याकरितां त्यास सदोदित नाहीं तरी वारंवार आपल्या इच्छा, आपली आवडनिवड ह्यांस फांटा देऊन तद्विरुद्ध आचरण करावें लागतें. ही झाली कुटुंबाची गुलामगिरी. त्याचप्रमाणें समाजाचेंही दास्य त्यास पतकरावें लागतें. समाजाचे हितासाठीं जरी त्यानें आपल्या इच्छेविरुद्ध जुलमानें कांहींएक केलें नाहीं किंवा त्यास करावें लागलें नाहीं असें घेऊन चाललें, तरी अमुक वेळीं अमुक एका तऱ्हेचाच पोषाख घालणें, लग्नकार्य अमुक एका तऱ्हेनेंच करणें, तें अमुक वयांत किंवा अमुक एका कुलमर्यादेंतच करणें, खरी गोष्ट असली तरी लोकाचारामुळें ती न उच्चारणें किंवा कधीं कधीं केवळ तद्विरुद्ध उच्चारण्याचें भाग पडणें, अमुकच खाणें, अमुकच पिणें, अमुकच तऱ्हेचें बसणें, बोलणें, चालणें इत्यादि सर्व नाहींत तरी अनेक गोष्टी त्यास आपल्या इच्छेविरुद्ध करण्याचा पदोपदीं प्रसंग येतो हें अनुभवसिद्धच आहे. तेव्हां ह्या अवस्थेंतीलसुद्धां जिणें निःसंशय परस्वाधीनच होय.

बाल्यावस्था, तरुणावस्था व वृद्धावस्था ह्यांपेक्षां आयुष्याच्या जास्त अवस्था मानणें अधिक सयुक्तिक व अधिक इष्ट आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याची सध्या जरूरी नाहीं. परंतु एक संपल्यानंतर लगेच दुसरी, व तिच्यानंतर लागलीच तिसरी असें घेऊन चाललें ह्मणजे आयुष्याचा कांहीं भाग शिल्लक राहिला आहे असें ह्मणतां येणार नाहीं. शिवाय मागील विवेचन सर्वसाधारणच आहे; ह्मणजे वरील तिहींपेक्षां

जास्त त्यांच्यामध्यें येणाऱ्या अशा जरी कांहीं अवस्था कल्पिल्या तरी त्यांस तें सारखेंच लागू पडणारें आहे. तेव्हां तें अनवघादक आहे हें उघड आहे. एवंच ताळा झाला.

पूर्वीच्या उत्तराचें किंवा निकालाचें ताळ्यानें समर्थन झालें. तेव्हां खरें स्वातंत्र्य जगतांत नाहींच वरें असें ह्मणण्याची पाळी आली. तथापि हा निकाल स्वीकारण्यास मन तयार होईना; त्यानें बिलकुल समाधान होईना. कारण उघडच आहे. एखाद्या दुर्मिळ परंतु अत्यंत प्रिय अशा वस्तूचा शोध करणाऱ्या मनुष्यास कोणी जर असें सांगितलें कीं ‘ बाबारे ती वस्तूच अस्तित्वांत नाहीं ’ तर त्याची जी निराशा होते व त्यास जें दुःख होतें तें, ‘ ती वस्तु सृष्टींत आहे परंतु तुला ती प्राप्त होणें अशक्य आहे ’ असें सांगितल्यानें होणाऱ्या दुःखाच्या पासंगासही बसावयाचें नाहीं; कां कीं ती जर अस्तित्वांत आहे तर ती प्राप्त करून घेणें जरी दुर्घट असलें तरी सर्वथैव अशक्य कधींच होणार नाहीं; ह्मणजे पूर्ण निराश होण्याचें कारण अशा प्रसंगीं नसतें. तेव्हां आपला स्वातंत्र्यविषयक प्रकृत अकरणरूपी किंवा निषेधक निकाल निरीक्षणानें कितीही प्रबळ व विश्वसनीय ठरला तरी तो निरुत्साहजनक असल्यामुळें माझ्या मनोदेवतेस तो पटेना; परंतु तो असत्य असेंही ह्मणण्याचें धाडस होईना. ह्या संशययुक्त स्थितींत घड्याळाचे लंबकाप्रमाणें मन गोते किंवा हेलकावे खात असल्यामुळें मला घेरी येऊन क्षणैक मानसिक मूर्च्छा प्राप्त झाली; आणि जरी मी लागलाच शुद्धीवर आलों तरी मला अगदीं चैन पडेनासें झालें. अशा स्थितींत मित्रमंडळीकडे जाऊन त्यांस आपले विचार सांगावे, व त्यांजकडून तरी कांहीं समाधान किंवा शांति प्राप्त होते कीं काय तें पहावें ह्या उद्देशानें मी आपणाकडे आलों आहें. तेव्हां स्वातंत्र्यशोधाचे कामीं मी जे परिश्रम केले आहेत ह्मणून आतां-पर्यंत आपणांस कळविलें त्याजवर आपलें काय ह्मणणें आहे तें मला कळवावें. ’

अशा प्रकारचें आमच्या मित्राचें मनोरंजक, कळकळीचें व सत्य-परिप्लुत भाषण ऐकून आमचीही स्थिति कांहीं अंशीं त्याच्यासारखीच झाली आणि त्याची स्थिति पाहून हंसावें की रडावें हें आमचें आह्मांसच कळेना. तथापि कांहीं वेळानें विचारांतीं आह्मीं आपल्या मित्रास ह्मटलें कीं, बाबारे, तुला अगदीं वेड लागलें आहे, दगड मारीत सुटत नाहींस इतकीच मेहेरबानी समजावयाची. बाकी तुझी कुलाब्यासच रवानगी केली पाहिजे. अरे स्वातंत्र्य ह्मणजे काय हेंच तुला समजत नाहीं ह्मणून तुझी अशी स्थिति झाली आहे. तुह्मीं स्वातंत्र्याची कल्पनाच कांहीं अफाट, विलक्षण, अप्रयोजक, नादान, त्याज्य, दुरुपयोगी, अनिष्ट, किंवा घातक अगर रानटी आहे असें ह्मटलें पाहिजे. ह्या विशेषणांनीं तुजसारखा शोधक रागावणार नाहींच. अरे सुधारलेल्या राष्ट्रांत अशी कल्पना वेड्यांचे डोक्यांत तरी येत असेल कीं नाहीं ह्याची शंकाच आहे. स्वातंत्र्य ह्मणजे स्वैरसंचार करण्याची मोकळीक नव्हे; तर ज्या गोष्टी सर्वांस सारख्याच रीतीनें, दुसऱ्याचें नुकसान न करितां किंवा त्याच्या न्याय्य हक्कांचे आड न येतां स्वतःचे व समाजाचे हितासाठीं करितां येण्यासारख्या आहेत त्या करण्याची आडकाठी नसणें ह्याचें नांव स्वातंत्र्य. इतकी विद्वत्ता संपादन करून आरिस्टाटल्, प्लेटो, बेन्थम्, मिल्ल इत्यादि पाश्चात्य विद्वानांच्या ग्रंथांचें पारायण करून, व रोमन लोकांचे कायदे व कायद्यांचें शास्त्र ह्यांचें इतकें परिशीलन करून व त्यांत बक्षिसें पटकावून फुकट रे फुकट!! सात वर्षें सतत रामायण ऐकून रामाची सीता कोण हा प्रश्न विचारणाऱ्या अडमुठ्याची व तुझी योग्यता सारखीच असें मोठ्या दुःखानें ह्मणावें लागतें. पूर्णस्वातंत्र्य ह्मणजे शशविषाण किंवा वंध्यासुतच होय. सरकारी कायद्याचें, नीतीचें व समाजाचें आणि धर्माचें हीं बंधनें असल्यामुळेंच मनुष्यास मनुष्यत्व व हल्लींचें स्वातंत्र्य प्राप्त झालें आहे. व्यक्तिस्वातंत्र्यास ही मर्यादा अत्यंत अवश्य आहे. हीं बंधनें ज्यावेळीं नव्हतीं तेव्हां मनुष्य अगदीं रानटी स्थितींत होता; व हीं गुणावह व हितकारक बंधनें अस्तित्वांत येत चालल्यानेंच मनुष्याची सुधारणा होत आहे; किंवा ह्या

बंधनांसच सुधारणा हें नांव दिलें असतां चालेल. तात्पर्य हीं बंधनें झुगारून देण्याचा प्रयत्न करणें किंवा तीं अवजड वाटणें ह्मणजे सुधारणेच्या मार्गापासून पराङ्मुख होणें होय. असला मनुष्य अलीकडील सुधारलेल्या समाजांत रहाण्यास योग्य नाहीं. एवंच तुझ्यासारखा मनुष्य विशेषेंकरून विद्वान् व सुशिक्षित समाजास काळिमाच होय. तुला स्वातंत्र्यपिशाचिकेनें घेरलें आहे ह्मणून तूं असा वरळत सुटला आहेस. ह्या समंदाच्या तडाक्यांतून जेव्हां तूं सुटशील तेव्हांच तुला जें स्वातंत्र्य पाहिजे आहे तें लगेच प्राप्त होईल. स्वातंत्र्याच्या वेडगळ माथेफिरू कल्पनांनींच तुला घेरल्यामुळें आपण पारतंत्र्यांत आहों असें तुला वाटत आहे. त्यांना तूं हाकलून लाविलेंस कीं आपण स्वतंत्र आहों असें तुझ्या प्रत्ययास येईल.

आमचें हें भाषण ऐकून आमचा स्वातंत्र्यशोधक मित्र ह्मणाला कीं, ह्या सर्व गोष्टी मला माहीत आहेत. आणि स्वातंत्र्याचा ' अप्रतिबंध किंवा अमर्याद वर्तन ' असा अर्थ न करितां जरी ' मनःपूत ' वर्तन — ह्या ठिकाणीं मनःपूताचा व्यावहारिक अर्थ न घेतां अर्थातच मूळ शब्दशः अर्थ घ्यावयाचा—असा अर्थ समजला ह्मणजे नीतिबंधनें जरी बाजूस ठेविलीं, तरीसुद्धां स्वातंत्र्यास बरीच असमाधानकारक मर्यादा आहे असें वरील निरीक्षणावरून आपल्या ध्यानांत येईलच. शिवाय पूर्ण स्वातंत्र्य असूंच शकणार नाहीं, ह्मणजे तें अशक्य आहे असें ह्मणण्यास तुह्मीं कांहींएक सबळ पुरावा आणिलेला नाहीं. तें अनिष्ट आहे, तें कोणासच नाहीं ह्या गोष्टी माझ्या दृष्टीनें अप्रकृत होत. त्यांनीं माझें समाधान होत नाहीं. तुह्मीं मला पाहिजे तर वेडा ह्मणा; परंतु तुमचें तर्कशास्त्र व तुमची युक्ति मला पसंत नाहीं, त्यास माझा काय उपाय? माझ्या शोधाचे कामीं तुमची मला सहानुभूतीही नाहीं असें ह्मणावयाचें. तथापि मी हा शोध कायमच ठेवणार. मला कांहीं स्वातंत्र्य ही गोष्ट अशक्य वाटत नाहीं. मला स्वातंत्र्याचा शोध लागण्याची अद्यापि आशा आहे. तिची दिशा अशी:— मनुष्यास पारतंत्र्य कां प्राप्त

झालें आहे? त्याच्या पारतंत्र्याचीं कारणें काय? अथवा त्याच्या स्वातंत्र्यास ज्या मर्यादा उत्पन्न झाल्या आहेत त्या कोठून? ह्याचा खल करावा; आणि तीं कारणें अथवा त्या मर्यादा दूर करितां येण्यासारख्या असल्यास पूर्ण स्वातंत्र्याची प्राप्ति होण्याचा संभव आहे. ह्या कल्पनेनें मला असें वाटत आहे कीं, खरें स्वातंत्र्य हें वंध्यापुत्राप्रमाणें अशक्य नसून मेरुपर्वताप्रमाणें ह्मणजे सुवर्णाचे पर्वताप्रमाणें जरी आपणास उपलब्ध नसलें तरी शक्य आहे. तात्पर्य तें केवळ चौकोनी वर्तुळ खास नाहीं.

ह्यावर आमच्यासारखा साधारण मनुष्य इतकेंच ह्मणणार कीं, बाबारे, तुझें ह्मणणें खरें दिसतें; तें विचारसृष्टींत ठीक आहे; परंतु आचारसृष्टींत तरी तें आह्मांस पोकळच दिसतें. तेव्हां हा तुझा शोध तुलाच लखलाभ होवो. तूं एक विलक्षण व्यक्ति आहेस, व तुझें ह्मणणें शास्त्रीयदृष्ट्या सत्य आहे. परंतु व्यावहारिक अथवा साधारण लोकांचे दृष्टीनें ह्याचा निकाल करावयाचा ह्मणजे जितकें स्वातंत्र्य हल्लींच्या स्थितींत मिळणें शक्य आहे तितकें मिळवून समाधानवृत्तीनें रहाण्यांतच मौज आहे. आपणांस अधिक प्राप्त होत नाहीं ह्या विचारानें असंतोष मधून मधून उत्पन्न व्हावयाचाच. तथापि त्याचा पगडा तुजप्रमाणें कायमचा मनावर बसवून घेतल्यानें उलट हानिच आहे. तथापि तुझा शोध मनोरंजक आहे. तेव्हां वेळोवेळीं तुझे विचार मात्र जाणण्याची आमची फार इच्छा आहे.

---

# विचारभ्रमण.

## ( सुशिक्षण व सुधारणा. )

ह्या सदराखालीं आह्मीं आमच्या मित्राचे स्वातंत्र्यावरील विचार सादर केले आहेत. त्यांवरून आमचे मित्र हे विलक्षण जरी नसले तरी एक विक्षिप्त व्यक्ति असून, त्यांचें डोकें बरेंच फिरल्यासारखें दिसत असल्यामुळें त्यांचे विचारप्रवाहास भ्रमण ही संज्ञा चांगलीच शोभत आहे. ते विचार व्यावहारिक साधारण वस्तुस्थितीचे दृष्टीनें कसेही असोत, त्यांस वाटेल तर आपण अशक्य, त्याज्य, नादान, काल्पनिक, भ्रामक अथवा अशाच अर्थाचें वाटेल तें विशेषण लावण्यास जरी तयार असलों, तरी इतकें खरें कीं, त्यांत कांहींच राम नाहीं, ते अगदींच निःसत्व होत, त्यांत सत्याचा अंश मुदलींच नाहीं असें कोणास कधींच ह्मणतां यावयाचें नाहीं; शिवाय ते निदान मनोरंजक तरी आहेतच आहेत. ह्मणून, अशाच कोटींतले जे आणखी कांहीं विचार आमच्या मित्राच्या डोक्यांत घोळत असल्यामुळें आह्मांस व इतरांस कधीं कधीं ऐकण्यास मिळतात ते बहुतेक त्यांच्याच शब्दांनीं वाचकांस आज सादर करून हें भ्रमणप्रकरण संपविण्याचा आमचा विचार आहे. त्यास आरंभ करण्यापूर्वीं प्रथम इतकें सांगणें जरूर आहे कीं, आमच्या मित्रांच्या विचारांप्रमाणेंच ते प्रकट करण्याची त्यांची तऱ्हा कांहीं चमत्कारिक आहे; तेव्हां स्वतःसंबंधाचा उल्लेख, थोडासा पाल्हाळ, गौरव, अतिशयोक्ति, फाजील उल्लास व जोर इत्यादि गोष्टी जरी सर्वच वाचकांस सारख्या आवडल्या नाहींत, तरी विचारांचें विशेषत्व कायम ठेवण्यासाठीं त्यांची छाटाछाट न करितां त्या तशाच ठेविल्या आहेत. इतका प्रस्ताव करून आमच्या मित्राच्या भाषणाकडे लक्ष देण्याची वाचकांस विनंति करितों.

'मी एक पदवीधर आहें. माझी अर्वाचीन सुशिक्षित वर्गांत गणना होत आहे; व ह्या सुशिक्षित समाजांत मला मानही आहे. सुशिक्षणाचे अत्युच्च नाहींत तरी साधारण बहुतेक बरे वाईट सर्व परिणाम माझे ठायीं वास करीत आहेत. मला मराठी शाळा, हायस्कुल, कॉलेज ह्या नांवांच्या शिक्षणसंस्थांपैकीं नांवाजलेल्या संस्थांमध्यें प्रख्यात अध्यापकांचे हाताखालीं स्वभाषा, इंग्रजी व संस्कृत ह्या भाषांचें ज्ञान प्राप्त झालें असून इतिहास, भूगोल, गणिताच्या मुख्य मुख्य शाखा, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, ज्योतिःशास्त्र, न्यायशास्त्र, अर्थशास्त्र, कायदेकानु, इत्यादि अनेक उदारशिक्षणाच्या व्यावहारिक व तात्त्विक ज्ञानभांडारांमध्यें माझा प्रवेश झालेला आहे; आणि ह्यांपैकीं कांहीं विषयांत तर माझें नैपुण्य बऱ्याच उच्च कसास लागलें आहे. हल्लींसुद्धां या विषयांपैकींच बऱ्याच विषयांवरील नव्हे तर आणखीसुद्धां राजनीति, समाजशास्त्र, वेदान्त ह्यांसारख्या गहन विषयांवरील बडीं बडीं नामांकित पुस्तकें माझ्या अवलोकनांत येत आहेत; माझा विद्याव्यासंग अद्यापि चालू असून वाचनाची अभिरुचि वृद्धिंगत होत आहे. त्याचप्रमाणें पाठशाळांतून शिकलेल्या, व सामाजिक व राजकीय दृष्टीनें सार्वजनिक महत्वाच्या, बहुतेक सर्व वादविवादांत माझें लक्ष लागतें, इतकेंच नव्हे, तर त्या वादविवादांत अनेक प्रसंगीं पूर्वपक्ष व उत्तरपक्ष करण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे. वर्तमानपत्रें व मासिकपुस्तकें वाचल्याशिवाय माझा एकही दिवस जात नाहीं, इतकेंच नव्हे तर तशाप्रकारचें अन्न मला जर एक दिवस मिळालें नाहीं तर मला कसेंसेंच होतें; मला बिलकुल चैन पडत नाहीं. रानांत चरावयाला गेलेल्या गाईची संध्याकाळीं परत येण्याची वेळ टळली असतां तिचें बिचारें तान्हें वासरूं जसें अगदीं घाबरून जाऊन कासावीस होतें आणि कधीं एकदां मातेचें मुख अवलोकन करावयास मिळेल ह्या उत्कंठासाधारण चिंतेनें अगदीं अस्वस्थ असतें, त्याचप्रमाणें जर कांहीं असाधारण, अकल्पित व आकस्मिक कारणानें टपाल वेळच्यावेळीं न आल्यामुळें वरील अन्न माझे पदरीं पडण्यास वेळ लागला तर मी सर्वथा अस्वस्थ होऊन माझे डोळे

टपालाकडे लागून रहातात. तसेंच आपल्यासारख्या चार सुशिक्षित विद्वान् शिष्टमंडळींत बसून सर्वतोमुखीं असणाऱ्या व्यक्तिविषयक व समाजविषयक गोष्टींचें विवेचन करण्यांत मला आनंद होतो. व्याख्यानें, सभा, मंडळ्या, समाज, मेळे, क्लब्स् अशाप्रकारच्या संस्थांशिवाय मला चैन पडत नाहीं. ग्रंथसंग्रहालय, पदार्थसंग्रहालय, अजबखाना, नाटकगृहें, सर्कस, क्रीडाभुवनें ह्यांचीही वेळोवेळीं मला आठवण होऊन त्यांचा मार्गही मी थोडाबहुत चोखाळीत असतोंच. व्यक्तिविषयक, सामाजिक, धार्मिक वगैरे सुधारणा कोणत्या व कशा घडवून आणितां येतील हे विचारही माझ्या डोक्यांत घोळत असतात. आणि ज्या मानानें वाचनाचा व वरील गोष्टींचा मला नाद आहे, त्याच मानानें ग्रंथलेखन व ग्रंथप्रसार ह्यांचें महत्व व उपयोगित्व माझ्या मनांत पूर्ण बिंबलें असून त्या दिशेनें मी यथाशक्ति, थोडाबहुत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रयत्नही करीत आहें. सारांश, पाश्चात्यांच्या आगमनानें ज्या ज्या अर्वाचीन विद्याविषयक नूतन संस्था व नूतन क्रियामार्ग आमच्या लोकांच्या नजरेस आले आहेत व येत आहेत त्या सर्वांचें महत्व मी ओळखून आहें; आणि मी शिक्षणदृष्टीनें ह्या नूतन परिस्थितींतच वाढलों असल्यामुळें माझें तिच्या ठायीं अकृत्रिम प्रेम जडलें असून त्या परिस्थितीच्या सुधारणेसाठीं व चिरस्थायित्वासाठीं कृतज्ञपणें मी काय केलें पाहिजे ह्या प्रश्नाचाही खल माझ्या डोक्यांत सदोदित चाललेलाच असतो.

अर्वाचीन सुशिक्षणाच्या ह्या शुद्ध सत्वानें वर सांगितल्याप्रमाणें माझें अंतरंगच केवळ व्याप्त झालें आहे असें नाहीं; तर त्याचीं बाह्य चिन्हेंही माझ्या बहिरंगाचे ठायीं अवयवरूपानें विलसूं लागलीं आहेत. शरीराचे अवयव शरीरास अवश्य असून वाटेल त्यावेळीं इजा झाल्याशिवाय ते जसे शरीरापासून अलग करणें सोपें नाहीं, आणि ह्मणूनच त्यांच्यायोगानें शरीरास शोभा व पूर्णत्व येत आहे, त्याचप्रमाणें सुशिक्षणाचे बाह्य चिन्हांचेंही स्वरूप माझे ठायीं इतकें खिळलें आहे कीं मला इजा झाल्याशिवाय मनास वाटेल त्यावेळीं त्यांचा मला त्याग करतां

येत नाहीं; आणि त्यांचेयोगानें माझ्या सुशिक्षितत्वास शोभा व पूर्णत्व येत आहे असें माझें व लोकांचेंही मत आहे. हवेचें व स्वच्छतेचें महत्व मला पूर्णपणें माहीत झालें असल्यामुळें गांवाबाहेरील नाहीं तरी गांवाच्या सीमेवरील हवाशीर व स्वच्छ बंगल्यांत मी रहात आहें. सकाळीं सूर्योदयानंतर उठलों ह्मणजे सावण आणि दंतमंजन व ब्रश ह्यांच्या उपयोगानें उत्तम प्रकारें शौच व मुखमार्जन करून लगेच चहा पितों; आणि ह्या पेयानें उत्तेजित होऊन बर्ड्स्आय्च्या अथवा तशाच नवीन विड्या किंवा चिरूट ह्यांचे धूम्रपानांत आपल्या कामास लागतों. केवळ तांब्यानें नुसतें पाणीच अंगावर ओतून स्नानविधि पुरा करीत नाहीं; तर पीअर्स सोपाचा स्नानविधींत प्रामाणिकपणानें नित्य उपयोग करितों. भोजनाचेवेळींसुद्धां घाणेरड्या मुकट्याचे ऐवजीं शुद्ध धौत-वस्त्रांचें परिधान करितों, आणि अन्नामध्येंसुद्धां सत्व, पालट व रुचि ह्या दृष्टींनीं अवश्य व योग्य सुधारणा करून दिवसांतून दोनच वेळां पोटें खच्चून भरून न घेतां अनेक वेळां मिताहारच करितों. पोषा-खांतसुद्धां मी अवश्य, गुणकारी, व गुलजार गुलहौशी फरक केला आहे, ह्मणजे उपयुक्तता व सौंदर्य ह्यांचा मनोहर मेळ घातला आहे. इस्त्री करून कडकडीत झालेल्या जाड व रुंद मनगटपट्या, गळपट्या व छातीपट्या असलेले व हरतऱ्हेच्या शोभादायक लखलखीत गुंड्या लाव-लेले शर्ट्स् मी अर्वाचीन शिष्टसांप्रदायाप्रमाणें नेहमीं वापरितों. त्याच-प्रमाणें काटदार जाकिटें व कोट, सांखळीनें युक्त सुंदर घड्याळ, झिरमिळी-दार पगडी, रेशिमकांठी उपरणें, वेताची मूठदार छडी, व प्रसंगानुसार बूटपाटलोण हीं मला अवश्य झालीं आहेत. केंस ठेवून दर दोन चार दिवशीं तरी तुळतुळीत हजामत स्वतः नाहीं तर निदान न्हाव्याकडून तरी, करविल्याशिवाय मला बरें वाटत नाहीं. चष्म्याचे कामींसुद्धां मी सदभिरुचीचा अगदीं नकळत उपयोग करितों. नुस्त्या चापाच्या दाबानें नाकावर बसणारा व एका टोंकास ज्यास गोफ लटकत आहे असा शुद्ध गारेचा सोनेरी अगर रुपेरी चष्मा मला आवडतो. त्याच-प्रमाणें घरामध्येंसुद्धां निरनिराळ्या प्रकारचीं टेबलें, नाना तऱ्हेच्या सोई-

स्कर खुर्च्या, कोचें, शामदानें, वालशेडा, विलायती सुंदर लांबण दिवे, वातक्षम ह्मणजे सोंसाट्याच्या वाऱ्यांतही न जाणारे दिवे, रमणीय घड्याळें ट्रंका, चर्मी ब्यागा, ग्लासें, पुष्पपात्रें, पत्रभार, ( कागद उडूं नयेत ह्मणून त्यावर ठेवण्याचीं दगडी, कांचीं वगैरे दडपणें ) इत्यादि अनेक सफाईदार, मनोवेधक, शोभायमान, व उपयुक्त सामानाचा मीं योग्य संग्रह करितों. सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं आंतबाहेर जिकडेतिकडे सुशिक्षणाचीं बहुतेक सर्व लक्षणें सांगोपांग माझ्या ठायीं अगदीं घनदाट पसरून गेलीं आहेत; तीं इतकीं कीं माझ्या सुशिक्षितपणाची लेशमात्रही शंका कोणास येईल असें मला वाटत नाहीं. शिवाय समाजामध्यें लोक मजशीं ज्या रीतीनें वागतात, व मजविषयीं व मजपाशीं ज्याप्रकारें संभाषण करितात त्यावरून त्यांस वरील शंका येत असेल असें दिसतही नाहीं; इतकेंच नव्हे तर मजविषयींचा त्यांचा व्यवहार अकृत्रिम प्रेमानें वा आदरबुद्धीनें भरलेला आहे असें जर मी स्पष्टपणें कबूल केलें नाहीं, तर त्यांच्यासंबंधानें मी अक्षम्य अन्यायच केल्यासारखें होईल.

माझ्या सुशिक्षितपणाचें मीं जें हें चित्र रेखाटलें आहे तें जरासें फाजिल लांबलें आहे हें खरें, तरी तसें करण्यांत माझा एक उद्देश आहे; तो असा कीं सुशिक्षणाची अर्वाचीन कल्पना आपल्यापुढें नीट उभी रहावी व तेणेंकरून सुशिक्षणाचें अंतरंग व बहिरंग यांमधील निकटसंबंध आपल्या लक्षांत यावा. प्राचीन विद्वत्ता ह्मणजे वेदान्त, न्याय, व्याकरण, ज्योतिष, वेद, इत्यादिकांचाच अभ्यास व साधारण बहुश्रुतपणा आणि गोपद्माएवढ्या बुंध्याची लहान शेंडी, दाभणकांठी मिशा, महिनापंधरा दिसांची हजामत, कपडा असल्यास फाटकातुटका व मळकट, बटबटीत गंध, जाड आवाज, ग्राम्य व अश्लील भाषण, इत्यादि गोष्टींची जशी बहुतकरून सांगड आहे, त्याचप्रमाणें अर्वाचीन विद्वत्ता व वर निर्दिष्ट केलेलें बाह्यांग ह्यांतही तसाच कार्यकारणभाव जरी नाहीं तरी सतत साहचर्य आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं हें आपल्या नजरेस यावें. असो. ज्याप्रमाणें माझ्या सुशिक्षितपणाची माझ्या आप्तइष्टांस व इतर मंडळीस अल्पही शंका नाहीं त्याचप्रमाणें तो मलाही सहाजिकच नसावी.

मी जेव्हां हायस्कुलांत व कालेजांत होतों त्यावेळीं ह्या सुशिक्षणाची हाव माझ्यामध्यें इतकी जबरदस्त होती कीं ती पुरविण्यासाठीं वाटतील तीं शारीरिक व मानसिक दुःखें सहन करण्यास माझी तयारी होती; आणि मला असं पक्कें आठवतें कीं जेव्हां एकदां माझें शिक्षण मध्येंच बंद पडण्याचा दुर्दैवानें प्रसंग आला होता तेव्हां तर मी एकांतांत एकसारखा ओकसाबोकशीं रडत असे. शिवाय अखेरीस जेव्हां पदवी प्राप्त झाल्यावर कुटुंबपोषणार्थ द्रव्यार्जनाचा मार्ग मला पतकरावा लागला, तेव्हांसुद्धां परीक्षा पास होण्याची व तद्द्वारा मानमान्यतेची माझी हाव पूर्ण तृप्त झालीनसल्यामुळें मला वाईट वाटलें; आणि ह्मणूनच नोकरीस लागल्यानंतरही ती माझी आशा तृप्त करण्यासाठीं संसारांतील अडचणींस न जुमानतां मी कष्टी मेहनत केली. सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं सुशिक्षणाबद्दलची लोकांची व माझी कल्पना अगदीं एकच होती. त्यामुळें सुशिक्षणाच्या अत्युच्च युरोपियन मर्यादेप्रत जरी मला पोंचतां आलें नाहीं, तरी माझा शिक्षणक्रम संपल्यावर जेव्हां मला विद्वत्ताद्योतक पदवी मिळाली तेव्हां मला जो आनंद झाला त्याच्यापुढें वेदान्त्यांच्या श्रेष्ठ ब्रह्मानंदाची ती काय मातबरी असें मला वाटावें हें साहजिक होतें; त्या आनंदाचें वर्णन मला करितां येत नाहीं, तो ब्रह्मानंदाप्रमाणें केवळ स्वसंवेद्यच होय. परंतु तो जरी मी स्वतः अनुभविलेला आहे तरी तो, केवळ क्षणभंगुर नसला तरी—मासभंगुर किंवा षण्मासभंगुर पडल्यामुळें माझ्या अंतःकरणांतून निःशेष अन्तर्धान पावला आहे; आणि असा एक आनंद मला झाला होता असें जरी मला अद्यापि स्मरतें तरी त्याची योग्य कल्पना सध्या मलाही करितां येत नाहीं. तो आनंद जर मला वाटला तसा खरोखरीच ब्रह्मानंदाच्या तोडीचा किंवा त्याहीपेक्षां श्रेष्ठ असता तर तो इतक्यांतच कां अन्तर्धान पावावा हें मला समजत नाहीं. तो आनंद लयास गेल्याचेंही मला इतकें दुःख वाटत नाहीं; परंतु सध्या माझ्या हृदयांत जें शल्य रुतलें आहे तें वेगळेंच आहे; तें ऐकून तुह्मांस सखेदाश्चर्य झाल्यावांचून रहाणार नाहीं; तरी ओघासच आल्यामुळें सांगतों. सरासरी तप दीडतप कष्टी मेहनत करून मी सुशिक्षण संपा-

दन केलें. मला त्याचप्रमाणें लोकांनाही मी सुशिक्षित झालों असें वाटूं लागलें व त्यामुळेंच वरील आनंद मला झाला. तो आनंद गेलाच. तरी पण मी सुशिक्षित झालों आहें ही लोकांची कल्पना जशी अद्यापि दृढ आहे तशी ती माझीही जर कायम राहिली असती तर प्रकृत आनंदाची मी विशेष पर्वा केली नसती. पण दुर्दैवानें ह्मणा किंवा सुदैवानें ह्मणा माझ्या त्या कल्पनेसही थोडथोडा धक्का बसत चालल्यामुळें मला जें खिन्नत्व प्राप्त झालें आहे त्याचा परिहार होईलसें मला वाटत नाहीं.'

असें बोलतां बोलतां आमच्या मित्रानें एक लांब सुस्कारा सोडून, कांहीं वेळ चित्तवृत्ति उचंबळल्यामुळें मौन धारण केलें. त्यानें सांगितल्याप्रमाणें आह्मांस खरोखरीच सखेदाश्चर्य वाटलें. आमच्या मित्राची, कोणत्या तरी वास्तविक नाहीं तरी काल्पनिक कारणानें, अशी अस्वस्थ व दुःखद स्थिति झालेली पाहून आह्मांस खेद झाला; आणि उच्चप्रतीच्या शास्त्रीय उदार शिक्षणाचें महत्व व उपयुक्तता ह्यांच्या वास्तविकतेविषयीं त्यांना जी शंका प्राप्त झाली व जी त्यांच्या चित्ताच्या अस्वस्थतेचें मूळ कारण होय, ती ऐकून मात्र आह्मांस अगदीं अचंबा वाटला. कांहीं काळ उभयतः स्तब्धतेंत गेल्यानंतर आह्मीं आपल्या मित्रांस ह्मणालों. अहो, ज्ञान व सुधारणा ह्यांची पराकाष्ठा ज्या देशांत होऊन गेली आहे आणि ह्मणूनच ज्यास सर्व जगामध्यें श्रेष्ठ पद प्राप्त झालें आहे, तेथील लोकांच्या दयाळु राज्यछत्राचे छायेखालीं सर्व जगास संमत असलेल्या शास्त्रादिकांचें आपणांस जें शिक्षण प्राप्त होत आहे, त्याच्या चांगुलपणाविषयीं तुह्मांस जी शंका प्राप्त झाली आहे, तिनें आह्मी तर अगदीं थक्क होऊन गेलों. आणि अशी शंका ज्या डोक्यानें घेतली त्याची कींव करावी, कीं तारीफ करावी हें आह्मांस समजत नाहीं. तथापि अशी शंका आपणास कां प्राप्त झाली तें आह्मांस कळूं द्या; ह्मणजे ती कितपत साधार आहे हें ठरविण्यास ठीक पडेल; आणि जर ती निराधार पोकळ आहे असें दिसून आलें तर तेणेंकरून आपल्या दुःखाचें निवारण सहजच होईल. ह्यावर आमचे मित्र ह्मणाले:—

‘ माझी स्थिति व माझे विचार हीं आपल्या पूर्ण लक्षांत आलीं ह्याबद्दल मी आपला आभारी आहें. वर जरी मी आपल्या स्वतःचीच हकीकत दिली आहे, तरी ती अलीकडील सुशिक्षित वर्गास सारखी लागू आहे. त्यांच्यांत व माझ्यांत फरक इतकाच कीं, आपणास मिळालेलें शिक्षण चांगलें भरींव व खणखणीत आहे असा त्यांचा समज आहे; माझाही तसाच होता व अद्यापिही बराच आहे; तरी अलीकडे त्या शिक्षणाचा पोंचटपणा व नकलीपणा थोडथोडा माझ्या नजरेस येत चालला आहे. ह्यामुळें मला जें दुःख होत आहे तें आपल्या ध्यानांत आल्याप्रमाणें केवळ व्यक्तिविषयक नसून सार्वजनिक असल्यामुळें त्याचा आवेग दुःसह होत आहे. पाश्चात्य शिक्षणाच्या शुष्कपणाबद्दलच्या शंकेचीं कारणें आपण मला विचारितां तीं सविस्तर सांगावयाचीं ह्मणजे एक प्रचंड ग्रंथच लिहिला पाहिजे. तथापि त्यांचें थोडेसें दिग्दर्शन करण्यास हरकत नाहीं. तेव्हां आपण माझें ह्मणणें सावधान पूर्णपणें ऐकून घेऊन मग काय तें त्याजवर आपलें ह्मणणें असेल तें सांगावें. मध्येंच मला अडथळा करूं नये. त्यायोगें श्रम व वेळ बराच वांचल्याचें आपल्या अनुभवास येईल.

आह्मांस मिळत असलेल्या पाश्चात्य शिक्षणाची विफलता दाखविण्यास आरंभ करण्यापूर्वीं प्रथम एक साहजिक होणारा गैरसमज दूर केला पाहिजे. हल्लींचें शिक्षण दूषित आहे ह्या माझ्या विधानावरून माझें मत, पूर्वीचें ह्मणजे पेशवाईंतील शिक्षण मात्र खरें शिक्षण होय, असें आहे असें आपणास वाटण्याचा संभव आहे. परंतु हा गैरसमज दूर करणें अवश्य आहे. त्यावेळीं लेखन, वाचन, व थोडेंसें गणित ह्मणजे हिशेबठिशेब व साधारण बहुश्रुतपणा, सुभाषितांचा परिचय, व संभाषणनिपुणता ह्या गोष्टी प्राप्त झाल्या ह्मणजे शिक्षण संपत असे. थोड्याशा मूठभर लोकांस मिळणारें त्यावेळचें हें चमचाभर शिक्षण जर बाजूस ठेविलें तर त्यावेळीं साधारणजनसमूहास मिळणाऱ्या शिक्षणाचें नांवानें आंवळ्यायेवढेंच होतें; तेव्हां त्याचा चांगलेवाईटपणा तो काय

ठरविणार. ह्मणून हल्लींच्या शिक्षणांतील दोष दाखवितांना त्याची वरील चमचाभर शिक्षणाशीं तुलना करून त्यापेक्षांही ह्याचा कस कमी ठरविण्याचा माझा उद्देश आहे असें समजण्याचें कारण नाहीं. तो काळच मुळीं अज्ञानांधकारांत गडप झालेला होता; आणि जरी त्या मध्यरात्रीचे वेळींही बहुजनसमाज घोरत पडला असतां कांहीं हाताच्या बोटांवर— मोजतां येणारीं— माणसें ज्ञानदीपाच्या उज्ज्वल प्रकाशाचा अनुभव घेत असलीं तरी त्यांचा दीप कोनाकोपऱ्यांत किंवा आडरानांतच चमकत पडल्यामुळें इतरांस त्यांचा उपयोग क्वचित्च होत असला पाहिजे, हें अगदीं निर्विवाद आहे. परंतु ती रात्र संपून इंग्रजीराज्यरूपी अरुणाचा उदय झाल्यानंतर लगेच ज्ञानसूर्य उदयास येऊन ज्या दिवसास आरंभ झाला तो अगदीं निरभ्र असून त्याची भर दोनप्रहरची बारा वाजण्याची वेळ सध्यां आली आहे; ह्मणजे ज्ञानसूर्याचा स्वच्छ व अत्यंत आल्हादकारक प्रकाश हिंदुस्थानभर जिकडे तिकडे पसरून हिंदुस्थानचें कोटकल्याण झालें आहे असा इतरांबरोबर झालेला माझा पूर्वीचा समज मात्र भ्रामक आहे; आणि ज्ञानसूर्य जरी उदयाचलावर आला आहे तरी तो अभ्राच्छादित असल्यामुळें सुदिनाचे ऐवजीं दुर्दिनच प्राप्त झाला असून त्याची क्षितीजावर फारच थोडी मजल आली आहे, ह्मणजे तो खस्वस्तिकीं किंवा डोक्यावर येण्यास फारच उशीर आहे असें हळू हळू माझ्या प्रत्ययास येत चाललें आहे. तें कसें हें आतां आपणास थोडक्यांतच दाखवितों.

सुशिक्षणाचें एक मुख्य सर्वमान्य लक्षण परीक्षा हें होय. ही परीक्षा मात्र कोणत्याही विद्यापीठाची किंवा सरकारानें घेतलेली नव्हे. अशा प्रकारची एक सोडून पांच परीक्षा पास झालेले लोक अलीकडे पायलीचे पंधरा आढळूं लागले आहेत, आणि प्रत्येकाच्या नांवापुढें तद्व्यंजक अक्षरांची गर्दीच उडून जात आहे, ती इतकी कीं, नाकापेक्षां मोतीं जड किंवा मिया मूठभर तर दाढी हातभर ह्या न्यायानें नांव इंचभर तर पदव्या फूटभर अशी स्थितिही कधीं कधीं दृष्टीस पडूं लागली आहे.

परंतु सुशिक्षणद्योतक जी परीक्षा आहे ती एका मनुष्यानें दुसऱ्या मनुप्याची घेतलेली नव्हे, किंवा मूठ मूठ जाड पुस्तकें घोंटून पास झाल्यावर पदवी मिळविण्याची नव्हे. त्या परीक्षेचा परीक्षक दुसरा नाहीं; तिचे परीक्षक आपले आपणच व परीक्ष्यही आपणच; ह्मणजे स्वतःच स्वतःची परीक्षा करणें. ही स्वपरीक्षा पास होणें महादुर्घट आहे. ‘ परंतु ह्या तुमच्या स्वपरीक्षेंतही पास झालेले आजकाल काय थोडे थोडके सुशिक्षित लोक आहेत! मग तुह्मीं अलीकडील शिक्षणाचे नांवानें कां व्यर्थ खडे फोडावे हें आह्मांस समजत नाहीं. ’ ह्यावर माझें उत्तर इतकेंच कीं, स्वपरीक्षेंत पास होणारे आजकाल बहुतेक सर्वच सुशिक्षित लोक आढळतात आणि ह्मणूनच त्यांस सुशिक्षित ह्मणावें कीं नाहीं ह्याबद्दल जबरदस्त शंका उत्पन्न होते. स्वपरीक्षा व प्रचलित सर्व परीक्षा ह्यांत ह्या बाबतींत जमिनअस्मानाचें अंतर आहे; किंवा त्या परस्पर विरुद्ध आहेत असें ह्मटलें तरी चालेल. प्रचलित सर्व परीक्षांत पास होण्यापेक्षां स्वपरीक्षेंत पास होणें फारच सोपें आहे; स्वपरीक्षेंत परीक्षक आपणच पडल्यामुळें पास होण्यास लागणारे गुण सहजच मिळूं शकतात, ह्यामुळें ह्या परीक्षेचा निकाल शेंकडा नव्याण्णव नव्हे शंभर झाला तरी त्यांत आश्चर्य नाहीं. परंतु बहुमानाच्या शिक्षणविषयक पदव्या मिळविण्यासाठीं प्रचलित परीक्षांत पास होणें जसें अवश्य आहे तसें मात्र सुशिक्षित ही पदवी वस्तुतः मिळण्यास स्वपरीक्षेंत पास होणें अवश्य नाहीं, इतकेंच नव्हे तर तींत नापासच होणें अवश्य आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं; आणि अलीकडील शिक्षण मिळालेले बहुतेक सर्व लोक ह्या स्वपरीक्षेंत पास होत असल्यामुळेंच त्यांस सुशिक्षित ही पदवी वस्तुतः मिळणें रास्त आहे कीं नाहीं हा मोठाच प्रश्न प्राप्त होतो. दोषहीन प्राणी कोणीच नाहीं; आणि जरी स्वतःच्या डोळ्यांतलें मुसळ दिसलें नाहीं तरी दुसऱ्याच्या डोळ्यांतलें कुसळ दिसतें ह्या न्यायानें स्वतःपेक्षां दुसऱ्यासच आपले दोष अधिक स्पष्ट व सहज दृष्टीस पडतात हें मानससरोवराच्या पृष्ठभागावर असणाऱ्या लहानमोठ्या दोषांसंबंधानें जरी बहुतांशीं खरें आहे तरी पृष्ठभागाखालीं लपून असणाऱ्या विकृत व दूषित लहरीं

संबंधानें मात्र तसें कधींच ह्मणतां यावयाचें नाहीं. आणि जरी ह्या मानस-सरोवराचा पृष्ठभाग वरून अगदीं शांत व स्तब्ध दिसला तरी त्याच्या-खालीं अशा कांहीं प्रचंड क्षुब्ध लहरींचा कल्लोळ सतत चालू असतो कीं त्यांच्यामुळें अंतःसंशोधनार्थ त्यामध्यें अल्पही अवगाहन करणें मोठ-मोठ्या विद्वानांस—रथी महारथींसही—फारच कठीण पडतें. असें असतांही जर कोणी धाडसानें बुडी मारून खालीं जाण्याचा प्रयत्नच करूं लागला तर तो मनुष्य त्या सरोवराचे आंत तळापर्यंत पसरलेल्या निरनिराळ्या सूक्ष्म आशापाशांत गुरफटून गुदमरण्याचा, किंवा अन्तर्हित सूक्ष्म काम-क्रोधादि नक्रांच्या विस्तृत जाभाड्यांतच गडप होण्याचा फारच संभव आहे. अशा भयंकर स्थितींत ह्या मानससरोवरांत बुडी मारून त्याच्या तळीं आणखी किती घनघोर दऱ्या व खोरीं पसरलीं आहेत ह्यांचा शोध लावून येणारा महात्मा फारच विरळा. ह्यामुळें मानस सरोवराच्या बाहेर त्याच्या कांठावर बसून निरीक्षण करणारांस त्याच्या अंतःस्थितीविषयीं कांहींच माहिती मिळावयाची नाहीं. ह्मणून वर्तन आणि वाणी ह्यांमध्यें ज्या मानानें मनाचें प्रतिबिंब उठतें त्या मानानें जरी दुसऱ्यास त्याची परीक्षा करितां आली तरी त्याच्या आंत खोल भागीं व बुडाशीं काय आहे ह्याची परीक्षा दुसऱ्यास कधींच करितां यावयाची नाहीं. आणि एकाच्या मनाची पूर्ण परीक्षा दुसऱ्यास करितां येते असें जरी घेऊन चालेल तरी ती गोष्ट ह्या ठिकाणीं अप्रकृतच होय. कारण आपल्या मनाची परीक्षा केवळ आपणांसच करितां येते कीं दुसऱ्यासही करितां येते हा प्रकृत प्रश्न नाहीं. प्रकृत मुद्दा असा आहे कीं स्वपरीक्षा ज्यास नीट करितां येते त्यास सुशिक्षित ही पदवी देण्यास हरकत नाहीं; शिवाय ही परीक्षा स्वतःच केली पाहिजे दुसऱ्यास होणें कठीण हें वरील सरोवराचे दृष्टांतावरून उघडच आहे. वर जें मानस सरोवराचें वर्णन केलें आहे, त्यावरून ह्या सरोवराच्या अंतःस्थितीबद्दल ज्यास खरोखर वाईट वाटेल, ती अत्यंत शोचनीय आहे, भयंकर आहे, व त्या सरो-वराचें शोधन करणें फारच कठीण जसें जो वर्णन करील त्यासच त्याची वास्तविक स्थिति कळली असें ह्मणतां येईल हें उघड आहे. ह्यावरून

स्वपरीक्षेंत जो स्वतःस नालायक ठरवील ह्मणजे जो नापास होईल त्यासच पास ठरवून सुशिक्षित पदवीस लायख कां समजावयाचें तें तेव्हांच आपल्या नजरेस आल्यावांचून रहाणार नाहीं. ह्या सरोवरांत जसजशी अधिकाधिक खोल बुडी मारावी तसतसे त्याचे अवगुण व दोष अधिकाधिक अनुभवास आल्यावांचून रहाणार नाहींत. ह्मणूनच स्वपरीक्षेंत जितके जितके कमी गुण मिळतील तितकी अधिक लायकी समजावयाची. स्वपरीक्षेंतील गुण व सुशिक्षितपणा हीं व्यस्त प्रमाणांत आहेत; तीं इतकीं कीं शून्य गुणाबराबरच पूर्ण सुशिक्षितपणाची जोड आहे असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. असो. तात्पर्य इतकेंच कीं स्वपरीक्षेंत भरपूर गुण मिळवून पास होणारी मंडळीच फार पडल्यामुळें ह्मणजे स्वतःची पात्रता, लायकी, किंवा किंमत फाजील नाहीं तरी अधिक समजणारेच बहुतेक सर्व लोक असल्यामुळें त्यांचे ठायीं आत्मश्लाघा, अहंपणा, इत्यादि गुणांचा भाव व तसेंच स्वतःविषयीं विनय व दुसऱ्याचे ठायीं पूज्यबुद्धि इत्यादिकांचा अभाव दृष्टीस पडतो. स्वपरीक्षेचें महत्व साक्रेतिसादिक पाश्चात्य व व्यास वाल्मीक्यादि पौरस्त्य तत्त्ववेत्त्यांस पूर्णपणें अवगत होतें असें त्यांच्या आचारविचारांवरून तेव्हांच कळून येतें. परंतु अर्वाचीन काळीं स्वतःची परीक्षा केवळ वरवर, ह्मणजे दुसऱ्याचे दृष्टीनें, करण्याची संवय इतकी कांहीं प्रचलित झाली आहे कीं अर्वाचीन मानसशास्त्राची उभारणी अशाच बाहेरून केलेल्या अवलोकनावर झाली असल्यामुळें त्यास शास्त्र ह्मणावें कीं नाहीं हासुद्धां एक वादग्रस्तच प्रश्न आहे. तात्पर्य, सुशिक्षितपणा जो आहे तो भौतिक शास्त्रें व तत्त्वज्ञान ह्यांतील पारंगततेनें प्राप्त होत नाहीं आणि ही पारंगतता तरी आह्मी कोठें संपादन करितों आहों, आमचा परिचय ह्यांच्या फार तर मूळाक्षरांशींच होत आहे, ह्मणजे ह्या दिशेनेंही आमची मजल धुळपाटीपलीकडे गेली आहे असें वाटत नाहीं. असें असतां सुशिक्षिततेचा बिल्ला मात्र विश्वविद्यालयांच्या पदव्यांबराबर जिकडे तिकडे चमकूं लागला आहे. परंतु ह्या धुळपाटीपंडितास जोंपर्यंत सर्वशास्त्रपारंगतेची घमेंड वाटत आहे, जोंपर्यंत ते बहुतेक

अध्यां हळकुंडानेंच पिंवळे होत आहेत तोंपर्यंत त्या विल्लयावर त्यांचा बिलकुल अधिकार नसून तो त्यांजपासून हिसकावून घेतला पाहिजे; आणि स्वपरीक्षा किंवा आत्मज्ञान सुशिक्षितपणास अवश्य आहे असें जगजाहीर झालें पाहिजे. ही केवळ वेदांतिक कल्पना आहे असें पुष्कळांस वाटल्यास त्यांत नवल नाहीं. कारण ह्या गोष्टीचें महत्व कळण्याची पात्रताही अलीकडील शिक्षणानें नाहींशी होत आहे. अशा स्थितींत आमच्या सुशिक्षितत्वाच्या शंकेचीं अन्य कारणें पहाणेंच योग्य आहे.

कोणतीही गोष्ट दुसऱ्यास प्रमाणभूत समजून स्वीकारावयाची नाहीं, तर तिची स्वतः शहानिशा करून साधकबाधक प्रमाणांचे परस्पर तुलेनें तिजविषयीं काय तें आपलें मत ठरवावयाचें; ह्मणजे सत्याचे कसोटीस ती उतरते असें प्रत्यक्ष स्वानुभवानें पाहून तिचा स्वीकार करावयाचा, नाहीं तर त्याग करावयाचा. ह्मणजे नवेजुनेपणावर किंवा अन्य आकस्मिक गोष्टींवर सत्यासत्यता अवलंबून नसल्यामुळें वस्तूचें योग्य परीक्षण करूनच तिचा निकाल करावयाचा—सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजंते—अशाप्रकारची मनाची प्रवृत्ति सुशिक्षणानें उत्पन्न झाली पाहिजे; ह्याविषयीं कोणाचा मतभेद असेल असें वाटत नाहीं. अंधपरंपरा, अंधविश्वास, किंवा परप्रत्ययनेयबुद्धि हें मूढत्वाचें लक्षण होय हें निर्विवाद आहे. ह्या दृष्टीनें तरी आपणं सुशिक्षित ह्या पदवीस कितपत पात्र आहों तें पाहूं या. स्वराज्य नष्ट झाल्यानंतर इंग्रजमध्यें जें पाश्चात्य शिक्षण आपणांस मिळूं लागलें आहे तें किती जरी चांगलें असलें ह्मणजे त्याचे कितीही चांगले परिणाम झाले असले किंवा होत असले तरी तें स्वत्वविघातक आहे ह्यांत संशय नाहीं. नवीन राज्यकर्त्यांनीं आमचें राजकारण जसें नालायक ठरवून आपल्याची श्रेष्ठता स्थापन केली तसेंच आमचा धर्म, आमची विद्या, आमची समाजस्थिति, आमची नीति, आमचें सर्व कांहीं नादान ठरवून इंग्रजीचें वर्चस्व हिंदुस्थानांत स्थापन करण्यांत त्यांचें हित होतें; आणि हें काम करण्यास त्यांस फारच सुलभ गेलें. ह्या जगांत कोणतीही गोष्ट निर्दोष नाहीं;

तेव्हां कोणत्याही गोष्टीस नालायक, नादान, त्याज्य असें ठरवावयाचें असल्यास तिच्यांतील दोषांचा विकास करून दाखविणें व तिच्यांतील सद्गुणांचा संकोच करून दाखविणें हा एक राजमान्य मार्ग तर प्रसिद्धच आहे. ह्या मार्गाचें तर आमच्या राज्यकर्त्यांनीं अवलंबन केलेंच. परंतु ह्याशिवाय आणखीही एक गोष्ट त्यांस अनुकूल अशी त्यावेळीं अस्तित्वांत होती, तिचाही त्यांस योग्य फायदा मिळाला. प्राचीन आर्यधर्म, आर्यविद्या, आर्यसमाजपद्धति, आर्यनीति एकंदर सर्व आर्यसंस्कृति आधींच अगदीं गंजून गेली होती. अनेक शतकेंपर्यंत तिच्याकडे अनेक कारणांनीं लोकांचें दुर्लक्ष झाल्याकारणानें तिचें बाह्यस्वरूप जरी जाग्यावर होतें तरी तिच्यांतील जीविताच्या नाड्या आंखडत आल्या होत्या. आणि जरी तिचा पूर्ण अंत झाला नव्हता तरी तिजवर जरासी प्रेतकळा दिसूं लागल्यामुळें तिचें जीवित केवळ दुःसाध्य होय ह्मणून तिच्या स्मशानयात्रेच्या तयारीस लागण्यांतच शहाणपणा आहे असें आमच्या मनावर ठसवून देण्यास आमच्या नवीन राज्यकर्त्यांस व मुख्यतः त्यांचेच अंगभूत किंवा आश्रित पाद्रीमंडळीस फारच सोपें गेलें. दगड, माती, झाडझुडूप, ह्या निर्जीव पदार्थांस किंवा आपणच केलेल्या त्यांच्या मूर्तींस ईश्वर मानून त्यांचें देव्हारें माजविणें, एक सोडून शेंकडों नव्हे तर करोडों देवांच्या पुढें नाक घांसणें अशा प्रकारचे समज व प्रायश्चित्तादि सांप्रदाय ज्या धर्मांत आहेत त्यास केवळ रानटी हेंच नांव शोभे. मंत्रतंत्र, किमिया, भविष्यकथन इत्यादि गोष्टींची ज्या लोकांत वास्तविक विद्येच्या वर्गांत गणना होते त्यांची ती विद्या त्यांसच लखलाभ होय. रोटीबेटीव्यवहार आपआपसांत बंद झाल्यामुळें ज्यांमध्यें कोणत्याही गोष्टींत एकी होऊं शकत नाहीं, मुलांचीं लग्नें केवळ लहानपणींच नव्हत तर तीं पोटांत असतांनाही पोटास अक्षता लावून ज्या लोकांत होऊं शकतात, ज्यांमध्यें स्त्रियांस बिलकुल शिक्षण नाहीं, व विधवांस गुलामाप्रमाणें वागवितात, व ज्यांच्यामध्यें सर्वच व्यवहारांस भोळेपणानें धर्माचें स्वरूप आलेलें आहे त्यांची समाजव्यवस्था मनुष्यपणास लांच्छन आणणारी होय. घटपटादि ठरीव सिद्धांतांचा

कीस काढीत बसण्यांत आणि द्वैताद्वैताचीं शाब्दिक जाळीं विणण्यांतच ज्यांच्या विद्वत्तेची व अकलेची पूर्णता होते त्यांची ती विद्वत्ता व अकल केवळ पढतमूर्खांसच साजणारी होय. अशा तऱ्हेची एकदेशीय, व अतिशयोक्तीनें भरलेली तिरस्कारद्योतक वाणी जेव्हां आमच्या कानीं-कपाळीं सारखी आपटूं लागली व तिला सत्तेचें पाठबळ मिळालें ह्मणजे ह्या वाणीचा आदर करून तदनुसार वर्तन करणारास सरकार दरबारांत वैभव व प्रतिष्ठा प्राप्त होऊं लागली, तेव्हां आह्मीं आपल्या शोधकबुद्धीस व विचारशक्तीस साफ गुंडाळून ठेवून आमच्या राज्यकर्त्यांचें ह्मणणें अक्षरशः खरें मानूं लागलों. सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं अशी ह्मण आहे; परंतु ती सबबही आह्मांस काय होय? शहाणपण अंगीं असून जेव्हां स्तब्ध बसण्याचा प्रसंग येतो तेव्हां ह्या ह्मणीचा उपयोग रास्त आहे. परंतु आमच्या अंगीं शहाणपण वसतही नाहीं, व आह्मीं स्तब्धही बसत नाहीं. आह्मीं केवळ परप्रत्ययनेयबुद्धि बनून राज्यकर्त्यांचे ह्मणण्यास गंभीरपणें माना डोलवूं लागलों इतकेंच नव्हे तर त्यांचा जयजयकार करून त्यांच्याच शब्दाचा अनुवाद करून सर्व देशभर एकच गडबड उडवून दिली; आणि सुधारणेचें राज्यकर्त्यांनीं युरोपांतून आणलेलें निशाण जिकडेतिकडे वेळीं अवेळींही नालसाहेबाच्या स्वारीप्रमाणें फिरवूं लागलों. अलीकडे अलीकडे आह्मांस आमच्या धर्म वगैरे गोष्टींचें महत्व व रहस्य कळूं लागलें आहे अथवा आमच्या पुरातन गोष्टींत कांहीं सत्व असून त्या केवळ अगदींच फोलमोल नाहींत असें आह्मीं थोडथोडें ह्मणूं लागलों आहों हें खरें. ह्मणजे दगड, माती, मूर्ती ह्यांसच वास्तविक देव किंवा ईश्वर मानून ह्मणजे ह्या दगडमाती इत्यादिकांचेच ठायीं अमानुष वैभव वसत आहे असें समजून त्यांच्या भजनीं लागणें हा मूर्खपणा होय; परंतु बादशहा हिंदुस्थानांत नाहीं ह्मणून त्याचे ठिकाणीं त्याची तसबीर मांडून तीस बादशहाचा मानमरातब करणें जसें योग्यच आहे, त्याचप्रमाणें ईश्वर किंवा देव चर्मचक्षूस दृश्य नाहींत ह्मणून मूर्तींची त्यांचे ठिकाणीं स्थापना करून ह्मणजे मूर्ती ह्या तद्द्योतक किंवा तत्स्मारक चिन्हें आहेत असें समजून प्रत्यक्ष ईश्वर किंवा देव ह्यांचेप्रमाणें

त्यांस वागविणें हें सर्वथैव न्यायास व युक्तीस योग्य असून असें करण्यांतच मनुष्याचें हित आहे; तसेंच देव व ईश्वर ह्यांत फरक आहे; देव हे यक्ष, गंधर्व, किन्नर इत्यादिकांप्रमाणें मनुष्यापेक्षां श्रेष्ठ दर्जाचे परंतु इंद्रियातीत सृष्टीतील रहिवाशी होत; ईश्वर ह्मणजे अनाद्यनंत परमात्मा किंवा ह्या अखिल विश्वाचें आदिकारण एकच आहे; तेव्हां एकेश्वरवाद हा देवबाहुल्याशीं विसंगत नसून दोहोंचा पूर्ण मेळ आहे. राजा जरी एकच असला तरी राजसत्ताधारी अधिकारी अनेक असतात व त्यांस योग्य मान देणें योग्य आहे इतकेंच नव्हे तर तें आपलें कर्तव्य आहे, कोणत्याही अधिकाऱ्याचा अपमान करणें ह्मणजे राजद्रोहाचा गुन्हा करणें होय; त्याचप्रमाणें सर्व प्राणिमात्रांत जरी ईश्वरांश असला तरी तो देवादिकांत आपल्यापेक्षां फारच अधिक आहे, ह्मणजे ते आमच्यापेक्षां श्रेष्ठप्रतीचे अधिकारी पडल्यामुळें त्यांस, व्हाईसरायासच जसा बादशहाचा मान द्यावयाचा तसा, ईश्वराचा मान देणें मूर्खपणाचें नाहीं; मात्र ते प्रत्यक्ष ईश्वर नव्हत तर प्रसंगापुरते ईश्वर होत इत्यादि आमच्या सनातनधर्मसमजुती इंग्रजी किंवा त्याच्या पलीकडीलही शहाणपणास साजेशा आहेत. इंग्रजांचे किंवा ख्रिश्चन लोकांचे जसे आर्केंजल्स, एंजल्स इत्यादि अनेक प्रकारचे देवदूत आहेत, तशाच प्रकारचे ह्मणजे परमात्म्यापेक्षां कनिष्ठ परंतु मनुष्यापेक्षां फारच श्रेष्ठ असे आमचे इंद्रादि देव होत. आणि सेंट्पाल्, व्हर्जिन् मेरी, किंवा ख्रिस्त ह्यांचें देव्हारें जसें सुशिक्षितत्वास व सुधारणेस बट्टा आणणारें नाहीं, तशीच आमची देवपूजा पाश्चात्य विद्वत्तेस काळिमा लावणारी नाहीं. ईश्वर व देव ह्यांमधील वर निर्दिष्ट केलेला फरक लक्षांत न आल्यामुळें आणि इंग्रजी गॉड व आमचा अन्तर्यामींचा गूढ देव हे समानार्थक शब्द आहेत असा अज्ञानमूलक समज आज कैक वर्षें प्रचलित असल्यामुळें सर्व गैरसमज उत्पन्न झाला आहे. प्रायश्चित्त हा केवळ विधि आहे; तो खऱ्या अंतःपश्चात्तापाचें बाह्यस्वरूप होय; आणि जेथें वास्तविक पश्चात्ताप नाहीं त्या ठिकाणीं प्रायश्चित्त केवळ हास्यास्पद आहे. एकंदर साधारण लोकांमधील विश्वास व प्रामाणिकपणा ह्यांस कृष्णपक्षांतील चंद्राप्रमाणें

उत्तरोत्तर अधिकाधिक कृष्णत्व प्राप्त होत चालल्यामुळें पश्चात्तापाचे अभावींही, दुसऱ्यास खुष करण्याचे बुद्धीनें, लबाडीनें व अज्ञानानें केवळ प्रायश्चित्ताचा बाह्यविधिच प्रचलित झाल्यामुळें धर्माची थट्टा होऊं लागली. एरव्हीं धार्मिक प्रायश्चित्त हें सरकारी शिक्षेच्याही वरच्या पायरीचें होय. आर्यधर्माप्रमाणें आर्यविद्याही केवळ भुसाप्रमाणें सहज फुंकरानें उडून जाणारी नाहीं. मंत्रांचें भाषांतर करणें नीट नाहीं. कारण, प्रत्येक शब्दध्वनीचा विशिष्ट आकार आहे हें आतां ध्वनिशास्त्रानें सिद्ध झालें आहे. तेव्हां मंत्रांतील शब्दविशेषांनीं जें कार्य व्हावयाचें तें त्यांच्या भाषांतरानें ह्मणजे अन्य शब्दांनीं होणें अशक्य आहे. मंत्रांप्रमाणेंच किमिया ह्मणजे हलक्या धातूंपासून कांहीं वनस्पतींच्या रासायनिक क्रियांनीं सोनें किंवा रुपें करण्याची विद्या झूट किंवा थोतांड होय असें जरी केवळ आमच्या राज्यकर्त्यांच्या सतत टकळीवरून, स्वानुभवावरून नव्हे, आह्मींही ह्मणूं लागलों तरी आतां गरीब धातूंपासून श्रीमंत धातु तयार करणें ह्मणजे किमिया करणें हें केवळ अशक्य, थोतांड, इंद्रजाल, गारुड किंवा हातचलाखी नसून रसायनशास्त्राच्या मर्यादेंतील शक्य कृत्य आहे असें आतां पाश्चात्य लोकही ह्मणूं लागले आहेत, इतकेंच नव्हे, तर एकादोघांनीं हें आमचें गारुड खरें करून दाखविलें आहे असें एक दोन वर्षांपूर्वीं आमच्या वाचनांत आल्याचें आह्मांस स्मरतें. भविष्य-कथनासंबंधानेंही लोकांचा उलट ग्रह पालटत चालला आहे. ह्यासंबंधानें एक गोष्ट विशेष लक्षांत ठेविली पाहिजे, ती ही कीं, कोणत्याही विद्येंत प्राविण्य संपादन करून आपणांस तज्ज्ञ ह्मणविणारे लोक व ती विद्या ह्या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. ह्या तज्ज्ञ ह्मणविणाऱ्या लोकांमध्यें खरें नाणें व खोटें नाणें असें असण्याचा फार संभव आहे. आणि इंग्रजीच्या पूर्वींचा काळ बहुतेक तमोमयच पडल्यामुळें शुद्ध सत्व विरळ होत चाललें होतें. ह्यामुळें नसत्या विद्वत्तेचें चर्म परिधान करून बहुजनसमाजाचे अंध विश्वासावर व्यापार करणाऱ्या पोटभरू धूर्त कोल्ह्यांचा जिकडे तिकडे सुळसुळाट झाला होता. तेणेंकरून जेव्हां त्यांचें कृष्णस्वरूप लोकांच्या प्रत्ययास येऊं लागलें तेव्हां त्यांजबरोबर

त्यांच्या विद्येचेंही बदनाम होऊन त्यांस व त्यांच्या विद्येस कोणी विचारीनासें झालें. असें होणें पृथक् जनांचे दृष्टीनें अगदीं साहजिक आहे; परंतु सुशिक्षितत्वास हें केवळ लांच्छनास्पदच होय. यूरोपांत व अमेरिकेंत हल्लीं मानसशास्त्र व वशीकरणकला व अध्यात्मविद्या ह्यांचे जे प्रयोग व शोध चालले आहेत, त्यांवरून किमियेप्रमाणेंच काल व स्थल ह्यांसंबंधाची दूरदृष्टि अलीकडे संभवनीय व विश्वसनीय वाटूं लागली आहे. तसेंच आमचा वाजवीपेक्षां फाजील झालेला जातिभेद जरी केवळ अंध-परंपरागत खुळ होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तरी त्यास आधारभूत असणारा वर्णाश्रमभेद हा केवळ धार्मिक दृष्ट्याच नव्हे तर सामाजिक व राजकीय दृष्ट्याही महत्वाचा व अवश्य आहे व अशा प्रकारचा भेद सर्व देशांत सतत वास करीत आहे व ख्रिश्चन लोकांत असा भेद नाहीं असें जरी स्थूलदृष्टीस वाटलें तरी सूक्ष्मनिरीक्षणांतीं तसा भेद त्यांच्यांतही दिसल्यावांचून रहाणार नाहीं. इतर सामाजिक चालींचीही स्थिति अशीच आहे. ह्मणजे ह्या आपल्या सर्वसाधारण अवनतीचेवेळीं त्या चालीरीतींचा मूळ उद्देश ह्मणजे अंतरात्मा आमच्या दृष्टिमांद्यामुळें अदृश्य झाल्यानें त्या हास्यास्पद झाल्या आहेत; परंतु वास्तविक त्या अद्यापि सजीव असून योग्य उपचार केल्यानें त्या सतेजही दिसूं लागतील असें आतां हळू हळू लोकांस वाटूं लागलें आहे. त्याचप्रमाणें आमचा न्याय, आमचा वेदांत, आमचा योग ह्यांविषयींची पूर्वींची तिरस्कारबुद्धि हळू हळू नाहींशी होत असून तिचे जागीं आदरबुद्धि उत्पन्न होत चालली आहे. ‘ हें सर्व जर तुह्मीं आपण होऊनच कबूल करीत आहां, तर मग प्रचलित शिक्षणाचे नांवानें तुह्मीं कां खडे फोडितां तें आह्मांस समजत नाहीं. जर आमचा धर्म, आमच्या विद्या, आमची समाज-पद्धति, आमचीं शास्त्रें ह्याविषयींचा आमच्या राज्यकर्त्यांनीं केलेला आमचा गैरसमज अर्वाचीन शिक्षणद्वारा लोप पावत असून त्यांचें शुद्ध स्वरूप आमच्या नजरेस पडूं लागलें आहे, तर ज्या साधनानें ही इष्ट क्रांति घडून येत आहे, त्यास तुह्मीं व्यर्थ नांवें ठेवावीं हें कोणत्याही न्यायास संमत होणार नाहीं. ’ ह्या शंकेचें उत्तर उघडच आहे कीं,

पूर्वीं जेव्हां आह्मीं आपल्या धर्मादिकांस पोरकट व वेडगळ ह्मणूं लागलों तेव्हां त्यांचा नीट विचार न करितां केवळ सत्तेनें शहाणपदाप्रत पावलेल्या आमच्या राज्यकर्त्यांचें ह्मणणें डोळे मिटून आह्मीं प्रमाण धरून चाललों; आणि आतां जरी आमचा तद्विषयक ग्रह बदलत चालला आहे, तरी आमच्या विचारांत होणारी ही क्रांति अर्वाचीन शिक्षणाचे मदतीनें आमची आह्मींच घडवून आणीत नाहीं. ह्यामुळें जरी ती इष्ट योग्य व अवश्य असली तरी तिचें श्रेय आह्मांस किंवा आमच्या शिक्षणास तिळभरही मिळावयाचें नाहीं. ‘ सत्यमेव जयते ’ व कार्लाइल ह्मणतो त्याप्रमाणें कोणत्याही गोष्टीचें दीर्घायुष्य हें वास्तविक ह्मटलें असतां तिच्या जोमाचें, सत्वाचें, व सत्यत्वाचें एक बळकट प्रमाण होय. ह्या न्यायानेंच पाहिलें तरी आमच्या आर्यधर्माइतका प्राचीन धर्म ह्या जगावर कोणताच नाहीं आणि ज्याअर्थीं तो हजारों शतकें तार्किक, नैय्यायिक, लोकायतिक इत्यादि आस्तिकनास्तिकांच्या वादशस्त्रास्त्रांपुढें न डगमगतां डोकें वर करूनच आहे, त्याअर्थीं त्यास, निर्मल सत्य, न्यायशुद्ध युक्ति, आणि निःसंदेह प्रत्यक्ष व परोक्ष अनुभव ह्यांचें भक्कम पाठबळ असलें पाहिजे; आमचीं श्रुतिस्मृतिपुराणें हीं आमच्या पूर्वजांच्या सर्वतोमुखी श्रेष्ठपणाची उत्तम साक्ष पटवीत असून त्यांनीं आह्मांस ठेविलेल्या या इस्टेटीचें योग्य मोल ठरविणें कठिण आहे; तसेंच आमची सामाजिक पद्धति व विशेषतः वर्णाश्रमधर्म अनुमेय असून त्यायोगेंच आमची उन्नति अनेक वेळ झालेली आहे व पुढेंही झाल्यावांचून रहाणार नाहीं. तिच्यायोगें पाश्चिमात्य राष्ट्रांवर ओढवणारीं सामाजिक संकटें—ह्या ठिकाणीं प्रसिद्ध विदुषी मिसेस आनी बिझांटबाई हिच्या शब्दांची आठवण होते. ती एकदां आपल्या भाषणांत ह्मणाली कीं *पाश्चात्य राष्ट्रांच्या पायांखालीं सामाजिक ज्वालामुखी गुप्तपणें जळत असून तो तडाडदिशीं कधीं प्रकट

---

* The western nations are treading upon a social volcano, which may burst at any moment.

होईल ह्याचा नेम नाहीं—पाश्चात्य राष्ट्रांस अस्वस्थ करणारे हे सामाजिक अनर्थ हिंदुस्थानांत ओढवण्याचा संभव आमच्या अप्रतिम सामाजिक पद्धतीनें सर्वस्वी नष्ट झाला आहे तेव्हां, त्या पद्धतीस खो देण्याचा विचार करणें ह्मणजे ' स्रजमपि शिरस्यंधः क्षिप्तां धुनोत्यहि शंकया ' या कालिदासोक्तीप्रमाणें केवळ अंधपणाचा स्वीकार करण्यास तयार होणें होय. तसेंच आमच्या विद्या व कला निदान जतन करून ठेवण्याच्या योग्यतेच्या तरी आहेत. आणि आमचें योगशास्त्र व आमचा वेदान्त केवळ आह्मांसच नव्हे तर सर्व जगास भूषणावह आहे; मात्र त्यांचें रहस्य व सत्य स्वानुभवावांचून कळणें अशक्य आहे. अशा प्रकारची जी भाषा आह्मीं अलीकडे वापरूं लागलों आहों ती तरी आर्यधर्मादिकांचें परीक्षण करून आह्मीं वापरीत आहों काय? नाहीं. पूर्वीं जसे आह्मीं दुसऱ्याचे तंत्रानेंच स्वतःविरुद्ध उठलों होतों, तसचे आतां दुसऱ्यांचेच सांगण्यावरून स्वतःचे मित्र बनत आहों. आर्यधर्मादिकांचा परिचय त्यांस दूषण देण्यापूर्वीं आह्मीं कधीं केला होता? आणि आतां त्यांचे गोडवे गाण्यास लागण्यापूर्वीं तरी आह्मीं त्यांचा कितीसा व्यासंग चालविला आहे? भट्ट मोक्षमुल्लर व मिसेस आनीबिझांट ह्यांच्यासारख्या खऱ्या विद्याव्यासंगी व सत्यशोधक माणसांनीं आर्यग्रंथांचा व आर्यसंस्थांचा जो स्तुतिपाठ सुरूं केला आहे तो आमच्या विचारक्रांतीचें व अलीकडे अलीकडे आमच्यांत सुरूं होऊन बहुतेक शिष्टसंप्रदायांत प्रचलित झालेल्या स्वाभिमानद्योतक भाषेचें खरें कारण होय हें मोठ्या दुःखानें कबूल केलें पाहिजे. 'दुःखानें' ह्मणण्याचें कारण असें कीं, अशी भाषा ही केवळ एक शिष्टसांप्रदाय झाली आहे; ह्मणजे तीस जवळ जवळ दांभिक ह्मणण्यासच हरकत नाहीं. ती भाषा हृदयापासून न निघतां केवळ ओंठापासूनच निघते ह्यामुळें तिच्याअनुरूप आचारास वळण लागत असलेलें लेशमात्रही दृष्टीस पडत नाहीं. परंतु हें दुःखाचें कारण जरी फारच महत्वाचें आहे तरी तें शिक्षणदृष्टीनें थोडेंसें अप्रकृत होय. दुसरें कारण असें कीं, आर्यधर्मादिकांचें महत्व प्रदर्शित करणारी वरील भाषा आमची नव्हे; ती आमच्या

विचारांपासून निघालेली नाहीं; ती केवळ पूर्वींच्या निंदात्मक भाषेप्रमाणेंच पाश्चात्यांच्याच भाषेचा अनुवाद होय; ह्मणजे पूर्वीं ज्याप्रमाणें आह्मीं मूर्खपणें त्यांची री ओढीत होतों त्याचप्रमाणें आतांही तितक्याच विचारशून्यपणें ते जें बोलतात तें बोलूं लागलों आहों. आणि जरी अलीकडील भाषणांत पूर्वींपेक्षां अधिक सत्य भरलेलें आहे तरी धनलोभ्याप्रमाणें खर्चास भिऊन विचारशक्तीचा कवडीभरही उपयोग न करितां आह्मीं केवळ पोपटाप्रमाणें धन्यानें बोललेलें बोलणारे पडल्यामुळें आह्मांस बालिश, दुधखुळे, अंध, दुसऱ्याचे ओंजळीनें पाणी पिणारे, विचारशून्य, परप्रत्ययनेयबुद्धि, मूढ ह्याच अर्थाच्या पदव्या साजण्यासारख्या आहेत; आणि ह्मणूनच आमच्या सुशिक्षितत्वाच्या खरेपणाची शंका निर्विवाद आहे असें ह्मणण्यास काय हरकत आहे?

आमच्या सुशिक्षितत्वाविषयींच्या प्रस्तुत शंकेचें आणखी एक महत्वाचें कारण आहे. तें ऐकून त्याचें जर आपण शांतपणें व लक्षपूर्वक मनन कराल तर त्याचें रहस्य व महत्व आपल्या ध्यानांत आल्यावांचून रहाणार नाहीं. सामाजिक, नैतिक, राजकीय, औद्योगिक, वैज्ञानिक, धार्मिक वगैरे गोष्टींसंबंधानें आज जी शोचनीय स्थिति दृष्टीस पडत आहे, आणि जी दूर व्हावी अशी आह्मां सर्वांची इच्छा असून ती तृप्त होण्यासाठीं आह्मी बहुतेक बडबड करूनच स्वस्थ बसत आहों; आणि ‘क्रियेवीण वाचालता व्यर्थ आहे’ ह्या न्यायानें बडबडीचें फळ शून्य येत आहे आणि ह्मणूनच जी शोचनीय स्थिति तशीच आणखी पुढें चालू होण्याचा बराच रंग दिसत आहे. ती शोचनीय स्थिति तरी अशीच स्थिर कां व्हावी हेंही त्या कारणानें स्पष्ट होईल. ह्या जगांत आपल्या हातून कोणतें कार्य होण्यासारखें आहे तें मोठ्या कळकळीनें विचारपूर्वक ठरवून त्या कार्यास आपलें तनुमनधन—आपलें ह्या जगांतील सर्वस्व-अर्पण करण्यास तयार होणें हें सुशिक्षितत्वाचें उत्तम लक्षण नाहीं असें कोण ह्मणेल? परंतु पदवी मिळाली ह्मणजे शिक्षण संपलें, असें समजून स्वतःचे व कुटुंबाचे पोषणासाठीं व चैनी-

साठीं द्रव्यार्जनाचे धोपटमार्ग चोखाळीत, व देशाभिमान, आणि सार्वजनिक व राष्ट्रीय हित ह्यांच्या हातहातच नव्हे तर मैलच मैल लांब तासतास शुष्क गप्पा मारीत बसणारे व मोठ्या दिमाखानें आपणास सुशिक्षित ह्मणविणारे हरीचे लाल आमच्यामध्यें आजकाल कवडीमोलाइतके स्वस्त झाले आहेत असें मोठ्या दुःखानें कबूल करणें भाग आहे. एकंदर मनुष्याजीविताच्या अंतिम उद्देशाचा गहन प्रश्न सोडवून तदर्थच सर्वस्व खर्चीं घालून आपल्या जीविताचें साफल्य करणें एकीकडेच राहिलें. परंतु निदान स्वतःपुरता तरी ह्या प्रश्नाचा अत्यंत गंभीरपणें विचार करणारे लोक आमच्यामध्यें हाताच्या बोटांइतके तरी निघतील कीं नाहीं ह्याचा वानवाच आहे. मला वाटतें खऱ्या कवींची गणना करितांना कालिदासाला कनिष्ठिकाधिष्ठित केल्यानंतर दुसरा कोणी नांव घेण्यासारखा कवि त्या पदवीस योग्य असा सांपडेना ह्मणून ' अनामिका सार्थवती बभूव ' असा उद्वेगजनक उद्गार काढण्याचा जसा पूर्वीं कोणासंसा प्रसंग आला होता तसा जरी प्रस्तुत काळीं मजवर प्रसंग येता ह्मणजे वरील प्रश्न स्वतः पुरताच सोडवून एकदां आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता ठरवून तदर्थ तनुमनधन अर्पण करणारा कालिदासकवीप्रमाणें निःसंशय एक जरी महात्मा मला मिळाला असता तरी मी आपणास धन्य समजलों असतों. आणि आहेत त्यांच्यांत उत्तम असे जरी एक दोन असामी दृष्टीस पडले तरी आपल्या सध्याचे दृष्टीनें नामधारी सुशिक्षित वर्गामध्यें निवड करण्यास लागणें ह्मणजे ' उडदांमाजी काळे गोरे ' निवडण्याचा प्रयत्न करण्यासारखेंच आहे असें मला वाटतें. आज काल मंडळीचा सर्व उद्देश कायतो द्रव्यार्जन व तद्वारा विषयोपभोग किंवा शरीरसुख हा होय. केवळ द्रव्यासाठींच द्रव्यार्जन करण्याचा अगदीं कनिष्ठ उद्देश कोणाचा फारसा नाहीं. ह्मणजे ' कवडी कवडी माया जोडी ' अशा रीतीनें संचय करून त्याचा मुद्दलींच कोणत्याही कामीं खर्च न करितां केवळ सर्व धन पुरून ठेवणारें आत्मघातकी कृपणत्व हा सध्याचा दोष नव्हे हें मी प्रांजलपणें कबूल करितों. खर्चासंबंधाचा जर हल्लींच्या काळचा दोष आपणास पहावयाचा असेल तर तो कृपणपणा हा नव्हे, तर त्याचा

उलट भाऊ उधळेपणा होय. ह्मणजे कृपणाचा धनलोभीपणा आमच्यांत उरला नाहीं; तरी पण मितव्यय जाऊन गुलजारगुलछ्रंशाचा धनलोभीपणा आमच्यांत निःसंशय भरला आहे. एवंच कृपणाप्रमाणेंच द्रव्य आमचें इष्ट दैवत बनून आह्मीं सर्व कायावाचामनें त्याच्या भजनीं लागलों आहों. ह्या दोषाबद्दल आह्मीं स्वतः फारसे जबाबदार कदाचित् नसूं. कारण कीं हिंदु लोकांचा अथवा आर्यसंस्कृतीचा प्रसिद्ध कल भोगाकडे नसून त्यागाकडे आहे. तेव्हां औद्योगिक सुधारणेच्या अत्युच्च शिखरावर आरोहण करून जड दृश्य सृष्टीपलीकडे कांहीं नाहीं असें समजून विषयोपभोगांतच गुंगून गेल्यामुळें ज्यांस नफ्यातोट्याशिवाय विद्या, नीति व धर्म ह्यांतही दुसरें कांहीं एक दिसत नाहीं, त्यांच्या दयाळू राजछत्राखालीं आह्मांस जें शिक्षण व जें निर्जीव स्वास्थ्य प्राप्त होत आहे त्याचा हा सर्व दोष होय हें बहुतांशीं खरें आहे. परंतु अशा रीतीनें आपल्यावरील दोषाचें निराकरण करण्यांत आपण आपली सुशिक्षित ही पदवी गमावून बसतों हें उघड आहे. हा दोष इंग्लंडांत अठराव्या शतकांत विशेष दृष्टीस पडत होता. त्याचें कार्लाइलनें आपल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं मोठें मार्मिक व सुंदर वर्णन केलें आहे. तथापि हल्लींच्या काळींही हा दोष युरोप व अमेरिकेंत कसा खिळून राहिला आहे हें ' ईस्ट अँड वेस्ट ' मध्यें नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या एका लेखावरून आपल्या चांगलेंच लक्षांत येईल. हा लेख आपणास अगदींच अपरिचित नसलेल्या अमेरिकन प्रोफेसर ल्याड ह्यांनीं लिहिलेला आहे; ह्मणून कबूलजबाब ह्या नात्यानें त्याचा माझ्या ह्मणण्यास बळकट पुरावा मिळत आहे. द्रव्यार्जन करून विषयोपभोगांत काळ घालविणें व देशहित, सुधारणा इत्यादि ठरींव सार्वजनिक विषयांवर भाषणांतून व लेखांतून ठरींव लांबच लांब गप्पा मारून व त्या कामीं मात्र अति बेतावातानें खर्च करून साधल्यास थोडासा नांवलौकिक संपादन करणें ही आह्मां सुशिक्षित ह्मणविणाऱ्या लोकांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता झाली आहे. ह्याच्या पलीकडे मजल मारण्याचें नांव काढण्यास नको; परंतु येथपर्यंतही येऊन पोंचणारी मंडळी थोडीच. स्वतःच्या पलीकडे ज्यांची दृष्टि

केवळ बोलण्यांत आणि फारच झालें तर लिहिण्यांत जात आहे अशीच मंडळी फार. नाहींतर देशहितास थोडासा आरंभ करण्यापूर्वीं दोन लाख पुरे होण्याची वाट पहाणार; तसेंच सरकारी नोकरींत स्वतः चे नांवानें व्याजबट्टा करितां येत नाहीं ह्मणून व्याजबट्ट्याचे द्वारें दामदुप्पट व्हावी ह्या उद्देशानें अशा अडचणींतूनही सुटून जाण्याची क्लृप्ति काढण्यांत आपलें कायद्याचें ज्ञान खर्च करणार, आणि सार्वजनिक संस्थांस कांहीं हजारांची देणगी देण्याचे वचनानेंच आपल्या हयातींत वर्तमानपत्रांमध्यें आपले स्तुतिपाठ गाइलेले ऐकण्यास तयार असणार आणि देऊं केलेल्या रकमेची व्याजानें दामदुप्पट झाल्यानंतर फार तर ती रकम देणारे आणि संतान नसतांही मेल्यानंतर आपल्या मृत्युपत्रानें समाजास निराश करून सोडणारे कवडीचुंबक अस्सल मारवाडी खप्पी सुशिक्षित ह्मणविणाऱ्या लोकांच्या अग्रभागीं विराजमान झाले नसते हें एक आणि अशी मंडळी अग्रभागीं चमकूं लागलेली पाहून सहनशीलतेनें स्वस्थ बसणारे सुशिक्षित अनुयायीही दृष्टीस पडले नसते. एवंच अशा प्रकारच्या गोष्टी त्या अध्वर्यूंस व सर्व सुशिक्षित वर्गास सारख्याच लाजिरवाण्या आहेत. जन्मानें ब्राह्मणत्व प्राप्त होत नसून सुशिक्षणानें होतें असें प्रतिपादन करणारे आज बरेच लोक आहेत. आणि स्नानसंध्या, सोंवळेंओंवळें, श्राद्ध, वेदोक्त श्रावणी वगैरे गोष्टींतही कांहीं अर्थ नाहीं असें ह्मणून त्यांस फांटा देणारे ब्राह्मण व त्या कर्मांचा स्वीकार करण्यांत हर्ष व अभिमान बाळगणारे ब्राह्मणेतर सुशिक्षित आजकाल पुष्कळ आहेत. तेव्हां जन्मतः ब्राह्मणत्व व वेदोक्त कर्मांचा अधिकार हे विषय जरी बाजूस ठेविले ह्मणजे ब्राह्मणकुळांत जन्मलेले तेवढेच ब्राह्मण आणि वेदोक्त कर्मांचा अधिकार फक्त ब्राह्मणांसच आहे हीं विधानें वादग्रस्त ह्मणून जरी सोडून दिलीं आणि ब्राह्मण तेवढेच सुशिक्षित असें न ह्मणतां सुशिक्षितच ब्राह्मण असें जरी ह्मटलें तरी आजकाल खऱ्या ब्राह्मणांची संख्या नष्टप्रायच झाली आहे असें ह्मणावें लागतें. रहाणें साधें व विचार मोठे किंवा गरीब रहाणी व श्रीमंत विचार अशी स्थिति रंगेल पाश्चात्यांसही

निदान कल्पनाप्रिय तरी आहेच. आणि वास्तविक हीच स्थिति खऱ्या ब्राह्मणांची होती व असावयास पाहिजे—मग तुमचे ब्राह्मण जन्मानें झालेले असोत किंवा सुशिक्षणानें झालेले असोत; परंतु अलीकडील ब्राह्मणकुळांत जन्मलेल्या ब्राह्मणांकडे पहा किंवा आह्मी सुशिक्षित झालों आहों असें ह्मणून दिखाऊ ब्राह्मणत्व उपटणाऱ्यांकडे पहा, वरच्या अगदीं उलट—ह्मणजे राहणें मोठें व विचार कोते, किंवा श्रीमंत राहणी व गरीब विचार—असा प्रकार दृष्टीस पडतो. ही व्यक्तिदृष्ट्या किंवा राष्ट्रीयदृष्ट्या अत्यंत शोचनीय स्थिति नाहीं असें कोण ह्मणेल? सुशिक्षितांची राहणी दिवसेंदिवस श्रीमंती थाटाची होत चालली आहे हें सिद्ध करण्यास फार लांब जाण्यास नको. प्रथम मी आपणांस जें आपल्या सुशिक्षितत्वाच्या बहिरंगाचें वर्णन केलें आहे तें लक्ष्यपूर्वक ध्यानांत आणिलें ह्मणजे प्रस्तुत विधानाची सत्यता तेव्हांच कळून येईल. परंतु ह्या क्रांतीस आमचा काय उपाय? राज्यक्रांतीमुळें जर सरकारदरबारांतच श्रीमंती पोषाखाची जरूर लागूं लागली व त्यामुळें तो आमच्या अंगावर दिसूं लागला तर त्यांत आमचा काय दोष? असें जर कोणी स्वमंडनार्थ प्रतिपादन करूं लागला तर तें केवळ ढोंगीपणाचें होय. कारण कीं असें जर वास्तविक असतें तरही श्रीमंती प्रसंगापुरतीच दृष्टीस पडली असती; तिची सतत अवश्यकता कोणासच भासली नसती. परंतु अर्वाचीन सुशिक्षण व श्रीमंती बाह्यांग ह्यांची न्यायाचे भाषेनें केवळ अन्वयव्याप्तिच नाहीं तर त्यांमध्यें व्यतिरेक-व्याप्तिही आहे असा आमचा दृढ समज होत चालला आहे. ह्मणजे सुशिक्षण असलें ह्मणजे श्रीमंती बाह्यांग, निदान आच्छादित शरीर, असतें इतकेंच नव्हे, तर आच्छादित शरीर नसलें तर सुशिक्षणही नाहीं, अर्थात् सुशिक्षण हें आच्छादित शरीराचे मानानें असतें असा नवीन ग्रह आमच्यांत शिरत आहे हें निर्विवाद आहे. एरव्हीं बूट, पाटलोण व त्यांमधून उठतां बसतांना चमकणारे रंगीबेरंगी स्टाकिंग्स् किंवा साक्स कालेजांतील विद्यार्थिवर्गांत अधिक प्रमाणानें दिसूं लागले, हें पाहून सुशिक्षण व सुधारणा ह्यांची प्रगति होत आहे ह्या विचारानें

कोणासच अभिनंदनपूर्वक आनंदाचें भरतें आलें नसतें. ( डेक्कन कॉलेज त्रैमासिकाचे एक दोन वर्षांचे मागले अंक चाळून पहा. ) कपड्यांचा विषय फारसा महत्वाचा आहे असें नाहीं; तथापि आह्मींच त्यास इतकें महत्व दिलें आहे कीं व्यासवाल्मीक्यादि किंवा शंकराचार्यादि पूर्वीचे महर्षी, विद्वच्छिरोमणि आज जर एका लंगोटीनिशीं आमच्यापुढें प्रत्यक्ष उभे राहिले तर वास्तविक जरी आजच्या सुशिक्षिताग्रणींसही त्यांच्या पायपोसाची योग्यता नाहीं तरी त्यांस आजचे सुशिक्षित रानटी समजून त्यांस आपल्या पायपोसापाशींही उभे राहूं देणार नाहींत. सुशिक्षण व सुधारणा ह्यांबद्दल अर्वाचीन कल्पनाच कांहीं अशी विचित्र झाली आहे. कीं; अनाच्छादित शरीर हें रानटीपणाचें द्योतक मानिलें जात आहे. मग ह्या अर्वाचीन सुशिक्षणानें शरीरांत असें काय उत्पन्न होतें कोणास ठाऊक कीं ज्याच्यायोगानें शरीराचे एकजात सर्व भाग, पंजे व तोंडसुद्धां ( मुसलमानांस बुरख्याबद्दल हसणाऱ्या युरोपिअन लोकांच्याही मडमांत अलीकडे निरनिराळ्या प्रकारच्या जाळ्यांनीं तोंड झांकण्याचा शिष्टसांप्रदाय वाढत चालला आहे व कपाळास कुंकूं लावणें ह्मणजे अंगास रंग लावणें रानटीपणाचें ह्मणून रोज नाटकांतल्या स्त्रीपार्टाप्रमाणें सर्व चेहरा रंगविण्यांत, कुंकवाच्या लहानशा महिनेच्या महिने पुरणाऱ्या डबीचे ऐवजीं निरनिराळ्या रंगाचे डबेच्या डबे खलास होत आहेत!!! ) लपविण्याची मनुष्यांस अवश्यकता भासूं लागावी. बरें, अलीकडील राहणीपैकीं ही एक कपड्यांची गोष्ट राहूंद्या. रोज दोन तीन वेळ चहा पिण्याची तर सरकारदरबारांत अवश्यकता नाहीं. असें असतां चहाचा प्रवेश सुशीक्षितांचे द्वारें गरबिांचे झोंपडींतही झाला आहे हें सुशिक्षितांस भूषणावह आहे असें कोण ह्मणणार नाहीं! एकंदरींत आह्मांमध्यें पाश्चात्यांचे उदाहरणानें रोजचे शिष्टसांप्रदाय वाढत असून चैनीच्या गोष्टी आवश्यक होत चालल्यामुळें जीवनार्थकलह दिवसेंदिवस कठिण होत आहे असें ह्मणून सुस्कारा टाकीत आह्मीं त्या संप्रदायाच्या जाळ्यांत सांपडून कसे अधिकाधिक जखडले जात आहों तें आमचें आह्मांसच ह्मणण्यापेक्षां

कोणास टाऊक असेंच ह्मणावें हें बरें. जीविनकलह कठिणतर होत आहे असें जाणत असतांही संप्रदायाच्या दोऱ्या आपणांभोवतीं अधिक ताणून तो कलह असह्यतर करून घेण्याची अवदसा आह्मांस कशी रुचली आहे कोण जाणे! ह्या पढतमूर्खपणास अर्वाचीन सुशिक्षितत्व हेंच नांव साजण्यासारखें आहे नांत संशय नाहीं. सारांश आह्मां सुशिक्षित ह्मणविणाऱ्या मंडळीची राहणी साधी व विचार मोठे असण्याचे ऐवजीं राहणी मोठी व विचार कोते किंवा खोटे होत आहेत आणि हें मनुष्यत्वास कमीपणा आणणारें 'लक्ष्मीपूजन' व ही पशूस शोभणारी शरीरोपभोगाची अनावर हाव ह्यांतच आपल्या आयुष्याचें सार्थक आहे असा समज 'पूरजळीं केवळ स्नेहबिंदु' प्रमाणें प्रसृत होत असल्यामुळें आमचें नांव मोठें व दर्शन खोटें असें ह्मणण्यास काय हरकत आहे?

आमच्या खोट्या दर्शनाचीं आणखीही कांहीं कारणें दाखवितां येतील. तथापि स्वपरीक्षेविषयींची पराङ्मुखता, परप्रत्ययनेयबुद्धित्व, आणि जीविताच्या इतिकर्तव्यतेचा प्रश्न स्वतःपुरताही सोडविण्याचें असामर्थ्य व तो सुटला तरी ठरविलेल्या कर्तव्यतेच्या ठायींचें औदासिन्य हीं मुख्य कारणें आमच्या सुशिक्षितत्वाचे शंकेचें पूर्ण समर्थन करण्यास पुरून उरेशीं आहेत असें मला वाटतें. तेव्हां आणखी पुरावा आणण्याची जरूर नाहीं?'

सुशिक्षणाच्या प्रश्नासंबंधानें वरील विचार आणि विशेषेंकरून अर्वाचीन पाश्चात्य शिक्षणाची वरील कुतरओढ पाहून आह्मीं तर अगदीं थक्क होऊन गेलों. आणि विचारांतीं तद्विरुद्ध कांहीं बोलण्यासारखें आहे असें जरी वाटलें तरी तें सध्या राखून ठेवून, सुधारणेच्या प्रश्नावरील आमच्या मित्रांचीं अशींच कांहीं विलक्षण तरी विचार व युक्तिवाद ह्यांस बरींच धरून असलेलीं मतें ऐकून घेऊन मग काय तें बोलणें बरें असा निश्चय करून आह्मीं आपल्या मित्रास ह्मटलें. सुशिक्षण व सुधारणा ह्यांचा अगदीं निकटसंबंध आहे. तेव्हां सुशिक्षणानंतर सुधा-

रणेविषयीं आपलें काय मत आहे तें ऐकण्याची आमची इच्छा आहे. तसेंच आयुष्याच्या मुख्य कर्तव्याचा प्रश्न स्वतःपुरता जरी कोणी सोडविला तरी त्या कर्तव्याचे ठायींचें औदासिन्य जें आमचेमध्यें दृष्टीस पडतें असें तुह्मीं ह्मणतां त्याचीही नीट फोड आपण केली नाहीं तीही व्हावी. ह्मणजे त्यायोगें सुधारणाभक्तांस जरी विशेष फायदा झाला नाहीं तरी त्यांचें घटकाभर मनरंजन होऊन वाटल्यास ते त्याचा थोडासा विचारही करितील.

'सुधारणा ह्या शब्दानें सामान्यतः अलीकडे सामाजिक सुधारणा समजली जाते; आणि सुधारक ह्मटला ह्मणजे धर्म व विशेषतः सामाजिक रीतिभाति ह्यांस पाश्चात्य नमुन्याप्रमाणें वळण लावूं इच्छिणारा गृहस्थ असाच बहुतेक अर्थ समजला जातो; तेव्हां प्रथम त्याच सुधारणांचा विचार करूं. सुधारकांच्या मतें हिंदुधर्मामध्यें ईश्वरबाहुल्य किंवा अनेकेश्वरता हा मोठा दोष असून मूर्तिपूजा हा निव्वळ वेडेपणा आहे. परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणें ईश्वर व देव ह्यांजमध्यें फरक असून देवबाहुल्य एकेश्वरवादाशीं पूर्ण संमत आहे हें आपल्या ध्यानांत आलेंच असेल. तसेंच मूर्तीस प्रत्यक्ष देव किंवा ईश्वर मानून त्यांचें देव्हारें माजविणें हें जरी वेडगळपणाचें लक्षण असलें तरी देव किंवा ईश्वर ह्याचें चिन्ह ह्मणून जर कांशाच्या अंबिकेची पूजा केली तर तुकाराम ह्मणतो त्याप्रमाणें पूजा वास्तविक अंबिकेस पोंचून कांशाची मूर्ति कांसेंच रहातें; अथवा ह्यांहीपेक्षां उत्तम उदाहरण पार्थिवपूजेचें होय. मातीचें रोज नवीन लिंग करून त्याची शिवाचे जागीं स्थापना करून पूजा संपल्यानंतर तें लिंग पुन्हा बाहेर फेंकून देण्याचा ज्या लोकांत प्रघात आहे त्यांस वरील निंद्य अर्थानें मूर्तिपूजक कसें ह्मणतां येईल हें सर्व पूर्वी केलेल्या विवेचनावरून उघडच आहे. तथापि ज्यांस अशा तऱ्हेचीही मूर्तिपूजा नको असेल, ज्यांना आपण मूर्तिपूजेच्या वरच्या दरजाचे असल्यामुळें आपणांस मूर्तिपूजेची अवश्यकता नाहीं असें वाटत असेल—मात्र हें वास्तविक असलें पाहिजे -- त्यांनीं तिचा स्वतः

त्याग करून मानसपूजा, ध्यान, धारणा, समाधि वगैरे उच्च आराधनेस लागावें. परंतु आह्मीं फर्डे कारकून झालों ह्मणून तीन अक्षरीं ढोबळ कित्ता गिरवणीचा जसा उपहास करण्याचा आह्मांस अधिकार नाहीं, किंवा तसा उपहास करणें स्वतःसच कमीपणा आणणारें आहे, त्याचप्रमाणें ह्या धर्मसुधारकांची जरी समाधिपर्यंत मजल गेली असली, तरी त्यांना मूर्तिपूजेचा उपहास करण्याचा अधिकार नाहीं इतकेंच नव्हे तर तसें करणें त्यांस शोभतही नाहीं. पूर्वीच्या समाधिपारंगत व ब्रह्मनिष्ठ ऋषिवर्यांनीं किंवा आचार्यांनींसुद्धां तसें केल्याचें कोठेंच दिसत नाहीं, अर्थात् मूर्तिपूजेच्या पलीकडे कांहीं नाहीं, असें जर ह्मणूं लागला तर त्याचा गैरसमज करण्यासाठीं त्याची कानउघाडणी करणें जरूर आहे. परंतु हें शिक्षण होय; उपहास नव्हे. तेव्हां मूर्तिपूजा ज्यांस पसंत नाहीं त्यांची वास्तविक योग्यता वरच्या प्रतीची आहे असें जरी गृहीत घेऊन चाललें, तरी त्यास तत्त्यागार्थ व एकेश्वरभक्तीसाठीं किंवा ह्याहीपलीकडील निर्गुण निराकाराचे उपासनेसाठीं स्वधर्मत्याग करून पाद्रीधर्म स्वीकारण्याची जरूर नाहीं. अर्वाचीन समाजस्थापकांचा पाद्रीधर्माकडे कल होता इतकेंच नव्हे, तर ते अन्तर्यामीं किरिस्तान बनले होते, परंतु उघडपणें बाप्तिस्मा घेतल्यानें आपला हिंदुस्थानांतील लोकांवरील पगडा नाहींसा होईल ह्या भीतीनें, हिंदु आचारांस फांटा देऊन त्यांनीं समाजस्थापनेचा मार्ग स्वीकारिला—जसें कांहीं समाजस्थापनेनें तो पगडा कायम राहिला आहे—हें आतां मॅक्समुल्लर साहेबांच्या ‘ हिंदु मित्र ’ ह्या पुस्तकावरून निर्विवाद स्पष्ट झालें आहे. त्याचप्रमाणें निषिद्ध अन्नपान करण्याची स्वतंत्रता मिळावी ह्मणून, कांहीं उच्छृंखळ स्वैरसंचारी पोरें प्रथम ह्या कळपांत शिरलीं हें डा० भांडारकरांचे व्याख्यानांत उघड उघड आलेंच आहे. आणि जरी त्यांचें अंतःकरण पाद्री नसलें तरी धर्मोन्नतीसाठीं समाजस्थापनेची त्यांस जरूर नव्हती. तेव्हां ‘ मोडुनि दंडा, फेंकुनि देइन भिकार भगवीं वस्त्रें ’ ह्या संन्यासास कंटाळलेल्या अर्जुनाचे उक्तीप्रमाणें जानवें तोडून

व गलिच्छ सोंवळें भिरकावून देऊन, अभक्ष्यभक्षण व अपेयपान ह्यांचा उपभोग घेण्याचे उद्देशानें स्मृतिकारांच्या दूरदर्शी व गुणावह बंधनास कंटाळलेल्या अर्वाचीन सुशिक्षिताग्रणींनीं धर्मसंस्थापकत्व पत्करिलें असेंच ह्मणावें लागतें. व समाजिस्ट भागवतांचे निरर्गल प्रलाप व बेताल पोरकट नाच पाहिले ह्मणजे वरील ह्मणण्यास चांगलेंच पुष्टीकरण मिळतें. तात्पर्य इतकेंच कीं, निरनिराळ्या प्रतींच्या मानसिक उन्नतीस अनुरूप अशा ईश्वरभक्तीचे लहानमोठे इतके कांहीं प्रकार आमच्यांत आहेत कीं, त्या बाबतींत आह्मांस आतां कांहीं कालच्या पाद्यांपासून मिळवावयाचें आहे असें नाहीं. कोणी साफ असें ह्मणतील कीं सोंवळेंओंवळें व मद्यमांस ह्यांचे जे स्मृतिप्रणीत निर्बंध आपणांत आहेत ते व्यर्थ होत—आणि होय त्यांच्यावरच आमचा समाजिस्टांचा मुख्य हल्ला आहे—त्यांस उत्तर इतकेंच कीं, एक तर हीं बंधनें सर्वच हिंदूंस सारखीं लागू नाहींत; केवळ ब्राह्मणांसच तीं विशेषें-करून लागू आहेत. आणि तुह्मांस जर ब्राह्मणत्व ह्मणजे श्रेष्ठत्व पाहिजे असेल—पण तें ब्राह्मणांस नकोसें होऊन इतरांसच आवडूं लागलें आहे. मि० केन व मिसेस बिझांट ह्यांच्यासारखीं परकीं माणसेंही आप-णांस ब्राह्मण ह्मणवून घेण्यांत अभिमान व आनंद मानूं लागलीं आहेत—तेव्हां तुह्मांस जर ब्राह्मण ह्मणवून घ्यावयाचें असेल तर हीं बंधनें तुह्मांस बिलकुल जड वाटतां कामा नयेत. टांकीचे घांव सोसल्याशिवाय देव-कळा येत नाहीं; व भट्टींतून निघाल्याशिवाय शुद्ध सुवर्णत्व प्राप्त होत नाहीं हें विसरतां कामा नये. तेव्हां ह्या बंधनांवर हल्ला करणारांस पहिलें उत्तर असें कीं, तुह्मांस हीं बंधनें जड झालीं असल्यास, तीं झुगा-रून खऱ्या ब्राह्मणत्वास मुकण्याची पूर्ण मुभा आहे. परंतु ह्या आपमतलब्यास ब्राह्मणत्व न गमावितां, वरील कचाटींतून सुटावयास पाहिजे आहे; तें कसें व्हावें? तर समाजाचे द्वारें, असें त्यांस वाटतें; परंतु तें व्यर्थ आहे. दुसरें असें कीं ज्या लोकांचा कित्ता पुढें ठेवून हीं बंधनें झुगारून त्या वळणवर जाण्याचा तुमचा इरादा आहे, त्यांच्याकडेच पुन्हां एक वेळ सूक्ष्म दृष्टीनें पहा. टेंपरन्स असोसि-

येशन तिकडे निघून इकडे यावी व तिचें काम इकडे फक्त सुशिक्षित वर्गांतच चालण्याची आवश्यकता यावी व तें फक्त केन किंवा ग्रुक्स सारखे टेंपरन्सचे भक्त इकडे येतील तेव्हांच सभा होऊन व्याख्यान रूपानें—हा प्रकार पाहून टेंपरन्स असोसियेशनचें भाषांतर जर ‘ बेतावातानें दारू पिण्याची सभा ’ असें कोणी थट्टेनें केलें तर त्यास नांवें ठेवण्यास काय जागा आहे ? तेव्हां मद्यपाननिषेध हा श्रेष्ठत्वास अवश्य आहे असें पाश्चात्यांसमुद्धां आतां संमत होत चाललें आहे; ह्यावरून त्या निषेधाचा निषेध करणें ह्मणजे उलटी सुधारणा किंवा सुधारणा उलटी करणें होय हें उघड आहे. हीच गोष्ट मांसभक्षणाची. मांसभक्षण प्राणहानिशिवाय होत नाहीं; आणि प्राणघात ह्मणजे दुःखाची किंवा निर्दयतेची परमावधि होय हें उघड आहे. आतां प्राण्यांस दुःख देणें किंवा त्यांस क्रूरपणें वागविणें रास्त नाहीं ह्मणून ‘ प्राणिदुःखनिवारक ’ किंवा ‘ प्राण्यांस होणाऱ्या क्रूरतेचें प्रतिबंधन करणाऱ्या ’ सभांची जर आवश्यकता भासूं लागली आहे, तर त्याच न्यायानें प्राणिवध बंद करणें अवश्य नाहीं काय ? परंतु ह्या प्राणिदुःखनिवारकांस आपलें पोट जाळण्यासाठीं किंवा चवचाल जिभेचे चोंचले पुरविण्यासाठीं ह्मटलें तर बरें, गाईबैलादिकांच्या चटदिशीं सफाईनें माना उडविणें पूर्ण संमत असावें ह्यांत आश्चर्य नाहीं! कारण उघडच आहे. गाईला आत्मा नाहीं— उच्छृंखल सूत्रांवरील तर्कटी भाष्य; सूत्र पहिलें. असें असतां ऋषिकालीं मद्यमांस निषिद्ध नव्हतें, आपले जे सुळे आहेत ते मांस तोडण्यासाठींच आहेत, मद्यमांस भक्षणाचा ईश्वरभक्तीशीं ह्मणजे धर्माशीं काय संबंध आहे, सुधारलेल्या देशांतील लोकांस मद्यमांस फार आवडतें ह्मणून आपणासही............ काय हरकत आहे असें ह्मणणें ह्मणजे दुसऱ्यानें * खाल्ला ह्मणून + + + + असें ह्मणण्यापैकींच आहे. तेव्हां असल्या बालिश कोटिक्रमाचें खंडन करण्यांत वेळ घालविणें व्यर्थ होय. सोंवळ्याचेंही बंधन उच्चवर्णासच लागू आहे. परंतु वर्ष सहामहिन्यांतही ज्यास पाणी लागत नाहीं, असें घाणेरडें सोवळें नेसण्यांत काय अर्थ आहे? कांहींच नाहीं असें मीही प्रांजलपणें कबूल करितों. पण त्यायोगें

सोंवळें भिरकावून देणें ह्मणजे आजाराचा नाश करण्यासाठीं मान काप-ण्यासारखेंच होय. अशा सुधारकांची व वैद्यांची अरण्यपंडितांतच गणना केली पाहिजे. सोंवळ्याची घाणच जर तुह्मांस नको आहे, तर सोंवळ्याचा नाश न करितां ती धुऊन घालविणें जोंपर्यंत शक्य आहे, तोंपर्यंत त्यास फांटा देणें शहाणपणाचें नाहीं. पण जर सोंवळें ह्मणजे स्वच्छता, तर धौतवस्त्राचा सोंवळ्याचे जागीं उपयोग करण्यास काय हर-कत आहे; त्यास ओंवळ्याचा स्पर्शही होता कामां नये हा सोंवळ्याचा अतिरेक नाहीं? काय होय, असेल कदाचित्, तथापि सोंवळ्यांत शिथिलता उत्पन्न करून त्यास ओंवळ्याचीच दिशा लावून देण्यापेक्षां, सोंवळ्याचा अतिरेकच पतकरला असें कोण समंजस मनुष्य कबूल करणार नाहीं परंतु ह्यावरही कोणी स्थूलदृष्टी असें ह्मणेल कीं, सोंवळ्याचा अतिरेक न करितां आह्मीं त्यास ओंवळ्याची दिशा लागूं दिली नाहीं ह्मणजे झालें कीं नाहीं; मग ओंवळ्याचा नुसता स्पर्श झालेलें धौतवस्त्र नेसून जेवण्यास काय हरकत आहे! ह्यास उत्तर इतकेंच कीं, असें ह्मणणें पोकळ आहे असें अनुभवानें सिद्ध झालें आहे. ह्मणजे नुसती स्वच्छता केली ह्मणजे झालें असें एकदां मंडळीच्या मनानें ठरविल्यामुळें, मग स्वच्छ धोतरावर स्वच्छ सदरा, त्यानंतर त्यावर स्वच्छ टोपी, व खालीं स्वच्छ बूट चढ-लेला दिसत नाहीं काय? पण ह्यापेक्षांही विलक्षण प्रकार जेव्हां पहावा तेव्हां केवळ डोळ्यांवर कातडेंच ओढण्याची पाळी येते. धर्मवेड ह्मणून सोंवळ्याचा पूर्ण त्याग केलेल्या मंडळींत जेव्हां एकच सदरा सारखा आठवडाभर घरांत, बाहेर, दिवसा, रात्रीं, मेरीवर, शेतखान्यांतही वापरला जात असतां, तोच सदरा किंवा शर्ट घालून बाह्या वर सारीत जेवणारे सुधारक दृष्टीस पडतात, तेव्हां स्वच्छतेच्या नांवावर गलिच्छ सोंवळ्याचा त्याग करूं पाहणाऱ्या सुधारकांची ही मिरवणूक पाहून हंसावें कीं रडावें हें मला समजत नाहीं. अशा पेंचांत सांपडल्यामुळें शेषं 'कोपेन पूरयेत्' ह्या न्यायानें 'तुह्मीं कांहीं ह्मणा; तुमचें तें त्रासदायक सोंवळें आह्मांस नको आह्मीं नेमस्तपणानेंच चालणार' असें जर कोणी ह्मणूं लागला तर तो 'बेताबातानें किंवा नेमस्तपणें खाण्यापिण्याच्या सभेचाच सभासद'

होण्यास लायक आहे ह्यांत संशय नाहीं. शिवाय ज्या सुधारलेल्या राष्ट्राच्या सहवासानें आह्मां सुशीक्षितांस हा नेमस्तपणाचा चार सुचूं लागला त्यांमध्येंही नेमस्तपणा खपत नाहीं असें सूक्ष्म निरीक्षणांतीं दिसून येतें. जेवणाच्या आधींचा पोषाख कितीही स्वच्छ असला तरी जेवणाच्या वेळीं ठराविक पोषाखच त्यांस घालावा लागतो, नाहींतर पंक्तिबाह्य व्हावें लागतें. जेवण्याचा ठराविक पोषाख घालण्याचें आज गरीबीनें किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें होणें शक्य नाहीं ह्मणून दुसऱ्यांकडील मेजवान्यांचीं निमंत्रणें कांहींस नाकारावीं लागावीं हाही पाश्चात्य सोंवळ्याचा अतिरेकच नव्हे काय? आणि ह्यावरून सुलभ वाईटाचें पूर्ण निराकरण करण्यासाठीं कठिण चांगल्याचा अतिरेक होणेंच इष्ट व साहजिक आहे असें दिसत नाहीं काय? अर्ध्याच मार्कानें नापास झालेल्यांचीं उदाहरणें आजकाल काय थोडीं आहेत? आणि एकंदरीनें निदान सेकंड क्लासांत पास होणाऱ्यास कांहीं प्रसंगीं अर्धा मार्क ग्रेस देण्यास जशी हरकत नाहीं, तसेंच एकंदरीनें उत्तम सोंवळें करणारास अडीअडचणीचे प्रसंगीं शास्त्रांत सवडी ठेविलेल्या नाहींत असेंही नाहीं. तात्पर्य, सोंवळें काय किंवा मद्यमांसनिषेध काय सर्वांस सारखा लागू नाहीं हें एक, आणि तो हिंदूंच्या काय किंवा युरोपिअनांच्या काय दृष्टीनें उच्चत्वास व उन्नतीस अवश्य दिसत आहे हें दुसरें, ह्यामुळें सुधारक ह्मणविणारांची दिशाभूल झाली आहे हें उघड आहे. शिवाय भौतिक शास्त्रांच्या दृष्टीनेंही हाच सिद्धांत सिद्ध होतो असेंही ठरत आहे; ( आचारमीमांसा—हें पुस्तक पहावें. ) आणि पारमार्थिक दृष्टीनें तर आमच्या आचारांची महती अवर्णनीय आहे. परंतु ह्या दोन दृष्ट्या मला विशेष नसल्यामुळें आणि सर्वसाधारण दृष्टीनेंच आपला विचार असल्यामुळें तत्संबंधानें दुसऱ्यांवरच हवाला देणें योग्य, अवश्य व पुरे आहे. ह्यांशिवाय स्नान, संध्या, मुंज, श्राद्ध, हव्यकव्य, इत्यादि धर्मविषयक बाबींसंबंधानें साधारणतः बरेंच सांगण्यासारखें असून त्यांचेही भौतिक शास्त्र, व परमार्थ ह्यांचें दृष्टीनें मंडन होण्यासारखें आहे. परंतु विद्यमान सुशिक्षित सुधारकांनीं जरी त्यांसही वेडांच्या कोटींत काढून

त्यांतही धाब्यावर बसविलें आहे तरी त्यांच्या हल्लयाचा भर विशेषतः त्यांजवर नसल्यामुळें आणि तत्समर्थनाची दिशा वरील प्रतिपादना-वरून बरीचशी सहज समजण्यासारखी असल्यामुळें येथें ऊहापोह करण्याची गरज नाहीं.

तेव्हां आतां आपण विशेषेंकरून सामाजिक ह्मटल्या जाणाऱ्या सुधारणेकडे वळूं. स्त्रीस्वातंत्र्य, स्त्रीशिक्षण, बालविवाहप्रतिबंध, पुनर्विवाह व वर्णसंकर ऊर्फ जातिभेदनिराकरण ह्या सुधारणा मुख्य होत; आणि ह्यांपैकीं सुधारकांचा भर कायतो बालविवाहनिषेध व विधवापुनर्विवाह ह्यांजवरच विशेष आहे. वर्णसंकर हा विषय बाजूस ठेविला ह्मणजे बाकीच्या गोष्टी बहुतेक स्त्रियासंबंधाच्याच आहेत; ह्मणजे सामाजिक सुधारणेचा मुख्य रोख '**स्त्रीदास्यविमोचन**' व 'स्त्रीदुःखनिवारण' हा होय. ह्यासंबंधानें, आमच्या एका मित्रानें सुधारणेची उत्पत्ति व उद्देश नुकताच स्पष्ट केला आहे. भाषेच्या अवनतीविषयींचे विवेचनांत ते लिहितात; 'सार्वजनिक बोलणें, सार्वजनिक लिहिणें, सार्वजनिक कृत्यें करणें ह्या सर्व बाबतींत राज्यकर्त्यांच्या भाषेचा व कृत्यांचा संचार होतो. तो इतका उत्कट होतो कीं, देशी भाषेंत लिहिणें व देशी तऱ्हेनें चालणें गौण, लाजिरवाणें, व तिरस्करणीय आहे असें देशांतील लोकांपैकीं कांहींस वाटूं लागलें, व ते स्वदेशांतील चांगल्याही संस्थांना वाईट समजूं लागतात................ वगैरे सर्व गोष्टी त्यांना त्याज्य वाटतात व परकीय राज्यकर्त्यांच्या वाईट व चांगल्या अशा सर्वच तऱ्हा संग्राह्य भासूं लागतात. उघडच आहे, राज्यकर्त्यांनीं राज्य मिळविलेलें असतें, तेव्हां त्यांच्यांत चांगले गुण असल्यावांचून तें त्यांना मिळवितां आलें नसावें, असा सिद्धांत लोक सहज करितात. तसेंच देशांतील लोकांनीं राज्य घालविलेलें असतें, तेव्हां त्यांच्यांत वाईट गुण असल्यावांचून तें त्यांनीं गमाविलें नसलें पाहिजे, असाही दुसरा सिद्धांत सहज उत्पन्न होतो व ह्या दोन सिद्धांतांची सांगड घालून देशांत कित्येक कुधारक निपजत असतात.

ह्या कुधारकांचा समज असा असतो कीं राज्यकर्त्यांची भाषा, धर्म, पोषाक, इतर संस्था स्वीकारल्या असतां, आपण राज्यकर्ते, निदान राज्यकर्त्याप्रमाणें तरी होऊं.............चातुर्वर्ण्य नाहींसें झालें पाहिजे, मूर्तिपूजा मोडली पाहिजे व सर्वत्र एकेश्वरी मत प्रचलित झालें पाहिजे, ह्मणजे आपला हा देश वर यइल, असा टाहो त्यांनीं फारशी भाषेंत चालविला. आपला हा देश वर यावा हा बोलण्याचा पेंच मात्र त्यांनीं कधीं सोडिला नाहीं; बाकी सर्व कृति त्यांनीं अशी ठेविली कीं, त्यानें भाषा, धर्म व आचार समूळ नष्ट व्हावे. स्वभाषेच्या, स्वधर्माच्या व स्वाचाराच्या निंदेनें भरलेलीं भाषणें फारशींतून करण्यानें त्यांना एक वैयक्तिक फायदा असे. तो हा कीं मुसलमान राज्यकर्त्यांना हे लोक आपल्या मताचे आहेत व कधींकाळीं आपल्या धर्माचेही होतील, निदान आपल्या राज्याच्या चिरस्थायित्वाचे स्तंभ होतील असा भ्रम पडे. आणि ह्या भ्रमावर ते त्यांना दरबारांत लहानमोठ्या नोकऱ्या देत. दरबारांत मान-मान्यता झाल्यामुळें देशांतील लोकांनाही त्यांचा वचक वाटे. असले कांहा चमत्कारिक कुधारक त्याकाळीं फार पिकले होते.' हें अवतरण शिवाजीच्या पूर्वीच्या काळासंबंधाचें आहे; परंतु त्याची सत्यता वर्तमान काळींही अक्षरशः कशी दिसत आहे हें पाहाण्यास साफ डोळे उघडण्याची जरूर नाहीं. भाषा, धर्म, आचार, पोषाक इत्यादि आपल्या सर्व गोष्टींचा त्याग करून त्यांच्या जागीं राज्यकर्त्यांच्या त्या त्या गोष्टींची स्थापना करणें ह्मणजे 'राज्यकर्ते, निदान त्यांच्यासारखे तरी बनणें' व 'वैयक्तिक फायदा' करून घेणें ह्या इच्छेपासूनच काय ती सुधारणेची उत्पत्ति झाली आहे. 'यथा राजा तथा प्रजा' अशी जुनी ह्मणही आहे. तेव्हां डाक राखून बट पाटलोण चढवून, उपरणें व गंध ह्यांस फांटा दिला आणि प्रार्थनामंदिरांत जाऊन जानव्यास सोडचिठ्ठी देऊन खाद्यपेयांचीं बंधनें तोडून टाकिलीं कीं स्वतः साहेब बनल. तरी अर्धांग तसेंच कायम राहिलें, ह्मणून ह्या प्राण्यांचें बहुतेक सर्व लक्ष तिकडे वळावें हें साहजिक आहे. ह्मणजे प्रथम त्यांस बरोबर फिरावयास नेणें, पुरुषांत मडमांप्रमाणें मिसळविणें, आपल्याबरोबर त्यांस इंग्रजी बोलण्यास

लावणें, कोर्टशिपच्या धरतीवर स्वयंवरपद्धति सुरू करणें, व त्यानंतर विधवांच्या दुःखविमोचनार्थ त्यांचा न्हावेर, झोतुर, पाट ऊर्फ पुनर्विवाह लावणें व तसेंच नवराबायको ह्यांचें परस्पर नीट जुळत नसल्यास काडी मोडणें इत्यादि गोष्टी अर्वाचीन सुधारकांस अवश्य भासूं लागल्या. पण ह्या सर्व घडवून आणण्याचें, उरस्फोड करून वरकांतीं प्रसिद्ध केलेलें मुख्य कारण देशोन्नति हें होय. ह्मणून देशोन्नतीसाठीं स्त्रीदास्य-विमोचन, स्त्रीशिक्षण, बालविवाहनिषेध, पुनर्विवाह इत्यादि सुधारणावाचक शब्दांनीं वातावरण अगदीं दुमदुमून जाऊन, पावसाळ्यांत बेडकांच्या डरांव डरांवानें जशा कानठाळ्या बसतात त्याप्रमाणें सर्व लोकांस झालें. इतक्यावरच केवळ संपलें नाहीं. कांहीं धीट सुधारकपट्टयांची मजल ह्याहीपलीकडे गेली. ‘ राष्ट्र बलाढ्य होण्यासमुद्धां निरानिराळ्या जातींचा रक्तानें मिलाफ व्हावा लागतो. साक्सन, नार्मन व दुसऱ्या जाती ह्यांचें मिश्रण होऊन सध्यांचें इंग्रजी राष्ट्र तयार झालें आहे................ हिंदु व मुसलमान ह्यांची एक जात होऊन (?) शीख लोक तयार झाले इ० ’—सयाजीविजय ता० ३० मे १९०३. अशा प्रकारें हिंदूंमध्यें युरोपिअन रक्ताची पिचकारी उडल्याशिवाय राष्ट्र बलाढ्य व्हावयाचें नाहीं असाही वात्रट विचार कांहीं डोक्यांत शिरला असल्यास नवल नाहीं; परंतु तो अद्यापही शारदाश्रमवासी लेखकासारख्या दुधखुळ्यांच्या भ्रष्ट डोक्यास सोडीत नाहीं हें पाहून आश्चर्य वाटतें. इकडे हिंदुस्थानांत येऊन खोऱ्यावारीं दरमहा ओढणाऱ्या राजेसाहेबांच्या राणीसाहेबांचे हाताखालीं पैशानें पासरी असे मनमुराद नोकर घरीं असल्यामुळें गृह-कृत्यांचा लकडा राणीसाहेबांचे पाठीमागें राहत नाहीं; तेणेंकरून वेळ दवडण्यासाठीं ज्यांस अचकट विचकट कादंबऱ्या वाचणें, नवऱ्याबरोबर किंवा दुसऱ्या वाटेल त्याचे हातांत हात घालून भटकणें, नाचणें, बागडणें ह्यांशिवाय ज्यांस दुसरा व्यवसायच राहत नाहीं, आणि हिंदुस्थानांत ज्यांस स्वतःच्याही समाजरूढींचीं बंधनें बाळगावीं लागत नाहींत अशा स्वतंत्र वर्तनाच्या मडमांचा स्वैरसंचार आपल्या बायकांस नाहीं ह्मणून त्यांस गुलाम समजून त्यांची त्या काल्पनिक दास्यांतून मुक्तता करण्यास

लागणें व हे चार स्वतः बायकांसच अमर्यादेचे व विनयहीन वाटून त्यांनीं ह्या स्वातंत्र्योपभोगास आपली असंमति प्रदर्शित केल्यास हिंदुमर्यादा व विनय ह्यांचीच थट्टा करणें हें मूर्खपणाचें होय. 'निसर्गसौंदर्याच्या मनोरम देखाव्यांपासून त्यांस घरांत चुलीपाशीं आपण कां कोंडून ठेवावें? आपणांप्रमाणें त्यांसही असले देखावे पहाणें इष्ट व अवश्य आहे. तेव्हां ह्या सुखास त्यांस आंचवावयास लावण्याचा आपणास काय अधिकार आहे? असे कांहीं वेड्यापीरांचे उद्गार निघालेले ऐकूं येतात. जसें कांहीं आमच्या बायकांस घराबाहेर पडण्याचीच मनाई आहे; आणि त्यांनीं हे देखावे नवऱ्याबरोबरच गाड्याघोडीं उडविल्यावांचून त्यांच्या दृष्टीस पडत नाहींत; आणि जणूं काय असले, सृष्टिसौंदर्य दृष्टीस पडण्याचे प्रसंग आमच्या चालीरीतीस अनुसरून कधींच येत नाहींत. यात्रा, मेळ, वनभोजनें, पर्वण्या ह्यांस फांटा देऊन असले प्रसंग नाहींत ह्मणणें ह्मणजे आपले पायांत आपणच बेडी अडकवून झालेल्या प्रतिबंधाबद्दल ओरड करण्यासारखें नाहीं काय? त्याचप्रमाणें शिक्षण ह्मणजे लिहितां वाचतां येणें अशी अप्रयोजक कल्पना मनांत घेऊन बायकांस लिहिणें वाचणें शिकवून त्यांची भारतभागवत रामायणादि पूज्य ग्रंथांवरील श्रद्धा आपणच उडवून त्यांच्या हातांत नाटकें, कादंबऱ्या, व प्रहसनें देणें; आणि इंग्रजी शिकणें किती मेहनतीचें काम आहे हें स्वतः जाणत असून व इतर विषयांचें तरी शिक्षण मुलांस देशी भाषांच्याचद्वारें मिळावें ह्मणून खटपट करीत असूनही बायकांस इंग्रजी शिकविण्याचा आग्रह धरणें ह्यापासून सुशिक्षणाची काय प्राप्ति होणार असेल ती कोणास ठाऊक? आमच्या भारतभागवत रामायणादि पूज्य ग्रंथांच्या व्यासंगानें व मननानें वास्तविक फारच चांगलें वळण मनास लागण्यासारखें आहे आणि त्यांमध्यें पातिव्रत्य, कुलीनता, विनय, धैर्य, निस्पृहता, परोपकार इत्यादि सद्गुणांचीं अनुकरणीय भव्य उदाहरणें मनावर कायमचीं ठसण्यासारखीं अनेक असून त्यांचेयोगानें मनुष्याची उन्नति झालीच पाहिजे; पुरुषांनीसुद्धां हरएक मर्दानी सद्गुणांसाठीं त्या ग्रंथांचें काळजीनें परिशीलन करणें इष्ट व अवश्य आहे. पूर्वीं ह्या ग्रंथांतील उत्तमोत्तम कथानकांचा

परिचय आबालवृद्धांस, स्त्रीपुरुषांस कथा, पुराणें, पोथीवाचन ह्यांच्याद्वारें चांगला होत असे. परंतु अलीकडे ह्या ग्रंथांचें अज्ञान पुरुषांमध्येंही इतकें वाढलें आहे कीं ह्यांतील कथांचे संबंध अन्य पुस्तकांत आल्यास स्पष्टीकरणार्थ त्यांवरील टिप्पणांची आह्मांस अवश्यकता भासूं लागली आहे. सारांश, ह्या आमच्या राष्ट्रीय पूज्य ग्रंथांचें रहस्य नित्य व्यासंगानें समजून घेऊन खरें सुशिक्षण संपादण्यासाठीं लिहिण्यावाचण्याचा उपयोग करणें रास्त आहे. परंतु स्त्रियांस सुशिक्षित करण्यासाठीं त्यांस सर्वस्वी मडमा बनविणें कोणत्याही दृष्टीनें अवश्य नाहीं इतकेंच नव्हे तर इष्टही नसून राष्ट्रीय दृष्ट्या फारच हानिकारक आहे. बालविवाहाविषयीं मुख्य गोष्ट ध्यानांत ठेवावयाची ती इतकीच कीं विवाह-विधि लहानपणीं झाल्यापासून कांहींएक नुकसान नाहीं; उलट विद्याधर पंडितांनीं दर्शविल्याप्रमाणें फायदाच आहे. नुकसान जर कशापासून होत असेल तर त अपक्कपणीं लग्न झाल्यापासून होत असेल. तथापि आज जितकी शारीरिक क्षीणता, दुर्बलता, किंवा हानि दृष्टीस पडत आहे ती सर्व ह्याच कारणापासून उत्पन्न होत आहे असें समजणें ह्मणजे ' तुह्मांस दारिद्र्यदशा पीडित आहे काय—बालविवाह बंद करा व पुनर्विवाह चालू करा ' अशा प्रकारें बेशुद्धपणीं बरळण्यासारखेंच आहे. स्वराज्य नष्ट होऊन त्याबराबरच मर्दुमकीच्या खेळांचा लोप झाल्यामुळें, शस्त्रांच्या कायद्यानें शस्त्रांची ओळख त्यांच्या चित्रांच्याच द्वारें करून घेण्याचा प्रसंग येत चालल्यामुळें, त्याचप्रमाणें मोठमोठ्या शहरांतील बेबंद रहाणी, नाटकांचे प्रयोग, नाटकें, कादंबऱ्या, प्रहसनें इत्यादि कामोत्तेजक गोष्टींचा प्रसार दिवसेंदिवस अधिक प्रमाणावर होत असल्यामुळें, ब्रह्मचर्य नष्ट होऊन आत्मघातकी खोड्या अपक्कपणापासूनच मंडळींत शिरून भर जवानींतच चेहऱ्यावरील तेज नष्ट होऊन गाल व छाती खोल जाऊन नाकावर चष्मा चढूं लागल्यामुळें, आणि पूर्वींची कुटुंबांतील तरुण स्त्रीपुरुषांच्या संमेलनास गुणावह आळा घालणारी मर्यादा, चालरीत, व धर्मबंधनें अन्तर्धान पावून त्यांच्या जागीं पाश्चात्यांचे मदनोद्दीपक शिष्टसांप्रदाय बसून स्त्रीपुरुषसंगमाचा अतिरेक होत चाल-

त्यामुळें अलीकडील शोचनीय शारीरिक ऱ्हास बहुतांशीं उदयास आला असें सूक्ष्म विचारांतीं कळून येईल. आणि ह्यामुळेंच, सुधारणेच्या भरीं भरून ज्यांनीं आपल्या मुलामुलींचीं लग्नें फारच लांबणीवर टाकिलीं त्यांच्या त्या संततीची शारीरिक व नैतिक हानि बरीच झालेली दृष्टीस पडत आहे. तात्पर्य, लग्नाची आयुर्मर्यादासुद्धां शारीरिक ऱ्हासाची वरील कारणें अस्तित्वांत आहेत तोंपर्यंत इंग्रजी रिवाजास किंवा आपल्या प्राचीन आर्य पद्धतीसही अनुसरून एकदम वाढविणें अविचाराचेंच होय.
आतां पुनर्विवाहाकडे वळूं. प्रथम विधवापुनर्विवाहाची उत्पत्ति पहा. एकंदर सुधारणेची राजवाड्यांनीं केलेली मीमांसा जी वर दिली आहे ती वास्तविक आहे; तरी विधवापुनर्विवाहासंबंधानें सुधारकांची ओरड 'दुःखविमोचन' ही होय. तेव्हां त्या ओरडीकडेही लक्ष पुरविलें पाहिजे. दुःखनिवारण व सुखवर्धन ह्या एकंदर सुधारणेच्या मूलतत्वा-संबंधाचा ऊहापोह सध्यां नको. सध्या विधवांच्या दुःखासंबंधानेंच बोलूं. विधवांच्या कपाळीं नेहमीं घरांत राबून चुलीशीं जळण्याचें व सर्वांचीं कर्णकटु बोलणीं सहन करण्याचें आमच्या समाजानें लिहिलें असून त्यांस उंची वस्त्र किंवा दागदागिना ह्यांचा उपभोग किंवा समाजांत लग्नकार्यामध्यें मिरविणें ह्या गोष्टी वर्ज असून संसारसुखाचा लेशही त्यांस मिळत नाहीं; इतकेंच नव्हे तर तिचें दर्शनही अमंगल किंवा अशुभ असें समजलें जातें इ०. आतां प्रथम असें पहा कीं घरांत राबणें व चुलीशीं जळणें ह्या गोष्टी गरिबीमुळें विधवांस व सधवांसही सारख्याच प्राप्त होतात. घरांत राबणाऱ्या व चुलीशीं जळणाऱ्या सधवा काय विधवांपेक्षां कमी आहेत, तेव्हां नवऱ्याचे मरणानें ह्या गोष्टी त्यांच्या गळ्यांत पडतात ह्या ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यांस कर्णकटु बोलणीं जीं सहन करावीं लागतात तीं टाळण्यासाठीं त्यांचा पुनर्विवाह करण्याचेंच कारण नाहीं. त्यांस अलंकार व मिरवणूक मिळत नाहींत हें ऋण दुःख होय; ह्मणजे हें सुख त्यांस नाहीं तरी त्यांची दुःखांत गणना केलीच पाहिजे, त्याचप्रमाणें नवऱ्याच्या सहवासाचें सुख त्यांस नाहीं, हेंही निर्विवाद आहे. वैधव्य हा एक प्रकारचा संन्यास असून

धार्मिक दृष्ट्या त्याची उपयुक्तता व अवश्यकता निदान सार्थकता स्थापन करितां येण्यासारखी आहे. परंतु तो मुद्दा बाजूस ठेऊन केवळ सामाजिक दृष्ट्याच पुनर्विवाहाचा विचार कर्तव्य आहे. विधवापुनर्विवाह हा कोणत्याही समाजांत गौण ह्मणजे कमीपणाचाच लेखला जात आहे. ह्मणजे जी विधवा वैधव्यांतच आपलें शेष आयुष्य पवित्र व शुद्ध आचरणानें घालवील ती इतर विवाहित अथवा अविवाहित पण भ्रष्ट विधवांपेक्षां जास्त योग्यतेची होय, किंबहुना तिची योग्यता सौभाग्यवती स्त्रीच्या बरोबरीची होय ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. विधवेचा पुनर्विवाह करणें ह्मणजे तीस वास्तविक व्यभिचाराची मर्यादित मुभा देऊन तीस लोकमान्यता देणें होय; आणि ह्यामुळेंच आमच्यापैकीं ज्या जातींत तो प्रचलित आहे त्यांमध्यें त्यास न्हावेर, ह्मोतुर, पाट इत्यादि जीं नांवें आहेत तीं कमीपणा दाखविणारींच आहेत. युरोपांत व विशेषेंकरून इंग्लंडांतसुद्धां गंगाभागीरथीची पुनरपि सौभाग्यवती होणें हें गौण समजलें जात आहे व त्यामुळेंच माजी महाराणी व्हिक्टोरिया हिनें आपलें बहुतेक सर्व आयुष्य वैधव्यांतच घालविण्याचें पत्करिलें असावें हें उघड आहे. ह्याप्रमाणें विधवेचा पुनर्विवाह हा जर गौण, कनिष्ठ होय तर तो श्रेष्ठ जातींत चालू करणें ह्मणजे त्यांस श्रेष्ठत्वापासून पदच्युत करणेंच होय. आतां हा प्रघात फक्त ब्राह्मण ह्या श्रेष्ठ वर्णांतच नाहीं. तेव्हां ब्राह्मणांनीं त्याची इच्छा धरणें ह्मणजे राजानें रंक होऊं पाहणें किंवा साधूनें भोंदु होऊं पाहण्यासारखेंच आहे. अभक्ष्यभक्षण, अपेयपान, सोंवळ्याचा अभाव, विधवापुनर्विवाह वगैरे बहुतेक सुधारणेच्या बाबी श्रेष्ठपणास विघातक असून जर ब्राह्मणांस खरें ब्राह्मणत्व ह्मणजे श्रेष्ठपणा पाहिजे असेल तर त्यांनीं त्यांचा मार्ग चोखाळितां कामां नये हें उघड आहे. बाजीरावानें मालकम साहेबांच्या हातावर जेव्हां राज्यदक्षणेचें उदक सोडून इंग्रजांस राज्यपदप्राप्ति झाली तेव्हां राज्यकर्ते ह्या दृष्टीनें आपण आतां सर्व हिंदूंपेक्षां श्रेष्ठ झालों आणि ह्मणूनच ज्या ज्या गोष्टींमध्यें आपणांस पूर्वीं बहिष्कार होता त्या त्या सर्व गोष्टींत आतां आपला प्रवेश झाला पाहिजे असें त्यास साहाजिक वाटूं लागलें.

परंतु राज्यलक्ष्मीनें जरीं आपणांस माळ घातली, आणि 'यस्यास्ति वित्तं' इत्यादि न्यायानें जरी कुलीनता, विद्वत्ता, गुणज्ञता, वक्तृत्व, सौंदर्य, इत्यादि सर्व गुण जरी आह्मांस प्राप्त झाले तरी अद्यापि ब्राह्मण आमच्या पंक्तीस बसत नाहींत, आमच्या हातचें खात नाहींत, पीत नाहींत, फार तर काय त्यांस आमचा स्पर्शही सहन होत नाहीं असें पाहून आमच्या राज्यकर्त्यांस आश्चर्य व विषाद वाटावा आणि त्यांनीं 'आपल्यासारखी कधीं होशील' ह्या इच्छेनें आह्मांस वरून खालीं ओढण्याचा ह्मणजे बाटविण्याचा प्रयत्न करावा हें साहजिक आहे. दोन असामींच्या योग्यतेंत अंतर असल्यास तें अंतर नाहींसें करण्याचे दोन मार्ग आहेत. एक सोपा, जवळचा, पण घाणेरडा व ग्राम्य होय; तो, कनिष्ठानें वरिष्ठास खालीं ओढून आपल्याच सपाटीवर ह्मणजे आपल्याच योग्यतेस आणणें; आणि दुसरा कठीण, लांबचा, पण पवित्र व शिष्टजनमान्य असा आहे; तो कनिष्ठानें आपली योग्यता वाढवून वरिष्ठाच्या पदवीस चढणें हा होय. जगाच्या एकंदर स्वरूपाकडे पाहिलें तर, चांगल्यापेक्षां वाईटाचीच गर्दी जिकडे तिकडे दृष्टीस पडते; त्यामुळें आमच्या राज्यकर्त्यांनीं त्यांच्यांतील व आमच्यांतील अंतर मिटविण्यासाठीं पहिल्या सोप्या व जवळच्याच मार्गाचें अवलंबन करणें साधारण सृष्टिक्रमास अनुसरून नाहीं असें कोण ह्मणेल? तरी त्या मार्गाचें अवलंबन करण्यांतही त्यांनीं मुसलमानांचा सरळ आडमुठेपणा न दाखवितां वारांगनेची कुटिलता आपल्या राजनीतींत प्रदर्शित करावी हें त्यांस अत्यंत भूषणावह नाहीं असें कोण ह्मणेल? शिवाय जबरदस्तीचा रामराम किती दिवस चालणार? तेव्हां जबरीनें ब्राह्मणांस वरील व्यवहार करावयास न लावितां त्यांच्या आचारांतील खरीं खोटीं असतील नसतील तीं व्यंगें दोषैकदृष्टीनें उघडी करून त्या आचारापासून त्यांस समूळ भ्रष्ट करण्याच्या पेंचांस त्यांनीं हात घातला; आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आमच्या पुरातन आचारांतील तेज नाहींसें होऊन कालगतीनें त्यांजवर गंज चढला असल्यामुळें, आमच्यावर वरील पेंच करणें त्यांस फारच सुलभ गेलें. परंतु 'हितं मनोहारि च दुर्लभं वचः' ह्या राज्यकर्त्यांच्या

परहित पेंचांस अमिषांतर्गत गळाप्रमाणें भुलून जाऊन त्यास गिळणें ह्मणजे मत्स्यवर्गांतच गणना होण्याची ईर्षा धरण्यासारखें नाहीं काय? आचारविचारानें सर्वस्वी साहेब नाहीं तरी हीन होण्याची अजागळ ईर्षा अर्वाचीन सुशिक्षणास व सुधारणेसच शोभे! एकंदरींत विधवापुनर्विवाहाची चाल गौण असून श्रेष्ठत्वविघातक आहे हें निर्विवाद आहे. आतां कोणी असें ह्मणेल कीं, असलें असिधाराव्रतासारखें कठीण व जवळ जवळ अशक्य श्रेष्ठत्व आमच्या हातून व विशेषेंकरून आमच्या अबला विधवांच्या हातून घडण्यासारखें नसल्यामुळें तें आह्मांस नको! तर त्यास उत्तर इतकेंच कीं असलें पोंचट पोरकट बरळण्यांत अर्थ नाहीं. कोणत्या पोरास कोणत्या विद्येचें किंवा कलेचें अध्ययन आवडतें! तरी पण मानेवर दगड देऊन त्यांजकडून तीं कामें करवून त्यांची व्यावहारिक योग्यता वाढविणें हेंच जसें त्यांच्या मातापित्यांस किंवा गुरूंस शोभतें व त्या पोरांसही परिणामीं हितावह होतें, त्याचप्रमाणें आचारांविषयींचें आमचे ऋषिप्रणीत कडक निर्बंध त्या ऋषिवर्यांस भूषणावह असून त्यांचें ओझें अंतीं आपणास हितकारकच झाल्यावांचून रहाणार नाहीं हें आपण पक्कें ध्यानांत ठेवावें. आतां विधवापुनर्विवाहाकडे तिसऱ्याच एका निराळ्या दृष्टीनें पाहूं. विधवांचे पुनर्विवाह करावयाचे ह्मटलें ह्मणजे तितक्या नवऱ्या समाजांत जास्त उत्पन्न झाल्या. हल्लीं त्यांचा पुनर्विवाह होत नाहीं ह्मणून पुरुषांस बायकांची वाण पडली आहे असें नाहीं. ह्मणजे बायकांचा फक्त एकदांच विवाह होत असल्यामुळें कांहीं पुरुषांस बिलकुल विवाह केल्यावांचून रहावें लागत आहे असा प्रकार दिसत नाहीं; तसें असतें तर, पुरुषांनीं त्याची तेव्हांच ओरड केली असती. ओरडच जर पहावयाची असेल तर ती पुरुषांस बायका मिळण्याच्या अडचणीची नसून उलट मुलींस नवरे मिळण्याच्या अडचणीची दिसते. आणि ही अडचण चांगलीं स्थळें थोडीं ह्यामुळें जरी उत्पन्न होते ह्मणजे तिजवरून वास्तविक नवरदेवांची संख्या वधूंपेक्षां कमी आहे असें सिद्ध होत नाहीं असें जरी ह्मटलें तरी नवरदेव तयार असून नवरी मिळण्याची पंचाईत पडलेली प्रायः ऐकूं येत नाहीं. सध्यांचे स्थितींत, ह्मणजे विधवांचा पुन-

र्विवाह होत नसता आणि पुरुषांस एकाच वेळीं जरी अनेक बायका करितां आल्या नाहींत तरी, त्यांस एकीच्या पाठीमागून दुसरी ह्याप्रमाणें अनेक वेळां विवाह करण्याची सवड प्रचलित असता, पुरुषांस निदान पुरेशा कुमारिका समाजांत उपलब्ध आहेत हें निर्विवाद आहे. अशा स्थितींत जर विधवांना पुनर्वधूत्व देऊन कुमारिकांची संख्या वाढविली तर अखंड सौभाग्याचे ऐवजीं अखंडकुमारीभाव कांहीं मुलींच्या तरी वांट्यास आल्या-वांचून राहणार नाहीं. ह्मणजे युरोपांत जशा अनेक कारणांनीं 'ह्याताऱ्या कुमारी' दृष्टीस पडतात; अथवा आमच्या इकडेही कांहीं हीन जातींत देवाशीं लग्न लाविलेल्या मुरळ्या आढळतात तशा ब्राह्मणांमध्येंही घोड-नवऱ्यांच्या पलीकडल्या, पुरुषांच्या कमतरतेमुळें जन्मभर अविवाहित रहावें लागलेल्या तरुण व वृद्ध कुमारिका आढळूं लागतील. पण तसें झालें ह्मणून काय झालें? इंग्रज लोकांत व युरोपांतील सुधारलेल्या सर्व लोकांत विधवांचा पुनर्विवाह सुरू असून जन्मभर अविवाहित राहणाऱ्या स्त्रिया जर आढळतात तर तेंच सुशिक्षणास व सुधारणेस व युक्तीसही संमत असलें पाहिजे असें कोणास वाटण्याचा संभव आहे. त्यास उत्तर इतकेंच कीं, विवाह होणें ही गोष्ट जर सर्वत्र स्त्रियांस इष्ट आहे—आणि हें विधवांचाही पुनर्विवाह लावण्यास तयार असणाऱ्या सुधारणा-ग्रणींस मान्य झालेंच पाहिजे—तर आमच्यांत प्रचलित नसलेला विध-वांचा पुनर्विवाह सुरू करून त्यायोगें वर दाखविल्याप्रमाणें कांहीं जणींस जन्मभर अविवाहित राहण्यास लावणाऱ्या नवीन पद्धतीपेक्षां प्रत्येकीस विवाहाचा मोका जिच्यायोगें एकदां तरी मिळण्यास हरकत नाहीं, मग पुढील सुखसोहळा जिचा तिच्याच नशिबावर! अशी आमची पुरातन समाजपद्धतीच अधिक सुशिक्षित, व युक्तिवादास अधिक संमत होणार नाहीं काय? कांहीं स्त्रियांस जर भर्तृसुखाशिवाय इहलोकची यात्रा कंठणें भाग आहे—आणि तें निर्विवाद आहे असें कोणत्याही समाजा-कडे पाहिलें तरी दिसतें, हें वर स्पष्ट केलेंच आहे—तर तसा प्रसंग कोणावरही येवो त्याबद्दल व्यर्थ वाद करण्यांत व इंग्रजांनीं व तदनुयायी अर्वाचीन सुशिक्षितांनीं पुरातन हिंदू पद्धतीस व हिंदूंनीं इंग्रजी पद्धतीस

नांवें ठेवण्यांत विशेष मतलब दिसत नाहीं. तथापि ह्या दोन समाज-पद्धतींपैकीं ज्या पद्धतीच्या योगानें प्रत्येकीस भर्तृसुख अनुभविण्याचा निदान मोका मिळत आहे ती दुसरीपेक्षां बरी नाहीं असें कोण समंजस व विचारी मनुष्य कबूल करणार नाहीं? असो. आतां राहिली, वर्ण-संकराची सुधारणा. ह्यासंबंधानें विशेष ऊहापोह करण्याची आवश्यकता दिसत नाहीं, वर जें धार्मिक व कांहीं सामाजिक सुधारणांचें विवेचन केलें आहे त्यावरून अठरापगड जाती नाहींत तरी वर्णव्यवस्था उपयुक्त असून तिचें महत्व व रहस्य कळण्यारखें आहे. प्रसिद्ध ग्रीक तत्ववेत्ता प्लेटो याच्या काल्पनिक प्रजासत्ताक राज्यामध्येंही त्यानें कांहींशी अशाच तऱ्हेचीं वर्णव्यवस्था उत्तम ह्मणून अमलांत असावी असें दाखविलें आहे. असला कृत्रिम उच्चनीचभाव किंवा पंक्तिप्रपंच काय कामाचा असें जरी कित्येकांस वाटलें तरी तो कुचकामाचा नाहीं. एकाच हाताचीं सर्व बोटें जशीं सारखीं नाहींत, त्याचप्रमाणें सर्व मनुष्यें जरी एकाच आकाशांतील बापाचीं लेंकरें असलीं तरी त्यांच्यामध्यें स्वाभाविकच अनेक बाबतींत उच्चनीचभाव आहे, तो कृत्रिम नाहीं; आणि तो उच्चनीचभाव क्षणभर गुंडाळून ठेऊन कोणत्याही लहान अगर मोठ्या बाबतींत आपण समता उत्पन्न केली तरी ती चिरस्थायी होणें, वंध्येला संतति होण्यासारखेंच अशक्य आहे. कांहीं ठिकाणीं जरी अशी असमता ढोबळ दृष्टीस आढळली नाहीं तरी सूक्ष्म दृष्टीस ती तेथें वसत आहे असें कळल्या-वांचून राहणार नाहीं. ह्मणून प्रथम जरी जातिभेद ख्रिश्चन लोकांत नाहीं असें वाटलें व त्यांनीं आपल्या कुटिल राजनीतीस अनुसरून आमच्यांत सबगोलंकार होऊन आह्मीं खालीं येऊन त्यांच्याच योग्यतेस मिळावें ह्मणून जातिभेदास कितीही नांवें ठेविलीं तरी इंग्रजांच्या इतक्या परिचयानें त्यांच्यामधील वस्तुस्थिति व त्यांचा कावा आह्मांस कळावयास नको काय?

ह्या धार्मिक व सामाजिक सुधारणांचे ऊहापोहामध्यें अर्थात्च चर्वित-चर्वण ह्मणजे आजपर्यंत झालेल्या वादाचा खल टाळवेल तितका टाळून

ज्या विशेष गोष्टी सांगण्यासारख्या होत्या तेवढ्याच सांगितल्या आहेत. ज्या चालीरीती त्याज्य ह्मणून ह्मणण्यांत येत आहेत त्या विशेषेंकरून ब्राह्मणांतच आहेत, ह्मणजे ब्राह्मणांमध्यें जी सुधारणा व्हावी ह्मणून अर्वाचीन सुशिक्षितांचा कट्टा प्रयत्न चालला आहे ती इतर सर्व जातींत वमत असतां त्यांचें कोठें गौरव केलेलें किंवा त्यायोगें त्यांची आमच्यापेक्षां अधिक प्रगति झालेली दिसत नाहीं; आणि शिवाय ज्या चाली बंद व्हाव्या ह्मणून ओरड करण्यांत येत आहे त्या चालींकडेच आमच्या सुधारलेल्या राज्यकर्त्यांचा थोडथोडा कल दिवसेंदिवस होत आहे, आणि त्यांच्याचसारख्या कांहींशा चाली हल्लींही त्यांमध्यें दिसत आहेत. शिवाय ह्या ब्राह्मणवर्गाच्या सुधारणेच्या बाबतींत राजनीतीचाही हात आहे आणि त्यामुळेंच सुधारकांस तिचें अप्रत्यक्ष बळ असल्यामुळें तेही अंशतः स्वहिताचे दृष्टीनें सुधारणेचे भक्त कसे बनतात इत्यादि मुद्दे वरील विवेचनावरून आपल्या स्पष्टपणें ध्यानांत आलेंच असतील. ह्या सुधारणानंतर राजकीय, व औद्योगिक सुधारणाकडे विशेषेंकरून वळावयाचें परंतु तसें करण्यापूर्वीं आणखी एक दोन महत्वाच्या गोष्टींचा उल्लेख केला पाहिजे. धार्मिक व सामाजिक, राजकीय, आणि औद्योगिक हे जे सुधारणेचे चार भेद आहेत त्यांजकडे आपल्या चातुर्वर्ण्याचे दृष्टीनें पाहिलें ह्मणजे असें दिसून येईल कीं, धार्मिक व सामाजिक ह्या बहुतेक ब्राह्मणांसंबंधाच्या, राजकीय ह्या क्षत्रियांसंबंधाच्या, आणि औद्योगिक ह्या वैश्यांसंबंधाच्या होत. शूद्रांच्या ह्मणजे सेवकवर्गाच्या सुधारणा निदान आज काल फारशा नाहींत. आपले राज्यकर्ते हे विशेषेंकरून वैश्यांच्या योग्यतेचे आणि फारच झालें तर क्षत्रियांच्या योग्यतेचे असल्यामुळें, ब्राह्मणांवरच उलट सुधारणेचें अस्त्र सोडून त्यांस वैश्य किंवा शूद्र बनविलें ह्मणजे आपलें श्रेष्ठत्व पूर्णपणें स्थापित झालें ह्मणावयाचें असें त्यांस वाटल्यास नवल नाहीं. कारण शस्त्रांच्या कायद्यानें क्षात्रतेज एकदम नष्ट करणें अत्यंत सुलभ होतें, त्यायोगें क्षत्रियांचा ताडदिशीं अधःपात होऊन ते यक्षिणीच्या कांडीप्रमाणें एका क्षणांत शस्त्रकायद्याचे तडाक्यानें हतवीर्य होऊन वैश्य किंवा शूद्र बनले. आणि जरी कांहीं क्षात्रियांचीं

डोकीं संस्थानिकांच्या रूपानें राहिलीं तरी त्यांच्याही डोक्यावरील खरा तेजस्वी मुकुट काढून त्यांच्या तोंडावरून ममतेनें कुरवाळण्याच्या निमित्तानें त्यांच्या बोडक्यांवरून सफाईचा हात फिरवून व त्यांच्या हातांतील शस्त्रांची लांबी आंखूड करून व त्यांची धार लोणकापी करून त्यांस पूर्णपणें कळसूत्री बाहुलीं करण्याचा कावा अद्यापही कसा सुरू आहे हें स्पष्ट करण्याची आवश्यकता नाहीं. ब्राह्मणांवर कायद्याची किंवा राजनीतीची मात्रा चालण्यासारखी नव्हती. तेव्हां त्यांजवर शिक्षण व नोकरी रूपी साखरेंत घोळलेल्या सुधारणेच्या, सौम्य पण बहुतेक रामबाण, मात्रेचा प्रयोग नेटानें चालत असून तिचें कार्यही बरेंच होत आहे. क्षत्रिय तर साफ नाहींसे झालेच! आणि आधींच निस्तेज झालेल्या ब्राह्मणत्वावर वैश्यत्वाचें कलम सुधारणेचें द्वारें करण्यांत येत आहे. वैश्यांचा मुख्य धंदा द्रव्यार्जन. त्यापेक्षां उच्चतर कर्तव्यें जीं राज्यरक्षण व धर्मपालन किंवा उन्नति त्या दोहोंचा मक्ता राज्यकर्यांनीं परोपकारबुद्धीनें आपणांकडेच घेतल्यामुळें आह्मांस आतां जशी कांहीं क्षात्रतेजाची व ब्राह्मणांची वाणच राहिली नाहीं. ह्यामुळें स्वधर्माचार सोडून क्षत्रियांनीं व ब्राह्मणांनीं नोकरी किंवा फारच झालें तर, धंदा करण्याचे दिवस आले आहेत. ह्याचा अर्थ इतकाच कीं, आतां तुमची योग्यता केवळ शूद्रांच्या बरोबरीची किंवा फारच झालें तर वैश्यांच्या तोडीची होत आहे. धर्मरक्षणास ह्मणजे स्वोन्नति करण्यास व देशरक्षणास मुख्य दोन गोष्टींची जरूर आहे शहाणपण आणि शक्ति, किंवा ब्रह्मतेज आणि क्षात्रतेज. तीं दोन्हींही ह्याप्रमाणें नष्टप्राय झालीं आहेत. परंतु आह्मांस ह्या गोष्टींची उठाठेव करण्याची मुळीं जरूरच नाहीं. देशांत जिकडे तिकडे शांतता राखून परराष्ट्रांपासून आमचें योग्य रक्षण करण्याची सर्व जबाबदारी आमच्या राज्यकर्त्यांनीं मोठ्या उदारपणानें आपणांवर घेतल्यामुळें आणि ती जबाबदारी ते पूर्णपणें ओळखत असून, आपलें तद्विषयक कार्य उत्तमप्रकारें बजावीत आहेत असा थोडाथोडका नव्हे पन्नास पाउणशें वर्षांचा अनुभव असल्यामुळें आह्मांस क्षात्रतेजाची जरूर नाहीं. क्षत्रियधर्म काय सोपा आहे? तो एक वास्तविक असिधाराव्रतच

होय. तेव्हां ही आमची गरज जर दुसरा आपण होऊन आमच्या स्वतःपेक्षांही अधिक योग्य रीतीनें भागवीत आहे तर त्यांत काय वाईट? तसेंच शहाणपणाचीही आपणांस जरूर नाहीं. राज्यकर्त्यांच्या अंगीं तें पूर्णपणें वसत आहे. त्यांची राज्यनीतिकुशलता अप्रतिमच होय; ह्मणूनच त्यांच्या राज्याचा विस्तार सर्व भूतलावर झाला आहे तो इतका कीं, त्यांच्या राज्यावर सूर्याचा अस्त कधींच होत नाहीं; अशा समुद्र वलयांकित राज्याचा योग्य बंदोबस्त करण्यास अवश्य लागणारें राजनीतिकुशलत्व, चातुर्य किंवा मंत्रित्व त्यांचेठायीं देदीप्यमान होत आहे ह्यांत संदेह नाहीं. तेव्हां धर्माचरणाचें किंवा त्या खडतर तपश्चर्येचें आतां कांहींएक कारण उरलें नाहीं; असें असतां, कारणांवाचून जर आपण ह्या गोष्टींचा अंगीकार करूं तर आमची अजागळांचेच वर्गांत गणना झाली पाहिजे. तेव्हां सध्यांची आमची इतिकर्तव्यता ह्मणजे द्रव्यार्जन व तद्द्वारा सुखोपभोग. शस्त्र धरण्याची किंवा तपश्चर्येची सुळावरील पोळी निवडण्याची असह्य दगदग न करितां स्वस्थपणें दोन पैसे मिळवून चैनींत गुण्यागोविंदानें जर आयुष्य कंठण्यास मिळालें तर आणखी काय पाहिजे? अशा तऱ्हेचा उपदेश कांहीं राज्यकर्त्या शहाण्यांकडून आह्मांस झालेला तरी कधीं कधीं ऐकूं येतो तरी वरील विचार आमच्यापैकींच कांहीं थोर पुरुषांच्या डोक्यांत घोळून अद्यापि प्रकट होऊं लागले नाहींत हें आमचें महद्भाग्यच समजलें पाहिजे. नुसतें द्रव्यार्जन करून पोट भरणें ह्मणजे वास्तविक उदरंभरि होणें—कारण द्रव्यार्जन त्यासाठींच त्याचा दुसरा उच्चतर उपयोग हल्लीं राहिलाच नाहीं—ह्मणजे पशुत्वाप्रत पोंचण्याच्याच उतरणीस लागल्याप्रमाणें आहे हें कोणा मनुष्यास समजत नाहीं? कुत्रीं मांजरेंहीं आपलें पोट भरून आहेतच. त्यांच्यांत व आमच्यांत मग काय फरक राहिला? तेव्हां द्रव्यार्जन व सुखोपभोग हे कालक्षेप करण्याचे जरी सुलभ व प्रिय मार्ग असले आणि जरी ते आयुष्याचे मुख्य उद्देश होऊं शकले तरी ते उन्नतीचे मार्ग नव्हत; त्यांचें अवलंबन करणें ह्मणजे डोंगरावरून घसरण्यासारखेंच होय; आणि ह्मणूनच त्यांस अवनतीचे

मार्ग ह्मणावयाचे. अशाप्रकारें तुह्मांस अवनतीची दिशा लावून व धर्म व राज्य ह्यांच्या रक्षणास अनुभवशून्यतेनें तुह्मांस नालायख करीतही ह्मणावयाचें काय कीं, आह्मीं येथें केवळ तुमचें रक्षण करण्याकरितां ह्मणजे केवळ परोपकारबुद्धीनें आलों असून तुमचें स्वतःचें राज्य रक्षणकरण्याची लायकी तुह्मांस आली ह्मणजे तुमचा कारभार तुमच्या स्वाधीन करून आह्मीं आपले स्वदेशीं परत जाण्यास तयार आहों, ह्या मानभावीपणास काय ह्मणावें. असो. तात्पर्य इतकेंच कीं आमच्या पुरातन आचाररूपी शस्त्रांवर कालगतीनें जरी बराच गंज चढला आहे तरी तीं सर्वस्वी फेंकून देऊन त्यांचे जागीं मातीचीं रंगीबेरंगी भपकेदार पाश्चात्य शिष्टसांप्रदायरूपी आयुधचित्रांचा संग्रह करणें ही वास्तविक सुधारणा उन्नति किंवा प्रगति नसून कुधारणा, अवनति किंवा पिच्छेहाटच होय. ब्राह्मणत्वास पराङ्मुख होऊन शूद्रत्व किंवा फार झालें तर वैश्यत्व ह्यांकडे ह्मणजे नीचत्वाकडे तोंड फिरवून त्याचा मार्ग क्रमण करितांना कांहीं वेळ भुरळ पडून किंवा दिशाभूल होऊन, चकून जाऊन आपण पूर्वींच्या पुढेंच चाललों आहों; किंवा स्वपूर्वपराङ्मुख होऊन पूर्वेकडील सूर्यास खग्रास ग्रहण लागल्यामुळें पश्चिमेकडील इतस्ततः संचारणाऱ्या खद्योतासच सूर्य समजून आपण आपल्या प्राचीन पूर्वजांच्या—व्यासवाल्मीक्यादिकांच्याही—फारच पुढें गेलों आहों असें मानणें श्रेयस्कर नाहीं. उपनिषदांमध्यें तत्वज्ञानाच्या बाल्यावस्थेंतील बोबडे बोल भरले आहेत—असा शेरा पोरांस शाबासकी देण्याचे ऐटीनें पाश्चात्य पंडितमन्य व्यासवाल्मीकींवर जरी देत आहेत तरी त्यानीं पक्कें समजावें कीं, व्यासवाल्मीकांच्या पायपोसाचीही योग्यता आपणांस नसून आपले रत्नमोल ग्रंथ कालाच्या सपाट्यांत स्मृतिनष्ट होऊन गेलेले ज्यावेळीं असतील त्यावेळीं ही कवडीमोल उपनिषदें पूर्वीप्रमाणेंच शिरसावंद्य मानिलीं जात आहेत असें आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. सत्तेपुढें शहाणपण रद्द, या न्यायानें सत्तारूढ संशयवादापुढें किंवा अज्ञेयवादापुढें उपनिषदांतील ब्रह्मज्ञान रद्द पडून गेलें आहे! कालमहिमा अगम्य होय! असो. ह्यावरून अंधपरंपरेनें चालत आलेल्या आचारांचें आपण गतानुगतिकत्वास अनुसरून

पालन करावें असा माझ्या ह्मणण्याचा अर्थ आहे असें कोणी समजूं नये. तर अज्ञानानें मागल्या अनेक शतकांमध्यें आमच्या चालीरीतींवर जो गंज चढला आहे तेवढा विचाररूपी कानशीनें घांसून काढून त्यांस पुन्हां सतेज केलें पाहिजे. ते निस्तेज किंवा निर्जीव झाले आहेत ह्मणून त्यांस अजीच फेकून द्यावयाचें नाहीं; तर त्यांस सतेज करण्याचा किंवा त्यांत जीव घालून सजीव करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. दगडासच देव मानून दगडाची पूजा होऊं लागली ह्मणून पूजेस फांटा न देतां दगड हा प्रतिमा किंवा चिन्ह होय; पूजेमध्यें वास्तविक लक्ष दैवताकडे किंवा ईश्वराकडे असलें पाहिजे. घरामध्यें रूढीस अनुसरून देवपूजा झाली पाहिजे ह्मणून ती लहान मुलाची मुंज झाल्याबरोबर त्याचे गळ्यांत अडकवून बापानें पूजेमधून सुटल्याचा हर्ष मानावयाचा, किंवा पूजेच्या वेळीं हातानें तंत्र व तोंडानें मंत्र चालला असतां व्यावहारिक गोष्टींचा खल मनानें चालावयाचा इत्यादि प्रकारें पूजा थट्टास्पद झाल्यामुळें अशी पूजा करण्यांत काय अर्थ आहे असें ह्मणून देवांस हद्पार न करितां ज्या दोषांनीं देवपूजा त्याज्य वाटत आहे ते दोष तिजमधून काढून टाकून तीस पुन्हां उज्ज्वल, सजीव, व लोकादरास पात्र करणें हीच खरी सुधारणा होय. सोंवळें जर गलिच्छ असेल तर तें स्वच्छ राखावें, त्यास नाट लावूं नये. अशाप्रकारें पुरातन ऋषिप्रणीत आचारविचारांचें पुनरुज्जीवन करून ब्राह्मणधर्माचा उद्धार करणें ह्मणजे काय ह्याचें थोडेसें दिग्दर्शन वर केलेल्या धार्मिक व राजकीय सुधारणांचे विवेचनावरून झालेंच आहे. एवंच ब्राह्मणांनीं द्रव्यलंपट व शरीरसुखलंपट होऊन ब्राह्मणत्वाचा त्याग करून वैश्य किंवा शूद्र बनूं न पाहतां कडकडीत खऱ्या ब्राह्मणत्वाचें, आचारानें व ब्रह्मज्ञानानें परिपालन करून हल्लीं जी त्यांची कुतरओढ होत आहे ती तशी न होऊं देतां त्यास जगामध्यें पुनरपि आदरणीय करणें हें त्यांचें मुख्य कर्तव्य होय. ही गोष्ट कशी घडवून आणावी हा एक मोठा प्रश्नच आहे. प्रथम खरें ब्राह्मणत्व ह्मणजे काय हें समजण्यासाठीं जुन्या धर्मग्रंथांचा सूक्ष्मपणें अभ्यास झाला पाहिजे; आणि त्यांचें मंथन करून सत्यरूपी नवनीत काढिलें

पाहिजे. ह्याकामीं सध्यां दुर्मिळ झालेल्या परंतु अद्यापही अगदींच अनुपलब्ध नसलेल्या खऱ्या साधुसंतांचा योग्य उपयोग करून घेतला पाहिजे. परंतु ह्या गोष्टीकरितां अर्वाचीन सुशिक्षणाचा ताठा व अहंभाव बाजूस ठेवून लीनता व नम्रता धारण केली पाहिजे. एरव्हीं विद्यमान साधुसंतांपासून आपणांस कांहींएक प्राप्त व्हावयाचें नाहीं. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, कबीर, तुळशीदास ह्यांच्याही ग्रंथांचा व सांप्रदायांचा ह्याकामीं बराच उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं. एकंदरींत आह्मांस खरे ब्राह्मण पाहिजे आहेत; हल्लींचे नामधारी ब्राह्मण असून नसून सारखेच. मिसेस बेझंट एकदां असें सूत्र बोलून गेली कीं, ब्राह्मणांनीं अवनतीमध्यें पुढाकार घेतला आहे; आणि ह्मणून ब्राह्मणांनीं पुनरुज्जीवन किंवा जीर्णोद्धार करण्यास पुढें सरसावलें पाहिजे. परंतु खरें ब्रह्मतेज अंगीं चमकूं लागल्याशिवाय हें काम होणें अगदीं दुर्घट आहे. 'धिक् बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलम्' असे उद्गार काढून विश्वामित्रानेंही ब्रह्मतेजाचा महिमा व वर्चस्व हीं कबूल केलीं आहेत. क्षात्रतेज उत्पन्न करण्यास हल्लींची परिस्थिति फारच प्रतिकूल आहे. ब्रह्मतेजाचें पुनरुज्जीवनास जरी ती पाहिजे तशी अनुकूल नसली तरी क्षत्रियत्वाच्या उज्जीवनास ती जितकी प्रतिकूल आहे तितकी प्रतिकूल त्यास खास नाहीं. अव्वल इंग्रजीमध्यें ब्रह्मतेज गंजलेलेंच होतें तरी, तें समूळ नष्ट झालें नव्हतें. त्यामुळें त्यावेळीं पाठशाळांतून व विश्वविद्यालयांतून तें सारखें चमकत होतें. पूर्वींच्या आचारविचारांस अंधपणें कां होईना चिकटून राहिलेल्या ब्राह्मणपुत्रांसच स्कॉलरशिपा, बक्षिसें, वगैरे बहुतेक सर्व मान मिळत असत. सीनिअर रँगलर परांजपे हे जे इंग्लंडांतही चमकून आले ते ह्या आपल्या वडिलांच्याच गंजलेल्या ब्रह्मतेजाचे जोरावरच चमकले. परंतु पूर्वीं जे लोक पाठशाळांतून व विश्वविद्यालयांतून चमकून निघाले त्यांचे अंगीं गंजलेलेंही ब्रह्मतेज न राहिल्यामुळें त्यांची संतती आतां पारशी वैश्यांपुढें कशी फिकी पडत चालली आहे तें पहा! ज्ञानसंपन्नतेमध्यें ब्राह्मणांची जी सारखी पिच्छेहाट होत चाललेली अलीकडे आपण पाहतों तिचें मुख्य कारण त्यांमधील ब्रह्मतेज नष्ट होत

चाललें व ते केवळ ब्राह्मणकुलोत्पन्न ह्मणजे नामधारी ब्राह्मण होत चाललें हेंच होय असें माझें मत आहे. ब्राह्मणत्वाप्रमाणेंच क्षत्रियत्वही आमच्यांतील नष्ट झालें आहे; आणि खऱ्या ब्राह्मणांप्रमाणें खऱ्या क्षत्रियांचीही आह्मांस तितकीच किंबहुना जास्त जरूर आहे. परंतु नष्ट झालेलें क्षत्रियत्व पुनरपि संपादन करण्यापेक्षां लुप्त झालेलें ब्राह्मणत्व जागृत करणें सद्यः परिस्थितींत कांहींसें सुकर आहे; तसेंच हातपाय जे निर्जीव लुले पडले आहेत ते डोकें आपल्या जाग्यावर नाहीं ह्मणून, व हातांपायांनीं आपलें काम पुनरपि योग्यपणें बजावण्यास लागण्यापूर्वीं प्रथम डोकेंच थाऱ्यावर आलें पाहिजे. (ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः। ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत।) ह्या गोष्टीमुळें आह्मांस प्रथम जीर्ण झालेल्या ब्राह्मणत्वाचाच उद्धार केला पाहिजे. धार्मिक व सामाजिक सुधारणेची जर कांहीं आजकाल अवश्यकता असेल तर ती ह्या दिशेनेंच झाली पाहिजे. आणि जोंपर्यंत ही ब्रह्मतेजाचे पुनरुज्जीवनाची इतिकर्तव्यता पुढें ठेवून तत्प्रीत्यर्थ तनमनधन सर्वस्वी अर्पण करण्यास अर्वाचीन सुशिक्षित दृढ निश्चयानें कंबर बांधून पुढें सरणार नाहींत तोंपर्यंत ‘बुडत्याचा पाय खोलांत’ ह्या न्यायानें सध्याची चालू अवनति तशीच वृद्धिंगत होत जाऊन सुधारणा, देशोन्नति इत्यादि बाबींची गोड गोड व्यर्थ बडबड व गडबड मात्र विपुल होऊन राहील.

आतां राजकीय सुधारणेकडे वळूं. वर क्षत्रियत्वासंबंधानें ज्या गोष्टींचा निर्देश आला आहे त्यांपेक्षां ह्या सुधारणेविषयीं विशेष कांहीं सांगावयाचें उरलें आहे असें नाहीं. तथापि एक दोन मुद्याच्या गोष्टी सांगितल्या पाहिजेत. आमचें राज्य नष्ट होऊन स्वदेशाचें रक्षण अन्य लोकांकडे गेल्यामुळें आणि आह्मीं शस्त्रहीन होऊन राज्यव्यवस्थेंतही आमचें अंग मुळींच नसल्यामुळें ह्या सुधारणेंत विशेष कांहीं अर्थ नाहीं. राज्याशिवाय राजकीय सुधारणांचा खल करणें ह्मणजे गरीबानें श्रीमंती ऐषआरामाच्या गप्पा मारण्यासारखेंच एका तऱ्हेचें मनोराज्य

करून कालक्रमणा करणें होय. ब्रिटिशराजछत्राच्या छायेखालींच दिवसेंदिवस अधिकाधिक राजकीय हक्क संपादन करून अखेरीस कानडा किंवा आस्ट्रेलिया ह्याप्रमाणें ब्रिटिश अध्यक्षतेखालीं स्वप्रजासत्ताक राज्य-व्यवस्था हिंदुस्थानांत स्थापन करणें ही आमच्या राजकीय सुधारणेची दिशा होय; आणि त्या मुक्कामास जाऊन पोंचण्याच्याच हेतूनें आह्मीं वर्तमानपत्रें, सार्वजानिक सभा, सार्वजनिक व्याख्यानें, प्रांतिकसभा आणि राष्ट्रीयसभा स्थापन करून, त्यांच्या द्वारें लोकमत जागृत करून व आपली राजकीय योग्यता वाढवून ती राज्यकर्त्यांचे नजरेस आणून देत आहों; आणि त्यायोगें राज्यकर्त्यांची आमच्या विशिष्ट योग्यतेबद्दल खात्री झाली ह्मणजे आह्मांस स्थानिक स्वराज्य, कायदेकौन्सिलांतील कांहीं सभासद निवडण्याचा आणि त्यांच्या द्वारें बजेटावर व नवीन बिलांवर वादविवाद करून राज्यव्यवस्थेविषयीं सार्वजनिक हिताहिताचे प्रश्न विचारण्याचा हक्क, इत्यादि कांहीं हक्क आह्मांस मिळत आहेत व त्या हक्कांच्या द्वारें निरनिराळ्या खात्यांत लोकहिताच्या निरनिराळ्या सुधारणा आह्मीं घडवून आणित आहों. जंगलाच्या कायद्याची सुधारणा, मिठावरील कराची अंशतः सूट, दुष्काळकोडाची सुधारणा, व रयतेस मदत इत्यादि लहानमोठ्या अनेक लोकहिताच्या गोष्टी आमच्या राजकीय हालचालींपासून मिळाल्या व मिळत आहेत. आणि अशाच दिशेनें नेटानें लोकांस जागृत करून आपली लायकी व मागण्या राज्यकर्त्यांचे कानावर घालून त्यांचे दृष्टीनें त्या योग्य आहेत असें शाबीद करीत गेलें असतां कालांतरानें आह्मांस कानडाप्रमाणें ब्रिटिश अध्यक्षतेखालीं स्वराज्यव्यवस्था करण्याचा अधिकार प्राप्त झाला ह्मणजे आणखी काय पाहिजे? हा आमच्या राजकीय पुढाऱ्यांच्या ह्मणण्याचा इत्यर्थ होय. हें ह्मणणें ठीक आहे, आणि मेल्यासारखें अगदींच स्तब्ध पडण्यापेक्षां निदान हातपाय हालविणें बरें ह्यांत संशय नाहीं. परंतु ह्यासंबंधानें आपण कांहीं गोष्टींचा विचार केला पाहिजे. शेंकडा तीन रुपये व्याज आजकाल कांहीं कमी नाहीं असें जर कोणी ह्मणाला तर त्याच्या ह्मणण्यांत ‘ दरसाल ’ ह्याचा अध्याहार झाला आहे असें आपण समजतों.

हा समज बराबर असल्यास ठीक आहे. परंतु शेंकडा तीन रुपये हें वीस वर्षांचें व्याज होय असें जर आपणांस मागून समजलें तर आपण काय ह्मणूं बरें? एकदां एक पंचवीस वर्षांचा गृहस्थ नोकरीसाठीं हिंडत हिंडत आला असतां ह्मणाला 'काय करावें कुटुंब मोठें; वतनवाडी नाहीं ह्यामुळें नोकरीसाठीं जोडे फाडावे लागत आहेत. वडिलांस शंभर रुपये पेनशन मिळतें; पण तेवढ्यानें काय होणार. इ०' ह्यांवर मी आश्चर्यचकित होऊन त्यास ह्मटलें, कुटुंब कितीही मोठें असलें तरी शंभर रुपये पुरे आहेत. लहानशा गांवांत पंधरा वीस माणसांचा निर्वाह होण्यास हरकत नाहीं.' ह्यावर त्या गृहस्थापासून असें कळलें कीं, शंभर रुपये हें वर्षाचें पेन्शन होतें. तात्पर्य प्राप्तीबराबर ती केवढ्या काळांतील प्राप्ति होय व तिला किती भांडवल खर्च करावें लागलें हेंही पाहिलें पाहिजे. अशा दृष्टीनें पाहिलें असतां आह्मांस राजकीय व्यवहारांत जें कांहीं प्राप्त झालें आहे तें दीड तपाचे आणि दरसाल चाललेल्या खर्चाचे मानानें कांहींच नसून अशा प्रकारचा जवळजवळ आंतबट्याचा व्यवहार पुढें चालवावा अशी जर कोणास शंका येऊं लागली असेल तर ती अस्थानीं होय असें कोण ह्मणेल? शिवाय यजमानापासून जी प्राप्ति आपणास झाली आहे ती आपण समजतों त्याप्रमाणें आपल्या परिश्रमाचें व योग्यतेचेंच फल वास्तविकपणें आहे काय हेंही पाहिलें पाहिजे. तसें नसल्यास ह्मणजे परिश्रम व योग्यता ह्यांची किंमत करण्याची यजमानाची कधींच इच्छा नसून तो भिक्षुकांच्या मुळमुळाटापासून मुक्त होण्यासाठीं व लग्नादि कार्याचे वेळीं लोकलज्जेस्तव कधीं कधीं एखादी चवली पावली काढून भिक्षुकांच्या हातावर ठेवीत असला तर भिक्षुकांनीं मोठ्या परिश्रमानें योग्यता संपादन करून त्याजकडे नम्रतापूर्वक विनंति करण्यापासून काय फायदा? भिक्षुकांची मिळकत केवळ यजमानाचे लहरीवर व स्वहितदृष्टीवर अवलंबून! शिवाय भिक्षा मागतां मागतां कांहीं चकचकीत लहान मोठीं नाणीं प्राप्त झाल्याचा हर्ष मानीत घरीं येऊन तीं व्यवहारांत चालवावयास जावें तों तीं खोटीं आहेत, त्यांची चकाकी केवळ दिखाऊ होय असें जर अनुभवास आलें तर भिक्षु-

काची निराशा विचारावयासच नको. अशा वेळीं प्रथम आनंद मानणाऱ्या भिक्षुकाच्या अजागळपणाची कीं धूर्त यजमानाच्या काव्याची तारीफ करावी हें ठरविणें कठीण आहे. दुसरें असें कीं यजमान चांगला धनाढ्य व उदारधी असूनही त्याचे पिढीजात डोईजड नोकर धूर्त असण्याचा संभव आहे. त्यायोगें यजमानापासून आपल्या संभावनेचा हुकूम जरी सुटला तरी हे मधील कावेबाज कोल्हे आपणास खो देण्याचा प्रयत्न करण्यास चुकावयाचे नाहींत. ह्मण आहे ना, यजमानाचें खरचतें आणि कोठावळ्याचें पोट दुखतें. ह्मणून एक तर ठरलेली संभावना पूर्णपणें आपल्या पदरांत पडणेंच कठीण, आणि जी अंशतः हातीं लागावयाची तिच्याकरितांही कैक जोडे फाटावयाचे; आणि हा तुकडा एका पदरांत पडून आपण तो गांठीस बांधतांना कांहींशा आनंदांत मग्न आहों इतक्यांत आपणास न कळत आपल्या दुसऱ्या पदराची गांठ सुटून तो रिकामा होण्याची पाळी यावयाची; अथवा कदाचित् असेंही व्हावयाचें कीं तुकडा पदरांत पडनां पडतां तो गारुड्याच्या हातचलाखीनें नाहींसा होऊन त्याचे ऐवजीं एखादा दगडच पदरांत पडावयाचा; आणि त्याच्या वजनानेंच आपण खूष होऊन मनांत मांडे खात बसावयाचें. अशा प्रकारच्या गोष्टी आमच्या राजकीय ह्मणविल्या जाणाऱ्या चळवळींत व त्यांच्या फलप्राप्तींत घडत असतील असें प्रत्यक्ष अनुभवानें ह्मणण्यास बरीच जागा आहे असें मला वाटतें. ह्या राजकीय बाबीसंबंधानें सुशिक्षितांची कांहींही आशा असो अथवा त्या चळवळींत त्यांस कितीही आनंद होवो आपली मुख्य चळवळ जी राष्ट्रीय सभा ती एक नाताळांतील वक्तृत्वप्रदर्शनाची सभा. वक्तृत्व प्रायः इंग्रजींत व्हावें लागतें ह्मणून ख्रिस्टमस एलोक्यूशन गॅदरिंग हें इंग्रजी नांव होय असें जें तिच्या एका निंदकानें तीस नांव ठेविलें आहे तें बरेंच अन्वर्थक आहे ह्यांत संशय नाहीं. राजकीय हक्क 'भवति भिक्षांदेही' असें ह्मणून मिळत नसतात हें जर इतिहासाचे भाराभर अध्ययनानें आह्मां सुशिक्षितांस अद्याप समजलें नसेल तर तें सर्व 'वांझें पाठांतर' होय ह्यांत संशय नाहीं.

आतां औद्योगिक व व्यापारविषयक सुधारणेकडे पहा. देशांतील उद्योगधंदे व व्यापार वाढण्यास एक तर स्वदेशांत कच्च्या मालाचा भरपूर पुरवठा असला पाहिजे आणि राजानें शांतता राखून उद्योगांस व व्यापारास उत्तेजन दिलें पाहिजे. ह्यांपैकीं आमच्या देशांत कच्च्या मालाची वाण बिलकुल नाहीं. विलायतेंतील बहुतेक सर्व धंदे हिंदुस्थानांतील कच्च्या मालाचे पुरवठ्यावर चालले आहेत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आणि लोकांत शांतता राखण्याचें कामही हल्लींचे राज्यकर्ते फारच उत्तम रीतीनें पार पाडीत आहेत. असें असतां आमचे उद्योगधंदे दिवसेंदिवस बसत चालले आहेत; आणि आगगाडी व तारायंत्र ह्यांच्या साहाय्यानें देशांतील निरनिराळ्या भागांतील दळणवळण वाढून व्यापाराची वृद्धि होत आहे तरी आमचे देशी व्यापारी बसत चालले आहेत. तसेंच आमच्या देशांतील शेंकडा ऐंशी लोकांचा मुख्य धंदा जो शेतकी तोही कमी किफायतीचा होत असून शेतकरी लोक वास्तविक अगदीं कंटाळून गेले आहेत, परंतु नाइलाजास्तव दुसऱ्या धंद्याचे अभावीं तो त्यांस चालवावा लागत आहे. ह्या औद्योगिक व व्यापारीय ऱ्हासाचें कारण उघडच आहे कीं कच्चा माल व शांतता ह्यांशिवाय त्यांच्या भरभराटीस अवश्य असणारी जी तिसरी गोष्ट राजकीय पाठबळ तें आमच्या लोकांस मुळींच मिळत नाहीं. हें राजकीय पाठबळ आह्मांस न मिळतां मांचेस्टरवाल्यांस व इतरांस असावें हें मनुष्यस्वभावास सर्वस्वी अनुरूपच आहे. ह्याच्या उलट राज्यकर्त्यांनीं वागावें आणि आपल्या जातभाईस न जुमानतां आह्मांसच मदत करावी असें ह्मणणें ह्मणजे मानवी स्वभावाचें एक तर अज्ञान दाखविणें होय. नाहीं तर राज्यकर्त्यांस स्व स्वभावाच्या विरुद्ध जाण्यास सांगणेंच होय. आतां आमच्या उद्योगास किंवा व्यापारधंद्यास उत्तेजन न देतां किंवा देण्याची इच्छा नसतां व आंतून आपल्या जातभाई तागडीवाल्यांस त्यांचें वास्तविक सर्व साहाय्य असतां ते आमच्या हिताची व औद्योगिक कल्याणाची वरून शब्दांनीं कळकळ दाखवितात हें खरें. परंतु असें करणें ‘ बारांगनेव नृपनीतिरनेकरूपा ’

अशा प्रकारें भर्तृहरीनें वर्णिलेल्या नृपनीतीस अनुरूपच होय. अशा तऱ्हेचें वेगडी वर्तन जर आमचे राज्यकर्ते करणार नाहींत तर त्यांस अव्यापारेषु व्यापार करणाऱ्या कीलोत्पाटी वानराप्रमाणें लौकरच राम ह्मणण्याची पाळी येईल. गिरणीचे कायदे आणि बहुतेक अनियंत्रित व्यापार, आणि हा अनियंत्रित व्यापार स्वहितास घातक होण्याचा संभव असेल त्या विशेष प्रसंगीं किंवा विशेष बाबतींत तेवढा नियंत्रितपणा ह्या गोष्टी जातभाईंच्या अप्रत्यक्ष हिताच्या राजकीय गिरणींतून निघत आहेत आणि इंग्लंडांत शेती नसल्यामुळें अशा तऱ्हेनें इकडे बिलें पास करून तिकडे लोकांचें हित साधितां येत नाहीं, ह्मणून प्रत्यक्ष इकडील शेतकरी लोकांचे पोटावर पाय आणण्याचेंही धाडस करण्यास आमचे राज्यकर्ते भीत नाहीं आहेत. चहाची लागवड करण्यासंबंधानें मद्रासकडे जो कायदा नवीनच केला आहे, आणि दुष्काळच्या प्रसंगीं ज्यांकडून सारा थकतो त्यांचा जमिनीवरील हक्क हुसकावून देऊन ती जमीन सरकारी करण्याचा जो महाराष्ट्रांत कायदा झाला आहे, हे आमच्या शेतकऱ्यांस केवळ भाडोत्री गुलाम बनवून हळू हळु आपल्या जातभाईस त्यांजवर सुखानें स्वारी करणारे जमेदार बनविण्याच्या उद्देशानें होत आहेत इतकें न समजण्याइतके विचारशून्य लोक फारच थोडे असतील. आगगाडीचेयोगानें व्यापार वाढून त्यास बरकत आली आहे, परंतु हिंदुस्थानच्या बाहेरीलच नव्हे तर हिंदुस्थान देशाच्या आंतीलही बहुतेक सर्व दलाली इंग्रजच आपल्या हातीं घेत चालल्यामुळें त्या बरकतीनें हिंदुस्थान देश दुसऱ्यांचेच खिसे तुडुंब भरीत आहे. हें इंग्रजी कंपन्यांचे आह्मीं गुमास्ते ( एजंट ) बनून खेड्यापाड्यांत जाऊन पिकें खडीं असतानांच त्यांची कंपन्यांचे नांवानें जवळ जवळ निमे किंमतीस खरेदी करून शेतकऱ्यांस मजुरीपुरतें जेमतेम टेकून बाकीच्यानें कंपन्यांचीं अधाशी पोतीं भरीत आहों ह्यावरून व्यक्त होत नाहीं काय? शेतकरी लोक बहुतेक ऋणको बनल्यामुळें आमचे देशी धनके मारवाडी व्याजानें त्यांस पिळून काढीत आहेत ह्मणून सरकारास शेतकऱ्यांची कींव येऊन त्यांस स्वल्प व्याजानें कर्ज मिळावें ह्मणून

तें एतद्देशीय धनकोंचे, कायद्यानें हातपाय बांधीत आहे. परंतु ह्मण आहे कीं म्हैस जी फळते ती कांहीं धन्यास दूध देण्यासाठीं नव्हे. ही ह्मण कांहीं खोटी नाहीं. तेव्हां वरील कायदे शेतकऱ्यांच्या हिताचे जरी बाह्यत: दिसले तरी त्यांचा उद्देश, आमच्या धनिकांच्या तोंडांतील काढून तें स्वदेशजातभाईंपुढें वाढण्याचा आहे हें निर्विवाद आहे. शेतकरी गरीब ह्मणून त्यांस मारवाड्यांनीं पीडणें बरें नाहीं व त्यांस स्वल्प दरानें कर्ज मिळणें इष्ट आहे हें सर्वांसच मान्य आहे. परंतु त्यांस आपल्या जात-भाईकडून स्वल्प दरानें कर्ज देववून त्यांजवरील ओझें एका हातानें हलकें करून, जमाबंदी वाढवून तें दुसऱ्या हातानें पुन्हा पहिल्याइतकेंच किंबहुना अधिकही जड करणें हें कपटपटुत्व प्रशंसनीय आहे. ह्यामुळें बिचारा शेतकरी होता तसाच रहातो इतकेंच नव्हे, तर जो पैसा जड व्याजानें देशी सावकारांचे पदरांत पडून स्वदेशांत राहत होता तो सर्वस्वी स्वदेशांतून पाय काढूं लागला आहे. अशा प्रकारें सर्व शेतकरीवर्गास केवळ इंग्रजी जमिनदारांच्या शेतांतील खपणारे स्वतंत्र गुलाम करण्याचा गुलामांचा व्यापार बंद करणाऱ्या राष्ट्रानें जणूं काय विडाच उचलला आहे. आणि जोंपर्यंत शेतकरी गुलामांचा क्रयविक्रय होत नाहीं तोंपर्यंत कायद्याचे दृष्टीनें गुन्हा होत आहे असेंही ह्मणण्याची कोणी छाती करणें विचारमूढत्वाचें लक्षण झालें आहे. असो, ही झाली स्वदेशांतर्गत उद्योगधंद्याची व व्यापाराची स्थिति! आतां येथें आपली धडगत नाहीं ह्मणून परदेशीं जाऊन कांहीं व्यापार करावा किंवा वसाहत करून तिकडचे शेतीचा किंवा इतर धंद्याचा मार्ग चोखाळावा असें जर कोणी मनांत आणील तर त्या कामीं त्यास कितपत यश येण्याचा संभव आहे ह्याचा अंदाज करणें कठीण नाहीं. आमच्या सरकारचें राज्यजाल सर्व पृथ्वीवर बहुतेक पसरलें असल्यामुळें तुह्मी इकडून सुटून तिकडे डोकें वर काढूं लागला असें आमच्या दयाळू इंग्रज सरकारच्या नजरेस आलें कीं, त्यांचे मुत्सद्दी तिकडील पाश ताणून तुह्मांस तिकडेही देमाय धरणीठाय असें करून घरची चत-कोर बरी, असें ह्मणतच आनंदानें पाय मागें घेण्याचा प्रसंग

आणून देतें; नाहीं तर तिकडे स्वतंत्र गुलाम होऊन राहण्याची मोठ्या उदारतेनें तुह्मांस परवानगी देण्यांत येते. नाताळ व केपकालनी ह्यांमधील इंडियन वसाहतवाल्यांची स्थिति व त्यांच्यासंबंधाचे कायदे ह्यांवरून वरील गोष्ट अनुभवसिद्धच आहे असें कोण ह्मणणार नाहीं? एवंच मृदंगास दोहींकडून मार, किंवा आई जेऊं घालीत नाहीं आणि बाप भिक्षा मागूं देत नाहीं अशी आमची स्थिति झाली आहे! बरें अशा स्थितीमध्यें जर तुह्मीं कांहीं तक्रार किंवा ओरड आरंभिली तर तिचाही उपयोग कितपत होणार हें दिसतच आहे; बहुतेक अरण्यरुदिताचाच अनुभव यावयाचा. बरें असें ह्मणून ओरड न करावी तर, तुह्मांस कांहीं दुःख होत आहे हें तरी आह्मांस कसें कळावें; ह्मणून आह्मीं स्वस्थ बसल्याबद्दल आमचा काय दोष असें ह्मणण्याची सरकारची तयारीच आहे. आणि ओरडल्याशिवाय दाद लागत नाहीं ह्मणून ओरडावें तर ह्या बोटावरची थुंकी त्या बोटावर करून दाखविण्याच्या मासल्याचीं उत्तरें देण्याची आमच्या इंग्रजी मुत्सद्यांची समयसूचकता अवर्णनीय आहे. आमच्या राजास डोकें बहुतेक नाहींच अथवा असलें तर तें बहुतेक निद्रिस्त आहे; ह्मणजे इंग्रजी राज्यांत बादशहा जरी आहे तरी राज्यव्यवस्थेसंबंधानें तो बहुतेक कर्तव्यहीनच असून मुकुटानें जशी त्यास शोभा येते त्याचप्रमाणें त्याच्यायोगें इंग्रजी राज्यास शोभा येत आहे; शोभादायकत्वापलीकडे त्याचें कर्तव्य किंवा त्याचा उपयोग नाहीं हें निर्विवाद आहे. तेव्हां दुःखानें गांजून जाऊन जर तुह्मीं ओरड केलीच तर राज्यव्यवस्था करणारे हात अनेक पडल्यामुळें फार तर एकावर जबाबदारी सोंपवून इतरांस स्वस्थ बसतां येतें. उजव्या हातानें मारल्यानंतर डाव्यानें ह्मणावें उजव्याचें उजव्यास माहीत; त्याचा माझा कांहीं एक संबंध नाहीं. अशा प्रकारची उडवाउडवी नाताळ व केपकालनींतील इंडियन वसाहतवाल्यांच्या ओरडीसंबंधानें उघड उघड चालली आहे हें आंधळ्यासही दिसल्यावांचून रहाणार नाहीं असें ह्मटलें असतां विशेष अतिशयोक्ति केल्याचा दोष पदरीं येईल असें वाटत नाहीं. अशा तऱ्हेचें आमच्या दक्ष पालकांचें उत्तम पाठबळ आह्मांस असल्यावर

व्यापार व उद्योगधंद्याचे बाबतींत आणखी तें आह्मांस काय पाहिजे? व्यर्थ न रडतां वेदांती तऱ्हेनें स्वतःचें सांत्वन करून स्वस्थ ईश्वरी अथवा इंग्रजी लीला पहात बसण्यांत शहाणपणा आहे असें कोणास वाटल्यास त्यांत त्याचा काय दोष?

व्यापार व उद्योगधंदे ह्यांची हिंदुस्थानांत सुधारणाच होत आहे असें प्रतिपादन करणारे इतिहास व अर्थशास्त्रतत्वज्ञ ह्यांची वरील विवेचनास संमति मिळणें दूरापास्त आहे. तेव्हां त्यांचें ह्मणणें काय आहे ह्याचाही आपणास थोडासा विचार केला पाहिजे. त्यांचे ह्मणण्याचा इत्यर्थ असा. हिंदुस्थान देश दिवसेंदिवस गरीब होत चालला आहे; स्वदेशांतील लक्ष्मीनें त्याच्याशीं काडी मोडून ह्मणा किंवा निदान त्यावर रुसून तरी इंग्लंडास माळ घालण्याचे उद्देशानें पश्चिमेचा रस्ता धरिला आहे. ह्या स्वदेशदारिद्र्यावर राष्ट्रीयसभाभक्तांची बरीच भिस्त आहे आणि लोकांत नसता असंतोष उत्पन्न करण्यासाठीं ते वेळीं अवेळीं मोठ्या चतुराईनें ही स्वदेशदारिद्र्याची टिमकी जोरानें बडवीत असतात; परंतु त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें पुढील भक्कम पुराव्यानें निःपक्षपाती विचारकांच्या तेव्हांच लक्षांत आल्यावांचून रहाणार नाहीं. पूर्वी हिंदुस्थानांत दळणवळणाचीं सोपीं साधनें नसल्यामुळें निरनिराळ्या प्रांतांत उत्पन्न होणारा माल जागच्याजागीं कुजून फुकट जात असे तो सर्व देशांतच खेळूं लागला आहे इतकेंच नव्हे तर युरोप, अमेरिका इतक्या लांबवर त्याचा विकास होत असून त्यायोगें देशांतील संपत्ति वाढत आहे. आणि जरी तिजोऱ्यांवर तिजोऱ्या भरून ठेवलेले नऊकोट नारायण अन्तर्धान पावले आहेत तरी त्यानें हिंदुस्थानची गरिबी सिद्ध होत नाहीं. एकाच ठिकाणीं पडलेली संपत्तीची रास वास्तविक नाहींशी झाली नाहीं आहे, तर तिची अर्थशास्त्रदृष्ट्या अधिक सम वांटणी झाली आहे व होत आहे ह्मणजे ती पूर्वींच्यापेक्षां अधिक जाग्यावर पसरल्यामुळें लक्षांत येईनाशी झाली आहे; तरी ती नष्ट झाली नाहीं किंवा तिनें दुसरीकडेही पलायन केलें नाहीं. एकाच्याच ताब्यांत आळसानें स्तब्ध पडून न राहतां ती आतां

अनेकांच्या हातांत खेळूं लागली आहे. कांहीं जणांनीं नऊकोट नारायण बनून बाकीच्या लाखों लोकांनीं अठराविसवे दारिद्र्यांत राहण्यापेक्षां प्रत्येकानें खाऊन पिऊन दोन पैसे बाळगून सुखी होणें अधिक इष्ट नाहीं काय? शिवाय पूर्वीं व्याजाचा दर इतका कांहीं जबरदस्त होता कीं दोन तीन वर्षांतच दामदुप्पट होऊन जात असे. परंतु अलीकडे व्याजाचा दर दिवसेंदिवस कमी होत चालला आहे तो इतका कीं पूर्वींच्या शेंकडा तीसांचे ऐवजीं हल्लीं शेंकडा तीनच आनंदानें पतकरून लोक आपले पैसे पोस्टल सेव्हिंग्स ब्यांकेंतही ठेवण्यास तयार आहेत. संपत्तीचा पुरवठा कमी असला ह्मणजे व्याजाचा दर वाढतो आणि तो पुरवठा वाढला ह्मणजे व्याजाचा दर कमी होतो अथवा गणिताचे भाषेनें संपत्तीचा पुरवठा व व्याजाचा दर व्यस्त प्रमाणांत असतात असा अर्थशास्त्राचा एक नियम आहे. त्या नियमाप्रमाणें हल्लीं व्याजाचा दर दिवसेंदिवस कमी होत चालला आहे ह्यावरून स्वदेशांतील संपत्ति दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे असें निर्विवाद अनुमान निघत नाहीं काय? हिंदुस्थानच्या अर्वाचीन सांपत्तिक समृद्धीचें व भरभराटीचें आणखीही प्रमाण पाहिजे असल्यास त्याची उणीव नाहीं. हिंदुस्थानांत पूर्वीं जे उद्योगधंदे मुळींच अस्तित्वांत नव्हते असे अनेक फायदेशीर उद्योगधंदे उत्पन्न होऊन देशाची संपत्ति वाढत आहे. कापसाच्या कापडाच्या गिरण्या; रेशमी व लोकरी कापडाच्या गिरण्या; कातड्यांच्या गिरण्या, चहा काफीची लागवड, कोळशाच्या खाणी, राकेलच्या खाणी, सोन्यारुप्याच्या व हिऱ्याच्या खाणी; लोखंडाच्या खाणी, इत्यादि अनेक नवीन धंदे सुरू झाले आहेत. आतां हे बहुतेक धंदे परदेशीय भांडवलानें चालले आहेत हें खरें तरी त्यायोगें देशाची हानि होण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट अमेरिका, जपान, हालंड वगैरे देशांत परकीय भांडवलानेंच त्या त्या देशांतील अंधारांत दडून असलेली नैसर्गिक संपत्ति उजेडांत येऊन त्यायोगें त्या त्या देशाची सांपत्तिक दृष्टया भरभराट झाली आहे हें इतिहासावरून प्रसिद्धच आहे. आतां हें परदेशीय भांडवल जर आह्मीं उपयोगांत आणणार नाहीं तर आज आपल्या देशांत उत्पन्न होणारें

लोखंड, सोनें, रुपें, राकेल, दगडी कोळसा, चहा, काफी वगैरे संपत्ति आपल्या दृष्टीस पडणार नाहीं व त्यायोगें जें आज हजारों माणसांचें पोट भरत आहे तें भरणार नाहीं. एवंच परकीय भांडवल असलं ह्मणून काय झालं त्यायोगें इतर देशांप्रमाणें आमच्याही देशाची व्यापारीय व औद्योगिक प्रगति होऊन तो संपन्न होण्यास काय हरकत आहे? एकं-दरींत कांग्रेसवाल्यांचें हें स्वदेशदारिद्र्याचे नेहमींचें तुणतुणें फुटकें असून त्याची तार तुटकी आहे; आणि ह्मणूनच तें कितीही जोरानें जरी वाजलें तरी त्यानें कोणाचेंच मन वेधलें जाऊं नये हें रास्तच आहे.

वरील विचारसरणी सकृद्दर्शनीं जितकी प्रबल दिसते तितकी नसून उलट बहुतेक वायफळच आहे असें सूक्ष्मनिरीक्षणांतीं दिसून येईल. ह्या समृद्धिवादस्थापकांचा पहिला मुद्दा असा कीं हिंदुस्थानांतील माल विक-ण्याचा बाजार स्वदेशांत व परदेशांतही विस्तृत झाला असल्यामुळें तो कुजून न जातां खपला जात असल्यामुळें देशांतील संपत्ति वाढत आहे. हें ह्मणणें शेतकरी वर्गास प्राधान्येंकरून लागू आहे. परंतु शेतकरी वर्गाच्या स्थितीकडे पाहिलें ह्मणजे वरील विचारसरणी जरी शुद्ध दिसली तरी ती कोणासही मान्य होणार नाहीं. वस्तुस्थिति जर अनुमानाचे विरुद्ध असेल तर अनुमान त्याज्यच होय. तथापि वरील अनु-मानांतील अशुद्धता कशी उत्पन्न झाली आहे ह्याचें आविष्करण झाल्यानें अनुमानाची शुष्कता व्यक्त होते ह्मणून तिकडेही लक्ष पोंचविलें पाहिजे. पिकलेलें सर्व धान्य जाग्यावर न राहतां खपून जातें हें निर्विवाद आहे. तर मग त्या विक्रीपासून आलेला पैसा जातो कोठें? येथेंच काय ती गोम आहे. हा पैसा शेतकरी वर्गाचे पदरांत पडला तर वरील अनुमान सत्य झालें असतें. परंतु पूर्वीं सांगितल्याप्रमाणें बहुतेक सर्व व्यापार नेआण, खरेदीविक्री, इंग्रजी कंपन्यांचे हातांत गेला असल्यामुळें बहुतेक सर्व नफा शेतकऱ्यांचे पदरांत न पडतां कंपन्यांचेच खिशांत जातो. आणि जो कांहीं लहानसा तुकडा शेतकऱ्यांचे हातीं लागतो तो नित्य वाढत्या सरकार देण्यांत बिनतक्रार गडप होतो! बिनतक्रार ह्या

शब्दाची सत्यता मागल्या दुष्काळाचे दिवसांत सर्वांचे अनुभवास आलीच आहे. तेव्हां त्याची स्पष्टता करण्याची आवश्यकता नाहीं. एवंच माल न कुजतां खपल्यापासून जी समृद्धि होते तिचें वाटप सरकार व सरकारचे जातभाई ह्यामध्येंच होत असल्यामुळें धन्याला धत्तुरा आणि चाकराला मलीदा ह्या न्यायानें शेतकरीमालकांस बहुतेक कोरडी चैनच करावी लागते, हें पूर्वीं केलेल्या विवेचनावरून स्पष्टच आहे. चार नऊ-कोटनारायणांच्या ऐवजीं जर खरोखरच खाऊन पिऊन दोन पैसे बाळगणारे सुखवस्तु गृहस्थ हजारों दृष्टीस पडते तर तें इष्टच होतें. परंतु वस्तुस्थिति अशी खास नाहीं; तर हिंदुस्थानरूपी कुरणांतील गरीब हिंदुगाईच्या पुढचा सुग्रास बलात्कारें बळकावून जे पुष्ट झाले आहेत त्यांचा, त्या गाईचे हंबरडे बंद करण्यासाठीं त्यांच्या तोंडास जाळें अडकवण्याचा हा एक पेंच आहे. नऊकोट नारायण देशांतून नाहींसे झाले आहेत हें दिसतच आहे. परंतु खाऊन पिऊन दोन पैसे बाळ-गणाऱ्या सुखवस्तूंच्या ठिकाणीं मात्र दोनप्रहरची वेळ कशी निघेल ह्या चिंतेनें ग्रस्त झालेलें भिकार वाढत आहे. खेड्यापाड्यांतही हल्लीं नाणें पूर्वींच्या मानानें अधिक चमकूं लागलें आहे हें खरें. तरी त्या नाण्याची पूर्वींची किंमत राहिली नाहीं. पूर्वीं ज्या ठिकाणीं एका रुपयानें कार्य होत होतें त्याच ठिकाणीं आतां दोनही पुरेनातसे झाले आहेत. पूर्वीं दोन पैसे लोकांजवळ नसले तरी खाण्यापिण्याची ददात पडत नसे. हल्लीं जरी कांहींपाशीं दोन पैसे असले तरी त्यांच्या पाठीमागची चिंता कायमच आहे. पूर्वीं पंचवीस तीस रुपये दरमहा-मध्यें जसा संसार होत असे तसा आजकाल शंभर रुपये दरमहामध्येंही होत नाहीं, हें अनुभवसिद्ध आहे. एवंच नऊकोट नारायण जाऊन सर्वच पोटार्थी बनले. एक धड ना भाराभर चिंध्यांचा सुकाळ होत आहे. संपत्तीची सम वांटणी होणें इष्ट आहे असें अर्थशास्त्राचें एक तत्व ज्यांनीं स्थापन केलें आहे त्यांचेच देशांत आमच्या पूर्वींच्या सर्व नऊकोट नारायणांस बगलेंत मारणारे रॉथ् चाईल्ड्स् उत्पन्न होत असून संपत्तीच्या वांटणीची पूर्ण असमता दृष्टीस पडत आहे. ह्या

पाश्चात्य कुबेरांचें उत्पन्न दर सेकंदासही नऊ कोट आहे असें ह्मटल्यानें अतिशयोक्ति न होतां त्यांच्या संपत्तीची योग्य कल्पना करितां येण्यासारखी आहे. तात्पर्य इतकेंच कीं सर्वांस नीट खाण्यापिण्यास मिळत असतां जरी संपत्तीची असमता देशांत वास करीत असली तरी ती पतकरली; पण ही उलट्या अंबारीची मालकी देणारी भिकारी समता नको असें कोण ह्मणणार नाहीं? अर्थशास्त्राच्या आधारावर केलेल्या संपन्नतेच्या तर्कानें दरघडी अनुभवास येणारी गरीबी कशी दूर व्हावी? असें नसतें तर उद्योगधंदे उभारण्यासाठीं परदेशीय भांडवलाची काय जरूर होती? मि० टाटा यांस लोखंडाच्या खाणींचा कारखाना काढण्यासाठीं लागणाऱ्या भांडवलाप्रीत्यर्थ परदेशांकडे पहाण्याची काय हौस आहे? परंतु तसें करणें त्यांस भाग झालें आहे. एकंदरींत अनुभवापुढें तर्कशास्त्र काय कीं अर्थशास्त्र काय केवळ लंगडें होय हें निर्विवाद आहे. ह्या देशांतील संपत्तीचा केवढा मोठा पाट पश्चिमवाही झाला आहे आणि त्यामुळें आमच्या अंगास सुरकुत्या पडून शिरा कशा टपटपीत उडून दिसूं लागल्या आहेत ह्याचें आंकडेशास्त्राचे आधारानें केलेलें सविस्तर वर्णन ‘ संपन्न हिंदुस्थान ’ (प्रास्परस इंडिया) ह्या पुस्तकांत उत्तम केलें आहे. असो, आतां व्याजाच्या दराचा विचार करूं. व्याजाचा दर आणि संपत्तीचा पुरवठा हे व्यस्त प्रमाणांत असतात. आणि व्याजाचा दर ज्याअर्थी पडत चालला आहे त्याअर्थी संपत्ती वढत असली पाहिजे असें कित्येकांस वाटतें. पण त्यांच्या असें लक्षांत येत नाहीं कीं व्याजाचा दर हा देशांतील सर्व संपत्तीवर अवलंबून नाहीं. व्यवहाराची ज्यास थोडीशीही ओळख आहे त्यास तेव्हांच असें कळून येईल कीं दागिन्यांत व इतर अलंकारांत गुंतलेली अथवा पुरून ठेवलेली संपत्ति व्याजबट्टयाचे दृष्टीनें अस्तित्वांतच नाहीं. तेव्हां तिचा व्याजाचे दरावर कांहींच परिणाम होत नाहीं. ह्मणजे व्याजाचा दर देशांत असणाऱ्या संपत्तीवर वास्तविक अवलंबून नसतां कर्जाऊ लागण्यास जेवढी संपत्ति उपलब्ध असते तेवढ्याच संपत्तीचे परिमाणावर अवलंबून आहे. शिवाय व्याजाचा दर ह्या एकाच गोष्टीनें ठरत नाहीं. तो ठरण्याचे

कामीं अनेक गोष्टींचा संबंध प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष येत असतो. त्यांपैकीं ऋणकोची पत, त्याचा प्रामाणिकपणा, देशांतील बंदोबस्त, सरकारी न्यायपद्धति, इतर धंद्यांतील फायद्यांशीं तुलना इत्यादि गोष्टी मुख्य होत. आतां पूर्वीं संपत्ति विपुल असतांही व्याजाचा दर जबर होता ह्याचीं कारणें अशीं कीं तिचा बराच भाग अलंकार व दागिने ह्यांत, आणि चोर, लुटारू, पेंढार, परचक्र ह्यांच्या धास्तीनें जमिनींत, गडप झाल्यामुळें कर्जाऊ लागण्यास थोडाच उपलब्ध होता शिवाय देशांत शांतता नसून न्यायपद्धतीहि अनिश्चित पडल्यामुळें दुसऱ्यास कर्ज देणें धोक्याचें असे. आणि शेतीमध्यें अतोनात फायदा होत असल्यामुळें ह्मणजे खर्चवेंच, सरकारदेणें इत्यादि वजा जातां शेंकडा पन्नासांपर्यंतही फायद्याची मजल जात असल्यामुळें धनकोस पंचवीस तीस व्याज व ऋणकोस तितकेंही कबूल करून कर्ज घेण्यास परवडत असे. आतां आमची संपत्ति जरी आह्मांस सोडून चालली आहे तरी व्याजाचा दर दिवसेंदिवस कमीच होत आहे तो कां हेंही समजणें कठीण नाहीं. जी काय थोडीशी माया लोकांजवळ आहे ती सर्व बाहेर आहे, दागिन्यांत व जमिनींत पूर्वींच्या शतांशही गुंतून राहिली नाहीं; आणि लोकांमध्यें शांतता असून न्यायाचे कचेऱ्यांतही देण्याघेण्यासंबंधाचा निकाल बहुतेक योग्य व वेळेवर होत आहे; ह्यामुळें व्याजाचा दर पडतच आहे. तथापि ह्या पडतीचें सर्वांत महत्वाचें व प्रधान कारण ह्मटलें ह्मणजे आमचा मुख्य धंदा जो शेती त्यांतील बरकतीची शून्याकडील गति हें होय. शेतकरी लोकांस खर्चवेंच व वाढत्या प्रमाणावर असलेलें जबर सरकार देणें वारूनच जर शेंकडा जवळ जवळ भोंपळ्याएवढा नफा राहूं लागला तर व्याजाचा दर पडूं नये तर काय चढावा? एवंच ह्या व इतर सर्व गोष्टी कायम राहत्या तर व्याजाचे दरावरून संपत्तीची बढती होत आहे हें अनुमान शुद्धपणें निघालें असतें. परंतु ह्या व इतर गोष्टी बदलल्या असल्यामुळें आणि विशेषेंकरून वर सांगितल्याप्रमाणें शेतीस मंदी आल्यामुळें आणि इतर हस्तकलेचे धंदेही पाश्चात्य यंत्रकलेच्या राक्षसी कारखान्यापुढें निस्तेज होऊन बहुतेक मृतप्रायच झाल्यामुळें

देशास कंगालदशा प्राप्त होत असतांही व्याजाचा दर सारखा उतरत आहे ह्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं एक नाहीं. आतां परदेशीय भांडवलानें कां होईना, आपल्या देशांत कपड्याचे, तेलाचे, सोन्या-रुप्याच्या खाणींचे, कोळशाच्या खाणींचे जे अनेक धंदे उदयास आले आहेत त्यांनीं आपल्या देशांतील भूमिगत संपत्ति प्राप्त होऊन त्याची इतर राष्ट्रांप्रमाणेंच भरभराट होत आहे, ह्या मुद्याचें परीक्षण केलें पाहिजे. अमेरिकेनें अठराव्या शतकांत, जपाननें ह्या गेल्या एकोणिसाव्या शतकाचे उत्तरार्धांत व हालंडसारख्या चिमुकल्या देशांनीं अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत परकीय भांडवल स्वदेशांत आणून आप-आपल्या देशांतील खनिज संपत्ति हस्तगत करून घेऊन ते चांगले गबर बनले ह्यांत संशय नाहीं. असें जर आहे तर तशाच प्रकारें हिंदुस्थान देशाला मात्र जळवा लागल्यासारखें होऊन तो दिवसेंदिवस कां शुष्क होत जावा हें एक मोठें गूढ आहे. परंतु तें उकलण्यास फारशी मेहनत, अक्कल किंवा वेळ खर्च करण्याचें प्रयोजन नाहीं. त्या देशाशीं आपल्या देशाची तुलना केली ह्मणजे तें सहजच स्पष्ट होणार आहे. ते देश स्वतंत्र असून त्यांतील सर्व उद्योगधंदे त्यांचेच ताब्यांत होते. हिंदुस्थान परतंत्र असून सर्व नवीन उद्योगधंदे दुसऱ्यांचे हातांत आहेत. त्या देशांतील लोकांनीं परकी भांडवल आह्मीं कर्जाऊ आणीत नाहीं तर तें इंग्रजी कंपन्या घेऊन इकडे येतात. त्या देशांतील लोकांचीच परकी भांडवलानें चालणाऱ्या नवीन कारखान्यावर मालकी असल्यामुळें सर्व नफा त्यांसच मिळत असे. हिंदुस्थानांत परकी भांडवलानें चालणाऱ्या बहुतेक नवीन कारखान्यांवर इंग्रजी कंपन्यांची मालकी. तेव्हां मजुरी जरी आमच्या लोकांस मिळाली तरी सर्व फायदा इंग्रजी कंपन्यांचाच. ह्यामुळें त्या देशांतील लोकांनीं कर्जाऊ आणलेल्या भांडवलाची होणाऱ्या नफ्यांतून कांहीं दहा पंधरा वर्षांत सव्याज फेड केल्यानंतर सर्वच नफा त्यांचा त्यांसच मिळूं लागल्यामुळें ते देश तेव्हांच धनसंपन्न झाले; परंतु हिंदुस्थानांतील नवीन धंद्याची मालकी इंग्रजी कंपन्यांचीच पडल्यामुळें मुद्दल भांडवलाची होणाऱ्या नफ्यानें दामदुप्पट नव्हे दामतिप्पट झाली

तरी सर्व नफा त्यांचेच खिशांत पडून तो इंग्लंडास जात असल्यामुळें आह्मीं भिकारी ते भिकारीच. ज्याप्रमाणें आमच्या मालकीच्या जमिनींत खणतां खणतां आमच्या नशिबानें आह्मांस ठेवणें ह्मणजे द्रव्यनिधि सांपडला तर त्याजवर इंग्रज सरकारची धाड पडून त्यापैकीं आमच्या हातीं एखादा तुकडाच लागतो; त्याचप्रमाणें आमच्याच देशांतील हें भूमिगत द्रव्य आह्मींच मेहनत करतां करतां उदयास येतें तरी आह्मांस फक्त मजुरीच मिळून बाकीचें इंग्लंड देशाच्या किनाऱ्याची वाट धरितें. नवीन नवीन कारखाने देशांत उत्पन्न होत आहेत हें निर्विवाद आहे. त्यांपासून स्वदेशांतील गुप्त संपत्ति बाहेर पडत आहे हेंहि निर्विवाद आहे. आणि हें परकी भांडवलाच्या आधारावर होत आहे हेंहि पण निर्विवाद आहे. इतर देशांत व हिंदुस्थानांत फरक इतकाच कीं इतर देशांतून ही बाहेर पडत चाललेली संपत्ति मुद्दलाची सव्याज फेड होईपर्यंतच बाहेर जाऊन नंतर त्या त्या देशांतच राहत असे. परंतु आमच्या आर्यभूमींतून बाहेर पडणाऱ्या संपत्तीनें एकसारखा बाहेरचा रस्ता धरला असून ती कधींही देशांत राहण्याचें चिन्ह नाहीं. इंग्रजी कंपन्यांसच हिंदुस्थानांत नवीन नवीन लहानमोठे कारखाने काढण्याचे परवाने बिनतक्रार मिळत असून देशी मंडळ्यांस—आधीं मंडळ्या फारशा नाहींतच, पण त्यांतूनही एखाद दुसरी तयार झाल्यास तीस——ते मिळण्याची मारामारच जी अनुभवास येते त्यांतील इंगित वरील विवेचनावरून स्पष्ट होइलच. एवंच दळणवळणाची सुलभता, व्याजाच्या दराची पडती, नव्या नव्या कारखान्यांची उत्पत्ति इत्यादि देशसमृद्धीचीं अनेक लक्षणें जरी आज हिंदुस्थानांत दृष्टीस पडत आहेत आणि त्यामुळें कर्झन हामिल्टनादि इंग्रजी मुत्सद्यांस हिंदुस्थानांतील व्यापारवृद्धि व औद्योगिक प्रगति ह्यांसंबंधानें तासचे तास कालमचे कालम भरणाऱ्या लांबलांब, गोडगोड व वक्तृत्वप्रदर्शक अशा गप्पा मारून जरी सत्तेच्या दराऱ्यानें व अस्सल जादुगिरीनें हिंदुस्थानांतील लोकांस नजरबंद स्तब्ध बसवितां येत आहे तरी हें इंद्रजाल संपून लोक शुद्धीवर आले ह्मणजे रोजची सक्तमजुरी चालली असतांही पोटास बसणारा

चिमटा अनुभवास येऊन त्यांस दुःख झाल्यावांचून रहात नाहीं. आह्मां सुशिक्षितांची व हिंदुस्थान देशाची स्थिति एकच आहे. अंगावर घालण्याचे कोट, सदरे वगैरे कपडे मात्र इंग्लिश फॅशनप्रमाणें फुगत असून शरीर जसें आंत काडीपेहलवान बनत आहे, त्याचप्रमाणें हिंदुस्थान देशाचीं वरील चिन्हें सांपत्तिक पुष्टतेचीं दिसत असून आंतून मात्र तो वास्तविक अस्थिपंजर होत आहे हें उघड आहे. पंचामध्यें जर मेडिकल कालेजांतील हाडांच्या सांपळ्याचे काबुली सदरा व काबुली विजार घातलेलें एक मार्मिक चित्र काढलें तर त्यापासून अर्वाचीन सुशिक्षित विद्वानांचा व आजकालच्या हिंदुस्थानच्या सांपत्तिक स्थितीचा योग्य बोध झाल्यावांचून राहणार नाहीं.

येथपर्यंत आमच्या सुशिक्षणाविषयीं व धार्मिक, सामाजिक, राजकीय, व औद्योगिक सुधारणांसंबंधानें बराच ऊहापोह झाला. आतां अखेरीस सुशिक्षण व सुधारणा ह्यांविषयीं सर्वसाधारण एक दोन गोष्टी सांगून आटपतों. आमच्या सुशिक्षितत्वाच्या शंकेचीं वर जीं कारणें दर्शविलीं आहेत त्यांशिवाय अलीकडे अलीकडे आमच्या शिक्षणांतील एक उणीव ह्मणून दाखविण्यांत येते. आह्मांस धर्म व नीति ह्यांचें शिक्षण मुळींच मिळत नाहीं. त्यामुळें आह्मीं बहुतेक धर्मलंड होत असून नीतीचाही आमच्यावरील पगडा शिथिल होत आहे. धर्म व नीति ह्यांमधील परस्पर संबंध व त्यासंबंधानें आमचा व पाश्चात्यांचा मतभेद हा विषय मनोरंजक आहे. परंतु तत्संबंधाचा विचार येथें अप्रकृतच होय. तेव्हां धर्म व नीति ह्यांच्या शिक्षणांची उणीव जी सध्यां भासत आहे आणि जी दूर करण्यासाठीं हल्लीं नवीन पुस्तकें तयार होत आहेत त्या उणीवीसंबंधानें इतकेंच लक्षांत वागविलें पाहिजे कीं धर्म हा एक निराळा विषय समजून त्यावरील दोन चार पुस्तकें शिकवून विद्यार्थी जरी तयार झाले तरी त्यापासून आमच्या सुशिक्षितपणांतील मुख्य व्यंग दूर होईल असें मला वाटत नाहीं. निरनिराळ्या देशांतील लोकांची स्वाभाविक प्रकृति निरनिराळी असल्यामुळें जशा प्रकारचें धर्मशिक्षण एका देशांत

समाधानकारक होईल तशाच प्रकारचें धर्मशिक्षण दुसऱ्या देशांतही तसेंच समाधानकारक होईल असें नाहीं. इंग्रज लोक निसर्गतः बनिये; त्यांची स्वाभाविक सर्व दृष्टी व्यापारीय तत्वाची; ह्मणजे त्यांचें सर्व लक्ष व्यावहारिक नफ्यातोट्याकडे. तेव्हां त्यांची नीति नफ्यातोट्याची; व त्यांचा धर्मही नफ्यातोट्याचेच तत्त्वावर उभारला जाणें साहजिक आहे. उपयुक्तता हें ह्या नफ्या तोट्याच्या दृष्टींचें शिष्ट नांव होय; आणि जनहितवाद किंवा सर्वांत अधिक संख्येचें सर्वांत अधिक हित, हें ह्यांचें तात्विक स्वरूप होय. स्वार्थत्याग व निरपेक्षता इत्यादि सद्गुणांची किंमतसुद्धां ह्या बनियेशाही तागडीनें ठरावयाची. आणि जरी कंपनी सरकारचा अधिकार संपल्यानें पैशावरील त्याची निशाणी तागडी नाहींशी झाली आहे तरी नैसर्गिक स्वभाव थोडाच पालटावयाचा आहे. ‘ सद्वर्तनासाठीं सद्वर्तन ’ किंवा ‘ नीतिसाठीं नीति ’ व ‘ ज्ञानासाठीं ज्ञान ’ अशा प्रकारचीं भव्य व दिव्य सूत्रें जरी त्यांच्या तोंडीं व ग्रंथीं खेळत असलीं तरी तींहि अखेरीस तागडींतच पडावयाचीं. ह्मणजे तत्संबंधाचा वाद सुरू होऊन त्यांची इष्टता जर ठरविण्याचा प्रसंग आला तर त्या वेळीं तागडीशिवाय चालावयाचेंच नाहीं. ह्या तागडींत घालावयाचीं त्यांचीं वजनें सुख व दुःख. तेव्हां धर्माचें आचरण कितपत इष्ट आहे हा प्रश्न असतांनाही त्याचा निकाल सुखदुःखाच्या वजनांनींच तागडीचेच द्वारा लागावयाचा ह्यात संशय नाहीं. जित्याचा स्वभाव मेल्याशिवाय जात नाहीं, ह्या न्यायानें बनियांना शेरतराजूशिवाय ध्यानींमनीं स्वप्नींही दुसरें कांहीं न दिसणें साहाजिक आहे. ह्या इंग्रजी बनियेशाहींचें आमच्या इकडील भाषेनें वर्णन करावयाचें झालें तर तें असें. धर्म, अर्थ, काम, व मोक्ष हे आमच्यामध्यें चार पुरुषार्थ गणिले आहेत. त्यांपैकीं मोक्ष किंवा मुक्ति हीहि चार प्रकारची समजली जात आहे. सलोकता, समीपता, सरूपता, व सायुज्यता. ह्यांची प्रतवारीही वरील क्रमानेंच आहे; ह्मणजे सलोकता ही कनिष्ठ व सायुज्यता ही श्रेष्ठ होय. ह्या चार मुक्तींपैकीं सलोकता व समीपता ह्यांचीच कल्पना ख्रिस्ति लोकांस आहे; सरूपता व सायुज्यना ह्या त्यांच्या आटोक्याचे अगदीं

बाहेर आहेत. आणि पहिल्या दोहोंची जरी त्यांच्या पूर्वजांस ओळख असून हल्लींही त्यांचा शाब्दिक खल पाद्र्यांचा धंदा करणाऱ्या ख्रिस्त्यांमध्यें होत असतो, तरी त्यांस व इतरांसही ह्मणजे बहुतेक सर्व ख्रिस्त्यांस तो शुष्क वाटूं लागला आहे. एवंच मुक्ति ह्मणजे निवळ शाब्दिक; तेव्हां तिच्याविषयीं त्यांच्या दृष्टीनें बोलावयासच नको. आतां राहिले धर्म, अर्थ, व काम; ह्यांपैकीं अर्थ व काम ह्यांचीच काय ती ते पुरुषार्थांत गणना करितात; आमचा धर्म शब्द व्यापक असून त्यामध्यें पाश्चात्य धर्म व नीति ह्या दोहोंचाही अन्तर्भाव होतो. तेव्हां आमच्या पुरुषार्थांपैकीं राहिलेला जो धर्म, ह्मणजे त्यांचा धर्म व त्यांची नीति, ह्यांस ते पुरुषार्थ समजतच नाहींत; तर अर्थ व काम हे पुरुषार्थ प्राप्त करून घेण्याच्या साधनामध्यें त्यांचा अन्तर्भाव होतो. एवंच पाश्चात्य दृष्टीनें मोक्ष केवळ शाब्दिक गप्पा-ष्टकांत शिरल्यामुळें आणि धर्म—पाश्चात्य धर्म व नीति—हा केवळ अर्थ व काम ह्यांच्या साधनांच्याच पदास पोंचल्यामुळें ह्मणजे पुरुषार्थाचे पदापासून तो भ्रष्ट झाल्यामुळें पाश्चात्यांचे दृष्टीनें अर्थ व काम हे दोनच पुरुषार्थ राहिले. आतां सीतेनें वानरांस वर दिल्याप्रमाणें ह्मणा किंवा दैवयोगानें ह्मणा किंवा अर्वाचीन विचारास अनुसरून यदृच्छेनें ह्मणा इंग्रजांस हिंदुस्थानचें राज्य मिळून तेच आमचे शिक्षक बनल्या-मुळें अर्थ व काम हेच काय ते दोन पुरुषार्थ, धर्म त्यांचें फार तर एक साधन होय आणि मोक्ष केवळ शुष्क होय हीं व अशाच प्रकारचीं शिक्षणसूत्रें आह्मांस पढविण्यांत येऊं लागल्यामुळें आह्मीं अर्थ व काम ह्यांचाच फक्त मार्ग चोखाळावा हें साहजिक आहे. आतां धर्म, अर्थ, काम, मोक्ष ह्या चार पुरुषार्थांकडे आमच्या दृष्टीनें पहा. पाश्चात्य दृष्टीनें जो केवळ शुष्क तो मोक्ष आह्मांस श्रेष्ठ होय; धर्माचा नंबर दोन; अर्थाचा तिसरा व कामाचा चवथा. आतां वर्णाश्रमांचे बाजूनें त्यांजकडे पहा. ब्रह्मचर्याश्रम हा पुरुषार्थांच्या तयारीचा होय; संन्यास व वानप्रस्थ ह्यांची दृष्टि विशेषेंकरून मोक्षावर; आणि गृहस्थाचे पुढें धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ आहेत. ह्यांपैकीं अर्थ व

काम हे गौण व धर्म प्रधान होय. कालिदासानें दिलीपाविषयीं

'अप्यर्थकामौ तस्यास्तां धर्म एव मनीषिणः।'

असें जें ह्मटलें आहे त्यांतील रहस्य हेंच आहे. आतां चातुर्वर्ण्याचे दृष्टीनें धर्मार्थ-काममोक्षांकडे पहा. ब्राह्मण व क्षत्रिय ह्या दोहोंचें धर्माकडे द्वितीय आश्रमांत व मोक्षाकडे तृतीय व चतुर्थाश्रमांत लक्ष असतें. ह्मणजे ब्राह्मण व क्षत्रिय गृहस्थांचे दृष्टीनें धर्म, प्रधान पुरुषार्थ होय व अर्थ व काम हे गौण होत. वैश्यांचे दृष्टीनें अर्थ व काम हे प्रधान असून धर्म गौण होय; आणि शूद्रांस पुरुषार्थच नाहीं. ह्या विवेचनावरून आह्मीं पाश्चात्य उपदेशानें व पाश्चात्य उदाहरणानें आज काल अर्थ व काम ह्यांचेच पाठीमागें लागल्यामुळें आह्मां सर्व ब्राह्मण व क्षत्रियांची वैश्यवर्गांत गणना केली पाहिजे असें जर कोणी ह्मणेल तर त्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. तरी पण खरे हिंदु वैश्य व आह्मीं पाश्चात्य ख्रिस्ति किंवा इंग्रजी वैश्य ह्यांची जर बारकाईनें तुलना करून पाहिलें तर त्या दोहोंत थोडासा महत्वाचा फरक दिसून येईल. पाश्चात्य दृष्टीनें अर्थ व काम हेच पुरुषार्थ होत, धर्म हा पुरुषार्थच नव्हे; तर तो अर्थकामांचें एक साधन होय; ह्मणून ताकापुरती आजीबाई किंवा कामापुरता मामा ह्या न्यायानें गरज पडेल तितकें व त्याच प्रसंगीं त्याचें अवलंबन केलें ह्मणजे झालें; त्या मर्यादेबाहेर व अन्य प्रसंगीं धर्माचें गवाळें खुंटीस लावणें हाच धर्म होय. परंतु खऱ्या हिंदु वैश्यांनीं अर्थ व काम ह्यांस जरी प्राधान्य दिलें तरी ते धर्माची पुरुषार्थामध्येंच गणना करितात. अर्थात् धर्माला जरी त्यांनीं गौणपद दिलें असलें तरी तें त्यास कधींच गचांडी द्यावयाचे नाहींत. तेव्हां आर्यदृष्टीनें अर्वाचीन ख्रिस्ति लोकांची व त्याजबरोबर आह्मां अर्वाचीन ब्राह्मणक्षत्रिय किरिस्तांवांची किंवा सुशिक्षितांची पायरी खऱ्या वैश्यांचेही जराशी खालचीच होय हें उघडच होय; तथापि वाटल्यास त्यांचा फार तर वैश्यवर्गांत अन्तर्भाव करण्यास हरकत नाहीं. आह्मांमध्यें खरे ब्राह्मण व खरे क्षत्रिय उरलेच नाहींत; आणि आमचे

अर्वाचीन सुशिक्षित द्रव्य व विषयसुख ह्यांच्या पाठीस लागले असून तत्संपादनांतच आयुष्याची इतिकर्तव्यता आहे असें समजत आहेत असें जें आरंभीं ह्मटलें आहे तें ह्याच दृष्टीनें होय. असो. सध्यां स्पष्ट करून दाखविल्याप्रमाणें इंग्रज लोक निसर्गतः व्यापारी पडल्यामुळें त्यांची सर्व प्रकारची उन्नति शेरतराजूनेंच झाली आहे; ह्यामुळें अनेक विद्यांपैकीं एक विद्या ह्या दृष्टीनें दिलेलें धर्म-शिक्षण त्यांस पुरेसें होत आहे. परंतु आह्मीं जरी आलीकडे इंग्रजी बनिये बनत चाललों आहों तरी निसर्गतः सर्व हिंदु धार्मिक आहेत. आणि ह्यामुळेंच जेव्हां जेव्हां त्यांची उन्नति झाली आहे तेव्हां तेव्हां ती धर्माचे पायावर उभारली गेलेली आहे. ह्मणून आमच्या उन्नतीस धर्माची पायाचे जागीं अवश्यकता असल्यामुळें धर्म हा आमच्या शिक्षणांतील केवळ एक विषय होऊन उपयोगी नाहीं; तर तो मुख्य विषय झाला पाहिजे. ह्मणजे ज्यांस खरे ब्राह्मण व खरे क्षत्रिय होण्याची इच्छा असेल त्यांस तरी धर्मामध्येंच आपल्या आयुष्याची इति-कर्तव्यता असून अर्थ व काम गौण होत असें बाळकडू पाजलें पाहिजे; कारण वर सांगितल्याप्रमाणें राष्ट्राची कोणत्याही प्रकारची उन्नति ह्या दोन वर्णांच्याच लोकांवर अवलंबून असते हें उघड आहे. आजच्या बनियेशाही शिक्षणामुळेंच आह्मांस कोणताही लहान मोठा उद्देश पुढें ठेवून तत्प्रीत्यर्थ आपलें सर्वस्व—तनुमनधन—अर्पण करण्याची योग्यता आह्मांस प्राप्त होत नाहीं; आणि खरी ज्ञानसंपन्नता ह्या योग्यतेनेंच ठरावयाची असते. तेव्हां धर्मासारखा श्रेष्ठ उद्देश पुढें ठेवून धर्मप्रीत्यर्थच आपलें सर्व धन खर्च करण्यास, धर्मप्रीत्यर्थच आपल्या सर्व विचाराचा व मानसिक इतर सर्व शक्तींचा उपयोग कर-ण्यास, आणि धर्मप्रीत्यर्थच मरण्यासही तयार असल्यावांचून आह्मांस ज्ञानसंपन्नत्व मिळावयाचें नाहीं व आमची उन्नति कधींही व्हावयाची नाहीं. तात्पर्य, ज्ञ (ज्ञाना) पर्यंत आमची मजल पोंचण्यासाठीं

आह्मांस प्रथम कनक, कांता, व कीर्ति ह्या क-का-कीचे बाराखडींतून सुटून पुढें गेलेंच पाहिजे हें उघड आहे.

सुशिक्षण हा सुधारणेचा पाया किंवा उगम होय. हल्लीं आह्मांस मिळणारें शिक्षण धर्महीनच नव्हे धर्मविरुद्ध अथवा धर्मलंड पडल्यामुळें त्याजपासून निघणारी सर्व सुधारणा त्याच मासल्याची असावी ह्यांत नवल नाहीं. धार्मिक, सामाजिक, राजकीय, औद्योगिक ह्यापैकीं कोणत्याही बाबतींत आह्मांस डोकें वर काढितां येऊं नये इतकेंच नव्हे तर डोंकें वर काढणें वाईट आणि राज्यकर्त्यांपुढें डोकें लववून चालणेंच चांगलें अशीच बुद्धि व्हावी अशा प्रकारचें आजकालचें शिक्षण आहे. आमचें राजकीय श्रेष्ठत्व नष्ट झाल्यावर धार्मिक व सामाजिक श्रेष्ठत्व नष्ट करण्याचा डाव इतका बेमालुम चालला आहे कीं त्यांत आमचा पाय पुढेंच आहे ह्मणजे आमची प्रगतिच होत आहे अशीही आह्मांस भुरळ पडली आहे. औद्योगिक बाबतींत तर अस्सल ह्मणजे हाडामांसाच्या व ब्राह्मणांच्या जानव्याप्रमाणें, तराजूचीच निशाणी धारण करणाऱ्या आणि बोलून चालून द्रव्यार्जनाचेच पाठीस लागलेल्या पटाईत व्यापाऱ्यांपुढें, राजकीय व धार्मिक उतरंडीवर खालीं घसरत असतां आमचें कांहीं एक तेज पडूं नये हें साहजिक आहे. अशा स्थितींत इंग्लंडच्या व इतर प्राच्य देशांच्या इतिहासाचे ज्ञानानें जरी आमच्यामध्यें प्रजासत्ताक पद्धतीवर राजकीय उन्नतीची थोडीशी हाव उत्पन्न झालीच तरी शतकेंच्या शतकें आह्मांस नुसतें कसें झुलवीत ठेवावें ह्याची आयर्लंडच्या अनुभवानें आमच्या राज्यकर्त्यांस बिलकुल काळजी उरली नाहीं. राजकीय सुधारणेचे आधीं सामाजिक सुधारणा झाली पाहिजे हें सामाजिक सुधारणेचें दुट्टें जें आमच्या पाठीमागें लागलें आहे त्यांतील इंगित हेंच होय. नियंत्रित व्यापारापेक्षां अनियंत्रित व्यापारच देशाच्या भरभराटीस अवश्य आहे, संपत्तीची वांटणी जितकी अधिक सम होईल तितकें चांगलें इत्यादि, सुधारणेच्या ईश्वरप्रणीत मृत्रांचा आमच्यांत प्रसार होण्याचें बीज तरी हेंच आहे. त्याचप्र-

माणें ब्राह्मणांनीं मराठ्यांचें राज्य बुचाडलें व अखेरीस बुडविलें, धर्माचे बाबतींतील ब्राह्मणांचें वर्चस्व केवळ आपलपोटेपणाचें होय, मुसलमान धर्मभोळे नव्हत धर्मवेडे आहेत असें ह्मणून हिंदूंच्या विरुद्ध त्यांस धर्माच्या आचारविचारांत, शिक्षणप्रसारांत, व नोकरीच्या वांटणींत जरासें गोंजारावयाचें इत्यादि खुळ्या प्रजेंत दुही माजवून राज्य चालविण्याचें कंकण बांधलेल्या लोकांस अवश्य आहेत. ह्या सर्व प्रकारांबद्दल राज्यकर्त्यांस दोष देणें व्यर्थ होय. परराष्ट्रावर जर राज्य चालवावयाचें आहे तर तें धर्मराज्य कोणास कधींही फार दिवस करितां यावयाचें नाहीं. परंतु राज्यकर्त्यांची ही राजनीति मार्मिकपणें न समजून त्यांच्याच तंत्रानें, सर्वस्वी परप्रत्ययनेयबुद्धित्व अंगीकारून चालल्यानें अमेरिकेंतील रेडइंडियन्सप्रमाणें आह्मी लवकरच नामशेष होऊन गेलों नाहीं तरी आमचा धर्म, आमची भाषा, आमचा आचारविचार, आमच्या विद्या, आमच्या कला, आमची रहाणी, इत्यादि आमचें सर्वस्व नष्ट होऊन आह्मीं किरिस्तांव होऊन जाऊं ह्यांत शंका नाहीं. पुराणविध्वंसपूर्वक नूतनारोपण करण्याची प्रचलित सुधारणा प्रगतीचे नांवानें अशीच चालू ठेविल्यास वरील स्थित्यंतरास मदत करण्याचेंच श्रेय आपणांस मिळणार आहे. इतकी धन्यता आपणांस नको असल्यास, अशा प्रकारची आमची कीर्ति इतिहासांत न रहावी असें वाटत असल्यास वेळेवर जागें होऊन आह्मीं पुरातन पुनरुज्जीवनास व जीर्णोद्धारासच लागलें पाहिजे. आणि हें काम करण्यांत दुसरी कोणतीही इच्छा न धरतां आपलें सर्व तनमनधन खर्चीं घातलें पाहिजे. राष्ट्रीयसभा, सामाजिक परिषद्, सार्वजनिक सभा, औद्योगिक मंडळ्या, गोरक्षिणी सभा, ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज, वर्णाश्रमधर्मविध्वंसक (?) मंडळ्या इत्यादि बऱ्या वाईट कोणत्याच संस्थेची वाचालतेपलीकडे क्रियेपर्यंत मजस पोंचली नाहीं ह्याचें कारण इतकेंच कीं, त्या त्या गोष्टींची खरी कळकळ कोणासच नाहीं; ज्याला त्याला वरील संस्थांपैकीं कोणत्यातरी दोन चार संस्थांचा सभासद होऊन, ह्मणजे बरीचशी बडबड करून, फार तर थोडीशी द्रव्याची घस सोसून कांहीं विशिष्ट जनसमूहांत व साधल्यास राजदरबारांतही बरें ह्मणवून

घेण्याचीच इच्छा आहे. कोणीही लहान मोठ्या कोणत्याच गोष्टीसाठीं आपलें इहसर्वस्व अर्पण करण्यास किंवा मरण्यास तयार नाहीं. ही देहावरील, धनावरील व डोळ्यांदेखतच्या मानावरील अतिप्रीति जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत उन्नतीच्या गप्पा मारीत आह्मीं अवनतीच्याच मार्गानें चालावयाचें; आणि तोंपर्यंत श्रीमद्भागवताचे अखेरीस वर्तविलेलें कलियुगांतील स्थितीचें भविष्य अक्षरशः खरें ठरतें कीं काय ही भीति कायम रहावयाची. 'श्रीशुकाचार्य ह्मणतात— राजा परीक्षिते, कालाची गति विलक्षण असल्यामुळें, कलियुगामध्यें दिवसानुदिवस धर्म, सत्य, शुद्धि, क्षमा, दया, आयुष्य, बल, व विवेक हीं सर्व नष्ट होत जातील. ज्यापाशीं द्रव्य असेल त्यासच कुलीन, सज्जन, व गुणवान् ह्या संज्ञा मिळतील. धर्म व न्याय हीं शक्तीच्या जोरावर चालतील; त्यांत सत्यासत्यविचार मुळींच आढळणार नाहीं. कोणीही वधूवरांच्या कुलगोत्रांची वगैरे पुसतपास करीत बसणार नाहीं; एकमेकांचें मन मिळालें ह्मणजे तितक्यावरच स्त्रीपुरुषयोग घडून येईल. क्रयविक्रयादि व्यवहारांत कपटास प्राधान्य प्राप्त होईल. स्त्रियांच्या अथवा पुरुषांच्या ठिकाणीं रतिकौशल्याचें मात्र चातुर्य दिसेल; शांति, तितिक्षा, दातृत्व इत्यादि सद्गुणांचा केवळ अभावच आढळेल. ब्राह्मण हा केवळ यज्ञोपवीतावरूनच ओळखावा लागेल; त्याच्या ठायीं ब्रह्मज्ञानाचे नांवानें शून्य दिसेल. दंड, चर्म इत्यादिक चिन्हांवरून आश्रम ओळखावे लागतील; त्या त्या आश्रमानुरूप आचरणाचा पूर्ण लोप होऊन जाईल. आश्रमांतर करणें ह्मणजे वेषांतर करावयाचें, ह्यापलीकडे त्यांत कांहीं एक अर्थ उरणार नाहीं. न्यायादिकांत लबाडी होईल; ज्याचा पैसा त्याचा न्याय असा अनर्थ घडेल. अचावचा बोलतां येणें हेंच पांडित्याचें लक्षण समजतील. दरिद्री लोकांवर चोरीचे आरोप येतील. दांभिक पुरुष साधु ठरेल. विवाहादिकांस विधीची अवश्यकता राहणार नाहीं. स्नान हें केवळ शरीर तुळतुळीत दिसण्यासाठींच करण्यांत येईल. गुरु वगैरे सत्पात्र पुरुषांची प्रतिष्ठा कमी होईल. दूर अंतरावरचीं तीर्थें पुण्यकारक मानलीं जातील. केश धारण करणें हें प्रमुख सौंदर्य ठरेल. पोट भरणें हाच पुरुषार्थ

होऊन बसेल. खरें बोलणारास दांडगा ह्मणतील. स्त्रीपुत्रादिकांचें पोषण करणें हेंच मोठें शहाणपणाचें काम ठरेल आणि धर्माचरण करितांना कीर्ति हाच उद्दिष्ट हेतु होईल. राजा, ह्याप्रमाणें ह्या भूतलावर अधर्म बळावला असतां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र ह्यांपैकीं जो कोणी बलिष्ठ होईल, तो बळी तो कान पिळी ह्या न्यायानें राजा बनून सर्वांवर सत्ता चालवील. नंतर त्याचे सेवक व आप्तसुहृद हे चोरांप्रमाणें वागतील. इंद्रियतृप्तीपलीकडे दुसऱ्या कोणत्याही विषयास ते महत्व देणार नाहींत. ते लोभाविष्ट होऊन निर्दयपणानें प्रजांची संपत्ति व स्त्रिया ह्यांचें हरण करितील. मग प्रजांना दे माय धरणी ठाय असें होईल. + + + + पाऊस पडणार नाहीं. दुष्काळ वारंवार पडतील. करांच्या ओझ्यामुळें प्रजा जर्जर होतील. थंडी, उष्ण, वारा, पाऊस, कलह, माराहाण इत्यादिकांनीं प्रजांची दुर्दशा उडेल. + + + मनुष्यांची आयुर्मर्यादा वीसपासून तीस वर्षांवर येईल. प्राण्यांचीं शरीरें लहान होतील. धर्मामध्यें पाखंडाचें वर्चस्व माजेल. राजे व चोर ह्यांत भेद उरणार नाहीं. मग प्रजाही राजांप्रमाणेंच अनीतिमान् होतील. लोक अकर्म व हिंसा ह्यांवर निर्वाह करतील. चारी वर्ण शूद्रप्राय बनतील इ०. ' ह्या भविष्यास सध्याच शेंकडा पन्नासांचेही वर गुण मिळून तें फर्स्ट क्लासांत नाहीं तरी त्याच्या जवळ जवळ पास होऊं पहात आहे. त्यास जर खोटें ठरविण्याची वास्तविक बेंबीपासूनची इच्छा असेल तर देह, धन, व मान ह्यांजवरील आसक्तीस फांटा देऊन श्रीमद्भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें निष्काम कर्म केलें पाहिजे. आजकाल पाश्चात्यांचे वळणावर ग्रंथरचनेचें खूळ देशसेवा व मातृभाषेची सेवा ह्या नांवावर बेंरच माजत चाललें आहे; त्यांतही भाषांतर व रूपांतर ह्या मार्गांनीं फार तर पारदर्शक किंवा परावर्तक बनून, ह्याचे दोन विचार त्याचे दोन शब्द अशी खिचडी तयार करून, प्राचीन ग्रंथप्रकाशन व फार तर स्पष्टीकरणद्वारा वाढपी बनून, आणि फारच झालें तर एखादें रद्दड चोपडें खरडून ग्रंथकार ह्मणविणाऱ्या प्रत्येक हमाल लेखकाची धनमानावरच पूर्ण दृष्टि असते हें उघड आहे. खरोखर देशसेवा किंवा स्वभाषेची सेवा ज्यास

कर्तव्य आहे त्यानें ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास ह्यांप्रमाणें केवळ निरपेक्ष बुद्धीनें, कवडीची, चांगल्या अभिप्रायाची, किंवा देहसुखाची आशा न करितां ग्रंथरचनेच्या कामीं उलट तनु, मन, धन खर्च करण्यास तयार झालें पाहिजे; तर त्यांच्या ग्रंथावर प्रकाशनानें, स्पष्टीकरणानें, कीर्तनानें, व्याख्यानानें, भजनानें, पुराणानें अशा अनेक प्रकारांनीं हजारों लोक अनेक शतकेंपर्यंत पोट भरूं शकतील; इतकेंच नाहीं तर त्यांस धर्म, नीति, भाषा, व्यवहार, इत्यादिकांचें खरें शिक्षणही मिळून ग्रंथकारास धर्मसेवा, देशसेवा, भाषासेवा, व परोपकार ह्यांचें पुण्यश्रेय प्राप्त होईल. ग्रंथरचनेच्या ह्या एकाच उदाहरणावरून निष्काम कर्म ह्मणजे काय, त्याची आपणांत कशी उणीव भासत आहे, त्यावांचून आपली अवनति कशी वृद्धिंगत होत आहे, व त्याचेचद्वारें आपली उन्नति होण्यासारखी कशी आहे हें स्पष्ट होईल.

'चणे खावे लोखंडाचे तरिच ब्रह्मपदीं नाचे'; आणि

'यदि समरमपास्य नास्ति मृत्योर्भयमिति युक्तमितोऽन्यतः प्रयातुम् ।
अथ मरणमवश्यमेव जन्तोः किमिति मुधा मलिनं यशः कुरुध्वे ॥'

अशीं वचनें विशेषेंकरून आपणांस ब्राह्मण व क्षत्रिय ह्मणविणाऱ्यांनीं पुढें ठेवून कर्तव्य करण्याची हीच वेळ आहे. डोकें जें भ्रष्ट झालें आहे तें पुन्हा स्वस्थानीं आलें ह्मणजे आणि हात जे केळीं खाण्यांत गुंतले आहेत त्यांनीं स्वकार्य स्वीकारलें ह्मणजे सर्व शरीर निरोगी होऊन पाय भलतीकडेच न जातां त्यांस वास्तविक प्रगतीची दिशा लागल्यावांचून राहणार नाहीं.

येथें माझें सुशिक्षण व सुधारणा ह्यांवरील पांडित्य संपलें. मी स्वतः पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आंतून बाहेरून पूर्णपणें अर्वाचीन सुशिक्षितच पडल्यामुळें सर्व आयुष्य ज्या नवीन आचारविचारांत गेलें त्यांच्या संवयीनें ते माझ्या स्वभावांत घुसल्यामुळें त्यांच्यापुढें माझा इलाज चालेनासा झाला आहे. अर्वाचीन सुशिक्षण व सुधारणा ह्यांची वर सांगितल्याप्रमाणें जबरदस्त शंका आल्यामुळें आलीकडील सुशि-

आहे. शिवाय सुधारणेला प्रथम पश्चिम दिशेचा सोंसाट्याचा वारा लागून ती जी भडकली होती तिची दिशा बदलली पाहिजे असें अर्वाचीन सुशिक्षितांपैकींच एका खऱ्या सुशिक्षितानें—कै० विष्णुशास्त्री चिपळुणकर ह्यांनीं—लोकांच्या निदर्शनास आणिल्यापासून तिला योग्य वळण लागूं लागलें आहे. तसेंच आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता ठरवून तिला आपलें तनुमनधन अर्पण करणारे लोक आमच्यांत फारसे नाहींत हें जरी खरें आहे तरी राजकीय चळवळीस वाहिलेले टिळक, इतिहाससंशोधनास वाहिलेले राजवाडे अशा प्रकारची मंडळी थोडथोडी चमकूं लागली आहे. आपण जो अर्वाचीन सुशिक्षणावर व सुधारणेवर कडाक्याचा ताशेरा झाडला आहे तो थोडासा फाजिल व अस्थानीं झाला आहे असें आमचें मत आहे. तथापि आपलें ह्मणणें मनन करण्यासारखें आहे ह्यांत संशय नाहीं.

‘तर मग मनन करा, मनन करा, मनन करा’ असे अखेरचे उद्गार आमच्या मित्रानें आग्रहपूर्वक काढिले.

———————

क्षितांच्या व्यर्थ बडबडीच्या कोणत्याही हालचालींत मन लागत नाहीं. शिवाय मला एक स्वातंत्र्याची अनिवार हांव लागली आहे. अमुक ठिकाणीं तें असेल तमुक ठिकाणीं तें असेल अशा समजुतीनें मी त्याच्या पाठीमागें जरी लागलों आहे तरी तें मृगजलाप्रमाणें जेथून तेथून अन्तर्धान पावत आहे. तथापि तें मृगजलाप्रमाणेंच सर्वस्वी मिथ्या होय असें मला वाटत नाहीं. तेव्हां त्याचा शोध मी मानससृष्टींत चालविलाच आहे. एवंच ह्या अमर्यादित स्वातंत्र्याचें मला वेड लागून त्यायोगें माझें माथें जणूं कांहीं फिरून गेल्यामुळें वर उपदेशिलेल्या पुनरुज्जीवनांतही माझें लक्ष लागत नाहीं. ह्यामुळें माझी स्थिति ‘ शिव शिव न हिंदुर्नयवनः ’ अशी झाली आहे असेंही पाहिजे तर ह्मणा. एवंच जर माझें डोकें स्वातंत्र्याचे नादानें फिरलें नसतें तर सुशिक्षण व सुधारणा ह्यांत तें कसें लागतें व इतरांनींही त्यांत कोणत्या प्रकारें यत्न करणें इष्ट व रास्त आहे असें मला वाटतें तें मी आपणांस थोडक्यांत सांगितलें. माझ्या स्वतःसंबंधानें सध्यां मी इतकेंच सांगूं शकतों कीं मला खऱ्या काय कीं खोट्या काय, प्राचीन काय कीं अर्वाचीन काय, इष्ट काय कीं अनिष्ट काय कोणत्याच सुशिक्षणांत व कोणत्याच सुधारणेंत मन घालणें अशक्य आहे. तेव्हां माझें कार्य होईपर्यंत मी वेडेपणें कांहीं तरी, कसें तरी व केव्हां तरी उदासीन वृत्तीनें करीत राहणार हें उघड आहे. सुदैवानें ह्मणा अथवा दुर्दैवानें ह्मणा—कोणास ठाऊक कशानें—माझ्या मनाची अशी स्थिति आली आहे हें खास! ’

सुशिक्षण व सुधारणा ह्या अलीकडील अत्यंत महत्वाच्या विषयांवरील आमच्या मित्राचे विचार ऐकून आह्मी त्यांस ह्मटलें कीं अर्वाचीन इंग्रजी शिक्षण तुह्मीं ह्मटल्याप्रमाणें कितीही नादान असो त्याचेयोगानें आमच्यांत चौकसपणा, विचारजागृति, व शोधक बुद्धि उत्पन्न होऊन आमचे पुरातन आचारविचार जे अज्ञानानें, रूढीनें, व परंपरेनें दूषित झाले होते त्यांतील दोषांचें आविष्करण करण्यास तरी त्याची आह्मांस बरीच मदत झाली आहे हें आपल्या स्वतःच्याच उदाहरणानें सिद्ध होत

# श्रीसमर्थ रामदास.

## उपोद्धात.

नित्य व्यवसायामुळें मराठी वाङ्मयाची ओळख करून घेणें भाग झालें. ही सुदैवानें आलेली संधि वायां जाऊं देऊं नये व मराठी भाषेची प्रगति कसकशी होत गेली हें जाणून घेण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली, ती थोडी बहुत तृप्त करण्याच्या हेतूनें ज्ञानेश्वर वगैरे मराठी कवि वाचण्यास सुरवात केली. ज्ञानेश्वराची भाषा फार जुनी व अलीकडील भाषेस बऱ्याच प्रकारें सुटून असल्याचें आढळून आलें. रामदासी ग्रंथाची भाषा सोपी व सरस असल्यामुळें मन बरेंच गुंगलें व यांतील विषय-विवेचन पाहून तर मनास साश्चर्यकौतुक वाटलें. कारण 'दासबोध' वगैरे रामदासी ग्रंथ भाविक लोक वाचतात व ते परमार्थपर आहेत अशी दृढ समजूत होती. ती पार नाहींशी होऊन नवीनच प्रकाश अंतः-करणावर पडला व हे ग्रंथ जसे परमार्थपर ज्ञानानें तसेच व्यवहारपर ज्ञानानें परिप्लुत आहेत अशी खात्री झाली. इतरांचाही माझ्याप्रमाणेंच या बाबतींत गैरसमज असल्याचें आढळून येतें. तेव्हां रामदासांचे कृतीबद्दल कांहीं तरी खरी कल्पना इतरांना आणून देऊन त्यांचा गैर-समज दूर करावा अशी इच्छा उत्पन्न झाली. ह्या इच्छेनुरूप या महान् अलौकिक पुरुषाच्या कृतीचें दिग्दर्शन करण्याकरितां एक छोटेखानीं व्याख्यान सन १८९९ सालीं येथील संमेलनाचे वेळीं दिलें व या प्रय-त्नास व्यवस्थित रूप देऊन एखाद्या मासिकांतून सर्व लोकांपुढें आपले विचार ठेवावे असा त्याच वेळीं विचार झाला, परंतु प्रापंचिक अडचणीमुळें हें काम लांबणीवरच पडत चाललें व कित्येक वेळां तर हें अजिबात टाकून द्यावें असें मनांत येई, परंतु जेवढें झालें तेवढेंच लोकसेवेस सादर करावें व उणें पुरें असेल तें मागाहून केव्हां तरी भरून काढावें असें ठरवूनच हा सध्याचा प्रयत्न केला आहे. समर्थ साधु होते, त्यांणीं अलौकिक गोष्टी पुष्कळ केल्या आहेत ही गोष्ट सर्वांस मान्यच आहे. ह्मणून या

दृष्टीनें यांच्या कृतीचा विचार न करितां आधिभौतिक दृष्टीनें पुढील विवेचनांत विशेष केला आहे व आधिभौतिक व अध्यात्मिक ज्ञानांची सांगड रामदासांचे ग्रंथांत उत्तम घातलेली आहे हें ही दाखविलें आहे. इंग्लिश भाषेमध्यें ' इंग्लिश मेन ऑफ लेटर्स ' या मालेमध्यें जशीं कवि चरित्रें लिहिलीं असतात, त्या धर्तीवर पुढील विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे. यांत माझें असें कांहींच नाहीं, जर कांहीं असेल तर तें अगदींच थोडें आहे. सर्व कांहीं समर्थांचेंच आहे. समर्थांच्या कृतींचें विवेचन माझ्यासारख्या मंदबुद्धि मनुष्यानें करणें ह्मणजे " प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहुरिव वामनः " याप्रमाणें आपल्यास करून घेणें होय. विवेचनाचे सोईसाठीं ग्रंथाचे निरानिराळे भाग केले आहेत, व समर्थांचे ग्रंथांची योग्यता वाचकांचे मनावर पूर्ण बिंबावी ह्मणून मधून मधून बरेच उतारेही दिले आहेत. उतारे पुष्कळ झाल्यामुळें कदाचित् ग्रंथ कंटाळवाणा होण्याची भीति वाटते. ' राजगुरु ' व ' महाराष्ट्र गुरु ' ह्यासंबंधानें समर्थांच्या कृतींचें विवेचन ह्या लेखांत त्रोटक झालें आहे, व असें व्हावें हीही समर्थांचीच इच्छा, त्यास आड कोण येणार. समर्थांच्या ग्रंथाचें परिशीलन सर्वत्र वाढलें ह्मणजे ह्या केलेल्या प्रयत्नाचें साफल्य झालें. व तसें तें वाढेल अशी आशा आहे.

सांगली, स. के. मराठे.

३० जुलै १९००.

---

# श्रीसमर्थ रामदास.

## १

## जीवनवृत्त.

रामदासाचें मूळ उपनांव ठोंसर होय. यांचे पूर्वज कृष्णाजीपंत हे शके ८८४ सालीं बेदराहून निघून गंगातीरीं मौजे हिवरें प्रांत बीड येथें येऊन राहिले. रामदासांचे वडील सूर्याजीपंत हे कृष्णाजीपंता-पासून बावीसावे पुरुष होत. हे जांबेस रहात असत. हे राम-उपासक होते. यांना गंगाधर व नारायण असे दोन मुलगे होते. गंगाधराचा जन्म शके १५२७ सालीं झाला. यांस ' ज्येष्ठ ' ह्मणत. याणीं अनुग्रह घेतल्यानंतर यांस ' रामीरामदास ' असें ह्मणूं लागले. धाकटा मुलगा नारायण याचा जन्म शके १५३० चैत्र शु. ९ दिवशीं झाला. यालाच पुढें अनुग्रह घेतल्यानंतर ' रामदास ' असें ह्मणूं लागले. यांचा स्वभाव लहानपणीं फार हूड होता. झाडांवर चढणें, माळ-वदावर चढून नानाप्रकारच्या खोड्या करणें हा यांचा नित्य क्रमच असे. शके १५३८ सालीं यांना अनुग्रह झाला, व तुह्मी कृष्णातीरीं राहून भक्ति व उपासना वाढवावी आणि जगदुद्धार करावा, म्लेंच्छाचे निवा-रणार्थ भोसले यांचे वंशांत शिवनामें राजा होणार आहे, त्यास तुह्मी साहाय्य होऊन धर्मस्थापना करावी असा यावेळीं यांना दृष्टांत झाला अशी दंतकथा आहे.

रामदासाचें वय बारा तेरा वर्षांचें झालें, तेव्हां याचें लग्न करावें असें यांचे मातुश्रीस व बंधूस वाटूं लागलें, व त्यांणीं त्याबद्दल खटपटही सुरू केली. रामदासांस हें न आवडून ते घरांतून निघून गेले. नंतर बंधूनीं पुष्कळ शोध करून यांना घरीं आणले, व मातुश्रीनीं अंतरपाट धरीपर्यंत

तरी जाऊं नको, असा विशेष आग्रह केल्यावरून ही गोष्ट रामदासांनीं मान्य केली, व लग्नाची सर्व तयारी होऊन अंतरपाट धरून ' सावधान ' असें ह्मणतांच हे तेथून निघून गेले, ते पुनः घरीं आले नाहींत. हे आमरण ब्रह्मचारी राहिले. रामदासांनीं प्रपंच साधून परमार्थ करावा असा दासबोधां 'त आग्रहपूर्वक उपदेश केला आहे; असें असतां त्याप्रमाणें त्यांणीं आचरण कां केलें नाहीं? ते अविवाहित कां राहिले? त्यांणीं प्रपंच कां केला नाहीं? वगैरे अनेक गूढ प्रश्न साहजिकच मनांत उद्भवतात; पण प्रपंचांत पडलें असतां देशउद्धाराचें जें महत्कार्य तें योग्य तऱ्हेनें आपल्या हातून पार पडावयाचें नाहीं, असें त्यांना "कें वाटूनच त्यांणीं या मार्गाचा अवलंब केला नाहीं असें वाटतें.

लग्नाचेवेळीं रामदास निघून गेले, ते नाशिकास जाऊन तेथून टाकळीस आले, व तेथें राहून त्यांणीं बारा वर्षें पुरश्चरण व भजन करण्यांत घालविलीं. पुरश्चरणाची समाप्ति करून ते तीर्थाटनास निघाले. काशी, गोकूळ, मथुरा, द्वारका वगैरे उत्तर हिंदुस्थानचीं व नंतर दक्षिणेंतील सर्व तीर्थें केलीं, व ठिक ठिकाणीं मठ स्थापले, व रामदासी संप्रदायाचा प्रचार पुष्कळ सुरू केला. याप्रमाणें बारा वर्षें यात्रा व तीर्थाटन करून हे पंचवटीस परत आले. तेथून ते मातुश्रीस व ज्येष्ठांस भेटण्यास जांबेस गेले, व उभयतांची गांठ पडून कुशलप्रश्न झाल्यावर मातुश्रीनीं रामदासांस त्यांच्या अलौकिक चमत्कारसामर्थ्याबद्दल प्रश्न केला. त्यास आपल्यास एक महाभूत लागलें आहे, व ह्या भूताची शक्ति अचाट आहे असें रामदासांनीं सांगितलें. या भूताचा महिमा रामदासांनीं एक पद रचून मोठ्या प्रेमळपणानें वर्णिला आहे. ते ह्मणतात :—

होतें वैकुंठीचे कोनी । शिरलें अयोध्याभुवनीं ।
लागे कौसल्येचे स्तनीं । तेंची भूतगे माय ॥ १ ॥

.......................................

मार्गीं जातां वनान्तरीं । पाय पडला दगडावरी ।
पाषाणाची झाली नारी । तेंची भूत ॥ २ ॥

सुग्रीवाचें पालन । वालीचें निर्दाळन ।
तारी पाण्यावरी पाषाण । तेंची भूत ॥ ३ ॥
रक्षी मरणीं विभीषण । मारी रावण कुंभकर्ण ।
तोडी अमरांचें बंधन । तेंची भूत ॥ ४ ॥
सर्वां भूतांचें हृदय । नाम त्यांचें रामराय ।
रामदास नित्य गाय । तेंची भूत ॥ ५ ॥

या वेंच्यावरून रामदासांची आपल्या उपास्यदैवतावर किती परम व निस्सीम भक्ति होती हें पूर्णपणें व्यक्त होत आहे, व यांचें 'रामदास' नांवही अन्वर्थ आहे. याप्रमाणें मातुश्रीची व ज्येष्ठांची गांठ घेऊन रामदास आपल्या उद्दिष्ट कार्यास कृष्णातीरीं शके १९६६ सालीं आले, व धर्मस्थापना करून शिवाजीकरवीं महाराष्ट्र राज्याची स्थापना करण्यास ह्याच वेळेपासून रामदासांनीं सुरवात केली.

रामदासांचा हेतु आपला सांप्रदाय वाढविण्याचा असल्यामुळें ते नेहमीं फिरत असत; तथापि त्यांणीं आपलें मुख्य ठिकाण 'चाफळ' ठरविलें होतें. या ठिकाणीं यांणीं शके १५७० मध्यें मठाची स्थापना करून रामजन्मोत्सवास सुरवात केली. समर्थांनीं मारुतीच्या मूर्ति चांफळखोऱ्यांत पुष्कळ ठिकाणीं स्थापिल्या, त्यांचें स्थळवार वर्णन वेणूबाईनें अभंग रचून केलें आहे. तो अभंगः—

चाफळामाजीं दोन, उंब्रजेमाजीं एक ।
पारगावीं देख चौथा तोहा ॥
पांचवा मसूरीं शहापूरीं साहवा ।
जाणतो सातवा शिराळ्यांत ॥
सिंगणवाडी आठवा मनपाडवें नववा ।
दहावा जाणावा माजगावीं ॥
बाह्यांत अकरावा येणें रीती गावा ।
सर्व मनोभाव पुरविला ॥
वेणी स्वामी रामदास माझा समर्थ ।
कीर्ती गगनांत नसे माय ॥

समर्थांचे शिष्य पुष्कळ होते, व यांपैकीं स्वामिसेवेस नित्य बरेच असत. तथापि उद्धव, कल्याण, अक्काबाई व वेणूबाई हे समर्थांस फार प्रिय होते. या सर्व शिष्यांच्या प्रेम व भक्तिबद्दल समर्थांनीं पुष्कळ वेळां त्यांचें परीक्षण केलें व त्यांत जे पसंत पडले, त्या सर्वांत 'कल्याण' हा अत्यंत प्रिय शिष्य होता. ह्याची पूर्वाश्रमीची माहिती पुढील एका भागांत त्रोटक दिली आहे. बाकीच्याबद्दल विशेष संगतवार अशी माहिती मिळत नाहीं.

धर्माची जागृति होऊन त्यास कायमपणा यावा यासाठीं समर्थांनीं ठिकठिकाणीं सर्व देशभर मठ स्थापन केले व प्रत्येक मठावर आपल्या शिष्यांपैकीं एक एक नेमिला. शके १५७४ मध्यें समर्थ मातुश्रीस व बंधूस भेटण्यास जांबेस गेलेवेळीं इंदुरास गेले व तेथें मठ स्थापून त्या ठिकाणीं उद्धव गोसावी यास ठेविलें. तसेंच शके १५७७ मध्यें स्वामी मिरजेस गेले व तेथें मठ स्थापून त्या ठिकाणीं वेणूबाईस ठेविलें. शके १६०१ मध्यें कल्याण गोसावी यास डोमगांवास जाऊन मठ स्थापण्याची आज्ञा झाली. कल्याण समर्थांस सोडून जाण्याविषयीं नाखूष होता; परंतु 'झाडाखालीं झाड वाढत नाहीं' वगैरे सांगून समर्थांनीं त्याची समजूत करून त्यास डोमगांवीं पाठवून दिलें. समर्थांनीं एकंदर ७०० मठ स्थापन केले असें समजतें. समर्थांचें मुख्य वास्तव्याचें ठिकाण चाफळ होतें हें वर सांगितलेंच आहे. श० १५८३ मध्यें समर्थ भागानगरास गेले व तेथें केशवस्वामींची भेट झाली. याच सालीं मोरयादेव यांची चिंचवड येथें भेट झाली. श० १५८९ मध्यें आनंद-मूर्तींची भेट ब्रह्मक्षेत्रीं झाली. श० १६०१ मध्यें व्यंकोजी राजे यांणीं विनंति केल्यावरून समर्थ कर्नाटकांत गेले. तेथें कांहीं दिवस राहून व मठस्थापना करून समर्थ परत स्वदेशीं आले. याप्रमाणें समर्थ नेहमीं संचार करीत असल्यामुळें ते सर्वव्यापीच होऊन राहिले होते असें ह्मणण्यास हरकत नाहीं, व या त्यांच्या सर्वव्यापीपणामुळेंच धर्माची जागृति करून स्थापना करण्याचा त्यांचा हेतू सफल झाला. असें न करितां ते जर एके ठिकाणींच राहिले असते, तर धर्माबद्दलची अनास्था

व शिथिलता कमी न होतां वाढलीच असती. समर्थांनीं वरील क्रम स्वीकारल्यामुळें इष्ट हेतु सफल होऊन त्यांचा दरदराट चोंहींकडे बसला.

शिवाजीची व समर्थांची प्रथम भेट श० १५७० मध्यें झाली. व या वेळेपासून दर गुरुवारीं समर्थांची गांठ घेण्याचा क्रम शिवाजीनें बहुतेक ठेविला होता. श० १५७३ मध्यें शिवाजीची व समर्थांची गांठ पडली त्यावेळीं, शिवाजीनें समर्थांनीं आपल्या हातून कांहीं सेवा घ्यावी अशी विनंति केल्यावरून त्यास पुढील तीन गोष्टी करण्यास सांगितल्या:—

१. प्रतिवर्षी श्रावणमासीं कोटि पार्थिवलिंगें करीत जावीं व त्याबद्दल ब्राह्मणभोजनही करीत जावें.

२. दरसाल श्रावणमासीं ब्राह्मणांस नेमणुकी दक्षणा होत जावी.

३. जोहार करण्याची पद्धत सोडून अंत्यजाशिवाय सर्व हिंदूंनीं एकमेकांस रामराम ह्मणावें व कागदोपत्रीं लिहावें.

या तीन गोष्टी करावयास सांगण्यांत समर्थांचा हेतू अगदीं व्यक्त होत आहे. पहिल्या दोन गोष्टींपासून विद्येस उत्तेजन मिळून प्रसार व्हावा हा त्यांचा हेतू होता व तिसरी गोष्ट याहीपेक्षां तत्कालीन स्थितीमध्यें विशेष महत्वाची होती. हिंदूमध्यें स्वाभिमान व स्वत्व उत्पन्न करून आपण परराष्ट्राखालीं आहों हें हिंदूच्या मनावर पूर्णपणें बिंबवण्यास या तिसऱ्या गोष्टीपासून फार मदत झाली. व जोहार करण्याची पद्धत त्याज्य केल्यामुळें हिंदूमध्यें एकप्रकारचें नवें स्फुरण उत्पन्न होऊन त्यांस निदान या पद्धतीमुळें तरी समर्थांनीं 'रामदास' बनवून सोडिलें असें ह्मणण्यास हरकत नाहीं व हीच 'रामराम' करण्याची पद्धत अद्यापि चालू आहे.

शिवाजीस ज्यावेळीं कोणत्याही गोष्टीसंबंधानें अडचण पडे, त्यावेळीं ते रामदासांचा सल्ला नेहमीं घेत असत. रामदासांचे ठिकाणीं शिवाजीचा अति आदर व प्रेम होतें. शिवाजीस रामदासाची गांठ घेण्याविषयीं अतिशय उत्कंठा झाली होती, त्या वेळेस रामदासांनीं शिवाजीस पत्र लिहिलें आहे. त्यांत त्या वेळची परिस्थिति कशी होती व शिवाजीनें काय कर्तव्य केलें पाहिजे, हें मोठ्या मार्मिक रीतीनें वर्णिलें आहे. रामदास ह्मणतातः—

तीर्थ क्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं ।
सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥
या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुह्माकरीतां ॥
सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ति । सांगणें काय तुह्माप्रति ।
धर्मस्थापनेची कीर्ती । सांभाळली पाहिजे ॥
उदंड राजकारण तटलें । तेणें चित्त विभागलें ।
प्रसंग नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ॥

शके १५७१ मध्यें रामदासानीं शिवाजीस केलेला उपदेश ‘ लघुबोध ’ या नांवानें दासबोधांत प्रसिद्ध आहे. यावेळीं रामदासानीं शिवाजीस मूठभर माती, दोन मूठी लीद व चार मुठी खडे, प्रसाद ह्मणून दिले. याचा अर्थ इतकाच कीं राज्याचा विस्तार होऊन महाराष्ट्र अम्मल जिकडे तिकडे स्थापला जावा, अशी आपली उत्कट इच्छा प्रदर्शित केली. समयास अनुसरून नेहमीं रामदास शिवाजीस उपदेश करीत असत. याणीं शिवाजीस ‘ राजधर्म ’ व ‘ क्षात्रधर्म ’ सांगितले. यांतील उपदेश केव्हांही, कोठेंही व कशीही परिस्थिती असली तरी उपयोगी पडणारा आहे. याप्रमाणें रामदासांची योग्यता जाणून राज्य करण्यास हेच योग्य आहेत असें शिवाजीस वेळोवेळीं वाटत असे व पुष्कळ वेळां यांणीं आपली अशा प्रकारची इच्छा रामदासांस प्रदर्शितही केली होती. श. १५७७ मध्यें रामदास भिक्षा मागत मागत राजवाड्यांत गेले; त्या वेळीं शिवाजीनें भिक्षेस एक चिठी घातली. तींत “ आजपर्यंत जें राज्य मिळविलें तें स्वामिभिक्षेस अर्पण होवो ” असें लिहिलें होतें. यापुढें समर्थांचे राज्याचा आपण प्रतिनिधि असें मानूनच शिवाजी राज्य करूं लागला. याचें दर्शक हेंच कीं रामदासी सांप्रदायी वस्त्रांचा जो भगवा रंग तोच त्यानें आपल्या निशाणास देऊन ‘ भगवा झेंडा ’ हें एक मराठ्यांचें राजचिन्हच ( emblem ) करून सोडिलें. श. १५९६ मध्यें शिवाजीस राज्याभिषेक झाला, त्यावेळींही त्यानें हेंच व्रत कायम ठेविलें. आपण सिंहासनारूढ होण्यापूर्वीं शिवाजीनें समर्थांचा जटाभार

उतरवून त्यांस मंगलस्नानविधि करून सिंहासनारूढ केलें व सर्व राजचिन्हें समर्थांस अर्पण केलीं.

समर्थांचे वडील बंधूस ज्येष्ठ ह्मणत हें पूर्वीं सांगितलेंच आहे. समर्थ यांस आपलें छत्र मानीत. यांनीं आपलें सर्व आयुष्य 'राम' सेवेंत घालवून आपला देह श. १५९९ मध्यें विसर्जन केला. यांस 'रामचंद्रबोवा' व 'शामजी' असे दोन मुलगे होते. यांस वडील वारल्यानंतर समर्थांनीं श. १६०० मध्यें पत्र लिहून आपल्याकडे आणविलें. या पत्रांत त्यांस जो उपदेश केला आहे तो खरोखर उत्तम 'बालबोध' आहे यांत कांहीं शंका नाहीं; व हा उपदेश आबालवृद्धांस सारखा उपयोगी पडणारा आहे. यांतील कांहीं वेंचे:—

बरें सत्य बोला यथातथ्य चाला। बहू मानिती लोक येणें तुह्मांला॥
धरा बुद्धि पोटीं विवेकें मुलेंहो। बरा गूण तो अंतरापासिं राहो॥
हिशेबीं सदा न्याय सांडूं नयेरे। कदाचीत अन्याय होतां धकारे॥
जनीं सांडिला न्यायरे दुःख होतें। महासूख तेंही अकस्मात जातें॥
प्रचीतीविणें बोलणें व्यर्थ वांया। विवेकेंविणें सर्वही दंभ झाला॥
बहू सज्जला नेटका साज केला। विचाराविणें सर्वही व्यर्थ गेला॥
भलारेभला बोलती तें करावें। बहूतां जनांचे मुखें यश घ्यावें॥
परी शेवटीं सर्व सोडोनि द्यावें। मरावें परी किर्तीरूपीं उरावें॥

श. १६०१ मध्यें समर्थांनीं शिवाजीस केलेला उपदेश अखेरचाच ह्मणावयाचा; कारण पुढील सालीं शिवाजी निवर्तला. शिवाजीचे पश्चात् संभाजीचें दुर्वर्तन ऐकून समर्थांस फार वाईट वाटलें व त्यास उपदेशपर एक पत्र १६०२ मध्यें लिहिलें; परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. त्या उपदेशामध्येंही समर्थांची मराठी राज्याबद्दल व शिवाजीचे वंशाबद्दल कळकळ पूर्णपणें व्यक्त होते. याप्रमाणें धर्मप्रसाराची चळवळ सुरु करून व राज्यस्थापनेचें बीं पुरें रुजवून समर्थांनीं आपला देह श. १६०३ माघ वा। ९ रोजीं ठेविला. समर्थांनीं याप्रकारें जें बीं रुजविलें होतें, त्याचा वृक्ष तयार होऊन समर्थांचे हयातींत तो पुरा

जोमावला नव्हता, तथापि तो पुरा वाढून सर्वत्र पसरेल अशी त्यांची पुरी खात्री होती. शिवाजीचे हातून म्लेंच्छांचा पुरा नाश झाला नाहीं, म्लेंच्छराज्यरूपी जुन्या वृक्षाच्या फांद्या मुळ्या सुकूं लागल्या होत्या व त्या पूर्णपणें सुकल्या ह्मणजे तो कधींतरी मरावयाचाच यांत संशय नाहीं हें त्यांना पूर्ण माहीत होतें, व हें पूर्णपणें व्यक्त करून दाखविणारा एक उतारा खालीं देऊन हें जीवनवृत्त संपवितों.

कल्पांत मांडिला मोठा म्लेंच्छ दैत्य बुडावया ।
कैंपक्ष घेतला रामें आनंदवनभूवनीं ॥ १ ॥
बुडाले सर्वही पापी हिंदुस्थान बळावलें ।
कोपला देवदेवांचा आनंदवनभूवनीं ॥ २ ॥
पूर्वीं जे मारिले होते तेचि आतां बळावले ।
अभक्तांचा क्षय झाला आनंद वनभूवनीं ॥ ३ ॥
त्रैलोक्य गांजिलें मागें ठाउकें विवेकी जनां ।
कैंपक्ष घेतला रामें आनंदवनभूवनीं ॥ ४ ॥
भीमच धाडिला देवें वैभवें धांव घेतली ।
लांगूल चालिलें पुढें आनंदवनभूवनीं ॥ ५ ॥
तेथून वाढिला धर्म रमाधर्म समागमें ।
संतोष मांडिला मोठा आनंदवनभूवनीं ॥ ६ ॥
बुडाला औरंग्यापापी म्लेंच्छसंहार जाहला ।
मांडिलीं मोडिलीं क्षेत्रें आनंदवनभूवनीं ॥ ७ ॥
बुडाले भेदवादी ते नष्ट चांडाळपातकी ।
तुडविले देवें आनंदवनभूवनीं ॥ ८ ॥
गळाले मेले गेले देशधडीं पुढें ।
निर्मळ झाली पृथ्वी आनंदवनभूवनीं ॥ ९ ॥

या वेंचांत आनंदवनभूवन हें नांव नाशिकापासून करवीरपर्यंतच्या टांपूस दिलें आहे. व यांत वर्णिल्याप्रमाणें शाहू व इतर मराठी राजे यांचे हातून कृति झाल्याबद्दल इतिहास साक्ष देतच आहे.

---

# महाराष्ट्रधर्म, समकालीनसाधु-स्वामीपंचायतन.

## २

पहिल्या भागांत धर्मस्थापना करून राज्याचा उद्धार करण्यास रामदासांनीं श. १५६६ मध्यें सुरवात केली हें सांगितलें. ह्या राज्योद्धाराचे कामीं रामदासांची एकंदर सर्व भिस्त काय ती ' महाराष्ट्रधर्म ' प्रसारावर फार दिसते. तेव्हां हा महाराष्ट्रधर्म ह्मणजे काय याचा विचार करूं. महाराष्ट्रधर्म हिंदुधर्मापासून भिन्न नाहीं, मात्र जास्त व्यापक आहे. हिंदुधर्म ह्मणजे हिंदूस योग्य जी उपासना, व्रतें, वगैरे यांचें यथाविधि आचरण होय. महाराष्ट्रधर्मांत या हिंदुधर्माचा समावेश होऊन आणखीही पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो. या गोष्टी कोणत्या याची थोडीशी कल्पना रामदासांनीं शिवाजीस पाठविलेल्या पत्रावरून करतां येते. रामदासासारख्या महान् साधु पुरुषाचे साहाय्यानें धर्मस्थापना करण्याकरितां शिवाजीचा अवतार होण्यापूर्वी मुसलमानांनीं हिंदूंचा फार छळ मांडिला होता. अकबर बादशहाच्या वेळेस हिंदूंस जें धर्मस्वातंत्र्य, जो मान व जी न्यायसमता मिळत असे, तें सर्व औरंगझेब बादशहाचे कारकीर्दींत नाहींसें होऊन हिंदूंचा अतिशय छल होऊं लागला. अकबरानें जे कर माफ केले होते ते सर्व औरंगझेबानें बसविले, एवढेंच नव्हे तर हिंदूंवर त्यांचें प्रमाण दुप्पट तिप्पट केलें. औरंगझेब धर्मवेडा असल्यामुळें हिंदूंस जबरीनें मुसलमान करण्याची व हिंदूंचीं देऊळें फोडून त्या ठिकाणीं मशीदी बांधण्याची त्यास फार हांव सुटली. हिंदूंस पूज्य जी गाय तिची चोहोंकडे हत्या होऊं लागली. अशा रीतीनें गांजून गेल्यामुळें हिंदूंस हिंदू होणें हें एक पापच आहे असें वाटूं लागलें. त्यावेळची परिस्थिति कशी होती ह्याचें वर्णन रामदासांनीं शिवाजीस पाठविलेल्या पत्रांत केलें आहे हें मागें सांगितलेंच आहे. यासंबंधानें ' दासबोधांतही ' ते ह्मणतातः—

कितेक म्लेंच्छ होऊन गेले । कितेक फिरंगणांत आटले ।
देशभाषेनें रोधिले । कितीएक ॥ १ ॥
महाराष्ट्रदेश थोडा उरला । राजकारणें लोक रोधिला ।
अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ २ ॥

द० १९, स० २.

सारांश हिंदुत्व राखणें व गोब्राह्मणप्रतिपाल करणें हीं लोकनायकाचीं आदिकर्तव्येंच झालीं होतीं हें वर दिलेल्या हकीकतीवरून लक्षांत येण्यासारखें आहे. तेव्हां हें महाराष्ट्रधर्माचें एक मुख्यांग होय. परंतु स्वराज्याची स्थापना झाल्याशिवाय या गोष्टी होणें शक्यच नाहीं. स्वराज्याची स्थापना करणें हें अत्यंत बिकट व महत्प्रयासाचें काम आहे व हें राष्ट्रांतील मंडळीचा एकोपा, जमाव व परस्पर दळणवळण असल्याशिवाय होणें शक्यच नाहीं ह्मणून रामदास शिवाजीस सांगतातः—

" मराठा तितका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ॥ "

श० १६०३ मध्यें संभाजी रामदासास भेटण्यास आला असतांही त्याणीं त्यास याच प्रकारचा उपदेश केला. ते ह्मणतात :—

बहुत लोक मिळवावे । एकविचारें भरावें ।
कष्टेंकरोनि घसरावें । म्लेंच्छावरी ॥
आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें ।
महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे ॥

ह्या रामदासांचे उक्तींवरून त्या काळीं महाराष्ट्रामध्यें कशी अविंधी माजली होती व कोणत्या प्रबल विचारानें महाष्ट्रीयांचीं मनें पूर्णपणें भारून गेलीं होतीं हें उत्तम रीतीनें लक्षांत येण्यासारखें आहे. ह्मणून या सर्व गोष्टींचा अंतर्भाव ज्यामध्यें होतो, तो महाराष्ट्रधर्म होय. ह्मणजे हिंदुधर्म+गोब्राह्मणप्रतिपाल+स्वराज्याची स्थापना+संमेलन व नायकत्व अशी या महाराष्ट्रधर्माची व्याख्या होते. या सर्व गोष्टींस अनुसरून प्रत्येक महाराष्ट्रीयानें वागणें ह्मणजेच महाराष्ट्र धर्माचा अंगीकार करणें होय. ह्या महाराष्ट्रधर्माचेंच वर्चस्व आमचेवर सुमारें २००

वर्षें होतें व यामुळेंच तेवढ्या काळांत आह्मांस स्वातंत्र्याचा व स्वराज्याचा उपभोग मिळाला व पुन:ही तो केव्हां मिळणें शक्य असेल तर परिस्थितीस अनुसरून एखादा ' रामदास ' च उत्पन्न झाला पाहिजे. महाराष्ट्रेतर प्रांतांत प्रचलित असणारा हिंदुधर्म व महाराष्ट्रांत प्रचलित असलेला हिंदुधर्म याची बरोबर कल्पना येण्यास राजवाड्यांनीं ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें ' यांत लटविलेली क्लृप्ति बस होणारी आहे. यांनीं पहिल्यास सहिष्णु व दुसऱ्यास जयिष्णु ह्मटलें आहे. दामाजीपंताच्या वेळचा स्तब्ध ' विठोबा ' ही सहिष्णु धर्माची मूर्ति व रामदासांचा उड्डाण करणारा मारुति हा जयिष्णु धर्माची मूर्ति आहे असें त्यांनीं ह्मटलें आहे तें यथार्थ आहे. अशा प्रकारें धर्माची ग्लानि झाली असतां ती नाहींशी करून स्वधर्माची स्थापना करण्याकरितां रामदास व शिवाजी यांचा एकसमयावच्छेदेंकरून अवतार झाला. यावरून भगवंतांनीं गीतेमध्यें अर्जुनास सांगितलेल्या *वचनाची सत्यता पूर्णपणें मनावर बिंबते व मन श्रद्धायुक्त होऊन उत्पन्न झालेली निराशा नाहींशी होते व मनास धीर व उमेद आल्याशिवाय रहात नाहीं.

अशा या महाराष्ट्रधर्माचा प्रसार करून मराठ्यांचें राज्य स्थापन करण्यास व मुसलमानांचा पूर्ण पराभव करून सर्वत्र शांतता करण्यास रामदासासारखेच राजगुरु मूळकारण होत. ह्या महाभाग दैविक पुरुषाचा अवतार जर या वेळेस झाला नसता, व ह्यांचे उपदेशामुळें व वर्तनामुळें जें महाराष्ट्रास वळण मिळालें तें जर मिळालें नसतें, तर मराठ्यांचा ' भगवा झेंडा ' जो सर्वत्र हिंदुस्थानांत कांहीं काळपर्यंत फडकत राहिला होता तो राहिला नसता. ही जी रामदासाचे हातून देशसेवा घडली, तिचा सर्वत्र त्वरित प्रसार होऊन दरदराट बसण्यास रामदासाचे समकालीन साधु व कविही बरेच साहाय्यभूत झाले. कारण ह्या साधूंनीं महाराष्ट्र बहुजनसमूहास ज्या गोष्टींची आवश्यकता होती, त्याच गोष्टी करण्यास सुरवात केली होती. आजपर्यंत एकंदर ग्रंथ-

---

* यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ १ ॥

रचना सर्व संस्कृतांत होत असे. सर्व धर्मग्रंथ संस्कृतांतच होते. प्राकृत भाषेबद्दल तिटकारा व हेळसांड होत असे. ब्राह्मण श्रेष्ठ, ब्राह्मणच ईश्वराचे आवडते भक्त अशी जी या वेळपर्यंत समजूत होती, ती ह्या साधुलोकांनीं समूळ नाहींशी करून टाकिली. हे साधु सर्व उपदेश प्राकृत भाषेमध्यें सरसकट सर्वांना करूं लागले. यांना ब्राह्मण, शूद्र, अगर अतिशूद्र सारखाच होता. ल्यूथरमुळें ज्याप्रमाणें इंग्लिश लोकांना 'बायबल' त्यांचे स्वभाषेमध्यें उपलब्ध झालें, व त्यांच्यामध्यें चोहोंकडे धर्माची उत्क्रान्ति झाली, त्याप्रमाणेंच या साधु लोकामुळें संस्कृतांतील अमूल्य ज्ञानभांडार महाराष्ट्र लोकांना मराठींत प्राप्त झालें व महाराष्ट्रजनांची सुधारणा झपाट्यानें झाली व महाराष्ट्र धर्मच चहूंकडे सुरू झाला. *

अशाप्रकारची ज्यांची योग्यता त्या महान् साधु कवींमध्यें 'रामदास-पंचायतन' फार पूज्य व मान्य आहे. श्रीजयरामस्वामी संस्थान वडगांव, श्रीरंगनाथस्वामी संस्थान निगडी, श्रीआनंदमूर्ति संस्थान ब्रह्मनाळ, श्रीकेशवस्वामी संस्थान भागानगर व श्रीसमर्थ रामदास संस्थान चाफळ मिळून हें पंचायतन होतें. यांपैकीं जयरामस्वामी, रंगनाथस्वामी व आनंदमूर्ति यांस रामदास चिरंजीव ह्मणत. जयराम-स्वामी हे मांडवगणकर भिकाजीपंत देशपांडे यांचे पुत्र होत. याणीं

---

* The Saints and Prophets addressed the people both in speech and writing in their own vernacular and boldly opened the hither to hidden and unknown treasures to all and sundry men and women, Brahmins and Shudras alike ............ These early marathi writers knew that modern India, after Buddistic revolution, was less influenced by the Vedas and Shastras, than by the Ramayan and Mahabharat, the Bhagawat Puran and the Gita, and these latter works were translated and made accessible to all.

Poona Sarvajanik Sabha
[Quarterly.] 1895.

अनुग्रह घेतल्यानंतर यांच्या व रामदासांच्या वारंवार भेटी होत असत. हे श० १५९४ मध्यें वारले. पंचायतनांतील इतर मंडळीप्रमाणें याणींही ग्रंथरचना केली आहे. यांचे ग्रंथांपैकीं शांतिपंचीकरण, सीतास्वयंवर व रुक्मिणिस्वयंवर, हे मुख्य आहेत. याशिवाय यांचीं किरकोळ पदेंही बरींच आहेत.

रंगनाथस्वामी हे नाझरे परगण्याचे देशपांडे गोपाजीपंत यांचे चिरंजीव. यांणीं निगडीस मठ स्थापिला. हे स्वामी राजयोगी व विलासी असत. यांचेबरोबर नेहमीं शेंपन्नास मंडळी लंगोटबंद असत. यांचा पोषाख नेहमीं सरदारी शिपाईबाण्याचा असे. अशा थाटाचा पोषाख यांचे वृत्तीस योग्य नव्हता, तथापि हा त्यांस त्यांचे देहभाग्यामुळें प्राप्त होता. व प्रारब्धीं जें आहे तें कोठेंही मिळाल्याशिवाय रहावयाचें नाहीं अशी खात्री, यांचेच उदाहरणावरून रामदासस्वामीनीं आपला अत्यंत प्रियशिष्या कल्याण याची केली. यांणीं ‘बृहद्वाक्यवृत्ति’ ‘चित्सदानंदलहरी’ वगैरे ग्रंथ केले आहेत. या सर्वांत ‘वासिष्ठसार’ सर्वमान्य ग्रंथ आहे. ‘चित्सदानंदलहरी’ ही गीतेवरील प्राकृत टीका आहे. यांची विषयनिरूपणपद्धति सुबोध असून भाषा सोपी आहे. हे श. १६०६ मध्यें समाधिस्थ झाले.

आनंदमूर्ति हे रंगनाथस्वामींचे शिष्य होते. यांस रामदास चिरंजीव ह्मणत हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हे शके १६१८ मध्यें वारले. यांचीं कांहीं पदें आहेत. केशवस्वामी हे शके १५९९ चे सुमारास वारले. यांचे ‘एकादशीचरित्र’ व कांहीं पदें एवढेच ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहेत. रामदासानीं या सर्वांपेक्षां अधिक व उत्तम ग्रंथ केले आहेत. त्यांचें निरूपण पुढें एका स्वतंत्र भागांत केलें आहे.

या पंचायतनाखेरीज तत्कालीन बरेच साधु व कवि होते. त्यांत ‘मोरयादेव’, ‘तुकारामबोवा’ हे प्रसिद्ध होते. तुकाराम रामदासास फार पूज्य मानीत. शिवाजी अनुग्रहाकरितां एकदा तुकारामाकडे गेला होता, त्यावेळीं याणीं रामदासासारखा योग्य पुरुष दुसरा नाहीं, अनुग्रह घेणें तो त्यांचेकडूनच घेणें वाजवी आहे असें सांगितलें. दुसरे एके प्रसंगीं

तुकारामानें शिवाजीस पत्र लिहिलें, त्यांतही त्यानें याच अर्थाचा उपदेश शिवाजीस केला आहे. तो ह्मणतोः—

राया छत्रपति ऐकावें वचन। रामदासीं ध्यान लावी वेगीं।
रामदासस्वामी सोयरा सज्जन। त्यासी तन मन अर्पी बापा॥
धरूं नको आस आमुची कृपाळा। रामदासीं डोळा लावीं आतां॥

यावरून रामदासांची योग्यता व वर्चस्व तत्कालीन साधूंमध्यें किती होतें हें पूर्णपणें व्यक्त होतें. सर्व साधुमंडळी रामदासांस वडिलांप्रमाणें मानीत व रामदासही त्यांचेबरोबर तसेच वागत. या प्रत्येक साधूचें एक एक उपास्यदैवत असे. प्रत्येकाची आपआपल्या उपास्यदैवतावर इतकी कांहीं दृढ व निःसीम भक्ति असे कीं त्याशिवाय त्यांना कोठें कांहीं दिसत नसे. ह्मणूनच रामदास पंढरीस गेले असतां त्यांना ‘ विठोबा ’ न दिसतां ‘ राम ’ च दिसला.

प्रसिद्ध महाराष्ट्र कवि वामनपंडित हा मोठा विद्वान् शास्त्री होता. काशीपासून रामेश्वरापर्यंत आपल्या विद्वत्तेसंबंधानें याणीं अजिंक्य पत्रें मिळविलीं होतीं. हें त्यावेळच्या विद्वान् मंडळीमध्यें एक प्रचंड धेंडच होतें. यांनीं संस्कृतामध्यें पुष्कळ ग्रंथ केले आहेत. यांचा ‘ निगम-सार ’ ग्रंथ सर्वमान्य आहे. यांची व रामदासांची गांठ पडली त्यावेळीं रामदासांनीं यांस प्राकृतभाषेमध्यें ग्रंथरचना करण्याबद्दल उपदेश केला. यावेळेपासून पंडितांनीं सर्व ग्रंथ प्राकृतामध्यें केला. यांचा एकंदर प्राकृत ग्रंथ बारा लक्ष आहे. त्या सर्वांत ‘ यथार्थदिपिका ’ ही गीते-वरील टीका फार प्रसिद्ध आहे. ह्यावेळपर्यंत गीतेवर ज्या टीका झाल्या आहेत, त्या सर्वांचे मतांचें प्रतिपादन व खंडण यामध्यें उत्तम रीतीनें केलें आहे. वामनाचे एकंदर ग्रंथांत ‘ यमकें ’ फार, ह्मणून रामदास यांस यमक्या ह्मणत. पंडितांनीं काढलेल्या सर्व शंकांचें निरसन राम-दासांनीं केलें व त्यास ‘ द्वैताचा ’ ‘ अद्वैती ’ बनवून सोडलें, एवढेंच नव्हे तर त्यास आपला शिष्य केलें. याप्रमाणें आपल्या अंगच्या सामर्थ्याचे, विद्वत्तेचे व ईश्वरीप्रसादाचे अनेक अलौकिक चमत्कार राम-दासांनीं करून दाखविले. पूर्वीं पुरश्चरण करीत असतां एका कुलकर-

ण्याच्या शवास यांणीं सजीव केलें, व पैठणास असतां मेलेली बार उठविली इत्यादि यांच्या सामर्थ्याबद्दल पुष्कळ दंतकथा आहेत. अशाप्रकारचे चमत्कार खरे वाटण्याचा त्यावेळचा काळ होता. हल्लींच्या काळीं ह्या गोष्टींच्या सत्यतेवर लोकांचा विश्वास बसावयाचा नाहीं. अशा गोष्टींवर विश्वास बसण्यास मनुष्याचें मन विशेष भाविक व भोळें असलें पाहिजे. भावनाशक्तीच्या जोडीस विचारशक्ति आली कीं, ती आपला पगडा बसविते व भावनेस बहुतेक हुसकून लाविते, व यामुळें कोणत्याही गोष्टीवर एकदम विश्वास ठेवण्याची जा साहजिक मनाची प्रवृत्ति ती नाहींशी होते. अशा रीतीनेंच या गोष्टींचा कार्यकारणसंबंध जुळवितां येतो. *

कांहीं असो, रामदासांच्या अलौकिक सामर्थ्यामुळें त्यांना सर्व साधु व लोक 'समर्थ' ह्मणत व हें नांवही यथार्थ आहे. कारण शिवाजीच्या हातून ज्या कित्येक गोष्टी पार पडणें फार दुरापास्त होत्या, त्या समर्थांचेच अनुग्रहामुळें व कृपेमुळें पार पडल्या. महाराष्ट्रामध्यें माजलेली 'अविंधी' नाहींशी करून मराठी राज्य स्थापनेचें व धर्मप्रसाराचें सर्व श्रेय शिवाजीचे व महाराष्ट्राचे परम पूज्य गुरु श्रीसमर्थ यांजकडे येतें व ह्या महत्कार्यास तत्कालीन महाराष्ट्रसाधूंही अंशतः साहाय्य होते हें मागें सांगितलेंच आहे.

---

* यासंबधानें लर्का ह्मणतो:—It is the atmosphere of childlike credulity which predisposes men to require and accept these wonders and miracles as events of ordinary occurrence. .... ....

The stories which are told of the way in which they were helped by supernatural agency in their mission of love may or may not be accepted in these days of vigilant criticism. The Saints, and Prophets themselves did not claim miraculous powers; they were meek and suffering men who place their trust in Providence and their trust was justified beyond their expectations, often times to their own surprize.

P. S. S. Q. 1895.

पंचायतनांतील प्रत्येक साधूनें थोडे बहुत ग्रंथ केल्याचें मागें सांगितलें. समर्थांनीं दासबोध, रामायण, पंचीकरण, मनाचेश्लोक, व शिवाय बरेच किरकोळ ग्रंथ लिहिले आहेत, व ते सर्व आज उपलब्धही आहेत. समर्थांचे ग्रंथ पंचायतनांतील इतर साधूंचे ग्रंथांपेक्षां फारच श्रेष्ठ आहेत. त्या सर्वांत दासबोध हा तर प्रपंच व परमार्थविषयक ज्ञानानें पूर्ण भरलेला आहे. ग्रंथाचे योग्यतेवरूनही समर्थांस पंचायतनाचे प्रमुख गणण्यास हरकत नाहीं व याप्रमाणें तत्कालीन सर्व साधु त्यांना लेखीतही होते हें मागें सांगितलें आहे. दासबोध हा ग्रंथ स्वामीनीं शके १५८१ मध्यें लिहिण्यास सुरवात केली असावी. असें त्यांतीलच एका ओवीवरून अनुमान होतें. अफझुलखानास मारून शिवाजी समर्थांचे दर्शनास गेले, त्यावेळीं १८ वे शतकांतील पांचवा समास सुरू होता. तो संपूर्ण झाल्यावर समर्थांनीं शिवाजीकडे पाहिलें व त्यास उद्देशून ‘ उत्तम पुरुष ’ वर्णन हा त्याच दशकांतील ६वा समास लिहिला. दासबोधाचा २०वा दशक शके १६०३ मध्यें संपला. यावरून हा ग्रंथ लिहिण्याचें कामही बरींच वर्षें चाललें होतें. हा ग्रंथ लिहिण्याचे कामीं ‘ कल्याण ’ यांची मदत फार होती व दासबोधाची मूळ प्रत सर्व त्यांचेच हातची आहे असें सांगतात.

कल्याण हा समर्थांचा अत्यंत प्रिय शिष्य होता. समर्थांवर कल्याणाची भक्ति अत्यंत होती व कल्याणावर समर्थांचें प्रेमही तसेंच होतें. दोघांसही परस्पर वियोग एक क्षणभरही सहन होत नसे. समर्थांचे इतर शिष्यांचे हांतून कोणतीही गोष्ट होईनाशी झाली कीं, कल्याण आपला ती करण्यास तयार असावयाचाच. मूल एखादे वेळीं आईस विसरेल व आईही क्वचित् प्रसंगीं मुलास विसरेल; परंतु समर्थ व कल्याण

हे केव्हांही एकमेकांस विसंबत नसत. कल्याण याचें पूर्वीचें नांव ‘ अंबाजी ’ व हा करवीरचे सुभेदार पाराजीपंत यांचे बहिणीचा मुलगा होय. मुलास लिहावयास येतें व मुलगा हुषार आहे असें पाहून हा आपल्यास ग्रंथ लिहिण्याचे कामीं उपयोगी पडेल असें समर्थांस वाटलें; व त्याप्रमाणें त्याणीं त्यास आपलेजवळ ठेऊन घेतलें. एके दिवशीं समर्थांचे आज्ञेप्रमाणें पुढें बसून मागें झाड तोडीत असतां हा विहिरींत पडला, तेव्हां समर्थांनीं विहिरीचे कांठावर उभे राहून ‘ अंबाजी ’ कसें काय आहे असें विचारलें. त्याबरोबर ‘ स्वामीकृपेनें कल्याण आहे ’ असें अंबाजीनें सांगितलें. तेव्हां ‘ कल्याणा बाहेर ये ’ असें समर्थांनीं ह्मटलें व त्या दिवसापासून त्यांस समर्थ व इतर लोक ‘ कल्याण ’ ह्मणूं लागले अशी दंतकथा आहे. दासबोध लिहिण्याचे कामीं कल्याणाची मदत बरीच होती हें वर सांगितलेंच आहे.

दासबोधाचे एकंदर दशक वीस आहेत व प्रत्येक दशकाचे दहा समास आहेत. हा ग्रंथ सर्व ओंवीबद्ध आहे. पुष्कळ ठिकाणीं निरनिराळ्या ग्रंथांतील श्लोकांवर टीका आहे. हा भक्तिपर व प्रासादिक ग्रंथ सर्व भाविक लोक मोठ्या प्रेमानें वाचतात. भाविक लोकांनींच वाचण्यासारखा नुसता परमार्थपर बोध व ज्ञानच यांत आहे असें नाहीं; तर प्रत्येक कुटुंबी संसारी माणसानेंसुद्धां हा नित्य वाचण्याचा क्रम ठेवल्यास अत्यंत फायदा होणारा आहे. प्रपंच साधून परमार्थ करावा असा रामदासच १२ वे दशकांत पहिले समासीं बोध करतात. ते ह्मणतात :—

आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ।
येथें आळस करूं नका । विवेकीहो ॥ १ ॥
प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुह्मीं कष्टी व्हाल ।
प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुह्मीं विवेकी ॥ २ ॥
प्रपंच सोडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।
मग तया करंट्याला । परमार्थ कैचा ॥ ३ ॥

प्रपंची जो सावधान । तो परमार्थ करील जाण ।
प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थीं खोटा ॥ ४ ॥

.... .... .... .... .... ....

संसारास आलियाचें सार्थक । जेथें नित्यानित्य विवेक ।
इहलोक आणि परलोक । दोन्ही साधले ॥ १ ॥ २ ॥ १७ ॥

ह्यावरून समर्थांचे वेळीं लोकांची प्रवृत्ति प्रपंच सोडून परमार्थ करण्याकडे होती असें दिसतें. प्रपंचांत राहून परमार्थ करितां येत नाहीं हें मत देशाच्या उर्जितदशेस आड येणार, व हीच प्रवृत्ति कायम राहिली तर लोकांचे हातून स्वहित व देशहित व देशसेवा होणार नाहीं, हें जाणूनच हा उपदेश केला आहे.

मनुष्यास त्याचे आयुष्यांत निरनिराळे कालीं निरनिराळीं कर्तव्यें करावयाचीं असतात, व त्याप्रमाणें त्याचे आयुष्याचे मुख्यतः चार भाग ह्मणजे ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, व भिक्षु हे चार आश्रम होत. प्रत्येक आश्रमाचें एक विशेष कर्तव्य आहे; परंतु त्यांतही प्रपंच साधून परमार्थ करण्याविषयीं जो वर उपदेश केला आहे, त्यांस पूर्ण अनुकूल असा गृहस्थाश्रमच आहे असें समर्थांनीं मोठ्या आग्रहानें पुढील ओंवींत सांगितलें आहे:—

नाना वेष नाना आश्रम । सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम ।
जेथें पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥
........ याकारणें गृहस्थाश्रम । सकळामध्यें उत्तमोत्तम ।
परंतु पाहिजे स्वधर्म । आणि भूतदया ॥ १४।७

वेदोक्त कालापासून ब्राह्मणांचें मुख्य कर्तव्य ह्मटलें ह्मणजे ज्ञानार्जन होय. सर्व ऋषि, साधु, संत हे आपला सर्व काल याच व्यासंगांत घालवीत; व उपजिवीकेकरितां राजाश्रयावर अगर भिक्षेवर अवलंबून असत. या दोन मार्गांपैकीं दुसराच स्वतंत्र असल्यामुळें विशेष श्रेयस्कर मानला गेला. ह्मणून फार प्राचीन कालापासून ब्राह्मणांची मुख्य वृत्ति ‘ भिक्षा मागणें ’ झाली आहे. भिक्षेचें महत्व काय आहे व ती कशी मागावी हें दासानीं खालील ओंवींत मोठ्या मार्मिक रीतीनें सांगितलें आहे.

नित्य नूतन हिंडावें। उदंड देशाटन करावें।
तरीच भिक्षा मागतां बरवें। श्लाघ्यपणें॥
भिक्षा ह्मणजे कामधेनू। सदाफळ नव्हे सामान्यू।
भिक्षेस करी जो अमान्यू। तो करंटा योगी॥
गोरक्ष वाणिज्य कृषी। त्याहून प्रतिष्ठा भिक्षेसी॥
कांहीं भिक्षा आहे ह्मणावें। अल्प संतोष असावें।
बहुत आणितां घ्यावें। मुष्टि एक॥ १४।२

याप्रमाणें भिक्षेची महति व स्थिति असतांना हल्लीं तिला परंपरेनें व कालवशीनें अतिशय निकृष्टरूप आलें आहे, व भिक्षा मागणें हा आमच्या देशामध्यें कित्येकांना वडिलोपार्जित धंदाच होऊन बसला आहे. आळशी व निरुद्योगी लोकांना 'भिक्षा' ही एक अमरवल्लीच होऊन राहिली आहे. भिक्षेचें मर्म जो 'अल्प संतोष' त्याचा तर अलीकडील भिक्षेकऱ्यांमध्यें अभावच आढळतो. धर्माचे नांवाखालीं जोंपर्यंत निरुद्योगी लोक पोसले जात आहेत, तोंपर्यंत देशास उर्जित दशा येण्याचें नांव घेण्यास नको. परंतु भिक्षेकऱ्यांची संख्या सालानुसाल सारखी वाढत आहे, व त्याबरोबरच आळस व मांद्य वाढत आहेत.

जो मनुष्य प्रपंचांत पडला आहे, ज्याचा लोकांशीं नित्य संबंध येतो, त्यानें आपली वर्तणूक कशी ठेविली असतां त्याचा व्यवहार उत्तम रीतीनें चालेल व संसारास आवश्यक जी दक्षता ती अंगीं कशी येईल वगैरे गोष्टींबद्दलही मधून मधून बरींच वचनें आढळतात. हीं वाचलीं असतां संसारांत मनुष्यास पदोपदीं ज्या अडचणी व जे अनुभव येतात, ते मोठ्या मार्मिक व हृदयंगम रीतीनें त्यांत गोंवले आहेत असें वाचकांचे ध्यानांत तत्काळ आल्यावांचून रहाणार नाहीं. समर्थांनीं सर्व आयुष्य ब्रह्मचर्य स्थितीमध्यें घालविलें, व ते नेहमीं रानावनांत फिरणारे होते; असें असूनही संसारी मनुष्याचे अनुभव त्याणीं इतक्या सूक्ष्म रीतीनें वर्णिले आहेत हें पाहून मोठें आश्चर्य व कौतुक वाटतें. त्यांची अवलोकन शक्ति विलक्षण होती. हीं नीतीपर वचनें एकवटून ग्रंथ

केल्यास तो आबालवृद्धांस, गरीब श्रीमंतास उत्तम नीतिमार्गदर्शक होईल. अशा प्रकारचें ज्यांचें महत्व त्या वचनांचे कांहीं वेंचेः—

धूम्रपान घेऊं नये । उन्मत्त द्रव्य सेवूं नये ।
बहुतेकांशीं करूं नये । मैत्री कदा ॥
सभेमध्यें लाजूं नये । बाष्कळपणें बोलूं नये ।
परस्त्रीतें पाहूं नये । पापबुद्धीनें ॥
मलीन वस्त्र नेसूं नये । जाणारासि पुसो नये ।
कोठें जातोसी ह्मणोनी ॥
पराधीन होऊं नये । आपुलें ओझें घालूं नये ।
कोणा एकाशीं ॥ २।२
जन्मा आलियाचें फळ । कांहीं करावें सफळ ।
ऐसें न करितां निष्फळ । भूमिभार होय ॥ २।४
आपण खातों अन्नासि । अन्न खातें आपणासीं ।
सर्वकाळ मानसीं । चिंतातूर ॥ ३।४
जैशी विद्या तैशी हांव । जैसा व्याप तैसें वैभव ।
तोलासारिखा हावभाव । लोक करिती ॥ ९।४
प्रत्यक्षास आणि प्रमाण । निश्चयास आणि अनुमान ।
मार्ग सांडून आडरान । घेऊंच नये ॥ १०।४
बहुत भ्रष्ट मिळाले । त्यांत उमजल्याचें काय चाले ।
सृष्टीमध्यें उमजले । ऐसे थोडे ॥ १०।६
आळस उदास नागवणा । आळस प्रयत्न बुडवाणा ।
आळसें करंटपणाच्या खुणा । प्रकट होती ॥ ११।३
पेरिलें तें उगवतें । उसणें द्यावें घ्यावें लागतें ।
वर्म काढितां भंगतें । परांतर ॥ १२।२
बोलणें एक चालणें एक । त्याचें नांव हीनविवेक ।
येणेंकरितां सकळ लोक । हांसों लागती ॥
भाग्यपुरुष थोरथोर । त्यासी निंदिती दिवाळखोर ।
सांवास देखतां चोर । चरफडी जैसा ॥ १२।७

कठिण शब्दें वाईट वाटतें । हें तों प्रत्यया येतें ।
तरी मग वाईट बोलावें तें । कायनिमित्त ॥
आपणांस चिमोटा घेतला । तेणें कासावीस झाला ।
आपल्यावरूनी दुसऱ्याला । राखीत जावें ॥ १२।१०
एक शीत चांचपावें । ह्मणिजे वर्म पडे ठावें ।
तैसें थोड्या अनुभवें । बहुत जाणावे ॥ १३।६
समाधानें समाधान वाढे । मैत्रीनें मैत्री जडे ।
मोडितां क्षणमात्रें मोडे । बरेंपण ॥
आहा कांहो अरे कारे । जनीं ऐकिजे कीरे ।
कळत असतांच कारे । निकामीपणें ॥ १४।६
वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा ।
सकळ लोकांचा जिव्हाळा । मोडूंच नये ॥ १५।१
कष्टेंविण फळ नाहीं । कष्टाविण राज्य नाहीं ।
केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥
मेळविती तितुकें भक्षिती । ते कठिण काळीं मरोन जाती ।
दीर्घ सूचनें वर्तती । तेचि भले ॥ १८।७
सकळांसि नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें ।
अखंड कोणीएकाचें उणें । पडोंचि नेदी ॥
दुसऱ्याच्या दु:खें दुखावें । दुसऱ्याच्या सुखें सुखावें ।
अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ॥ १९।४

हे वेंचे पुष्कळ झाले खरे, तथापि विषयाचे महत्वाकडे लक्ष दिलें ह्मणजे अशासंबंधानें जितके उतारे द्यावे तितके थोडेच होणार आहेत. आरंभापासून अखेरपर्यंत सर्व दासबोध अशा उत्तम वचनांनीं परिपूर्ण भरलेला आहे, हें प्रत्येक दशकांतून वर घेतलेल्या वेंच्यावरून पूर्णपणें लक्षांत येईल.

यांशिवाय अक्षर कसें असावें, मनुष्याचा नित्य दिनक्रम कसा असावा वगैरे किरकोळ बाबतींतही समर्थांनीं उत्तम उपदेश केला आहे.

कवित्व कसें असावें, त्याच्या अंगीं कोणते गुण असावे, तेंही मोठ्या चातुर्यानें वर्णिलें आहे असें पुढील वेंच्यावरून लक्षांत येणारें आहे.

कवित्व नसावें रसभंग । कवित्व नसावें रंगभंग ।
दृष्टांतहीन ॥
कवित्व नसावें पाल्हाळ । कवित्व नसावें बाष्कळ ।
कवित्व नसावें कुटिल । लक्षूनिया ॥
कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें रसाळ ।
कवित्व असावें प्रांजळ । अन्वयाचें ॥ १४।३

येथपर्यंत दासबोधांतील जीं वचनें दिलीं त्यावरून प्रपंच—जग—ज्याच्या-योगानें सुगम व सुखकर करितां येईल, अशा ज्ञानानें हा ग्रंथ पूर्ण परिप्लुत आहे अशी खात्री झाल्याशिवाय राहणार नाहीं. प्रपंची मनुष्याच्या दृष्टीनें इहलोकचें जें मुख्य कर्तव्य, तें ज्या ज्ञानाच्यायोगानें उत्तम रीतीनें बजावतां येईल त्यासंबंधीं ग्रंथाचें येथवर विवेचन केलें. आतां ह्यापेक्षां अधिक महत्वाचें काय, तर ज्याच्यायोगानें राज्य एकवटून त्यास बळकटी येते! ज्याच्यायोगानें प्रत्येक मनुष्याच्या अन्तःकरणांत राष्ट्रीयत्वाची कल्पना उत्पन्न होऊन एकप्रकारचें विशेष वळण वर्तनास लागतें व व्यक्तीची व राष्ट्राची उन्नति झपाट्यानें होते, असें जें अपूर्व, विलक्षण राजनीतीचें ज्ञान हें ह्या ग्रंथापासून कितपत प्राप्त होण्यासारखें आहे ह्याचाही विचार करणें अवश्य आहे. असल्या ह्या अनुपमेय ज्ञानाचा प्रसार समर्थांनीं आपल्या उपदेशानें सर्व राष्ट्रभर फार जलद करून सोडिला. समर्थांसारख्या अलौकिक, ज्ञानी व राजकार्यपटु महात्म्याचाच शिवाजीस पूर्ण पाठिंबा असल्यामुळें राज्यस्थापनेचें व एकीकरण करणेचें अचाट काम फत्ते झालें व महाराष्ट्रास स्वातंत्र्याचे व स्वराज्याचे कांहीं दिवस लाभले. ह्या अत्युत्तम, उदात्त राजनीतिविषयक ज्ञानाचे दोन समास समर्थांनीं लिहिले आहेत. ह्या दोन समासांत जो उपदेश केला आहे व जीं राजकार्यपटुत्वाचीं लक्षणें व मर्में सांगितलीं आहेत, तीं केव्हांही व कोठेंही लागू पडण्यासारखीं व ग्राह्य आहेत. या सर्वमान्य उदात्त विचारांचे कांहीं वेंचे देणें अवश्य आहे.

प्रसंग समय वोळखावा । धीर बहुत असावा ।
संबंध पडों न द्यावा । अतिपरिचयाचा ॥
फड नासोंच न द्यावा । पडिला प्रसंग सांवरावा ।
अतिवाद न करावा । कोणा एकाशीं ॥
करणें असला अपाय । तरी बोलोन दाखऊं नये ।
परभारेंचि प्रत्यय । प्रचीतीस आणावा ॥
जो बहुतांचें सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना ।
बहुत सोशितां उरेना । महत्व आपुलें ॥
कांटीनें काठी झाडावी । झाडावी परी ते कळों न द्यावी ।
कळकटपणाची पदवी । असों न द्यावी ॥
मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें ।
कित्येक खल्लक उगवावे । राजकारणामध्यें ॥

शिवाजी समर्थांस भेटण्यास प्रथम आला त्यावेळीं याणीं बोध केला, तो ‘ लघुबोध ’ या नांवानें दासबोधांत प्रसिद्ध आहे. तसेंच त्याच वेळीं ‘ राजधर्म ’ व ‘ क्षात्रधर्म ’ हेही समर्थांनीं मोठ्या मार्मिक रीतीनें ‘ राजश्री ’ स समजावून सांगितले.

येथपर्यंत आधिभौतिक महत्वाचे व किरकोळ विषयाचें विवेचन समर्थांनीं किती उत्तम व हृदयंगम केलें आहे त्याचें दिग्दर्शन झालें. सर्वांत श्रेष्ठ जें अध्यात्मज्ञान आत्म्याचें अविनाशित्व व सर्वव्यापकता, ईश्वराचें ऐक्य, माया व परब्रह्म यांची सांगड, एकाचें अनित्यत्व व दुसऱ्याचें नित्यत्व इत्यादि विषयांचें विवेचन समर्थांनीं मोठ्या चातुर्यानें केलें आहे. विषय इतके गहन असून समर्थांच्या साऱ्या भाषेमुळें व योग्य व उत्तम दृष्टान्त योजण्याच्या विलक्षण शैलीमुळें ते साधारण जिज्ञासू वाचकांस फार सुगम झाले आहेत. परमार्थज्ञानाची वाट सुगम करणारी महत्वाची पायरी ह्मणजे ‘ आत्मज्ञान ’ होय व यांवरच समर्थांची फार भिस्त दिसते. ते ह्मणतात:—

ज्ञान ह्मणिजे आत्मज्ञान । पहावें आपणांस आपण ।
या नांव ज्ञान ॥

शोधितां आपलें मूळस्थान । सहजचि उडे अज्ञान ।
या नांव ह्मणिजे ब्रह्मज्ञान । मोक्षदायक ॥
स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म । येविषयीं संदेह भ्रम ।
धरूंच नको ॥
आतां हेंचि दृढीकरण । व्हावया करीं सद्गुरुभजन ।
सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त पाविशी ॥
या नांव शिष्या आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान ।
भवभयाचें बंधन । समूळ मिथ्या ॥ ९।६

चौऱ्यांशीं लक्ष योनीच्या फेऱ्यामध्यें प्राणी सांपडला कीं, तो आपल्या पापपुण्याप्रमाणें निरनिराळे देह धारण करितो. नरदेह प्राप्त होण्यास पुष्कळच पूर्वपुण्याई पाहिजे असें आमच्या लोकांचें मत आहे. देह हा अनित्य आहे व आत्मा हा नित्य व सर्वव्यापक आहे. देवळामध्यें जसा देव तसा शरीरामध्यें आत्मा हा असावयाचाच. याबद्दल दास ह्मणतात :—

देऊळें ह्मणिजे नाना शरीरें । तेथें राहिजे जीवेश्वरें ।
नाना शरीरें नाना प्रकारें । अनंत भेद ॥
चालतीं बोलतीं देऊळें । त्यामध्यें राहिजे राऊळें ।
जितुकीं देऊळें तितुकीं सकळें । कळलीं पाहिजे ॥

आत्मा हा एकच आहे, परंतु संयोगपरत्वें तो गुणामध्यें भिन्नत्व पावतो. उंसाचे शेतास पाणी पाजलें असतां त्याचे अंगीं माधुर्य येतें, परंतु तेंच पाणी विषवल्लीस सोडिलें असतां त्याचा विपरस बनतो. ह्मणून आत्म्याच्या गुणामध्यें जर कांहीं फेर आढळत असेल तर तो संगतीमुळेंच असला पाहिजे.

आत्मा आत्मपणें असतो । देहसंगे विकारतो ।
साती मानें भरी भरतो । भलतीकडे ॥
बरी संगति सांपडली । जैसी उंसास गोडी आली ।
विषवल्ली फोंफावली । घातकी प्राणीं ॥

उदकाचा नाशच होतो । आत्मा विवेकें निवतो ।
ऐसा आहे प्रत्यय तो । विवेकें पहावा ॥

जीवात्मा व परमात्मा एकच आहे. त्यांचेमध्यें पूर्ण अभिन्नत्व आहे. भेद भ्रामक आहे, व यामुळेंच अपूर्ण ज्ञानी जे आहेत, त्यांचे मनांत द्वैत कीं अद्वैत असा विकल्प उत्पन्न होतो. माया व ब्रह्म यांची सांगड कशी बनली आहे, दृश्य तें मिथ्या व विनाशी कां व अदृश्य तें सत्य व नित्य कां वगैरे गूढ विचारांचें ज्ञान प्राप्त झालें कीं द्वैत मत पार नाहींसें होऊन अद्वैताचाच सर्वत्र जयजयकार होतो. मूढजन, जगाचा उत्पादक व चालक अशा परमेश्वरास विसरतात व अल्प कोत्या समजुतीमुळें निरनिराळ्या देवता मानतात. जितक्या प्रकृती तितक्या विकृति या न्यायानें असंख्य उपास्य देवता अस्तित्वांत आल्या आहेत.

ऐक निश्चय तो ऐसा । मुख्य देव आहे कैसा ।
नाना देवांचा वळसा । करूंचि नये ॥
जेणें निर्मिलें चराचर । त्याचा करावा विचार ।
शुद्ध विवेकें परमेश्वर । वोळखावा ॥
ब्रह्मा विष्णु आणि हर । त्यासि निर्मिता तोचि थोर ।
तो वोळखावा परमेश्वर । नानायत्नें ॥
एक ह्मणती तुकाई । एक ह्मणती यमाई ।
एक ह्मणती सटवाई । सर्व करी ॥
एक ह्मणती विरंणा कर्ता । एक ह्मणती बस्वंणा कर्ता ।
एक ह्मणती रेवंण्य कर्ता । सर्व कांहीं ॥
देव पाहतां आहे एक । परंतु करितो अनेक ।
त्या अनेकास एक । ह्मणों नये कीं ॥ १८।७
पंचभूतां वेगळें निर्गुण । तेथें नाहीं कर्तेपण ।
निर्विकारासि विकार कोण । लावूं शके ॥ १३।८
ब्रह्म निर्गुण निराकार । माया सगुण साकार ।
ब्रह्मासि नाहीं पारावार । मायेसि आहे ॥

ब्रह्म निर्मल निश्चल। माया चंचल चपल।
ब्रह्म निरुपाधि केवळ। माया उपाधिरूप॥
माया दिसे ब्रह्म दिसेना। माया भासे ब्रह्म भासेना॥
माया नासे ब्रह्म नासेना। कल्पांत काळीं॥ ६।५
ब्रह्म सर्वव्यापक। ब्रह्म अनेकीं एक।
ब्रह्म शाश्वत हा विवेक। बोलिला शास्त्रीं॥
धरूं जातां धरितां नये। टाकूं जातां टाकितां नये।
जेथें तेथें आहेच आहे। परब्रह्म तें॥ २०।१०
परब्रह्म जाणार नाहीं। कोणास दुःख देणार नाहीं।
स्तुति निंदा दोनी नाहीं। परब्रह्मीं॥ १७।६

सर्व कांहीं पृथ्वीपासून होतें व अखेरीस पृथ्वीसच मिळतें हें तत्व पुढील ओवींमध्यें मोठ्या खुबीनें गोंविलें आहे.

जितुका कांहीं झाला आकार। तितुक्यास पृथ्वी आधार।
होती जाती प्राणिमात्र। शेवटीं पृथ्वी॥ १५।३

सृष्टीचे एकंदर व्यापार 'चक्रनेमि' क्रमाप्रमाणें चालले आहेत. कोणतीही स्थिति स्थिर व शाश्वत नाहीं. अवनति उन्नति ही एकसारखी सुरू आहे. तेव्हां जगाची सर्व व्यापारपरंपरा ह्मणजे एक रहाटगाडगेंच आहे.

एक भाग्यपुरुष मोडती। एक नवे भाग्यवंत होती।
तैशीच विद्या व्युत्पत्ति। होत जाते॥
एक भरे एक रितें। रितें मागुतें भरतें।
भरतें तेंही रितें होतें। काळांतरीं॥
ऐशी हे सृष्टि चालली। संपत्ति दुपारची सांउली।
वयसा तरी निघोन गेली। हळूहळू॥ १७।७

येथपर्यंत व्यवहार, नीति वगैरेबद्दलचे तसेंच अत्युच्च जें आत्मज्ञान, वेदान्त अगर परमार्थज्ञान याबद्दलचे वेंचे दिलेले फार झाले खरे, तथापि विषयाचे महत्वाकडे लक्ष दिलें असतां हे वेंचे अगदींच थोडे झाले असें

वाटेल; तथापि ह्या वर दिलेल्या वेंचांवरून 'दासबोध' हा ग्रंथ सदरील ज्ञानवचनांनीं ओतप्रोत आहे अशी खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. अकिंचन, व 'दिशोपि वसनं' अशा भिकाऱ्यापासून तों थेट श्रीयुत नरश्रेष्ठापर्यंत सर्व आबालवृद्धांना या अपरिमित व अत्युच्च ज्ञानाचा रसास्वाद सारखा घेतां येण्याजोगा हा ग्रंथ आहे. कांहीं पुस्तकांच्या वाचनानें मनुष्य रंकाचा राव बनून जातो असें एका इंग्रजी ग्रंथकाराचें ह्मणणें आहे. ह्या ग्रंथाचे वाचनानें मनुष्य 'रंकाचा राव' बनून जाईल, एवढेंच नव्हे तर 'नराचा नारायण' बनवून सोडण्याचेंही अलौकिक सामर्थ्य ह्या ग्रंथांत आहे. प्लेटो वगैरे प्राचीन युरोपीय तत्ववेत्ते यांच्या मतें 'तत्वज्ञान हें मनुष्याकरितां नाहीं, मनुष्य तत्वज्ञानाकरितां आहे.'* ह्या तत्वाचा अंमल जोंपर्यंत पाश्चात्य राष्ट्रामध्यें होता तोंपर्यंत तिकडील लोक इहलोकचे सुखास विशेष मानीत नसत, व ईश्वराबद्दल ज्ञान मिळविणें हेंच आपल्या आयुष्याचें मुख्य कर्तव्य असें समजून सर्व आयुष्य या दिशेनेंच घालवीत; परंतु बेकनच्या उपयुक्तता utilitarianiasm ह्या तत्वाचा प्रसार झाल्यापासून मनुष्य इहलोकचें सुख सुलभ करण्याकडे प्रवृत्त झाला व बेकनच्या तत्वज्ञानाचें शिक्षण हें इंग्लिश लोकांच्या अभ्युदयाचें मूळ कारण होय. बाकीचे देश थोडेबहुत स्वतंत्र आहेत; परंतु आमचा देश बहुतकरून बराच काल पराधीन आहे. देशास प्राप्त झालेल्या स्वतंत्रतेचा काल फार थोडा होता, याचेंही कारण आमच्यांतील तत्वज्ञानावरील प्रेम हेंच होय. पृथ्वीवरील मोठमोठ्या राष्ट्रांची मदार कायती आधिभौतिक सुखोत्पत्तीवर आहे, व त्याप्रमाणें त्यांचे सर्व प्रयत्न चालू आहेत; परंतु खरें सुख व खरी योग्यता कोणती, याचा बरोबर निर्णय न झाल्यामुळें ते खऱ्या सुखास अंतरतात. खरी सुखाची प्राप्ति ह्मणजे आत्मसंतोष होय. ज्ञानेश्वर ह्मणतात:—

> नाना दुःखीं प्राप्ती। जया उद्वेग नाहीं चित्तीं।
> आणि सुखाचिया आर्ती। अडपथेचिजेना।

---

* Man is made for Philosophy and not Philosophy for man.

ऐशी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता ।
आणि पालट नाहीं चित्ता । कोणे वेळीं ॥ ३।२

कोणत्याही गोष्टीचा अभिलाष नसणें, अगोदर शारीरिक किंवा मानसिक दुःख व्हावयाचेंच नाहीं, आणि जर कदाचित् झालें तर त्याविषयीं निष्काळजी असणें, सदासर्वकाळ सुप्रसन्न व काम, क्रोध, भय रहित असणें वगैरे गोष्टींचें अनुपम सौख्य ही आह्मां हिंदु लोकांची संपत्ति, परंतु पाश्चिमात्य उन्नतीच्या तेजास दिपून जाऊन आह्मीं ह्या संपत्तीस मुकूं लागलों आहों; असें न होतां, आधिभौतिक व मानसिक आत्मोन्नती सारख्याच चालवावयाच्या असतील तर ‘ रामदासां ’ नीं दासबोधांत व इतर साधूनीं प्रसंगानुसार केलेल्या उपदेशाचेंच अवलंबन केलें पाहिजे. ‘ स्कूलमेन ’ च्या निरुपयोगी ज्ञानापासून जसें बेकननें युरोपीयन लोकांचें मन अधिक उपयोगी ज्ञानाकडे वळविलें, तसेंच रामदासानीं आपल्या प्रेमळ व भक्तिपुरःसर उपदेशानें महाराष्ट्रीयांचे मनांतील विरक्तता व उद्विग्नता काढून त्यांस राष्ट्रहित व राष्ट्रोन्नति या महत् कार्यास लाविलें. ह्याचा प्रत्यय ‘ दासबोध ’ वाचूं लागलें असतां पदोपदीं येतो. ह्या ग्रंथांत वर सांगितल्या दोन्हीही सुखांची सांगड फार चांगली घातली आहे. लार्ड बेकनच्या Advancement of Learning ह्या ग्रंथास विश्वविद्यालयामध्यें जसें अत्युच्च पद मिळालें आहे व विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रम पुरा होण्यास ह्या ग्रंथाचें अध्ययन जसें अवश्यक मानलें आहे, तसेंच किंबहुना थोडें जास्त ह्या दासबोध ग्रंथाचें महत्व व योग्यता आहे. ज्यावेळीं मराठी भाषेचा विश्वविद्यालयीं शिरकाव होऊन ती इतर भाषांप्रमाणें तेथें शोभूं लागेल, त्यावेळीं ‘ दासबोधा ’ स अभ्यासक्रमांत अत्युच्च पद मिळाल्याखेरीज राहणार नाहीं. रामदास हे साधु होते, त्यांचे ग्रंथांत भक्ति व परमार्थज्ञान असावयाचें, व्यवहारी मनुष्यास उपयोगी असें त्यांत कांहींच मिळावयाचें नाहीं, अशा लटक्या समजुतीमुळें पुष्कळ चांगल्या सुशिक्षित लोकांमध्येंसुद्धां रामदासी ग्रंथाविषयीं अनास्था दिसून येते. ह्यास कारण रामदासी ग्रंथाचा अनुभव नसून सदर ग्रंथाचें

अज्ञान व रामदास हा मराठी कवि ही समजूत हें होय. अशा लोकांना 'दासबोधा' दि ग्रंथाचा रसास्वाद जर का एकदां मिळाला, तर त्यांचे मनांतील अनास्था नाहींशी होऊन ते रामदासाचे पक्के अध्यायी बनतील ह्यांत संशय नाहीं. भाविक लोक तर हा ग्रंथ वाचतातच; परंतु संसारी जनांनींदेखील याचें अध्ययन करावें अशी याची योग्यता आहे. ग्रंथाची भाषा सोपी, गोड व रसाळ आहे. या ग्रंथावर मराठी भाषेमध्यें टीकाविषयक एक स्वतंत्र ग्रंथ होईल. दासबोधादि ग्रंथ वाचले असतां समर्थांशीं प्रत्यक्ष भाषण केल्याप्रमाणें आहे असें समर्थांनींच वेणूबाईस सांगितलें, यावरून ह्या ग्रंथाचें महत्व किती आहे हें लक्षांत येण्यासारखें आहे.

# इतर ग्रंथ–पंचीकरण, मनाचे श्लोक, रामायण वगैरे.

## ४

मागील भागांत समर्थांच्या ओंवीबद्ध ‘ दासबोध ’ ग्रंथाचें विवेचन केलें आहे. ह्या भागांत समर्थांच्या इतर ग्रंथांचें स्वरूप दिग्दर्शन केलें आहे. समर्थांनीं अभंगग्रंथही पुष्कळ केला आहे. त्या सर्वांत ‘ पंचीकरण ’ प्रकरण मोठें व महत्वाचें आहे. हा ग्रंथ सर्व वैराग्यपर व परमार्थपर आहे. दासबोधांत जीं तत्वज्ञानाचीं उत्तम तत्वें गोंविलीं आहेत त्यांतील बहुतेक यांत आहेत. श्रोत्यानें खालील अभंगांत केलेल्या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें ह्यांत दिलेलीं आहेत.

वक्तयासी पुसे जीव हा कवण । शीवाचें लक्षण सांगा मज ॥
सांगा मज आत्मा कैंचा परमात्मा । बोलिजे अनात्मा तो कवण ॥
कवण प्रपंच कोणें केला संच । मागुता विसंच कोण करी ॥
कोण ते अविद्या सांगे जो जी विद्या । कैसें आहे आद्यस्वरूप तें ॥
स्वरूप ते माया कैसी मूळ माया । इशीं चाळावया कोण आहे ॥
आहे कैसें शून्य कोणतें चैतन्य । समाधान अन्न तें कवण ॥
कवण जाणता कवणाची सत्ता । मोक्ष हा तत्वता कोण सांगा ॥
सांगा ब्रह्मखूण सगुण निर्गुण । पंचवीस प्रश्न दासें केले ॥

ह्या गहन प्रश्नांचें विवेचन रामदासांनीं मोठ्या मार्मिक रीतीनें केलें आहे. ज्ञानरूपी गंभीर सागरांत मनुष्य जितका पुढें जाईल तितकें ईश्वराशीं त्याचें सान्निध्य निकट होतें, व हें ज्ञान पूर्ण झालें कीं, जग हें मिथ्या व निर्गुण निराकार ब्रह्मच सत्य व नित्य अशी खात्री होऊन मनुष्य तल्लीन व तादात्मी बनून जातो. परमेश्वराचें ज्ञान होण्यास ज्ञानच पाहिजे.

ज्ञान देहीं वसे तया देव दिसे । अंतरीं प्रकाशे ज्ञानदृष्टी ।
ज्ञानदृष्टी होतां पाविजे अनंता । हा शब्द तत्वतां दास ह्मणे ॥

मनुष्याचें व्यवहारांतील वर्तन पुष्कळ अंशीं संगतीवर अवलंबून असतें. परमार्थज्ञानाविषयींही हीच गोष्ट खरी आहे. साधूंची संगति झाली असतां मनुष्य साधूच बनेल.

कस्तुरीका होय कस्तुरीच्या योगें । साधुच्याही संगें साधुजन ॥
साधुजन होती संगति धरितां । मिळणी मिळतां गंगाजळीं ॥
वाणलिया त्या निःसंगाचा संग । होईजे निःसंग आपणचि ॥
देवाचे संगति देवची होईजे । चतुर्भुज राजे वैकुंठीचे ॥

परंतु दुर्जन संगति झाली असतां सज्जनही दुर्जन बनतो.

खाराचे संगति नासे मुक्ताफळ । होतसे तात्काळ कळाहीन ॥
लाखेच्या संगति सोनें होय उणें । दुग्ध हें लवणें नासतसे ॥
दुर्जनसंगति सज्जन दांसळे । क्रोध हा प्रबळे अकस्मात ॥
दास ह्मणे संग त्याग दुर्जनाचा । धरा सज्जनाचा आदरेसी ॥

माया गुणात्मक आहे, ब्रह्म निर्गुण आहे. मायेच्या अस्तित्वास ब्रह्माची जरूर आहे, परंतु ब्रह्म हें निरालंबी, स्वस्वरूपी व सर्वव्यापक आहे. ब्रह्म आणि माया निवळ भ्रांतीमुळें एकच दिसतात.

बोलताती सर्व ब्रह्म ऐसें बंड । सर्वही थोतांड सत्य जाणा ॥
सत्य जाणा ब्रह्म निर्मळ निश्चळ । मायेचा विटाळ तेथें नाहीं ॥
जवळी ना दुरी पाताळीं ना वरी । सबाह्यअभ्यांतरीं कोंदलेंचि ॥
कोंदलेंचि असे परि तें न दिसे । लवलिच कैसें आढळेना ॥
आढळेना अंगीं असोनि सर्वांगीं । जयालागीं योगी धुंडिताती ॥
चोजवेना एका सद्गुरुवांचूनि । निश्चय हा मनीं पाविजेतो ॥

ईश्वर सर्वव्यापी आहे, त्याचें ज्ञान व प्राप्ति होण्याकरितां लोक निरनिराळ्या भक्तिमार्गाचें अवलंबन करितात. कोणी कर्ममार्गी असतात, तर कोणी उपासनामार्गानें त्याची भक्ति करतात. मनुष्यास सुख व समृद्धि असतांना, क्वचितच तो परमेश्वरास आठवतो, परंतु तीच विपत्ति

आली असतां त्यांतून मुक्तता होण्याकरितां त्यास नाना मार्गांनीं आळवूं लागतो. परंतु खरा मार्ग जो निःसीम, निरिच्छ व दृढभक्ति त्याचा स्वीकार न केल्यामुळें ईश्वरप्राप्ति होत नाहीं. कारण प्रसिद्ध साधु ' तुकाराम ' यांच्या ह्मणण्याप्रमाणें ' देव भावाचा भुकेला ' आहे. जेथें भाव तेथें देव.

भावनेचा देव भावार्थे भाविला । देव भक्त झाला भावनेचा ॥
भावनेचा देव भावनेचा भक्त । भावनेनें मुक्त भावितसे ॥

केव्हांही व कोठेंही उपयोगी पडणारा हा खरा मार्ग सोडून खोट्या मार्गाचेंच विनाकारण स्तोम माजविलें आहे. सोंवळेंओंवळें याचीच सर्वत्र बंडाळी माजलेली दिसते. देह हा मूळचा विटाळाचा व अमंगल असतां त्यास शुद्ध करण्याकरितां बाह्योपचार करितात. परंतु मुंडनादि बाह्योपचारांनीं शुद्ध केलेला देह पुनः अपवित्र होणारच, व पुनः त्यास त्याच उपचारांनीं शुद्ध करावयाचें व ही परंपरा सारखी सुरू रहावयाची; परंतु मुख्य जी अंतःकरणशुद्धि ती करण्याकडे कोणाचेंच लक्ष जात नाहीं. ब्राह्मणांच्या सोंवळ्या ओंवळ्याबद्दल तिरस्कार तुकारामांनीं

ऐसें कैसें रे सोंवळें । शिवतां होतसे ओंवळें ।

या अभंगांत व्यक्त केला आहे. रामदासांनींही त्याच तऱ्हेचे उद्गार काढले आहेत.

अस्थिचा विटाळ होतां स्नान केलें । चुडे दातवले कासयासी ॥
आचमन करावें शूद्राच्या विटाळें । हाटाचे चौटाळे कोण जाणें ॥
नदीचे प्रवाहीं आंत पाहों नये । स्नानसंध्या होय अग्रोदकीं ॥
ओले चर्मी दृष्ट होत आहे हिंग । स्वयपाकीं सांग सेविताती ॥
रामदास ह्मणे हें कोणी न पाहे । देह मुळीं आहे विटाळाचा ॥

मायामोहामध्यें मनुष्य सांपडून जन्मापासून मरणापर्यंत सारखा संसाराची दगदग करीत असतो, व आशा वाढल्यामुळें सुख व समाधान यांस अंतरतो. आजन्म ' माझें माझें ' ह्मणून मिळविलेलें सर्व सोडून शेवटीं आला तसाच एकटा निघून जातो. ह्मणून सुख असें कोठें

नाहीं. संसार हा दुःखमूलक आहे व त्यांतून तरून जाण्यास ईश्वराचेंच चिंतन केलें पाहिजे, असे विचार झाल्याशिवाय मुक्तता नाहीं.

कोणाचें हें घर कोणाचा संसार । सांडुनी शरीर जाणें लागे ॥
जाणें लागे अंतीं एकलें एकटें । व्यर्थ खटपटी जन्मवरी ॥
अधोगती गेले देवा न भजतां । संसारीं ह्मणतां माझें माझें ॥
माझें माझें करी साचाचिये परी । अति दुराचारी एकलाची ॥
एकलाची येतां एकलाची जातां । मध्येंचि दुश्चिता मायाजाळ ॥
रात्रंदिवस मन राघवीं असावें । चिंतन नसावें कांचनाचें ॥
कांचनाचें ध्यान परस्त्री चिंतन । जन्मासि कारण हींच दोन्हीं ॥
दोन्हीं नको धरूं निंदा नको करूं । तेणें हा संसारू तरशील ॥

वरील वेंचांवरून हा ग्रंथ केवळ वेदान्तपर आहे असें दिसून येईल. जगाची उत्पत्ति, ब्रह्म व माया यांचें भिन्नत्व, संसाराची दुःखमुक्तता, व भावनेचा देव इत्यादि गहन सिद्धांतांचें यामध्यें मोठ्या खुबीनें विवेचन केलें आहे. दिलेल्या वेंचांवरून, दृष्टान्त देऊन विषय सुगम करण्याची समर्थांची विलक्षण हातोटी होती असें स्पष्टपणें लक्षांत येईल. याच वेंचांवरून मागील अभंगाचा शेवट तो पुढील अभंगाचा आरंभ आहे. असेंही लक्षांत आल्याशिवाय रहावयाचें नाहीं. या रचनाविशेषामुळें अभंगास एकप्रकारची मोहकता आली आहे. यावरून रामदासांचा महाराष्ट्रभाषेशीं दृढ परिचय व ती वाटेल तशी योजण्याची हातखंडा शैली व्यक्त होते.

वैराग्यशतक, ज्ञानशतक, उपदेशशतक, सगुणनिर्गुणशतक अशीं चार अभंगशतकें रामदासांनीं केलीं आहेत. या शतकांच्या नांवांवरून त्यांत कोणत्या विषयाचें प्रतिपादन आहे हें स्पष्ट होत आहे. याशिवाय मूर्खपणपंचक, उन्मत्तपंचक, ज्ञानपंचक, नीतिपंचक वगैरे किरकोळ एकतीस अभंगपंचकें लिहिलीं आहेत. ह्यापैकीं कांहींमध्यें अभंगसंख्या पांचांपेक्षां अधिक आहे. पंचकामध्यें विषय कोणता आहे हें नांवावरून स्पष्ट आहे, व त्याचा अर्थ निव्वळ परमार्थपर आहे. दासबोधामध्यें व

पंचीकरणामध्यें ज्या वेदांतविषयक सिद्धान्ताचें निरूपण केलें आहे, त्याच विषयांचें त्रोटक रीतीनें ह्या पंचकामध्यें विवरण केलें आहे, व कांहीं उत्तम दाखलेही दिले आहेत. ' उन्मत्तपंचका ' मध्यें अभक्त, भ्रष्ट व पतित जो आहे, त्याचें वर्णन खुबीदार रूपकें देऊन रामदासांनीं मोठें मजेदार, बोधपर व रमणीय केलें आहे. हें वाचलें असतां सन्मार्ग सोडून दुर्मार्गाकडे ज्याची प्रवृत्ति झाली आहे, त्याच्या मनोविकाराचें हुबेहुब चित्र डोळ्यापुढें उभें राहतें.

शांति माता हे मारिली । भ्रांति तेथें प्रतिष्ठिली ।
ऐसे लोक कलियुगिंचे । भय न धरिती पापाचें ।।
विवेक गुरु तो मारला । तेथें क्रोध प्रतिष्ठिला ।।
नीति अमृत सांडिलें । असत्य–मद्य–पान केलें ।।
दया बहीण संहारिली । निंदा मातंगी पाळिली ।।
पुत्र विचार दवडिला । दासीपुत्र प्रतिष्ठिला ।।
सत्य ब्राह्मण मारिला । दोषी धीवर पाळिला ।।
ज्ञानपक्वान्न सांडिलें । माष–अज्ञान सेविलें ।।
भक्ति लक्ष्मी त्यागिली । अभक्ति अवदसा घेतली ।।
मित्र विश्वास सोडिला । शत्रु विकल्प जोडिला ।।
भेद चोरटे पाळिले । अभेद राजे दुराविले ।।
रामीं रामदास ह्मणे । जळो अभक्ताचें जिणें ।।

प्रसिद्ध महाराष्ट्र साधु ' तुकाराम ' यांचा ब्राह्मणांनीं माजविलेल्या सोंवळ्याओंवळ्याच्या बंडाळीबद्दल तिरस्कार व्यक्त करणाऱ्या अभंगाचा उल्लेख वर केला आहे. हाच अभंग रामदासांनीं केलेल्या ' प्रस्ताविक ' पंचकांत आहे. तेव्हां हा अभंग मूळचा तुकारामाचा असून तो रामदासांनीं विषयविवेचनपरत्वें आपल्या ग्रंथांत घेतला, अगर याचे उलट स्थिति होती, हें कांहीं खात्रीलायख सांगतां येत नाहीं. दोघांच्याही ग्रंथांत अभंग अक्षरशः एकच आहे; यावरून तो कोणी केला असला तरी एवढी गोष्ट व्यक्त होते कीं, त्यावेळच्या सर्व साधु व

कवि यांच्यामध्यें दांभिक सोंवळ्याओंवळ्याबद्दल तिरस्कार पूर्णपणें वसत होता. ह्मणून त्याबद्दल ठिकठिकाणीं जोरदार व आस्थेचे उद्गार काढिलेले आढळतात. यावरून रामदासांचे मनांत वैदिक अगर ब्राह्मणधर्म स्थापण्याचें नसून निव्वळ महाराष्ट्रधर्मच स्थापण्याचा पूर्ण हेतु होता हें व्यक्त होतें. रामदासांची महाराष्ट्रधर्मावर फार भिस्त होती व त्यांचा उद्दिष्ट हेतु तडीस नेण्यास याचाच फार उपयोग झाला. याकरितांच त्यांस 'महाराष्ट्रगुरु' मानणें योग्य आहे, व लोक त्यांना त्याप्रमाणें मानतात.

हीं अभंगपंचकें व पंचीकरणें रामदासांनीं केव्हां लिहिलीं हें समजण्यास मार्ग नाहीं. निरनिराळ्यावेळीं प्रसंगास अनुसरून त्यांनीं हीं केलीं असावींत असें दिसतें. शके १५८२ मध्यें शिवरामस्वामी कल्याणकर यांची व समर्थांची गांठ पडली, त्यावेळीं शिवरामस्वामीनीं आपण केलेले ग्रंथ 'समर्थां'स दाखवून शुद्ध करण्याबद्दल विनंति केली. या ग्रंथांत 'पंचीकरण' ह्मणून एक ग्रंथ केलेला पाहून समर्थांची मर्जी शिवरामस्वामीवर फारच बसली. यावेळीं समर्थ बोलले कीं, 'आह्मीं पंचीकरणें पांच प्रकारचीं केलीं. बालबोध पंचीकरण करावें असें मनांत होतें, तें तुह्मीं केलें हें पाहून फार संतोष झाला. आतां आह्मीं करीत नाहीं. हींच आमचीं व आपल्या मुद्रेदाखल त्या 'पंचीकरणा'वर पांच ओंव्या करून ग्रंथाची पूर्णता केली. या स्वामीचरित्रांतील हकीकतीवरून रामदासांनीं शके १५८२ पूर्वीं आपलीं पंचकें लिहिलीं असावीं असें दिसतें. मागें ज्या पंचीकरणाबद्दल उल्लेख केला, त्याचे प्रत्येक अभंगाचे शेवटीं 'रामदास' अगर 'दास' असा शब्द आढळतो. यावरून तें पंचीकरण रामदासांनींच केलेलें असावें. बाकीचीं पंचीकरणें कोठेंही उपलब्ध असल्याचें आढळत नाहीं. संस्कृतांतील वेदान्तज्ञानभांडार प्राकृतांत आणून महाराष्ट्र प्राकृतजनांचा उद्धार करावा अशी समर्थांची दृढ इच्छा होती हें बालबोध पंचीकरण करण्याच्या त्यांच्या हेतूवरून स्पष्ट दिसतें.

रामायण, मनाचे श्लोक व कांहीं किरकोळ श्लोक इत्यादि रामदासांचे श्लोकबद्ध ग्रंथ आहेत. हे सर्व रामदासांनीं 'भुजंगप्रयात' वृत्तांत लिहिले आहेत. 'भुजंगप्रयात' हें रामदासाचें फार आवडतें वृत्त दिसतें. यांच्या रामायणांत किष्किंधाकांड, सुंदरकांड व युद्धकांड हीं तीनच कांडें आहेत. ह्यांची एकंदर श्लोकसंख्या १६०० आहे. आद्य कविगुरु 'वाल्मीकी' यानें केलेल्या रामायणाचें हें थोडक्यांत सार आहे असें रामदासच 'युद्धकांडा' मध्यें एक दोन ठिकाणीं ह्मणतात.

ह्मणे दास उदास श्रोतीं न व्हावें ।
ऋषी बोलितां तेंचि हें सार घ्यावें ॥ प्र० ६
ह्मणे दास हे श्लोक रामायणाचे ।
जरी अल्पसोपेचि नाना गुणांचे ॥
कितीएक पाल्हाळ टाकोनि मागें ।
कथा चालिली ते पुढें लागवेगें ॥ प्र० १०

हीं कांडें समर्थांनीं कधीं केलीं याबद्दल खात्रीलायख अशी माहिती नाहीं. रामदासचरित्रांतील हकीकतीवरून शके १५९४चे सुमारास हीं लिहिलीं असावींत. दासबोधामध्यें 'कवित्वा' चे आवश्यक ह्मणून जे गुण सांगितले आहेत, ते बहुतेक या ग्रंथांत आहेत. भाषा सोपी व अन्वयास सुलभ आहे. तसेंच सरस व गोडही आहे. 'उकारान्त' व 'ओकारान्त' शब्द यामध्यें पुष्कळ ठिकाणीं आहेत. मासल्याकरितां दोन श्लोक खालीं दिले आहेतः—

प्रतापें दिनेशू तपाचा हुताशू ।
विरांमाजी ईशू सुरांचा सुरेशू ॥
मुनींचा महेशू महादेव धीशू ।
सदांचा उदासू वनारण्यवासू ॥ प्र० ११
हरू शैलजा वल्लभू भक्तपाळू ।
धराधार मृत्युंजयो तो कृपाळू ॥ प्र० ११

तसेंच 'पालाणिका', 'कुडावा', 'गुमाने' 'खुजंटू', 'तमासा' वगैरे जुनाट, अपरिचित व ग्राम्य भाषेमध्यें प्रचलित असलेले शब्दही

थामध्यें बरेच आढळतात. ‘ दासबोधा ’ मध्यें उकारान्त शब्द फारच थोडे आहेत. या दोन ग्रंथांच्या भाषांची तुलना केली असतां असें दिसून येतें कीं, ‘ दासबोधां ’ च्या भाषेमध्यें गांभीर्य, प्रौढता, माधुर्य, मोहकता वगैरे गुण जितके आढळतात, त्यापेक्षां रामायणाच्या भाषेमध्यें हे गुण फारच कमी आढळतात. ‘ दासबोध ’ वाचून रामायण वाचलें कीं, हा फरक तात्काळ लक्षांत येतो. यावरून रामदासांनीं ‘ रामायण ’ आपल्या पूर्ववयांत लिहिलें असावें असें अनुमान होतें.

‘ मनाचे श्लोकां ’ मध्यें मनास उद्देशून रामदासांनीं उपदेश केला आहे. विचारी मनुष्यानें मनन करून हे श्लोक वाचले असतां त्यांत जगांत येणारे मोठमोठे अनुभव व गूढ तत्वें मोठ्या आस्थेनें व प्रेमानें रामदासांनीं वर्णिलीं आहेत, अशी खात्री झाल्याशिवाय रहावयाची नाहीं. ह्या श्लोकांची रचना इतकी कांहीं रम्य, मोहक, व आकर्षक आहे कीं, हे श्लोक कोणत्याही रामदासाच्या तोंडून ऐकिले कीं, ज्याचें चित्त वेधून जात नाहीं, असा माणूस क्वचित् आढळेल. भिक्षा मागतांना रामदासी-पंथी लोकांचा हे श्लोक म्हणण्याचा परिपाठ आहे. हे श्लोक म्हणजे मराठी भाषेंतील एक उत्तम अलंकार आहे, व ह्यापैकीं कांहीं श्लोक तर मराठी भाषेमध्यें उत्तम म्हणी होऊन राहिले आहेत. मनुष्य हा अनुकरणप्रिय आहे. सर्व बाबतींत वयानें व ज्ञानानें जे श्रेष्ठ असतील त्यांचेंच अनुकरण करण्याची प्रवृत्ति सार्वत्रिक दिसून येते. लोकाग्रणी अगर नायक म्हणून जे लोक गणिले जातात, त्यांच्याच वर्तनावर इतर लोकांची नीति व वर्तन अवलंबून असतें. लोकाग्रणींचें भाषण व वर्तन यामध्यें विसंगता अगदीं उपयोगीं नाहीं. व्यवहारामध्यें हा गुण मनुष्याचे अंगीं जितका अधिक असेल, त्या मानानें त्यास यशाचा वांटा अधिक येतो. लोकनायकत्वास लागणारे आवश्यक गुण रामदासांनीं पुढील श्लोकांत मोठ्या गंभीर व उदात्त रीतीनें गोंविले आहेत.

तुटे संवाद वाद तेथें करावा । विवेकें अहंभाव हा पालटावा ।
जनीं बोलण्यासारखें आचरावें । क्रिया पालटे भक्तिपंथेंचि जावें ॥

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे । दिसंदीस अभ्यंतरीं गर्व साचे ।
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । विचारी मना तूंचि शोधूनि पाहे ॥

अशाच प्रकारचे उत्तम उदात्त, व प्रत्येकाचे आयुष्यक्रमांत पावलों-पावलीं उपयोगीं पडणारे विचार मोठ्या रसिक व प्रेमळ रीतीनें यांमध्यें गोंवले आहेत. या श्लोकांचें नुसतें वाचन अगर पठण जरी मनुष्य नियमानें करीत राहील, तरी त्याच्या मनावर हा सर्व उपदेश बिंबून त्याचें वर्तन सुधारल्याशिवाय राहणारच नाहीं.

याशिवाय ‘ अन्वय ’ ‘ व्यतिरेक ’ वगैरे प्रसंगास अनुसरून पुष्कळ किरकोळ अभंग व स्तोत्रें रामदासांनीं लिहिलीं आहेत. एकेवेळीं शाहीर लोकांची चढाओढ चाललेली समर्थांनीं पाहून डफगाणें करून शाहीरावर ताण केल्याचेंही आढळतें. यावरून समर्थांचे अंगच्या अलौकिक कवित्वशक्तीचें अनुमान होतें.

# उपसंहार.

मागील चार भागांत महाराष्ट्रधर्म व रामदासी ग्रंथ यांचें विवेचन केलें आहे, त्यावरून रामदासांचा एकंदर रोंख काय होता हें कळण्यासारखें आहे. समर्थांस शिवाजी आपले गुरु मानी, हें कांहीं दाखले देऊन पहिल्या भागांत सांगितलेंच आहे. त्यांचा परस्पर जो संबंध होता त्यावरून समर्थ हे खरोखर ' राजगुरु ' च होते असें अवश्य मानिलें पाहिजे. कारण शिवाजी कोणतीही गोष्ट समर्थांचा सल्ला घेतल्याशिवाय करीत नसे, व समर्थही ज्यायोगानें राज्यविस्तार होईल अशाच गोष्टी करण्यास शिवाजीस सांगत असत. इंदुरास मठ स्थापून समर्थ जेव्हां परत आले त्यावेळीं शिवाजीची जी प्रथम भेट झाली, त्यांत स्वामींनीं शिवाजीस ज्या प्रांतांत त्याचें राज्य नव्हतें तेथील गांवच्या सनदा करून देण्यास सांगितलें. यावरून राज्यविस्तार करण्याचा व धर्मप्रसार करण्याचा त्यांचा पूर्ण हेतु होता हें व्यक्त होतें. शिवाजीचें राज्यधोरण चुकूं नये व क्षत्रियास उचित अशाच गोष्टी त्याचे हातून घडून राज्यास बळकटी यावी, याकरितां समर्थांनीं शिवाजीस ' राजधर्म ' व ' क्षात्रधर्म ' स्वतंत्र दोन समास करून समजावून दिले. या दोन समासांतील कांहीं वेंचे :—

आधीं मनुष्य ओळखावे । योग्य पाहूनि काम सांगावें ।
निकामी तरी ठेवावे । एकीकडे ॥
पाहोन समजोन कार्य करणें । तेणें कदापि नये उणें ।
कार्यकर्त्याच्या गुणें । कार्यभाग होतो ॥
अमर्याद फितवेखोर । यांचा करावा संहार ।
शोधिला पाहिजे विचार । यथातथ्य ॥
मनुष्य राजी राखणें । हींचि भाग्याचीं लक्षणें ।
कठीणपणें दूरी धरणें । कांहीं एक ॥

मोहरा पेटला अभिमाना । मग तो जिवास पाहेना ।
मोहरे मिळवूनि नाना । वरी चपेटे करी ॥
मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्र वाढवावा ।
येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥
देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥

रामदास जर अवतरले नसते, तर शिवाजीचे हातून राज्यस्थापनेचें काम झालें असतें कीं नाहीं हा एक मोठा गूढ प्रश्नच आहे. रामदासाचा उड्डाण करणारा मारुती सर्वत्र संचरीत असल्यामुळें धर्माची जागृति व प्रसार त्वरित होऊन सर्व देशभर एकच चळवळ सुरू झाल्यामुळें एकीकरण व संमेलन—जीं महाराष्ट्र धर्माचीं मुख्यांगें—सुलभ झालीं व यामुळें नायकत्व पतकरून राज्य स्थापण्यास शिवाजीस मदत झाली एवढी गोष्ट मात्र निर्विवाद आहे. समर्थांच्या उपदेशामुळेंच सर्व जातीच्या लोकांमध्यें एकप्रकारें स्वदेशाभिमानाचें नवीन वारें उत्पन्न झालें व आजपर्यंत अंगीं खिळलेलें सहिष्णुत्व टाकून जोतो आपल्यापरी जयिष्णु होऊन ह्या महत् उद्दिष्ट कार्यास मदत करण्यास प्रवृत्त झाला. असें जें महत् प्रयासाचें काम तें ज्या महाभाग दैविक पुरुषाचे उपदेशामुळें पार पडलें, त्यास शिवाजीनें आपला गुरु केलें व राज्यही त्यासच अर्पण करून आपण त्याचा प्रतिनिधि बनला हें शिवाजीस अत्यंत भूषणास्पद आहे. 'बागप्रकरण,' 'कारखानेप्रकरण' वगैरे किरकोळ प्रकरणें हीं समर्थांचा उपदेश शिवाजीस पावलोंपावलीं किती उपयोगीं पडत होता याजबद्दल साक्ष देतात. समर्थ हे जसे 'राजगुरु' तसेच 'महाराष्ट्रगुरु' ही होत. याणीं महाराष्ट्रांतील सर्व आबालवृद्धांस आपल्या उपदेशानें कोणतें वळण लाविलें व धर्मप्रसार कसा केला हें मागें सांगितलेंच आहे. सेवकवर्गास योग्य असा उपदेश यांणीं 'सेवकधर्माचे' दोन समासांत केला आहे. अमक्या एका बाबतींत समर्थांनीं आपल्या उपदेशाचा फायदा अन्यजनांस दिला नाहीं असें ह्मणतां यावयाचें नाहीं. समर्थ हे मूर्तिमंत महाराष्ट्रदेशाभि-

मानच होत, व ते आपल्या उपदेशानें ज्याच्या अंगांत संचार करीत, त्यास देशाभिमानाचा थोडाबहुत झपाटा लागल्याशिवाय रहात नसे. यांची प्रत्येक कृति देशाभिमानपूर्ण होती. परिस्थितीस अनुसरून यांणीं मराठी भाषेचा कैवार घेतला व तिची योग्यता किती आहे हें, आपण स्वतः त्या भाषेंत ग्रंथ करून, दाखविलें. मराठी भाषेबद्दलचा अभिमान यांचे ग्रंथांत सर्वत्र व्यक्त होत आहे. ते आग्रहपूर्वक असें सांगतात कीं :—

" एक ह्मणती मराठे काय ।
हें तो भल्यानें ऐकों नये " ॥

वामनपंडितासही यांणीं अशाच तऱ्हेचा उपदेश केल्याचें मागें सांगितलेंच आहे. समर्थांची अलौकिक अवलोकनशक्ति पाहून मन थक्क होतें. आसेतुहिमालयांत रामदासाचें नांव माहित नाहीं असा मनुष्य मिळणें दुर्लभ आहे. महाराष्ट्रांत तर त्यांचें वास्तव्य असल्यामुळें त्यांना होऊन जरी २००।२२९ वर्षें होत आलीं तरी महाराष्ट्रीय सर्व बायकामुलांना त्यांचें नांव अतिशय परिचित होऊन राहिलें आहे. अशाप्रकारचें ज्याचें अलोट, अलौकिक बुद्धिसामर्थ्य व करामत तो खरोखर दैविक पुरुष होता असें ह्मटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. लौकिक मनुष्याचे हातून अशा पुरुषांच्या कृतीचें विवेचन होणें दुरापास्त आहे. जें कांहीं थोडें होईल तें त्यांच्याच कृपेचें फल आहे. समर्थांनीं कृपा केल्यावर काय होणार नाहीं. कारण, आनंदमूर्ति ह्मणतात :—

समर्थ हें नाम साचचि मानू । समर्थ हें नाम दुसरा न मानू ।
समर्थ कृपें जडजीव तरती । समर्थ हें नाम सद्यःप्रचीती ॥

---

# रामदास

दासबोध स्वल्प वाटे नरा । तो जाणावा आत्महत्यारा ॥
जेथें अतिसूक्ष्मचि विचारा । फटके होती ॥२१॥ दशक ६ ॥

कुबडी.

१. नाशकापासून कोल्हापुरापर्यंतच्या महाराष्ट्राला श्रीमत् समर्थ रामदासस्वामी आनंदवनभूवन ह्या नांवानें ओळखत असत ( स्वामींची बखर, आवृत्ति २ री, पृष्ठ ४९९ ). ह्या आनंदवनभूमींतील प्रायः प्रत्येक शहरांत व खेड्यांत स्वामींचा कोणता ना कोणता तरी ग्रंथ कोणाच्या तरी संग्रहाला असतोच असतो. समर्थांच्या विचारसरणीनें महाराष्ट्रांतील लोकांच्या मनाचा भेद इतका खोल केलेला आहे कीं, त्यांनीं रचलेल्या मनाच्या श्लोकांपैकीं एखाद्या श्लोकाचा एखादा चरणहि ज्याच्या कानावरून गेला नाहीं, असा एकहि माणूस अठरा पगड जातींत मिळणें केवळ अशक्य आहे. समर्थांच्या मनाच्या श्लोकांच्या व्याप्तीची बरोबरी कांहीं थोड्याशा अंशानें देवीदासाच्या व्यंकटेशस्तोत्रानें केली तर सांगवत नाहीं. परंतु व्यंकटेशस्तोत्राची ओळख शूद्रादि कनिष्ठ वर्णांत फारशी नसल्यामुळें, रामदासी मनाच्या श्लोकांचें सर्वव्यापित्व अनन्यसाधारणच रहातें. ह्या श्लोकांच्या सर्वव्यापित्वाचें कारण असें आहे कीं, ते फार सुबोध आहेत, इतकेंच नव्हे, तर ते अत्यंत अशिक्षित अशा मनुष्याच्या मनालाही चटका लावणारे आहेत. हे श्लोक ह्मणण्यालाही फार सोपे जातात. शिवाय ह्यांच्या रचनेंत एक ऐतिहासिक गूढ आहे. तें हें कीं, ह्या श्लोकांची वृत्तरचना मुसुलमानी फकिरांच्या फारशी, उर्दू व मराठी सवालांच्या वृत्तरचनेसारखी हुबेहुब आहे. उदाहरणार्थ, करीमांतील पहिला चरण देतों:—

करिमा बिबक्षायि बर्हालि मा

ह्याच्याशीं तुलना करावयाला मनाच्या श्लोकांपैकीं पहिल्या व दुसऱ्या श्लोकांचे प्रथम चरण देतों:—

गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा ॥
मना सज्जना भक्ति पंथेंचि जावें ॥

रामदाशी मनाच्या श्लोकांचें वृत्त भुजंगप्रयात आहे. त्या वृत्तांत व फारशी करीमाच्या वृत्तांत भेद एवढाच कीं करीमाच्या चरणांत अंत्य यगणाचें गुरू अक्षर नाहीं. दासांच्या वेळीं मुसुलमानी पीर व त्यांचे तकिये महाराष्ट्राच्या लहानशा खेड्यांतूनहि अति झाले होते; आणि अज्ञ जो सामान्यजनसमूह तो ह्या पीरांच्या, तकियांच्या व फकिरांच्या मायावी कचाटींत इतका सांपडला होता कीं समर्थांना व शिवाजीमहाराजांना त्याला मुक्त करण्यास नाना प्रकारचे लहान थोर उपाय योजावे लागले. त्यापैकीं फकिरांच्या सवालाच्या अनुकरणानें सुचलेला हा वृत्तरचनेचा लहानसा परंतु मोठा गुणकारी उपाय होता. रामदाशी श्लोक व फकिरी सवाल एकसमयावच्छेदानें ऐकून गांवोंगांवच्या मार्मिक लोकांना पाच्छाई धर्माची परीक्षा करण्यास केवढी सवड झाली असेल तें सांगावयास नकोच!

२. स्वधर्म व स्वदेश ह्यांच्या प्रीतीनें समर्थांनीं जे हे लहान मोठे प्रयत्न केले, त्यांचीं फळें त्यांच्या हयातींत तर त्यांनीं तर पाहिलींच; परंतु त्यांच्या पश्चात्‌हि ह्या फळांच्या माधुरीची स्मृति महाराष्ट्रांत अखंड जागृत आहे. गेल्या सहाशें वर्षांत महाराष्ट्रांत जे अनेक उत्तम पुरुष झाले, त्यांतून श्रीमत् समर्थ रामदासस्वामी व छत्रपति शिवाजी महाराज ह्या दोन वीर पुरुषांच्या चारित्रांइतकीं चरित्रें दुसऱ्या कोणत्याच पुरुषांचीं झालेलीं नाहींत. अठराव्या शतकांत झालेल्या पद्यात्मक संतचरित्रांत समर्थांचीं त्रोटक चरित्रें आलेलीं सर्वांस मशहूर आहेत. परंतु त्यांशिवाय त्यांचीं आणिक पांच चरित्रें त्या व पुढील शतकांत त्यांच्या शिष्यपरंपरेंतील साधूंनीं लिहून ठेविलीं आहेत. पैकीं

दोन पद्यात्मक व तीन गद्यात्मक आहेत. (१) गंगाधर स्वामींनीं शके १६४० त सांगितलेलें चरित्र, (२) उद्धवसुत केशवशिष्य लक्ष्मणकृत ओंवीबद्ध चरित्र, (३) आत्मारामबोवाकृत ओंवीबद्ध चरित्र, (४) श्रीहनुमंतस्वामीकृत रामदासस्वामींची बखर, व (५) ठाणें येथें सूर्योदयांत छापलेलें चरित्र. पैकीं पहिलें चरित्र छापलेलें नाहीं. शेवटलीं चार चरित्रें, प्रस्तुत लेखकास जशीं असावीशीं वाटतात तशीं जरी नाहींत तरी, बरींच विस्तृत व मुद्देसूद आहेत. ह्या चार चरित्रांखेरीज, तुकारामबोवा, वामनपंडित, अनंतकवि, मोरोपंत वगैरे कवींनीं व व वर्तमानकालीन ल्हानमोठ्या लेखकांनीं व वक्त्यांनीं दासांचे शेंकडो पवाडे वेळोवेळीं गायिलेले सांगूं गेल्यास एक ग्रंथ होईल. शिवाजी महाराजांचीं चरित्रें हीं अशींच नाना प्रकारचीं आहेत. ह्यावरून महाराष्टांतील लोकांना साधुपुरुष व वीरपुरुष ह्यांच्या चरित्रांची गोडी फार पूर्वींपासून आहे हें तर सिद्ध होतेंच. परंतु ह्याबरोबर हेंहि सिद्ध होतें कीं, स्वेतिहासानभिज्ञतेचा आरोप जो पाश्चात्य ग्रंथकार हिंदुस्थानांतील यच्चयावत् लोकांवर सरसकट आणतात, तो निदान महाराष्ट्रापुरता, सर्वांशीं जरी नव्हे तरी, बऱ्याच अंशानें अवास्तव आहे. व दिवसेंदिवस लोकांच्या अभिरुचीवरून अशीं हीं थोडीं थोडीं चिन्हें दिसत आहेत कीं, हा आरोप समूळ नाहींसा व्हावयाला फार काळ लागणार नाहीं. इतकेंच कीं सर्वांनीं झटून ह्या कामीं हातभार लाविला पाहिजे. मग, स्वतःच्या पदराला खार लागला तरी बेहत्तर आहे.

३. समर्थांचीं चरित्रें ज्याप्रमाणें अनेक झालीं, त्याप्रमाणेंच त्यांच्या ग्रंथांच्या आवृत्त्याहि, मुद्रणकला ह्या प्रांतांत सुरू झाल्यापासून गेल्या ऐंशीं वर्षांत, अनेक निघाल्या. ज्यानें ह्मणून छापखाना घातला त्यानें समर्थांचा एक तरी ग्रंथ छापला, असें झाल्यावांचून प्रायः राहिलें नाहीं. एकटा दासबोध घेतला, तरी तो दहा पांच ठिकाणीं निरनिराळा छापलेला आढळेल. अशी समर्थांच्या ग्रंथांनीं असामान्य लोकप्रियता

आहे. ह्या लोकप्रियतेच्या आदरानें स्वामींचे समग्र ग्रंथ कित्येक प्रकाशकांनीं अलीकडील दहा बारा वर्षांत छापून काढिले आहेत. परंतु त्यांनीं काढिलेल्या ग्रंथांना समग्र हें विशेषण बिलकुल शोभत नाहीं. १८९०त माडगावकरांनीं स्वामींचे समग्र ग्रंथ छापिले. त्यांत पुण्याच्या ज्ञानप्रकाश छापखान्यांत १८७९ त छापिलेल्या पुस्तकांतील बरींच प्रकरणें आलीं नाहींत. पुढें १८९१ त तेंडुलकरांनींहि दासांचे समग्र ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांत ज्ञानप्रकाशांतल्या पुस्तकांतील बरींच प्रकरणें नसून, शिवाय दासबोधहि नाहीं; आणि इतकीं व्यंगें असून त्यांच्या पुस्तकाच्या नांवांत समग्र हीं अक्षरें आहेतच. अलीकडील दोन महिन्यांत गोंधळेकरांनीं स्वामींचे समग्र ग्रंथ निर्णयसागर छापखान्यांतून छापून काढिले आहेत. त्यांतहि स्वामींचीं पुष्कळ प्रकरणें छापिलेलीं नाहींत. माडगांवकरांनीं टाकून दिलेली कुबडी गोंधळेकरांनीं बगलेंत मारिली आहे. परंतु तेवढ्यानें त्यांची लंगडशाई छपली असें मात्र झालें नाहीं. तेंडुलकरांच्या ग्रंथांतील व ज्ञानप्रकाशांतल्या ग्रंथांतील बरींच प्रकरणें त्यांनीं सोडून दिलेलीं आहेत. हीं प्रकरणें स्वामींचीं नव्हत ह्मणून त्यांनीं तीं सोडून दिलीं, असा प्रकार नाहीं. प्रकार शुद्ध अज्ञानाचा आहे. आपण जें काम करण्यास उद्युक्त झालों त्यासंबंधानें आपल्या अगोदर इतरत्र काय झालेलें आहे, ह्याचा शोध ह्या प्रकाशकांनीं केला नाहीं, हा ह्यांचा मुख्य दोष आहे. ठाणें किंवा मुंबई येथील ग्रंथसंग्रहालयांत जाऊन त्यांनीं तपास केला असता किंवा स्वतःच्या दुकानांतील पुस्तकांच्या राशी उलगडून पाहिल्या असत्या, तर, स्वामींचे एकंदर ग्रंथ आहेत किती, त्यापैकीं आजपर्यंत छापले किती, व आपण छापूं घातलेल्या पुस्तकाला **समग्रपणा** येण्यास मिळवावयाचे किती, ह्याची कल्पना त्यांस सुरेख आली असती. दिवशीबुधशी घरीं ठेवून लोकांच्या घरीं गोंधळ घालावयाला जाणाऱ्या शहाण्या गोंधळ्याप्रमाणेंच आमच्या इकडील प्रकाशकांची स्थिति आहे. त्यांना वर्तमान काळाचा महिमा जसा कळावा तसा कळत नाहीं.

त्यांनीं हें पक्केपणीं समजून राहिलें पाहिजे कीं वाटेल तें पुस्तक वाटेल तसें वेडेंवागडें छापून बाजारांत मांडण्याचा आतां काळ राहिला नाहीं. जें कांहीं काम करावयाचें तें चोख केलें तरच पत रहाणार आहे.

४. गेल्या सहाशें वर्षांत जे अर्वाचीन मराठी कवि व साधू झाले, त्यांच्या ग्रंथांचा अभ्यास लोक पूर्वी भाविक पद्धतीनें करीत असत. ह्या भाविक लोकांत जे विशेष चिकित्सक असत, ते आपल्या आवडत्या साधूंचीं काव्यें प्रयत्नानें मिळवून व स्वतः लिहून काढून संग्रह करून ठेवीत. त्यामुळें, कोणत्याही साधूची समग्र कृती पाहण्याची जिज्ञासा झाली, तर त्या साधूच्या एखाद्या चिकित्सक भक्ताकडे ती आद्यंत पाहण्यास मिळण्याचा संभव असे. ही स्थिति मुद्रणकाळाच्या पूर्वीची झाली. अलीकडील ऐशीं वर्षांत ह्या साधूंचीं कांहीं त्रोटक काव्यें शिळे-वर व ठशांवर छापलेलीं मिळूं लागलीं. त्यामुळें, लेखी पोथ्यांकडे लोकांचें दुर्लक्ष होत चाललें. लेखी पोथ्यांपेक्षां छापील पुस्तकें दिसण्याला सुबक, वापरण्याला आटोपशीर व किंमतीनें स्वस्त असतात, हें तर जग-जाहीर आहे. छापील पुस्तकांच्या ह्या तीन गुणांचा परिणाम असा झाला कीं, लेखी पोथ्या मागें पडून, घरोघर छापील पुस्तकांचें व पोथ्यांचें राज्य सुरू झालें. अर्थात् चिकित्सक रसिकांनीं लिहून ठेवलेल्या संग्रहाकडे कोणी पहात नाहींसें झालें; व त्यांना जुन्या बाडांचें स्वरूप आलें. पाश्चात्यांच्या संसर्गानें गेल्या ऐशीं वर्षांत असा एक काळ येऊन गेला कीं, त्यावेळीं ज्यांना रसिक ह्मणून ह्मणतां येईल, त्यांच्या रुचीचा प्रवाह देशी सारस्वताच्या उलट वाहूं लागला. आधीं स्वदेश भिकार, मग स्वदेशांतील लोक भिकार आणि शेवटीं स्वदेशांतील लोकांनीं केलेलीं काव्यें तर अगदींच भिकार, अशी ह्या रसिकवरांची भावना झाली. जेथें रसिकवरांनींच देशांतील ग्रंथसंपत्तीला रद्दींत काढिलें तेथें, सामान्य लोकांच्या नित्याच्या पाठांतील कांहीं लहानसहान प्रासादिक ग्रंथांखेरीज, बाकीच्या प्रासादिक ग्रंथांचा समूळ नायनाट होण्याचा प्रसंग आल्यास नवल कसचें? परंतु आपलें भाग्य थोर कीं, अशाही संकटांतून कांहीं कांहीं प्रासादिक ग्रंथ कोण्या कोण्या भाग्यवंताच्या घरीं अजूनही चुकून-

गाकून शाबूत राहिले आहेत. प्रत्येक कवीचे व साधूचे सर्व ग्रंथ सांपडण्याची तर आतां आशा नकोच. आतां आशा इतकीच करावयाची कीं, जे ग्रंथ अद्यापि कोठें कोठें सापडण्यासारखे असतील ते शोधून काढून नीट व शुद्ध छापून काढिले पाहिजेत. त्यांत गचाळपणा करून उपयोगाचें नाहीं. ह्या गचाळपणानें फार नुकसान होतें. (१) अगदीं नवीन आवृत्तींत जितके ग्रंथ छापिले असतील, तितकेच काय ते मूळ कवीचे, अशी वाचकांची खोटी समजूत होते. (२) पूर्वींच्या आवृत्तींत छापिलेले ग्रंथ—जे ह्या नवीन आवृत्तींत आले नसतील ते—कवीचे नसावे अशी शंका येते. (३) ह्या दुहेरी गैरसमजुतीनें काळजीनें अभ्यास करणाऱ्या वाचकांना बुचकळ्यांत पडल्यासारखें होऊन ठाम असा कोणताच सिद्धांत करतां येत नाहीं. कवींचे व साधूंचे ग्रंथ राष्ट्रीय सारस्वत होत. ह्यांच्या सूक्ष्म परिशीलनानें व परीक्षणानें तत्कालीन राष्ट्रीय विचाराची दिशा काय होती हें ठरवावयाचें असतें. हे मूळ ग्रंथच जर गचाळपणानें संपादिले व छापले गेले, तर त्यांवरून राष्ट्रीय विचारांच्या दिशेचें अनुमान निघावें तसें निघणार नाहीं हें उघड आहे. तेव्हां ही चूक प्रकाशकांनीं सुधारली पाहिजे. ही सुधारणा करण्यास एकच उपाय आहे. तो हा कीं, ज्यांनीं महाराष्ट्रकवितेचा अभ्यास केला आहे, अशा विद्वान् गृहस्थांचें साहाय्य प्रकाशकांनीं घेतलें पाहिजे. अशांचें साहाय्य गेल्या तीस चाळीस वर्षांत कित्येक छापकांनीं व प्रकाशकांनीं घेतलें होतें. परशुरामपंत गोडबोले, शंकर पांडुरंग पंडित, जनार्दन बाळाजी मोडक, वामन दाजी ओक, अण्णा मोरेश्वर कुंटे, ह्या पांच गृहस्थांचें साहाय्य घेऊन ज्यांनीं मराठी कवींचे ग्रंथ छापिले त्यांचे ग्रंथ बरेच शुद्ध छापून निघाले आहेत. ह्या चार गृहस्थांच्या पाठीमागेंही कांहीं विद्यमान गृहस्थ मराठी कवितेचे ज्ञाते आहेत. रा. रा. नारायण चिंतामण केळकर, रा. रा. विनायक लक्ष्मण भावे, रा. रा. लक्ष्मण गणेश पांगारकर, नागपुरचे प्रो. परांजपे, अशासारख्या विद्वानांच्या साहाय्यानें जर कोणी महाराष्ट्रकवींचे ग्रंथ शोधवून घेईल, तर तो सहृदय वाचकांच्या शाबासकीला लायक होईल ह्यांत संशय

नाहीं. ह्या गृहस्थांना आपल्या अंगावर सोंपविलेल्या कामाचा जसा व्यापक अंदाज होईल तसा इतरांना होण्याचा संभव कमी. अमुक कवीनें एकंदर काव्यें केलीं किती, त्यांपैकीं आजपर्यंत छापिलीं गेलीं किती, न छापलेल्यांपैकीं उपलब्ध किती, अनुपलब्धांपैकीं कोणत्या प्रदेशांत मिळण्याचा संभव किती, वगैरे बऱ्याच गोष्टी ह्या लोकांना माहीत आहेत. ह्या माहितीचा फायदा ते कोणाहि योग्य प्रकाशकाला मोठ्या आनंदानें करून देतील हे सांगावयाला नकोच.

९. अशा एखाद्या तज्ज्ञाच्या साहाय्यानें कोण्याही प्रकाशकानें रामदासस्वामींचे समग्र ग्रंथ अद्यापपर्यंत छापिले नाहींत. जनार्दन बाळाजी मोडक यांनीं काव्येतिहाससंग्रहांत स्वामींचीं कांहीं थोडीं प्रकरणें बरींच शुद्ध अशीं छापिलीं आहेत. त्यांच्यापुढें स्वामींचे समग्र ग्रंथ गेल्या पंधरा वर्षांत शोधकबुद्धीनें छापण्याचा कोणीच प्रयत्न केलेला दिसत नाहीं. तेंडुलकर, माडगांवकर, गोंधळेकर, वगैरे छापकांनीं समग्र ह्या अवास्तव विशेषणानें विशिष्ट असे कांहीं ग्रंथ बाहेर काढिलेले आहेत. परंतु ते अपूर्ण आहेत हें, कोठेंही न छापलेलीं नवीन प्रकरणें विचारांत न घेतलीं तरी, एकमेकांशीं तोलून पाहतां सहज समजण्यासारखें आहे. तेव्हां पुढेंमागें कोण्या प्रकाशकाला स्वामींचे समग्र ग्रंथ प्रसिद्ध करण्याची सदिच्छा झाली, तर त्याच्याकरितां ह्या ग्रंथांची मला माहीत असलेली यादी पुढें देतों. नारायणबोवा कावनईकर ह्या नांवाचे एक तरुण व चिकित्सक रामदासी कोल्हापुरांत होते. ते गेल्या वर्षीं वारले. त्यांनीं दासांच्या बऱ्याच ग्रंथांचा संग्रह केलेला आहे. पैकीं एक दासबोधाची पोथी गुरुपरंपरेनें त्यांजपाशीं आली. ही पोथी समर्थांच्या हयातींतील आहे असें कळतें. अर्थात् ही पोथी दोनशें वर्षांची आहे. इतरही दुसरे ग्रंथ त्यांजपाशीं होते. ते त्यांचे शिष्य रा० शेवडे यांनीं माझ्या स्वाधीन केले. त्यावरून व इतर माहितीवरून खालील यादी तयार केली आहे. ह्या यादींत

गोंधळेकरांच्या ग्रंथांत जीं प्रकरणें दिलीं नाहींत तीं देतों. गोंधळेकरांचा ग्रंथ ह्मणजे माडगांवकरांचा ग्रंथ + कुबडी आहे.

१ एकवीससमासी.
२ चतुः समासी.
३ सप्तसमासी.
४ दासप्रबोध.
५ अक्षरमालिका.
६ कृतनिर्वाह.
७ चतुर्थयोग.
८ पंचमान.
९ मानपंचक.
१० मुखवस्त्र.
११ एकविसावा दशक.
१२ श्लोकबद्ध रामगीता.
१३ चतुर्थमान.
१४ मारुतीची आर्ती.
१५ संकल्प.
१६ भूपाळी.
१७ अनामक प्रकरण.
१८ अष्टाक्षरी पंचीकरण.
१९ गद्यपद्य पंचीकरण.

शिवाय समर्थांच्यावेळीं रचिलेलीं खालील स्फुट पद्यें आहेतः—

१ मनोहरस्वामिकृत आर्ती.
२ कल्याणस्वामिकृत आर्ती.
३ मनोहरस्वामीकृत कटाव.
४ मनोबोधाची आर्ती.

इतकीं प्रकरणें माझ्या संग्रहास असलेलीं गोंधळेकरांच्या ग्रंथांत छापिलीं नाहींत. ह्यापैकीं कांहीं प्रकरणें इतरत्र छापलेलीं आहेत.

ह्याशिवाय दुसरींहि स्वामींचीं अनेक प्रकरणें आहेत. रामायणाचीं तीनच कांडें प्रसिद्ध आहेत. बाकीचीं अद्याप उपलब्ध नाहींत. तसेंच उद्धवसुत केशवशिष्य लक्ष्मणकृत ओवीबद्ध चरित्रांत जागोजागीं समर्थांचीं पदें व अभंग दिलेले आहेत. त्यांपैकीं बराच भाग गोंधळे-करांच्या ग्रंथांत नाहीं. येणेंप्रमाणें अद्यापि बरींच प्रकरणें सांपडावयाचीं आहेत. तेव्हां जेवढीं सध्यां सांपडलीं आहेत व जेवढीं निरनिराळ्या आवृत्त्यांतून प्रसिद्धी पावलीं आहेत, तेवढ्यांसंबंधानें मला काय ह्मणाव-याचें आहे तें सांगतों.

६. समर्थांचा सर्वांत मोठा व मान्य ग्रंथ ह्मटला ह्मणजे दासबोध हा होय. ह्याचे वीस दशक व दोनशे समास आहेत ( दशक २०, समास १० ). हा ग्रंथ दहा पंधरा वर्षें बनत बनत शके १५८१ त ह्मणजे इ. स. १६६० त संपूर्ण झाला ( दासबोध, दशक ६, समास ४ ). शके १५७८ त ह्मणजे इ. स. १६५६ त वामनपंडित समर्थांच्या भेटीस आले त्यावेळीं दासबोध चालला होता. दासांवरती वामनानें स्तोत्र केलें त्यांत, ' ग्रंथाश्चापि जगत्प्रबोधपटवः संसारमाशंसिनः, ' असें ह्मटलें आहे ( चरित्र, पृष्ठ ३०४ ). इंदुराहून उद्धव गोसावी यांनें समर्थांस १६५९ त पत्र पाठविलें त्यांत

मला वाटतें, अंतरीं त्वा वसावें, ।
तुझ्या दासबोधासि त्वा बोधवावें ; ॥

हें श्लोकार्ध आहे ( चरित्र, पृष्ठ ३०९ ). इ० स० १६५९ च्या डिसेंबरांत अफजलखानाचा वध करून शिवाजी रामदासांस भेटण्यास आले त्या दिवशीं अठराव्या दशकाचा उत्तमपुरुषनिरूपण नांवाचा सहावा समास समर्थांनीं संपूर्ण केला ( चरित्र, पृष्ठ १७३ ). बखरींत विकारी संवत्सराला शकाचा १५७१ आंकडा चुकून पडला आहे. तेथें खरा आकडा १५८१ पाहिजे. इ० स० १६४९ त समर्थांनीं शिवाजीस दासबोधांतील तेराव्या दशकांतला लघुबोध नांवाचा सहावा समास सांगितला

( चरित्र, पृष्ठ १२६ ). समर्थ शके १५६६ त, तारण संवत्सरीं कृष्णातीरास आले ( चरित्र, पृष्ठ ७० ). चरित्रांत तारण संवत्सराला १५५६ शक जोडला आहे तो चूक आहे. तारण संवत्सरीं शिवाजीचें वयमान सतरा वर्षांचें होतें ह्मणून पुढें दुसऱ्या ओळींतच ह्मटलें आहे ( चरित्र, पृष्ठ ७०, पंक्ति ३ ), त्यावरून १५६६ हाच शक खरा ठरतो. शिवाय शके १५५४ अंगिरा नाम संवत्सरीं समर्थ पंचवटीहून पृथ्वीपर्यटणास निघाले, ते बरोबर बारा वर्षांनीं परत आले, असें बखरींत ह्मटलें असल्यामुळें, समर्थांचा कृष्णातीरीं येण्याचा १५६६ हाच शक होय हें निश्चित आहे. शके १५६६ त समर्थांचें वयमान ३६ होतें. ह्या सुमारास दासबोधाला प्रारंभ होऊन त्याची समाप्ति शके १५८१त झाली. इ० स० १६५९च्या डिसेंबरांत ज्या अर्थीं अठरावा समास चालला होता त्या अर्थीं शके १५८१ च्या फाल्गुनांत ह्मणजे इ० स० १६६० च्या मार्चएप्रिलांत विसावा दशक संपून सबंध ग्रंथाची उजळणी व तपासणी त्याच महिन्यांत झाली असावी. ही तपासणी करतांना सहाव्या दशकांतल्या चवथ्या समासांत गतकलीची गणना ४७६० समर्थांनीं केली. येणेप्रमाणें ह्या ग्रंथाची रचना बरोबर पंधरा वर्षें चालली होती. ग्रंथसमाप्तिसमयीं समर्थांची पन्नाशी उलटून गेली होती, व शिवाजीमहाराज ऐन बत्तिशींत आले होते. तिशीपस्तिशीच्या भरज्वानींत असतांना समर्थांनीं ह्या ग्रंथास प्रारंभ केला आणि पन्नाशीच्या पोक्त अशा अनुभवपूर्ण अमदानींत त्याची समाप्ति केली. शके १५५४ ह्मणजे इ० स० १६३२ ह्या सालीं नाशकांतील पंचवटींत असतांना, यवनांनीं आक्रमिलेल्या महाराष्ट्राचा उद्धार व सनातनधर्माची स्थापना करण्याचा संकल्प समर्थांनीं केला होता. त्या संकल्पाचा मूर्तिमंत अवतार हा दासबोध ग्रंथ होय. निर्माण होत असतांना, अनेक लहानथोर स्त्रियांनीं व पुरुषांनीं हा परम आस्थेनें ऐकिला; व संपूर्ण झाल्यावर ह्याच्या प्रती सर्व महाराष्ट्रभर पसरल्या. मुद्रणकला ह्या देशांत सुरू झाल्यापासून तर ह्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. हा जुन्या चालीच्या लोकांना अत्यंत प्रिय आहे हें प्रसिद्धच आहे. परंतु नव्या चालीच्या सुधारकांना व उद्धारकांनाहि ह्या ग्रंथानें मोहून टाकिलें आहे.

७. असा हा दासबोध ग्रंथ आहे तरी काय? हा काव्य आहे कीं इतिहास आहे कीं वेदान्त आहे? ह्याचें प्रमेय काय? ह्याचें प्रयोजन काय? ह्याचें फल काय? हा वाचिल्यापासून वाचकांच्या मनांत भावना कोणती होते? वगैरे अनेक प्रश्न ह्या ग्रंथासंबंधानें मनांत येण्यासारखे आहेत. त्यांचीं उत्तरें देण्याचा अल्प प्रयत्न पुढें करतों.

८. एकंदर विचार केला असतां, दासबोध हा ग्रंथ काव्य नाहीं. ह्या ग्रंथाचें रूप पद्य आहे, परंतु ह्यांत जे विषय निरूपिले आहेत ते काव्याचे विषय नाहींत. गीता, अमरकोश, वैय्यासिकन्यायमाला, ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, यथार्थदीपिका, अष्टांगहृदय, लीलावती हे ग्रंथ पद्य असूनहि ज्याप्रमाणें काव्य नाहींत, त्याप्रमाणेंच दासबोध हा ग्रंथ काव्य नाहीं. स्वतः खुद्द रामदास आपल्याला कवि ह्मणवितात. परंतु दासांच्या कवि ह्या शब्दाचा अर्थ फार व्यापक आहे. कवि गद्य व पद्य ग्रंथ लिहिणारे असून नाना शास्त्रांचे ऊहापोहहि करणारे असतात; इतकेंच नव्हे, तर ते प्रासादिक असावे लागतात, असें दासांनीं पहिल्या दशकाच्या सातव्या समासांत ह्मटलें आहे. धीट व पाठ ह्या सदराखालीं जी कविता येते तें खरें कवित्व नव्हे, तर निव्वळ करमणूक होय, असें दासांचें ह्मणणें आहे.

नेमकेंच बोलणें, । तात्काळची प्रतिवचन देणें, ।
शीघ्रचि कवित्व करणें. । हें ज्ञान नव्हे. ॥ (९-९-२६)

नाना गती, नाना व्युत्पत्ती, । नाना मती, नाना स्फूर्ती, ।
नाना धारणा, नाना धृती, । या नांव कवित्व. ॥

शंका, आशंका, प्रत्यंतरें, । नाना वाक्यें शास्त्राधारें, ।
तुटे संशय निर्धारें । निर्धारितां. ॥

नाना प्रसंग, नाना विचार, । नाना तत्वचर्चासार, ।
नाना योग, नाना विवर, । या नांव कवित्व. ॥

नाना साधनें, पुरश्चरणें, । नाना तपें, तीर्थाटणें, ।
नाना संदेह फेडणें, । या नांव कवित्व. ॥
जेणें अनुताप उपजे, । जेणें लौकिक लाजे, ।
जेणें ज्ञान उपजे, । या नांव कवित्व. ॥
जेणें सद्वस्तु भासे, । जेणें भास हा निरसे, ।
जेणें भिन्नत्व नासे, या नांव कवित्व. ॥ (१४–३–४४–९१)

दासांची कवित्वाची व्याख्या ही अशी आहे. विषय, संदेह, संगति, पूर्वपक्ष व सिद्धांत, हे जे शास्त्राचे पांच अवयव ते दासांच्या कवित्वांत असावे लागतात. तत्वचर्चा, योग, विवरण, ज्या ग्रंथांत असतील तो कवित्वाचा ग्रंथ होय. कवित्व ग्रंथ रूपानेंच असलें पाहिजे असें नाहीं. कवित्व आचरणरूपहि असूं शकतें. साधनें, पुरश्चरणें, तपें, तीर्थाटणें, धैर्य, शौर्य, धृति, ह्या वस्तूदेखील कवित्वांतच मोडतात. सारांश ज्या ज्या वस्तूंत, विचारांत, व आचारांत ईश्वरी अंश आहे, तें सर्व, दासांच्या मतें, कवित्व होय. आधुनिक भाषेमध्यें ह्या ह्मणण्याचा अर्थ असा होतो कीं, जें जें ह्मणून कांहीं प्रतिभासंपन्न असतें तें तें सर्व कवित्वाखालीं मोडतें. दासांची कवित्वाची कल्पना ह्मणजे निव्वळ सध्यांच्या काळच्या प्रतिभेची कल्पना होय. सर्व जग ह्या प्रतिभावान् पुरुषांच्या व स्त्रियांच्या पुढारपणाखालीं चालतें हें तर आपण प्रत्यक्ष पाहतों. हाच विचार लक्षांत घेऊन, दासांनीं कवींना ह्मणजे प्रतिभावान् व्यक्तींना, पुरुषार्थाचें वैभव, स्वधर्माचा आश्रय, अध्यात्मरत्नांच्या खाणी, योग्यांचा गुप्त पंथ, मोक्षाचे पडिभर, भाग्याचे भूषण, सुखाचे संरक्षक, स्वदेशाचे उद्धारक, वगैरे नाना तऱ्हेच्या प्रशंसेनें आळविलें आहे. ह्या दृष्टीनें पाहिलें ह्मणजे समर्थांचा दासबोध हा प्रतिभासंपन्न ग्रंथ आहे हें स्पष्ट होतें. आतां यद्यपि हा ग्रंथ प्रतिभासंपन्न आहे तत्रापि तो, आपण ज्याला काव्य ह्मणून आधुनिक परिभाषेत ह्मणतों, तें नाहीं. आधुनिक भाषेत काव्य ह्या संज्ञेनें ज्या ग्रंथांना आपण ओळखतों ते सर्वस्वीं रसात्मक असावे लागतात.

संसारांतील कोणता तरी एक विषय किंवा प्रसंग घेऊन तो नव रसांनीं रुचिर करून दाखविण्याचें काम कवीचें होय. कवीच्या ग्रंथांत संदेह, संगति, पूर्वपक्ष, सिद्धांत वगैरे शास्त्रीय परंपरा आणणें ह्मणजे काव्याच्या आत्म्याचा शतधा भंग करण्यासारखें आहे. दासबोधांत, तर, ही परंपरा अथपासून इतिपर्यंत आहे. अर्थात् दासबोध हा ग्रंथ, आधुनिक परिभाषेंतील, काव्य नाहीं. दासांचे रामायण वगैरे ग्रंथ काव्य आहेत. ते रसात्मक आहेत. त्यांचा विषय कांहीं तरी एकच प्रसंग आहे. तसा दासबोधाचा नाहीं. दासबोधांत वेदान्ताचें गूढ निरूपण आहे, पढतमूर्खांचें वर्णन आहे, कीर्तन कसें करावें तें सांगितलें आहे, राजनीति आहे, व्यवहारनीति आहे, चातुर्यनिरूपण आहे, कवि, तापसी, योद्धे, गुरु, शिष्य, वगैरेंचीं विस्तृत वर्णनें आहेत, असे नाना प्रकार आहेत. ह्या सर्व प्रकारांना परमार्थतः काव्यांत गोवणें ह्मणजे अपरंपार अरसिकतेचें प्रदर्शन करणें होय.

९. समर्थांच्या दासबोधाची गणना काव्यग्रंथांत लोक करतात त्याला एक कारण आहे. तें हें कीं वर्णनाच्या व विवेचनाच्या भरांत दृष्टान्तांची ह्या ग्रंथांत रेलचेल उडविलेली आहे. परंतु दासबोधांत ह्या दृष्टान्तांची योजना काव्यग्रंथांतल्याप्रमाणें केवळ चमत्कृति उत्पादिण्याकरितां केलेली नाहीं. दृष्टान्त देण्यांत त्या त्या विषयाचा परिपोष करणें हाच एक मतलब आहे. शिवाय काव्यांत ह्या ग्रंथाची गणना होण्यास दुसरेंही एक कारण झालेलें आहे. तें हें कीं, हा ग्रंथ वक्तृत्वप्रचुर आहे. गचाळ किंवा मिळमिळीत असें एकहि वाक्य ह्या ग्रंथांत नाहीं. बोलण्याचा ओघ इतका अप्रतिबद्ध आहे, शब्दांची योजना इतकी समर्पक आहे, आणि विवेचनाची सरणी इतकी चित्तवेधक आहे, कीं सिद्धान्तविषय गहन असूनहि तो काव्याप्रमाणें आल्हादकारक वाटतो. आणि इतकें असून, भाषा अत्यंत साधी, सोपी व सरळ आहे. ह्या दिसावयाला सहज, परंतु बहुत मेहनतीनें कमाविलेल्या, वक्तृत्वाला भुलून,

वाचकवर्गाला आपण एखादें काव्यच वाचतों आहों कीं काय असा भास होतो. अत्यंत गहन असे शास्त्रीय ग्रंथ अशा वक्तृत्वपूर्ण व कवित्व-सदृश भाषेंत लिहिलेले निरनिराळ्या भाषांत कांहीं कांहीं आहेत. हंबोल्ट्चा विश्वावरील Cosmos नांवाचा ग्रंथ, किंवा क्रिस्टोफर नॉर्थ्चे भूगर्भावरील ग्रंथ, किंवा व्होल्टेअर्चा ' चौदाव्या लुईचें मन्वंतर ' नांवाचा इतिहासावरील ग्रंथ, दासकृत बोधाच्याच कमजास्त मासल्याचे आहेत. आतां एवढें खरें आहे कीं, ह्या तिन्हीं यूरोपियन ग्रंथकारांना दासांच्या लेखनपद्धतींतील मोहकपणाची बरोबरी जशी करतां यावी तशी आली नाहीं. हे तिघेही उच्च प्रतीच्या प्रतिभेचे मालक होते. तिघांनींही त्या त्या शास्त्रीय विचारांचें प्रदर्शन मोहक व काव्यप्रचुर अशा पदपद्धतीनें केलें आहे. ह्मणून, तेवढ्यावरून त्या त्या ग्रंथांचे कर्ते ह्या नात्यानें त्यांस कोणी कवि ही संज्ञा लावीत नाहींत. ज्या शब्दरचनेनें व पदपद्धतीनें कवींची प्रतिभा उदय पावते त्या रचनेचें व पद्धतीचें रूप ह्या ग्रंथकारांच्या लेखनपद्धतीनें स्वीकारिलेलें आहे. पण, आंतील विषय शुद्ध शास्त्रीय असेच आहेत. हाच न्याय रामदासांनाहि लागू केला पाहिजे. रामायण ह्या काव्याचा कर्ता ह्या नात्यानें रामदासांची गणना कवींत करणें भाग पडतें. परंतु दासबोध ह्या ग्रंथाच्या कर्तृत्वाच्या दृष्टीनें पहातां कवि ही संज्ञा समर्थांस लावणें उचित होणार नाहीं. कवि ह्मणजे प्रतिभावान् स्त्री किंवा पुरुष,—मग तो कवी असो, गणिती असो, वेदान्ती असो, योद्धा असो, चित्रकार असो, साधु, असो दाता असो किंवा शिल्पी असो —, ह्या समर्थांच्या लक्षणानें पाहिलें ह्मणजे समर्थांना कवि ही संज्ञा खुशाल बिनहरकत लावावी. दासबोधाचा कर्ता ह्या नात्यानें, मात्र, समर्थ काव्यें करणारे कवि आहेत असें ह्मणणें सर्वथा अनुपपन्न होईल. समर्थ प्रासादिक उपदेशग्रंथाचे कर्ते आहेत. ग्रंथ ह्मणजे काय ह्याचें निरूपण दास सातव्या दशकाच्या नवव्या समासांत करतात. तेथें ग्रंथत्वाचीं जीं लक्षणें दिलीं आहेत तींच कवित्वाचींहि लक्षणें आहेत.

१०. समर्थांनीं निरूपिलेल्या कवित्वाची व्यापकता यथास्थित ध्यानांत न आल्यामुळें, रा० रा० पांगारकरांसारख्या कित्येक आधुनिक वक्त्यांनीं व महाराष्ट्रकवितेचा आस्थापूर्वक अभ्यास करणाऱ्यांनीं मुकुंदराजाचें परमामृत, ज्ञानदेवाची ज्ञानेश्वरी, रामदासाचा दासबोध, वगैरे शास्त्रीय ग्रंथ कवितेच्या सदरांत काढिले आहेत. दासांनीं धीट, पाठ व प्रासादिक असे कवींचे तीन वर्ग केलेले आहेत हें पांगारकरांप्रमाणें मलाहि मान्य आहे. मेलेल्या मांजरावर कविता करणारा कौपर, किंवा तेरड्याच्या फुलांवर कविता करणारा वर्ड्स्वर्थ, किंवा बाभळीच्या झाडावर अन्योक्ति रचणारा कृष्णशास्त्री, हे धीट कवी होत. ह्या कवींच्या कवितेपासून मनाला चमत्कृति होते. गङ्ग्वाल्यासारखे शीघ्रकवि, किंवा प्राससयमकांच्या योजनेंत गुंतणारे वामनमयूरमारव्यादि कवी, किंवा पोप, जान्सन वगैरे अनुकरणप्रिय व भाषांतऱ्ये कवी, हे पाठ कवी होत. ह्या कवींची कांहीं कविता बळेंच हटानें रचिलेली असून, तींत तादृश चमत्कृति करण्याची शक्ति नसते. दोरीवरून चालणारा हंडीबाग जें कौतुक हृदयांत उत्पन्न करतो तेंच ह्या कवींच्या शब्दालंकारांपासून उत्पन्न होतें. ह्या दोन वर्गांहून भिन्न असा जो तिसरा वर्ग तो प्रासादिक ह्या नांवानें दासांनीं वर्णिला आहे. व्यवहार शिकविणारा, अनिष्टापासून रक्षण करणारा व ममतेनें उपदेश करणारा, असा हा तिसरा वर्ग आहे. ह्यांत व्यास, वाल्मीकि, मुक्तेश्वर, होमर, कालिदास, शेक्सपीयर, लोपड, व्हीगा वगैरे कवींची गणना होते. दासांच्या प्रासादिक प्रतिभावान् लोकांतच हा कविवर्ग मोडतो. ह्यांना लौकिकभाषेंत महाकवि ही संज्ञा आहे. ह्या महाकाव्यें निर्मिणाऱ्या कविवर्गाबरोबर तपस्वी, योद्धे, शास्त्रज्ञ वगैरे महाप्रतिभावान् लोकांची गणना समर्थ करतात व त्यांना कवी असें नांव देतात. राष्ट्रोद्धारक इतर पुरुषांच्या बरोबरीनें महाकवींची गणना समर्थ करतात तें यथायोग्य आहे. ह्या कवींचें सामर्थ्य तसेंच अलौकिक असतें. परंतु ह्या महाकवींच्या कोटींत विद्यावीर, रणवीर, सभावीर, शास्त्रवीर, वगैरे वीरांची, कवी ही जी संज्ञा देऊन, समर्थ गणना करितात ती रा० रा० पांगारकरादि गृहस्थांना बुचकळ्यांत

पाडते. एकाच शब्दांत अनेक अर्थांना समावेश समर्थ करीत आहेत. तो वीर ह्या दृष्टीनें, उद्धारक ह्या दृष्टीनें, श्रेष्ठ पुढारी ह्या दृष्टीनें ते करीत आहेत; काव्यें करणारे कवी ह्या दृष्टीनें करीत नाहींत. समर्थ कोणत्या अर्थानें बोलत आहेत हें लक्ष्यांत न घेतल्यामुळें, ज्ञानेश्वरी, दासबोध वगैरे ग्रंथ काव्यें आहेत अशी समजूत झाल्यामुळें, व हे ग्रंथ भक्तिमार्गाचे आहेत हें स्पष्ट दिसत असल्यामुळें, प्रासादिक कवी ह्मणजे यूरोपियन कवीहून अत्यंत भिन्न असे भक्तिमार्गी कवी होत, असा एक सिद्धान्त पांगारकरांनीं महाराष्ट्रकाव्योदधींत मज्जन करून घाईघाईनें शोधून काढिला आहे. ह्या सिद्धान्तांत ते असेंहि ह्मणतात कीं, यूरोपियन कवींत भक्तिमार्गी कवी नाहींत; व महाराष्ट्रकवींत सर्व कवी भक्तिमार्गी आहेत; तेव्हां भक्तिमार्गी जेवढे कवि तेवढेच प्रासादिक कवी होत; अर्थात् इतर देशांतील कवी धीट किंवा पाठ ह्या दोन वर्गांतील कोणत्या तरी वर्गांत मोडतात. वर जें विवेचन केलें आहे, त्यावरून हा चतुर्विध कोटिक्रम भ्रममूलक आहे हें अंशतः दिसतेंच आहे. तरी ह्या भ्रमाचें पूर्ण उन्मूलन करण्याकरितां यूरोपांतील कवींकडे थोडासा वळतों.

११. समर्थांनीं दासबोधाच्या चवदाव्या दशकाच्या तिसऱ्या समासांत कवित्वाचें लक्षण केलें आहे. त्यांत जी कविता केवळ शृंगारिक, हास्यरसप्रचुर, विनोदी, कुटिल, असेल ती अधम होय, असें ते ह्मणतात. ह्याव्यतिरिक्त बाकीची कविता, दासांच्या मतें, प्रासादिक होय. ज्या कवितेपासून संसाराचा पोकळपणा कळेल, विरक्तीचा उदय होईल व भक्तीचा पवाडा वाढेल, ती कविता दासांनीं प्रासादिक ह्मणून ठरविली आहे. ह्या न्यायानें पहातां बरीच युरोपियन कविता प्रासादिक या सदराखालीं येईल. चॉसर्नें बोडकींचें काव्य, बट्लर्चें ह्यूडब्रास, शेरिडन्चीं शृंगारिक नाटकें, वगैरे कुटिल काव्यें समर्थांनीं वर्णिलेल्या बाष्कळ काव्यांत मोडतात. ह्या काव्यांपासून मनाच्या रंगेल वृत्तीला करमणूक होते. परंतु ह्या नरदेहाचें सार्थक होण्याचें साधन ह्या काव्यांत नाहीं. अशी कुटिल कविता यूरोपियन सारस्वतांत कांहीं आहे.

आतां उदात्त भावनांचा उदय करून व मलिन उपाधींचे कोश फाडून जीवात्मा शिवाची ओळख करून देणारीं काव्येंहि ह्या सारस्वतांत थोडीं नाहींत. शेक्सपियरच्या बहुतेक सर्व नाटकांत उदात्त भावनांचीच चिकित्सा केलेली आहे. टायमनांत संपत्तीचें चंचलत्व, आथेल्लोंत मत्सराचें नैर्घृण्य व हॅम्लेटांत असंतोषवृत्तीची दुष्टता कवीनें अत्युत्कट चातुर्यानें दाखविलेली आहे. गेटीचें सर्वांत उत्कृष्ट प्रकरण जें डॉक्टर फास्टस त्याचा मुख्य आणि एकच हेतू संसाराची असारता, मायेचा मोह, ईश्वराची वत्सलता, भक्तीचें बळ, व धर्माची सनातनता स्पष्ट करण्याचा आहे. शिलर, रासीन, ह्यूगो, टेनिसन, वगैरे अनेक प्रासादिक कवींचा हेतु सर्वोत्तम जो परात्पर आत्मा त्याच्याकडे मनुष्यांचीं मनें वळविण्याचाच आहे, हेंहि विस्तार केला असतां दाखवून देतां येईल. परंतु केवळ धर्माचे व भक्तीचेच पवाडे गाणारे उत्कृष्ट कवि हवे असल्यास तेहि यूरोपांत झालेले आहेत. मिल्टनची येथून तेथून सर्व कविता भक्तिप्रचुर आहे. Paradise Lost, Paradise Regained, Samsom, व इतर किरकोळ स्तोत्रें बायबलांतील कित्येक प्रसंगांवर मिल्टन्नें रचिलीं. दुष्ट लोक रौरव नरकांत कसे पडतात हें डांटीनें Inferno त वर्णिलें. शिवाय आपल्या इकडील अभंग, भूपाळ्या, वगैरेसारखी ईश्वरस्तुतिपर कविता यूरोपांतील प्रत्येक भाषेंत हवी तितकी आहे. येणेंप्रमाणें भक्तिपर कविता नाहीं असें सारस्वत बहुधा कोठेंच सांपडावयाचें नाहीं. भक्तिपर कविता एकट्या महाराष्ट्रांतच सांपडेल असें विधान करणें व्यर्थ आहे. तसेंच सर्व महाराष्ट्र कवि केवळ भक्तिपरच आहेत असेंहि नाहीं. मुक्तेश्वराच्या भारताला, रघुनाथपंडिताच्या नलदमयंतीला, रामजोशाच्या फटक्यांना, होनाजीच्या लावण्यांना, व शाहीरांच्या पवाड्यांना भक्तिपर कसें ह्मणावयाचें? इतर राष्ट्रांप्रमाणें महाराष्ट्रांतहि भक्तिपर कवींप्रमाणें अन्यविषयपर कवी आहेत. हे अन्यविषयपर कवी केवळ धीट किंवा पाठ नसून प्रासादिक आहेत. सारांश, इकडील कवींची कोटी इतर राष्ट्रांतल्या कवींच्याहून भिन्न नसून, त्यांचीं लक्षणें इकडील कवींस यथास्थित लागू पडतात. भेद कवींत नाहीं; भेद दासांच्या विवेचनांत नाहीं; भेद रा०

रा० पांगारकरांच्या कल्पनेंत आहे. नाटकादि रचना आपल्याइकडील कवींनीं केली नाहीं, ह्यामुळें जें व्यंग भासतें त्यानें हा भेद उत्पन्न होतो. खेरीज, महाराष्ट्र सारस्वताची, अभ्यासाभावामुळें, परीक्षा करण्यास सर्वथा अनधिकारी अशा विल्सनप्रभृति परकीयांनीं, मराठी कवी अमुक कोटींतील आहेत व तमूक कोटींतील नाहींत अशीं, जीं निरर्गल विधानें ठोकून दिलीं आहेत त्यांचाहि परिणाम इकडील रसिकांच्या मना-वर न कळत होतो. ह्या आगंतुक आणि अपक्व संस्कारांस एकीकडे सारून आणि पाश्चात्य व पौर्वात्य सारस्वताचा स्वबुद्धीनें विचार करून, महाराष्ट्र सारस्वतासंबंधानें जें कांहीं बोलावयाचें तें बोललें पाहिजे.

१२. असो. वर्तमानकालीन परिभाषेंत ज्याला काव्य ह्मणून ह्मण-तात तें जर दासबोध नाहीं, तर तो आहे तरी काय? आतां दासबोध आहे काय हा प्रश्न नव्यानेंच निघाला आहे असें नाहीं. हा प्रश्न खुद्द रामदासांच्या वेळींहि उद्भवला होता ( कुबडी, दशक १, ओवी ५ ). कोणी ह्याला समुच्चयवादाचा ग्रंथ ह्मणूं लागले; कोणी ह्यांत त्रिकांडनिरूपण आहे ह्मणून प्रतिपादिलें; व कोणाला हा ग्रंथ केवळ व्यवहारज्ञान शिकवितो असेंहि वाटलें. आणि हीं तिन्हीं ह्मणणीं खरीं होतीं. ह्या ग्रंथांत ज्ञानाचें, कर्माचें, भक्तीचें व व्यवहाराचें निरूपण आहे. केवळ वेदान्ती जे होते त्यांना ह्यांत ज्ञाननिरूपण दिसलें; केवळ कर्ममार्गी लोकांना ह्यांत कर्माचा ऊहापोह सांपडला; केवळ भक्तिमार्गाच्या चहात्यांना ह्यांत भक्तीचे पवाडे आढळले; आणि नुसत्या व्यवहाराकडेच ज्यांची दृष्टी होती त्यांना हा ग्रंथ व्यवहारनीतीचा असावा असें वाटलें. ही लोकांची दृष्टी झाली. आतां स्वतः ग्रंथकाराची दृष्टी काय होती तें पाहूं. आपल्या ग्रंथाचें रूप काय हें स्वतः ग्रंथकारानें दासबोधाच्या पहिल्या दशकाच्या पहिल्या समासांत सांगितलें आहे.

( १ ) नाना किंतू निवारून, नाना संशय छेदून, नाना आशंका फेडून, भक्तीचा, वैराग्याचा, मोक्षप्राप्तीचा, आत्मज्ञानाचा, उपदेश करण्याचा ह्या ग्रंथाचा मुख्य हेतू आहे.

( २ ) ह्या हेतूच्या अनुषंगानें, नाना मतें, कवित्व, चातुर्य, राजकारण, गुरुत्व, शिष्यत्व, वगैरे व्यवहारज्ञानाचें निरूपण केलेलें आहे.

( ३ ) ह्या निरूपणाच्या निदिध्यासानें अज्ञान नष्ट होऊन बद्ध मुमुक्षू होतात, मुमुक्षूंच्या अंगीं वैराग्य बाणतें, अवलक्षणी मनुष्यें सुलक्षणी होतात, धूर्त व विचक्षण समयज्ञ बनतात, आळशी साक्षेपी होतात, व मूर्खांस दक्षता प्राप्त होते. अशी ह्या ग्रंथाची त्रिविध रचना आहे. मोक्षदर्शन हा मुख्य हेतू, उपदेश हें त्याचें मुख्य साधन, व मुमुक्षा हें मुख्य फळ, अशी ह्या ग्रंथाची त्रिविध घटना आहे. ही घटना स्पष्ट ध्यानांत येण्याकरितां पृथक्करण करून, विस्तारानें लिहिणें जरूर आहे.

१३. ह्या अखिल जगतामध्यें, ह्या सर्व जंगमामध्यें नित्य वस्तू एक आहे. ती शुद्ध ज्ञान ही होय ( दशक ५, समास ६ ). शुद्ध विमळ ज्ञानालाच स्वरूपज्ञान ह्मणतात. हें शुद्ध ज्ञान पदार्थविज्ञानाहून निराळें आहे. पदार्थविज्ञानाला समर्थ बहुधाज्ञान ह्मणतात व त्याचें निरूपण त्यांनीं पांचव्या दशकाच्या पांचव्या समासांत केलें आहे. त्यांत शास्त्र किंवा विज्ञान ह्मणून ज्याला यूरोपियन लोक ह्मणतात त्या सर्वांचा समावेश होतो. पशुज्ञान, रोगज्ञान, ओषधिज्ञान, यंत्रज्ञान, धातुज्ञान, शस्त्रज्ञान, वस्त्रज्ञान, गीतज्ञान, तर्कज्ञान, शब्दज्ञान, अंतर्ज्ञान ह्या सर्व वर्गीकरणात्मक विज्ञानांचा अंतर्भाव त्यांत होतो. हीं सर्व विज्ञानें ह्मणजे मायेनें उत्पन्न केलेल्या दृश्य पसाऱ्याचें केवळ वर्गीकरण आहेत, ह्यापेक्षां जास्त कांहीं नाहींत. हें शुद्ध ज्ञान नव्हे, हें तत्वज्ञान नव्हे, हीं सर्व अविद्या आहे, माया आहे, मोह आहे. ही केवळ अनित्य वस्तूंची याद आहे. ह्या अनित्य सृष्टीच्या पलीकडील जें ज्ञान त्याला नित्यज्ञान ह्मणतात. ह्यालाच आत्मज्ञान असेंहि नांव आहे.

१४. नित्य असा जो आत्मा त्याचें ज्ञान व अनित्य असे जे पदार्थ त्यांचें विज्ञान ह्यालाच नित्यानित्यविवेक अशी संज्ञा आहे. क्षेत्री आणि क्षेत्र किंवा द्रष्टा आणि दृश्य किंवा नित्य आणि अनित्य ह्यांच्या संबंधानें जो विवेक तो सर्व ज्ञानाचा मुकुटमणि होय. क्षेत्री, द्रष्टा

अथवा आत्मा हा सत्, शाश्वत, निरुपाधिक व निर्विकार आहे. क्षेत्र, दृश्य अथवा देह असत्, अशाश्वत, सोपाधिक व सविकार आहे ( ६, ९ ). आत्मा सूक्ष्म परंतु देह स्थूल आहे. आत्मा स्वयंभू, व माया परभू आहे. माया फुटते, ब्रह्म फुटत नाहीं. असा हा आत्मा व अनात्मा ह्यांत अखंड भेद आहे. परंतु सर्वांत मुख्य भेद ह्मटला ह्मणजे आत्मा स्वतंत्र व स्वाधीन आहे आणि माया परतंत्र व पराधीन आहे.

१९. ह्या स्वतंत्र आत्म्याचा परतंत्र मायेशीं संयोग झाला, आत्म्याला मायेचा लेप झाला, आत्मा मायेनें दिग्ध झाला, ह्मणजे तो देही होतो. आत्म्याला मायेचा देह ह्मणजे लेप बसला ह्मणजे मायेच्या विषानें दिग्ध असा हा आत्मा सुखदुःखाचा भोक्ता होतो ( दशक १३, समास ९ ). आतांपर्यंतचा हा स्वतंत्र आत्मा ह्यापुढें बद्ध होतो.

१६. मायेचें हें बंधन ह्मणजेच नरदेहाचा जन्म होय. आत्म्याला नरदेह प्राप्त झाला कीं त्याच्या संसाराला व तापत्रयाला प्रारंभ झाला. ह्या तापत्रयाचें तपशीलवार वर्णन दासांनीं बोधाच्या तिसऱ्या दशकाच्या दाही समासांत जन्मापासून मृत्यूपर्यंत केलें आहे. ह्या तापत्रयाचें एकच कारण ही त्रिगुणात्मक माया होय. सत्व, रज आणि तम ह्यांच्या न्यूनाधिक्यानें भ्रांत होऊन ह्या नरदेह्याच्या ठिकाणीं अहंकाराचा प्रादुर्भाव होतो. मी असा आहे, मी तसा आहे, मी यंव केलें, मी त्यंव केलें, मी शहाणा, मी कर्तृत्ववान्, मी दुसऱ्यांना मारीन, छळीन, अशा वेड्यावागड्या भावना होऊन मनुष्य ह्या तापत्रयांत व संसारांत मग्न होऊन जातो. संसाराच्या मोहानें व बंधनानें, डोळ्यावर धुंदी येऊन आपण कोण, हें हा देही विसरून जातो व मूर्खांच्या व पढतमूर्खांच्या सदरांत गणण्यास सर्वथा योग्य होतो ( दशक दुसरा ). मूर्खत्वाचीं व अज्ञत्वाचीं हीं लक्षणें आंगीं बाणलीं ह्मणजे मग ह्याच्या दुःखाला काय पारावार आहे? ह्यानें दुसऱ्यांना छळावें व दुसऱ्यांनीं ह्याला छळावें असा क्रम सुरू होतो. हा असा क्रम कां चालतो, दुःख कां होतें, दुःख हेंच सुख कां वाटतें, हें कळेनासें होऊन, प्राणी भांबावून

जातो. कालांतरानें त्याला ह्या देहाचा व संसाराचा वीट येतो, द्वेष होतो आणि तिटकारा वाटतो. नरदेह खोटा, ह्याच्या पायीं दुःख हें ठेवलेलें, अशी त्याची खात्री होते. सत्व, रज आणि तम ह्यांपैकीं शेवटल्याचें अतिरेकानें सेवन केल्यामुळें आपली ही अशी दशा झाली, हें ह्या प्राण्याला कळत नाहीं; व जो नरदेह वाईटाप्रमाणें चांगल्याहि कामाला लावतां येण्याची शक्यता व संभव असतो त्याची तो व्यर्थ निंदा करूं लागतो. आपल्याला नाचतां येईना हें विसरून तो सर्व दोष अंगणालाच लावूं पहातो. आपण बिघडून ज्याच्या आश्रयानें आपण राहिलों त्या देहावर हा करंटा अपेशाचें सर्व खापर फोडूं जातो.

१७. अशा ह्या गृहकलहाच्या संकटसमयीं प्राण्याला सद्गुरू भेटला तर त्याचें भाग्य उदेलें समजावें; न भेटला तर त्याचा पाय संसृतीच्या खोल पाण्यांत जास्तच जातो व नरदेहाचें सार्थक्य न करतां तो ह्या महोदधींत बुडून निरयगतीचा मार्ग धरतो.

१८. येथें समर्थांच्या ग्रंथाची प्राथमिक भूमिका संपली. संसार हा दुःखमय आहे, आत्मा देही झाला, संसारी झाला ह्मणजे तो तापत्रयाचा धनी होतो, हा जो सार्वत्रिक अनुभव आहे, त्याचें येथपर्यंत निरूपण झालें. हें निरूपण वेदान्ताच्या सर्व ग्रंथांत जसें आलेलें आहे; तसेंच तें समर्थांच्याहि ग्रंथांत निरूपिलें आहे. ह्यापुढीलहि निरूपण ह्मणजे दुःखापासून सुटका कशी व्हावयाची ह्याचें निरूपण, समर्थांच्या पूर्वीं झालेल्या संस्कृत व प्राकृत अशा अनेक ग्रंथांत केलेलें प्रसिद्ध आहे. त्याचाच अनुवाद समर्थांनीं दासबोधांत केलेला आहे. परंतु दासबोधांत विशेष हा आहे कीं महाराष्ट्राच्या तत्कालीन स्थितीला ज्याप्रकारचें निरूपण पाहिजे होतें त्याप्रकारचें तें ह्या ग्रंथांत आहे. गीतादि ग्रंथांत केलेलें निरूपण सर्व कालीं सर्व देशांना लागू पडणारें असून सूत्रवत् त्रोटक आहे. तसा प्रकार दासबोधाचा नाहीं. दासबोधांत गीतेंतील निरूपण तत्कालीन महाराष्ट्राला अनुलक्षून स्पष्ट भाषेंत विस्तृत केलेलें आहे.

१९. संसारांतील तापत्रयानें त्रस्त मनुष्याला सद्गुरू भेटला तर त्याच्या उपदेशानें व संगतीनें केवढा चमत्कार होतो ह्मणून सांगावा! जो नरदेह हा वेळपर्यंत केवळ निंद्य वाटत असतो, तो ह्यापुढें वंद्य व स्तुत्य वाटूं लागतो. गुरूच्या उपदेशानें दृष्टि शुद्ध होऊन आपल्याला ह्या जगांत कांहीं कर्तव्य आहे, कांहीं साध्य आहे, त्या साध्याच्या कामीं आपला हा नरदेह उपयोगी पडण्यासारखा आहे, नरदेह नसता आणि पशुदेह असता तर हें साध्य आपल्या हातून सिद्ध होण्याची शक्यता नव्हती, वगैरे गोष्टी कळूं लागून, हा दुर्लभ नरदेह प्राप्त झाल्याबद्दल आनंद वाटूं लागतो ( दशक १, समास १० ). परंतु, हा अपूर्व चमत्कार घडून येण्यास एका गोष्टीची अपेक्षा असते. ती कोणती तर सद्गुरू मिळणें ही. हा लाभ कांहीं लहानसहान नाहीं. नरदेहाची माती करणारे गुरू पायलीचे पंधरा व अडक्याचे तीन हवेतितके मिळण्यासारखे असतात ( दशक ५, समास २ ). कसें तरी करून व कांहीं तरी करून पोट भरण्याची विद्या भाड्यानें शिकविणारे पामर गुरू, कोणत्याहि काळीं, अगदीं स्वस्त मिळतात. परंतु, समूळ अविद्या छेदून, व अहंकारासुद्धां सर्व आंतर व बाह्य इंद्रियांचें दमन शिकवून, भवाचा पैलपार दाखविणारा सद्गुरू अत्यंत विरळा. हा असला गुरुराज पैशानें मिळत नसतो. ह्याला पूर्वपुण्याईचीच जरूर असते. परंतु ही पूर्वपुण्याई फळास आणण्यास सद्गुरूनें आपण होऊन पुढें आलें पाहिजे. असद्विद्येचा समाजांत प्रसार होतो तो केवळ शिष्यांचाच दोष नाहीं. हा दोष बऱ्याच अंशानें गुरूंकडे असतो. पाखंड आणि बजबजपुरी समाजांत अथवा समुदायांत माजते त्याचा दोष एकट्या असच्छिष्यांकडेच येत नाहीं; तर असद्गुरूंकडेहि बऱ्याच अंशानें येतो (दशक ५, समास ३). शिष्य ह्मणजे अज्ञ, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली असतां, ह्या ठिकाणीं शिष्याला शब्द लावून बिलकुल भागावयाचें नाहीं. समाजाला नीट वळण लावण्याची सर्व जबाबदारी सद्गुरूच्याच माथ्यावर आहे ( दशक ५, समास ३, ओंवी १९ ). सर्वज्ञ असे जे सद्गुरू, ज्ञानानें, अनुभवानें, व विरक्तीनें समाजानें पुढारपण स्वीकारण्याचा ज्यांचा सहज

अधिकार, त्यांनीं शिष्यसमुदायाचा ह्मणजे अर्थात् समाजाला योग्य वळण लावून दिलें नाहीं, तर दुसऱ्या कोणी द्यावें? सद्गुरू उपदेश करण्याला सिद्ध झाले ह्मणजे सच्छिष्य तो ऐकण्यालाहि उत्सुक होतात. अशी ही मेघचातकांची कृष्णार्जुनवत् जोडी मिळाली, ह्मणजे परमार्थाचा विचार होण्यास प्रत्यवाय कोणता?

२०. हा परमार्थ कोणता?

२१. समर्थ ह्मणतात हा परमार्थ ह्मणजे दुसरें तिसरें कांहीं नाहीं. तत्वमसि, तें तूं ब्रह्म आहेसी (दशक १३, समास २, ओवी २०), ह्याचा अनुभव ह्मणजेच हा परम अर्थ होय. हाच अर्थ दुसऱ्या शब्दांनीं सांगूं गेलें असतां, जीवात्म्याची परमात्म्याशीं सायुज्यता होणें हा परमार्थ होय. हाच अर्थ तिसऱ्या शब्दांनीं सांगावयाचा ह्मटलें तर, मायेच्या बंधनापासून सुटून मुक्तीच्या स्थितीला जाऊन पोहोंचणें ह्मणजे परमार्थ मिळविणें होय.

२२. ह्या परमार्थलाभाला, ह्या मोक्षप्राप्तीला, ह्या तत्वमसीला, ह्या मुक्तांच्या स्थितीला जाऊन पोहोंचण्याला मार्ग कोणता? ज्ञानमार्गानें मुक्ति मिळेल, कीं योगमार्गानें मिळेल, कीं कर्ममार्गानें मिळेल, कीं भक्तिमार्गानें मिळेल? बंधापासून मुक्तता होईल कशी? असे नाना प्रकारचे प्रश्न काढून, समर्थ त्यांचीं उत्तरें पांचव्या दशकाच्या सातव्या समासापासून विसाव्या दशकाच्या दहाव्या समासापर्यंत मोठीं समर्पक देतात. त्यांचें निरूपण येथें संक्षेपानेंच करणें भाग आहे.

२३. प्रायः सर्व जीवमात्राच्या व विशेषतः मनुष्यमात्राच्या बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध, अशा चार कोटी आहेत. पैकीं बद्ध जो आहे तो ह्या प्रपंचांतच धडपड करीत असतो. त्याला ह्या धडपडीचा पस्तावा आला ह्मणजे तो बद्धस्थितींतून सुटून जाण्याचा प्रयत्न करतो. गुरूपदेशानें बद्धस्थितींतील तामस वृत्ति सोडून, आपण बद्ध नाहींत,

स्वतंत्र आहेत, अशी त्याची खात्री होते. आतांपर्यंत आपण बद्ध आहोंत असें त्याला भ्रांतीनें वाटत होतें इतकेंच.

कोणासीच नाहीं बंधन, । भ्रांतीस्तव भुलले जन, ।
दृढ घेतला देहाभिमान, । ह्मणोनिया; ॥ ( ५–६–१७ ).

ही बंधनभ्रांति उडून गेली, ह्मणजे मुमुक्षेचा उदय झाला. ह्या अवस्थेंत मोक्षाची अपेक्षा उत्पन्न होते. ही अपेक्षा उत्पन्न झाली ह्मणजे सत्व-वृत्तीचा अभ्यास मनुष्य करूं लागतो. ह्या वृत्तींत तो सर्वथा परोपकारी होतो. असा हा निरभिमान मनुष्य साधक बनतो; परंतु ह्याचा संदेह मावळत नाहीं. हा संदेह ज्याचा मावळला, तूं आणि तें ह्यांच्या ऐक्याची निःसंदेह प्रतीति ज्याला झाली, तो सिद्ध ह्या पदवीला पोहोंचला.

२४. समाजांत असे हे चार प्रकारचे लोक असतात. त्यापैकीं सर्वांना मुक्ति मिळण्याची शक्यता असते, असें वेदान्त सांगतो व दास अनुवादतात.

२५. सिद्ध बोलून चालून स्वतंत्र असतात. साधकहि त्याच स्थितीला जाऊन पोहोंचण्याच्या मार्गांत असतात. मुमुक्षूंची स्वतंत्र-स्थितीला जाऊन पोहोंचण्याची उत्कट इच्छा असते, अर्थात् ह्या तीन कोटींतील लोक मुक्तीच्या, मोक्षाच्या अथवा स्वतंत्रतेच्या स्थितीला जाऊन पोहोंचलेले असतात किंवा पोहोंचण्याच्या मार्गांत असतात. आतां राहतां राहिले बद्ध लोक. ह्यांना मुक्तीच्या मार्गाला आणण्याचा प्रयत्न सिद्धांना व साधकांना मुमुक्षूंच्या साहाय्यानें करावयाचा असतो, ( २–९–१९ ). हा प्रयत्न सफल झाला ह्मणजे सर्वांना परमार्थलाभ झाला व जन्माचें सार्थक्य झालें. अर्थात् सर्वांना परम अर्थ मिळाल्यावर, ह्मणजे पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्यावर, कोणाला कांहींच मिळवावयाचें रहात नाहीं व अखिल मनुष्यजातीचा उद्धार होतो. हा उद्धार होतांना जी धडपड होते, जी खळबळ चालते, जे प्रयत्न चालतात, त्यालाच मनुष्य-जातीचा इतिहास ह्मणतात. ही धडपड व हा इतिहास आज हजारों

वर्षे सारखा चालत आला आहे व पुढेंहि परमार्थाची प्राप्ति यच्चयावत् मनुष्यांना होईतोंपर्यंत असाच अव्याहत चालत राहील.

२६. सिद्धांनीं व साधकांनीं ( २–८–२४ ) मुमुक्षूंच्या साहाय्यानें ( २–९–३८ ) बद्धांचा उद्धार कसा करावा ह्याचें निरूपण करण्यांत दासबोधाचा बहुतेक सर्व भाग दासांनीं खर्चिला आहे. ह्या निरूपणांत समाजाच्या उद्धरणाचे तीन मार्ग सांगितले आहेत. ते तीन मार्ग हे होत:—नीतिस्थापना, धर्मस्थापना व राज्यस्थापना. ( १ ) हरिकथा-निरूपण, ( २ ) नेमस्तपणें राजकारण, ( ३ ) वर्तायाचें लक्षण, तेंहि असावें ( ११–६–४ ). ह्या तीन स्थापनांचे उपाय कशाकरितां करावयाचे तर ह्या उपायांनीं समाज अनन्य राहतो ह्मणजे अन्यतंत्र ह्मणजे परतंत्र ह्मणजे बद्ध रहात नाहीं ह्मणून ( ११–५–३ ). समाज जर मुक्त व्हावा, स्वतंत्र व्हावा, परमार्थाचा भोक्ता व्हावा, अशी इच्छा व आवश्यकता असेल तर सिद्धांनीं व साधकांनीं ह्या तीन उपायांची योजना ह्मणजे स्थापना केली पाहिजे. समाज परमार्थाचा भोक्ता व्हावा ह्यांत समाजाचें तर हित आहेच; परंतु सिद्धांचेंहि आहे. समाजांतील मनुष्यांचें दुःख व विपन्न स्थिति पाहून सिद्धहि दुःखी व विपन्न होतात. अर्थात् समाज ज्या मानानें दुःखी, विपन्न व बद्ध असेल त्या मानानें सिद्धहि दुःखी, विपन्न व बद्ध होतात. तेव्हां समाजाला ह्मणजे समाजांतील मनुष्यांना बंधमुक्त होण्याचा मार्ग दाखविण्यांत आपल्याहि बंधमोक्षाचा मार्ग सिद्ध पहात असतात. तात्पर्य ह्या तीन उपायांची योजना करणें सर्वांना सारखेंच अगत्याचें आहे. पैकीं, सर्वांत नीतीची स्थापना प्रथमारंभीं केली पाहिजे. बद्ध जे आहेत त्यांच्याठायीं नीतीचा अत्यंत लोप झालेला असतो ( दशक ९, समास ७ ). स्वधर्म, भूतदया, आत्मज्ञान ह्यांची तर त्यांना ओळख नसतेच. परंतु, निंदा, द्वेष, अनीति, भ्रष्टाचार, कापट्य, कलह, पाखंड, पैशुन्य, क्रौर्य, कातर्य, दुराशा, ह्यांचें आवरण त्यांच्या आत्म्यावर फारच बिकट बसलेलें असतें. हें आवरण काढून टाकणें हें पहिलें काम आहे. हें काम नीतीचें आहे. नीतीनें मलिन वृत्ति

विमल होऊन, प्राणी सुधारण्याच्या मार्गाला लागतो. सत्व, रज आणि तम, हे जे मायेचे तीन गुण, त्यापैकीं ग्राह्य कोणतें व त्याज्य कोणतें हें सद्गुरूच्या शिकवणीनें कळलें ह्मणजे एक मोठेंच कार्य उरकलें. ह्या नीतिशिक्षणाचें व नीतिस्थापनेचें महत्व अत्यंत हितकारी आहे हें सर्वांच्या लक्षांत यावें ह्मणून त्याच्या विशदीकरणार्थ दासांनीं बोधाचा दुसरा दशक व पहिल्या दशकाचा दहावा समास लिहिला आहे. नरदेह जसा नीतीकडे तसाच अनीतीकडे लावतां येणें शक्य आहे असा प्रस्ताव करून, शहाणा आणि मूर्ख, कुविद्या आणि सुविद्या, सत्वगुण आणि तमोगुण, ह्यांचें निरूपण दुसऱ्या समासांत केलें आहे. अज्ञ जो आहे त्याला नीति माहीतच नसते, तेव्हां तो कुलक्षणी बनल्यास मोठेंसें आश्चर्य नाहीं. असे लोक उपदेशानें सुधारण्याचा पूर्ण संभव असतो. परंतु ह्या अज्ञ जनांशिवाय विद्वन्मन्य असा एक पढतमूर्खांचा वर्ग असतो त्याची नीति सुधारणें मोठें बिकट कृत्य आहे. हे पढतमूर्ख बहुश्रुत आणि व्युत्पन्न असून, ब्रह्मज्ञानाच्या लांब लांब गोष्टी सांगणारे असतात. परंतु क्रोध, मत्सर, अभिमान आणि दुराशा ह्यांनीं पछाडून गेल्यामुळें, ते स्वधर्माची निंदा, भक्तिमार्गाची टवाळी आणि भूतदयेचें विस्मरण, स्वतः करतात आणि अज्ञजनांना करावयाला लावतात. ह्या अवलक्षणी पढतमूर्खांचीहि नीति सुधारणें अत्यंत आवश्यक असतें. अशा ह्या नेणत्या व पढियंत्या अनीतिमान् लोकांची नीति सुधारावयाचा प्रयत्न करणें व तत्प्रीत्यर्थ संस्था स्थापणें हें परमार्थाचा मार्ग दाखवून देण्याचें पहिलें साधन आहे.

२७. परमार्थप्राप्ती अज्ञजनांना करून देण्याचें दुसरें साधन ह्मणजे धर्मस्थापना होय. धर्म ह्मणजे परमेश्वराची उपासना अथवा भक्ति. ही भक्ति नऊ प्रकारची आहे ( दशक ४ ). त्यांत आत्मनिवेदनरूप भक्ति सर्वांत श्रेष्ठ आहे. इतर आठहि भक्तींत जीवात्मा व परमात्मा ह्यांच्यांत भेद आहे असा भाव रहाण्याचा संभव असतो. भक्तीचा विषय जो ईश्वर तो व भक्ति करणारा जो भक्त तो ह्या दोहोंत भेद आहे अशी भावना

पहिल्या आठ प्रकारांत कदाचित् रहाते. परंतु ह्या नवव्या भक्तींत भक्ताच्या मनांत विभक्तपणाचा भाव रहाणें अशक्य आहे अशी ऐक्य-वृत्ति उत्पन्न होते. ही उपासना ह्मणजेच आत्मज्ञान होय. उपासना आणि ज्ञान ह्या दोन गोष्टी, दासांच्या मतें, भिन्न नाहींत. उपासना ज्ञानस्वरूप आहे, उपासना ह्मणजे ज्ञान होय ( २०–४–२० ), अशीं विधानें दासांनीं वारंवार केलेलीं आहेत. अध्यात्मविद्येचें श्रवण, देव-पूजन, भजन, स्नानसंध्यादि कर्में, ह्या सर्वांचा अंतर्भाव उपासनेंत होतो. सारांश कर्म व ज्ञान, ह्यांचा अंतर्भाव उपासनामार्गांत अथवा भक्तिमार्गांत होतो. ह्या भक्तिमार्गांत प्रतिमांची पूजा सांगितली आहे. परंतु प्रतिमा ह्मणजे परमेश्वराचीं चित्रें हें दास कंठरवानें सांगतात. ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा कसा आहे तें ओळखलें पाहिजे, ह्मणून दास अकराव्या दशकाच्या नवव्या समासाच्या सहाव्या व सातव्या ओव्यांत सांगतात.

> थोर लोक मरोनि जाती । त्यांच्या सुरता करोनि पहाती ।
> तैशीच आहे ही गती । उपासनेची ॥ ( २०–९–९ ).

सारांश, मनुष्याच्या कल्पनेप्रमाणें केलेल्या परमेश्वराच्या प्रतिमांत परमे-श्वराचें जें ध्यान करणें ती उपासना होय. ह्या प्रतिमा वाटेल त्या स्वरूपाच्या असोत किंवा ह्यांना वाटेल तें नांव मिळो, मुख्य गोष्ट ही आहे कीं एका परब्रह्माच्या ह्या सर्व प्रतिमा व नांवें आहेत. खंडोबा, विठोबा, नारायण, कृष्ण, लक्ष्मी, विष्णु, राम, अशीं नाना प्रकारचीं नांवें ह्या अनिर्वाच्य वस्तूला लोक देतात ( दशक ११–समास २ ). परंतु, ही अनिर्वाच्य वस्तू एक आहे हें उपासनेंत विसरतां कामा नये. स्वधर्म, कुळधर्म, वर्णाश्रमधर्म असे सर्व धर्म ह्या एका उपासनाधर्मांत ह्मणजे भक्तिमार्गांत येतात. ह्या मार्गाकडे लोकांची प्रवृत्ति करणें ह्मणजे पर-मार्थाच्या मार्गाला त्यांना लावणें होय. तेव्हां भक्तिमार्गाची स्थापना अथवा धर्माची स्थापना करणें हें एक मुक्तीचें मोठेंच साधन आहे. धर्मस्थापनेचे नर केवळ ईश्वराचे अवतार होत, असें समर्थांनीं वारंवार ह्मटलें आहे ( १८–६–२० ). ह्या भक्तिमार्गानें सर्वस्व जें आत्मज्ञान

त्याचें निरूपण, शंका, प्रतिशंका, आशंका वगैरे नाना तऱ्हांनीं सर्व ग्रंथभर समर्थांनीं केलें आहे.

२८. नीतीची व धर्माची स्थापना केल्यानें परमार्थ जो मोक्ष अथवा मुक्ति अथवा स्वतंत्रता तिची अंशतः प्राप्ति होते. परंतु ती प्राप्ति पूर्ण व अप्रतिबद्ध होण्यास, तिच्या आड कोणतेहि अडथळे न येण्यास, तिसऱ्या एका साधनाची जरूर आहे. तें साधन राज्यस्थापना हें होय. समाजांतील सर्वच लोक मुमुक्षू ह्मणजे मुक्तीची इच्छा करणारे ह्मणजे नीतिमान् असतात असें नाहीं. बराच मोठा वर्ग बद्ध ह्मणजे मुक्तीला पराङ्मुख असणारा ह्मणजे अनीतिमान् असतो. नीतिमानांची न्यायाकडे व अनीतिमानांची अन्यायाकडे प्रवृत्ति असल्यामुळें, नीतिमानांचा व अनीतिमानांचा सहज विरोध असतो. ह्या विरोधानें समाजाची तत्वापासून ह्मणजे परमार्थापासून परावृत्ति होते. ही, अर्थात्, मुमुक्षू समाजाला व आत्म्याला हानिकारक असते. कोणी शास्ता नसणाऱ्या सहज स्थितींत समाजांत मुमुक्षूंची संख्या बद्धांच्या संख्येहून केव्हांहि बरीच कमी असल्याकारणानें, केवळ नीतीच्या जोरावर नीतिमान् अनीतिमानांना दाबांत ठेवून नीतीचा विजय करूं शकत नाहींत. तेव्हां नीतीचें संरक्षण करण्यास व अनीतीचें उत्पाटन करण्यास कांहीं तरी शासन करणारी संस्था असावी लागते. तीच ही राज्यसंस्था होय. नीतीप्रमाणेंच धर्माचीहि गोष्ट आहे. स्वधर्माच्या विरुद्ध असणारे बद्ध लोक समाजांत अखंड वावरत असतात. देव व धर्म ह्यांच्या विरुद्ध पाखंडी व नास्तिक हे तर कंकण बांधून सदा तयार आहेतच. परंतु ह्यांच्या व्यतिरिक्त परमेश्वराविषयींच्या ज्यांच्या कल्पना भिन्न आहेत असे परधर्मीहि लोक असतात. ते देवाच्या व धर्माच्या सदा विरुद्ध असतात. आपण जे आर्य लोक त्या आर्य लोकांतील सिद्धांना व साधकांना जो परमार्थ मोठ्या तपानें व परम भाग्यानें प्राप्त झाला आहे व जो इतर सर्व अर्थांहून परम श्रेष्ठ आहे त्याची कल्पना ह्या परधर्मीयांना नसल्याकारणानें, तामसवृत्तीचें प्राबल्य त्यांच्या ठायीं विशेष

असल्यामुळें, व बद्धस्थितींतील मोहरूपी पदार्थसुखांवर त्यांची सर्वस्वी आसक्ति असल्यानें, ते ह्या परमार्थप्रवण संस्थांचा द्वेष करतात व त्यांना हाणून पाडण्याची कष्टी मेहनत करीत असतात. अशा ह्या दुष्ट व अधम लोकांपासून धर्मसंरक्षण करण्याकरितां कोणी तरी शासन करणारी संस्था अवश्य हवी असते. जेथें न्याय आणि धर्म यांचा प्रसार झाला व मुमुक्षुवर्गाचा उदय झाला, त्या समाजाला राज्यसंस्था निर्माण करण्याची जरूरी सहजगत्या उत्पन्न होते. अथवा, खरें पाहिलें तर, परमार्थाचा शोध करणाऱ्या ह्या समाजांत नीति व धर्म ह्यांच्या जोरावर जिचें अस्तित्व सर्वस्वी अवलंबून असतें ती राज्यसंस्था आपोआप दिसूं लागते.

२९. ह्या राज्यसंस्थेचें तत्व समर्थांनीं जागोजागीं मोठें नामी प्रतिपादिलें आहे. व्यक्तिभूत नरदेहाचा आश्रय करून रहाणारा जो आत्मा तो जाणीव आहे. देहाचा लेप असल्याकारणानें ह्या आत्म्याची ही जाणीव अपूर्ण असते. तेव्हां पूर्ण जाणिवेचा अखंड सांठा जो परात्पर आत्मा त्याच्याशीं सायुज्यता प्राप्त होण्यास, ह्या अपूर्ण जाणिवेला आपल्याहून अधिक जाणिवेचें जें अधिष्ठान त्याचा आश्रय करणें जरूर आहे.

> रायाचे सत्तेनें चालतें, । परंतु अवघीं पंचभूतें, ॥
> मुळीं अधिक जाणिवेनें तें, । अधिष्ठान आहे; ॥ (१९–३–४).

राजा किंवा राज्यसंस्था अधिक जाणिवेचें अधिष्ठान आहे, हा सिद्धांत दुसरा एक दृष्टान्त देऊन, समर्थ सजवितात.

> दुरस्ता दाटल्या फौजा, । उंच सिंहासनीं राजा, ॥
> याचा विचार समजा, । अंतर्यामीं; ॥ ( १९–३–२ ).

लाखो सैन्य समोर असून राजा ज्याप्रमाणें उंच सिंहासनावर बसून जास्त अधिकारानें त्यावर हुकूम चालवितो, त्याप्रमाणें लाखो लोकांचा जो समाज त्या समाजावर जास्त जाणिवेनें परमेश्वररूपी राज्यसंस्था अधिकार चालविते.

विवेकें बहुत पैसावले, । ह्मणोन अवतारी बोलिले, ॥
मनु चक्रवर्ती जाहले, । येणेंचि न्यायें; ॥ (१९-३-९).

आजपर्यंत ज्या ज्या अवतारी राजांनीं राज्यें स्थापिलीं ते ते विवेकाचीं ह्मणजे जाणिवेचीं बहुत मोठीं अधिष्ठानें होते. हा मनुष्यमात्राचा जो पसारा आहे त्यांत राजा ह्मणजे परमात्म्याच्या साक्षित्वाचा तत्वरूप दोरा आहे ( १९-३-१ ). मनुष्यसमाजांत ज्याला राजा ह्मणतात तो मी परमेश्वर आहे, असें गीतेंतहि ( १०-२७ ) ह्मटलें आहे. येणेंप्रमाणें राजा हा परमेश्वर आहे व राज्यसंस्था ही परमेश्वराचें अधिष्ठान आहे, असें समर्थांचें ह्मणणें आहे. जसें जीवात्म्याचें अधिष्ठान देह, तसें परमात्म्याचें अधिष्ठान राज्यसंस्था आहे. ह्या राज्यसंस्थेचें मुख्य कार्य ह्मटलें ह्मणजे धर्म व नीति ह्यांना साहाय्य करणें व ह्यांचें साहाय्य घेणें हें होय ( ११-६ ). आतां धर्म व नीति ह्यांचा मार्ग परमार्थशोधनाचा आहे. तेव्हां राज्यसंस्थेचा मुख्य हेतू समाजाला परमार्थाकडे नेण्याचा असतो. हा परमार्थ ह्मणजे ज्याला मुक्ति, मोक्ष, स्वतंत्रता हीं नांवें आहेत तो. येणेंप्रमाणें आत्यंतिक मोक्षाचा ह्मणजे सायुज्यतेचा हेतू धरून मानवसमाज चालला असतां तो नीति, धर्म व राज्य ह्या तीन संस्थांचा आश्रय करितो. ह्या आश्रयांत ज्याला तो राजकीय, नैतिक व धार्मिक स्वातंत्र्य ह्मणून ह्मणतो त्याचा त्याला लाभ होतो, व हा लाभ बरींच शतकें व सहस्रें टिकला तर तो पूर्ण स्वतंत्र होऊन परमेश्वराशीं सायुज्यता पावतो ह्मणजे आपल्या तत्वाला जाऊन गाठतो.

३०. नीति, धर्म व राज्य ह्या ज्या परमार्थाला नेणाऱ्या तीन संस्था त्या स्थापाव्या एवढेंच सांगून समर्थ राहिले नाहींत. तर त्या कशा स्थापाव्या ह्याचेंहि निरूपण परम कारुणिक बुद्धीनें त्यांनीं अनेक स्थळीं केलें आहे. जगताच्या उद्धारार्थ सिद्धांनीं साधकांची भूमिका घेऊन, एकान्तांत वस्तुस्थितीचा अभ्यास करावा, उत्तम गुण तितके घ्यावे, घेऊन जनास शिकवावे आणि उदंड समुदाय करावे ( ११-१०-१८ ). लोकांचे समुदाय करून ह्मणजे मंडळ्या स्थापून

भूतदयेनें बीजारोपण केल्यानें नीतीची संस्थापना होते. कारण, जाणीव-रूपें सकळाचें अंतःकरण एक असतें हें प्रमाण आहे ( १०-१-१९ ). ही जाणीव सर्व भूतांच्या ठायीं एकच असल्यामुळें, आत्मवत् सर्व लोकांना मानणें मनुष्यांना सहज आहे ( १२-१०-२२ ). नीतिस्थापनेचा समर्थांचा हा असा विचार आहे. धर्मस्थापनेकरितां ह्मणजे भक्तिमार्गाच्या स्थापनेकरितां, समर्थ ह्मणतात, ब्राह्मण मंडळ्या, संत मंडळ्या, व भक्त-मंडळ्या स्थापाव्या ( १९-६-१४ ); व परमात्म्याच्या ज्ञानपूर्वक भजनानें व कीर्तनानें दशदिशा दणाणून टाकाव्या. ह्या स्थापनेनें कर्मठ असे कर्ममार्गी ब्राह्मण, ज्ञानमार्गी संत व केवळ भजनप्रिय असे सर्व जातींचे भक्त, एका परमार्थाच्या निमित्तानें एकत्र जमून, मतानें व मनानें एक होतात. ह्या स्थापनेचें हें काम सिद्धांचेंच आहे.

ऐसा जो महानुभाव, । तेणे करावा समुदाव, ।
भक्तियोगें देवाधिदेव, । आपुला करावा ;॥(१२-१०-३२).

सिद्धानें, साधकानें किंवा महानुभावानें समुदाय ह्मणजे मंडळ्याच कां स्थापाव्या, एकेकट्या मनुष्याला उपदेश केला असतां कार्य साधणार नाहीं कीं काय, असा येथें कोणी प्रश्न करील. तर ही शंका समर्थ पुढील ओवींत फेडतात:—

आपण अवचितें मरोन जावें, । मग भजन कोणें करावें, ।
याकारणें भजनास लावावे, । बहुत लोक ; ॥ ( १२-१०-३३ ).

कोणतेंहि मत पूर्णपणें पसरण्यास व फलद्रूप होण्यास एकाकी मनुष्यापेक्षां अनेकमनुष्यघटित निरनिराळ्या मंडळ्यांचा जास्त उपयोग होतो. एकट्या-दुकट्या मनुष्याचें मनोगत हातीं घेऊन विशेषसा कारभार उरकत नाहीं. महत्कार्यसिद्धि होण्याला बहुतांचें मनोगत हातीं घेतलें पाहिजे ( १२-१० -३७ ). व हा क्रम पिढ्यानपिढ्या चालला पाहिजे. परंतु महत्कार्य ह्मणून घाई व उतावीळपणा करतां नये.

मानत मानत शिष्य करावे, । हळू हळू शेवटा न्यावें, ।
विवेकानें ; ॥ ( १२-१०-४१ ).

धर्मस्थापना कशी करावी आणि त्याला साधन कोणतें त्याचा ऊहापोह समर्थांनीं जो दासबोधांत विस्तारानें अनेक समासांत केला आहे त्याचें मीं नुसतें दिग्दर्शन केलें आहे. ज्यांस विस्ताराची उत्कंठा असेल त्यांनीं मूळाचाच आश्रय करावा.

३१. परमार्थाच्या मार्गाला नेणारी तिसरी संस्था जें राज्य त्याच्या स्थापनेलाहि समुदायाची ह्मणजे मंडळ्यांची आवश्यकता आहे. ह्या कामाला मोठा समुदाय असावा लागतो व तो बळकट ताण देऊन जय्यत तयार ठेवावा लागतो ( १९--९--२२ ). असा समुदाय केला ह्मणजे चहूंकडे सर्व मनुष्यांच्या ठायीं परमार्थबुद्धि उचंबळूं लागते ( १९--२ --२७ ). आपण ह्मणजे इतर जन व आपण ह्मणजे सर्व राष्ट्र, असें जें वाटणें त्यालाच राजकीयदृष्टया परमार्थबुद्धि ह्मणतात. ही बुद्धि समुदायाच्या अंगीं बाणली ह्मणजे लोकांना आधींच अत्यंत इष्ट व आवश्यक अशा ज्या नीति व धर्म ह्या संस्था त्यांच्या रक्षणार्थ व संस्थापनार्थ माणसें कट करून राजकारणांत उत्साहानें पडतात. असा व्याप व आटोप जो समुदाय व समाज करतो आणि धक्के व चपेटे सोसतो तोच देखतदेखतां भाग्याला ह्मणजे परमार्थाला चढतो ( १९–३–७ ). असे सडकून कष्ट केल्याशिवाय ह्या जगांत राज्य प्राप्त होत नसतें ( १८--७ --३ ); व तें प्राप्त झाल्याशिवाय नीति व धर्म ह्यांची सुरक्षितता असूं शकत नाहीं. सिद्धांनीं व साधकांनीं राजकीय समुदाय करावे असें सांगून व्यक्तिमात्राला समर्थ सांगतात कीं, देशांत जो कोणी राजा असेल किंवा त्याचा प्रतिनिधि असेल त्याच्या समुदायांत जाऊन त्यानें सुखानें असावें. असा आश्रय करण्याव्यतिरिक्त विलग व्यक्तीला गत्यंतर नाहीं.

समर्थाची नाहीं पाठी,।
तयास मळताच कुटी; ॥ ( ११--१०--३० ).

येणेंप्रमाणें समुदाय करून राज्यस्थापना करणें हें नीतिमान् व धर्मनिष्ठ पुढाऱ्यांना व अनुयायांना दोघांनाहि सारख्याच हिताचें आहे. कारण

ह्या स्थापनेच्या साहाय्यानें जीवात्म्याला परमार्थाचा, मोक्षाचा, मुक्तीचा, पूर्ण स्वातंत्र्याचा लाभ व्हावयाचा असतो.

परमार्थ सकळांस विसावा, ।
परमार्थ जन्माचें सार्थक, ।
परमार्थ संसारीं तारक, ।
परमार्थी तो राज्यधारी; ॥ ( १-९--२०।२३ ).

१२. गीतेंत भगवंतांनीं अर्जुनास जो उपदेश केला त्याहून दासांनीं केलेला हा बोध तत्वदृष्ट्या कांहीं निराळा नाहीं. देश व काल ह्यांच्या परिस्थितीच्या दृष्टीनें मात्र निरूपणांत व दृष्टान्तांत जमीनअस्मानाचा भेद आहे. भगवद्गीतेंत केलेलें निरूपण गीताकालीन समाजस्थितीला अनुरूप होतें. ती समाजस्थिति बदलल्यावर तें निरूपण नवीन परिस्थितीला लागू पडण्यासारखें नव्हतें. निराळें निरूपण हवें होतें. ह्या नव्या नव्या परिस्थितींना अनुलक्षून शिवगीता, रामगीता, गुरुगीता, गर्भगीता, उत्तरगीता, अवधूतगीता, ब्रह्मगीता, हंसगीता, पांडवगीता, अनुगीता, गणेशगीता, यमगीता, अशा नाना प्रकारच्या गीता निर्माण झाल्या. ह्यानंतर केवळ तत्कालीन महाराष्ट्रसमाजाला लागू पडणारी अशी इसवी सनाच्या तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरी गीता मराठींत लिहिली गेली. ह्या गीतेचा तत्कालीन समाजावर काय परिणाम झाला, वगैरे बाबींचा विचार अन्यत्र करण्याचा हेतू आहे. प्रस्तुत इतकेंच सांगून ठेवणें भाग आहे कीं ह्या ज्ञानेश्वरी गीतेचाहि रामदासीन कालीं कांहींएक उपयोग होण्यासारखा नव्हता. तेराव्या शतकांतलें महाराष्ट्र व सतराव्या शतकांतलें महाराष्ट्र ह्यांत फारच थोर अंतर पडलें होतें. भाषा, नीति, रीति, रिवाज, धर्म, वगैरे सर्व प्रकारें विलक्षण व शोचनीय स्थित्यंतर झालें होतें. अशा स्थित्यंतराला ती तीनशें वर्षांपूर्वींची गीता कशी उपयोगी पडावी? तींतील जुन्या भाषेनें व टीकात्मक पाल्हाळानें सतराव्या शतकांतल्या समाजाचें लक्ष्य कसें वेधावें? तेव्हां हा फरक लक्षांत घेऊन, वेदान्तांतील सिद्धान्तांच्या अनुरोधानें समर्थांनीं

दासबोध ह्या स्वतंत्र प्रबंधाची निर्मिति केली. हा प्रबंध कोणत्याहि ग्रंथाची टीका नाहीं. तत्कालीन नैतिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीला पूर्णपणें अनुलक्षून हा ग्रंथ स्वतंत्र बुद्धीनें रचिला आहे. गीतेंतील व वेदान्तांतील सिद्धान्त, तर, ह्या ग्रंथांत गृहीत ह्मणून घेतले आहेतच. परंतु गीतेंतील सिद्धान्तांचा विपर्यास होऊन लोकांच्या विचारांत जो एकप्रकारचा एकदेशीपणा एव्हांपर्यंत येत होता व सध्याहि येत असतो तो ह्या ग्रंथांत टाळला आहे. गीता हा ग्रंथ, खरें पाहिलें तर, नैराश्यवादी किंवा कातर्यवादी किंवा आलस्यवादी नाहीं. असें असून, परमार्थाचा ज्यांना लाभ झाला अशी ज्यांच्याविषयीं लोकांची समजूत त्या संन्याशांचा व विरक्तांचा वर्ग सर्व लौकिक कर्मांचा परिच्छिन्न त्याग करून दुसऱ्याच्या जीवावर पोट भरण्याचें तेवढें कर्म स्वीकारून राहिला व लोकोद्धरणाचें जें महत्कार्य त्याला सर्वस्वी विसरता झाला. सर्व कर्मांचा त्याग करणें हा संन्यास नव्हे, सर्व कर्मं इतर जनांप्रमाणें किंबहुना इतर जनांहून श्रेष्ठ तऱ्हेनें करीत राहून त्या कर्मांच्या फलाचा भोग आपण घेऊंच अशी दुरिच्छा न करणें हा खरा संन्यास होय, असें भगवद्गीता कंठरवानें सांगत आहे. तें एकीकडे सारून, परोपजीवी व स्थाणू अशा वनस्पतींप्रमाणें हे संन्याशी जीवयात्रा चालवूं लागले. असा जीवितक्रम सिद्धांच्या किंवा संन्यस्तांच्या स्वभावाला विरुद्ध आहे हें दासांनीं आपल्या बोधांतील भिक्षानिरूपणांत प्रतिपादिलें आहे. परमार्थज्ञानवान् जे सिद्ध त्यांनीं साधकांची भूमिका घेऊन लोकांना परमार्थाचा मार्ग दाखवावा, असें प्रतिपादन समर्थांनीं दासबोधांत अनेक ठिकाणीं स्पष्टपणें व विस्तारानें केलें आहे. हा एक दासबोधांतील प्रमुख विशेष आहे. नीति व भक्ति ह्यांची प्राप्ति व्यक्तिमात्रानें कशी करावी हें गीतेंत विस्तारानें सांगितलें आहे. परंतु समुदाय करून समाजाला नीति व धर्म ह्यांकडे कसें न्यावें ह्यांचें दहा पांच उल्लेखांपलीकडे गीतेंत विवेचन नाहीं. हें विवेचन तर दासबोधाचा मुख्य प्राण होय. तसेंच गीतेंत राज्यसंस्थापनेसंबंधीं—नराणांच नराधिपम्—ह्यासारख्या कांहीं खंडवाक्यांखेरीज दुसरा स्पष्ट असा उल्लेख नाहीं. दास-

बोधांत राज्यसंस्था ह्मणजे ईश्वराचें शरीर आहे, वगैरे प्रतिपादन स्पष्ट केलें आहे. सारांश, गीतेंत जो अर्थ केवळ मुग्ध आहे, तो दासबोध ढोबळ अक्षरांनीं स्पष्ट करून दाखवीत आहे.

३३. विस्तारानें व स्पष्टपणानें परमार्थाचें व तत्प्रवण साधनांचें विवेचन केल्यावांचून तत्कालीन महाराष्ट्रसमाज बद्ध ह्मणजे परतंत्र स्थितींतून मुक्त होण्याचा बिलकुल संभव नव्हता. गीताकालीन समाजाला रामदासकालीन समाजाचीं संकटें आलीं नव्हतीं. गीता भारतीय युद्धाच्या कालीं लिहिली असें धरलें तर, त्यावेळीं राष्ट्रांत गृहकलह लागला होता, दोन्हीं युयुत्सू पक्ष एकधर्मी होते, परंतु राज्यसंस्था नष्ट झाली नव्हती, अशी स्थिति होती. गीता भारतीय युद्धानंतर हजार पांचशें वर्षांनीं लिहिली असें धरलें तरीहि, सांख्य व बौद्ध ह्या मतांचें एकीकरण करण्याचाच तेवढा तिचा मुख्य उद्देश होता, असें दिसतें. आतां रामदासांच्या वेळीं सांख्यांच्या किंवा बौद्धांच्या मतांचें वेदान्ताशीं समीकरण करावयाचें नव्हतें; अथवा धर्मराज्य हिंदूंच्या हातीं असून, तें कोणत्या पक्षाच्या हातीं द्यावें, असाहि प्रश्न नव्हता. प्रश्न ह्याहून अगदीं निराळा होता. राज्यसंस्था परधर्मी म्लेंच्छांच्या हातांत गेली होती व नीति व धर्म यांचा बहुतेक पूर्ण उच्छेद होऊन, हिंदूसमाज अत्यंत विस्कळित झाला होता. ह्या विस्कळितपणाचें चित्र दासांनीं कलिधर्मनिरूपणांत व इतरत्र मोठें चतुराईनें चितारलें आहे. म्लेंच्छांनीं महाराष्ट्र पादाक्रान्त केल्यापासून समाजांत अनन्वित प्रकार होऊं लागले. म्लेंच्छ राजांचें व उमरावांचें वैभव पाहून, लोकांस स्वतःचे आचार, विचार, शास्त्र, सिद्धान्त, चाली, रीती, देव, धर्म, वगैरे सर्व कुचकामाचें वाटूं लागलें. स्वतःचीं देवस्थानें सोडून लोक दाउद–उल्–मुलूख उर्फ दावलमलक नामक मुसुलमान पीराला भजूं लागले. कित्येकांनीं तुर्की उर्फ मुसुलमानी धर्म स्वीकारिला. ब्राह्मणांचा बुद्धिनाश झाला. शूद्र व अतिशूद्र ब्राह्मणांना शास्त्र शिकवूं लागले. मनोदौर्बल्य येऊन ब्राह्मणहि त्यांचा उपदेश ऐकूं लागले. शूद्र ब्राह्मणांचा आचार करूं लागले आणि ब्राह्म-

णांनीं ग्रामण्यें करून आपसांत तंटे गाजविले. चातुर्वर्ण्य नष्ट झालें. सर्वत्र बेबंदशाही गाजूं लागली. येणेंप्रमाणें नीतीचा व धर्माचा दाब नाहींसा होऊन हिंदूंच्या हातचें राज्य म्लेंच्छांच्या हातीं जाऊन, त्यांची मगरमिठी जास्तच बसली. तीर्थक्षेत्रांचा धुव्वा उडाला. मूर्ती फोडल्या गेल्या. बायका भ्रष्ट झाल्या. आणि धर्महि बहुतेक गेल्यासारखाच झाला. असा अनन्वित व विस्कळित प्रकार चालूं असतां दासांनीं नाशकास शके १५५४ त ह्मणजे इ० स० १६३२ त नीति, धर्म व राज्य स्थापून परमार्थाचा मार्ग लोकांना दाखविण्याचा निश्चय केला. त्या निश्चयाचें फळ हा दासबोध होय. ह्यांत गीतेंतल्याप्रमाणें अनीतिमान् भाऊबंदाना मारून राज्य मिळविण्यांत पाप नाहीं, असा उपदेश केलेला नाहीं. तर, मुळींच अस्तंगत झालेल्या नीति, धर्म व राज्य ह्या तीन संस्था स्थापाव्या कां व कशा ह्याचें निरूपण केलें आहे. नीति, धर्म व राज्य हीं तीन परमेश्वराचीं ह्मणजे परमार्थाचीं ह्मणजे पूर्ण स्वातंत्र्याचीं मूर्त रूपें आहेत; तेव्हां त्यांची स्थापना व आश्रय करणें मुमुक्षूंना अत्यंत आवश्यक आहे, हा दासांच्या उपदेशाचा मथितार्थ आहे.

३४. दासांनीं हें जें निरूपण केलेलें आहे तें हिंदुस्थानांतील सर्व आर्य लोकांना लागू पडण्यासारखें होतें. परंतु दासांच्या निरूपणाचा मुख्य कटाक्ष महाराष्ट्रावर सर्वस्वी असलेला दिसतो. बहुतेक सर्व हिंदुस्थान व महाराष्ट्राचा बराच भाग म्लेंच्छ संस्कृतीनें भिनून गेला होता. तेव्हां बाकी उरलेला जो थोडा महाराष्ट्रदेश ( १९-२-४ ) त्याला अनुलक्षून समर्थांनीं आपला उपदेश सांगितला आहे. परमार्थाचीं मुख्य साधनें जीं नीति, धर्म व राज्य त्यांना मूर्तस्वरूप धारण करून अवतीर्ण होण्याला हा महाराष्ट्रदेशच तेव्हा त्यावेळीं पक्क झाला होता. महाराष्ट्राच्या ह्या पक्कतेला उद्देशून, महाराष्ट्रधर्म ह्या शब्दाची दासांनीं योजना केली आहे. महाराष्ट्रधर्म ह्या शब्दांतील ' महा ' हा अवयव काढून टाकून बाकी उरलेला जो राष्ट्रधर्म हा शब्द त्यावरून ह्या शब्दानें कोणत्या अर्थाची व्यक्ति होते तें वाचकांनीं पहावें. परमार्थप्रवण जीं

नीति, धर्म व राज्य तीं सर्व हिंदुस्थानाला सारखींच लागू पडतात; परंतु महाराष्ट्रधर्म केवळ महाराष्ट्रालाच तेवढा लागू पडतो. महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्राचें कर्तव्य. हें कर्तव्य कोणतें तर परमार्थप्रवण नीति, धर्म व राज्य ह्यांच्यासंबंधीं जें महाराष्ट्राचें कर्तव्य तें. महाराष्ट्रधर्माचें विस्तृत विवेचन मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या पहिल्या व चवथ्या खंडांच्या प्रस्तावनांत मी केलें आहे व तेथें कैलासवासी म० गो० रानडे यांनीं केलेला महाराष्ट्रधर्म ह्या शब्दाचा religion हा अर्थ चुकीचा आहे हें सिद्ध केलेलें आहे. ही चुकी रानड्यांनीं पुढील आपल्या एका व्याख्यानांत सुधारून घेतली आहे. श्रीमती गंगाभागीरथी रमाबाई यांनीं नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या रानड्यांच्या धर्मव्याख्यानांत महाराष्ट्रधर्म म्हणजे बहुतेक patriotism होय असें स्पष्ट म्हटलेलें आहे. ह्या म्हणण्याकडे रा० रा० सरदेसाई ह्यांची नजर न गेल्यामुळें, त्यांनीं आपल्या 'मराठी रियासतींत' रानड्यांच्या पहिल्या अर्थाचाच अनुवाद केला आहे. आपल्या आर्य लोकांचा जो सनातनधर्म त्याचा अभिमान बाळगणारा हा महाराष्ट्रधर्म होय. ज्याप्रमाणें धर्माचा त्याप्रमाणेंच नीतीचा व राज्याचाहि अभिमान महाराष्ट्रधर्म बाळगतो. तेव्हां सनातनधर्माला महाराष्ट्रधर्म समजून कसें चालेल? परंतु ह्यासंबंधीं विस्तृत विवेचन इतरत्र केलें असल्यामुळें, त्याची पुनरुक्ति येथें करण्यास अवकाश नाहीं.

३५. येथपर्यंत परमार्थप्राप्तीसंबंधानें समर्थांचे विचार काय आहेत त्यांचें पृथक्करण संक्षेपानें केलें. आतां हे विचार आधुनिक यूरोपियन शास्त्राच्या कसोटीला कितपत उतरतात तें पाहूं.

३६. हा मानवसमाज आज हजारों वर्षें जी सारखी धडपड करीत आहे, तिचा विचार अनेक दिशांनीं करतां येण्यासारखा असतो. (१) ह्या समाजाचा अथपासून आतांपर्यंत इतिहास काय आहे तें पाहून ह्या धडपडीचें तात्पर्य कोणतें निघतें तें कित्येक शास्त्रज्ञ पहातात. त्यावरून अमूक अमूक चरित्र हा समाज करीत आला आहे एवढेंच

निष्पन्न होतें. पुढें हा समाज काय चरित्र करील हें पुढील चरित्रावरून समजावयाचें असतें. त्यासंबंधीं अगोदर कोणतेंहि भाकीत करण्याचें इतिहासाचें काम नाहीं. ह्या पद्धतीला समाजाच्या धडपडीचा विचार करण्याची ऐतिहासिक पद्धति असें नांव आहे. ( २ ) धडपड करतांना हा समाज कोणतीं रूपें अथवा शरीरें धारण करतो ह्याचा विचार कित्येक शास्त्रज्ञ करतात. धडपड करतांना, समाज एकसत्ताक रहातो किंवा बहुजनसत्ताक रहातो, चातुर्वर्ण्याची संस्था स्वीकारतो किंवा एकजातीनेंच रहातो, वगैरे समाजाचीं रूपें पहाण्याचा ह्या शास्त्रज्ञांचा हव्यास असतो. ह्या पद्धतीला समाजाच्या धडपडीचा विचार करण्याची शारीरिक पद्धत ह्मणून संज्ञा आहे. ( ३ ) समाज कोणतेंहि रूप घेवो किंवा कोणतेंहि चरित्र आचरो, ह्या रूपाचीं किंवा चरित्राचीं लक्षणें काय आहेत एवढ्याचेंच निदान करण्याचा कित्येकांचा संकल्प असतो. ह्या पद्धतीला लाक्षणिक पद्धति असें नांव देतां येईल. ( ४ ) ह्या तिन्ही पद्धतींहून निराळी अशी चवथी एक पद्धत आहे. हींत समाजाच्या चरित्राकडे, शरीराकडे किंवा लक्षणांकडे सर्वस्वी लक्ष देण्याचा विचार नसून, ज्याचीं हीं चरित्रें, शरीरें किंवा लक्षणें असतात त्या समाजाच्या चालकाची दृष्टी कोणीकडे आहे त्याचा विचार केलेला असतो. ह्या पद्धतीला आत्मिक किंवा तात्विक किंवा वैवेकिक पद्धति असें नांव आहे. ह्या पद्धतींत समाजाचा व मनुष्याचा चालक जो आत्मा त्याच्या धडपडीचा विचार केलेला असतो. आत्म्याचा स्वभाव काय, रूप काय, कार्य काय, अंत्य हेतू काय, वगैरे प्रश्नांचा ऊहापोह करून, त्यावरून समाज कोणीकडे जात आहे ह्याचें विवेचन करण्याचा ह्या पद्धतीचा मुख्य हेतू असतो. ह्या चार पद्धतींना ( 1 ) Historical, ( 2 ) Morphological, ( 3 ) Physiological व ( 4 ) Psychological किंवा Philosophical किंवा Rational अशीं अनुक्रमें यूरोपियन लोक नांवें देतात. पैकीं चवथी जी आत्मिक किंवा तात्विक किंवा वैवेकिक पद्धति तिचा अवलंब दासांनीं आपल्या दासबोधांत केला आहे. ह्या पद्धतीचा अवलंब यूरोपांत श्लेगेल, हेगेल, वगैरे तत्वज्ञांनीं केलेला प्रसिद्ध आहे. जो जो ह्मणून तत्वज्ञानाच्या ह्मणजे आत्मज्ञानाच्या

पाठीमागें लागला तो तो ह्याच पद्धतीचा अवलंब करील हें उघड आहे. मनुष्य ह्मणजे जर सर्वस्वी आत्मा आहे, तर मनुष्याच्या कोणत्याहि हालचालींचा विचार करावयाचा ह्मणजे त्याच्या आत्म्याच्या दृष्टीनें तो केला पाहिजे. अन्य दृष्टीनें करणें केवळ एकदेशी होईल. अन्य दृष्टीनें विचार करणें नानातऱ्हांनीं अत्यंत उपयोगाचें आहे. परंतु मानवसमाजाच्या धडपडीचा अंत्य हेतू काय ह्याचा जर विचार करावयाचा असेल तर ह्या आत्मिक किंवा तात्विक पद्धतीचाच स्वीकार करणें भाग पडतें.

३७. पहिल्या तीन पद्धतींचा अवलंब ज्या शास्त्रज्ञांनीं केला त्यांच्या मतें सुखवृद्धि, अर्थवृद्धि, शरीरसंरक्षण, विद्यावृद्धि, राजपुरुषांच्या सुखाचें साधन, वगैरे हेतू समाजाच्या किंवा राज्याच्या धडपडीचे अंत्य हेतू होत. ह्याच्याहि पुढें जाऊन, राष्ट्रीय गुणांची पूर्ण वृद्धि करणें हा समाजाचा किंवा राज्यस्थापनेचा मुख्य व अंत्य हेतू असतो, असे ब्लंश्ली वगैरे इतिहासज्ञ व राजनीतिज्ञ प्रतिपादन करतात. परंतु एकंदर सर्व मानवजातीचा ही प्रचंड व अव्याहत धडपड करण्यांत अंत्य हेतू काय ह्याची परीक्षा ह्या शास्त्रज्ञांच्या हातून होणें शक्य नसतें. कारण, वर सांगितल्याप्रमाणें, ते समाजाच्या बाह्य व आंतर उपाधीं-कडेच तेवढें लक्ष देतात. ह्या उपाधींना झाडून टाकून शुद्ध आणि विमळ जें निरुपाधिक आत्मस्वरूप त्याकडे हे लोक लक्ष देत नाहींत. त्याकडे लक्ष देऊन मानवसमाजाच्या धडपडीचा ज्यांनीं विचार केला आहे अशांच्यापैकीं हेगेल् ह्या तत्वज्ञाचे विचार समर्थांच्या विचारांशीं बरेच जमतात. हा तत्वज्ञ वेदान्ती असून अध्यात्मदृष्टीनें त्यानें Philosophy of History ह्या ग्रंथांत मानवसमाजाच्या अंत्य हेतूचें विवरण केलें आहे. त्याचा सारांश खालीं देतों व दासांच्या निरूपणाशीं त्याची तुलना करून दाखवितों.

३८. हेगेलचें मत येणेंप्रमाणें आहे. हें जग आत्मा व माया ह्या दोन घटकांचें बनलेलें दिसतें. जें जें कांहीं चित्स्वरूप असतें तें तें

आत्मा होय; व जें जें कांहीं पंचभूतात्मक असतें तें तें माया होय. मानवसमाजाच्या इतिहासांत पंचभूतांचें ह्मणजे नद्या, डोंगर, हवा, पाणी, वगैरेचें महत्व बरेंच असतें. परंतु ह्या मायात्मक पंचभूतांपेक्षां हजारों पटीनें आत्म्याचें महत्व मानवेतिहासांत जास्त आहे. तेव्हां ह्या प्रधानघटकात्मक आत्म्याच्या प्रगतीचा व मूर्त अवताराचा जो इतिहास त्यालाच मानव इतिहास असें नांव देणें योग्य आहे. मायेचें मुख्य लक्षण जडता, परतंत्रता किंवा बद्धता आहे; व आत्म्याचें मुख्य लक्षण सूक्ष्मता, स्वतंत्रता किंवा मोक्ष आहे. आत्मा स्वयंभू, स्वतंत्र व स्वसंवेद्य आहे ह्मणजे स्वतः स्वतःला जाणणारा आहे. मोक्ष, मुक्ति किंवा स्वतंत्रता हें जें आत्म्याचें मुख्य रूप त्या रूपाचा शोध आत्मा करीत असतो. हा शोध करण्याचा जो प्रयत्न त्यालाच मानव इतिहास ही संज्ञा आहे.

३९. हेगेल पुढें ह्मणतो, ह्या इतिहासाचें सूक्ष्म निरूपण केलें असतां असें दिसतें कीं, आपण सर्व माणसें मुक्त आहों किंवा मुक्त होण्यास लायक आहों हें प्रस्तुतच्या युरोपियन ह्मणजे जर्मन समाजाला कळलें आहे. ग्रीक व रोमन लोकांना कांहीं मनुष्यें मुक्त होण्याला लायक आहेत एवढेंच कळलें होतें. आणि पूर्वेकडील हिंदू, चिनी, वगैरे जे लोक आहेत व होते त्यांना एकच मुक्त आहे इतकेंच माहीत आहे व होतें. आत्म्याच्या मुक्तस्वरूपासंबंधानें ह्या तीन समाजांचे हे असे निरनिराळे विचार असल्यामुळें, यूरोपियन लोक पूर्ण स्वतंत्र आहेत, ग्रीक व रोमन लोक अंशतः स्वतंत्र होते, व हिंदू आणि चिनी लोक पूर्ण परतंत्र किंवा बद्ध आहेत.

४०. येणेंप्रमाणें बद्धता, मुमुक्षा आणि मुक्ति हा आत्म्याच्या इतिहासाचा ह्मणजे जगाच्या इतिहासाचा क्रम आहे. अर्थात्, मानव समाजाच्या धडपडीचा अंत्य हेतू मुक्ति, मोक्ष किंवा स्वतंत्रता हा आहे. ही स्वतंत्रता, हा मोक्ष, ही स्वसंवेद्यता ह्मणजेच आत्म्याची तत्ता किंवा तत्व होय. ह्या तत्वाला जाऊन मिळण्याला मुमुक्षू आत्मा धर्म, नीति

आणि राज्य हीं तीन रूपें धारण करतो. पैकीं तिसरें रूप जें राज्य त्याच्या चरित्राला राजकीय इतिहास हें नांव आहे.

४१. आत्मा राज्यरूपानें मूर्त होऊन अवतीर्ण झाला म्हणजे त्याची स्वतंत्र स्थिति प्राप्त करून घेण्याचा मार्ग सिद्ध झाला. हा मार्ग सिद्ध करणारे जे सीझर, नापोलियों, वगैरे वीरपुरुष त्यांच्या ठायीं असणाऱ्या राजस, तामस व सात्विक गुणांचे परिणाम जगाच्या उद्धाराला व प्रगतीला म्हणजे आत्म्याला आपल्या तत्तेकडे अथवा तत्वाकडे म्हणजे पूर्ण स्वातंत्र्याकडे नेण्याला कारणभूत होतात. ह्याच लोकांना अवतारी किंवा वीरपुरुष अशी संज्ञा आहे.

४२. राज्य म्हणजे ज्याअर्थी परमात्म्याचें किंवा जीवात्म्याच्या तत्तेचें अधिष्ठान अथवा मूर्त रूप आहे, त्याअर्थी तेंच राज्य उत्तमोत्तम होय कीं ज्यांत राज्याच्या हिताची दिशा तद्घटक सर्व मनुष्यांच्या हिताच्या दिशेशीं सर्वतोपरी जमते*. असा जम बसावयाला प्रत्येक मनुष्याला आत्म्याच्या तत्वाशीं म्हणजे परमार्थाशीं ओळख झाली पाहिजे. ही ओळख करून देण्याचें राष्ट्रांतील शिक्षणादि नाना तऱ्हांच्या संस्थांचें काम असतें. . ह्या संस्थांनीं राज्यघटक ज्या व्यक्ति त्यांच्या ठायीं अध्यात्म

---

* ह्या सिद्धान्ताचा उल्लेख प्रो॰ सेल्बी ह्यांनीं आपल्या पुण्यांतील एका व्याख्यानांत केला होता. परंतु तो वर्तमानकालीन स्थितीला फारसा जुळणारा होता असें प्रस्तुत लेखकाला वाटत नाहीं. राजा आणि प्रजा ह्यांच्या नीतीच्या, धर्माच्या व राज्याच्या जेव्हां एकच कल्पना असतील तेव्हां तेथें हा सिद्धान्त पूर्णपणें लागू पडतो. राजा गोमांसभक्षक असला व प्रजा गोमांसभक्षण अनीतीचें आहे असें मानीत असली किंवा ख्रिस्तीधर्माला परोक्ष किंवा अपरोक्ष रीतीनें प्रोत्साहन देणारा राजा असला व प्रजेचा त्या धर्माच्या विरुद्ध कटाक्ष असला, किंवा स्वजनांना पूर्ण राजकीय स्वातंत्र्य देणारा व प्रजेला अनेक प्रकारें स्वतंत्र नागरिकत्वाचे हक्क देऊं नेच्छिणारा राजा असला, तर राजा व प्रजा ह्यांच्या परमार्थाची दिशा एक कशी असूं शकेल? Nationalism कडे जगांतील निरनिराळे लोक जात आहेत, असें जे Hegel नें म्हटलें त्याकडे प्रो. सेल्बी ह्यांचें लक्ष ह्या विधानाचें प्रदर्शन करितांना गेलें नाहीं असें दिसतें.

ज्ञानाकडे नेणाऱ्या सात्विक व राजस गुणांचा प्रादुर्भाव होतो. ह्या निरनिराळ्या संस्थांचा विचार हेगेलनें आपल्या Philosophy of History त केला नाहीं; परंतु दासांनीं आपल्या दासबोधांत केला आहे.

४३. दासबोधांत व हेगेलच्या फिलासफींत किती साम्य आहे हें वरील अत्यंत संक्षिप्त पृथक्करणावरून दिसून येईल. हेगेल व रामदास ह्यांच्या तत्वज्ञानांत एका स्थलीं मात्र लक्ष्यांत घेण्यासारखा एक मोठा भेद आहे. तो हा कीं, हिंदू लोकांच्या मतें एकच मुक्त आहे व बाकीचे सर्व बद्ध आहेत, अशी हेगेलनें आपली भ्रममूलक समजूत करून घेतली. हेगेलनें आपलीं इतिहासावरील व्याख्यानें १८२२पासून १८३१पर्यंतच्या दहा वर्षांत रचिलीं. त्यावेळीं महाराष्ट्राचा इतिहास यूरोपांत मुळींच माहीत नव्हता. सतराव्या शतकांत आत्म्याच्या तत्त्वाचा शोध करण्या-करितां मराठ्यांनीं जी अवाढव्य उलाढाल केली ती हेगेलला माहीत नव्हती. उपनिषदांप्रमाणें रामदासांचे ग्रंथ जर हेगेलच्या अवलोकनांत येते, तर आत्म्याच्या तत्त्वाचा जसा हिंदू लोकांनीं शोध चालविला त्याप्रमाणेंच ही तत्ता मूर्त स्वरूपानें अस्तित्वांत आणण्याचेंही काम रामदासानें व शिवछत्रपतीनें चालविलें, हें त्याच्या लक्षांत आलें असतें.

४४. वास्तविक प्रकार असा आहे कीं सर्व लोकांना मुक्ति शक्य आहे असें रामदासांनीं स्पष्ट ह्मटलें आहे.

कोणासीच नाहीं बंधन, । भ्रांतिस्तव भुलले जन, ॥

(९-६-९७)

असें दासांनीं स्पष्ट विधान केलें आहे. तेव्हां महाराष्ट्राच्या इतिहासाच्या व सारस्वताच्या अज्ञानामुळें, हेगेलच्या हातून उपरिनिर्दिष्ट अवास्तव विधान नमूद केलें गेलें हें सांगावयाला नकोच. शिवाय, हेगेलनें ज्याकालीं आपलीं व्याख्यानें दिलीं त्याकालीं हिंदुस्थानाची राजकीय स्थिति फारच विपरीत झालेली होती. ह्या विपरीत स्थितीचें मिल्ल वगैरे ग्रंथकारांनीं जें विपरीत वर्णन केलें त्यावरून हेगेलनें आपलीं अनुमानें बांधिलीं. ह्या आर्यभूमींत

सात्विक गुणांचा एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभास जो ऱ्हास झाला त्याच्याबद्दल महाराष्ट्रांतील लोकांना दोष दिल्यास तो एक वेळ ऐकून घेणें भाग आहे. परंतु अठराव्या शतकाच्या उत्तरार्धाच्या पूर्वी शंभर सवाशें वर्षे जो सद्‌गुणांचा महाराष्ट्रांत उदय झाला त्याच्याकडे ह्या लोकांनीं कानाडोळा करावा हें केवळ पक्षपाताचें लक्षण आहे. ह्या पक्षपातानें हे लोक इतके अंध व कृतघ्न होऊन जातात कीं, जें निःपक्षपाती दृष्टीला निःसंशय उत्तम आहे असें वस्तुतः वाटावें तेंहि हे लोक निंद्य व त्याज्य असें दाखविण्यांत भूषण मानतात. यूरोपांतल्यापेक्षां हिंदुस्थानांतील एखादी वस्तू मोठी असली तर तिचा मोठेपणा हाच त्यांना अवगुण वाटतो, मग जें जात्याच लहान व क्षुद्र असेल तें तसें वाटल्यास नवल काय? भारत ईलियडापेक्षां मोठें आहे ह्मणून तें वाईट आणि दुसरा बाजीराव फ्रेडरिक द ग्रेटपेक्षां लहान दिसतो, तेव्हां तो तर वाईट ठरलेलाच! यूरोपांत योगी नाहींत ह्मणून ते वाईट आणि हिंदुस्थानांत वेरुळचीं लेणीं आहेत ह्मणून तींहि वाईट! यूरोपांत नसतें तें हिंदुस्थानांत असतें किंवा यूरोपांत असतें तें हिंदुस्थानांत नसतें, मिळून दोन्ही तऱ्हांनीं हिंदुस्थानांतील सर्वच वस्तू ह्या लोकांच्या अवकृपेस सारख्याच पात्र होतात. आणि हें कशामुळें होतें तर एक राजकीय स्वातंत्र्य नाहीं ह्मणून. ह्याच दृष्टीनें हेगेलनें, one is free, असें हिंदू लोकांचें मत असतें असें अवास्तव विधान ठोकून दिलें आहे. सद्‌गुणांनीं सर्व लोक मुमुक्षू ह्मणजे स्वतंत्र होण्याच्या लायकीचे आहेत, असें वेदान्त, गीता व रामदास पुनःपुन्हा सांगत असतां व हेगेलनें मोक्षाचा सिद्धांत वेदान्तावरून घेतला असतां, तो असे उद्गार काढतो, त्या अर्थीं हा परिणाम पक्षपाताचा, दुरभिमानाचा, दुराग्रहाचा व महाराष्ट्रेतिहासानभिज्ञतेचा आहे ह्यांत काडीचाहि संशय नाहीं असें ह्मणणें प्राप्त होतें. यूरोपीयन लोकांचा हा दुराग्रह घालवावा आणि यूरोपीयन लोकांचा जो परमार्थाकडे जाण्याचा हेतू आज तीनशें वर्षे दिसत आहे तोच मराठ्यांचाहि हेतू होता हें सिद्ध करून दाखवावें, ह्या इराद्यानें अलीकडे एक ग्रंथ एका इतिहासवेत्याच्या हातून

लिहिला गेला आहे. तो रानड्यांचा मराठ्यांचा इतिहास होय. ह्या ग्रंथांतील कित्येक लहान मोठ्या गोष्टी तज्ज्ञांना मान्य होण्यासारख्या नाहींत. तत्रापि मराठ्यांचा इतिहास जगाच्या इतिहासांतील एक घटक होण्याच्या लायकीचा आहे हा जो रानड्यांचा सिद्धान्त तो सर्वांना ग्राह्य होण्याच्या योग्यतेचा आहे. हा ग्रंथ शंभर वर्षांपूर्वी झाला असता, तर हेगेलसारख्या लोकांना जगाच्या इतिहासाच्या तत्वदर्शनांत कांहीं फेरफार करणें अवश्य झालें असतें. बाकी ह्या तत्वज्ञांनीं मराठ्यांच्या इतिहासाची तशी गणना केली नाहीं ह्मणून ती व्हावयाची रहाते असा बिलकुल भाग नाहीं.

४५. असो. येथपर्यंतच्या पृथक्करणावरून व तुलनेवरून, दासबोध हा ग्रंथ कोणत्या स्वरूपाचा आहे, हें स्पष्ट होण्यासारखें आहे. हा ग्रंथ ज्याला इतिहासाचें तत्वज्ञान ह्मणतात त्याचा आहे. इतकेंच कीं ह्या ग्रंथांतील विचारसरणीची पद्धत ऐतिहासिक नसून अध्यात्म किंवा तात्विक आहे. परमार्थप्राप्तीशीं प्रारंभ करून, नीति, धर्म व राज्य ह्या संस्थांचा उदय कसा होतो, ह्याचें निरूपण ह्या ग्रंथांत केलें आहे.

४६. ह्यावरून एवढें निष्पन्न झालें कीं, रामदास हे इतिहासतत्वनिरूपण करणारे महाराष्ट्रांतील प्रथम ग्रंथकार होत. एकनाथ, तुकाराम वगैरे जे साधुसंत झाले त्यांचा सर्व कल नीति व भक्ति ह्यांकडे होता. नीतीचे व भक्तीचे पवाडे गाण्यांत ह्या साधुसंतांनीं महाराष्ट्रानें मोठें हित केलें ह्यांत संशय नाहीं. परंतु राष्ट्रीय व राजकीय दिशेनें विचार करण्यांत ह्या लोकांनीं बिलकुल लक्ष घातलें नाहीं. रामदास व त्यांच्या पूर्वींच्या साधूंत हाच मोठा भेद आहे. पूर्वींचे साधू एकदेशी होते व रामदास सर्वदेशी होते. ह्याशिवाय ह्या दोघांत दुसरा मोठा भेद असा आहे कीं, पूर्वींच्या साधूंनीं ब्राह्मणांचे दोष दाखविण्याचेंच तेवढें व्रत स्वीकारल्यामुळें, चातुर्वर्ण्यघटित जो आपला महाराष्ट्रांतील समाज त्याचे पुढारी जे ब्राह्मण लोक त्यांचें महत्व नाहींसें करण्याकडे ह्या

साधूंच्या उक्तींनें व लेखांनें पर्यवसान झालें. स्वजनांचे दोष दाख-विणें हें कांहीं वाईट काम नाहीं. परंतु दोष काढणाऱ्यावर योग्य रस्ता कोणता तेंहि सांगण्याची व आचरणानें दाखविण्याची जबाबदारी असते. ही जबाबदारी नीट न ओळखिल्यामुळें, दोषाविष्करणानें मनोभंग व मानभंग होऊन, समाजांत विस्कळितपणा व बेबंदशाही मात्र माजली. हा परिणाम साधूंच्या एकदेशीपणाचा झाला. तो रामदासांच्या सर्व-देशीपणानें टळला. रामदासांनीं दोष दाखवून सुरक्षिततेचा रस्ता कोणता हें चातुर्वर्ण्यघटित समाजांतील सर्व लोकांना कारुणिकबुद्धीनें सांगून दिलें. आज हजारो वर्षांची स्थिति पाहिली तर आपला हा समाज चातुर्वर्ण्यघटित आहे हें उघड दिसत आहे आणि हें चातुर्वर्ण्य असेंच किती सहस्रें राहील ह्याचा अंदाज होत नाहीं. तेव्हां चातुर्वर्ण्य ही गृहीत गोष्ट धरून, मग जे कांहीं दोष दाखवावयाचे व ज्या सुधारणा सुचवावयाच्या त्या देशहितेच्छूंनीं सुचविल्या पाहिजेत. यूरोपांतील समाजांचा असंतुष्ट व socialistic कल पाहतां, त्याहि समाजाला प्रायः ह्या चातुर्वर्ण्याचाच पुढें मागें आश्रय करावा लागण्याचा जर दूरदृष्टि लोकांना बराचसा संभव दिसत आहे, तर आपल्याजवळ संतोषप्रवण जी संस्था आहे ती मोडूं पाहून, असंतुष्ट समाजस्थितीकडे ओढा दाख-विणें केव्हांही देशहिताचें होणार नाहीं. हीच गोष्ट लक्षांत घेऊन दासांनीं आपल्या उपदेशाची रचना केली आहे.

४७. दासबोधाच्या स्वरूपासंबंधानें साधारणपणें संक्षेपानें जें कांहीं सांगण्यासारखें होतें तें वर अंशतः सांगितलें आहे. ह्यासंबंधानें आण-खीहि बरेंच लिहिण्याजोगें आहे. तें मराठ्यांच्या सतराव्या शतकांतील इतिहासाविषयीं विचार करण्याचा प्रसंग आला तर विस्तृतपणें लिहि-ण्याचा विचार आहे.

४८. आतां दासांच्या इतर प्रकरणांकडे वळूं. इतर प्रकरणांत, छपाई व शुद्धाशुद्धता ह्यांसंबंधानें दासबोधाच्या मुद्रणांत जीं व्यंगें व दोष दिसले, तेच दिसतात, एवढें सांगितलें ह्मणजे बस आहे. ओव्यांचे जे

चरण तेंडुलकरांनीं सोडिले आहेत ते गोंधळेकरांनींहि तसेच फुल्या घालून छापिले आहेत. माडगांवकरांनीं कठिण शब्दांचे जे चुकीचे अर्थ दिले आहेत तेच अर्थ गोंधळेकरांच्याहि ग्रंथांत असून, शिवाय आणी-कहि बऱ्याच चुका आहेत. सारांश दासांच्या ग्रंथांची शुद्ध अशी एखादी नवी आवृत्ति कोण्या विद्वानानें काढणें जरूर आहे. गोंधळे-करांच्या ग्रंथांतील अपपाठांची व अशुद्ध टिपांची मी एक लांबचलांब यादी केली आहे. परंतु तिनें जागा अडविणें इष्ट दिसत नाहीं. तरी मासल्याकरितां एखाद दुसऱ्या समासांतील अपपाठ वगैरे दाखवितों.

दशक चवदा, समास १.

| | | गोंधळेकरांच्या आवृत्तींतील अपपाठ. | मजजवळील जुन्या पोथींतील पाठ. |
|---|---|---|---|
| ओवी | १ | ऐका निस्पृह शिकवण | ऐका निस्पृहाची शिकवण |
| ,, | ५ | कांता दृष्टीस राखूं नये | कांतादृष्टी राखूं नये |
| ,, | ८ | भिक्षेविषयीं लाजूं नये | भिक्षेविशी लाजूं नये |
| ,, | १४ | कदाकाळीं | कांहीं केल्या |
| ,, | १७ | उडवितां उडो नये | उडवितां उडवूं नये |
| ,, | १८ | चालवितां चालूं नये | चाळवितां चळों नये |
| ,, | २० | भरंवसा कोणास देऊं नये | प्रतिग्रह घेऊं नये |
| | | अंगीकार करूं नये | सभेमध्यें बैसो नये |
| | | नेमस्तपणाचा | सर्वकाळ |
| ,, | २३ | एकान्त मोडो नये | एकान्त मोडो देऊं नये |
| ,, | २४ | लोकनिंद्य तें करूं नये | लोकलाज धरूं नये |
| ,, | २८ | न मानी त्यास सांगो नये | न मनी त्यास सांगो नये |
| ,, | ३२ | दाटून उपदेश देवूं नये | दाडून उपदेश देवूं नये |
| ,, | ३४ | कठिण अभ्यास सोडूं नये | कठिण अभ्यास सांडूं नये |
| ,, | ३६ | मुक्तपणें कदा | मुक्तपणें भरी |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | ४० | निःसंगपणाचे | निसुगपणाचें |
| ,, | ४१ | आपण पुढें | आपणास पुढें |
| ,, | ४७ | नेणपण सांडू नये | नेणपण सोडूं नये |
| ,, | ४८ | कारभारीं पडो नये | कारबारीं पडो नये |
| ,, | ५० | मध्यवर्ती घडो नये | मध्यावर्ती घडो नये |
| ,, | ५१ | प्रपंच परहस्तीं जाऊं नये | प्रपंचप्रस्तीं जाऊं नये |
| ,, | ५१ | पाहण्यासरिसें घेऊं नये | पाहुण्यासरिसें घेऊं नये |
| ,, | ५२ | भोग राहणें बहुवसें | भोग राहाण बहुवसें |
| ,, | ५४ | वोर(!) अन्न खाऊन पडो नये | वारें अन्न खाऊं नये |
| ,, | ५६ | दिलें तरी घेऊं नये | दिल्हा तरी घेऊं नये |
| | | इनाम निस्पृहें | ईनाम निस्पृहें |
| ,, | ५९ | आळस दृष्टीस आणूं नये | आळस दृष्टीं आणूं नये |
| ,, | ६० | उपाधिमध्यें दडो नये | उपाधिमद्धें पडो नये |
| | | उपाधि अंगीं जडो नये | उपाधि आंगीं जडोनि ये |
| | | निःसंगपणें | निसंगळपणें |
| ,, | ६१ | बहु उपाधि धरूं नये | बहुत उपाधि करूं नये |
| ,, | ६२ | बहु कष्ट करूं नये | बहुत कष्ट करूं नये |
| | | अशुद्ध खोटें | असुदें खोटें |
| ,, | ६८ | मुक्तमार्ग कामा नये | मुक्तमार्ग करूं नये |
| ,, | ७१ | अलक्ष्य वस्तू लक्षितां नये | अलक्ष्य वस्तू लक्ष्या नये |
| ,, | ७३ | ज्ञातेविण कामा नये | ज्ञानेविण कामा नये |
| | | अतर्क्य वस्तू तर्कूं नये | अतर्क्य वस्तू तर्का नये |
| ,, | ७७ | अबद्ध पोथी लिहो नये | अबद्ध पोथी लेहो नये |
| | | अबद्ध कदा वाचूं नये | अबद्ध पोथी वाचूं नये |
| ,, | ७८ | निस्पृह वक्तृत्व सोडूं नये | निस्पृहें वक्तृत्व सोडो नये |

गजजवळील पोथींतील ह्या समासांत ८० ओव्या आहेत. गोंधळेकरांच्यांत ७९ आहेत.

दशक चवदा, समास ७.

| | |
|---|---|
| ओवी ३५ हें ब्राह्मणास कळेना | हें ब्राह्मणांस कळेना |
| त्याची वृत्ति चळेना | त्यांची वृत्तिच वळेना |

गोंधळेकरांच्या व बाकीच्या सर्व आवृत्तिकारांच्या पुस्तकांत असे अपपाठ जर बहुतेक दर ओवीमागें आहेत, तर त्या ओव्यांवर दिलेल्या अर्थनिर्णायक टिपा कोणत्या किंमतीच्या असतील तें स्पष्ट करून सांगावयास नको. गोंधळेकरांचे अपपाठ घेऊन वाचकांनीं अर्थ करावयाला जावें ह्मणजे त्यांना त्यांतील रहस्य कळेल. शिवाय सतराव्या शतकांतील लोक जसें मराठी लिहीत होते तसेंच तें सध्या छापिलें पाहिजे. सध्याच्या आपल्या पद्धतीप्रमाणें छापणें ह्मणजे मूळ ग्रंथाचा रूपभंग करणें होय.

४९. दासबोधाची बरीच जुनी ह्मणजे दोनशे वर्षांपूर्वीची पोथी मजजवळ असल्यामुळें व तीहि परंपरागत असल्यामुळें, दासबोधांत क्षेपक प्रकरणें किंवा ओव्या शिरल्या असण्याचा संभव अगदींच कमी आहे, किंबहुना, मुळींच नाहीं ह्मटलें तरी चालेल. एकवीससमासींत दासबोधांतील कांहीं विषय व ओव्या आहेत. विस्तृत दासबोध वाचण्यास ज्यांना अवकाश नसेल त्यांच्याकरितां हा ग्रंथ लिहिला आहे. इतर प्रकरणांसंबंधीं सध्यां विशेष कांहीं नमूद करण्यासारखें नाहीं. स्वामींच्या हनुमंतस्वामींनीं सांगितलेल्या चरित्रासंबंधीं मात्र एक बाब नमूद करतों. हनुमंतस्वामींनीं दासांचा वंशवृक्ष दिला आहे. तो वंशवृक्ष दर पुरुषाला २५ किंवा २२ वर्षें धरिलीं असतां ५०० वर्षें व्यापितो. समर्थ इ. स. १६०८त जन्मले, तेव्हां त्यांचा पहिला मूळपुरूष ११००च्या सुमाराला हयात असावा असें दिसतें. आतां बखरींतल्या वंशावळींत मूळपुरूष ९व्या शतकांत हयात होता असें ह्मटलें आहे. ह्मणजे मूळपुरुषापासून रामदासांपर्यंत ७०० वर्षें गुदरतात. हीं इतकीं वर्षें व्यापण्याला बखरींत दिल्या आहेत त्याहून बऱ्याच जास्त पिढ्या झाल्या असल्या पाहिजेत. तेव्हां वंशावळ बरोबर दिली नाहीं हें उघड आहे.

९०. दासांचीं चरित्रें प्रसिद्ध असल्यामुळें, त्यांच्यासंबंधानें काल-निर्णयाचें खटलें रहात नाहीं. त्यांच्या चरित्रांतील कोणतीं कृत्यें केव्हां घडलीं हें अनुक्रमानें दाखवून देण्याचें काम मात्र सध्यांच्या चिकित्सकाकडे येतें. तें यथास्थित करावयाला गंगाधरस्वामिकृत शके १६४०तील बखर छापिली गेली पाहिजे. तोंपर्यंत ह्या अनु-क्रमाच्या चिकित्सेंत न पडणें बरें. बाकी राहिलेलें जें दासांच्या ग्रंथांचें व विचारांचें राष्ट्रीय महत्व त्याचें दिग्दर्शन प्रस्तुतच्या निबंधांत केलें आहे. त्यावरून तत्कालीन पुढारी पुरुषांवर व सामान्यजनांवर दासांच्या विचारांचा काय परिणाम झाला त्याचा अंदाज बांधतां येईल. तसेंच, शिवाजीचा व रामदासाचा कांहीं एक ह्मणण्यासारखा संबंध नव्हता, सामान्य गुरूपदेश घेण्यापुरतेंच रामदासाला शिवाजीनें गुरू केलें, वगैरे निरर्गल प्रलाप जे सध्या कित्येक लोकांच्या तोंडून ऐकूं येतात त्यांत कितपत अर्थ आहे तेंहि कळेल. रामदास प्रतापगडच्या भवानीला भेटण्यास गेले तेव्हां, माझ्या राजाला राख, अशी त्यांनीं शिवाजीसंबंधानें देवीपाशीं मागणी केली. परळीवरील उत्सवांत शिवाजीनें केलेलीं पदें व अभंग ह्मणण्याची अद्यापिही चाल आहे. ह्या दोन गोष्टी लक्ष्यांत घेतल्या ह्मणजे रामदासाचा व शिवाजीचा किती निकट संबंध होता तें स्पष्ट होईल. परंतु सिद्ध गोष्टीची सिद्धि करीत बसण्यांत कांहीं हांशील नाहीं. जोंपर्यंत दासबोध हा ग्रंथ विद्यमान आहे व मराठ्यांनीं सतराव्या शतकांत स्वतंत्र राज्य स्थापिलें ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे, तोंपर्यंत रामदासाचा व शिवछत्रपतीचा संबंध नव्यानें सिद्ध करूं जाण्याची, अव्यवस्थितचित्तांखेरीज बाकीच्या लोकांना, कांहीं अवश्यकता आहे असें वाटत नाहीं.

९१. वरील सारांश, निरूपण, पृथक्करण व टीका पाहून एक शंका उद्भवण्यासारखी आहे. ती ही कीं भक्तिमार्गाचा, ज्ञानमार्गाचा व कर्ममार्गाचा विस्तृत प्रपंच दासांनीं जसा केला तसा योगमार्गाचा कां केला नाहीं? किंवा समर्थांना योगमार्ग परमार्थाच्या प्राप्तीला योग्य नाहीं असें वाटत होतें कीं काय? ह्या शंकेचें उत्तर असें आहे कीं, मूळ वेदान्तांत योगमार्गाचें महत्व विशेषसें मानिलेलें नाहीं. समर्थ कट्टे अद्वैतवेदान्ती

होते. तेव्हां त्यांनीं योगमार्गाचा प्रपंच केला नाहीं हें रास्तच आहे. समर्थांनीं योगमार्गाचा प्रपंच केला नाहीं इतकेंच नव्हे, तर केवळ हटयोगाचा त्यांनीं उपहास केला आहे. आमचा गुरू पाण्यावर तरून जातो, जमिनींत पुरून घेतो, बीरमंत्र जाणतो वगैरे फटके असद्गुरूंना दासांनीं मारिले आहेत. हटयोगाच्या बळावर अद्भुत चमत्कार करूं जाणाऱ्या भोंदूंचा समर्थांना फार तिटकारा असे. शिवाजी व रामदास हीं माणसें फसवेगिरीला—विचारांत किंवा आचारांत—बिलकुल भीक घालणारीं नव्हतीं. योगाचें निरूपण दासबोधांत न होण्याला हें एक कारण होतें. दुसरें कारण असें होतें कीं, योगाची तालीम करणें प्राय: सामान्यजनसमूहाला शक्य नसतें. निर्वात व निवांत असा प्रदेश, नेमस्त व सात्विक असा आहार, आणि मूक व शांत अशी वृत्ति, ज्याला प्राप्त झाली तोच ह्या नाजूक व मिनतवारीच्या तालमींतील कसरत करूं शकतो. ही कसरत धांगडधिंग्याच्या व आटापिटीच्या ह्या संसारांत सर्व माणसांना कशी साधणार व साधून प्राप्ति काय? तेव्हां योगाचें साधन समर्थांनीं उपदेशिलें नाहीं तें यथायोग्यच केलें यांत संशय नाहीं. स्वत: समर्थ ह्या तालमींत कधीं पडत नसत व अद्भुत चमत्कार करीत नसत. समर्थांनीं अद्भुत चमत्कार केल्याचें हनुमंतस्वामीनें लिहिलें आहे. परंतु तो सर्व हनुमंतस्वामीच्या कल्पनेचा खेळ होय. समर्थांचे अद्भुत चमत्कार सांगण्यांत हनुमंतस्वामीनें आपल्या स्वत:च्या भोळेपणाचें मात्र हास्यकारक प्रदर्शन केलें आहे. समर्थांच्या काळांत व हनुमंतस्वामीच्या काळांत अंतर केवढें पडलें होतें तें ह्यावरून उत्तम दिसतें. समर्थांच्या वेळची मंडळी धर्मनिष्ठ होती व हनुमंतस्वामीच्या वेळची मंडळी धर्मभोळी होती. समर्थांचा काळ विचक्षणपणाचा समजला तर, हनुमंतस्वामीचा काळ भोळसटपणाचा समजावा. सारांश, योगमार्ग परमार्थाच्या प्राप्तीला विशेषसा श्रेयस्कर नाहीं, अशी समर्थांची समजूत असावी असें दिसतें. कसरतीच्या योगापेक्षां भक्तियोग व ज्ञानयोग समाजाच्या जास्त हिताचे आहेत, असें दासांचें ठाम मत होतें.

---

# शुद्धिपत्र.



| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १ | करिमा | करीमा |
| १२ | १० | ग्रंथ रूपानें | ग्रंथरूपानें |
| १६ | १९ | ह्लोपड, व्हीगा | ह्लोप् ड व्हीगा |
| ३६ | १९ | महराष्ट्र | महाराष्ट्र |

# मुक्तेश्वर.

१. कुरुंदवाडापासून एक मैलावर पंचगंगेच्या तीरीं तेरवाडास प्रसिद्ध मराठी कवी मुक्तेश्वर याची समाधि आहे. ही समाधि पूर्वी अगदीं उघडी होती. सध्या ह्मणजे अलीकडील पांचपन्नास वर्षांत मुक्तेश्वराच्या वंशजांनीं तिजवर छप्परवजा एक खोपट बांधिलें आहे. हें खोपट पावसापाण्यापासून समाधीचा बचाव व्हावा ह्मणून बांधिलेलें नाहीं. कारण, गंगेला महापूर आला असतां किंवा पावसाची मुसळधार लागली असतां, ह्या छपराचा कांहीं एक उपयोग होण्यासारखा नाहीं. नंदादीप लावण्यास व पूजाअर्चा करण्यास सुलभ जावें ह्मणून हें छप्पर उभारलेलें आहे. मुक्तेश्वराचे वंशज जे तेरवाडचे इनामदार ते ह्या समाधीपुढें सभामंडप चढविणार आहेत असें समजतें.

२. सदर इनामदारांजवळ मुक्तेश्वराचा एकही लेखी ग्रंथ, अस्सल किंवा नकल, संग्रहास नाहीं. मला सांपडलेल्या सौप्तिक पर्वाची वार्ता ऐकून ह्या इनामदारांस परम समाधान वाटलें.

३. मुक्तेश्वराची वंशावळ येणेंप्रमाणें :--

१ भुजंगपंत ( अत्रिगोत्री ).          एकनाथस्वामी.
|                                   |
२ चिंतोपंत ( विश्वंभर ). = गोदा ऊर्फ गंगा ऊर्फ लीला.
|
३ मुक्तेश्वर ( कवी ).
|
४ निरंजन.
|
५ आकाण्णा गोसावी.
|
६ मुक्तेश्वर ( तेरवाडसंपादक इ. स. १७२७ ).
|
७ निरंजन ( इ. स. १७५९ ) ( वकूबाईचा मुलगा-दत्तक )
वकूबाई ( बाजीनाईक भारद्वाज यांची स्त्री ).
|
निरंजन.          एकनाथ बाजी.

४. मुक्तेश्वरकवीपासून चवथा पुरुष तेरवाडग्रामसंपादक जो मुक्तेश्वरबुवा त्याला कोल्हापूरच्या शंभुछत्रपतीनें खालील सनद शके १६४९, राजशक ५४, प्लवंग संवत्सरीं करून दिली.

श्री.

० श्री ~
प्रतिपच्चंद्ररेखेव
वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥ २२ जुलै १७२७.
शंभुछत्रपतेर्मुद्रा
रामसूनोर्विराजते ॥

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंगनाम संवत्सरे श्रावण शुद्ध त्रयोदशी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं राजश्री मुक्तेश्वर गोसावी बिन्न आकाण्णा गोसावी, गोत्र अत्रि, वास्तव्य मौजे कुरुंदवाड, यांस दिल्हें इनामपत्र ऐसे जेः—तुह्मीं धारूरचे मुक्कामीं स्वामिसन्निध येऊन विदित

| प्रधानाचा | प्रतिनिधीचा |
|---|---|
| शिक्का. | शिक्का. |

केलें कीं, आपण कुटुंबवत्सल आहों, योगक्षेमास कांहीं उपजीविका नाहीं, आपले पणजे राजश्री थोरले मुक्तेश्वर गोसावी, हे श्री एकनाथ स्वामींची कन्या गंगाबाईचे पुत्र, यांचें वृंदावन मौजे तेरवाड, प्रा। रायबाग, येथें आहे. तेथील पूजा, उत्साह, ब्राह्मणसंतर्पणादिकांची अनुकूलता होयसारिखें करावयासी महाराज धर्मपरायण आहेत. ह्मणून तुह्मीं विदित केलें. त्यावरून मनास आणितां, तुह्मीं बहुत भले, भगवद्भक्त, गायनविद्येमध्यें अति निपुण, तुमचे कुटुंबाचा योगक्षेम चाले व थोरले मुक्तेश्वर गोसावी यांचा वृंदावनमहोत्सव होय, ऐसें केल्यानें स्वामीस परम श्रेयस्कर पाहोन, स्वामींनीं यांस मौजे तेरवाड, प्रा। रायबाग, सुभा प्रांत कोल्हापूर, हा गांव पेशजीच्या मुकाशियाकडून दूर करून, इनाम, कुलबाब, कुल-

कानू, हाळीपट्टी, व पेस्तरपट्टी, जलतरुतृणपाषाणनिधिनिक्षेपसहित, खेरीज इनामदार व हक्कदार करून, सर्वमान्य करून दिल्हा असे. येविशीं देशाधिकारियांस व ग्रामाधिकारियांस व वरकडांस अल्लाहिदा पत्रें सादर केलीं आहेत. तरी तुह्मीं मौजेमजकूर पूर्वोक्त यादीप्रमाणें स्वाधीन करून घेणें, आणि इनाम तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून आपला योगक्षेम व वृंदावनीं महोत्सव, ब्राह्मणसंतर्पणादिक सांग चालवून, स्वामींचें व स्वामीच्या राज्याचें अभीष्ट चिंतून, भगवद्भजन करून, सुखरूप राहणें. जाणिजे. निदेश समक्ष. मोर्तब. रुजू. सुरू सूद. बार. बार. ता। ११ जिल्हेज, सुरुसन समान अशरीन मया व अलफ.

ह्याच मुक्तेश्वरबुवास शंभुछत्रपतीनें राजशक ८९ त दुसरी एक सनद दिली.

श्री.

श्री

प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णु-
र्विश्ववंदिता ॥ शंभुछत्रपते-
र्मुद्रा रामसूनोर्विराजते ॥

२ मे १७५९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८९ प्रमाथीनाम संवत्सरे वैशाख शुद्ध ७ गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी यांणीं राजश्री निरंजन गोसावी बिन्न मुक्तेश्वर गोसावी, गोत्र अत्रि, सूत्र आश्वलायन, यांसी दिल्हें इनामपत्र ऐसें जेः—तुमचेविशीं राजश्री नरसिंगराव देवाजी पंतप्रधान यांणीं करवीरचे मुक्कामीं स्वामिसन्निध विदित केलें कीं, मौजे तेरवाड, प्रा। रायबाग, हा गांव पूर्वीं, राजश्री मुक्तेश्वर गोसावी, हे श्री एकनाथ स्वामीची कन्या गंगाबाईचे पुत्र, यांचें वृंदावन मौजे मजकुरीं आहे, त्यांस वृंदावनीं पूजा, उत्साह व अन्नसंतर्पण करावयासी पुरातन इनाम होता. त्यास, ऐलेकडे त्यांचे पणतू मुक्तेश्वर गोसावी बिन्न

आकाण्णा गोसावी यांसी इनाम दिला होता. त्याप्रमाणें ते उपभोग करीत आहेत. त्यास, गोसावीमशारनिल्हेचा वृद्धापकाळ जाहाला ह्मणून गोसावियानीं विदित केलें जे, वृंदावनीं पूजा, उत्साह व अन्नसंतर्पण करावयासी आपली कन्या बकूबाईचे पुत्र निरंजन गोसावियांचे नांवें पत्रें करून द्यावीं. ह्मणून विदित केलें. त्यावरून तुह्मावरी कृपाळू होऊन मौजे तेरवाड, प्रा रायबाग, हा गांव पेशजीप्रमाणें इनाम करार करून दिल्हा असे. तरी तुह्मीं सदर्हू मौजेमजकूर आपले स्वाधीन करून घेणें, आणि इनामगांव दरोबस्त तुह्मीं व तुमचे पुत्रापौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून, स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चिंतून, सुखरूप राहणें. जाणिजे.

निदेश समक्ष. मर्यादेयं
विराजते.

रुजू. संमत मंत्री.

तेरीख ९

रमजान, सुा तिस्सा खमसैन अलफ.

बार सुरूसूद संमत सूद

५. ह्या तीन लेखांतील मजकुरावरून असें दिसतें कीं, मुक्तेश्वर कवीचा पणतू मुक्तेश्वरबुवा इ. स. १७२७ त हयात होता. दर पिढी २२ वर्षांची धरली, तर मुक्तेश्वरबुवाचा बाप आकाण्णा गोसावी १७०५ त, आकाण्णाचा बाप निरंजन १६८३ त व निरंजनाचा बाप प्रसिद्ध मुक्तेश्वर कवी १६६० त वर्तमान होता, ह्यांत फारसा संशय नाहीं.

६. इ. स. १६६० च्या आधीं मुक्तेश्वर कवी किती वर्षें होता व नंतर किती वर्षें जगला हें नक्की सांगण्यास कांहींच आधार नाहीं. परंतु १६६० च्या नंतर लवकरच तो वारला असावा असें धरून खुशाल चालावें.

७. इ. स. १६०९ त मुक्तेश्वराचा जन्म झाला असें समजल्यास, मृत्युसमयीं मुक्तेश्वर पन्नाशीच्या सुमाराचा असावा.

८. मुक्तेश्वराचें गोत्र अत्रि व सूत्र आश्वलायन होतें. त्याचें उपनाम मुद्गल होतें असें " तो मुद्गल चिंतामणिसुत " ह्या सभापर्वाच्या उपसंहारांतील तिसऱ्या ओवीच्या प्रथम चरणावरून दिसतें. त्याच्या आईचें माहेरचें नांव गोदावरी, सासरचें नांव गंगाबाई, आणि एकनाथानें प्रेमानें ठेवलेलें व मुक्तेश्वरानें बोबडेपणीं उच्चललेलें लाडकें नांव लीला होतें. परम भागवत जो एकनाथ त्यानें आपल्या मुलीचें लाडकें नांव परमेश्वराची दुहिता जी माया तिच्या टोपणनांवावरून ठेवावें हें साहाजिक आहे. मुक्तेश्वराच्या आईच्या ह्या तीन नांवांमुळें आजपर्यंत पुष्कळ लोक घोटाळ्यांत पडत. उपरिमुद्रित लेखांत हिचें नांव गंगा आहे. मुक्तेश्वर आपल्या काव्यांत हिला लीला ह्मणून संबोधतो. आणि एकनाथाच्या चरित्रांत व इतर ठिकाणीं गोदा ह्या नांवानें हिचा उल्लेख होतो. हीं तिन्ही नांवें खरीं असून संशयाला मात्र कारण झालीं होतीं.

९. मुक्तेश्वराच्या बापाचें पाळण्यांतील नांव चिंतामणी व जनांतील टोपण नांव विश्वंभर होतें. ह्या टोपण नांवाचा मुक्तेश्वर वारंवार उल्लेख करतो. परंतु आईचें नांव अगोदर व बापाचें नांव पाठीमागून असा क्रम मुक्तेश्वराच्या सर्व काव्यांत आढळतो.

१०. मुक्तेश्वराचा गुरु त्याचा बाप विश्वंभर होता, दुसरा कोणी नव्हता. आपल्या आजाला जनार्दनी एकनाथ ह्मणून तो ह्मणतो (आदिपर्व, अध्याय १, ओवी ७७). प्राकृतकवीश्वर ह्या उपपदानें ज्ञानेश्वराचा तो सन्मानपूर्वक उल्लेख करतो, त्या अर्थी तो नाथपंथी होता हें उघड आहे.

११. मुक्तेश्वराच्या पितृवंशाची कुळस्वामिनी कोल्हापुरची जगदंबा होती (वनपर्व, उपोद्घात, ओवी ३). मातृवंशाकडील कुळस्वामी सोनारीचा बहिरोबा होता. रा. ओक कर्नाटकांतील सुवर्णपुरीच्या भैरवाला

मुक्तेश्वरानें कुळस्वामित्व देतात. परंतु तें अप्रमाण आहे. बार्शीजवळ बहिरोबाची सोनारी अनेक देशस्थांच्या व मराठ्यांच्या यात्रेची जागा ह्मणून प्रसिद्ध आहे. शिवाय तेरवाडकर इनामदारांच्या घरीं ही ओवर-जत्रा अद्याप पाळतात. माजी निबंधचंद्रिकेंत सोनारीसंबंधीची ही गैर-समजूत एका गृहस्थानें दूर केलेली आहे.

१२. मुक्तेश्वराच्या काव्यांत पश्चिम महाराष्ट्रांतील त्यावेळच्या राज्यक्रांतीचा दूरचा असा एकच अस्पष्ट उल्लेख आहे. मुक्तेश्वर मूळचा रहाणारा पैठणचा. पैठणास असतांना त्यानें आपलें भारत लिहिलें, ( सभापर्व, उपसंहार, ओवी २ ). तें लिहीत असतां शिवाजीची सत्ता गोदावरीपलीकडील लोकांना गोचर झाली नव्हती, इतकेंच नव्हे तर तिची वार्ताही तत्रस्थांना नव्हती. आणि यदाकदाचित् असली तरी लहानशा दोन दिवसांच्या बंडाच्या रूपानेंच ती त्यांना दिसत असावी. शिवाजीच्या चळवळीचा असा काळ ह्मटला ह्मणजे इ० स० १६६०च्या पूर्वींचा होय. अर्थात् मुक्तेश्वरानें आपलें महाभारत १६६० च्या सुमारास लिहिलें असावें. शिवाजीची चळवळ फार पसरली नव्हती अशा वेळीं, ह्मणजे इ० स० १६६० च्या सुमारास, मुक्तेश्वरानें भारत लिहिलें असें ह्मणण्यास दुसरें एक कारण आहे. काव्यें लिहिण्याच्या वेळीं शिवाजीची चळवळ लक्ष्य वेधण्यासारखी मोठी असती, तर मुक्तेश्वरानें तिचा उल्लेख खास केला असता असें ह्मणण्यास बळकट पुरावा आहे. तो हा कीं मुक्तेश्वरानें १६६० च्या सुमारच्या दुसऱ्या कित्येक क्षुल्लक गोष्टींचा उल्लेख केला आहे. आदिपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत खालील ओंव्या आहेत :—

> वर्णव्यवस्था जया देशीं । कुमारीखंड ह्मणिजे तयाशी ।
> म्लेंछमंडळ सिंधुप्रदेशीं । एकवर्ण नर तेथें ॥ ६ ॥
> अष्टादश आणि बावन्न । उत्तम, मध्यम, कनिष्ठ वर्ण ।
> यांहीं वसविलें देशसंपूर्ण । भोगिता तो एक नरनाथ ॥ ७ ॥

यावेगळे एकवर्णी । सिंधुपरिसरीं सिंधुस्थानीं ।
मंडळें भरिलीं बहुत यवनीं । तेथेंहि स्वामित्व तयाचें ॥ ८ ॥
जावी, जंगी फिरंगी क्रूर । नायी, इंग्रेज, मल्लोवार ।
कावे, कावटे, कंकम खर । जळतस्कर मांसाशी ॥ ९ ॥
रूमशाम, खोरासान । मुलतान, हबशान, अर्बस्थान ।
उजबेख, पठाण, तुर्कमान । बदकशान, मेवात ॥ १० ॥
घोडेमुख, धेनूमुख । सूकरमुख, रासभमुख ।
वानरमुख, ऋक्षमुख । मानवहार जयांचा ॥ ११ ॥

आदिपर्वाच्या ४० व्या अध्यायांत खालील ओंवी आहेः—

एक फिरंगी रक्तवर्ण । खुरासनीं पांडुरवर्ण
बर्बर जन्मले कृष्णवर्ण । स्थूलघ्राण लंबोष्ठ ॥ ८९ ॥

सभापर्वाच्या आठव्या अध्यायांत ह्या ओंव्या आहेतः—

सागरद्वीपवासीय बहुत । म्लेंछयोनीचे असंख्यात ।
ज्यांते बोलती नर प्राकृत । बहुधा नामीं एकाळीं ॥ १२६ ॥
जावी, जंगी फिरंगी । इंग्रेज बहुधा रक्तरंगी ।
मल्लोवार नौकामार्गीं । विघ्नकर्ते दंडिले ॥ १२७ ॥
पल्हव, बर्बर, किरात, यवन । शकनामाचे बहु दारुण ॥ १९९ ॥
पारसी, भासीक, ताम्रमुख, । आरब, हुरमुज, काळमुख ।
रूमशाम, घोडमुख । नाट, पाट, पुलिंद ॥ १९६ ॥

१३. ह्या ओंव्यांत, जावी ह्मणजे हच लोक, फिरंगी ह्मणजे पोर्तुगीज लोक, इंग्रेज, मलबारी, कावे ह्मणजे उखामंडळांतील वाघीर-लोक, कावटे किंवा काठे ह्मणजे काठेवाडचे लोक, कंकमखर ह्मणजे कोंकणांतील चाचे, रूमशामचे लोक, खोरासानी लोक, मुलतान, हबसाण, अर्बस्थान, बदक्षान वगैरे देशचे लोक, उजबेख, पठाण, तुर्कमान, तिबेटांतील घोडे, गायी, डुकर, गाढव, माकड, अस्वल वगैरे जानावरांचे मुखवटे घालणारे लामा लोक,—अशा नानाप्रकारच्या लोकांचा उल्लेख मुक्तेश्वरानें केला आहे. कोळवण, कऱ्हाड, करवीर, ठाण्याजवळचें

सोपारें, मलबार, कर्नाटक, मल्याळ, श्रीरंगपट्टण, चौदाताळ कोंकण, अपार बंदरें, शिवकांची, वगैरे दक्षिणेंतील व महाराष्ट्रांतील देश मुक्तेश्वराला माहीत होते ( आदिपर्व, अध्याय २६, ओव्या २५--२९ ). इंग्रेज लोक प्रथम आले ते १६१२त सुरतेस आले. त्यावेळीं मुक्तेश्वर तीन चार वर्षांचा होता. वीस-बावीस वर्षांचा झाल्यावर मुक्तेश्वर तीर्थयात्रेला निघाला असावा. ह्मणजे १६३०च्या सुमारास तो बाहेर पडला असें होतें. त्यावेळीं जे जे देश त्यानें पाहिले त्या त्या देशांचीं नांवें त्यानें आपल्या भारतांत गोविलीं आहेत. कोळवण, मलबार, कोंकण हीं नांवें मूळ भारतांत नाहींत; मुक्तेश्वराच्या भारतांत आहेत. अत्यंत जुन्या गोष्टी संबंधानेंहि कोणी कवि लिहूं लागला, तरी तो आपल्या वेळच्या कोणत्या तरी गोष्टींचा समजून किंवा नसमजून उल्लेख करतो. कवि मोठा शास्त्रज्ञ व ऐतिहासिक कालविपर्यासाचा दोष जाणणारा असला, तथापि त्याच्या भाषेवरून, प्रयोगांवरून, व त्याच्या भाषेंतील विलक्षण शब्दसमूहावरून, तो आपल्या काळाचें व मनोरचनेचें प्रदर्शन कसें करतो तें हटकून समजतें. तशांत, ऐतिहासिक कालविपर्यासाचा दोष जाणणारा कवि नसला, ह्मणजे तो आपल्या वेळच्या अनेक गोष्टींचा उल्लेख अत्यंत पुरातन विषयावरील काव्यांतहि केल्याशिवाय रहात नाहीं. मुक्तेश्वराची गोष्ट अशीच आहे. इंग्रेज, पोर्तुगीज, डच, उजबेख, पठाण हीं नांवें मूळ भारतांत नसलेलीं मुक्तेश्वराच्या भारतांत आलीं आहेत. ह्या उल्लेखांवरून मुक्तेश्वराचा काळ नक्की ठरवितां येतो.

१४. इंग्रेजादिकांविषयीं लिहितांना विघ्नकर्ते, दंडेले, जलतस्कर, मांसाशी वगैरे विशेषणें कवीनें योजिलेलीं आहेत. मुक्तेश्वरानें केलेला ह्या दंडेलीचा उल्लेख काल्पनिक नसून अत्यंत खरा आहे हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल. मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीचा एके वेळीं व्हाईस प्रेसिडेंट असलेल्या फिलिप अंडर्सन ह्यानें The English in Western India ह्या नांवाचें एक पुस्तक पन्नास वर्षांपूर्वी लिहिलें आहे. त्या पुस्तकाच्या १८५६ च्या दुसऱ्या आवृत्तीच्या ६८ व ६९ पानांवर हा मजकूर आहे:—

As the number of adventurers increased, the reputation of the English did not improve. Too many committed deeds of violence and dishonesty. We can show that even the commanders of vessels belonging to the Company did not hesitate to perpetrate robberies on the high seas, or on shore, when they stood in no fear of retaliation. During a visit which some English ships paid to Dhabhol, the officers suddenly started up from a conference with the Native Chiefs, and attacked the town, having first secured some large guns that could not be turned against them. Their attempt failed, but after retreating to their ships they succeeded in making prizes of two native boats. Della Valle declares that it was customary for the English to commit such outrages.

And although this last account may be suspected, as dictated by the prejudices of an Italian, we can see no reason to suspect Sir Thomas Herbert's veracity. Sailing along the coast with several vessels under the command of an English admiral, he descried, when off Mangalore, a heavily laden craft after which a Malbar pirate was skulking. The native merchant in his fright sought refuge with the admiral; but writes our author with confessed grief, his condition was little better than it would have been if he had fallen into the pirate's hands. After a short consultation, his ship was adjudged a prize by the English officers. "For my part," proceeds Herbert, "I could not reach the offence: but this I could, that she had a cargo of cotton, opium, onyons and probably somewhat under the cotton of most value, which was her crime it seems. But how the prize was distributed concerns not me to enquire; I was a passenger, no merchant, nor informer". The whole account would be incredible if not given on such good authority; but as it is, we must regard it as a blot upon the English character. Sixty of the native seamen trusted rather to the mercy of the waves than of such Englishmen, and threw themselves into the sea.

सदर ग्रंथकार पुढें ७० च्या पृष्ठावर ह्मणतो:—

Hindoos and Mussulmans considered the English a set of cow-eaters and fire-drinkers, vile brutes, who would cheat their own fathers.

ही हकीकत इ० स० १६३० च्या सुमाराची आहे. ह्या सुमारास सुरत, सुपारा, ठाणें, वाळुकेश्वर, दाभोळ, कारवार, मलबार, वगैरे

प्रांतांतून हिंडतांना मुक्तेश्वराला ह्या म्लेंछ लोकांच्या दुष्ट स्वभावाची माहिती प्रत्यक्ष व कर्णोपकर्णी झाली, ह्यांत संशय नाहीं. ज्या अनेक म्लेंछ लोकांचीं नांवें मुक्तेश्वरानें दिलीं आहेत, त्यापैकीं कित्येक त्यानें सुरत, दाभोळ वगैरे बंदरांत पाहिले असावे असें दिसतें. अंडर्सन आपल्या पुस्तकाच्या ७९ व्या पानावर १६४०तील सुरतेचें येणेंप्रमाणें वर्णन देतो:—

Perhaps no city in the world contained a more varied and mixed assemblage of people. In the thoroughfares were to be seen not only natives of the Guzerathee and Marathee provinces, but also Sindians, Persians, Arabs, Armenians, Parsis, Jews, English, Dutch and Portuguese.

१६६१ त राजापुराहून ज्यांना शिवाजीनें हाकून काढिले त्या इंग्रजांहून हे १६३० व १६४० तील इंग्रज मुक्तेश्वराला जास्त माहीत होते हें वरील उताऱ्यांवरून स्पष्ट आहे. कारण, १६६० च्या सुमाराला इंग्रज लोक सभ्यपणा व माणुसकी जास्त दाखवूं लागले असें अंडर्सन लिहितो. तेव्हां मुक्तेश्वरानें आपलें भारत १६५० च्या सुमाराला लिहिलें असें ठाम विधान करण्यास हें एक सबळ कारण आहे.

१९. इ. स. १६५० च्या पूर्वी मुक्तेश्वरानें भारत लिहिलें ह्याला दुसरें एक प्रमाण आहे. आदिपर्वाच्या ३१ व्या अध्यायांत खालील ओंव्या आहेत: —

> शिंगणी चापीं शरसंधान । उत्तर दिशेचें युद्ध दारुण ॥
> करकाठिया खोचणें प्राण । गौड युद्ध या नांवें ॥ ९२ ॥
> सलंब भाले कोपरखेडी । गर्जतां झुंजती इडेपाडी ॥
> दे अभिचार युद्धप्रौढी । क्षात्रधर्मी बोलिले ॥ ९३ ॥
> खेटक करवाळें सतेज । सूडसाधनीं विशाळ पैज ॥
> त्या नावें महाराष्ट्र झुंज । खंडिताहि न खंडे ! ॥ ९४ ॥
> कटीं कटारे तडक हातीं । उघड आंगीं सत्वरगती ॥
> ते कर्णाटकयुद्ध ह्मणती । रणपंडित निर्धारें ॥ ९५ ॥
> आपादमस्तकावरी ओढण । आडकरूनि परते मारण ॥
> तैलंगयुद्ध तें जाण । आंध्रदेशस्थ बोलती ॥ ९६ ॥

लोहवृश्चिक वाम करीं । सव्य असिलता दुधारी ॥
मारीत लोटणें पुढारी । बर्बरयुद्ध या नांवें ॥ ५७ ॥
करीं यष्टी अर्धचंद्राकार । तेंचि करूनि हत्यार ॥
दक्षिणसमुद्रीं प्रखर । कर्णफाटे झुंजती ॥ ५८ ॥
नौकायानीं यंत्रमारें । पोत भंगिती पाणीमारें ॥
वातवेगीं पळावें त्वरें । फिरंगीयुद्ध या नांवें ॥ ५९ ॥

तसेंच आदिपर्वाच्या २६ व्या अध्यायांत कवी ह्मणतोः—

श्रीरंगपट्टण शिवकांची । समुद्रवासी गडवासियांची ॥
स्थळें जिंकून दुर्जनांचीं । अपार वस्तू आणिल्या ॥ २७ ॥

ह्या उताऱ्यांत निरनिराळ्या देशांतील युद्धपद्धतींचें वर्णन केलें आहे. मराठा क्षत्रिय लांब भाल्यांनीं लढत ह्मणून ५३ व्या ओवींत ह्मटलें आहे. महाराष्ट्रांतील लोक शत्रूचा सूड उगविण्याच्या कामीं विशाळ पैज मारतात, पैज मारून लखलखीत पाणीदार तरवारींनीं लढतात, आणि खंडताहि खंडले जात नाहींत, असा अर्थ ५४ व्या ओवीचा होतो. तेलंगी लोक धनुष्यानें, बर्बर लोक वाघनखानें, व फिरंगी लोक गलबतावरील तोफांनीं झुंजतात, असा पुढील ओव्यांचा अर्थ आहे. आतां शिवाजीनें १६६० च्या पुढें गलबतें, तोफा, घोडे, गड, वाघनखें, तरवारी, भाले, व क्वचित् तिरकामटें, ह्या सर्वांचा उपयोग केलेला प्रसिद्ध आहे. १६६० च्या पुढें, इतकेंच नव्हे तर १६५९ त अफजलखानाचा मोड झाला त्यावेळीं, जर मुक्तेश्वर असता तर महाराष्ट्र-युद्धाचें त्यानें दिलें आहे त्याहून निराळें वर्णन दिलें असतें. तशांत, मुक्तेश्वर ह्मणजे तुकारामासारखा शांत कवी नाहीं. महाराष्ट्रांत तुकारामाच्या भोंवतीं शिवाजीची चळवळ चालली असतां सामाजिक व धार्मिक विषयांतच तो गढून गेलेला होता. तुकारामाप्रमाणें मुक्तेश्वर नुसत्या मानसिक सुखदुःखांचें जाळें विणीत बसणारा नव्हता. मुक्तेश्वरानें सर्व भरतखंड स्वदृष्टीनें पाहिलें असून, निरनिराळे देश व परदेशांतील म्लेच्छ लोक यांचीं वर्णनें, प्रसंगीं सहेतुक विशेषणांचा उपयोग करून, देण्याइतकें त्याचें मन संस्कारक्षम होतें. त्यावेळीं शिवाजीच्या उदात्त पराक्रमाची

वार्ता जर त्याच्या ध्यानांत येण्यासारखी मोठी असती, तर तिचा उल्लेख, अर्जुन, भीष्म, जरासंध, दिग्विजय, यवन, पठाण वगैरेसंबंधानें, त्याच्या काव्यांत, सहेतुक विशेषणांच्या रूपानें किंवा तुलनेच्या ओव्यांत, निःसंशय आला असता; परंतु, मराठ्यांच्या व मावळ्यांच्या पराक्रमांचा उल्लेख होण्याच्या ऐवजीं, गडवासियांची ह्मणजे डोंगरी किल्ल्यावरील मावळ्यांची गणना तो दुष्ट अशा दुर्जनांत करतो. अर्थात् १६५० किंवा १६४०च्या अगोदर मावळांतील किल्ल्यावरील मावळे लोक मवाशी ह्या नात्यानें मुक्तेश्वराला माहीत होते. मुक्तेश्वराच्या कारकीर्दींत पैठण कांहीं वर्षें अहमदनगरच्या पादशाहींत व कांहीं वर्षें विजापुरच्या पादशाहींत मोडत असे. ह्या दोन्ही पातशाहींच्या अमलांत सह्याद्रीच्या किल्ल्यावरील लोक लहानसहान बंडाळी करीत. तिचा उल्लेख मुक्तेश्वरानें आदिपर्वाच्या २६ व्या अध्यायांतील २७ व्या ओवींत केला आहे. सारांश, मुक्तेश्वराचें भारत १६५० च्या आधीं लिहिलें गेलें ह्यांत बिलकुल संशय नाहीं.

१६. मुक्तेश्वराचा काळ ठरविण्याला आणीक एक प्रमाण आहे. तें हें कीं, इंग्रेज, डच, फिरंगी ह्यांचा उल्लेख जसा हा कवी वारंवार करतो तसा फ्रेंच लोकांचा एकदासुद्धां करीत नाहीं. उल्लेख न करण्याचें सबळ कारण असें आहे कीं, मुक्तेश्वराच्या वेळीं हिंदुस्थानांत फ्रेंच लोक आलेच नव्हते. प्रसिद्ध फ्रेंच मुत्सद्दी कोल्बर्ट यानें French East India Company इ० स० १६६४ त स्थापिली व फ्रेंच लोकांनीं आपली पहिली वखार सुरतेस १६६८ त घातली. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या आठव्या खंडांतील आठवें पत्र एका फ्रेंच ह्मणजे फुरशिस कप्तानानें शिवाजी महाराजांना पाठविलेलें आहे. तें १६६८ च्या नंतरचें आहे. तेव्हां ज्या अर्थीं फ्रेंच लोकांचा उल्लेख इंग्रज लोकांबरोबर मुक्तेश्वर करीत नाहीं, त्या अर्थीं ते लोक हिंदुस्थानांत स्थापित होण्यापूर्वी हा कवी झाला असें ह्मणणें भाग पडतें.

रामदासाच्या पुढच्यांतील जे प्रसिद्ध कवी झाले, त्यांचीं नांवें मुक्तेश्वराच्या कवितेंत आढळत नाहींत. फक्त ज्ञानेश्वराचा, एकनाथाचा व

जनार्दनपंताचा उल्लेख मुक्तेश्वर करतो. देहूच्या तुकारामाचीही माहिती मुक्तेश्वराला नव्हती. पंढरीच्या विठोबाचा उल्लेख व वाडीच्या दत्ताचा उल्लेख मुक्तेश्वर अनेक ठिकाणीं करतो; परंतु देहूहून पंढरीस कधींमधीं वाऱ्या करणाऱ्या तुकोबाची माहिती त्याला नव्हती. ह्यावरून १६४९च्या अगोदर ह्या कवीनें भारत लिहिलें असें वाटतें. १६४९त तुकोबा स्वर्गस्थ झाला. नंतर पुढें तुकोबाची कीर्ति दहा वीस वर्षें हळूहळू पसरत चालली व ती पसरत असतां तिचा पल्ला आपल्यापर्यंत येऊन पोहोचण्याला मुक्तेश्वर जिवंत नव्हता असें दिसतें.

१७. येणेंप्रमाणें इ. स. १६५० च्या पूर्वीं मुक्तेश्वरानें भारत लिहिलें हें निश्चित आहे.

१८. मुक्तेश्वराचे खालील ग्रंथ छापले आहेत: —

१. गीतेचें भाषांतर.
२. शतमुखरावणवध.
३. शुकरंभासंवाद.
४. रामायण.
५. एक आरती ( निबंधचंद्रिकेंत छापिलेली. )
६. आदिपर्व.
७ सभापर्व.
८ वनपर्व.
९ विराटपर्व.

१९. काव्यसंग्रहाचे नूतन संपादक रा. रा. नारायण चिंतामण केळकर हे बडोदे येथील रा. रा. चिपळोणकर व रा. रा. पुराणिक ह्यांकडून मजकडे आलेलें सौप्तिकपर्व रा. रा. विनायक लक्ष्मण भावे यांजकडून शोधवून छापणार आहेत. रा. रा. पांगारकर ह्यांनाही सौप्तिकाची एक प्रत सांपडली आहे. विराटपर्वाच्या शेवटीं उद्योगपर्व लिहिल्याचा उल्लेख आहे. तसेंच, आदिपर्वाच्या १७ व्या अध्यायांत ही ओवी आहे:—

ऐसे हे ययातीचे दौहित्र । चौघे माधवीचे सुपुत्र ।
यांचें सविस्तर चरित्र । उद्योगपर्वीं परिसणें ॥ १७३ ॥

शिवाय सौप्तिक ज्या अर्थी उपलब्ध आहे, त्याअर्थी तत्पूर्वीचीं पर्वें मुक्तेश्वरानें लिहिलीं हें संभवतें. तात्पर्य, मुक्तेश्वरानें सबंध अठरा पर्वें भारत लिहिलें असें जें ह्मणतात तें खरें आहे. हीं अठराही पर्वें कधींना कधीं तरी सांपडतील असें वाटतें.

२०. मुक्तेश्वराच्या ज्या हस्तलिखित पोथ्या मजजवळ आहेत, व ज्या मी इतरत्र पाहिलेल्या आहेत, त्यावरून ताडून पहातां, रा० रा० ओक ह्यांनीं छापिलेले ह्या कवीचे ग्रंथ बरेच अशुद्ध आहेत असें दिसतें.

२१. भारतांतील अनेक उल्लेखांवरून ( आदिपर्व, अध्याय ८ वगैरे ) दत्तात्रेय मुक्तेश्वराचें दैवत होतें. तेरवाड येथील वृंदावनांत दत्तात्रेयाची मूर्ति आहे. कृष्णातटाकीं, वाडी, औदुंबर वगैरे स्थळीं दत्ताचा साक्षात्कार जागृत असल्यामुळें, मुक्तेश्वर यात्रेच्या निमित्तानें नरसोबाच्या वाडीस आला असतां त्याचा काल वाडीपासून अडीच मैलावर असणाऱ्या तेरवाडास झाला. त्यावेळीं तेरवाड हें गांव मोंगलांच्या ताब्यांत होतें.

२२. मुक्तेश्वराचे वंशज कविता करीत असत. पैकीं एक श्लोकबद्ध गुरुचरित्र व एक श्लोकबद्ध संतमाला, अशीं दोन त्रुटित प्रकरणें कोल्हापुरांतील रा. भाऊबोवा तेरवाडकर, तेरवाडसंपादक मुक्तेश्वरबुवाची मुलगी बकूबाई इचे वंशज, ह्यांच्या दफ्तरांत मिळालीं.

२३. मजजवळील दोन पोथ्यांत ह्या कवीला मुक्तीश्वर असें बऱ्याच अध्यायांच्या शेवटीं ह्मटलेलें आहे. परंतु सनदेंत मुक्तेश्वर असें नांव असल्यामुळें, वरील नांव अर्थात् अशुद्ध आहे.

२४. प्रस्तुत लेख केवळ कालविवेचनात्मक आहे. तेव्हां मुक्तेश्वराच्या काव्यांचा ऐतिहासिक उपयोग काय तें दुसऱ्या एका लेखांत दाखविण्याचा विचार आहे.

---

# वामन पंडित.

जैसा चंडांशु सतेज व्योमीं
तैसाचि केवळ वामनस्वामी ।
ज्याची श्लोकरचना ये भूमी
भू-मंडळावरी अपूर्व ।

रामविजय, अध्याय १, ओंवी १४.

वामनस्वामी भक्त थोर
जो व्यास अवतार कलियुगीं ।

संतविजय, अध्याय २२, ओंवी ११७.

यमुनेच्या सुंदर वळणावरील रमणीय ताजमहाल आज, काल बांधल्याप्रमाणें, कोराकरकरीत दिसत आहे. व त्याची साफसफाई आजपर्यंत तशीच चांगली ठेवण्यांत येत आहे. देशी वाङ्मय राज्यक्रांतीनें मलिन होऊं न देतां, उर्जित दशेस आणण्यांत येत आहे. कोणी पेशवाई दप्तरें धुंडाळूं लागले आहेत; कोणी श्रीसमर्थपाद सेवूं लागले आहेत; कोणी देहूची यात्रा करूं लागले आहेत; कोणी मयूराचा टाहो कोठून, कोठवर कसा येत होता, याचा सुगावा लावूं लागले आहेत; कोणी शास्त्रीयज्ञानप्रसारार्थ प्रयोगशाला व ग्रंथटंकशाला काढूं लागले आहेत; कोणी सरस्वतीमंदिरांत अभीष्टदेवतेची षोडशोपचारांनीं पूजा करूं लागले आहेत; यावरून, आपणास पाश्चात्य राष्ट्रें, जपानाप्रमाणें, ‘ कळकळीनें कर्तव्यकर्म करणारें राष्ट्र ’ ( a Nation in earnest ) असें ह्मणोत किंवा न ह्मणोत, आपण आपला क्रम असाच नेटानें चालू ठेवणें इष्ट आहे. निश्चयाचे बळानें फळप्राप्ति कशी होते हें आज नव्यानें सांगण्याचें येथें कारण नाहीं. तें आपल्या साधुसंतांनीं अङ्गीकृतहि

आपल्या कर्णरंध्रावर दुमदुमत ठेवण्याचा सारखा प्रयत्न केला होता. तसाच तो आज आपले मान्य समाजाग्रणी करीत आहेत. त्यांची आज्ञा शिरसा वंद्य मानून, पुष्कळ व्यक्तींनीं देशोन्नति व आत्मोन्नति यांतील कार्यकारणभाव ध्यानांत आणून, आपलें कर्तव्य यथाशक्ति पार पाडण्याचें व्रत अंगिकारिलें आहे. हें पाहून, आपणहि त्यास हातभार लावावा या इच्छेनें प्रस्तुत विषय हातीं घेतलेला आहे.

पूर्वीं मुंबईत 'वामनी ग्रंथ' नांवाचे मासिकपुस्तकांत, संपादकांनीं रा. हंसकृत 'वामन चरित्र' इत्यादिकांचें परीक्षण करून, वामनपंडितांचें चरित्र साद्यंत लिहिण्याचा यत्न केलेला आहे. असें असतां, या निबंधांत नवीन तें काय असणार असें माझ्या प्रिय वाचकांस वाटेल, तर त्यांस असें नम्रभावानें कळवितों कीं, 'पिंडे पिंडे मतिर्भिन्ना' या न्यायानें प्रत्येकाचे दृष्टीनें कोणत्याही विषयाचा विचार निरनिराळ्या दिशेनें होत असतो. तर या अल्प निबंधांत तसें कांहीं असेल, तर त्यांनीं तें पहावें; ह्मणून गेल्या सहा महिन्यांत वामनपंडितांशीं-ह्मणजे त्यांच्या काव्यात्म्याशीं—जो परिचय मला प्रसंगवशात् घडला, त्याचें दिग्दर्शन येथें करण्याचें मी योजिलें आहे.

आतां, प्रस्तुत विषयांत कोणकोणते प्रश्नांचा उलगडा करावयाचा आहे, तें आपण पाहूं. ते प्रश्न येणेंप्रमाणें:—

( १ ) वामनपंडित हे जगन्नाथराय यासारखे होते काय ?

( २ ) वामनपंडित हे रघुनाथपंडिताप्रमाणें होते काय ?

( ३ ) वामनपंडितांचें डॉ० जान्सनशीं साम्य होतें काय ?

( ४ ) वामनपंडित हे ड्रायडन्तुल्य होते काय ?

( ५ ) वामनपंडितांनीं संस्कृतांतला नाटकाचा प्रकार मराठींत कां आणला नाहीं ?

( ६ ) वामनपंडिताप्रमाणें, अलीकडील कवींनीं कवितेच्या नवीन शाखा स्थापाव्या काय ?

( ७ ) वामनपंडितांनीं आपलें पांडित्य कशांत प्रकट केलें आहे?

( ८ ) श्रीसमर्थ हे वामनपंडितांचे गुरु होते काय?

( १ ) पहिला प्रश्न वामन पंडित हे जगन्नाथरायासारखे होते काय हा होय. पंडितराय यासारखे वामन पंडित अप्रतिम विद्वान् कवि होते. पंडितरायांनीं दिल्लीदरबारीं जशी आपल्या विद्याधनाचे जोरावर छाप बसविली होती, तशी वामन पंडितांनीं काशी ह्मणजे विद्येचें माहेरघर तेथूनच अजिंक्यपत्रें घेण्यास सुरवात केली होती. दोघांचे वेळीं विद्वानांचें दुर्भिक्ष होतें व एकानें असें ह्मटलें कीं,

‘ नखानां पांडित्यं प्रकटयतु कस्मिन् मृगपतिः ’

तर तें दुसऱ्यास अगदीं बरोबर पटणार. पहिल्याच्या ‘ रसगंगाधरा ’ सारख्या अलंकारशास्त्रावरील ग्रंथाची पारख करण्यास जसें त्यावेळीं कोणी नव्हतें, तसें दुसऱ्याच्या ‘ यथार्थदीपिके ’ सारख्या तत्वज्ञानपर ग्रंथाची किंमत जाणणारें त्यावेळीं कोणी नव्हतें. असें जरी आहे, तरी एकास ‘ नवनीतकोमलांगी लवंगी ’ समागमांत निरंतर राहून पाठीमागून अनुताप होतो व गंगातीरीं ‘ गंगालहरी ’ ह्मणून विष्णुपद प्राप्त होतें; पण दुसऱ्यास द्वैताद्वैताची मानगड सर्व जन्मभर पुरविते. एवढेंच नव्हे, तर तो आपल्या प्रियपत्नीसही

‘ वळख तूं तुज टाकुनि मीपणा ! ’

ही ‘ प्रियसुधा ’ ह्मणण्यास शिकवितो! एक पक्का आरामवादी ( Epicurean ), तर दुसरा पक्का अल्पेच्छावादी [ Stoic ]! जर दुसरा, सौदे या इंग्रजी कवीप्रमाणें, पहिल्यास असें ह्मणाला असता कीं—

( गीति )

“ अविचारी तरुण जनीं माझें तारुण्य छान शोभावें,
ह्मणुनी रंगेल अशा तरुणांमध्यें गभीरसें व्हावें!
तेणें वृद्धपणीं मी आनंदानें सदाचि नांदावें
हेमंतांतिल हिरव्या झाडी वृक्षासमान वय जावें!

तर तें त्यास कितपत रुचलें असतें, याची वानवाच आहे.

( २ ) दुसरा प्रश्न असा कीं, वामनपंडित हे रघुनाथपंडिताप्रमाणें होते काय? मराठी वाङ्मयांत कवि असून 'पंडित' पदधारी असे कायते दोघेच; ही गोष्ट सर्व सुज्ञाण वाचकांस अवगत आहे. वामनपंडितांनीं भर्तृहरीचीं 'तीन शतकें' व पंडितरायांची 'गंगालहरी' असे ग्रंथ भाषांतरास निवडून काढले व त्यांत अप्रतिम यश संपादिलें; तद्वत् रघुनाथपंडितानीं 'नैषध काव्य' घेऊन, त्याचें मराठींत सुंदर भाषांतर केलें. इतकें करून दोघांची भाषाशैली, कालिदास व शेक्सपीयर यांच्या भाषासरणीप्रमाणें सरळ, साधी व सुंदर आहे. तींत भवभूति व मिल्टन* याप्रमाणें किंवा मोरोपंत व जॉन्सन यांप्रमाणें प्राचीन

---

* प्रोफेसर पॅटिसन यांनीं आपल्या 'मिल्टनचरित्रां'त आपल्या चरित्रनायकावरील लौकिक आक्षेप कितपत यथायोग्य आहे त्याचें असें विवेचन केलें आहे:—

" One drawback there was attendant upon the style chosen by Milton, *viz.* that it narrowly limited the circle of his readers. All words are addressed to those who understand them... Confining ourselves to that small portion of our millions which we speak of as the educated classes, that is, those whose schooling is carried on beyond fourteen years of age, it will be found that only a small fraction of the men, and a still smaller fraction of the women fully apprehend the meaning of the words. This is the case with what is written in the ordinary language of books. When we pass from a style in which words have only their simple signification to a style of which the effect depends on the suggestion of collateral associations, we leave behind the majority even of those few. This is what is meant by the standing charge against Milton—that *he is too learned* ... ... Hence, we cannot be wrong in asserting that 'Paradise Lost' has been more admired than read. We shall prefer to read the fashionable novelist of each season as it passes, but we shall choose to be represented at the international congress of world poets by Shakespeare and Milton—Shakespeare first and next Milton.

—*Prof. Pattison's " Milton " Chapter XVII.*

भाषेतील शब्दपद्धति प्राकृत काव्यांत घालून ' गौडी ' रचना करण्याचा यत्न दिसत नाहीं. सारांश, दोघे §वामनपंडित व रघुनाथपंडित हे सुलभभाषावादी होते.

( ३ ) तिसरा प्रश्न हा कीं, वामनपंडितांचें डॉ. जॉन्सनशीं साम्य होतें काय. एकास ' पंडित ' व दुसऱ्यास तत्समान ' डॉक्टर ' अशी पदवी होती. शिवाय, दोघेहि उत्तम कवि होते. दोघांचा स्वभाव अगदीं निस्पृह व सरळ होता. एकानें आपल्या तत्वज्ञानास ' यथार्थ ' करून सोडिलें, तर दुसऱ्यानें आपल्या भाषेस कोशाचें बंधन तयार केलें! दोघांस कीर्तिमंदिरासारख्या उच्च स्थलाप्रत चढून जाण्यास दुसऱ्या कोणाचा आश्रय किंवा उत्तेजन नव्हतें. असल्यास, तें घरांतलेंच होतें. पंडितांची प्रीति आपली पत्नी गिरावाई हिजवर फार होती; तशीच गिरावाई हिची आपल्या पतीवरहि होती. एवढेंच नाहीं, तर ती आपल्या पतीच्या अलौकिक विद्वत्तेचें कौतुक करी. त्यामुळें, ज्ञानेश्वरी, चित्सदानंदलहरी, इत्यादि ग्रंथांच्या भक्तांनीं त्यांच्या ' यथार्थदीपिके ' सारख्या जगन्मान्य ग्रंथास हुसकून दिलें, तरी त्यांस त्याचें कांहीं वाटलें नाहीं! जॉन्सनची गोष्ट पण अशीच. इंग्रेजी भाषेच्या कोशासारखें अवाढव्य काम एकटा सतत सात वर्षें करीत होता; तो केवळ आपल्या आवडत्या बायकोच्या उत्तेजनानेंच—तिला त्याच्या विद्वत्तेचें व भाषाचातुर्याचें मोठें कौतुक वाटत असे; व जॉन्सनला तिची रसिकता व पतिनिष्ठा पाहून, अत्यंत समाधान होत असे.* राजाश्रय नसला, तरी पतकरला. लोकाश्रय नसला, तरी पतकरला; पण ' गृहा 'श्रय हवा, असें मोठमोठाल्या विद्वानांनादेखील वाटतें व तसा गृहाश्रय विरळा, म्हणून भवभूति चोपून असें म्हणतो कीं :—

§ रा० हसासारख्या मान्य निबंधकारांसहि या गोष्टीचें अत्यंत कौतुक वाटतें.

* " All his affection had been concentrated on her. He had niether brother nor sister, neither son nor daughter. To him she was as the Gunnings, and witty as Lady Mary. Her opinion of his writings was more important to him than the voice of the pit of Drury Lane Theatre or the judgment of the Monthly Review !"

— Macaulay.

सर्वथा व्यवहर्तव्यं कुतो ह्यवचनीयता ।
यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः ॥ *

व एका मान्य इंग्रजी कवीसहि असें ह्मणण्यास जागा झाली आहे:—

( द्रुतविलंबित. )

" नर असे प्रिय हा निजबांधवां!
गरिब हीन ह्मणे तरि मानवां
उपकृती घडली, तरि ऐकवा!
नरमनींचिहि हौसचि पूरवा!

( ४ ) वामन पंडित हे ड्रायडनतुल्य होते काय? हा चौथा प्रश्न होय. जसें ड्रायडन यानें रोमन कवींपासून आपल्या आवेशयुक्त कवितेचें वळण उचलिलेलें आहे, तसें वामनपंडितांनीं प्राचीन संस्कृत कवींपासून आपल्या उदात्त कवितेचें वळण उचलिलेलें आहे, व ह्मणूनच त्यास महीपतिबोवांनीं मराठीचा 'व्यास' ह्मटलें आहे. संस्कृत तत्वज्ञानाचें पर्यालोचन करून, तें स्वदेशबांधवांस ' यथार्थ ' देण्याची जंगी खटपट प्रथमतः अशी यांनींच केली. तशीच संस्कृत भाषेंतील भव्य व रम्य भाषाशैली यांनींच मराठींत प्रथमतः आणिली.* आतां, असें करतांना, त्यांच्या

---

* सर्वप्रकारें करण्यासारखें तें अवश्य करावें. लोक नांवें ठेवीत नाहींत असें काय आहे? कारण, लोकांचा हा स्वभावच आहे कीं, स्त्री व वाणी यासंबंधीं उपहास खुशाल करावा. '

* याचा मासला त्यांच्या भक्तास पदोपदीं आढळणार आहे. मला त्यांच्या ' नामसुधे 'तील पहिल्याच श्लोकानें संस्कृतकाव्योपवनांत एकदम शिरल्याचा भास होतो. तो हाः—

नसे ठावा ब्रह्मा, न शिव अथवा श्रीपतिहरि ।
हरी जो तापातें, उचलुनि कृपा-सिंधु-लहरी ॥
हरी वाटे काळाकरिस! विपती मृत्यु-भुजगा ।
जगाचा तूं ऐसा धणि कवण तो पाव मज गा ॥

कालिदासाच्या कोणत्याही नांदीची बरोबरी करणारा हा श्लोक नव्हे असें कोणता रसज्ञ वाचक ह्मणणार नाहीं बरें?

कृतीत कोठें कोठें अल्पस्वल्प छंदःशास्त्रदृष्टीनें दोष, संस्कारहीनत्वाचे दोष, संस्कृत–प्राकृत–मिश्रसमासाचे दोष, व संस्कृतविद्येच्या पुनरुज्जीवन काळचा बीभत्सपणाही कोठें आढळतो आहे. एतद्व्यतिरिक्त, 'महाराष्ट्र–सारस्वत' या सुंदर निबंधाचे लेखक रा० विनायक लक्ष्मण भावे बी. एस्. सी. त्यांस दूषण देतात. ते ह्मणतात. "यांच्या-सारख्या जाड्या कवीनें व विद्वान् पंडितानें असल्या बाणरच्या प्रकारांत लवमात्र तरी आनंद मानावा हें जरा विपरीत दिसतें. तसेंच, व्याकरणनियमाकडे जरा दुर्लक्ष आणि शब्दांची प्रासयमकासाठीं ओढाताण हेंही याच्यासारख्यास शोभत नाहीं." (पृ. ९८ पहा). पण, माझ्या अल्प मतीस हें प्रशस्त दिसत नाहीं. मला वाटतें कीं, मनुष्य दोषार्ह आहे, व जितकी जितकी त्याची कृति अवाढव्य असेल तितक्या तितक्या चुक्या तींत राहण्याचा संभव अधिक असतो. किल्ल्याच्या मोठेपणाप्रमाणें त्यास शत्रूकडून मारा बसण्याचीं ठिकाणेंहि अधिक असण्याचा संभव असतो. या चुक्या तत्कालीन ज्ञानस्थिती-कडे पाहून क्षम्य किंवा अक्षम्य ठरविणें रास्त आहे. ह्यास प्रत्यंतर ड्रायडन कवीचेंच आहे. त्याचा ग्रंथविस्तार अपरंपार असल्यामुळें, त्यांतहि अशीं अशुद्ध स्थळें राहणें स्वाभाविक आहे.†

आतां उत्क्रान्तितत्वा ( Theory of Evolution ) प्रमाणें, ड्रायड नचा शिष्य पोप यानें जशी इंग्रजी कवितेची भाषाशुद्धि केली व तीस

---

† यासंबंधीं प्रोफेसर केक आपल्या 'इंग्रेजी वाङ्मय' नामक नामांकित ग्रंथांत ड्रायडनविषयीं असें ह्मणतात :—

"Pope, no doubt, wrote with a care and eleboration that were unknown to Dryden; against whom, indeed, it is a reproach made by his pupil that, copious as he was, he

—'wanted or forgot

The last and greatest art—the art to blot!'

—*Prof. Craik's "Mannual of English Literature"*

*( Ed 11th p. 356. )*

अधिक मोहकपणा आणिला, तसा, वामनपंडितांचा शिष्य मोरोपंत यांनें मराठी कवितेची भाषा अधिक शुद्ध व मोहक केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. डा० भांडारकरांच्या संस्कृत मार्गदर्शिकेहून प्रोफेसर गोळे यांची नवीन संस्कृतपाठावली संस्कृताचें अध्ययनास अधिक सुगम झाली असल्यास, तेवढ्यानें डॉ. भांडारकरांना अग्रतिलक लावण्याचा मान यत्किंचित्‌हि कमी होत नाहीं; तद्वत् मोरोपंताची कविता अधिक शुद्ध व मोहक झाली म्हणून वामनपंडिताच्या अग्रेसरत्वास कलंक लावण्याचा प्रयत्न इष्ट नाहीं.

( ५ ) पांचवा प्रश्न म्हणजे वामनपंडितांनीं संस्कृतांतला नाटकाचा प्रकार मराठींत कां आणला नाहीं? हा होय. ड्रायडननें रोमन कवितेनें वळण आल्या कवितेस लावून दिलें व फ्रेंच नाट्यशास्त्राचे धर्तीवर इंग्रेजींत नाटकें बसविलीं. अलीकडील परशुरामपंत तात्या गोडबोले यासारख्या शास्त्रीकवींनींहि संस्कृत नाटकांच्या प्रतिकृति मराठींत आणल्या आहेत. मग वामनपंडितासारख्या संस्कृतज्ञ मराठी कवीस हें काम कां पसंत पडलें नाहीं? संस्कृत नाटकादि प्रकारानीं जनमनोरंजनाचा नवीन मार्ग खुला केल्याचें श्रेय त्यांस तशानें मिळालें नसतें काय? मराठी वाङ्मयांतील केवढी मोठी तरी उणीव भरून काढण्याचें पुण्य त्यांस लागलें नसतें काय? कालिदासादि महाकवींची मनुष्यस्वभावमीमांसा व सृष्टिसौंदर्यवर्णन यांचा परिचय प्राकृत जनांस करून देऊन त्यांच्या ‘ संसारसुखां ’त भर घालण्याचा परोपकार त्यांचे हातून घडला नसता काय? अशा प्रश्नांस उत्तर ‘ हो ’ असें सहज येणार. पण जरा विचार केला, तर तें कोणास पटणार नाहीं. कारण, तो काळ *

---

* त्यावेळची महाराष्ट्राची स्थिति ‘ माधवचंपू ’ कारांनीं त्रिभुवन मौलिमाणिक्यभूत वाराणसीप्रमाणें होती.

धर्मवर्त्मपरिरक्षणदक्षाः
सादरं परहिताहितचित्ताः ।
यत्र सन्त्यमितधामकसन्तः
सर्वतंत्रपरिचिंतितवृत्ताः ॥

तृतीयोच्छ्वासः श्लोकः ३४.

धर्मजागृति व राष्ट्रोदय यांचा असल्यामुळें, जनमनोवृत्तीकडे लक्ष्य देऊन वामनपंडितांसारख्यांनीं आपल्या कवितेचे विषय व्यासवाल्मीकीसारख्या पुराण संस्कृत कवींपासूनच उचलले; व हें जें त्या कविवर्यांनीं केलें, तें यथायोग्य होतें. तसें त्यांनीं न केलें असतें, तर राष्ट्रीय मनोवृत्ति भलतीकडेच बहकली असती; व राष्ट्रास कदाचित् असें ह्मणण्याची पाळी आली असती!

> कोयं निपतितस्तन्व्याः कटाक्षविशिखो मयि ।
> कलेवरमभित्त्वायत्परं मर्मैव कृन्तति ॥

व जें धर्मयुद्धाचें वारें सुटलें होतें, तें थंड होऊन वीररसप्रधान नाटकाऐवजीं कदाचित् सारें शृंगाररसप्रधानच नाटक झालें असतें! पण तें टळलें हें आपलें भाग्य!

( ६ ) सहावा प्रश्न असा कीं, वामनपंडिताप्रमाणें अलीकडील कवींनीं कवितेच्या नवीन शाखा काढू नयेत काय.? या प्रश्नासंबंधीं दोन मतें आहेत. *वामनपंडितानीं नामदेव, तुकाराम, रामदास, इत्यादिकांची पूर्वींची साधी व रसाळ भाषापद्धति अजीबात न सोडतां प्रौढ संस्कृत भाषापद्धति उचलली हें ठीक केलें; कारण अशानें भाषोन्नति झाली. सबब, आधुनिक कवींनीं वामनपंडितादिकांचा कित्ता गिरवावा असें कांहीं जणाचें मत आहे. † दुसऱ्यांचें असें मत आहे कीं, फार ल्याटीन शब्द न वापरतां, शुद्ध अँग्लोस्याक्सन् शब्दांनींच भरलेल्या काव्याची गोडी जशी आजकाल इंग्रजींत आहे, तशी आपल्याकडे शुद्ध मराठी शब्द होतां होईल तेवढे वापरून, साध्या व सरळ कवितेविषयीं गोडी उत्पन्न करणें अधिक श्रेयस्कर आहे. कारण, ‘ वाचमर्थोनुधावति ’ असें न झालें

---

* उदाहरणार्थ, नामदेवाची ‘ बालक्रीडा ’ व पंडितांची ‘ वनसुधा ’ किंवा ‘ वेणुसुधा ’ ताडून पाहिली कीं ही गोष्ट तेव्हांच लक्षांत येते.

† निबंधमाला भाग २ रा पृ. ८५९; भारतीय साम्राज्य, पुस्तक ११, पृ. ३७६; व न्या. रानडे यांचा ‘ मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि ’ ( The growth of the Marathi Litreture ) पहा.

तर त्यापासून लोकरंजन तें कसें होणार ? § सध्याच्या लोकस्थितीकडे पाहिलें तर ज्ञानाची नुसती गोडी लावणारी भाषापद्धति अगोदर पाहिजे; मग विचार करण्यास लावणारी भाषापद्धति हवी; व तदनुरूप कुंटे, कीर्तीकर, पाळंदे, चिपळूणकर, जुन्नेकर, ओक, खरे, कानिटकर, मोगरे, लेंभे, भांडारे, माधवानुज, रमाधव, केशवसुत, इत्यादि आधुनिक कवींची भाषाशैली सरळ, सुगम व सुंदर आहे, व त्यांनीं इंग्रेजी कवींचें अनुकरण करून त्याप्रमाणें विषयवैचित्र्यहि आणण्याची खटपट केली आहे.

बरें, अशा विषयवैचित्र्यानें जनसमूह भलतीकडे वाहवेल अशांतला भाग नाहीं. उलट त्याचें सांप्रतचें विद्येसंबंधीं औदासिन्य जाऊन त्यास नवीन आल्हाद वाटेल. कारण, विषयवैचित्र्य हा रमणीयतेचा आत्माच होय. आतां एवढें बरीक खरें कीं, नुसत्या इंग्रेजी कवींवर भर देऊन चालणार नाहीं; आपल्या जुन्या कवींच्या ग्रंथांचें अध्ययन चालू ठेवणें अवश्य आहे. कारण, पाया शुद्ध असल्याशिवाय वरची इमारत भक्कम होणें अशक्य आहे!

( ७ ) सातवा प्रश्न असा कीं, वामनपंडितांनीं आपलें पांडित्य कशांत प्रकट केलें आहे. हा प्रश्न वेदान्ताचा अभ्यास करणाऱ्यास बराच चित्तवेधक आहे. वामनपंडितांनीं शास्त्राध्ययन करून जो विषय हस्तगत नव्हे, करतलामलकवत करून ठेविला होता, त्याचें प्रतिबिंब

§ ‘ मोल्ला ’ ही आंध्र कवयित्री ह्मणे कीं मध तोंडांत टाकल्यावर ज्याप्रमाणें त्याची गोडी समजते, त्याप्रमाणें काव्य वाचल्याबरोबर जर त्यांतला अर्थ समजला नाहीं, तर तें वाचणें ह्मणजे मुक्या बहिऱ्या लोकांचें संभाषणच होय!!”

‘ कूचिमंचि तिम्मकवि ’ यानें आपल्या ‘ शुद्धांध्ररामायणां ’त खरोखर ‘ शुद्धांध्र काव्य ’ बनविलें व हें त्याच्या विद्वत्तेचें फल होय; कारण, असल्या कवीस शुद्धांध्रकोश व तद्भवाचे नियम इत्यादिकांची चांगलीच माहिती पाहिजे. असलीं काव्यें तेलंगींत १०।१२च आहेत.

— के. व्ही. लक्ष्मराव [ एम्. ए. ] कृत ‘ आंध्रवाङ्मय ’ ( विविधज्ञानविस्तार वर्ष ३२, अंक ३ ).

त्यांच्या कृतींत पडल्याशिवाय कसें राहील? तें जागोजाग अचानक दिसून येतें. व वाचकांस कथारंगांत तें अचुक दृष्टीस पडतांच, मोठा विस्मय वाटतो. याचा अनुभव थोडक्यांत येथें देण्याकरितां चार मासलेवाईक कविता दिल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. त्या येणेंप्रमाणें:—

[ १ ] शर्वादि सर्व तुझि इच्छिति पाय-धूळी!
तूझा प्रसाद नव्हता मज याच काळीं,
जन्मां शतांत मरणें स्मरणें मुकुंदा
अंतीं तुझ्याच वरणें चरणारविंदा! रुक्मिणी-पत्रिका.

रुक्मिणीसारख्या नववधूची मजल वेदान्ततत्व उलगडण्यापर्यंत जावी हें मोठें नवल आहे. तशांत ' जन्ममरणासारखा उत्क्रांतिपर सिद्धांत ' ( Transmigration of soul ) पत्रांत सफाईनें गोवून देण्याची शक्कल त्या लहानशा डोक्यांत यावी याचें रसिक वाचकांस आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. !

[ २ ] ' चिच्छक्तिला सतत चिन्मय जेंवि योग,
श्रीरुक्मिणीस न कधीं हरिसी वियोग !
—रुक्मिणीविलास.

ही कवीची वेदान्ती उपमा किती चमत्कृतिजनक आहे ! हीच सुंदर कल्पनालहरी त्यांच्या मनांत अनेक प्रसंगीं घोळत आहे असें पुढील अवतरणावरून स्पष्ट दिसतें—

[ ३ ] येणार मागुति चतुर्दश वत्सरांतीं
राहो वनांत तितुके दिन आणि रातीं!
आत्माच तो तुज वियोग तयासि नाहीं !
येऊनि हे करिल जे तव कामना ही!
——भरतभाव.

पित्याच्या आज्ञेप्रमाणें राम वनवासास जात असतां, भरत त्यास तसें करूं नको ह्मणून विनवितो. त्यावर, वसिष्ठमुनि त्याची समजूत घालतां

घालतां पटकन् एका अमोल वेदान्ती तत्वावर तें काम तडीस नेतात. तें कोणतें ? तर, जीवात्मापरमात्मा यांचें ऐक्य. आतां, हें ऐक्य अगोदरच भरतासारख्या सुशिक्षित राजपुत्रास कळलें नाहीं! त्याचें कारण एवढेंच कीं, तो मोहांध झाला होता. ' नृसिंहावतारांत, प्रल्हादाचे तोंडून कविवरानें असेंच वदविलें आहे—

( ४ ) स्वपर ह्मणुनि ज्याची मोहितें स्वैर माया,
स्व-वश करि तिला जो षड्गुणत्वीं रमाया,
नमिन मि भगवंता जो तुह्मां आकळेना !
स्व-पर-कुमति-भेदें तोचि आत्मा कळेना ! *

( ५ ) लोपामुद्रेसही जीवात्मा व परमात्मा यांचा स्नेह कसा शक्य-आहे ह्याचें गूढ पडलेलें आहे, व तें ती सीतेस उकलण्यास सांगत आहे. तेव्हां सीता ह्मणते :—

---

* जेव्हां परमेश्वराप्रमाणें जीवात्मा निरिच्छ होऊन, त्याचे ठायीं तल्लीन होतो, तेव्हां जो आनंद होतो तो अवर्णनीय आहे! अशा वेदान्तदृष्टीनें एका आंग्ल कवीनें असें ह्मटलें आहे:—

O, not a joy or blessing
With this can we compare
The power He hath given us
To pour our hearts in prayer !

या ओळीशीं कांहींसा समानार्थ असा नामदेवांचा लोकप्रिय अभंग असा आहे-

अवघी चित्त-वृत्ती एकवटुनी जेणें ॥
अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥
अवघें सूख एक तयासी पावलें ॥
अवघें सफल झालें जन्म त्याचें ॥ २ ॥
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें ॥
जयाचें विठ्ठलीं मन जडलें ॥ ३ ॥
नित्य विठ्ठल-नाम गर्जति सप्रेम ॥
अवघे नित्य-नेम झाले त्याचे ॥ ४ ॥

'' विरक्त, बाई, रघुराज साचा ।
भोक्ता नव्हे राजस-तामसांचा ॥
न या बहू कल्पतरूपमा ते ।
दे सोहळे कल्पित-रूप मातें ॥
जसि बहु रवितप्ता साउली गोड वाटे ।
तसि वनिं पति-लाडें मानितें कोड वाटे ॥
घरिंहुनि मज बाई सोहळे काननाचे ।
सजळ जळदसंगें मोर वो कां न नाचे ?

लोपामुद्रेस जशी परमविरक्त रघुराजाच्या संसारसुखाविषयीं शंका आली, तशी वामनपंडितासारख्या महावेदान्ती गृहस्थाच्या गृहस्थितीविषयीं आपणास शंका येणें स्वाभाविक आहे, व तिचें समाधान कविवरानें सदरहू लोपामुद्रासंवादांत परोक्षरीतीनें व प्रत्यक्ष रीतीनें ' प्रियसुधा ' या काव्यांतही केलें आहे.

वामनपंडितांनीं जागोजाग असा वेदान्त प्रकट करून शिवाय त्यांवर स्वतंत्र प्रकरणें व ' यथार्थदीपिका ' यासारखी तत्वज्ञानाची हौस पुरविणारी अजरामर रचनाही केली आहे. तसेंच, लोकव्यवहारनिरीक्षणांत असामान्य पांडित्य प्रकट केलें आहे, असें त्यांच्या भामाविलासादि आख्यानांवरून व्यक्त होतें. अत्रिऋषीच्या आश्रमास श्रीरामचंद्र आले, तेव्हां अनुसूयेनें सीतेविषयीं काढलेले सहजमनोहर प्रेमोद्गार असे आहेत :--

" ' वेणी फणी करिल वो तुज कोण वाटे ।
वाईट हें मज ' ह्मणे ' मुलि फार वाटे ॥
म्लानता कधिं न यो सुमनातें ।
क्लेश केश न करोत मनातें ॥
गंध आर्द्रचि असो ' अनसूया ।
दे असा वर न जीस असूया । "

भामाविलासांत भामेची समजूत कृष्णानें मोठ्या खुबीनें पाडिली आहे. तो तिला ह्मणतो :—

> " तुतें वृक्ष देणेंचि याला गिं आधीं ।
> फुलें नाशिला, जो तिला*होय आधीं ॥
> न जाणोनि केलें तुवां कष्ट भारी । "

रुक्मिणीविलासांत, रुक्मिणीस खिजवून, कृष्णानें तशाच हुशारीनें तिचा गर्व परिहार केला आहे. रुक्मिणी वाटेवर आल्यावर असें ह्मणते—

> राज्यादिकें टाकुनि निर्विकारी
> त्वदर्थ होतात असे भिकारी !
> राज्यांत दुःखें, सुख तूजमाजीं !
> ह्मणून तूं श्लाघ्य तया समाजीं !
> सुधा मानुनीयां पितो एक कांजी !
> सुधापानकर्ता शिवे त्यास कां जी ?
> तशी टाकुनी मी तुला भंगलाला,
> नृपांला तयां कां भजों वोंगळाला ?

'लोपामुद्रासंवादांत, लोपामुद्रेसारख्या वयोवृद्ध ऋषिपत्नीस युक्तिवादांत कुंठित करण्याचें काम सीतेसारख्या तरुण राजघराण्यांतील स्त्रियेकडून फार सुरेख वठलें आहे. तिचा तो चाणाक्षपणा कौतुक करण्यासारखा आहे—

> " ह्मणे लोपामुद्रा 'चुळभरि समुद्रा करि पती ! †
> तया या आयासेंकरुनि उतरे कां रघुपती ?'
> 'द्विजाच्या, हो, मुत्रा शिवति अपवित्रा न कपि ते!'
> ह्मणे सीता ' नाहीं-तरि सगिरि सप्ताब्धिहि पिते ! ' "

'भरतभावां'त, भरतानें रामास अयोध्येस परत येण्याविषयीं विनविलें असतां, वामनपंडितांनीं रामाच्या मनाची स्थिति रामाचेच तोंडून किती बहारीनें वर्णन करविलेली आहे. राम ह्मणतो—

---

* रुक्मिणीला. † अगस्त्यमुनि.

"* आज्ञा पित्याची मज मोडवेना!
वत्सा, तुझी गोष्टहि तोडवेना!
घालूं नको, बा, मज संकटांत!
नको पडों या सहसा हटांत!"

'वामनचरित्रां'त बळीराजानें आपलें वचन राखिलें व 'वेश्याङ्गनेव नृपनीतिरनेकरूपा' हें भर्तृहरि राजाचें वचन अजीबात खोटें ठरविलें. ही त्याची सत्यनिष्ठा पाहून देव प्रसन्न होऊन त्यास मुक्ति मिळाली, अशी कथा सांगतां सांगतां वामनपंडितांनीं एक शेरा ठोकला आहे, नव्हे हुकमाचा पत्ताच झाडला आहे, तो हा—

'प्रेमामृताचा हरि हा भुकेला!'

वामनपंडितांनीं वेदान्त व मनुष्यस्वभाव यांत जसें पांडित्य दाखविलें आहे, तसें सृष्टिसौंदर्यांतहि दाखविलें आहे. 'वनसुधा' व 'वेणुसुधा' या आख्यानांत वनशोभा उत्तम वर्णिलेली आहे व त्यांत बालस्वभावाचीहि लकेर मारते. एवढेंच नव्हे, तर या दिशेनें अधिक प्रयत्न झाला असता, तर ग्रामदशा (Country Life) हा विषय, इंग्रेजी कवि,

* या एका श्लोकानें माझें मन अत्यंत सद्गदित होऊन मला थेट 'भट्टिकाव्या'ची आठवण झाली. त्यांत त्या कविवरानें रामाचे तोंडून असेच प्रेमळ व धीरोदात्त उद्गार वदविले आहेत ते असे—

अरण्ययाने सुकरे पिता मां
प्रायुङ्क्त राज्ये बत दुष्करे त्वाम् ।
मा मा शुचं वीर भरं वहासुम्
आभाषि रामेण वचः कनीयान् ॥

× × ×

अस्माकमुक्तं बहु मंन्यसे चेद्
यदीशिषे त्वं न मयि स्थिते च ।
जिन्हेष्यतिष्ठन्यदि तातवाक्ये
जहीहि शंकां ! व्रज ! शाधि पृथ्वीम् ॥

भट्टिकाव्यम् ३- ५१, ५३.

तेंत जसा अलीकडे आला आहे, तसा मराठी कवितेंत तो अलीकडला झाला नसता. ह्मणजे राजेरजवाडे, त्यांचे धर्मगुरु, त्यांचें प्रधानमंडळ, त्यांचे घरचेंदारचें वर्तन, याशिवाय शेतकरी, साळी, माळी, कोळी, इत्यादि गरीब मागासलेल्या लोकांची बालबोध राहणी काव्यदृष्टीनें आपणास पाहण्यास सांपडली असती. पण, इंग्रजी विद्येच्या अलभ्य लाभामुळें अलीकडील कवींपैकीं पुष्कळांस ही उणीव वाटत असून, त्यांनीं ती भरून काढण्यासाठीं ‘ शेतकरी ’ यासारखीं प्रेमळ नूतन काव्यें ‘ काव्यरत्नावळीं ’ तून प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न चालविला आहे. हें अभिनंदनीय आहे.

( ८ ) आठवा प्रश्न असा आहे कीं, श्रीसमर्थ हे वामन पंडिताचे गुरु होते काय ? रामदासस्वामींनीं आपल्या अपूर्व देशाभिमानानें वामन पंडितांस मातृभाषेची सेवा करण्यास लाविलें ; एवढ्यावरून जसें त्यानीं आपणांस पंडितांकडून गुरु ह्मणवून घेतलें, तसें त्यांच्या द्वैतांतून त्यांस अद्वैती बनविण्यांतही ते त्यांचे गुरु होते. उपनिषदाच्या अर्थान्वयें, ब्रह्मात्म्यैक्याविषयीं सच्चिदानंद ब्रह्मलक्षण आत्म्याकडे कसें लागतें ? सत् पदानें आत्मा ब्रह्मासारखा कालत्रयीं विद्यमान आहे. चित् पदानें तो तसाच ज्ञानरूपहि आहे असें पंडितांच्या अनुभवास आलें. पण या दुःखमय संसारांत तो निरंतर आनंदरूप कसा असावा ? या शंकेचे निराकरणार्थ ‘ साधुसंताची कामधेनु ’ जी पंढरी, तेथें पंडित आषाढी एकादशीचे उत्सवास ( शके १५७१ त ) गेले. तेथेंहि त्यांची निराशा झाली. ‘ एवं संस्कृत शास्त्रज्ञ प्राकृतग्रंथवित्तम.

> अद्वैत तत्व बोलाया सेविले म्यां बहुत ते ।
> वर्षशतचिया पूर्वीं प्राकृत ग्रंथकार जे ।
> त्यक्तदेही जे यथोक्त न तैसे ज्ञानि प्रस्तुती !
>
> —अनुभूतिलेश ( वामनी ग्रंथ, धा. ४ पृ. २६१.

या [illegible] ल्यांत वामन पंडित हे रामदासस्वामी ह्मणजे शार्मण्यदेशीय हेगेलसारख्या अप्रतिम तत्ववेत्यासही ओढतात असें दिसतें. व

चाकळ, परळी व रामवळी येथें झालेल्या वादांत तर वामनी ग्रंथ संपादक ह्मणतात कीं रामदासस्वामी हरले व 'शेषं कोपेन पूरयेत्' याप्रमाणें त्यांचें वर्तन होतें. व रामदासस्वामीचे अनुयायी * पंडितांस 'देहोऽहम्' इत्यादि कोटींतले आणि ह्मणून अद्वैत मत ग्रहण करण्यास अनधिकारी असें दाखविण्याचा हेतु मनांत धरून, रामदासस्वामी वामन पंडितांस मुद्दाम तसें टाकून बोलले असावेत, कारण महात्मेदेखील आपल्या भावी शिष्याचा अधिकार कितपत आहे हें पाहण्याकरितां, कधीं कधीं मुद्दाम अशी मौज करितात. §

दुसरें असें कीं, वेदान्त किंवा अद्वैत मत ह्मणजे कांहीं थोतांड नाहीं; नुसतें तर्कज्ञान नाहीं; पण अनुभवानें व साक्षात्कारानें ठरलेल्या गोष्टी आहेत. हा हुज्जत घालण्याचा विषय नाहीं. तो ज्याचा त्यास विचारानें उमजण्यासारखा आहे. तो भावगम्य अतएव गूढ † आहे. अशा

---

* माझे सन्माननीय, परिचयांतले गृहस्थ, रा. गोविंदराव नेरूरकर यांसारखे.

§ एकदा, एका गांवाजवळ एक महात्मा आला होता. तो १५ वर्षांचा होता. हें ऐकून तेथील एक वृद्ध पंडित त्याचे दर्शनार्थ गेला. अमुक अमुक गृहस्थ आपले दर्शनार्थ येत आहे असें अंतर्ज्ञानानें जाणून, तो कितपत अधिकारी आहे हें पाहण्याकरतां, त्या महात्म्यानें त्यास असें ह्मटलें

'आवो, बेटा! आवो!'

हे शब्द अत्यंत उद्धटपणाचे आहेत असें समजून त्या वयोवृद्ध पंडिताची तळव्याची आग मस्तकास गेली व तो आल्या वाटेनें तसाच चरफडत चालता झाला!

† याचे स्पष्टीकरणार्थ एक गोष्ट अशी सांगतात.

एकदां, एका तीर्थस्थलीं आल्यागेल्या यात्रेकरूस शिधा घेऊन शिजवून घालणारी बाई राहत असे. ती मोठी वेदान्ती होती. कोणी जर विचारिलें कीं बाई, माझ्या पिठाच्या काय साऱ्या ३ च भाकऱ्या झाल्या, तर ती ह्मणे "बोवा, चार झाल्या. पण ती एक भाकरी तुह्मीं खाल्ली काय आणि मी खाल्ली काय एकच. कारण, 'सर्वं ब्रह्मेदम्' असें आहे ना?" भोळे यात्रेकरू यावर जात. पण तिला एक सवाई वेदान्ती पुढें भेटला. त्यानें तिचा नेहमींचा तो कोटिक्रम ऐकून चुलींतलें लांकूड घेऊन तिच्या पाठींत घातलें! व ह्मणाला, 'सर्वं ब्रह्मेदम्'!

दृष्टीनें पाहिलें ह्मणजे वामन पंडितांचे शंकेचें समाधान रामदासस्वामी-च्याच या अलौकिक श्लोकांत आहे.

" जगीं सर्वसूखी असा कोण आहे ?
विचारी मना तूंचि शोधूनि पाहे ! "

जगांत सर्व सुखी असा जर कोणी असेल तर तो विचारी पुरुष होय. असें नीट विचारांतीं कोणासही दिसून येईल. असे महात्मे होऊन गेले आहेत व सध्यांहि आहेत. त्यांचें मुख सदा फुललेल्या कमळाप्रमाणें असतें व त्यांचें दर्शन पहाटेप्रमाणें सदा आनंददायक असतें. त्यांच्या दर्शनानें भक्तांची तहानभूक हरते व

' येति साधुसंत घरा तोचि दिवाळी दसरा। '

असें त्यांचे मनास खरोखर भासतें!

ही शंका पुढें त्यांची त्यांनाच, विचार करतां करतां दूर करतां आली. एके दिवशीं मध्वसंप्रदायाप्रमाणें, पंडित स्वयपाक करतेवेळीं सच्चिदानंदब्रह्मलक्षणाच्या विचारांत निमग्न असतां, इकडे भांडें चुलीवरून घसरलें. त्यामुळें गिराबाईस हसूं आलें. हें हास्य कानीं पडतांच, पंडितांनीं तिला कां हंसलीस ह्मणून विचारलें. तेव्हां ती ह्मणाली, तीन वेदांचा विचार अजून चालू आहे ह्मणून हसूं आलें. त्यावर पंडित ह्मणाले कीं, ' दुसरा कोणी असता, तर वंदनादि व्यवहार केला असता ! ' या गोष्टींत रामदासस्वामींचे बखरकार, स्वामींचे अंतर्ज्ञानानें गिराबाई-कडून पंडितांचें हंसूं करवितात. पण ' निगमसारां 'त पंडितांनीं आपणास एका सन्याशाचा हास्यध्वनि ऐकून साक्षात्कार झाला व

---

( मागील पृष्ठावरून )

' नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ' शस्त्रांनीं ब्रह्म तुटत नाहीं, विस्तवानें जळत नाहीं. ' तेव्हांपासून ती ताळ्यावर आली व तिनें तो आपमतलबी व विपरीत वेदान्त सोडला !

आपल्या शंकेचें समाधान झालें असें म्हटलें आहे. आतां, पंडिताचा हा संन्यासी ‘ साक्रेटिसाच्या दीमना ’ सारखीच कल्पनासृष्टि असावी असें वाटतें. यांत तथ्यांश एवढाच कीं, न्यूटनास किंवा केरोपंतास, उदाहरणें कित्येक दिवस डोक्यांत घोळतां घोळतां एकाएकीं सुटत असत. तसें प्रस्तुत प्रश्नाचा खल अहोरात्र चालू असतां, वामनपंडितास त्याचें समर्पक उत्तर गवसलें असेल. आतां ‘ आनंद ’ पदापासून काय बोध होतो तें आपण अंमळ पाहूं. ‘ पंचदशीग्रंथां ’ त आनंदाचीं पांच लक्षणें गणिलीं आहेत:

( १ ) आत्मानंद ( विषयसुखापासून पराङ्मुख होऊन, आत्मचिंतनानें होणारें सुख )

( २ ) ब्रह्मानंद ( जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्यापासून होणारें सुख.

( ३ ) विषयानंद.

( ४ ) विद्यानंद.

( ५ ) योगानंद ( योगाभ्यासांतला आनंद ).

आतां, ईश्वराचे किंवा ब्रह्माचे ठायीं आनंद कसा असणार तो पहा. प्रभातसमयीं, सूर्याचे सुवर्णकिरण क्षितिजावर येत आहेत न येत आहेत, तोंच सृष्टि जिकडे तिकडे आनंदमय भासते ती कां ? कारण, उगवता सूर्य तिला मातृवत् निरिच्छ व स्वार्थत्यागपर कर्तव्यकर्म करण्यास सांगतो. दुसरें असें कीं, अनंतप्रेमभाक् जो परमेश्वर त्याची सृष्टि ही काया असल्यामुळें, ती स्वतः ईश्वरी प्रेम प्रकट करीत असते. कारण, जो आत्मा शरीरांत आहे, त्यास तें चाळविल्याशिवाय राहत नाहीं ! असा हा वामनपंडितांस तसाच विवेकानंदादि आधुनिक प्राच्यपाश्चात्यविद्याविभूषित तत्ववेत्त्यासहि बराच घोळविणारा गूढ आनंदसिद्धान्त आहे.

असो. येथवर, वामनपंडितांसंबंधीं माझे मनांत आज कित्येक दिवस जें घोळत होतें, तें प्रिय वाचकांस सादर केलें आहे. त्यावरून, वामन-

पंडित हे जगन्नाथराय, रघुनाथपंडित, डॉ. जान्सन् व ड्रायडन् यांसारखे कसे होते; त्यांनीं मराठींत संस्कृत नाटकाचा प्रकार कां आणला नाहीं; त्यांच्याप्रमाणें अलीकडील कवींनीं कवितेच्या नवीन शाखा स्थापणें कसें इष्ट आहे; पंडितांनीं आपलें पांडित्य कशांत प्रकट केलें आहे; श्रीसमर्थ त्यांचे गुरू कसे होते; हें यथामति दाखविलें आहे. नित्य-व्यवसायानिमित्त पंडितांच्या काव्याचें अध्ययन करण्याचा जो सुयोग आला आहे, त्याचें हें अल्प फल आहे. शास्त्रीय विषय साधे, सोपे सरळ भाषेंत लिहिण्याची कला पंडितांनीं प्रथम प्रचलित केली व आपल्या अमोल विद्येचा लाभ लोकांस असा करून दिला कीं घरोघर हे शब्द कानीं येतात—

‘ भक्ति थोर ! भक्ति थोर !
तूं चंद्रमा ! भक्त तुझे चकोर !
तूं मेघ ! भक्त मयूर !
मेघश्याम समोर त्यांस तूं सर्वत्रही !

---

# जनीजनार्दन

१ बालेघाटीं बीडशहरीं पाटांगण नांवाचें एक देवस्थान आहे. पाटांगण ह्मणजे पाटे ( एकवचन पाटा ) ठेवण्याची कचेरी. मुसुलमानांचें राज्य देवगिरीस इ० स० १३१८त झाल्यावर कांहीं वर्षें बालेघाटांत बीड व जोगाईचें आंबें ह्या दोन शहरीं स्वतंत्र संस्थानिक राज्य करीत होते. ह्या संस्थानिकांचें सार्वजनिक कागदपत्रांचें दफ्तर ठेवण्याच्या कचेरीस पाटांगण अशी संज्ञा असे. पत्रा=पट्टा=पाटा अशा परंपरेनें पाटा हा शब्द सध्याच्या मराठींत आला आहे. मुसुलमानांच्या पूर्वीं व हेमाद्रीच्यावेळीं व पूर्वीं हे सार्वजनिक पाटे पाटांगणांत ठेवीत व त्या पाटांगणाच्या मुख्य अधिकाऱ्याला पाटेलू--ह्मणजे पाटे ज्याच्या ताब्यांत असत तो अधिकारी--ह्मणत. ह्याच पाटेलू शब्दापासून प्रस्तुतचा पाटील शब्द निघाला आहे. हे पाटे पूर्वीं तांब्याचे किंवा भूर्जपत्रांचे असत; परंतु पुढें कागदाचे होऊं लागले. ह्या कागदाच्या पाटांचा उल्लेख ज्ञानेश्वरींत झाला आहे. भूर्जपत्र ह्या शब्दाचे भुजपाट असें रूप तेराव्या व चवदाव्या शतकांतील कित्येक मराठी लेखांत आढळतें.

२. बीड येथील पाटांगणाचे वर्तमान अधिकारी हरिभक्तिपरायण मथुरानाथ गोसावी, संस्थान तीर्थ पाटांगणकर, हे आहेत. हे प्रसिद्ध महाराष्ट्रभगवद्भक्त जनीजनार्दनस्वामी ह्यांचे वंशज होत. ह्यांची वंशावळ येणेप्रमाणें:—

१ जनीजनार्दन
|
२ नारायण
|
राघव — ३ देवस्वामी
|
४ पुरुषोत्तम
|
५ महादेव
|
६ गंगाधर
|
७ गोविंद
|
८ विद्याधर
|
९ विनायक
|
१० मथुरानाथ (इ. स. १९०३ वर्तमान.)
|
११ गंगाधर

३ एकनाथस्वामींचे गुरु जे जनार्दनस्वामी त्यांच्याहून हें जनीजनार्दन निराळे आहेत हें प्रसिद्ध आहे. ह्या जनीजनार्दनांचें आडनांव गोसावी. हे विजापूरच्या पातशाहींत कमाविसदार होते. एकदा दुष्काळ पडला असतां, ह्यांनीं सरकारीं कोठारें गरिबांकडून लुटविलीं. अर्थात्, ह्या बेकायदा व बिगरपरवाना वर्तनाबद्दल पातशाहानें ह्यांना दोष दिला व विजापुरास धरून नेलें. बिगरपरवाना सरकारी कोठारें कां लुटविलीं असा पातशाहानें सवाल केला असतां ह्यांनीं खालील ओवीबद्ध रोकडा जबाब दिला:—

जितुकें खर्चिलें उदरास ।
स्त्री, सुत आणि कन्यकेस ॥
तितुकें मजकडे, इतरास ।
दानधर्मी योजिलें! ॥ १ ॥

ह्या ओव्या जनीजनार्दनाच्या एका ओवीबद्ध आधुनिक चरित्रांतील आहेत. असला परोपकारी मामलदार निर्दय व पाषाणहृदयी सरकाराला कसा खपणार? सदर भूतदयेच्या कृत्याबद्दल जनार्दनपंताला मस्त हत्तीच्या पायाखालीं चिरडून मारविण्याची शिक्षा झाली. परंतु चमत्कार असा कीं, ह्या साधुपुरुषाच्या शांत मूर्तीला स्पर्श करण्याचें त्या मस्तवाल पशूलाहि धैर्य होईना! असा जेव्हां प्रकार झाला, तेव्हां पातशाहानें जनार्दनपंताला सोडून दिलें व पुनः नोकरीवर रुजू होण्याचा हुकूम फर्माविला. परंतु जनार्दनपंताची वृत्ति ह्या अघोर संकटांतून जातांना पूर्ण विरक्त बनली, व त्यानें यवनाची सेवा प्राणांतींहि करावयाची नाहीं असा निश्चय केला इतकेंच नव्हे, तर ह्यापुढें जो कोणी आपल्या वंशांत यवनाची सेवा करील तो कुलबाह्य समजला जाईल, अशी आपल्या वंशजांस शपथ घातली. ही शपथ बीड येथील पाटांगणांत अजूनहि पाळली जाते.

४. ह्यानंतर जनार्दनपंतानें आपलें सर्व आयुष्य ईश्वरभजनांत व लोकोपदेश करण्यांत खर्चिलें. जनार्दनपंताचें उपास्य दैवत गणपति होतें. त्याची स्थापना त्यानें गंगामसलें ह्या गांवीं केली. पुढें प्रसिद्ध मुत्सद्दी हरिपंत फडके ह्यांनीं ह्या स्थापनेचा अडीचशें वर्षांनंतर उद्धार केला. गंगामसलें हें गांव पैठणाजवळ आहे. जनार्दनपंत पंढरीची वारी करीत असे. जनार्दनपंत आपणास जनीजनार्दन ह्मणून प्रायः कवितेंत ह्मणे. तेव्हां नांवांत घोटाळा होऊं नये ह्मणून एकनाथस्वामी आपणांस एकाजनार्दन ह्मणवूं लागले.

५. जनीजनार्दन, शके १५२३, श्रावण वद्य ७, अभिजित् मुहूर्ती, ह्मणजे इ० स० १६०१ त, समाधिस्थ झाले.

६. ह्यांची भाषा दासोपंताच्या भाषेसारखी आहे. दासोपंताची भाषा कशी होती, हें पुष्कळांना माहित असण्याचा संभव नसल्यामुळें, दासोपंताचीं एक दोन पदें देतों व नंतर जनीजनार्दनाचीं दोन तीन देतों.

## दासोपंताचीं पदें.

( १ )

राग: — ( कांबोद — मल्हार. )

पैलु कागु बोले काये?
माझा नयनु स्पंदतु आहे.
दत्तु अझुणी कां नये?
मन वेधलें, परति न लाहे.
वियोगु आंगीं न साहे.
त्रिविध तापु बाधिताहे.
जा, वो! वेगु करा, माये!
याचे दाखवा येकु वेळ पाये. ॥ १ ॥ ध्रु.
आतां न धरवे धीरू.
लागला भवविखारू.
दूजा नेणें उपचारू.
एकु समर्थु श्री आदिगुरु. ॥ छ ॥
देवो गुरू, बापु, माये!
दत्तु आत्मा माझा, सैये!
तयाची वाट मीं पाहें.
सवें जाइन, पुडती न ये.
आनंदु आजि वाटताहे!
भाव पालटले, गे! बाइये!
दिगंबरीं भेटि होये,
ऐसें चिन्ह भासताहे! ॥ २ ॥

ह्या पदांत विरहिणी नायिका नायक जो दत्तु त्याच्या भेटीविषयीं उत्कंठित झालेली कवींनें वर्णिली आहे. येथें शृंगारसंवलित भक्तिरस प्रत्येक अक्षरांत भरला आहे.

( २ )

राग—देशी.

सेर-खदिर-सर्प-संगति घडलीसे, चंदना! रे!
पासीं लसनराशि, कें गुणें उरसी चंदना? रे!

हृदय कठिण करी, परगुण न धरी, चंदना! रे!
गुणा भुलसी तरि पडसील बाहेरि, चंदना! रे! ॥ १ ॥
धृ॥ अरे रे रे रे रे रे! परिस तुं, सज्जना! रे!
खळसंगु असतां साधुत्व काय उरे? सज्जना! रे! ॥ छ ॥
शिला पानीय वरि घसणी पडतीसे, चंदना! रे!
करवत, कुठार तुजचि लागि पैल, चंदना! रे!
घालुनि दहनावरि पाहों पाहाती थोरी, चंदना! रे!
दिगंबरावांचून न धरीं आन साधु, चंदना! रे!

ही अन्योक्ति मोठी रमणीय आहे!

जनीजनार्दनाचीं पदें.

( १ ) राग—वैराटिका.

तळहातीचे केस
विंचरीते गोरी!
वांजेचिया सूतें
धरलीसे करी! ॥ धृ० ॥
परता, परता, मी
वंध्येची सूता!
पतिव्रता मी
माझी, रे! माता! ॥ १ ॥
आजी, पणजी,
निपणजी तिजी
तिघी वांजा, आई
तुझी आणि माझी! ॥ २ ॥
विचारितां, तुह्मी
आह्मी भावांडडें,
न घडे संगू,
नवल दिसें कुडें! ॥ ३ ॥
तूं माझा पिता!
तुझी मी माता!

येवढी आण आतां,
न बोलैं तत्वता!!! ॥ ४ ॥
तु माझा नातू?
किं मी तुझी नाती?
जनार्दनु ह्मणे,
भ्रांति! हो भ्रांति! ॥ ५ ॥

( २ ) राग—माळगौडा ॥ केदारा.

॥ धृ ॥ अरे! अरे! आळया! तुं पाहिलें पाहिं! रे!
अझुनु काय निदसुरा! तुज जाहालें काई? रे!
होई ठीक आसनीं तूं ठायींच्या ठायीं, रे!
फिरे बुद्धि, मागुता तूं हंस बाहीं राही, रे! ॥१॥

( ३ )

धरणी रक्षावया
परब्रह्म हरी
गौळियाचा घरीं
प्रगटला ॥ धृ ॥
तिहीं लोकीं जाला
परम आनंदु
आनंदाचा कंदु
गोपीनाथु ॥ १ ॥
संपूर्ण अवतारु
नंदाचा नंदनु
ह्मणत जनार्दनु
भक्तिप्रियु ॥ २ ॥

७. जनीजनार्दनाचीं १००।१५० पदें मजजवळ आहेत.

८. जनीजनार्दन हे नाथपंचकापैकीं एक होते, असें ह. प. मथुरानाथस्वामींचें ह्मणणें आहे. नाथपंचकांत खालील साधु अंतर्होतात:—

१ एकनाथस्वामी पैठणकर.
२ जनीजनार्दन बीडकर.
३ दासोपंत आंबेजोगाईकर.
४ विठा रेणुकानंदन सोनठाणे गोलटगांवकर.
५ केशवस्वामी भागानगरकर.

९. विठा रेणुकानंदनाचें एक पद ह. प. मथुरानाथ गोसाव्यांनीं ह्मटलें. तें फार चमत्कृतिजनक आहे ह्मणून खालीं देतों.

उगवला दिनकरु
विश्व देखे डोळा,
न देखे आंधळा,
तरी काय सूर्यु नव्हे? ॥ १ ॥
वाजे गाजे ध्वनि,
विश्व ऐके कानीं,
न पडे बधिरा श्रवणीं,
तरी काय नादु नव्हे? ॥ २ ॥
पंचमालापस्वरें
शब्द करिती कोकिला,
नायकें कावळा!
तरी काय वसतु नव्हे? ॥ ३ ॥
तैसा आदि पुरुषाचा दासु
विठा रेणुकानंदन
न मनिती दुर्जन
तरी काय साधु नव्हे? ॥ ४ ॥

१०. ह. प. मथुरानाथ गोसावी सांगतात कीं, उद्धवचिद्घन हा धारूरचा रहाणारा असून, ह्याचें आडनांव कोकिळ होतें व हा रामदासस्वामींच्या वेळीं हयात होता. ह्यास प्रमाण खालील उद्धवचिद्घनाचेंच पद आहे.

ज्याचे वंशीं कुळधर्म रामसेवा
त्याचे वंशीं मज जन्म दे गा! देवा! ॥ १ ॥

वारंवार विनंति आयकावी
दयासिंधू ही सर्व सिद्धि न्यावी. ॥ २ ॥
ज्याची वाणी रंगली रामनामा,
त्यासी मजसी संवाद घडो, रामा! ॥ ३ ॥
ह्मणे उद्धवचिद्घन, महाराजा!
रामदासाचा संग घडो माझा. ॥ ४ ॥

११. गोसावीमजकुरांनीं ज्ञानेश्वरीसंबंधानें खालील दोन श्लोक ह्मटले.

स्वस्तिश्रीनृपशालिवाहनशके पंध्रा शतें साऽगळीं ।
श्रीमत्पैठणिं तारणाख्यवरुषीं गोदावरीच्या कुळीं ॥
षष्ठी कृष्ण कपील भाद्रपदिची ग्रंथार्थमूलान्वयें ।
केलें शोधन ज्ञानदेविप्रतिचें श्रीएकनाथें स्वयें ॥ १ ॥
श्रीकार्ष्णव्यास इत्यग्रगनगनिस्सृता ज्ञानदेवी प्रयागे ।
संबद्धा केवलोक्तिग्रथनविवरणत्रिप्रवाहित्रिवेणी ॥
तस्मिन्प्राप्ते सदैवे नरतनुमकरे तच्छ्रुतिस्नानकृद्यः ।
तीर्त्वा संसारसिंधुं सकलपितृगणैर्ब्रह्मसाम्राज्यमेति ॥ २ ॥

ह्या दोन्ही श्लोकांवरून असें दिसतें कीं, ज्या ग्रंथाला प्रस्तुत कालीं ज्ञानेश्वरी असें ह्मणतात त्याला ज्ञानदेवी ह्मणण्याचा एकेकाळीं परिपाठ होता.

१२. येणेप्रमाणें जनीजनार्दन, विठारेणुकानंदन व उद्धवचिद्घन ह्यांचे काळ वरील हकीकतीवरून कायमचे ठरले. उद्धवचिद्घनासंबंधीं आजपर्यंत फार घोटाळा असे. कोणी त्याला इसवीच्या तेराव्या शतकांत घालीत, कोणी सोळाव्यांत आणीत व कोणी तर महिपतीच्या बहुतेक जवळचा असें ह्मणत. ह्मणजे चारशें वर्षांच्या अवधींत उद्धवचिद्घनाची स्थापना कोठें करावी ह्याबद्दल संशय होता. परंतु तो असण्याचें आतां कांहीं एक कारण नाहीं. उद्धवचिद्घन रामदासांच्या वेळीं होता व तो रामदासांपेक्षां कदाचित् वयानें लहान असावा.

१३. जनीजनार्दनानें कांहीं पदें व्रज भाखेंतहि लिहिलीं आहेत.

---

# देवदास

व्यंकटेशस्तोत्र ज्यानें रचिलें, त्याला देवीदास ह्मणण्याचा सांप्रदाय आहे. परंतु, संतमालिका नामक ह्या कवीचा एक लहानसा ग्रंथ बीडास मिळाला त्यांत ह्यानें आपलें नांव देवदास दिलें आहे. ह्या संतमालि ग्रंथांत एकंदर १४६ ओव्या असून शेवटीं

क्षय संवत्सर, आषाढमासीं, । सोमवार, तृतीयेसी, ॥

ग्रंथ संपूर्ण केला ह्मणून ह्मटलें आहे. ह्या ओवींत, संवत्सर, महिना, वार व तीथ इतक्या चार बाबी दिल्या आहेत; परंतु पक्ष दिला नाहीं. तत्रापि क्षय संवत्सर व आंतील विशेषनामें ह्यांवरून ह्या ग्रंथाच्या रचनेचा नक्की काल ठरवितां येतो. क्षय संवत्सर शक १५४८, शक १६०८ व शक १६६८ ह्या तीन सालीं १२० वर्षांत पडतो. पैकीं रामदास, वामन, रंगनाथ, वगैरेंचा उल्लेख ज्याअर्थी देवदास करतो, त्याअर्थी शक १५४८तील क्षय संवत्सर टाकून देणें भाग पडतें. तसेंच श्रीधरस्वामी नाझरेकर, मोरोपंत वगैरेंचा हा कवी उल्लेख करीत नाहीं, त्याअर्थी शक १६६८ सोडावा लागतो व शक १६०८ हा ह्या संतमालिकेच्या रचनेचा शक स्वीकारणें रास्त दिसतें. शिवाय शक १५४८ किंवा १६६८ ह्यांतील आषाढ महिन्याच्या वद्य किंवा शुद्ध तृतीयेस सोमवार पडत नाहीं. तेव्हां ह्या ग्रंथाच्या रचनेचा १६०८ शकच कायम करावा लागतो. शक १६०८च्या आषाढाच्या शुद्ध तृतीयेस सोमवार पडतो. ह्या ग्रंथांत कोणत्या संतांचीं नांवें दिलीं आहेत. तें समजण्याकरितां हें सबंद काव्य खालीं देतों.

## देवदासकृत संतमालिका

### श्रीगणपतिर्जयति.

ॐ नमो ! जी ! एकदंता, । देवी गौरीचिया सुता, ॥
करुणाकरा, दयावंता, । लंबोदरा, गणेशा. ॥ १ ॥
नमन माझें सारजा माये. । मला कृपादृष्टी पाहे. ॥
वाचा हरिगुण गाये, । ऐसी सोय वदावी. ॥ २ ॥
नमन माझें सद्गुरुनाथा, । दयाळु व्हावें जी ! समर्था ! ॥
हरिगुणनामा वृत्ता । वदवीं आतां यथारुचि. ॥ ३ ॥
नमन माझें श्रोतयांप्रती, । कथा ऐकावी परमप्रीती ; ॥
जेणें पावन त्रिजगती, । ते तुह्माप्रती निवेदितो. ॥ ४ ॥
सकळ सुरवरांचा ईश । पूर्णब्रह्मसनातन वेंकटेश. ॥
स्थिर करूनि मानस, । हरिचरित्रास श्रवण कीजे. ॥ ५ ॥
जयापासूनि त्रिगुण । ना भक्तिस्तव जाला सगुण, ॥
षष्टाचळीं अवतरोन, । भक्तजन उद्धरिला. ॥ ६ ॥
ऐसा जो का जगन्निवास । करुणावचनें प्रार्थिंदेस, ॥
तें श्रोतीं सावकास । आदरेंकरूनि परिसावें. ॥ ७ ॥
जय ! जया ! वेंकटेशा ! । पुरुषोत्तमा ! परेशा ! ॥
भक्ताची पुरविसी आशा, । माझी उपेक्षा कां केली ? ॥ ८ ॥
युगायुगीं भक्तांसी । स्मरतां पावे हृषीकेशी. ॥
तूं अळसक्त जालासी. । मज न पावसी स्मरणमात्रें. ॥ ९ ॥
गजेंद्र संकटीं आळवी तुज, । जळीं कासावीस जाला सहज, ॥
तेव्हां तूं पावसी गरुडध्वज. । गजेंद्रें चोज मांडिलें ! ॥ १० ॥
चक्रें नक्र विदारिला, । गजेंद्र तुवा सोडविला, ॥
तो पुरुषार्थ काय केला ? । न कळे मज स्वामिया. ॥ ११ ॥
द्रौपदी आणिली सभास्थानीं, । खळ दुरात्मा वदे वाणी, ॥
नग्न करावी याज्ञसेनी, । तेव्हां चक्रपाणी ! स्मरली तुज. ॥ १२ ॥

गरुडासी टाकूनिया मागें । तू धावसी लागवेगें; ॥
वस्त्रं पुरविसी अनयोगें । संख्यारहित गोविंदा! ॥ १३ ॥

वनीं असतां पांडवगण । दुर्वास आला भोजना, ॥
तेव्हां जावोनि वृंदावना । श्री नारायणा प्रार्थित. ॥ १४ ॥

मग धांवलासी निस्तुरा । ऐकोनि द्रौपदीचा करुणोत्तरा, ॥
धांवलासी एकांगवीरा! । शारंगधरा! ते काळीं. ॥ १५ ॥

आश्वासिलें द्रौपदीसी. । शाखपत्र मागोनि घेसी. ॥
कांहीं न कळतां पांडवांसी । ऋषेश्वरांसी तृप्त केलें. ॥ १६ ॥

लाक्षाजोहरीं वांचविलें. । विष अमृतमय केलें. ॥
जयद्रथाचे पणीं बांचविलें । पार्थालागीं जगदीशा! ॥ १७ ॥

कृतायुगीं प्रल्हाद, । हिरण्यकश्यपूचा केला वध, ॥
स्तंभीं अवतरोन गोविंद! । संरक्षिलें तयातें. ॥ १८ ॥

त्रेतायुगीं बिभीषण । तुज जाला शरण; ॥
त्यासी देऊन लंकाभुवन, । अक्षयीं तुवा स्थापिला. ॥ १९ ॥

ध्रुव बैसविला अढळपदीं, । ज्या पदासी चळ नाहीं कधीं, ॥
तें त्वां दिधलें कृपानिधि! । महिमा वेदीं न वर्णवे. ॥ २० ॥

उपमन्य तानें बाळक, । मातेसी दुध मागे निष्टंक, ॥
देव देईल ह्मणोनि कौतुक । सहज केलें तयानें. ॥ २१ ॥

बाळकें केलें स्मरण, । तूं दयासागर परिपूर्ण, ॥
बाळकासी, कृपाळु होऊन, । क्षीरसिंधु दिधला. ॥ २२ ॥

यमभयें त्रासिली कुंटिणी । शुकमिसें स्मरली चक्रपाणी, ॥
एवढी जे का पापखाणी! । ते वैकुंठसदनीं पावविली. ॥ २३ ॥

अजामेळ ब्राह्मण । विषयसंगें अंत्यज, जाण, ॥
पुत्रमिसें नारायण । ह्मणोनि स्मरण तुझें केलें. ॥ २४ ॥

धांवलासी तमाळनीळा! । यम नेत होता अजामेळा ॥
सोडविलें त्वां गोपाळा! । भक्तवत्सला! गोविंदा! ॥ २५ ॥

भिल्लटी जाऊन वनांतरीं । पक्व फळें बोटी भरी, ॥
चाखून पाहे वैखरी, । स्वाद जिव्हारीं पैं लागे. ॥ २६ ॥
उच्छिष्ट फळें बोटी भरी, । तुजलागीं अर्पी श्रीहरि ! ॥
भाव देखोनि निर्धारीं । त्यांचा अंगीकारी जालासी. ॥ २७॥
कढईमाजि बेडकुळी, । ज्वाळ लागलिया तया तळीं, ॥
मग मरण ये ते काळीं । तेव्हां वनमाळी! स्मरे तुज. ॥ २८ ॥
तेव्हां धावलासी गोपाळा! । ज्वाळा केल्या सुशीतळा. ॥
वांचली ते मंडुकबाळा. । अद्भुत लीळा हरि! तुझी. ॥ २९ ॥
पक्षी होता वृक्षावरी, । पारधी ससाणा सोडी वरी, ॥
वृक्ष वेष्टिला वागुरी, । बाण गुणीं लाविला. ॥ ३० ॥
पक्षियानें केलें तुझें चिंतन, । पावलासी व्याळ होऊन, ॥
पारधियातें दंशोन । हातींचा बाण चुकविला. ॥ ३१ ॥
त्या योगें पाडिला ससाणा. । पक्षी उडोनि गेला गगना. ॥
ऐसें भक्तसंरक्षणा! । तुझें अवतरण यालागीं. ॥ ३२ ॥
मृग हरणी आणि पाडसें । क्रिडाकौतुकें रहिवासें ॥
पारधी येवोनि कैसें । येकायेकी पै केलें? ॥ ३३ ॥
सभोवता लाविला वोणवा, । श्वानें सवेग घेती धावा, ॥
निदान जाणोनि माधवा! । स्मरण तुझें पै केलें. ॥ ३४ ॥
भक्तवत्सला! मुरारि! । प्रजन्य आणिला तये अवसरीं. ॥
अग्नि विझविला निर्धारीं । मार्ग हरणी पै दिधला! ॥ ३५ ॥
हरिश्चंद्र आणि तारामती । निर्वाणीं तुजलागीं स्मरती, ॥
अरिष्ट दूर करूनि श्रीपति! । राज्यपदीं स्थापिला. ॥ ३६ ॥
भक्तवत्सला! श्रीहरि! । बळीस पाताळीं दिधली पुरी. ॥
युगें लोटलियावरी । अद्याप द्वारीं राहिलासी. ॥ ३७ ॥
तुज उद्देशें अंबऋषी । व्रत करी द्वादशी. ॥
कृपा करूनि हृषीकेशी! । दश अवतारांसी धरीयेले. ॥ ३८ ॥
रुक्मांगद करी एकादशीव्रत. । त्यासी पावलासी तू भगवंत. ॥
नगरनागरिकलोक समस्त । पुरी नेली वैकुंठा. ॥ ३९ ॥

पैंधा करी पाषाणपूजा. । ते पूजा घेशी गरुडध्वजा ! ॥
ज्याचा भाव नाहीं दुजा । त्याचिया काजा पावशी. ॥ ४० ॥
उद्धवासी वर्जिता द्वारपाळ । वो मनीं जाला विव्हळ. ॥
त्यासी होवोनिया स्नेहाळ । देवतार्चन दाखविलें. ॥ ४१ ॥
भक्त दाखविलें मूर्तिमंत. । उद्धवासी वाटला विस्मय बहुत. ॥
भक्तकैवारी हा भगवंत. । अति अद्भुत वाटलें. ॥ ४२ ॥
दावाग्नि पीडितां गोपाळां । तेव्हां निजमुखें गिळिल्या ज्वाळा. ॥
ऐसीया करिशी प्रतिपाळा । तूं कृपाळू बा गोविंदा ! ॥ ४३ ॥
गर्भाधानीं परीक्षितीसी । त्वां वाचविलें हृषीकेशी ! ॥
अंतीं भागवत उपदेशसी. । मोक्षपदासी पावविलें. ॥ ४४ ॥
गोपिका भाविती ज्यापरी । तैसा तूं होसी श्रीहरी ! ॥
तुझी महिमा दुसरी । द्यावया कांहीं न दिसे. ॥ ४५ ॥
सुदामा होवोनि परमकष्टी । पोहे मिळविले तीन मुष्टी. ॥
मग द्वारकेप्रती उठाउठी । तुझिया भेटी पातला. ॥ ४६ ॥
आवडी तया सन्मानिसी. । आदरेंकरूनि भेटलासी. ॥
पोहे मुखामाजि घालसी. । मग सांगसी सुखगोष्टी. ॥ ४७ ॥
पोहेसी केलें तुज ऋणित. । नगर दिलें रत्नखचित. ॥
ऐसा कृपाळू भगवंत. । संख्यारहित गुण तुझे. ॥ ४८ ॥
युगायुगीं रक्षिलें भक्तां, । हे आहे पुराणप्रसिद्ध कथा. ॥
कलियुगीं हि भगवंता । तैसाचि भक्ता आहेसी. ॥ ४९ ॥
ज्ञानदेवासी जग मानी अभेद, । हैशाहातीं वदविला वेद, ॥
दूर करोनि जनापवाद. । कृपाळू गोविंद समर्थ. ॥ ५० ॥
कैसी काय नेणों केली कळा ! । नामयासाठीं फिरविलें देउळा. ॥
जीवनविन जाला विव्हळा, । तेव्हां आड उचंबळला तात्काळ. ॥५१॥
कृष्णदास मुद्गल लक्षी, । तवें विमान देखिलें अंतरिक्षीं. ॥
तुझिया कृपाकटाक्षीं । खोळंबलें तीन दिवस. ॥ ५२ ॥

भरथरघुनाथा केली भेटी. । मग पावलासि वैकुंठीं. ॥
ऐसे तुझे गुण कोटी । कोण वर्णू सकेल! ॥ ५३ ॥

कीं विठ्ठल जालिया यशोदा । तवें बाळ जालासि मुकुंदा! ॥
भक्ताचें उणें आनंदकंदा! । कदा काळीं न देखसी. ॥ ५४ ॥

उद्धवाचें रूप धरून । एकनाथाचें फेडिलें ऋण. ॥
ऐसा उदार सर्वज्ञ । तूंच एक गोविंदा! ॥ ५५ ॥

जनजसवंताच्या घरास समुदावो । आला, तों वरोसि नाहीं ठावो. ॥
तेवेळीं लक्ष्मीचा रावो! । ब्राह्मणवेष जालासि. ॥ ५६ ॥

डोईवर सामोग्रीची मोट । गृह पुसत आला नीट; ॥
अवघी करूनि खटपट । गेलासि नीट तेथूनीं. ॥ ५७ ॥

कबिरागृहीं अग्नीचा वळसा, । तेव्हां उदक जालासि जगदीशा! ॥
लतीफ निघाला राणिवसा, । तेव्हां मृत्यापासोन सोडविला. ॥ ५८ ॥

गोरया कुंभारें पुत्र तुडविला, । अवघा चिखलांत कर्दम जाला, ॥
बोलावितां उठविला. । पवाडा विठ्ठला! काय वर्णूं! ॥ ५९ ॥

जगमैत्र नागोसी । व्याघ्रवेषें भेटलासि. ॥
जैसा लोभ गायवत्सांसी । तैशापरि चाटिलें. ॥ ६० ॥

राणा विष दे मिराबाईसी, । तेव्हां आठविले हृषीकेषी. ॥
विषाची क्रिया अनृता ऐशी । तत्काळ तुवा पै केली. ॥ ६१ ॥

सावत्यानें चिरोन उदर । तुज सांठविलें सत्वर. ॥
रखमाईस विस्मय थोर । वाटला फार तेकाळीं. ॥ ६२ ॥

भक्तशरीरीं चतुर्भुज । रूप दाखवीसि गरुडध्वज. ॥
रखमाईस वाटलें चोज । पादांबुज मग वंदिलें. ॥ ६३ ॥

धरूनि शेना न्हावियाचें रूप । रायाचा शांतविला कोप. ॥
धन्याघरीं दामोदररूप । क्रीडसील गोविंदा! ॥ ६४ ॥

पुरंदर आला दर्शना । तालतालीं धरी अहंभावना. ॥
छेदूनि त्याच्या अहंभावना । हर्षें गायना नाचसी. ॥ ६५ ॥

चोख्यामेळ्याचे स्वासि ग्रास । नीच यात ह्मणोन न करी उदास. ॥
गर्भी रक्षिलें रायास, । पुष्पामाजी सांठविलें. ॥ ६६ ॥

शिवदास अका दिवस भीमाजळीं । तुवा रक्षिलें वनमाळी ! ॥
काढूनि वाघेची दांतखिळी । ब्रीदावळी पढविल्या. ॥ ६७ ॥

मृत्युंजयो पडतां गंगोदकीं । तूं धांवलासि एकाएकीं, ॥
हात ठेवूनि मस्तकीं । संतांत सरता पै केला. ॥ ६८ ॥

जातीचा वाणी तुकाराम. । तुझा भजनीं अत्यंत प्रेम. ॥
त्या पावलासि पुरषोत्तमा. । उदकीं कागद तारिले ! ॥ ६९ ॥

सिवा गुरव जातीचा. । चाळा लाविला भजनाचा. ॥
तयासी मार्ग वैकुंठीचा । सोपा करूनि दीधला. ॥ ७० ॥

मुक्ताई, वाटेश्वर, सोपान, । निवृत्ति, देवा ! तुझें ध्यान. ॥
त्यांसी देऊनि आपुलेपण । सरते केले त्रैलोक्यीं ॥ ७१ ॥

रांडवेसी दिधला पुत्र. । महिमा दाखविली विचित्र. ॥
त्या चांगयाचें चरित्र । साधुसंत वर्णिती. ॥ ७२ ॥

चाव, भाव, काम, उवेश, । नरहरि सोनार, कूर्मदास, ॥
आवडी वर्णीत चरित्रास, । ह्मणोनि तुझें मानस त्यांपासी. ॥ ७३ ॥

सहजानंद, रामानंद, । तुझे भजनीं त्यांसी आनंद. ॥
ह्मणोनि गोविंद । सर्वकाळ त्यांपासीं ॥ ७४ ॥

केशवासी तुझा वर ; । महत्व देऊन केलें थोर. ॥
रामदासाची भक्ति देखोन फार । तूं समोर नाटलासि ॥ ७५ ॥

माणका तुझे बोधें बोधला, । अरिष्टापासून सोडविला. ॥
तुझे पवाडे वर्णावयाला । मति कैची गोविंदा ! ॥ ७६ ॥

सख्यालागूनि तुझा वेध, । कवित्व वदविलें अगाध. ॥
मालोसी करूनि बोध । गुण आपुले वदवीसि. ॥ ७७ ॥

काशिवासी दिधलें लक्षघर । आईआदिपुरुषा दिधला वर. ॥
मोरेश्वराचा वडिवार । वाढविला त्वां गोविंदा ! ॥ ७८ ॥

संतबास आणुनि दिधली गीता. । अद्वय नामा केला सरता. ॥
पंडितासी अखंडता । नामें तुवा दीधली. ॥ ७९ ॥
प्राणगोपाळ प्राणापरता । अखंड त्यापासीं सभोंवता. ॥
कृपा करूनि गोसावीसुता । करवी कविता अपरमित. ॥ ८० ॥
लोलिंबराज करितां स्तवन । मस्तकीहुनीं काढिलें जीवन. ॥
भक्तवत्सल तूं भगवान. । महिमा कोण वर्णू सके? ॥ ८१ ॥
कान्होबा तुझें लडिवाळ. । त्यासी जालासि कृपाळ. ॥
उदकाचें तूप केवळ । तात्काळ तुवां पै केलें. ॥ ८२ ॥
स्त्रियेलागीं प्राणान्त जाला. । तेव्हां जयदेव तुज स्मरला. ॥
धावोनि तुवा विठ्ठला । पद्मावतीतें जीवविलें. ॥ ८३ ॥
रायानें मांडिलें निर्वाण । तेव्हां नरसी मेहत्यानें केलें ध्यान. ॥
तूं कृपाळु, जगजीवन । त्यासी आळंगून संबोखिसि ॥ ८४ ॥
मंबाजी कृष्णें न कळता चुना । तुज समर्पिला जगजीवना! ॥
भक्षिला, परंतु त्याचिया प्राणा । तुवा रक्षिलें गोपाळा! ॥ ८५ ॥
कौळिकें घेऊन तुझा वेष, । पर्णिलें राजकन्येस, ॥
रायानें मांडलें परीक्षेस, । तेव्हां तुज आठवलें. ॥ ८६ ॥
ब्रीदासाठीं धाव घेसी. । त्याचे रूपीं प्रगटलासि ॥
राजा जाला परमसंतोषी. । पवाडे हृषीकेशी! काय वानू? ॥ ८७ ॥
मुक्तेश्वरा मुक्तदशा । दिधली तुवा जगदीशा! ॥
पुरवून त्याची आशा । भारथटीका वदविली. ॥ ८८ ॥
राजाई दरिद्रें चिंता करी, । तवें बिडवई जालासि श्रीहरि! ॥
द्रव्यगोणी लोटिली द्वारीं. । महिमा मुरारि! न कळे तुझी! ॥ ८९ ॥
केशवराज याचा केश । एक तंतू जाला झाडा ॥
योजनपर्यंत त्यास । वाढविशी गोविंदा! ॥ ९० ॥
जनाबाईस म्लेच्छें दुष्ट । अरिष्ट आरंभिलें मोठें, ॥
तेव्हां तुझें रूप गोमटें । अंतरीं आठविलें ते काळीं. ॥ ९१ ॥

चोरें घेऊं जातां घोडें, । वाचेसी तुझीं ब्रीदें पडे. ॥
सांचळ होता बळियाडें । धावण्यासी निघाला. ॥ १०० ॥
तेव्हां तुज पडिलें संकट. । आश्वांचा केला पालट. ॥
चोरासी दिधली वाट. । महिमा अचाट काय वाणूं? ॥ १०१ ॥
आणीकहि अपरिमित भक्त । तुझे जाले शरणांगत. ॥
त्यांची नामावळी किंचित । वर्णीन तुझिये मतीनें. ॥ १०२ ॥
दामाजीपंत पडिला संकटीं. । तो आला तुझिया भेटी. ॥
चरणीं घातली मिठी । अश्रुपात गळत असे. ॥ १०३ ॥
तेव्हां अनामिकाचें रूप धरून । तूं गेलासि बेदरालागून. ॥
द्रव्य दिधलें संपूर्ण । आणि हुजरातीं आणिलें ॥ १०४ ॥
अनंत गोपाळा तुझा वेध. । अद्वय कृष्ण तुझा बोध. ॥
तुझिया कृपें प्रल्हाद । उचंबळत सर्वदा. ॥ १०५ ॥
चिद्घनासी तुझें ध्यान. । सदानंदाचें तूं जीवन. ॥
मोहणियाचें तूं मन. । तूं ध्यान युक्तानंदाचें. ॥ १०६ ॥
नरसिंहतीर्थ उतरला तुझिया तुका. । नरहरिमालोचा तूं सखा. ॥
शिवदास तुझिया गुणनिका । होऊनिया राहिला. ॥ १०७ ॥
परमानंद केला सरता. । रामानंद स्मरण करता ॥
। केला सरता संतांत. ॥ १०८ ॥
उद्धरिला शामदास. । निजपदीं बैसविलें वामनास. ॥
लाड जो माधवदास, । करीं तयास धरियेलें. ॥ १०९ ॥
ताता अंतरीं तूं श्रीरंग. । सर्वोत्तमानें तुझा धरिला संग. ॥
रंगावा नाझरकर अपंग । तुझे दयेनें पैं जाला. ॥ ११० ॥
दिंडुडकर गोपाळ तुझा दास. । पूर्ण दया तुझी कोकिळास. ॥
नामीं विनटला नांदेडकर शेष, । प्रसन्न तयासी जालासि. ॥ १११ ॥
गरुड तुझे पायीं विनीत. । निरंजन स्मरणीं सावचित्त. ॥
आणीकहि अपरमित । भक्त पंढरीस नांदती. ॥ ११२ ॥

रामा न्हावी आणि जनार्दन । तुझिये नामीं अत्यंत लीन. ॥
त्या दोघा गळ्यां तुझें ध्यान । सर्वकाळ गोविंदा ! ॥ ११३ ॥

ऐसा कृपाळू तूं अनंत. । तुझे भक्त संख्यारहित ॥
किती आहेत लक्षा आंत, । त्याचा अंत कोण जाणें ? ॥ ११४ ॥

गंगाधर कोणेर परम प्रीती । तुज आळवी श्रीपति ! ॥
वर देवोनि कंकावती । कवित्वशक्ति दीधली. ॥ ११५ ॥

स्त्रियामाजी देखिली ताई, । तैसींच वेणा, बहिणाबाई, ॥
रामदासांकित गिरिबाई, । तुझिया पाया विनटली. ॥ ११६ ॥

दतवाडीं घोळकर बोधला बोधें । कीर्तनीं नाचे तुझिया छंदें. ॥
कोड करोनि विनोदें । कीर्तनानंदें डुल्लसी. ॥ ११७ ॥

निळानंदासी दिधला आनंद. । नरसावासी लाविला छंद. ॥
अचळालागीं उद्‍बोध । तुझिया स्मरणीं निरंतर. ॥ ११८ ॥

रायाजी अंतरीं केला सुखी. । दिगांबर सरता केला परलोकीं. ॥
केशवाची बुद्धि जागे निकी, । स्मरणीं चाळा लाविला. ॥ ११९ ॥

शंकरभट्टाची वेधली वृत्ति. । आत्मारामास केली वैराग्यस्थिति. ॥
शंकरानंदास आत्मप्रचीति । तुवा गुरुमूर्ति दाखविली. ॥ १२० ॥

ऐसे गुण कोठें अपार ! । न वर्णवे तुझा पार. ॥
महिमा अगोचर । देवा तुझी सर्वथा ! ॥ १२१ ॥

दीनानाथ तूं श्रीहरि. । काय वर्णूं तुझी थोरी ? ॥
भक्तालागीं चराचरीं । इच्छेसारिखा तूं होसि. ॥ १२२ ॥

कोण्हास होऊन गुरुरूप । ब्रह्मस्थितीचा करिसी साक्षेप. ॥
कोण्हास लाउनि ज्ञानदीप । प्रकाश करिसी परिपूर्ण. ॥ १२३ ॥

कोण्हास दाखविसी स्वरूपस्थिति. । कोण्हाची फेडिसी अज्ञानभ्रांति ॥
कोण्ही एका सगुणमूर्ति । होऊनिया प्रगटलासि. ॥ १२४ ॥

कोण्हास दाखविसि भजनसंभ्रम. । कोण्हास ह्मणासि ह्मणा नाम. ॥
कोण्हा एकासी वैकुंठधाम । वस्तीलागीं देतासि. ॥ १२५ ॥

भक्तालागीं अनंत, अपार, । अनंतरूपीं तूं साचार. ॥
गिरीवरी निरंतर । व्यंकटेशरूपी विलाससि. ॥ १२६ ॥
पंढरीस होऊनि पांडुरंग । धरिला पुंडलिकाचा संग. ॥
तोचि शेषाचळीं श्रीरंग । भक्तालागी रक्षिसि. ॥ १२७ ॥
यालागीं स्मरे देवदास, । ठेऊनि हरीशीं विश्वास. ॥
साहाकारी तूं भक्तास, । ह्मणऊन तुजला विनवीतसे. ॥ १२८ ॥
जय जयाजि पुरुषोत्तमा! । जय जयाजि निरोपमा! ॥
जय जयाजि गुणधामा! । अपार महिमा हरि! तुझा ॥ १२९ ॥
जय जयाजि जगदोद्धारा! । जय जयाजि परात्परा! ॥
जय जयाजि गुणसागरा! । विश्वंभरा! आदिमूर्ति! ॥ १३० ॥
जय जयाजि भक्तवत्सला! । जय जयाजि त्रैलोक्यपाळा! ॥
जय जयाजि कृपाळा! । अद्भुतलीला हरीची! ॥ १३१ ॥
जय जयाजि विश्वव्यापका! । जय जयाजि जगन्नायका! ॥
जय जयाजि जगपाळका! । जीवन सकळिकां तूं एक. ॥ १३२ ॥
जय जयाजि अव्यक्ता! । जय जयाजि गुणरहिता! ॥
जय जयाजि श्री अनंता! । तूं माता पिता जगद्गुरू ॥ १३३ ॥
ऐशा करुणावचनें देवास । प्रार्थितां, पावला जगदीश. ॥
वोतला चैतन्यकृपेचा सौरस । सुखसंतोष पै जाला. ॥ १३४ ॥
करूनि दुसरेपणाची बोळवण, । अवघा प्रगटला आपण. ॥
करूनि नामावृत ग्रंथ संपूर्ण । वदलासि पूर्ण निर्धारें ॥ १३५ ॥
भक्तजनाची आवडी मोठी, । ह्मणोनि अंतरीं दिधली भेटी, ॥
जा भेटीसी नाहीं तुटी, । ऐसी मिठी पडियेली. ॥ १३६ ॥
दुसरेपणा नाहीं ठाव. । अवघा प्रगटला देव. ॥
देवदासा हाचि भाव । मावळोनि गेला निर्धारें ॥ १३७ ॥
परंतु आवडीचें बोलण, । श्रोतीं व्हावें सावधान. ॥
ग्रंथाक्षर भगवद्भजन । यथार्थ मानावें निश्चयेसी ॥ १३८ ॥

कोण्हा पडलिया संकट, । अथवा आलिया दुष्ट अरिष्ट, ॥
त्यानें तीन सप्तकें ग्रंथ पाठ । आदरेंकरूनि वदावा. ॥ १३९ ॥
पुत्रार्थी अथवा धनार्थी यान । तीन मास करावीं तीन आवर्त; ॥
त्यासी कृपाळु लक्ष्मीरमण । होईल, जाण, निर्धारें. ॥ १४० ॥
अत्यंत रोगी असेल नर, । वेथेनें पीडिले अपार, ॥
त्यानें पारायण सात वार । आदरें हो! करावें. ॥ १४१ ॥
भूत-पिशाच-समंद बाधा । प्राणियासी जालिया आपदा ॥
पंच सप्तकें ग्रंथ सदा । श्रवण करवावयाचा ॥ १४२ ॥
दया करील वेंकटरमण, । यथार्थवाह, नसे आन. ॥
कारागृहाचें बंधन । द्वयसप्तकें तुटेल. ॥ १४३ ॥
जे जे इच्छा करील प्राणी । ते पूर्ण करील चक्रपाणी. ॥
यालागीं ग्रंथपठणीं । आळस सर्वथा न करावा. ॥ १४४ ॥
देवदास विनवी पुढतपुढती । ग्रंथ केवळ भागीरथी. ॥
स्मरणमात्रें मुक्ति । प्राणियांस पै होय ॥ १४५ ॥
क्षयसंवत्सर, आषाढमासीं, । सोमवार तृतीयेसी, ॥
पूर्णता आली ग्रंथासी. । श्रोतीं सावकासी परिसीजे. ॥ १४६ ॥
इति श्री संतमालिका देवदासकृत संपूर्णमस्तू ॥
श्रीकृष्णार्पण ॥

ह्या काव्यांत खालील संत उल्लेखिले आहेतः—

( १ ) पौराणिक कालांतील संत व संतिणी ( मनुष्य, पशु, पक्षी, राक्षस वगैरे ):—

( १ ) गजेंद्र
( २ ) द्रौपदी
( ३ ) पांडव
( ४ ) भीम
( ५ ) पार्थ
( १४ ) पक्षी
( १५ ) हरिण
( १६ ) हरिश्चंद्र आणि तारामती
( १७ ) बळी
( १८ ) अंबऋषि

( ६ ) प्रल्हाद
( ७ ) बिभीषण
( ८ ) ध्रुव
( ९ ) उपमन्यु
( १० ) कुंटिणी
( ११ ) अजामेळ
( १२ ) भिल्लटी
( १३ ) बेडकुळी
( १९ ) रुक्मांगद
( २० ) पेंधा
( २१ ) उद्धव
( २२ ) गोप
( २३ ) परिक्षिति
( २४ ) गोपिका
( २५ ) सुदामा

( २ ) ऐतिहासिक कालांतील संत व संतिणी ( मनुष्यें ):—

( १ ) ज्ञानेश्वर
( २ ) नामदेव
( ३ ) कृष्णदास मुद्गल
( ४ ) एकनाथ
( ५ ) जनजसवंत
( ६ ) कबीर
( ७ ) लतीफ
( ८ ) गोरा कुंभार
( ९ ) नागा जगमित्र
( १० ) मिराबाई
( ११ ) सावता माळी
( १२ ) सेना न्हावी
( १३ ) पुरंदर
( १४ ) चोखामेळा
( १५ ) शिवबा
( १६ ) मृत्युंजय
( १७ ) तुकाराम
( १८ ) शिवा गुरव
( ५४ ) जनाबाई
( ५५ ) गोमाई
( ५६ ) रोहीदास
( ५७ ) बुलाखे
( ५८ ) कृष्णदास जयराम
( ५९ ) जयराम
( ६० ) कृष्णा न्हावी
( ६१ ) चैतन्यस्वामी
( ६२ ) दामाजीपंत
( ६३ ) चोर
( ६४ ) दामाजीपंत
( ६५ ) अनंत
( ६६ ) गोपाळ
( ६७ ) अद्वयकृष्ण
( ६८ ) प्रल्हाद
( ६९ ) चिद्‌घनस्वामी
( ७० ) सदानंद
( ७१ ) मोहणिया

| | |
|---|---|
| ( १९ ) मुक्ताई | ( ७२ ) युक्तानंद |
| ( २० ) वाटेश्वर | ( ७३ ) नरसिंहतीर्थ |
| ( २१ ) सोपान | ( ७४ ) नरहरिमाळो |
| ( २२ ) निवृत्ति | ( ७५ ) शिवदास |
| ( २३ ) चांगदेव | ( ७६ ) परमानंद |
| ( २४ ) चाव | ( ७७ ) रामानंद |
| ( २५ ) भाव | ( ७८ ) शामदास |
| ( २६ ) काम | ( ७९ ) माधवदास लाड |
| ( २७ ) उघेश | ( ८० ) ताता |
| ( २८ ) नरहरि सोनार | ( ८१ ) सर्वोत्तम |
| ( २९ ) कूर्मदास | ( ८२ ) रंगनाथ नाझरकर |
| ( ३० ) सहजानंद | ( ८३ ) गोपाळ दिद्रुंडकर |
| ( ३१ ) रामानंद | ( ८४ ) कोकिळ |
| ( ३२ ) केशवस्वामी | ( ८५ ) शेष नांदेडकर |
| ( ३३ ) रामदासस्वामी | ( ८६ ) गरुड |
| ( ३४ ) माणका | ( ८७ ) निरंजन |
| ( ३५ ) सख्याकवि | ( ८८ ) रामा न्हावी |
| ( ३६ ) मालोपंत | ( ८९ ) जनार्दन न्हावी |
| ( ३७ ) काशीबा | ( ९० ) गंगाधर कोणेरे |
| ( ३८ ) आईआदिपुरुष | ( ९१ ) कंकावती |
| ( ३९ ) मोरेश्वर | ( ९२ ) ताई |
| ( ४० ) संतबा | ( ९३ ) वेणा |
| ( ४१ ) अद्वयनामा | ( ९४ ) वहिणाबाई |
| ( ४२ ) वामनपंडित | ( ९५ ) गिरीबाई |
| ( ४३ ) प्राणगोपाळ | ( ९६ ) बोधला घोळकर |
| ( ४४ ) गोसावीनंदन | ( ९७ ) निळानंद |
| ( ४५ ) लोलिंबराज | ( ९८ ) नरसावा |

| | |
|---|---|
| ( ४६ ) कान्हु पाटक | ( ९९ ) अचळ |
| ( ४७ ) जयदेव | ( १०० ) रायाजी |
| ( ४८ ) नरसी मेहता | ( १०१ ) दिगंबर |
| ( ४९ ) मंबाजी कृष्ण | ( १०२ ) केशव |
| ( ५० ) कौळिक | ( १०३ ) शंकरभट्ट |
| ( ५१ ) मुक्तेश्वर | ( १०४ ) आत्माराम |
| ( ५२ ) राजाई | ( १०५ ) शंकरानंद |
| ( ५३ ) केशवराज | |

हीं सर्व नांवें शके १६०८ पूर्वींचीं आहेत. चिद्घनस्वामीचा शिष्य जो उद्धवचिद्घन तो ह्यावेळीं फारसा प्रसिद्धीस आला नव्हता. जनीजनार्दनाविषयीं लिहितांना उद्धवचिद्घन रामदासाहून लहान असावा असें मीं ह्मटलें आहे. ह्या लेखावरून असेंहि ह्मणतां येतें कीं शके १६०८त उद्धवचिद्घन काव्यरचनेंत नुकताच गुंतला होता व १६०२च्या सुमारास किंवा पांच चार वर्षें अगोदर वृद्ध जो रामदास त्याच्या दर्शनाला तो फार उत्कंठित झाला होता. वरील यादींत मोरेश्वर ह्मणून एक नांव आलें आहे. तें मोरोपंत पराडकराहून निराळें आहे. मोरोपंत पराडकर शक १६५१त जन्मला त्याअर्थीं शक १६०८तील ग्रंथांत त्याचें नांव येणें अशक्य आहे.

ह्या यादींत रामानंद हें नांव दोनदा व दामाजीपंत हेंहि नांव दोनदां आलें आहे. तेव्हां ह्या नांवाच्या दोन दोन निराळ्या व्यक्ती होत्या हें निश्चित आहे. आनंद सांप्रदायापैकीं रामानंद हें नांव शक १६०८ नंतरहि कोठें कोठें वाचण्यांत येतें.

१६०८ शकापूर्वीचे बरेच संत व कवि ह्या यादींत आले नाहींत. जनार्दनस्वामी, जनीजनार्दन, दासोपंत, मुंतोजीबुवा, भानुदास वगैरे मोठमोठीं नांवें ह्या यादींतून गळालीं आहेत. परंतु यादींत आलीं आहेत तीं नांवें शक १६०८चीं किंवा त्यापूर्वींचीं आहेत ही निश्चिति महाराष्ट्रांतील संतांचा व कवींचा कालनिर्णय करण्यास फार उपयोगाची आहे.

देवदासानें ह्या लहानशा काव्यांत १०५ संतांचीं नावें दिलीं आहेत. ह्याखेरीज आणीकहि ज्ञात व अज्ञात असे अनेक संत होते व आहेत असेंहि विधान देवदास करतो. तेव्हां आदिनाथ, मत्स्येंद्र, गोरख, गहिनी, निवृत्ति व ज्ञानेश्वर ह्यांच्यापासून देवदासापर्यंतच्या सहा साडेसहाशे वर्षांत महाराष्ट्रांत किती संत झाले ह्याचा अंदाज होण्यासारखा आहे. स्थूलमानानें संतांची ही संख्या एक हजाराहून कमी नसावी असा, मला जी कांहीं थोडीशी माहिती झाली आहे तीवरून, अदमास होतो. ही एक हजार संख्या ग्रंथकार संतांची आहे. ज्यांनीं अभंग, पदें, ग्रंथ, वगैरे रचना न करतां लोकसंग्रहाचें व लोकोद्धाराचें महत्कृत्य जागोजागीं केलें व त्याचा विशेष बोभाटहि केला नाहीं असे संत, साधू, तापसी व संन्यासी महाराष्ट्रांत त्या कालीं किती झाले असतील ह्याचा अंदाज, महाराष्ट्रांतील प्रत्येक शहरांतून, खेड्यांतून, क्षेत्रांतून व तीर्थांतून जेव्हां संतमालिकेचा ऐतिहासिक शोध सुरू होईल तेव्हां, यथास्थित करतां येईल.

देवदासाचा समकालीन जो उद्धवचिद्घन त्याणें भक्तचरित्र नामक एक चरित्रग्रंथ लिहिला आहे असें ह्मणतात. ह्याच सुमारास नाभाजीनें आपला भक्तमाल नांवाचा ग्रंथ व्रज भाखेंत लिहिला. उद्धवचिद्घनाच्या आधींचे चरित्रग्रंथ ह्मटले ह्मणजे गंगाधरसरस्वतीकृत नृसिंहसरस्वतीचें चारित्र, नामदेवकृत ज्ञानदेवाची आदि, एकनाथकृत ज्ञानदेव वगैरे साधूंवर केलेले अभंग व ओव्या, दामाजीपंतांचीं अनेककविकृत आख्यानें, अनागोंदींतील रामराजाचें व भानुदासाचें चरित्र, वगैरे चारित्रप्रबंध आहेत. शिवाय अलीकडील सन्मणिमाला, संतविजय, संतलीलामृत, भक्तविजय, भक्तलीलामृत, नवनाथभक्तिसार, कथामृतसार, भक्तकथातत्व, केशवचरित्र, रामदासस्वामीच्या बखरी व चरित्रें, जयरामस्वामी, चांगदेव, शिवरामस्वामी वगैरेंचीं चरित्रें, तुकारामचरित्र वगैरे बरेच चरित्रग्रंथ शंभर सवाशे वर्षांपलीकडे झाले आहेत. ह्यावरून साधूंचीं व संतांचीं चरित्रें लिहिण्याची व ऐकण्याची महाराष्ट्रांतील लोकांस किती उत्कंठा व

हौस आहे तें स्पष्ट दिसतें. ह्या जुन्या चरित्रावरून प्राचीन संतांचीं, कवींचीं, वीरांचीं, विद्वानांचीं व कार्यकर्त्यांचीं नवीन ऐतिहासिक पद्धतीनें चरित्रें रचण्याची सध्याची वेळ आहे. येथें एक विशेष बाब नमूद करून ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, ब्रह्मेंद्रस्वामीनंतर मोरोपंतानें संतस्तवनात्मक दोन काव्यें लिहिलीं; त्यांत ब्रह्मेंद्रस्वामीचें नांव नाहीं. तसेंच महीपतीनेंहि ब्रह्मेंद्राचें चरित्र लिहिलें नाहीं इतकेंच नव्हे तर त्याचा उल्लेखहि केला नाहीं.

देवदासाची संतमालिका व तत्कृत व्यंकटेश स्तोत्र ह्यांतील भाषा, प्रयोग, उपोद्घात व उपसंहार एकसारखे आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईल. उपसंहारांत संतचरित्रें वाचल्यापासून फायदे काय होतात ह्याची थोडक्यांत मीमांसा कवीनें केली आहे. थोर पुरुषांचीं ह्मणजे संतांचीं चरित्रें वाचल्यानें विपन्न प्राण्यांना मोक्ष अथवा मुक्ति प्राप्त होते असें देवदास ह्मणतो. थोर पुरुषांवर आलेलीं संकटें, त्यांतून मुक्त होण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न, व त्यांत असतांना त्यांनीं दाखविलेलें धैर्य, हें पाहून व मनन करून, कोणता प्राणी बंधमुक्त होणार नाहीं? संतचरित्रें मनन केल्यानें मानसिक आधि तर नाहींशा होतातच; परंतु शारीरिक व्याधींच्या वेदनाहि कमी होतात, अस कवीचा अभिप्राय आहे. ह्या शेवटच्या विधानाच्या समर्थनार्थ पूर्वेकडील व पश्चिमेकडील प्राचीन व अर्वाचीन इतिहासांतून शेकडो दाखले साक्षेपी वाचकांस आढळतील.

मुक्तेश्वरानें सबंद भारत रचिलें असें देवदास ह्मणतो.

---

# मुकुंद

जशी देवदासानें संतमालिका लिहिली तशीच मुकुंदकवीनेंहि एक संतप्रशस्ति रचिली आहे. ह्या मुकुंदकवीनें देवदासानंतर दहा वीस वर्षांनीं ही प्रशस्ति लिहिली असावी. सदर प्रशस्ति येणेंप्रमाणें:—

## श्रीरामवरद.

प्रबंध ॥ माधव, मोहन, मंगळधाम, मुरारि, मुकुंद, मनोरम, ॥ मधुसूदन, मन्मथकदन, प्रिय, पुराणपुरुषोत्तम, ॥ त्रिविक्रम, मुचुकुंदवरद, गोविंद, ॥ स्तंभेरमतारण, नक्रनिवारण, नारायण, निर्गुण, सद्गुणधाम, घनःशाम, ॥ मनोहर, मुरलीधर, गिरिधर, सुखकर, करुणाकर, पूर्णकृपाकर, दामोदर, दरहरसखा, धनुर्धर, धरणीधरभिदनुज, दनुजदमन, उदधिसदन, एक, जनार्दन, कमळवदन, अरविंदनयन, गरुडध्वज, अच्युत, अनंत, भगवंत, अधोक्षज, कृष्ण, चतुर्भुज, पंकजविष्टरतात, जगन्नाथ, अनाथदीनबंधु, जगज्जीवन, दयासिंधु, सन्मूर्ति, साधुसंततपोधनसज्जनमनरंजन, भवभंजन, भुवनाधीश, भूपाळभूषण, शिशुपाळविनाशन, निर्जरवैरिशासन, जगदुद्धारण, धराधरतल्पशयन, धरामरपाळन, धर्मसंरक्षण, सत्यसनातन, नतसनकादिकनारदअंबरुषीशुकवामदेववाल्मिकव्यासवसिष्ठतपोनिधिअत्रिअगस्तिगौतमगार्ग्यभृषंडिकपिलकात्यायनकौंडण्यकश्यप--भृगुभारद्वाजशांडिल्यशौनकजमदग्निमांडव्यमार्कंडेययाज्ञवल्किहंसबकदाल्भ्यलोमहर्षगर्गाऋष्यशृंगअंगिराविश्वामित्रपाराशरऋषिचयभक्तसमुदयजनकशतदेवहरिनंदांगदनळनीळजांबुवंतहनुमंतध्रवउपमन्यभैनिकाउद्धवविदुरअक्रुरगौतमीपुत्रभीमधनुर्धरधर्म, बिभीषणरामचंद्रपदपंकजस्मरत, यदुसुतअभिवंदित, संतत, कृपावंत॥ चिन्मयवृत्तिस्वानंदवदनींछंद,॥ संतकवितपोधनवृंद,॥ दत्त, एकजनार्दन, राघवसद्गुरु, विठ्ठल, मंगळ, केशव, वामन, रामदास,

जयराम, कृष्ण, रामीरामदास दासबोधकथन, आनंदगोसावी वृंदावन डोलत, दासोपंत, शिवराम सदोदित, विठ्ठलरेणुकानंदन, जनार्दन मंगळमूर्तिगणेशवरद वस्ती बीड निविडभक्ति सनातन ज्ञाननिधि, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपानदेव, मुक्ताबाई, केवळ ईश्वर विसा खेचर, नामा, विठा, नारा, बहिरो पिसा, परसा भागवत, केशवदास, परमानंद, जोगा, विठ्ठल, भानुदास, पुरंदर, वेडानागा, कुरुमदास, चांगा, कनकदास, बडवाळसिद्ध, नागेश, बोखाविठा, संतीदास, मरुळ, माधवदास, चिंतामणि, रामानंद खंदारकर, श्रीरंगीं रंगला रंगनाथ, तसाच जगन्नाथ, तुकोब्बा सदा प्रसन्नपंढरिनाथ, नरहरि सोनार, जनमित्र नागा, नरसी मेहता, नरसीदास, रामानंद, कबीर, रोहिदास, तुळसीदास, जनजसवंत, वना जाट, पिपा रजपूत, सुरदास, सेवीबाई, मिराबाई सदाचित्त रामपायीं, नंदनरामगोसावी आर्यांवरी टीका केली एक नियमें वदावी ते रामस्वरूप दावी, साधुविभुषण माणिकभट्ट धरामरकोविदमंडित कऱ्हापुरीं सतत राहत, भूतदयाघन उदार समर्थ गोसावीनंदन, सिद्धचरित्रकवित्व-सुधामान्य संत विबुधां कृष्णदास बीडकर जनार्दनवंशकुळदीप, कथाकीर्तन गीतप्रबंधझाप स्मरतां हरे ताप, पाप पळे, वृत्ति निवळे, सुख धाम सदा ॥ त्रिंबक रे ध्या अंकोळकर मुखीं नाम रामरमावर भूतदयाचित्तसुधाकर संतसमागमश्रुतिसारविचारनित्यनिरंतरगायनकीर्तननर्तनसुंदर अन्तर्निष्ठ गुरु-भक्तिसात्विक धर्मपरायण कवित्व बरें मानिति पंडितभूसुर वाणी रसाळ पदप्रबंधचालमनोहर ॥ केसरिनाथसंप्रदायज्ञानेश्वर दीनबंधुवैराग्यधुरंधर, त्याचा शिष्य मल्लारिपंत बुद्धिदिवाकर, तया शरण जड-मूढ-कुमति, पाखंड तमहृ, मार्तंड-भक्ति, सदा सांबशिवशंभुशंकरध्याननिरंतर, नामउच्चारसुखकर, स्वरूपी निर्भार, दीनदयापर, उद्धवचिद्घन, मध्वमुनीश्वर, श्रीधरगुरु गंगाधर कोकिळ, श्रीधरबाबा नित्य जपावा ॥ ईश्वर केवळ संत-दयार्णव, साधु निरंजन गोसावी, त्यांचीं पदें उत्तम गावीं, जरी पुण्य असेल प्राप्त ठेवीं, आळस न करावा, सपदि राम गावा, सार्थक जन्म, संत भजावा, ते दीनदयाळ, सदैव कृपाळ, त्यांचे चरणामृत सेवित, प्राप्त स्वरूपस्थिति संतत वदला सुवाची रसाळ, सद्गुरु

विठ्ठल विठ्ठल मंगळ यादवबाळ ॥ ब्रह्मानंद, परमानंद, गोपाळ सुकाळ सदय समीप राम नीळतमाळ प्रतापभवन, विशाळस्वानंदकल्लोळ, वदे रसना करुणावरुणालय, भक्तपालय, नित्य निरामय, चिन्मय केशव, यादव, राघव, कृष्ण, विष्णु, पंकजलोचन, मंगळमूर्ति, सन्मुनि-जीवन, रघुनंदनस्फूर्ति, सद्‌गुणकीर्ति, सुधारसनाम, सुखैकधाम ॥ शंकर-विश्राम श्रीरामभक्त महामुद्गलभट्ट अवतारनिष्ठ करुणापर वदला राम-आर्या निजध्यासें मन-राम नमोनि सकळसंतआंघ्रिद्वयावृत्ति गेली ॥ अपरोक्षानुभव ग्रंथ पहावया लोकितां ग्रंथ स्वानंदसुखप्राप्त नमिला श्रीशंकराचार्यप्रतापनिजसूर्यमतिवर्यशंकरभाष्य कथिलें ॥ तें अनुभव-सुखगौरव भोगिति संत, सर्व कृपा एकजनार्दन देवाधिदेव-प्राप्त मुकुंद सदासुखकंद सच्चिदानंद मृदुपदारविंद ध्यानीं संतत वदे माधव ॥ छ, छ, छ ॥—

एकनाथस्वामीच्या शिष्यपरंपरेपैकीं हा मुकुंद कवि होता. ह्यानें श्रीधर व उद्धवचिद्धन यांचा उल्लेख केला आहे. देवदासानें न वर्णिलेला त्र्यंबक अंकोळकर मुकुंदकवीनें उल्लेखिला आहे व त्याच्या पदांचें मनोहारित्व वाखाणिलें आहे. मोरोपंत, महीपति, अमृतराय वगैरेंचा मुकुंदकवि उल्लेख करीत नाहीं, त्याअर्थीं तो शक १६२२ पासून १६९०पर्यंतच्या काळांत होता असें ह्मणावें लागतें. श्रीधर, निरंजन, मध्वमुनीश्वर, मुद्गलभट्ट, मल्लारिकवि, त्र्यंबककवि, वगैरे शक १६२२च्या सुमारच्या कवींचा व संतांचा समकालीन हा मुकुंद आहे. मुकुंदकवीचे तीस चाळीस प्रबंध मजजवळ आहेत.

७९ श्लोकांचा एक प्रबंध आहे त्यांतील एक श्लोक असाः—

तारादेवि मला कृपा करुनिया सांभाळिते तोषदा. ।
सिद्धीच्या सुखराशि अंतरिं बहू, धान्यें गहू सर्वदा. ॥
काव्यें कोटिशतें प्रबंध रसना बोले जशी शारदा, ।
संतांचे निजमंडळी यदुकुळीं स्वानंदबिंदीं मुदा. ॥ ७२ ॥

अर्थात्, राजाराम छत्रपतीची स्त्री ताराबाई हिचा प्रस्तुत कवीस आश्रय होता.

---

# शिवदिनकेसरी



१. प्रकाश, स्वरूप, आनंद व चैतन्य असे जे चार संप्रदाय त्यांपैकीं प्रकाश संप्रदायांत शिवदिनकेसरीची गणना होते. शिवदिनकेसरी ह्या जोड नांवांतील शिवदिन हें शिष्याचें व केसरी हें गुरूचें नांव आहे. ह्या दोघांचीं सबंद नांवें शिवदिननाथ व केसरीनाथ अशीं त्या संप्रदायास महशूर आहेत. ह्यांची गुरुपरंपरा येणेंप्रमाणें: —



( ३ ) उद्बोधनाथ ( शके १६०९ )

( ४ ) केसरीनाथ ( शके १६४६ )

| | |
|---|---|
| ( ५ ) मल्लारिनाथ ( राशिनकर ) | ( ५ ) शिवदिननाथ (शके १६९५) |
| ( ६ ) रंगनाथ | ( ६ ) नरहरिनाथ |
| ( ७ ) मनोहरनाथ | ( ८ ) लक्ष्मीनाथ |
| ( ८ ) रामचंद्रनाथ | ( ८ ) विठ्ठलनाथ |
| ( ९ ) रघुनाथ | ( ९ ) रघुनाथ |
| ( १० ) रामचंद्र | ( १० ) रंगनाथ |
| ( ११ ) मनोहर ( शके १८२५ ) | ( ११ ) धोंडीनाथ |
| | ( १२ ) रंगनाथ |
| | ( १३ ) रंगनाथ |
| | ( १४ ) दत्तक ( शके १८२५ ) |

२. ही वंशावळ शिवदिनकेसरीच्या शिष्यशाखेंतील खानदेश व दक्षिण महाराष्ट्र ह्या दोन प्रांतांतील मंडळीकडून आणि केसरीनाथानीं सिद्धान्तसार नांवाचा दशप्रकरणात्मक एक ग्रंथ केला आहे त्याच्या

उपसंहारावरून घेतली आहे. हींत शक १२१२ त अथवा शक १२०९ त असणाऱ्या ज्ञानेश्वरापासून शक १६०९ त समाप्त झालेल्या उद्बोधनाथापर्यंत ४०० चारशें वर्षांत एकंदर पांच पुरुष दिले आहेत. ह्मणजे दर पुरुषास सरासरीनें ८० ऐशीं वर्षें पडतात. अर्थात् ह्या गुरुशिष्यमालिकेंत कोठें तरी खंड आहे. तो बहुशः गैबीनाथ व सत्यामळनाथ ह्या दोन नांवांमध्यें असावा. गुरुशिष्यांची दरएक पिढी ३० तीस वर्षांची धरली तर एकंदर तेरा पुरुष लागतात. पैकीं आपल्याजवळ सध्यां ५ पांच आहेत. अर्थात् आठ पुरुषांचा तपशील मिळावयाचा आहे. आतां हे पांच पुरुष योगी होते व ह्यांपैकीं ज्ञानेश्वराखेरीज प्रत्येक जण ८० किंवा १०० वर्षें जगला, अथवा एकच जण ३०० किंवा चारशें वर्षें वांचला, असें धरल्यास सर्वच ठीक आहे. परंतु ज्यापक्षीं विवेकानंदादि प्रस्तुतकालीन राजयोगी व हटयोगी भर तारुण्यांत देह सोडतांना आपण प्रत्यक्ष पहात आहोंत व शंभर वर्षांच्या पुढें कोणी योगी जगला असा निश्चय करण्यास जसा मिळावा तसा समर्थक ऐतिहासिक पुरावा अद्यापपर्यंत मिळाला नाहीं, त्यापक्षीं ह्या परंपरेंत कोठेंतरी खंड आहे असें धरून चालावें हेंच मानवी इतिहासाला भूषण आहे.

३. ह्या पंथांतील उद्बोधनाथाचें मूळचें नांव उद्धवनाईक ठिपसे. बार्शीजवळ राशीन नांवाचें गांव आहे तेथें हा यजुर्वेदी ब्राह्मण सराफी करून स्नानसंध्या व भगवद्भजन ह्यांत निमग्न असे. ह्याच गांवांत कोणीएक घरभरिणी स्त्री मोठी अधिकारसंपन्न व अपरोक्षसाक्षात्कारिणी होती. ह्या साध्वीच्या समागमें उद्धवनाईक काशीयात्रेस जात असतां वाटेंत सदर साध्वीची गैबीनाथाशीं गांठ पडली व त्यानें तिला उपदेश दिला व तिचें सांप्रदायिक नांव गुप्तनाथ ठेविलें. ह्या गुप्तनाथानें उद्धवनाईकास उपदेश केला व त्याचें नांव तेव्हांपासून उद्बोधनाथ असें प्रचलित झालें. उद्बोधनाथ राशिनांत कालक्रमण करीत असतां तेथें कोणी केसोपंत नांवाचा एक मदोन्मत्त मामलतदार होता. तो उद्बोधनाथाची

बहुत निर्भर्त्सना करी. एकदां हुजरून मामलतदारमजकुरास कांहीं कामानिमित्त मोंगलाई दपटशा आला. तेव्हां उद्बोधनाथांच्या साहाय्यानें केसोपंत आलेल्या संकटांतून कसेतरी पार पडले, तेव्हांपासून त्यांनीं नोकरीला रामराम ठोकला, आणि पुढें केसरीनाथ ह्या नांवानें जगांत वर्तूं लागले. केसरीनाथांनीं शिवदिननाथास शिष्य ह्मणून व उद्बोधनाथाचा पुत्र मल्लारि यांस गुरुपुत्र ह्मणून उपदेश दिला. तेव्हांपासून शिवदिनकेसरीची शिष्यपरंपरा व राशिनकर मल्लारिनाथाची शिष्यपरंपरा आजपर्यंत अनुक्रमें पैठण व राशिन ह्या गांवींहून चालत आहे. उद्बोधनाथाची व गुप्तनाथाची समाधि राशिनास, केसरीनाथाची समाधि ज्ञानोबाच्या आळंदीस पोवारांच्या धर्मशाळेंत, व शिवदिननाथाची समाधि पैठणास आहे. उद्बोध, केसरी व शिवदिन ह्यांचा समाधिकाल शक १६०९ वैशाख वद्य ९, शक १६४६ मार्गशीर्ष शुद्ध २, व शक १६९६ माघी शिवरात्र, अनुक्रमें आहे.

४. उद्बोधनाथाचीं कांहीं पदें, केसरीनाथाचा शक १६३८ त रचिलेला सिद्धान्तसार व कांहीं पदें व शिवदिननाथाचीं बरींच पदें मजजवळ आहेत. पैठणास शिवदिनकेसरीचीं शेकडो पदें त्यांच्या वंशजांजवळ आहेत. ह्या पंथाची शिष्यपरंपरा महाराष्ट्रांत बऱ्याच ठिकाणीं पसरलेली आढळते.

५. ह्या पंथाच्या परंपरेचा श्लोक असा:—

नरहरिउद्बोधं गुप्तगैबीस्वरूपम्
गुरुपदजपसत्यं ज्ञाननिवृत्तिनाथम् ।
पलपलस्मरणीयं गैनिगोरक्षनाथम्
अभयकरमच्छेंद्रं आदिनाथं नमामि ॥१॥

६. सदर पंथाची पुंगी, शिंगी वगैरे चिन्हें आहेत.

# दासोपंत

---

१. बेदरच्या ब्राह्मणी पादशाहांच्या रियासतींत नारायणपेठ ह्मणून एक तालुक्याचें ठाणें होतें. तेथील देशपांड्ये दिगंबरपंत गाल्वगोत्री ह्यांना पार्वतीबाईच्या पोटीं शके १४७३, भाद्रपद वद्य ८स ह्मणजे इसवी सन १५५१ त, मुलगा झाला. त्याचें नांव दास. त्यालाच पुढें दासोपंत ह्या नांवानें लोक ओळखूं लागले.

२. एकनाथस्वामींचे गुरू जनार्दनपंत हे दिगंबरपंताचे समकालीन होत. हे दत्तपंथी होते. एकदां दुष्काळ पडला असतां, पातशाही रसद दिगंबरपंताचे हातून वेळेवर पोंहोचली नाहीं. सबब, दिगंबरपंताला आपला मुलगा जो दासोपंत त्यास पातशाहाजवळ ओलीस ठेवावें लागलें. रसद महिन्याच्या आंत पोंहोचवावी, नाहीं तर मुलगा बाटविला जाईल, अशी ह्या ओलीची अट होती. अटीच्या महिन्याचा शेवटला दिवस आला, तरी दिगंबरपंताच्या रसदीचा पत्ता कांहींच लागेना. इकडे तर, दासोपंताला भरदरबारांत यवनी धर्माची दीक्षा देण्यास काजी सिद्ध झाला. इतक्यांत दिगंबरपंताकडून एक महार रसद घेऊन आला अशी वर्दी पोंहोचली. महार रसद गुजरून एकाएकीं गुप्त झाला!

३. ह्या आकस्मिक दैवी कृपेनें दासोपंताच्या वृत्तींत चमत्कारिक फरक पडून त्या दिवसापासून तो विरक्त झाला व हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन करण्याचा त्यानें निश्चय केला. ह्यावेळीं दासोपंताचें वयमान अठरा वीस वर्षांचें असावें.

४. दासोपंत शके १५३७, माघ वद्य ६स ह्मणजे इसवी सन १६१६ त समाधिस्थ झाला. त्याच्या वंशजांची याद येणेप्रमाणें :—

१ दिगंबर
|
२ दासोपंत (ग्रंथकार---इ०स० १६१६)
|
३ दत्ताजीपंत
|
४ दासोपंत
|
५ विश्वंभर
|
६ दासोबा
|
७ दत्ताजी
|
८ देवाजी
|
९ विश्वंभर
|
१० गुरुबोवा
|
११ अवधूत
|
१२ अत्रिवरद
|
१३ विश्वंभर (वर्तमान--इ० स० १९०२)

५. दासोपंत ग्रंथकार जोगाईच्या आंब्यास रहात असत. आंब्याचे गार्ग्यगोत्री देशपांड्ये दासोपंताचे शिष्य होत. देशपांड्यांच्या घराण्यांतील शितोपंत हा दासोपंताचा पहिला शिष्य झाला. दासोपंताच्या वंशजांचीं दोन घरें सध्यां जोगाईच्या आंब्यास आहेत. त्यांना थोरलें

देवघर व धाकटें देवघर अशा संज्ञा आहेत. दासोपंताचे एक वंशज सध्यां नागपुराजवळील चंद्रपुरास व दुसरे बेदराजवळील बावगीस आहेत. आंबे येथील देवघरांत दासोपंताचे खालील ग्रंथ आहेत :—

१ गीतार्णव.
२ पदार्णव.
३ गीतार्थबोधचंद्रिका.
४ वाक्यवृत्ति.
५ ग्रंथराज.
६ अवधूतराज.
७ दत्तात्रेयमाहात्म्य ( संस्कृत ).
८ पंचीकरण पासोडी.

६. पैकीं गीतार्णव हा ग्रंथ ओवीबद्ध असून सुमारें सवा लाख आहे. ह्याच्या एकट्या अठराव्या अध्यायाच्या सोळा हजार ओव्या आहेत. पदें सुमारें पांच हजार आहेत. मूळ पदेंहि सवा लाख होतीं. गीतार्थबोधचंद्रिकेचे १८ अध्याय आहेत. वाक्यवृत्ति गद्य असून प्रश्नोत्तररूप आहे. मराठींतील पहिला गद्य ग्रंथ, मला माहित असलेला, हाच आहे. अवधूतराज व ग्रंथराज हेहि वेदान्तपर ग्रंथ आहेत. सारांश, दासोपंताचा एकंदर उपलब्ध ग्रंथ सुमारें दीड लाख आहे. हा सबंध छापण्याचें काम कोण करील तो करो! दासोपंताच्या लेखांपैकीं पदेंच तेवढीं काव्यांत मोडतील. बाकीचे सर्व ग्रंथ वेदान्तशास्त्रपर आहेत.

७. वर निर्दिष्ट केलेले ग्रंथ जोगाईच्या आंब्यास रा० रा० श्रीधर अवधूत देशपांड्ये मोहरीर, दासोपंताच्या शिष्यपरंपरेंतील घराण्यापैकीं एक सद्गृहस्थ, ह्यांजपाशीं आहेत.

८. दासोपंताच्या पंचीकरणासंबंधानें एक बाब नमूद करण्यासारखी आहे. ती ही कीं, हें सबंद पंचीकरण एका पासोडीवर लिहिलें आहे. ही पासोडी बरोबर चोवीस हात लांब व अडीच हात रुंद आहे.

९. ह्या आठ ग्रंथांखेरीज दासोपंतानें दुसरे अनेक संस्कृत आगम-निगमादि आचारग्रंथ लिहिले आहेत; परंतु ते प्राकृत नसल्यामुळें त्यांची विल्हे दिली नाहीं.

१०. दासोपंत, एकनाथस्वामी, मोरोपंत, वगैरे प्राकृत कवींचे व ग्रंथ-कारांचे ग्रंथ पाहिले ह्मणजे एक गोष्ट स्पष्टपणें ध्यानांत येते; ती ही कीं, यूरोपियन कर्ते व शास्त्रज्ञ ह्यांच्यापेक्षांहि कित्येक मराठी जुने ग्रंथकार जास्त ग्रंथ प्रसवणारे होते. खुद्द दासोपंताविषयीं अशी आख्यायिका सांगतात कीं, ते दररोज एका ढबूची शाई ग्रंथलेखनाच्या कामीं जिरवीत असत.

११. वरील हकीकत दासोपंताच्या एका ओवीबद्ध चरित्रावरून व इतर माहितीवरून लिहिली आहे. सदर चरित्र रा० रा० श्रीधर अवधूत देशपांड्ये ह्यांच्याजवळ आहे.

---

# मुधेश चांगा

१. जोगाईच्या अंब्यास रा० रा० नारायणनाईक वांजरखेडे या नांवाचे एक गृहस्थ रहातात. त्यांच्या घराण्यांत मुधेश चांगा ह्या सिद्ध-पुरुषाचा उपदेश अद्याप चालतो. मुधेश चांगा याचें एक अभंगबद्ध चरित्र नारायणनाईकांनीं माझ्या स्वाधीन केलें. हें चरित्र, मुधेश चांगा ह्याचा वंशज शामजी गोसावी नामेंकरून एक भगवद्भक्त झाला, त्यानें लिहिलें. ह्या चरित्राचे सात अध्याय होते. परंतु मला जी पोथी मिळाली आहे तींत पहिले दोन अध्याय नाहींत. बाकी राहिलेल्या पांच अध्यायांत अभंग येणेंप्रमाणें आहेत :—

| | | |
|---|---|---|
| अध्याय तिसरा, | १०९ | अभंग |
| अध्याय चवथा, | १४६ | अभंग |
| अध्याय पाचवा, | १२४ | अभंग |
| अध्याय सहावा, | १६४ | अभंग |
| अध्याय सातवा, | २०९ | अभंग |
| | ७४४ | अभंग |

पोथीचीं एकंदर चाळीस पानें आहेत व पहिल्या पानाला तिसऱ्या अध्यायास आरंभ केला आहे. ह्मणजे ही प्रत ज्या पोथीवरून केली त्या पोथींत पहिले दोन अध्याय नव्हते व तींतहि प्रारंभ तिसऱ्या अध्यायापासूनच केलेला होता. चरित्राचा उपसंहार शामजी गोसाव्यानें येणेंप्रमाणें केला आहे :—

शके सोळासे ॥ असती सदुसष्ट ॥
संवत्सर स्पष्ट ॥ क्रोधन आसे ॥ २०१ ॥
आश्विन शुद्ध ॥ विशयादशमीस ॥
ग्रंथ समाप्तीस ॥ जाला आसे ॥ २०२ ॥

शामजी गोसावी ॥ चरित्र वदत ॥
भावें शरणांगत ॥ संता पायीं ॥ २०९ ॥

येणेंप्रमाणें हें चरित्र शक १६६७ त लिहिलें गेलें.

२. शामजी गोसावी मुधेशचांग्यापासून आपणा स्वतःपर्यंत वंशावळ अशी देतो :—

चांगया उपदेशी ॥ पुत्र तो विठ्ठल ॥
तयाचा निर्मळ ॥ चांगदेव ॥
चांगदेवा पुत्र ॥ प्रल्हाद पैं जाहाला ॥
नरहरी जन्मला ॥ तया कूळीं ॥
नरहरीसी पुत्र ॥ जाला जनार्दन ॥
मुधासंनिधान ॥ तया पोटीं ॥
मुधा त्याच्या पोटीं ॥ गोपाळ गोसावी ॥
त्याची चांगदेवीं ॥ निष्ठा वहू ॥
तयाचे उदरीं ॥ अवतार चांगयाचा ॥
जाला सत्यसाचा ॥ योगसिद्धी ॥
कोनेर गोसावी ॥ तया सिद्ध नांव ॥
तयाचें वैभव ॥ काय वानू? ॥
कोनेरीचा पुत्र ॥ शामजी गोसावी ॥

मुद्धेश चांगदेव समाधिस्थ झाल्याचाहि अभंग शामजी देतो

शके १४०० चौदाशे ॥ असती सत्तावीस ॥
संवत्सर नाम ॥ क्रोधन असे ॥ १४० ॥
ज्येष्ठ शुद्ध सप्तमी ॥ रविवार असे ॥
नक्षत्र पुष्य योग- ॥ सिद्धि आसे ॥ १४१ ॥
पांडुरंगमूर्ति ॥ आणुनि ध्यानासी ॥
आत्मा ब्रह्मांडासी ॥ नेते जाले ॥ १५१ ॥ अध्याय ७ ॥

वरील अभंगांवरून मुधेश चांगदेवापासून शामजी गोसाव्यापर्यंत वंशावळ येणेंप्रमाणें समजते :—

(१) मुधेश चांगा अथवा चांगदेव (शक १४२७)
|
(२) विठ्ठल
|
(३) चांगदेव
|
(४) प्रऱ्हाद
|
(५) नरहरि
|
(६) जनार्दन
|
(७) मुधोजी
|
(८) गोपाळ
|
(९) चांगदेव
|
(१०) कोन्हेर
|
(११) शामजी गोसावी (शक १६६७)
|

शामजी गोसाव्यापुढील वंशावळ रा. रा. नारायणनाईक यांः रखंडे येणेंप्रमाणें देतात:—

|
(१२) देवाजी
|
(१३) भगवंत
|

( १४ ) चांगदेव
|
( १५ ) मुक्तेश्वर
|
( १६ ) विठ्ठल ( वर्तमान १८२९ शक )

ह्या मुधेश चांगदेवाचें आडनांव मरुद्गण. हा मूळचा रहाणारा नारायणडोहचा. ह्याच्या वडिलाचें नांव मुधोपंत व मातुश्रीचे नांव रुक्मिणी. ह्या नवराबायकोस पुत्रसंतान वृद्धापकाल होऊनहि झालें नव्हतें. रुक्मिणीनें तापीतीरनिवासी वटेश्वर चांगदेवाच्या समाधीपुढें अति तीव्र अनुष्ठान केलें. तेव्हां स्वप्नांत येऊन वटेश्वर चांगदेवांनीं रुक्मिणीस सांगितलें कीं मी तुझ्या पोटीं लवकरच अवतार घेईन. नंतर रुक्मिणी आपल्या घरीं येऊन राहिली असतां, प्रातःकाळीं कोणी एक गोरखपथी कानफाट्या भिक्षेस आंगणांत आला आणि अलक ह्मणून आरोळी करता झाला. रुक्मिणी कानफाट्यास घालण्याकरितां भिक्षा आणण्यास घरांत जाऊन परत जों येते तों काय चमत्कार झाला कीं, कानफाट्या तर कोठें दिसत नाहीं, पण एक पाचचार वर्षांचें गोजिरवाणें मूल आंगणांत खेळत आहे! मुलाला पहातांच रुक्मिणीस पान्हा फुटला व वटेश्वरांनीं देऊं केलेला मुलगा तो हाच अशी तिची, तिच्या नवऱ्याची व ग्रामस्थांची खात्री झाली. हा मुलगा पुढें मुधेश चांगदेव ह्या नांवानें अलौकिक साधुत्वामुळें लोकांत व इतिहासांत प्रसिद्ध झाला.

३. हा मुधेश चांगदेव वटेश्वर चांगदेवाहून अगदीं भिन्न होय हें मुद्दाम सांगितलें पाहिजे असें नाहीं. शामजी गोसाव्यानें मुधेश चांगदेव वटेश्वर चांगदेवाचा अवतार होता असें वर्णन केलें आहे, तें आपल्या धर्मांतील सिद्धांतांना पूर्णपणें धरून आहे. मुक्ताबाईचा उपदेश ज्या वटेश्वर चांगदेवानें घेतला तो यद्यपि तापीतीरीं समाधिस्थ झाला, तत्रापि त्याच्या कांहीं वासना अतृप्त राहिल्यामुळें तो रुक्मिणीच्या पोटीं पुनः अवतीर्ण झाला. ह्या मरुद्गण कुळांत मुधेश चांगदेवानंतर आणीक

दोन चांगदेव झाले. मुधेश चांगदेवापूर्वीं सुमारें २०० दोनशें वर्षें झालेला वटेश चांगदेव तर १४०० चवदाशे वर्षें जगला अशी कथा आहे. त्याचा अर्थ मी एवढाच समजतों कीं वटेश्वर चांगदेवापूर्वीं चवदाशे वर्षेंपर्यंत चांगदेव हें नांव मोठमोठ्या कार्यकर्त्या व योगयुक्त पुरुषांनीं धारण केलें असावें ; व तें नांव ज्या विख्यात व्यक्तींनीं धारण केलें तोच पुरुष मी आहें असें हा वटेश्वर चांगदेव निश्चयानें व तत्वदृष्टीनें ह्मणत असे.

४. रा. रा. बळवंत खंडोजी पारख ह्यांनीं ज्ञानेश्वराचें एक चरित्र लिहिलें आहे त्यांत ह्या दोन्हीं चांगदेवांची गफलत व भेसळ केलेली आहे. सुधारक वर्तमानपत्रांत भारद्वाजानें ज्ञानेश्वरावर जो लेख लिहिला आहे त्यांतहि हे दोन्ही चांगदेव एकच भासविले आहेत. हरिभक्तिपरायण श्रीपतिबोवा भिंगारकर यांनीं वटेश्वर चांगदेव व मुधेश चांगदेव हे दोन भिन्न व्यक्ति होते असें स्पष्ट ह्मटलें आहे व तें साधार आहे. रा. भिंगारकर रुक्मिणीला मुधेश चांगदेवाची बायको ठरवतात तें मात्र शामजी गोसावी मरुद्गण ह्यानें लिहिलेल्या ह्या मजजवळील चरित्राच्या विरुद्ध आहे. ह्या चरित्रांत रुक्मिणी चांगदेवाची आई व मुधोपंताची बायको होती असें ह्मटलें आहे; आणि ह्या चरित्राची परंपरा पहातां हेंच ह्मणणें खरें आहे असें वाटतें.

५. मुधेश चांगदेवाचा कांहींच ग्रंथ किंवा उक्ति मजजवळ नाहीं. वटेश्वर चांगदेवाची ज्ञानेश्वराला पाठविलेली उत्तरपंचविशीची एक अशुद्ध, शेदोनशे वर्षांअलीकडे लिहिलेली, लेखी पोथी मजजवळ आहे. वटेश्वर चांगदेवाचे अभंग छापलेले प्रसिद्ध आहेत. परंतु मूळ भाषा बदलून अशुद्ध व अलीकडील रूपें त्याच्या अभंगांत निरनिराळ्या संपादकांनीं ठेवून दिलीं आहेत. अलीकडील साठसत्तर वर्षांत छापलेल्या बहुतेक सर्व मराठी पोथ्यांत मूळ ग्रंथकाराच्या वेळची भाषा जशीच्या तशी छापलेली क्वचित् आढळेल, प्रायः आढळावयाचीच नाहीं.

---

# कृष्ण याज्ञवल्कि

१. ज्ञानेश्वराच्या अनुभवामृतावर शिवकल्याणानें नित्यानंदैक्यदीपिका नांवाची टीका लिहिली आहे. ही टीका डा० अण्णा मोरेश्वर कुंटे यांनीं शक १८१० त प्रसिद्ध केली. शिवकल्याणानें आपल्या टीकेचा काळ

> कलियुग प्रथमचरण । विख्यात शक शालिवाहन ॥
> पंधरा शत सत्तावन । संवत्सरगणना ॥ ४२९
> युव नाम संवत्सर । जेथें शुभफळाचा पडिभर ॥
> मास मार्गशीर्ष मास सिशिर । पौर्णिमासी ॥ ४३०,
>
> प्रकरण १० ॥

ह्मणजे शक १५५७ दिला आहे. शिवकल्याणाची गुरुपरंपरा येणेंप्रमाणें :—



५ निवृत्ति     ५ वटेश्वर
|     |
६ ज्ञानदेव     ६ चक्रपाणी
|
७ विमळानंद
|
८ चांगा केशवदास
|
९ जनकराज
|
१० नृसिंह
|
११ हृदयानंद
|
१२ विश्वेश्वर
|
१३ केशवराज
|
१४ हरिदास
|
१५ परमानंद
|
१६ नित्यानंद
|
१७ शिवकल्याण ( शक १५५७ )

मुक्ताबाईपासून शिवकल्याणापर्यंत एकंदर १४ व्यक्ति ३४० वर्षांत होतात व दर व्यक्तीस सुमारें २४।२५ वर्षे पडतात. अर्थात् ही परंपरा पूर्णपणें विश्वसनीय आहे. हिच्यांत खंड वगैरे बिलकुल नाहीं.

२. शिवकल्याणानें दिलेल्या आपल्या गुरुपरंपरेंत एक विशिष्ट गोष्ट आहे. ती ही कीं हा टीकाकार मुक्ताबाईचा गुरू गोरखनाथ होता असें स्पष्ट ह्मणतो:—

असो. हे एका हेलावयाची मातु ॥
आतां तोचि श्री गोरक्षनाथु ॥
जो श्री आदिनाथाचा नातु ॥
मच्छेंद्रद्वारा ॥ ३९४ ॥
तो तैसाचि रसु वोसंडला ॥
तंव मुक्ताबाईया प्राशिला ॥
प्राशून तैसाचि उरला ॥
तो वटेश्वरा दिधला ॥ ३९९ ॥

इतर अनेक ठिकाणीं अशी माहिती मिळते कीं ज्ञानेश्वर, सोपान व मुक्ताबाई ह्या तिघांस निवृत्तिनाथांनीं उपदेश दिला. परंतु निवृत्तिनाथांचा आजेगुरु जो गोरखनाथ त्यानें मुक्ताबाईला उपदेश दिला, असें शिवकल्याण शक १९९७त ह्मणजे सरासरीं २०० वर्षांपूर्वीं ह्मणतो. तेव्हां ही विशिष्ट गोष्ट बरीच विचारणीय आहे.

३. अमृतानुभवावरील ही नित्यानंदैकदीपिका शिवकल्याणानें देवगिरीस ह्मणजे दौलताबादेस राहाणाऱ्या गोपाळ याज्ञवल्कि ह्या भाग्यवान पुरुषाच्या विनंतीवरून रचिली. गोपाळ याज्ञवल्कीचा पिता कृष्ण याज्ञवल्कि होय. ह्या कृष्ण याज्ञवल्कीनें कथाकल्पतरू नांवाचा एक ग्रंथ केला आहे. गोपाळ याज्ञवल्कि शक १९२७ पासून १९९७ पर्यंत होता. असें धरलें तर कृष्ण याज्ञवल्कि १९०० पासून १९२७ पर्यंत होता असें निष्पन्न होतें. ह्मणजे हा कृष्ण याज्ञवल्कि एकनाथाच्या वेळीं होता. ह्याचा कथाकल्पतरू हा ग्रंथ छापिला आहे. परंतु त्याची भाषा संपादकांनीं व लेखकांनीं अज्ञानानें आधुनिक करून टाकिली आहे. उदाहरणार्थ, मजजवळ असलेल्या एका जुन्या पोथींतून ह्याच्या भाषेचा एक मासला देतों. तो छापील प्रतींतील भाषेशीं वाचकांनीं ताडून पहावा.

स्तबक ३

मग नाम ठेविलें कृष्णु ॥ मग तो निघाला ब्राह्मणु ॥
तवं आली विडा घेउनु ॥ पूतना ते ॥ ९ ॥
मग ह्मणे जन्मेजयो ॥ एकु असे जी संदेहो ॥
काळया कें जाला निर्भयो ॥ यमुनेमाजि ॥ ७६ ॥
तवं बोभाइला चळचरू ॥ सौभरी तुं महापवित्रु ॥
तुज असतां परिवारू ॥ भक्षिला गरुडें ॥ ७८ ॥
तवं गोकुळीं वर्तला कोल्हाळू ॥ जळीं बुडाला जी गोपाळू ॥
गोवळीं कथिला सकळू ॥ वृत्तांतु त्याचा ॥ ९१ ॥
परि तैसियातें हि न मनीतु ॥ साउमा चालिला अनंतु ॥
तवं देखिला धुधुवातु ॥ काळया तो ॥ ६४ ॥
तवं कोण्हे एके अवसरीं ॥ वत्सें चारितुसे मुरारी ॥
गोवळां सहित तीरीं ॥ काळिंदीचा ॥ २९ ॥
आतां असौ हे विस्तारणा ॥ जो परिपूर्ण त्रिभुवना ॥
नाना वेषांचया रचना ॥ वेगळा तो ॥ ४५ ॥

४. ह्या भाषेची एकनाथाच्या भाषेशीं तुलना करितां, कृष्ण याज्ञवल्कि एकनाथाहून वडील होता व दासोपंताच्या भाषेसारखी ह्याची भाषा होती, असें दिसतें.

---

# जयरामसुतकृत संतमालिका

१. देवदासकृत व मुकुंदकृत संतमालिकाप्रमाणेंच जयरामसुत नांवाच्या कवीनें एक संतमालिका रचिली आहे. ह्या संतमालिकेंत शक १६५० त समाधिस्थ झालेल्या श्रीधरकवीचा उल्लेख आहे; परंतु शक १६५० पासून १६६० च्या सुमारास प्रसिद्धीस आलेल्या कृष्ण-दयार्णवाचा नामनिर्देश नाहीं. तसाच पंढरपूरच्या प्रल्हाद बडव्याचें नांव जयरामसुत देतो. तेव्हां हा जयरामसुत शक १६२० पासून शक १६४० पर्यंत हयात होता असें ह्मटलें असतां चालण्यासारखें आहे. शक १६२० च्या पूर्वीं ३०।४० वर्षें हा कवि असावा. कारण तो आपल्याला जयरामस्वामीचा शिष्य ह्मणवितो. जयरामस्वामी वडगाव-कर शक १५९४ त वारले. त्यांच्या वेळीं जयरामसुत एक दोन वर्षें तरी शिष्यवृत्ति स्वीकारून रहात असला पाहिजे. अर्थात् हा जय-रामसुत कवि शक १५८० पासून शक १६४० पर्यंतच्या काळांत होता असें दिसतें. ह्याची संतमालिका अशी:—

## जयरामसुतकृत संतमालिका

हरिजन हे हरिगुरुभजनें जन तारुनि आपण तरले । निजभक्तिसुखें अवतरले । धृ० । तारकमार्ग दाविति लोका । बोधें हरिती भेदभयशंका । जे संसारसागरीं नौका । नामें त्यांचीं पावन ऐका । ब्रह्मा, शंभु, कुबेर, प्रभंजन, इंद्र, चंद्र, यम, भास्कर, पावक, वाक्पति, वरुण, वसिष्ठ, परा-शर, वाल्मिक, व्यास महाकवि, गौतम, विश्वामित्र, अगस्ति, भार्गव, ऋषभदेव, सनकादिक, नारद, कपिल, बकदाल्भ्य, कश्यप, आस्तीक, शुक, वामदेव, श्रुतदेव, शमीक, जडभरत, दत्तऋषि, याज्ञवल्कि, भृगु, भरद्वाज, उपमन्य, कदर्यु, पुंडलिकमुनि, मुद्गल, कवि, हरि, आंतरिक्ष, पिप्पलायन, वीरहोत्र, प्रबुद्ध, चमस्कर, भाजन, द्रमिळ, आत्मप्रियसुत शौनक, वृहदश्व, मार्कंडेय, असित, देवल, दुर्वास, देवद्विज, सुदेव, संजय, जयमिनि, वयशंपायन, सन्मुख, हरिश्चंद्र, इक्ष्वाकु, आईला, नळ, चंद्र-

हास्य, मुचकुंदमुनि, ध्रुव, अंबरीष, पृथु, लक्ष्मण, गुहक, भरत, भक्त रुक्मांगद, अंगद, धर्मांगद, सुग्रीव, बिभीषण, जांबुवंत, हनुमंत, सुदामा, जनक, बळि, प्रल्हाद, अजामीळ, गणिका, गरुड, गजेंद्र, पिंगळा, विदुर, व्याध, गंगासुत, अर्जुन, धर्म, भीम, सहदेव, सुभद्रा, नकुळ, पृथा, गोपाळ, गोपिका, उद्धव, यदु, अक्रुर, परिक्षिति, शेष, श्रियाळ, जटायु, जानकी, शर्वाणी, शबरी, अनुसूया, सरस्वति, भागीरथी, यमुना, मैत्री, कमळजा, अहिल्या, अरुंधती, संध्यावळी, त्रिजटा, देवहूति, पांचाळी, रुक्मिणी, राधा, ऋषिपत्ना, चंद्रावळी, उग्रसेन, वसुदेव, देवकी, कुब्जा, नंद, यशोदा ॥ १ ॥

जाले नित्यमुक्त निजज्ञानें । धाले बोधसुधारसपानें । त्यजिले काम-क्रोध अभिमानें । त्यांचीं परिसावीं अभिधानें । श्रीशंकराचार्य जगद्गुरु भाष्यकार, श्रीधर, मधुसूदन, हस्तामळक मुकुंदराज नृप जैतपाळ जोतुरा-नंद, मछिंदर, मीन, गोरक्ष, भर्तृहरि, सदानंद, गैनी, चौरंगी, परमहंस कृष्णद्वैपायन, मध्व, महामुद्गल, नारायण, श्रीनिवास, जयदेव, निवृत्ति, ज्ञानेश्वर, सोपान, चांगया, मुक्ताई, रेवणसिद्धेश्वर, मरळसिद्ध, जालंदर, अच्युत, दामोदर, सारंग, सरस्वति, संतिदास, नवलक्ष, साळया, निपट, चर्पट, नारसिंह, वडवाळ, वटेश्वर, चांद, बोधला, विक्रम, गोपीचंद, कानिफ, मुक्ता, मैनावती, मृत्युंजय, मालो, नरहरि, वछा, बंका, परमा-नंद, विसोबा खेचर, नामदेव, हरिदेव, विठोबा, नारा, गोंदा, महादा, परसा भागवत, सिल्पिकार गोविंद, सांवता, चोखामेळा, पिसा बहिरा, कान्हो पाठक, नरसी मेहता, जनमित्र नागा, पुरंदर विठ्ठल, गोरा कुलाळ, सेना न्हावी, कूर्मदास, हरिदास, कान्हया, मलुकदास, रोहिदास, त्रिलोचनद्विज, नरहरि सोनार, लतिफा, धना जाट, हरिवल्लभ, दामा, रामानंद, उदासी, नानक, सहजानंद, कबीर, कमाल, किशोर, सखा, सुरदास, सुधैया, तुळसीदास, पिपाजी, सजणा, रामदास, जयवंत, बाजिंदा, शाहुसेन, शाहुशमना, माधव, प्रेमानंद, मदलसा, कान्होपात्रा, मिरा, हरि, वल्लभ, कृपा, जनी, बहिनी, करमाई ॥ २ ॥

कोण्ही ब्रह्मनिष्ठ गुरुभजनीं। योगी वीतरागी रत सगुणीं। भाविक नामकीर्तनीं। मौनी सज्जन श्रवण करावें श्रवणीं। कनकदास, अज्ञान-सिद्ध, नागेश, मौनि, रेणुकानंदन, भानुदास विख्यात, जनार्दन, एकनाथ, गुरुभक्त रामय्या, पुरुषोत्तम, लीलाविश्वंभरचिंतामणि मुक्तेश्वर, अवधूत दिगंबर दासोपंत, मुद्गल कृष्ण, रमावल्लभ, लोलिंबराज, संतोष, निंबया, गंगाधर, कोनेरि, मुरारि, शांतलिंग, श्रीकृष्णयोगिया, कृष्णदास जयराम, तुकोबा, रामदास, आनंदमूर्ति, मल्लारि, पूर्ण शिवराम, बोधला, रघुपति, शेष, निरंजन, केशव, विश्वनाथ, वामन, विठ्ठल कवि, रंगनाथ, कल्याण, चंदसखी, मानपुरी, रुक्मणापंत, चिद्घन, रामकृष्ण, वासुदेव, माधव, तुकयाबंधुकुमर नारायण, मध्वमुनेश्वर, निपट निरंजन, पंढरिवास प्रल्हाद, साधु जयराम, काशी, गोसावीनंदन, राघवचिद्घन, हरिनारायण, श्रीधर, गुरुगोपाळ, अनंत। महंत असे बहु संत जगीं किति गुप्त प्रकट जड मूढ पिशाच्च बालोन्मत्त विदेही निरंकुश। वर्णियले हरिभक्त चतुर्विध मुक्त विरक्त मुमुक्षु उपासक। सर्व गुणें जाले भगवत्पर। जातिविजाति ह्मणोंचि नये। मग पावन। हें सुकृतेविण गात असे जयरामसुताची वाणी। हरिजन हे —।

---

# तुकाराम



१. शके १५७१, विरोधी नाम संवत्सरे, फाल्गुन वद्य द्वितीया, सोमवारीं, तुकाराम गुप्त झाला, असें अनेक ठिकाणीं लिहिलेलें आढळतें. " फाल्गुन वद्य द्वितीयेला शनवार येतो, सोमवार येत नाहीं, " असें रा० विनायक लक्ष्मण भावे, संपादक, महाराष्ट्रकवि यांनीं ग्रंथमालेंतील ' महाराष्ट्रसारस्वत ' ह्या निबंधाच्या ४५ व्या पृष्ठावर ह्मटलें आहे व तें बरोबर आहे. तुकारामाच्या चवदा शिष्यांदेखत बोवाची गोधडी व टाळ ह्या दोन जिनसा फाल्गुन वद्य पंचमीला तीर्थाला प्रयाण केल्यापासून चवथ्या दिवशीं–शनवार द्वितीया, रविवार तृतीया, सोमवार चतुर्थी व मंगळवार पंचमी---ह्मणजे मंगळवारीं पंचमीस, वरून खालीं पडल्या. फाल्गुन वद्य द्वितीयेलाहि सोमवार नाहीं व पंचमीलाहि सोमवार नाहीं. तिथींचा व वारांचा मेळ जमत नाहीं. अर्थात्, तुकारामाच्या मृत्यूची तीथ व वार ही ह्याहून कांहीं निराळीं असलीं पाहिजेत. आतां जेथें तीथवार जमत नाहींत तेथें शकाचा आकडा व संवत्सराचें नांव जमलें तरी तें विश्वसनीय कां मानावें हा प्रश्नच आहे. परंतु पांच चार ठिकाणीं शक १५७१ हा तुकोबाच्या प्रयाणाचा शक एकच आढळतो. त्यांत कोठेंहि फेरबदल नाहीं. शिवाय, शक १५७१ त शिवाजीला रामदासास भेटण्यास तुकारामानें सांगितलें हें प्रसिद्ध असल्यामुळें, व ती भेट १५७१ च्या फाल्गुनाच्या आधीं घडली असल्यामुळें, तुकाराम १५७१ च्या शेवटास कधीं तरी वारला असावा हें निर्विवाद आहे. १५७१ त शिवाजीचें वयमान बावीस होतें व त्यावेळीं डबीर, मजमूदार वगैरे अधिकारी शिवाजीजवळ होते, हें मी मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या चवथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत सिद्ध केलें आहे. तेव्हां १५७१ त शिवाजीची व तुकारामाची गांठ पडून, तुकारामानें शिवाजीला

अभंगमय पत्र लिहिलें, ही गोष्ट पूर्णपणें विश्वसनीय आहे. सारांश १५७१ च्या फाल्गुनांत तुकाराम वारला असावा, हें विधान बहुतेक, किंबहुना सर्वस्वी विश्वसनीय धरून चालण्यास कांहीं हरकत नाहीं. तीथ व वार ह्यासंबंधीं मात्र संशय आहे व तो फिटण्यास कांहीं प्रत्यक्ष-प्रमाण सांपडणें जरूर आहे.

२. मरणसमयीं तुकारामाचें वय काय होतें ह्यासंबंधानेंहि अद्याप संशयच आहे. महीपतिबावांनीं तुकारामाचे सतराव्या वर्षीं आईबाप वारले, अठराव्यांत बंधु वारला, असें सांगून, पुढें,

एकविसाव्यांत विपरीत काळ । तुकयासि पातला तत्काळ ॥

असें सांगितलें आहे. आणि नंतर,

पूर्वार्ध संपलें ऐशा रीतीं । दुःखें देखिलीं नाना रीतीं ॥

असें ह्मटलें आहे. यावरून एकविसाव्यांत जर पूर्वार्ध संपलें, तर त्याचें एकंदर वय ४२ वर्षांचें असलें पाहिजे, असें समजून त्याचा जन्मकाल १५३० हा शक कित्येकांनीं धरला आहे. ह्मणजे चाळीस बेचाळीसाच्या ऐन उमेदींत तुकाराम वारला असा अभिप्राय आहे. परंतु, प्रयाणसमयींचे तुकारामाचे जे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत त्यांत तुकाराम मरणसमयीं जख्ख ह्मातारा झाला होता असें स्पष्ट विधान केलेलें आढळतें. तुकाराम तात्या यांनीं छापलेल्या गाथेच्या दुसऱ्या भागांत खालील अभंग आहे:—

ऐसी देवास आण घालून, देहुग्रामास येऊन, सभोवतें
संदसमुदाय असून, आपण बसले तों अकस्मात् जरा प्रत्यक्ष
वृद्ध स्त्रीच्या रूपें येऊन कानींसांगितलें कीं, काळ सन्निध आला.

अभंग ६४९२

जरा कर्णमूळीं सांगो आली गोष्टी । मृत्यूचिये भेटी जवळी आली ॥ १ ॥
आतां माझ्या मना होई सावधान । हे पुण्याची जाण कार्यसिद्धी ॥ २ ॥

सेवटील घडी बुडता नलगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥३॥
तुका ह्मणे चिंती कुळीची देवता । वाराया मोंवता मिथ्या शब्द ॥ ४ ॥

ह्या अभंगावरून तुकाराम मृत्यूकाळीं वयोवृद्ध झाला होता, हें स्पष्ट होतें. शिवाय, ह्या विधानाला दुसरें एक प्रमाण आहे. निबंधमालेच्या चवसष्टाव्या अंकांत तुकारामासंबंधानें वामन दाजी ओक ह्यानीं एक पत्रव्यवहार केला आहे, त्यांत त्यांनीं कांहीं अभंग दिले आहेत, पैकीं एक अभंग येणेप्रमाणें:—

बाबाजी चैतन्य योगिराज धन्य । तुकयालागून प्रकटले ॥ १ ॥
शालिवाहनशके चौदाशे त्र्याण्णव । प्रजापतिनाम संवत्सरीं ॥ २ ॥
वैशाखवद्य द्वादशीचे दीनीं । समाधि स्वामीनीं घेतलीसे ॥ ३ ॥
तेथूनि तीस वर्षे भेटी तुकयासी । देऊनी तयासी पूर्णपण ॥ ४ ॥
महीपति ह्मणे जाले समाधिस्थ । तुकया क्रीडत ब्रह्मानंदें ॥ ५ ॥

ह्या अभंगांत, तुकारामाचा गुरू बाबाजी चैतन्य शके १४९३, प्रजापति नाम संवत्सरीं वैशाख वद्य १२स वारला; व पुढें तीस वर्षांनीं ह्मणजे शक १५२२ च्या सुमारास पुष्पावतीतीरीं ओतुर मुक्कामीं त्यानीं तुकाराम स्वप्नस्थ असतांना त्याला उपदेश दिला, असें ह्मटलें आहे. आतां, कित्येक लोक ह्मणतात त्याप्रमाणें शक १५३०त तुकाराम जन्मला असें धरून चाललें, तर शक १५२२ च्या सुमारास त्याला गुरूपदेश होणें असंभवनीय होतें. तेव्हां तुकारामाचा जन्म शक १५३० धरून उपयोगाचें नाहीं. शक १५२२ च्या सुमारास तुकारामाला गुरूपदेश व्हावयाला त्यावेळीं त्याचें वय पंचवीस तीस वर्षांचें असलें पाहिजे, असें अनुमान करावें लागतें. हें अनुमान खरें समजण्यास एक लेखी आधार आहे. वाईप्रांतीं करजखोप मुक्कामीं तपास करीत असतां, एका पंढरीच्या वारकऱ्याच्या जवळील ज्ञानेश्वरीच्या पोथींत मला एक तुकारामाची वंशावळ सापडली. हा वारकरी पंढरींत जो तुकारामाचा वंश आहे त्यांचा शिष्य आहे. त्याजवळील वंशावळ येणेप्रमाणें:—

श्रीगुरु तुकोबाराय देहूकरांच्या संस्थानीं मूळपुरुष



६ रंगनाथ × हिराबाई — सीताबाई — हरिबाई — ६ मैनाबाई

हरिबाई: ६ व्यंकाजी × गुजाबाई

सीताबाई: ६ गोविंद × भागीरथी; ६ श्रीधर × बाळूबाई

रंगनाथ × हिराबाई: ७ बोलोजी; ७ कृष्णाबाई.

७ बोलोजी:

८ तुकाराम × रखमाबाई व जिजाबाई
जन्म सके १४९०
समाप्ति सके १५७१

कोनोबा

८ तुकाराम:

९ शिवाजी नकल
( रखमाबाईच्या पोटीं )

९ महादेव
×
लक्ष्मी

९ विठ्ठल
×
रखमा

९ नारायण जन्म १५७२
समाप्ति सके १६४५
श्रावण शुद्ध ४

९ गंगाबाई

९ भागीरथी

३. ह्या वंशावळींत तुकाराम शक १४९०त जन्मला असें स्पष्ट ह्मटलें आहे. शक १५२२ च्या सुमारास उपदेश झाला त्यावेळीं तुकारामाचें वय ३०।३२ वर्षांचें होतें. तसेंच ज्या अर्थी ह्या वंशावळींत तुकोबा शक १५७१ त वारला असें ह्मटलें आहे, त्या अर्थी मरणसमयीं त्याचें वय ८१ वर्षांचें होतें, हें निश्चित आहे. वामन दाजी ओकांनीं तुकारामाला शक १५२२च्या सुमारास गुरूपदेश झाला अशा अर्थाचे जे अभंग निबंधमालेच्या ६४व्या अंकांत छापले त्यांची आठवण, माझ्याजवळील ही वंशावळ पाहून, मराठी कवितेचे गुणग्राहक रा. रा. नारायण कृष्ण गद्रे यांस झाली; आणि १५३० त तुकाराम जर जन्मला असें धरलें तर १५२२ च्या सुमारास त्याला गुरूपदेश कसा व्हावा, हें कोडें सुटलें. कोडें सुटण्यांत दोन गोष्टी निष्पन्न झाल्या :— एक; तुकारामाचा जन्मशक १५३० नव्हे; व दुसरी; मरणसमयीं तुकाराम वयातीत होता. ह्या दुसऱ्या गोष्टीपासून, तुकारामानें आत्महत्या केली ह्मणून कोण्या वाचाटानें जी पोरकट कल्पना कांहीं दिवसांपूर्वीं विविधज्ञानविस्तारांत काढिली होती, ती निराधार व टाकाऊ ठरते. ही वाचाट कल्पना उद्भवण्यास कारण असें झालें कीं, ऐन चाळीशीच्या भरांत ज्याअर्थी तुकाराम गुप्त झाला त्याअर्थी संसाराला वैतागून त्यानें आत्महत्या केली. परंतु, तुकाराम ऐन चाळिशीच्या भरांत मेला नाहीं हें आतां सिद्ध झाल्यामुळें, आत्महत्येची खुळी कल्पना खोटी ठरते, हें निर्विवाद आहे.

४. आतां,

'एकविसाव्यांत विपरीत काळ ।
तुकयासि पातला तात्काळ ॥
पूर्वार्ध संपलें ऐशा रीती ।
दुःखें देखिलीं नाना रीतीं ॥

ह्मणून महिपतीनें जें विधान केलें आहे त्याच्याशीं मी काढलेल्या वयमानाचा मेळ कसा बसवावयाचा, हा प्रश्न येतो. ह्या प्रश्नाचें उत्तर

असें कीं, एकविसाव्या वर्षीं पूर्वार्ध जें संपलें तें एकंदर हयातीचा बरोबर अर्धा तुकडा होतें, असा महिपतीचा आशय नव्हता. दुःखाचा व संसारयातनेचा जो काळ तो हयातीचा पूर्वकाळ किंवा पूर्वार्ध होय, असा महीपतीचा आशय होता. एकवीस वर्षांची उमर होईतोंपर्यंत दुःखाचे डोंगर कोसळल्यावर, तुकारामाचें मन संसारबंधांतून सुटून मुमुक्षूच्या मार्गास लागलें, व त्याच्या आयुष्याच्या उत्तरार्धाला प्रारंभ झाला. हें उत्तरार्ध एकवीसच वर्षांचें असलें पाहिजे असें नाहीं. तें वाटेल तितक्या वर्षांनें असूं शकेल. कोण्या मनुष्याला ८ व्या वर्षींच उपरति झाली, तर त्याच्या आयुष्याचें पूर्वार्ध ह्मणजे संसारयातनांनीं असह्य झालेलें अर्ध आठव्या वर्षींच संपलें, असा भाषणसंप्रदाय आहे. आयुष्यांतील एक स्थिति संपून दुसऱ्या स्थितीला जेव्हां प्रारंभ होतो, तेव्हां त्या आयुष्याचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग निसर्गतःच पडतात. सारांश, महीपतीचा आशय वर्षांची निम्मेनिम वाटणी करण्याचा नसून, बद्धस्थिति सुटून मुमुक्षुस्थितीस प्रारंभ जेव्हां झाला तेव्हां तुकारामाच्या चरित्रांतील पूर्वरंग समाप्त होऊन उत्तररंगाला प्रारंभ झाला, हें सांगण्याचा आहे. महीपतीचा मी ह्मणतों तोच आशय होता, असें ह्मणण्यास कारण आहे, तें हें कीं, वामन दाजी ओकांनीं निबंधमालेंत दिलेला जो अभंग वर नमूद केला आहे, तो खुद्द महीपतीचाच आहे. त्या अभंगांत जर महीपति स्वतःच ह्मणतो कीं, तुकारामाचा गुरु बाबाजी चैतन्य शक १४९३त वारला व पुढें तीस वर्षांनीं ह्मणजे शक १५२२च्या सुमारास त्यानें स्वप्नांत तुकारामाला उपदेश दिला; तर शक १५७१त तुकाराम मेला त्याच्या पूर्वीं २१ वर्षें ह्मणजे शक १५५० त त्याच्या हयातीचें पूर्वार्ध संपलें, असें असंबद्ध विधान त्यानें केलें, हें ह्मणणें सर्वस्वीं विपरीत दिसतें. तात्पर्य, वामन दाजी ओकांनीं दिलेल्या ओव्यांत व भक्तलीलामृतांतील ओव्यांत, नीट अर्थ केला ह्मणजे विसंगतता बिलकुल नाहीं. शंकर पांडुरंग पंडितांच्या देखरेखी-खालीं विष्णु परशुराम शास्त्री पंडितांनीं इ. स. १८७३ ( १८६९ नव्हे ) त छापलेल्या तुकारामाच्या गाथेला जनार्दन सखाराम गाड-

गीळांनीं एक चरित्रवजा इंग्रजी निबंध जोडला आहे. त्या निबंधाच्या मराठी तर्जुम्यांत, तुकारामाचें वय समाप्तिसमयीं ४२ वर्षांचें होतें, कारण, २१ व्या वर्षी तुकारामाच्या आयुष्याचें पूर्वार्ध संपलें असें महिपति भक्तलीलामृताच्या पांचव्या अध्यायांत ह्मणतो, हें विधान प्रथमतः केलेलें आहे. तेव्हांपासून हें विधान, वामन दाजी ओकांनीं निबंधमालेंत महीपतीचे अभंग छापून, त्यांत तुकारामाला गुरूपदेश १५२२ च्या सुमारास झाला हें प्रसिद्ध करीतोंपर्यंत, अबाधित चाललें होतें. परंतु जन्मकाल १५३० व उपदेशकाल १५२२ चा सुमार ही विसंगतता त्यावेळीं कोणाला भासलीच नाहीं; व त्यासंबंधीं पत्र छापून काढण्यापलीकडे वादाची मजल गेली नाहीं. अलीकडे, कित्येक गृहस्थांनीं ग्रंथमाला व केसरी ह्या दोन स्थलीं तुकारामासंबंधीं कांहीं माहिती देण्याचा स्तुत्य क्रम आरंभिला आहे. त्याचा विचार करीत असतां, असें आढकून आलें कीं, वामन दाजी ओकांनीं दिलेल्या बाबाजी चैतन्याच्या समाधिकालाकडे व तुकारामाच्या उपदेशकालाकडे जितकें लक्ष द्यावें तितकें थोडेंच आहे.

५. वरती तुकारामाला शक १५२२ च्या सुमारास गुरूपदेश झाला ह्मणून ह्मटलें आहे. तेथें ' सुमारास ' हे शब्द जाणूनबुजून घातले आहेत.

बाबाजी आपलें सांगितलें नाम ।
मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥
माघ शुद्ध दशमी पाहूनि गुरुवार ।
केला अंगीकार तुका ह्मणे ॥

ह्या अभंगांत कोणत्या तरी वर्षाच्या माघ शुद्ध दशमीस गुरुवारीं आपल्याला उपदेश मिळाला असें तुका स्वतः ह्मणतो. ओकांच्या अभंगांत हें वर्ष १४९३ प्रजापतीपासून तीस वर्षांनीं होतें असें ह्मटलें आहे. प्रजापति १४९३ पासून ३० वा संवत्सर ह्मटला ह्मणजे १५२२ शार्वरी येतो. परंतु त्या सालीं माघ शुद्ध दशमीला गुरुवार नाहीं. १५२३ प्लवाला किंवा १५२१ विकारीलाहि माघ शुद्ध दशमीस गुरु-

वार नाहीं. १५२० विलंबाच्या माघ शुद्ध दशमीस मात्र गुरुवार आहे. १५२० विलंब हें साल १४९३ प्रजापतीपासून २८ वें आहे. व ह्याच सालाला अनुलक्षून महीपतीनें तीस हा शब्द योजला आहे. ह्या तीस ह्या शब्दाचा अर्थ पंचवीस तीस किंवा तीस पसतीस असा करणें येथें जरूर आहे. कां कीं, तंतोतंत तिसावें वर्ष जर महीपतीला सांगावयाचें असतें, तर "तिसावें वर्ष' असे शब्द त्यानें योजिले असते. बाबाजी चैतन्याचा समाधिशक महिपतीला जसा नक्की माहीत होता, तसा तुकारामोपदेशशक नक्की माहीत नसल्यामुळें, परंतु १४९३ पासून तीस वर्षांच्या सुमारास कोठे तरी हा शक पडावा असेंहि माहीत असल्यामुळें, त्यानें 'तीस' हा शब्द सुमारानें घातला आहे. एवंच सिद्ध काय झालें कीं, तुकोबाला बाबाजी चैतन्यानें ओतुरास शक १५२०, विलंब संवत्सर, माघ शुद्ध दशमी, गुरुवारीं, उपदेश दिला. त्यावेळीं तुकारामाचें वय बराबर तीस वर्षांचें होतें.

६. वरील माहितीवरून तुकारामाच्या आयुष्यांतील इतक्या प्रसंगांचा काळ नक्की ठरतो :—

१ शक १४९०त तुकाराम जन्मला.
२ शक १४९३त बाबाजी चैतन्य वारला.
३ शक १५०२च्या सुमारास त्याचें लग्न झालें.
४ शक १५०३त तुकाराम घरचा व्यापार बघूं लागला.
५ शक १५०४च्या सुमारास त्याचें दुसरें लग्न झालें.
६ शक १५०७त त्याचे आईबाप वारले.
७ शक १५०८त त्याचा भाऊ सावजी उठून गेला.
८ शक १५२०च्या माघ शुद्ध दशमीस गुरुवारीं ओतुरास स्वप्नांत त्याला गुरूपदेश झाला.
९ शक १५७१च्या फाल्गुन शुद्ध १२ नंतर चार दिवसांनीं तो वारला. १२ नंतर चवथ्या दिवशीं शनिवारीं वद्य २ होती; शुक्रवारीं पूर्णिमा असून वद्य प्रतिपदेचा क्षय होता.
१० शक १५७२त नारायणबोवाचा जन्म झाला.

७. तुकारामाच्या आयुष्यांतील इतर माहिती सडकून प्रसिद्ध आहे. ती ह्या शकांच्या साच्यांत बसविली ह्मणजे ऐतिहासिक रीतीनें तुकारामाचें चरित्र उत्तम लिहितां येण्यासारखें आहे. तुकारामाचें चरित्र नीट मुद्देसूद लिहितां येण्यास खालील व्यक्तींची त्या त्या व्यक्तीच्या वर्तमान वंशजाजवळून माहिती काढली पाहिजे.

१ निळोबास्वामी
२ गोपाळबोवा, तुकारामाचा नातू.
३ रामेश्वरभट्ट
४ कोनोबा, तुकारामाचा भाऊ
५ कोंडभट्ट विप्र लोहकऱ्या
६ गंगाधर मवाळ कडूसकर
७ संताजी जगनाडा
८ नावजी माळी
९ शिवजी कासार
१० आबाजी जोशी लोहगांवकर
११ कोंडपाटील लोहगांवकर
१२ महादाजीपंत जोशी देहूकर
१३ पंढरपूरांतील तुकोबाचे वंशज.
१४ देहूंतील तुकोबाचे वंशज.
१५ तुकोबाच्या मुलामुलींचीं व त्याचें चुलते व मामा ह्यांचीं घरें.

इतक्या ठिकाणचे कागदपत्र गोळा करून, अभंगांच्या वह्या ताडून, व तोंडीं माहिती व आख्यायिका टिपून, जो तुकारामाचें चरित्र लिहिण्याचा उद्योग करील तो एक वाचनीय कथा निःसंशय निर्माण करील.

८. तुकाराम शक १४९० त जन्मला. त्याच्यापासून आठवा पूर्वज विश्वंभर. ह्या विश्वंभराला मुकुंद व हरि, असे दोन मुलगे होते. पैकीं मुकुंदराव आपल्या राजाकरितां राजधानीवर म्लेच्छांचें परचक्र आलें असतां लढून मेला, अशी आख्यायिका आहे. तुकाराम व त्याचा

मुलगा, ह्या दोघांची हयात १४९० पासून १६४५ पर्यंत, ह्मणजे १५५ वर्षांची होती. तुकारामाचे पूर्वज त्याच्यासारखेच शांत व नियमबद्ध असल्यामुळें, तेहि वयातीत होऊन वारले असावे, असें ह्मणावें लागतें. तेव्हां, तुकारामाच्या घराण्याची दरपिढी ३०।३५ वर्षांची धरली असतां अशास्त्र होणार नाहीं. दर पिढीस ३५ वर्षें धरून १४९० पासून ८ पिढ्या मोजल्या तर विश्वंभर शक १२१० त व त्याचा मुलगा शक १२४५ त हयात होता असें दिसतें. शक १२४० त मुबारिकानें हरपाळास मारून देवगिरीचें राज्य घेतलें अशी इतिहासांतरी माहिती आहे. तिशीं वरील हकीकतीचा मेळ घालतां, असें दिसतें कीं, विश्वंभराचा मुलगा मुकुंदराव शक १२४० तील लढाईत देवगिरीजवळ लढून मेला.

९. मी दिलेली तुकारामाची वंशावळ दुसऱ्या ज्या दोन चार गद्य व पद्य वंशावळी आहेत त्यांशीं दोन चार स्थलीं जमत नाहीं. तत्रापि अभंग, ओव्या वगैरेंत दिलेल्या वंशावळीपेक्षां मी दिलेली यादींतील वंशावळ जास्त विश्वसनीय धरावी असें वाटतें.

१०. तुकारामानें एकंदर अभंग पांच कोटी, सत्तर लक्ष, चौतीस हजार लिहिले अशी एक अभंगोक्ति आहे. इतकी अवाढव्य रचना एक मनुष्य करील कसा, अशी कित्येक लोक शंका घेतात; परंतु मला वाटतें, इतकी अवाढव्यहि ग्रंथरचना करणें प्रतिभावान् मनुष्याला शक्य आहे. वाल्टर स्कॉट, आलेक्झांडर डूमास, व्होल्टेअर, वगैरे ग्रंथकारांची रचना तुकारामाच्या पांच कोटींहूनहि, शब्दसंख्या मोजून पाहिली असतां, प्रत्येकीं जास्त भरेल. सर्व वेद व ब्राह्मण वगैरे-वरील सायणाच्या भाष्यांची मोजणी केली तर तीदेखील तुकारामाच्या पांच कोटींहून जास्त होईल. अशी जर गोष्ट आहे, तर ८१ वर्षें वाचणाऱ्या तुकारामाच्या प्रतिभेला ही गोष्ट अशक्य काय ह्मणून मानावी?

११. तुकारामाची बायको त्याच्या ८१ व्या वर्षीं गरोदर राहिली. त्या वेळीं तीहि सुमारें पाउणशे वर्षांची असावी. ह्यावरून एवढेंच

ह्मणणें प्राप्त होतें कीं, ह्या नवराबायकोची शरीराची काठी उत्तरवयांतहि कणखर होती. प्रसिद्ध जर्मन कवी गेटी ह्यानें साठीच्यापुढें लग्न केलें व पंधरावीस वर्षें मरेपर्यंत संसार केला. तोच प्रकार तुकारामाचाहि होता. पांच कोट अभंग रचण्याला समर्थ अशी ज्याची प्रतिभा त्याची संसारयात्रा बिनबोभाट उरकण्याजोगी शरीरयष्टि ८१ व्याहि वर्षीं असावी, हें उचितच आहे.



# तुकोब्बाराय देहूकर



१. हरिभक्तिपरायण तुकोब्बाराय देहूकर यांच्या आयुष्यांतील निधनादि प्रसंगांसंबंधानें ग्रंथमालेंत मी एक निबंध लिहिला होता. त्यांतील कांहीं विधानांवर इंदूरच्या पाठशाळेंतील शिक्षक रा० रा० प्र० रा० भांडारकर यांनीं गेल्या मेच्या ( जुलैंत हातीं आलेल्या ) अंकांत टीका केली आहे. तींत खालील मुद्दे आहेतः—

१ मरणसमयीं तुकारामाचें वय ८१ नसावें.

२ तो सदेह वैकुंठास गेला नाहीं.

३ त्यानें तीर्थास प्रयाण केलें नाहीं.

४ तो इंद्रायणींत बुडून मरण पावला.

५ त्यानें जलसमाध घेतली नाहीं ( असें वाटतें ).

पैकीं पहिल्या मुद्यासंबंधानें रा० भांडारकरांचा कोटिक्रम असा.

मरणसमयीं तुकारामाचें वय ८१ नसावें.

कारण, ८१ वर्षांच्या म्हाताऱ्यांना मुलें होत नाहींत.

पण, तुकारामाची बायको त्याच्या मरणसमयीं पांच महिन्याची गरोदर होती.

तेव्हां, तुकाराम मरणसमयीं ८१ वर्षांचा नसून, प्रजोत्पादनाला शक्य अशा वयाचा असावा.

येथें मुख्य मदार, ८१ वर्षांच्या म्हाताऱ्याला व निदान ७० वर्षांच्या म्हातारीला मुलें होणें शक्य आहे किंवा नाहीं, ह्या निकालावर आहे. निजामुन्मुलुखाचा मुलगा निजामअल्ली इ. स. १८०३ त वारला, त्यावेळीं तो निदान ८० वर्षांचा होता. त्याहून कमी वयाचा नव्हता. निजामुन्मुलूख

इ. स. १७४८ त वारला. ह्मणजे बापाच्या मरणसमयीं निजामअलीचें वय २९ होतें. त्यावेळीं निजामुन्मुल्खाचें वय १०४ होतें. अर्थात्, निजामअली निजामुन्मुलुखाला त्याच्या ७९ । ८० व्या वर्षी झाला, असें निष्पन्न होतें. ह्यावरून एवढें सिद्ध होतें, कीं कित्येक पुरुषांना ऐंशीच्या सुमारास संतती होते. आतां, आधीं ऐंशीं वर्षे जगणारे पुरुष विरळा असतात ही बाब लक्षांत घेतली, तर संतती होणारे पुरुष त्याहून विरळा असणार हें उघड आहे. असल्याच विरळा पुरुषांपैकीं तुकाराम होता, असें माझें ह्मणणें आहे.

आतां, सत्तर वर्षांच्या स्त्रीचें एखादें ऐतिहासिक उदाहरण मिळतें कीं काय, तें पाहूं. प्रसिद्ध गुरुचरित्र ह्या चरित्रग्रंथांत विटाळ जाऊन पांचपंचवसि वर्षें लोटलेल्या एका वृद्ध स्त्रीला संतति झाल्याचें लिहिलें आहे. विटाळ जाण्याची सामान्य मर्यादा जर पन्नाशीची धरली, तर, ती गुरुचरित्रांतील बाई प्रसूतिसमयीं ७० । ७५ वर्षांची असावी. पाऊणशे वर्षांच्या ह्मातारीला मूल विरळा होतें, हें खरें; परंतु होतें, असें ह्मणण्याला हा एक आधार आहे. आतां, गुरुचरित्र हा ग्रंथ किती ऐतिहासिक किमतीचा आहे, हें पाहूनच हा आधार जमेस घेतला पाहिजे. महिपतीचीं चरित्रें ज्या ऐतिहासिक किंमतीचीं आहेत, त्याच ऐतिहासिक किंमतीचें गुरुचरित्र आहे, असें माझें मत आहे. महिपतीची चरित्रें बऱ्याच ऐतिहासिक महत्वाचीं असावीं, असें कै० रानड्यांस वाटलें होतें, असें त्यांच्या इतिहासावरून दिसतें. गुरुचरित्रांत गुरूंच्या समाधीच्या संवत्सर, तिथी, नक्षत्र वगैरे बाबी दिल्या आहेत, त्या खऱ्या आहेत. श्रीपादश्रीवल्लभस्वामी ही ऐतिहासिक व्यक्ति आहे, त्यावेळीं बेदरची पाच्छाही होती, गाणगापूर, नरसोबाची वाडी वगैरे स्थलें होतीं, व योगबलानें स्वामी कर्नल आल्कॉट प्रमाणें (मोठ्याचीं लहानाशीं तुलना केली आहे हें लक्षांत धरून) लोकांचीं दुःखें निवारण करीत; ही ऐतिहासिक माहिती गुरुचरित्रांत आहे. स्वामींच्या कृपेनें वृद्ध बाईला पोर झालें, हें सांगण्यांत, लेखकाचा

कांहीं क्षुद्र हेतु होता, असेंहि ह्मणतां येत नाहीं. कारण, गुरुचरित्राचा कर्ता जो गंगाधरसरस्वती तो परमभगवद्भक्त असून, लोकांना फसविण्यांत त्याचा कांहीं एक मतलब साधावयाचा नव्हता. कारण, गंगाधरसरस्वती हा पूर्ण विरक्त पुरुष होता. तेव्हां पाऊणशाव्या वर्षीं पोर झालेल्या ह्या गुरुचरित्रांतील ह्यातारीच्या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास कांहीं हरकत नाहीं. आतां अशा बाया अत्यंत विरळा असतात, हें स्पष्टच आहे. नाहीं तर, श्रीपादस्वामींच्या कृपेनें कांहीं एक कारण नव्हतें. ह्या शेवटल्या वाक्यावर कोणी अशी शंका घेईल कीं, योगिजनांच्या कृपेनें जी गोष्ट झाली, ती इतिहासांत जमेस धरूं नये. परंतु, गोष्ट जर साक्षात् घडली असली, तर ती जमेस धरली पाहिजे, मग ती वाटेल त्या कारणानें होवो. सांगण्याचें तात्पर्य काय कीं, कधीं कधीं ७०।७५ वर्षांच्या वयांत स्त्रियांना क्वचित् संतति होते. ह्या विरळा अपवादात्मक बायांपैकींच तुकारामाची स्त्री होती.

वस्तुतः पहातां ह्या बाबीचा निकाल करण्याचें काम रा. भांडारकरांचेंहि नाहीं व माझेंहि नाहीं. हें काम वैद्यकांच्यां इतिहासज्ञांचें आहे.

तात्पर्य, ८१ वर्षांच्या ह्यातार्‍याला व सत्तर वर्षांच्या ह्यातारीला कधीं कधीं विरळा मुलें होतात, हें ज्याअर्थीं वरील दोन उदाहरणांवरून सिद्ध होत आहे, त्याअर्थीं, तुकाराम मरणसमयीं ८१ वर्षांचा नसावा, हें जें रा. भांडारकरांचें ह्मणणें तें बिलकुल न टिकावें, असें ह्मणावें लागतें.

२. रा. भांडारकरांच्या पहिल्या मुद्याचा हा असा त्यांच्या विरुद्ध निकाल लागला. आतां ह्या मुद्यांतील एका पोटबाबीचा छडा लावावयाचा राहिला आहे. संतती होण्याच्या बाबीसंबंधानें टीका करतांना भांडारकर ह्मणतात, कीं “ साधें कोडें सोडविण्यांत गहन कोडें उत्पन्न करणें हा सशास्त्र मार्ग नव्हे. ” येथें सशास्त्रतेचा किंवा अशास्त्रतेचा प्रश्नच कसा उपजतो तें मला समजत नाहीं. एका जुन्या पोथींत तुकारामाच्या जन्मशकाचें टिपण मला सापडलें. त्या जन्मशकानें

तुकारामाचा गुरू जो बाबाजी त्याच्या समाधीकालाचा व त्यानें तुकारामाला दिलेल्या उपदेशाच्या कालाचा यथास्थित जम बसला. हा जम पुष्कळ वर्षें बसत नव्हता, ह्मणून ' कोडें सुटलें ' असे समाधानाचे उद्गार मी काढले. ह्या जम बसण्यानें दुसरे अनेक साधे व कठिण प्रश्न उद्भवण्याचा संभव आहे. ह्यातारा ह्यातारीला मुलें कशीं व्हावीं, हें कठिण कोडें माझ्या साध्या कोड्यापासून रा. भांडारकरांच्या मनांत जसें उद्भवलें, तशीं दुसरीं अनेक कोडीं उद्भवतील. परंतु, तीं उद्भवलीं ह्मणून, साधें कोडें सोडविलें असतां, तें अशास्त्र कसें ठरतें तें कळत नाहीं. अशा साध्या कोड्याला, फार तर, मोठें उपद्यापी कोडें ह्मणा. असल्या उपद्यापी कोड्यांनीं शोधकांना व विवेचकांना, खरें ह्मटलें असतां, आनंद व्हावा. साध्या कोड्यापासून उत्पन्न होणारा उपद्व्याप व गुंतागुंत समाधानकारक रीतीनें सोडवावी कशी, ह्याकडे विवेचकांचें, वस्तुतः, लक्ष्य लागावें. गुंतागुंत उत्पन्न झाली ह्मणून त्याच्यावर रागावणें व त्याला अशास्त्र ह्मणून नांवें ठेवणें सशास्त्र नव्हे.

ह्या बाबीसंबंधें लिहितां लिहितां रा. भांडारकर ह्मणतात कीं, राजवाड्यांनीं केलेला तुकारामाच्या जन्माचा कालनिर्णय चुकला, असें समजलें पाहिजे; कां कीं ह्यातारा ह्यातारीला मुलें होत नाहींत. परंतु, वृद्ध माणसांना कधीं कधीं मुलें होतात, असें उदाहरणें देऊन सिद्धी केली असल्यामुळें मी दिलेला तुकारामाचा जन्मकाल खरा ठरतो, ही बाब मागें यथास्थित सांगितलीच आहे. येथें जें सांगावयाचें आहे तें हें कीं, आपल्या बिधानाला पुष्टी आणण्याकरितां मी तुकारामाच्या जन्माचा कालनिर्णय केला आहे, असें भांडारकरांनीं, ह्मटलें आहे. सबळ किंवा दुर्बळ लेखी आधार नसतांना, अवांतर गोष्टींच्या जोरावर एखाद्या प्रसंगाचा काळ अनुमानानें ठरवणें ह्मणजे कालनिर्णय करणें होय. तसा प्रकार मी कांहीं एक केलेला नाहीं. जन्मकालाचा अनुमानानें निर्णय करण्यापूर्वीं, जन्मशक मजजवळ आयता तयारच होता. तो जन्मशक इतर प्रसंगांच्या कालाशीं कसा जमतो, ह्याची वाटाघाट

ग्रंथमालेंतल्या मागील निबंधांत मी केली आहे. ही गोष्ट एकीकडे ठेवून, रा. भांडारकरांनीं कालनिर्णय हा शब्द योजला आहे. योजनेचा मुद्दा असा, कीं, अनुमानिक कालनिर्णयानें साधें कोडें सुटल्याचा भास यद्यपि राजवाड्यांना झाला, तत्रापि त्यांनीं नवेंच एक विचित्र व अशक्य कोडें उत्पन्न करून आपला अनुमानिक कालनिर्णय खोटा ठरवून घेतला, असा ग्रह उत्पन्न व्हावा. हा डावपेच भांडारकरांनीं दुर्बुद्धीनें केला असें मी ह्मणत नाहीं. विरुद्ध मानलेल्या सिद्धान्ताचा पाडाव करतांना नकळतहि असला हेत्वाभास होऊन जातो, इतकेंच.

३. आतां रा. भांडारकरांच्या बाकीच्या चार मुद्यांकडे वळतों. १ तुकाराम सदेह वैकुंठास गेला नाहीं; ( २ ) त्यानें तीर्थास प्रयाण केलें नाहीं; ( ३ ) तो इंद्रायणींत बुडून मरण पावला; ( ४ ) अर्थात्, त्यानें जलसमाध घेतली नाहीं; हे ते चार मुद्दे होत. ह्या मुद्यांच्या सिद्धचर्थ भांडारकरांनीं खालील अभंग दिलेले आहेतः—

( १ )

विमानाचे घोष वाजती असंख्य ।<br>
सुरू झाला डंका वैकुंठीचा ॥ १ ॥<br>
शब्दांचा विश्वास झाली आठवण ।<br>
करा बोळवण सज्जन हो ॥ २ ॥<br>
आले विष्णुदूत आली विठ्ठलमूर्ति ।<br>
अवसान चित्तीं सांपडलें ॥ ३ ॥<br>
आला पाठमोरा इंद्रायणीजवळी ।<br>
नामघोषें टाळी वाजवीली ॥ ४ ॥<br>
प्रथम तो पाय घातला पाण्यांत ।<br>
राहिलीं ते मात तुका ह्मणे ॥ ५ ॥

( २ )

माझ्यावरुतें पांजलें शरीर ।<br>
झाला धुंदुकार दाही दिशा ॥ १ ॥

टाळ घोळ विणा मृदंगाचे घोष ।
ाती हरिदास नाचताती ॥ २ ॥
ाणों मागें पुढें होती हरिकथा ।
ाहातां पहातां भ्रम लोकां ॥ ३ ॥
ातावरी हात मारुनि जातो तुका ।
परी कोणा एका उमजेना ॥ ४ ॥

( ३ )

वाराणसीपर्यंत असो सुखरूप ।
सांगावा निरोप संतासीं हा ॥ १ ॥
येथूनियां आह्मां जाणें निजधामा ।
सर्वे असे आह्मां गरुड हा ॥ २ ॥
कृपा असो द्यावी मज दीनावरी ।
जातसों माहेरीं तुका ह्मणे ॥ ३ ॥

( ४ )

सकें १५७१ विरोधीनां संवछरेः समिगा वद्य द्वीतियाः वार सोमवारः ते दिवसीः प्राथःकाळींः तुकोब्बानीः तीर्थास प्रयाणं केलें शुभ भवतुः मंगळं

ह्या चार लेखांचा वाटेल तसा अर्थ करून रा. भांडारकरांनीं वरील चार मुद्दे काढले आहेत. वरील चार लेखांचा त्यांनीं जो अर्थ लावला आहे तो बराबर नाहीं हें सिद्ध केलें ह्मणजे त्यांचे हे चारी मुद्दे खालीं पडतात. पहिल्या लेखांत तुकाराम सदेह वैकुंठास गेला ह्मणून लिहिलें आहे; दुसऱ्या लेखांत त्याला ताटीवर बांधून स्मशानांत नेलें ह्मणून ह्मटलें आहे; तिसऱ्या लेखांत तो वाराणशीस गेला असें विधान ठोकून दिलें आहे; आणि चवथ्या लेखांत त्यानें तीर्थास प्रयाण केलें ह्मणून सांगितलें आहे; असा ह्या चार लेखांचा भांडरकरांनीं अर्थ केला आहे. एकाचा मेळ दुसऱ्याला नाहीं असे हे चार लेख परस्परविरोधी आहेत असें रा. भांडारकरांच्याप्रमाणें त्यांचा अर्थ करूं गेल्यास कोणालाहि वाटेल ह्यांत

बिलकुल संशय नाहीं. परंतु मराठी भाषा व महाराष्ट्रांतील रीतरिवाज नीट लक्ष्यांत घेऊन अर्थ केल्यास, हे लेख परस्परविरोधी नसून अन्योन्यपोषक आहेत, अशी कोणाचीहि निःसंशय खात्री करून देतां येण्यासारखी आहे. तीर्थास प्रयाण करणें, ह्या भाषाप्रयोगाचा अर्थ पुण्यक्षेत्रास जाणें, असा रा. भांडारकर करतात. परंतु उपरिलिखित चवथ्या लेखांत ह्या प्रयोगाचा अर्थ, मरून गेल्यावर स्मशानांत नेलें जाणें, असा आहे. स्मशान प्रायः नदीच्या ह्मणजे तीर्थाच्या सन्निध असतें, त्यावरून लक्षणेनें स्मशानालाहि महातीर्थ ह्मणण्याची चाल महाराष्ट्रांत आहे. तुकारामाला स्मशानांत नेऊन सरणावर जाळलें, असें पहिल्या व दुसऱ्या उताऱ्यांत स्पष्ट ह्मटलें आहे. सर्व जातींतील साधु, संत, तपस्वी व संन्यासी ह्यांच्या मृत देहाला विमानांत बसवून वाजत गाजत व कीर्तन करीत मोठ्या थाटानें स्मशानांत पुरण्याकरितां किंवा जाळण्याकरितां नेण्याची चाल महाराष्ट्रांत आज हजारों वर्षांची आहे. एका ऐसपैस चौरंगाच्या किंवा पाटाच्या चारी बाजूला केळी बांधून जें यान किंवा तिरडी साधूंच्या मृत देहाला वाहून नेण्याकरितां करतात त्याला महाराष्ट्रांत विमान असें ह्मणतात. त्या त्या साधूच्या कमजास्त लोकप्रियतेप्रमाणें मनुष्यांची लाहान मोठी गर्दी ह्या विमानाच्या पुढें व मागें उच्च स्वरानें भजन व कीर्तन करीत नाचत बागडत जाते. तुकोब्राराय फाल्गुन वद्य द्वितियेस सोमवारीं सकाळीं वैकुंठास जाणार, अशी बातमी दहा पंधरा दिवस भोंवतालच्या प्रांतांत पसरल्यामुळें, अनेक भगवद्भक्तांचे व प्रेक्षकांचे संघ देहूस जमा झाले व तुकोब्बाच्या विमानाच्या पुढें व मागें कीर्तनाचे असंख्य घोष अंबरांतराळीं दुमदुमूं लागले. हा प्रकार जसा साक्षात् घडला तसाच तो अभंगांत वर्णिला आहे. सदेह तुकारामाला ह्मणजे तुकारामाच्या मृत शरीराला विमानांत ह्मणजे चौरंगावर बसवून असंख्य कीर्तनांचे घोष चालू असतां व वैकुंठीचा डंका ह्मणजे साधू संताच्या शरीराला स्मशानांत नेतांना वाजविले जाणारे शंख गंभीर नाद करीत असतां विष्णुदूत ह्मणजे भक्तमंडळी देहूच्या नदीवरील तुकारामानें बसविलेल्या खोपटवजा विठोबाच्या देवळापाशीं आले. त्यावेळीं

तुकारामाच्या मृत देहाची पाठ इंद्रायणीकडे झाली व तोंड विटोबाकडे झालें. असा प्रकार झाला असतां, भक्तमंडळींनीं भक्तिप्रेमानें एकच आरोळी करून दिली. नंतर प्रेमानें चित्त आर्द्र होत्साते ते सर्व भगवद्भक्त तुकारामाच्या देहाला नदीतीरावर किंचित् पाण्यांत किंचित् बाहेर असा ठेवून, स्वतः इंद्रायणींत पाय टाकते झाले आणि " तुका ह्मणे " हे असंख्य वेळा कानावरून गेलेले शब्द येथून पुढें बंद झाले, हा तरंग एकसमयावच्छेदनानें सर्वांच्या मनांत उमटला.

पहिल्या उताऱ्याचा असा उघड अर्थ आहे. विमान, डंका, वैकुंठ, तीर्थ, विष्णुदूत वगैरे शब्दांचा अर्थ साधुसंतांच्या स्मशानयात्रेंत काय करावयाचा, ह्या बाबीकडे लक्ष्य न दिल्यामुळें, स्वधर्माची व स्वदेशांतील साधुसंताच्या वचनांची थट्टा करण्यांत तरबेज असलेल्या बालिश नास्तिकांप्रमाणें रा० भांडारकरांनीं ह्या अभंगाचा अर्थ केला. तुकाराम सदेह विमानांत बसून विष्णुदूतांच्या साहाय्यानें वैकुंठास जाईल कसा? अशी अद्वितीय शंका भांडारकरांना पडली; व पाश्चात्य अपविचारांनीं व अपसिद्धांतांनीं मति दूषित होऊन, अर्थाचा अनर्थ करण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली. स्वर्गांत विष्णु ह्मणून जें दैवत आहे त्याच्या स्वर्गीय दूतांनीं स्वर्गीय विमानांत बसवून जिवंत तुकारामास सदेह वैकुंठास नेलें, असा अभिप्राय ह्या अभंगांत कोठेंहि नाहीं. तुकारामाच्या मृत देहाच्या स्मशानयात्रेची साधी गोष्ट त्या त्या वस्तूला योग्य असलेल्या रूढ शब्दांनीं ह्या अभंगांत सांगितलेली आहे. तिचा विपर्यास करून व नसत्या कल्पना गृहीत धरून, भांडारकरांनीं आपलें हसें मात्र करून घेतलें आहे. तुकाराम सदेह वैकुंटास ह्मणजे स्वर्गास गेला, असें विधान करण्याचा अभंगकाराचा हेतु नव्हता, हें सिद्ध करण्यासहि यथास्थित पुरावा आहे. मागें दिलेल्या दुसऱ्या उताऱ्यांत असें ह्मटलें आहे कीं, तुकारामाचा देह माडियावर ह्मणजे सरणावर अथवा चितेवर पांजून ह्मणजे पांजणानें आच्छादून चिता धुमसूं लागली असतां, दाही दिशा

धुरानें धुंद होऊन गेल्या. त्यावेळीं विष्णुदास जे हरिभक्त त्यांनीं टाळ, घोळ, विणें व मृदंग वाजवून एकच गर्दी उडवून दिली. अभंगकार ह्मणतो, तुकारामाच्या चितेच्या मागें व पुढें इतकीं भजनें व कीर्तनें झालीं कीं प्रेक्षकांना भांबावल्यासारखें झालें नसलें ह्मणजे पुरवलें. पण प्रेक्षक भांबावले नाहींत असेंहि ह्मणतां येत नाहीं. कारण, तुकोब्बाराय सर्वांच्या डोळ्यादेखत हातावर हात मारून गेले असतां, कोणालाहि कोण गेला, हें उमजल्यासारखें दिसेना. तेव्हां प्रेक्षकांचीं डोकीं ताळ्यावर नव्हतीं, हेंच खरें. हीं वेडीं तुकोब्बाच्या देहाच्या पाठीमागें रडत, ओरडत, बागडत व नाचत बसलीं आहेत; पण तुकोब्बाचा आत्मा त्यांच्या डोळ्यादेखत त्यांना झुकांडी देऊन गेला, हें ह्या खुळ्यांना कळेना!

४ ह्या दोन अभंगांवरून इतकें निःसंशय सिद्ध झालें कीं, फाल्गुन वद्य द्वितीयेस, सोमवारीं, प्रातःकाळीं तुकाराम आपल्या घरीं वारला, भक्त-मंडळीनीं त्याच्या देहास विमानांत बसवून मिरवत व वाजतगाजत विठोबाच्या देवळाला उजवी घालून इंद्रायणीच्या तीरावर नेलें, आणि तेथें त्याला अग्नि दिला. तुकारामाला ज्या विमानांत नेलें तें विमान केवळ साधें नव्हतें. गरुडविमान ह्मणून ज्याला ह्मणतात तें तें होतें. अत्यंत प्रख्यात असे जे साधुसंत असतात त्यांच्या स्मशानयात्रेला जें विमान तयार करतात त्याच्या खालील लाकडांना गरुडपक्षाचा आकार प्रेमळ शिष्यमंडळी देत असतात. ह्या गुरुडाचा उल्लेख उपरिनिर्दिष्ट तिसऱ्या उताऱ्यांत व अभंगांत आहे. सदर अभंगांत काशीपासून रामेश्वरापर्यंच्या साधुसंतांना, मी ब्रह्म झालों, सुख झालों, सुखरूप झालों, आनंद झालों, असा निरोप तुकारामाच्या तोंडून अभंगकारानें पाठविला आहे. आह्मीं येथूनच ह्मणजे देहूहूनच निजधामाला ह्मणजे विष्णुपदाला जातों, आमच्या-बरोबर हा गरुड येत आहे ह्मणजे आह्मीं गरुडविमानांत बसून स्मशान-यात्रेला जात आहों, आतां तुमची आमची देहावस्थेंतील ही शेवटची भेट होय, कृपा असो द्यावी, आह्मी कोठें दुसऱ्या तिसऱ्या ठिकाणीं जात

नाहीं, माथघरालाच जात आहों, तेव्हां काळजी करूं नये, असाहि आणीक मजकूर ह्या अभंगांत आहे. तुकाराम खुद्द देहूस मेला, असें ह्या अभंगांत तर स्पष्टच म्हटलें आहे. पण ही गोष्ट रा० भांडाकरांच्या लक्ष्यांत आली नाहीं. "वाराणशीपर्यंत" ह्या शब्दाचा संबंध कोणी-कडे लावावा हेंहि त्यांना उमगलें नाहीं असें दिसतें. सारांश ह्या तिन्ही अभंगांचा अर्थविपर्यास त्यांच्या हातून झाला आहे. आपल्या देशांतील चालीरीतीस व भाषेस आधुनिक विद्वान कसे पारखे होत चालले आहेत त्याचा हा एक उत्तम मासला आहे.

९ येथवर केलेल्या प्रपंचावरून रा. भांडारकरांचे माझ्या पूर्वींच्या निबंधावरील आक्षेप कोणत्या मासल्याचे आहेत व त्यांत किती पोचटपणा भरला आहे तें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. आतां रा. भांडार-करांच्या दुसऱ्या एका विचित्र मुद्याची वाचकांना ओळख करून द्याव-याची आहे. ते निक्षून सांगतात कीं तुकाराम बुडून मरण पावला; आणि आधाराला "प्रथम तो पाय घातला पाण्यांत" हा पहिल्या उताऱ्यांतील चरण देतात. पण हा चरण कोणाला अनुलक्षून लिहिला आहे, तें रा. भांडारकरांना कळलें नाहीं. भक्तमंडळी तुकारामाच्या देहाला विमानांत बसवून इंद्रायणीवर आली व पाण्यांत उतरली, ह्या हकीकतीला अनुलक्षून हा चरण लिहिला आहे, हें पहिल्या अभंगाचा पूर्वापर संदर्भ पाहतां कळून येईल. रा. भांडारकरांच्या मतें, तुकाराम विमानांत बसून, भजन करीत, नाचत बागडत?, इंद्रायणीच्या तीरावर पाठमोरा आला व म्हातारा असल्यामुळें अडखळून पडला, आणि वीतभर पाण्यांत बुडाला!!! विमानांत बसून तो नाचला कसा, पाठ-मोरा झाला कसा व वीतभर पाण्यांत बुडाला कसा, वगैरे प्रश्नांचीं सम-र्पक उत्तरें रा. भांडारकर विचारपूर्वक critical faculty ची मदत घेण्यास न विसरतां निःसंशय देतीलच.

वरील प्रपंचाचा आढावा.

| रा. रा. भांडारकर. | प्रस्तुत लेखक. |
|---|---|
| १ तुकारामानें तीर्थास (परलोकास) प्रयाण केलें, हें मत टाकाऊ. | १ तुकारामानें तीर्थास ह्मणजे स्मशानभूमीस इंद्रायणीच्या तीरावर प्रयाण केलें हें मत ग्राह्य. |
| २ तुकाराम (स्वर्गीय) विमानांत बसून सदेह वैकुंठास गेला, हें मत टाकाऊ. | २ तुकारामाचा मृतदेह लाकडाच्या विमानांतून वैकुंठास ह्मणजे विठोबाच्या देवळावरून इंद्रायणीतीर्थास नेला गेला व त्याचा आत्मा वैकुंठास गेला, हें मत ग्राह्य. |
| ३ तुकाराम इंद्रायणींत बुडून मरण पावला. | ३ तुकाराम घरीं स्वस्थपणें बसून वारला. |
| ४ त्यानें जलसमाधि घेतली नाहीं. | ४ नाहीं. |
| ५ तुकाराम मरणसमयीं वृद्ध असावा. | ५ होता. |
| ६ ८१ वर्षांचा असल्यास त्याची स्त्री गरोदर असणें अशक्य. | ६ नवरा ८१ वर्षांचा असतांनाहि ७० वर्षांची स्त्री गरोदर असणें अपवादानें शक्य आहे. पण हा मुद्दा वैद्यशास्त्राच्या इतिहासांतील आहे. |
| ७ तुकाराम काशीस गेला नाहीं. | ७ नाहीं. |
| ८ बुडालेल्या तुकारामाचें शरीर मगरीनें खाल्लें नाहीं. | ८ घरीं मेलेल्या तुकारामाचें शरीर मगरीनें खाल्लें नाहीं. |
| ९ इंद्रायणी डोहांत मगरासारखे प्राणी आहेत किंवा नाहींत? | ९ स्वानुभवावरून सांगतों कीं, एखादी सुसर अलीकडे डोहांत असावी. तुकारामाच्या वेळीं देहूस इंद्रायणीला धरण नव्हतें. तेव्हां फाल्गुनांत डोहांत पाणी अर्थात्च थोडें असे. |

६ वर दिलेल्या चार उताऱ्यांचा अर्थ नीट करतां न आल्यामुळें रा. भांडारकर गोत्यांत पडले, हें उघड आहे. तुकारामाच्या अभंगांचें पारायण करतांना ज्या टीपा मी केल्या होत्या त्यावरून मला असें दिसून आलें कीं तुकाराम घरीं स्वस्थ बसून वारला. तुकाराम सदेह वैकुंठास गेला, अशी खुळी कल्पना कित्येक अज्ञ व अविवेचक वारकऱ्यांची आहे, हें मी जाणून आहे. परंतु, ही कल्पना, वेदांत आगगाडी व तारायंत्र आहे असें मानणाऱ्या अज्ञ भिक्षुकांच्या किंवा अहंमन्य दयानंदजीच्या कल्पनेइतकीच खुळी आहे, असें मला वाटतें. ही कल्पना आधारभूत मानून तिच्या जोरावर वरील उताऱ्यांचे अर्थ करूं जाणें अगदीं अप्रयोजकपणाचें कृत्य आहे. हा अप्रयोजकपणा एखाद्या अज्ञ भिक्षुकानें किंवा अशिक्षित चारित्रलेखकानें केला असता, तर तो एक वेळ क्षम्य झाला असता. परंतु रा० भांडारकरासारख्या विवेचकांनीं तो करावा, हें आश्चर्य आहे. असो. रा. भांडारकरांच्या व आमच्या वादविवादापासून एवढी एक गोष्ट निष्पन्न झाली कीं, तुकाराम घरीं स्वस्थ बसून वारला, व त्यानें जलसमाध घेतली नाहीं. ही जळसमाध तुकारामाला रा० पारसनिसांनीं कशाच्या आधारावर दिली, ह्याचें मला अद्याप गूढच आहे. तें उकलण्याला जर रा. भांडारकर मदत करतील, तर त्यांचा मी फार आभारी होईन.

७ ह्मातारपणीं तुकारामाला मूल झालें किंवा नाहीं, आणि तो सदेह वैकुंठास गेला किंवा घरींच बसून मेला, ह्या प्रश्नांची वासलात येथपर्यंत लागली. येथेंच, खरें ह्मटलें असतां, हा निबंध संपावा. परंतु रा० भांडारकरांनीं दोन चार अवांतर प्रश्न व कोट्या केल्या आहेत. त्यांना उत्तरें देऊन, मग समाप्ति करणें शिष्टाचाराचें होईल असें वाटतें. रा० भांडारकर विचारतात कीं इंदुप्रकाशांत छापलेल्या गाथेंतील इंग्रजी चरित्राचा मराठी चरित्र तर्जुमा आहे, त्याला आधार काय? अंतस्थ प्रमाणांवरून भांडारकरांना, असें वाटतें कीं मराठी चरित्राचा इंग्रजी

तर्जुमा आहे. परंतु चरित्र खालील उतारा लक्ष्यांत घेतां भांडारकरांचें हें मत साधार नाहीं असें दिसेल. इंदुप्रकाशांतील गाथेच्या मुखपृष्ठावर असा मजकूर आहेः—

A

COMPLETE COLLECTION

OF THE

POEMS OF TUKARAM

TO WHICH IS ATTACHED

A LIFE OF THE POET IN ENGLISH

BY

JANARDAN SAKHARAM GADGIL, B. A.

ह्या मुखपृष्टावरील मथाळ्यांत इंग्रजी चरित्राचाच तेवढा उल्लेख केला आहे, मराठी चरित्राचा केला नाहीं. मुद्दाम उल्लेख करण्याचें कारण असें कीं तें चरित्र शोधकपणानें व विवेचकदृष्टीनें जनार्दन सखाराम गाडगीळ यांनीं लिहिलें, सबब तें महत्वाचें आहे, असें लोकांना कळावें. शंकर पांडुरंग पंडिताच्या देखरेखीखालीं विष्णु परशुराम शास्त्र्यांनीं ही गाथा छापली. विष्णु परशुराम शास्त्री पाश्चात्त्य विद्येत व शास्त्रपद्धतींत प्रवीण नसल्यामुळें, त्यांजवर शंकर पांडुरंगांची देखरेख ठेवावी लागली व शोधक व विवेचकबुद्धीनें चरित्र लिहिण्याचें काम पाश्चात्य विद्याविभूषित जनार्दन सखाराम गाडगीळ ह्या तरुण व तरतरीत गृहस्थाकडे द्यावें लागलें. त्याच्या अनुरोधानें विष्णु परशुरामशास्त्र्यांनीं मराठी चरित्र लिहिलें असें दिसतें. परंतु त्याचा उल्लेख मुखपृष्ठावर नाहीं. ह्याचा अर्थ असा होतो कीं चरित्राचें कर्तृत्व जनार्दन सखारामाकडे

होतें, विष्णु परशुरामाकडे नव्हतें. इंग्रजी चरित्र मुख्य व त्याचा तर्जुमा मराठी चरित्र, असें जें मी ह्मटलें त्याला कारण हें असें आहे. तें रा. भांडारकरांना पसंत पडल्याचें कळेल अशी मनीषा आहे.

भांडारकरांचा दुसरा प्रश्न असाः— " शके १५७१त शिवाजीला रामदासास भेटण्यास तुकारामानें सांगितलें, " असें जें मी विधान केलें आहे त्याला आधार काय. ह्याला आधार रामदासाच्या बखरीचा व इतर शिवाजीच्या बखरीचा. त्यांत १५७१त रामदासाला भेटण्यास शिवाजीला तुकारामानें सांगितल्याचा मजकूर रा. भांडारकरांना सांपडेल व त्यांची लज्जा रक्षण होईल. अवतरणचिन्हांतर्गत माझ्या वाक्यांत १५७१ पूर्वीं शिवाजीनें रामदासाला गुरू केलें नव्हतें असें कोठें ह्मटलेलें नाहीं. रामदासाला गुरू करून तुकारामाला भेटण्यास शिवाजीनें बोलाविलें असतां, रामदासाकडेच जाण्यास तुकारामानें शिवाजीला सांगितलें असेल. ह्यांत माझ्या लिहिण्यांत विरोध कोठें व कसा येतो तें कळलें नाहीं. तें कळविण्याची तसदी रा. भांडारकर घेतीलच.

---

# श्रीरंगानुजकृत संतस्तवन

१ ग्रंथमाला व महाराष्ट्रकवि ह्या दोन मासिकपुस्तकांतून पाच सहा संतमालिका प्रसिद्ध झाल्या आहेत. अलीकडे श्रीरंगानुजकृत संतस्तवनात्मक एक भूपाळी ऐकण्यांत आली. अशा संतमालिका व संतस्तुती किती असतील ह्याचा अंदाज नाहीं. आतांपर्यंत ज्या मालिका व स्तुती उपलब्ध झाल्या, त्यावरून असें दिसतें कीं, संतमालिका दोन प्रकारच्या असतात::—एक सामान्यतः सर्व संतांची; व दुसरी विशिष्ट पंथांतील संतांची. दत्तपंथ, रामदासी पंथ, ज्ञानेश्वरपंथ, वगैरे पंथांतील साधुपुरुषांची जी परंपरा ती ह्या दुसऱ्या प्रकारांत मोडते. प्रस्तुतची संतमालिका येणेंप्रमाणें:—

उठि, उठी, बा । पुरुषोत्तमा ।
भक्तकामकल्पद्रुमा ॥
आत्मारामा । निजसुखधामा ।
मेघश्यामा । श्रीकृष्णा ॥ १ ॥
भक्तमंडळी महाद्वारीं ।
उभी तिष्ठती । श्रीहरी ॥
जोडोनिया । उभय करी ।
तुज मुरारि । पहावया. ॥ २ ॥
सुरवर, सनकादिक, नारद ।
व्यास, वाल्मिक, ध्रुव, प्रल्हाद ॥
शुक, बिभीषण, रुक्मांगद ।
हनुमान, अंगद, बळिराज ॥ ३ ॥
" रिक्तपाणी न पश्यति; " ।
घेउन आले सुखसंपत्ति; ॥

ह्मणोनि तुजलागी सांगती, ।
नाचति, गर्जति आनंदें ॥ ४ ॥

आला माणकोजी बोधला ।
जगन्मित्र नागा आला ॥
जोहार करी चोखामेळा ।
उठ घननीळा । लवकरी ॥ ५ ॥

उठोनि प्रातःकाळीं ।
विठ्ठल विठ्ठल हाका मारी ॥
सेना न्हावी उभयकरीं ।
दर्पण घेऊनि तिष्ठतसे ॥ ६ ॥

झाला प्रातःकाळ, जाण ।
करी पंचांगश्रवण ॥
आले मुद्गलभट ब्राह्मण ।
आशीर्वाद घे त्यांचा ॥ ७ ॥

तुझा नामदेव शिंपी ।
घेउनि आला आंगडटोपी ॥
आतां नको जाउ झोंपी ।
दर्शन देई निजभक्ता ॥ ८ ॥

आला नरहरि सोनार ।
घेउनि नाना अलंकार ॥
आला रोहिदास चांभार ।
जोडा घेउन तुजलागी ॥ ९ ॥

सुगंध सुमनें पुष्पांजळी ।
घेउनि आला सावता माळी; ॥
ह्मणतो, श्रीहरिचरणकमळीं ।
अनन्यभावें समर्पू ॥ १० ॥

गुळ, खोबरें भरोनि गोणी ।
घेउनि आले तुकोबा वाणी ॥
त्यांच्या वह्यालागि पाणी ।
लागूं दिलें नाहीं त्वां! ॥ ११ ॥
निराबाई तुजसाठीं ।
दूध, तूप भरोनि वाटी ॥
तुझ्या लावावया होटी ।
लक्ष धरोनि बैसलिसे ॥ १२ ॥
कान्हो पात्रा नृत्य करी ।
सुरदास गायन करी ॥
कर्माबाई खिचडी भरी ।
उभय करीं पातली ॥ १३ ॥
हरिभजनाविण वाया गेले, ।
ते नर बैल सारे झाले ॥
गोऱ्या कुंभारे आणिले ।
खेळावया तुजलागी ॥ १४ ॥
कृष्णाबाई तुजकारणे ।
सर्व कर्म कृष्णार्पण ॥
श्रीरंगानुज शरण ।
अनन्यभावें होतसे ॥ १५ ॥

२ ह्या भूपाळींत ( १ ) सनक, ( २ ) नारद, ( ३ ) व्यास, ( ४ ) वाल्मिक, ( ५ ) ध्रुव, ( ६ ) प्रल्हाद, ( ७ ) शुक, ( ८ ) बिभीषण ( ९ ) रुक्मांगद, ( १० ) हनुमान्, ( ११ ) अंगद, ( १२ ) बळि, हे पौराणिक संत उल्लेखिले आहेत. ऐतिहासिक व अर्वाचीन कालापैकीं ( १ ) माणकोजी बोधला, ( २ ) जगमित्र नागा, ( ३ ) चोखामेळा, ( ४ ) विठ्ठलकवि, ( ५ ) सेना न्हावी, ( ६ ) मुद्गलभट, ( ७ ) नामा शिंपी, ( ८ ) नरहरी सोनार, ( ९ ) रोहिदास चांभार, ( १० )

सावता माळी, ( ११ ) तुका वाणी, ( १२ ) निराबाई, ( १३ ) कान्होपात्रा, ( १४ ) सुरदास, ( १५ ) कर्माबाई, ( १६ ) गोरा कुंभार, इतक्या १६ सोळा संतांचीं नावें गोंविली आहेत. विठोबाला एखाद्या श्रीमंताचें तान्हुलें कल्पून, त्याच्या सेवेप्रीत्यर्थ धंद्याच्या व जातीच्या मिषानें ह्या संतांना व संतिणींना कवीनें विठोबाच्या महाद्वारीं एकदम आणिलें आहे.

३ ही भूपाळी रचणाऱ्या कवीचें नांव श्रीरंगानुज. हा रंगनाथ-स्वामीचा धाकटा भाऊ. माणकोजी बोधला व तुका वाणी ह्यांचा ज्या अर्थी हा उल्लेख करतो त्या अर्थी हा रामदासांच्या वेळीं होता हें उघड आहे.

———

# धाकटा शिवाजी व धाकटा रामराजा

१ क्षत्रियकुलावतंस छत्रपति पहिले शिवाजी महाराज यांचा कनिष्ठ पुत्र जो राजाराम छत्रपति त्याला दोन स्त्रिया होत्या. एकीचें नांव ताराबाई मोहिते; व दुसरीचें राजसबाई घाटगे. या दोघी स्त्रियांना एकंदर मुलगे व मुली किती झाल्या याची माहिती तपशीलवार दिलेली अद्याप कोठें पाहण्यांत आली नाहीं. ही माहिती मिळाली असतां, राजारामाच्या गृहस्थितीचा जास्त खुलाशानें विचार करण्यास मार्ग झाला असता. ह्या दोन्ही स्त्रियांशीं राजारामाचें लग्न संभाजीनें लाविलें. कारण कीं शिवाजीनें जी स्त्री राजारामाला करून दिली होती ती संभाजी राज्यारूढ झाल्यावर लवकरच वारली. सारांश शक १६०२ पासून शक १६२२ पर्यंत वीस वर्षें राजारामानें गृहसौख्य अनुभविलें. तेवढ्या अवधींत त्याला शिवाजी व संभाजी हे दोन मुलगेच तेवढे झाले असतील असें संभवत नाहीं. वीस वर्षांत एकाच स्त्रीला कमींत कमी पांच सात मुलें व्हावीं असें धरलें, तर तीन स्त्रिया मिळून राजारामाला दहा पंधरा मुलें झालीं असावीं असा अंदाज आहे. पैकीं मरणसमयीं त्याला दोन मुलगे होते हें प्रसिद्ध आहे. मुली किती होत्या किंवा मुळींच नव्हत्या, वगैरे माहिती कांहींच नाहीं. थोरल्या शिवाजी महाराजांना मुली किती होत्या ह्याचाहि जर अद्याप निश्चयात्मक निर्णय करणें अशक्य आहे, तर संभाजी, राजाराम वगैरेंचीहि तीच दशा व्हावी, ह्यांत फारसें नवल नाहीं. शिरक्याकडे दिलेली राजकुवरबाई व फलटणच्या निंबाळकराकडे दिलेली तुकाबाई ह्या दोन मुली शिवाजीला होत्या, हें अलीकडे माहीत झालें आहे. शिवाजीला चार बायका असून, त्यांच्या अपत्यांपैकीं दोघा मुलांचीं व मुलींचींच नांवें तेवढीं माहीत असावीं व बाकींच्या अपत्यांचें काय झालें ह्याचा पत्ताहि अद्याप नसावा, ही गोष्ट महाराष्ट्रांतील इतिहासाचीं साधनें शोधणाऱ्या गृहस्थांच्या अल्प संख्येची व अल्पतर उद्योगाची द्योतक आहे.

२ राजारामाची थोरली स्त्री जी ताराबाई तिला शिवाजी नांवाचा मुलगा होता; व धाकटी स्त्री जी राजसबाई तिला संभाजी नांवाचा मुलगा होता. राजाराम वारल्यावर त्याच्या ज्येष्ठ स्त्रीचा पुत्र जो शिवाजी तो छत्रपति झाला. ह्या दुसऱ्या शिवाजीनें शक १६२२ पासून १६२९ पर्यंत गृहकलह झाल्याशिवाय राज्य केलें. शके १६२९।१६३० ह्या सालीं अवरंगझेबाच्या मृत्यूनंतर संभाजीचा पुत्र शाहू गादीवर हक्क सांगण्यास दक्षिणेस आला. ह्या आगमनानें मराठ्यांच्या राजनीतींत अवरंगझेबाच्या व त्याच्या पुत्राच्या व त्याच्या मुत्सद्यांच्या इच्छेप्रमाणें दुहीचा प्रवेश झाला. राजारामाचा थोरला भाऊ जो संभाजी त्याचा पुत्र ह्या नात्यानें गादीचा हक्क आपल्याकडे पोहोचतो असें शाहूचें ह्मणणें पडलें. धाकट्या शिवाजीचें ह्मणणें असें होतें कीं, ज्याअर्थी संभाजीच्या वधानंतर राजारामानें अकरा वर्षे राज्य केलें व राजारामानंतर आठ वर्षे आपण स्वतः साक्षात् राज्यावर आहों, त्याअर्थी राज्याचे खरे वारस आपण आहोंत व दोन पिढ्यांनंतर दुसऱ्या कोणत्याहि प्रतिस्पर्ध्याला—-तो प्रतिस्पर्धी वडिलपणाच्या नात्यानें गादीला हक्क सांगण्यास कितीहि योग्य असो—गादीला हक्क सांगतां यावयाचा नाहीं. आणि शिवाजीचें हें ह्मणणें सर्वथा योग्य व राष्ट्रहिताचें होतें. गादीच्या हक्कासंबंधानें सार्वत्रिक कायदाहि असाच आहे. इंग्लंडच्या गादीवर हॉनोवर कुळांतील पहिला व दुसरा जार्ज राज्यावर असतां, स्टुअर्ट कुळांतील दोघा पुरुषांनीं इ. स. १७१५ व १७४५ ह्मणजे शक १६३७ व १६६७ ह्या सालीं इंग्लंडच्या गादीवर हक्क सांगण्याकरितां खुद्द इंग्लंडांत येऊन दंगेधोपे केले. परंतु त्यांचा गादीवर हक्क शाबीद झाला नाहीं. त्याना युद्धांत जय येता तर ते गादीचे मालक झाले असते ही गोष्ट निराळी. परंतु, एखाद्या घराण्यांतील पुरुषांनीं दोन पिढ्या राज्योपभोग घेतला असतां, पूर्वींच्या एखाद्या घराण्यांतील पुरुषानें गादीला येऊन हक्क सांगावा, हें धर्माच्या, नीतीच्या, कायद्याच्या, रूढीच्या व कदाचित् देशहिताच्या दृष्टीनेंहि अयोग्य आहे. फ्रान्सांत नेपोलियनानंतर पूर्वींच्या घराण्यांतील दोन पुरुष राजे झाले; नंतर

पुनः नेपोलियनाच्या घराण्यांतील एक पुरुष राजा झाला. अधूनमधून प्रजासत्ताक राज्यपद्धतीही सुरू होती व आहे. परंतु हा प्रकार कायद्याचा, धर्माचा, नीतीचा किंवा रूढीचा समजला जात नसून, अव्यवस्थेचाच समजला जातो. सारांश, शाहूचा हक्क धर्मानें, नीतीनें, रूढीनें व देशहितानेंहि पाहिलें तरी सर्वथा लंगडा होता. असेंहि असून शाहू महाराष्ट्रांत ससैन्य उतरून, कांहीं प्रांत बळकावून बसण्याचा व आपण गादीचे खरे वारस ह्मणून प्रतिपादन करण्याचा प्रयत्न करूं लागला. ह्या प्रयत्नास आळा घालण्याचें काम छत्रपति दुसरा शिवाजी याचें व याच्या मुत्सद्यांचें होतें.

३ शक १६२९त शिवाजी व शाहू ह्यांचा झगडा सुरूं झाला त्यावेळीं शंकराजी नारायण सचिव, रामचंद्रपंत अमात्य बहुतकर, कान्होजी आंग्रे, कृष्णराव खटावकर, दमाजी थोरात, उदाजी पवार, वगैरे मंडळी शिवाजीच्या बाजूची होती. बाळाजी विश्वनाथ, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे, परसोजी भोसले, चिमणाजी दामोदर, हैबतराव निंबाळकर, कंठाजी कदम बांडे, वगैरे मंडळीनें शाहूचा पक्ष उचलला. दोनहीकडच्या मंडळींत आपापल्या पक्षाचीं सूत्रें मुत्सद्देगिरीनें चालविणारे दोन इसम होते. शिवाजीकडे रामचंद्रपंत अमात्य; व शाहूकडे बाळाजी विश्वनाथ भट. वार्धक्य व तारुण्य, शैथिल्य व चलाखी, अर्धवेडेपणा व पूर्ण शहाणपणा, स्त्रियांचा मृदू व अनिश्चित पुढारीपणा आणि पुरुषांचें कठोर व नेमस्थ नायकत्व, ह्यांचा हा कलह होता. ह्या कलहांत जयश्रीनें माळ कोणत्या पक्षाच्या गळ्यांत घातली तें प्रसिद्ध आहे.

४ प्रतिपक्षाचा पाडाव करण्याकरितां, शाहूनें व बाळाजी विश्वनाथानें ज्या अनेक युक्त्या योजल्या त्यापैकीं एका युक्तीचा तपशील प्रस्तुत निबंधांत देण्याचा विचार आहे. लढाया करणें, प्रतिपक्षाचे सरदार फोडणें, मोगलाचें पाठबळ घेणें, वगैरे युक्त्या तर शाहूनें योजल्याच होत्या. परंतु सर्वांत नाजूक व अंतःस्थ अशी जी युक्ति शाहूनें योजिली तिचा उपयोग पृथ्वीवरील बहुतेक सर्व पुरातन व अर्वाचीन राजघराण्यांत

केलेला दृष्टीस पडतो. शाहूच्या प्रतिपक्षाचें पुढारपण ताराबाईकडे होतें. तिचा मुलगा शिवाजी छत्रपति होता. तेव्हां ह्या छत्रपतीला वेडा ठरवून, ताराबाईच्या हातचें शस्त्र काढून घ्यावें, असा व्यूह शाहूनें व बाळाजी विश्वनाथानें रचिला. हा व्यूह तडीस जाण्यास ताराबाईची सवत राजसबाई व राजसबाईचा मुलगा संभाजी ह्यांचा उपयोग चाणक्यनीतीनें शाहूनें व बाळाजी विश्वनाथानें केला. राजारामाच्या मृत्यूपासून शाहू दक्षिणेंत येईतों-पर्यंत सर्व राज्याधिकार ताराबाई व तिचा पुत्र शिवाजी यांच्या हातांत होता. ताराबाईनें आपली सवत राजसबाई व तिचा पुत्र संभाजी ह्यांस फारशी स्वतंत्रता ठेविली नव्हती. ह्यांना ताराबाईच्या कचाटींतून निसटून जाण्याची फार इच्छा होती. ती इच्छा सफल होण्याचा काल शाहूच्या आगमनानें आला. शाहूनें व बाळाजी विश्वनाथानें राजसबाईस व संभाजीस असा सल्ला दिला कीं, ताराबाई व शिवाजी ह्यांस एकाएकीं कैद करून तुह्मीं राज्याधिकार हातीं घेतल्यास आपल्याकडून कांहीं एक अडथळा होणार नाहीं. ही सल्ला राजसबाई व संभाजी ह्यांस पसंत पडून त्यांनीं गिरजोजी यादव, अंताजी तिमळ व इतर गडकरी ह्यांच्या साहाय्यानें ताराबाई व शिवाजी ह्यांस किल्ले पन्हाळा येथें शके १६३४ त कैद केलें आणि आपण कोल्हापूरप्रांताचीं राज्यसूत्रें धारण केलीं. हीं राज्यसूत्रें धारण करण्यांत संभाजीला शाहूचें साहाय्य होतें, त्यामुळें संभाजी शाहूचा मिंधा राहिला व ताराबाईकडून पांच चार वर्षें ताप पोहोंचत होता तो शाहूचा कायमचा बंद झाला. वडील जो शिवाजी त्यास अटकेंत ठेवून राज्यपद भोगण्याची हाव धरल्यामुळें संभाजीचा पक्ष नीतीनें दुर्बल झाला व शाहूचें साहाय्य घेतल्यामुळें एकप्रकारें शाहूचें अंकितत्व त्यास पत्करावें लागलें. ह्यापुढें कोल्हापूरचें राज्य राजनीतीच्या दृष्टीनें फारसें महत्वाचें नाहीं.

९ शके १६३४ त शिवाजीला कैद केला ह्यावेळीं त्याच्या दोघी स्त्रियांपैकीं पार्वतीबाई सगर्भ होती. कारागृहवासांत तिला ह्यावेळीं एक पुत्र झाला. फेरमोबदला करून तो देवीच्या स्वाधीन करून पालन

करविला. पुढें शके १६३६त देवीच्या आजारानें शिवाजी वारला. बरोबर पार्वतीबाई सती गेली. शिवाजीची दुसरी स्त्री भवानीबाई ह्यावेळीं पोटीसी होती ती प्रसूत झाली. पुत्र झाला, तो संभाजीनें व राजसबाईनें कपटबुद्धीनें मारविला; काय निमित्त कीं, शाहूराजे यांची तशी आज्ञा होती. असा ताराबाई, शिवाजी, त्याच्या स्त्रिया पार्वतीबाई व भवानीबाई व त्यांचीं अपत्यें, ह्यांचा शोचनीय वृत्तांत आहे. ह्या कुटुंबांतील ताराबाई व पार्वतीबाईचा पुत्र—जो देवीच्या स्वाधीन केला होता तो—एवढीं दोनच कायतीं दुर्दैवी माणसें राहिलीं. पैकीं ताराबाईचा पुढील इतिहास प्रसिद्ध आहे. पार्वतीबाईच्या पुत्राची हकीकत इतकी प्रसिद्ध नाहीं. ती त्या पुत्रानें लिहिलेल्या एका पत्राच्या रूपानें पुढें देतों. हा देवीच्या स्वाधीन केलेला जो मुलगा तोच पुढें शाहूनंतर रामराजा ह्या नावानें साताराच्या गादीवर आरूढ झाला. रामराजाचें आज्ञापत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

स्वस्ति. श्रीराज्याभिषेक शके ७६, शुक्लनाम संवत्सरे, फाल्गुण शुध पंचमी, गुरुवासरे, क्षेत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति यांणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराउ पंडित अमात्य हुकमतपन्हा व राजश्री शिवराम पंडित छंदोग अमात्य मुतालीक यासी आज्ञा केली ऐसी जे::—

निळो सोनदेव यांसी, तीर्थस्वरूप कैलासवासी थोरले शिवाजी महाराज यांणीं राज्य संपादन केलें, ते समयीं वतनी मजमु सांगोन, त्यासी सर्व लिहिण्याचे यख्त्यार करून दिल्हा. महाराजांनीं व त्यांणीं बहुत प्रेत्नें किले कोट जुने होते त्याचा पुस्तपन्हा करून नवे किले बांधिले. उपरांत, विज्यापूर, भागानगर, दोलताबादच्या पातशाहांनीं फौजा रवाना केल्या. त्यांसी लढाया देऊन पराभव केले. पुढें, दिल्लीहून सुभे आले तेहि पराभविले. जेसिंग यांणीं थोरले महाराज व संभाजी महाराज दिल्लीस नेले. ते समयीं निळो सोनदेव यांणीं राज्य रक्षिलें.

दिल्लीहून आल्यावर निळो सोनदेव मृत्य पावले. नंतर राज्याभिषेक जाला. त्याजवर तुमचे बाप रामचंद्र नीळकंठ यासी मजमूचे दरख दिल्हे. तीर्थस्वरूप कैलासवासी संभाजीराजे व शाहूराजे पातशाहास हस्तगत जाले. तीर्थस्वरूप कैलासवासी राजारामसाहेब चंजीस गेले. मागें पातशाहासी रामचंद्रपंतांनीं लढाया देऊन राज्य संरक्षिलें. तीर्थस्वरूप महाराज, मातुश्री आईसाहेब, व आमचे तीर्थरूप शिवाजी महाराज, व तीर्थस्वरूप संभाजी महाराज रांगणियाचे मुलकीं असतां तीर्थस्वरूप कैलासवासी शाहूमहाराज दिल्लीहून आले. ते समयीं त्यांसी अनकूल न व्हावें ह्मणोन मातुश्री साहेबीं व तीर्थरूपांनीं रामचंद्रपंताजवळ शफत घेतली. यामुळें शाहूमहाराज सातारियास राहिले. आमचे तीर्थरूप व चुलते पनाळियास राहिले. त्याजरून शाहूमहाराज आबासाहेब यांणीं तुमचें अमात्यपद दुसरियास दिल्हे. आमच्या तीर्थरूपांस आमच्या चुलत्यांनीं नजरबंद ठेविलें. उपरांत तुह्मी कीलक संवत्सरीं सातारियासी येतांच, तुमचें अमात्यपद व दरख तुह्मांस दिल्हे. याजकरितां बाबासाहेब यांणीं वारणेचा तह करून तुह्मांस घेऊन गेले. पनाळियास तीर्थरूप नजरबंद असतां आमचा जन्म जाला. ते काळीं वडिलांनीं आह्मांस शिवराम पंडित यांचे स्वाधीन केलें. त्यांणीं आपली स्त्री सौ दुर्गाबाई याजवळ बावडियास ठेविलें. त्यांणीं पंधरा सोळा वर्षें पुत्रापेक्षांही लोभ करून संगोपन केलें. ते वेळेस मातुश्री साहेबांनीं राजश्री भगवंतराव हरी दफ्तरदार यांस तीर्थस्वरूप आबासाहेब यांच्या अनुमतें नेहमीं बावडियास जाऊन साहेबांस व माहाराजांस हरवख्त वर्तमान कळवीत आले. तेथें बोभाट होऊं लागला. यांजकरितां पानगांवीं पोहोंचविलें. तेथें व तुळजापुरीं हा कालपर्यंत अज्ञातवास कर्मिला. हल्लीं आबासाहेब यांणीं सातारियाचे मुकामीं आणून प्रकट करावयासी तुह्मांस शिराळियाहून आणिलें. तों त्यांचे शरीरीं स्वस्थ नाहीं. आरोग्यता जालियावर प्रकट करावें. इतकियांत, कैलासवास जाला. हल्लीं मातुश्री साहेबीं राजश्री बाळाजी पंडित प्रधान, व गोविंद खंडेराव चिटणीस यांसी आज्ञा करून आह्मांस आणून सिंव्हासनारूढ करून

लग्न केलें. तुमचे दरख पूर्ववत् तुह्मांस द्यावे ह्मणोन आज्ञा जाली. त्याजवरून पेशजीचे दरखदारांकडून दूर करून तुमचें अमात्यपद व सर्व लिहिण्याचे दरख करार करून दिल्हे. याची तैनात सालीना बो। मानी होन पातशाहीः—

| | |
|---|---|
| १२००० | खुद्द तुह्मांस अमात्यपद. |
| ६००० | राजश्री शिवराम पंडित यांसी छंदोग अमात्य मुतालीक. |
| ५००० | राजश्री बाबूराव शिवराम यांसी फडनीस. |
| २००० | राजश्री नारायण शिवराम यांसी दफ्तरदारी. |
| २५००० | |

एकूण पंचवीस हजार होन जातीस तैनात करार केली असे. खेरीज तुह्मांस जिल्हा व पूर्वील वतनें व इनाम गांव व बाग शेऱ्या व कुरणें करार करून दिल्हे जातील. व संपूर्ण राज्यांतील मजमू, व फडणिशा व दफ्तरदाऱ्या व किले हायच्या सबनिशा याप्रों वतनी दरख पेशजीप्रों तुह्मांस करार करून दिल्हे असेत. पहिले दफ्तरदार व मदतनीस तुह्मीं आपले निसबतीस ठेविले आहेत त्यांची तहगिरी बदली तुह्मांकडे. याखेरीज लिहिण्यास मदतनीस लागतील ते ठेवणें. त्याची तैनात हुजुरून पावेल. ठाई ठाई लिहिण्याचे दरख लिहितात त्याप्रों होणार नाहीं. सर्व लिहिणें तुमचें तुह्मीं करीत जाणें. येविशीं आबासाहेबीं तुह्मांस इमानपत्र पाठविलें आहे. सदहूप्रों तुमचे दरख तुह्मांकडे वतनी पाठविले जातील. यास आह्मी अगर आमचे वंसीचे दिकत करणार नाहींत. लिाप्रों तुमची तैनात व सरंजाम व जिल्हा व वतनें चालवावयास अंतर करील, त्यास श्री शंभुमहादेव व आंबाबाईची शफत असे. * बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

बार. बार. बार. बार. बार.

---

* येथपासून खुद्द रामराजाचें हस्ताक्षर.

६ रामराजा शके १६३४त जन्मला. त्यानंतर तो शिवरामपंडित बहुतकर ह्यांची स्त्री दुर्गाबाई हिजजवळ बावड्यास पंधरा सोळा वर्षे होता. शके १६५० कीलक संवत्सरीं भगवंतराव व शिवरामपंत पंडित अमात्य ह्यांस शाहू महाराजांनीं साताऱ्यास बोलावून नेलें. तेव्हां रामराजाला आश्रयाचें पुनः संकट पडलें. अशा संकटांत, त्याची रवानगी पानगांवीं झाली. तेथें त्याची बहीण दर्याबाई होती, तिचें सान्निध्य त्याला होतें. पानगांवास नारोजी भुत्या नांवाचा एक आराधी होता, त्याजवळ शक १६७१च्या मार्गशीर्षापर्यंत रामराजा होता. तेथून बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं साताऱ्यास आणून त्यास शाहूच्यानंतर गादीवर बसविलें. राज्यारोहणाच्या वेळीं रामराजाचें वय (शक १६७१–१६३४) ३७ सदतीस वर्षांचें होतें. त्यापैकीं त्याचा बहुतेक सर्व काल अज्ञातवासांत गेला.

७ मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या आठव्या खंडांतील १६९, १७०, १७१ वगैरे लेखांवरून व वरील आज्ञापत्रावरून ही हकीकत लिहिली आहे.

८ इ. स. १७१२त दुसरा शिवाजी वारला ह्मणून ग्रांट डफ ह्मणतो तें चुकलें आहे. दुसऱ्या शिवाजीचीं आज्ञापत्रें इ. स. १७१३ व १७१४ सालचीं सांपडतात. शिवाजी शक १६३६च्या शेवटीं वारला

९ ताराबाईचा पक्ष लंगडा करण्याला शाहूनें जे अनेक उपाय योजले, त्यापैकीं शिवाजीला वेडा ठरवणें, त्याला व त्याची आई ताराबाई हिला कैदेंत ठेवणें, त्याच्या मुलांना संभाजी कडून ठार मारवणें, वगैरे कृत्यें डफला माहीत नव्हती. त्यांचा उलगडा वरील हकीकतीवरून होणार आहे.

१० थोरल्या शिवाजीचा वडिल पुत्र जो संभाजी त्याच्या नंतर शिवाजीचा धाकटा पुत्र जो राजाराम तो गादीवर बसला. राजारामानंतर त्याचा वडील पुत्र दुसरा शिवाजी छत्रपति झाला. दुसऱ्या शिवाजीला पदच्युत करून व राजारामाचा कनिष्ठ पुत्र संभाजी ह्यास

कोल्हापूरचें लहानसें संस्थान देऊन, शाहूनें मराठ्यांची गादी चळकाविली. शाहू शक १६७१ त निपुत्रिक वारला. नंतर दुसऱ्या शिवाजीचा पुत्र रामराजा गादीवर आला. सारांश, शाहू राजारामाच्या वंशजांना यद्यपि कांहीं वर्षें एकीकडे सारण्यांत विजयी झाला, तत्रापि राजारामाचा पुत्र जो शिवाजी त्याच्या वंशाकडे पुनः साताराची गादी गेली. शाहूची उपटसुंभी कारकीर्द जर झाली नसती, तर मराठी राज्यांत दुही माजविण्याचें एक प्रबल साधन अस्तित्वांत आलें नसतें; कदाचित् पेशव्यांचा उदय झाला त्याप्रकारानें झाला नसता; व अर्थात् माराठ्यांच्या इतिहासाला निराळें स्वरूप आलें असतें. प्रायः सत्य व न्याय ह्यांना चंद्रसूर्याप्रमाणें अधूनमधून ग्रहणें लागावीं असा मानवी प्रगतीचा संकेतच दिसतो.

---

# मुकुंदराज



१ मराठी भाषेंतील आद्य ग्रंथकार कोण, ह्यासंबंधीं आज पन्नास पाऊणशें वर्षें संदेह चालू आहे. कोणी ह्मणतात, मुकुंदराज आद्य; व कोणी ह्मणतात, ज्ञानेश्वर आद्य. पण ह्या वादांत कांहीं तात्पर्य नाहीं. कारण, वादी व प्रतिवादी ह्या दोघांनाहि, पुरावा ह्मणजे काय, तो न्यायासनापुढें आणावा कसा, व त्याचें आविष्करण कोणत्या शब्दांनीं करावें, ह्या तीन गोष्टी बहुतेक बिलकुल कळलेल्या नाहींत. मराठी-भाषेचा आद्यग्रंथकार ज्ञानेश्वरहि नाहीं व मुकुंदराजहि नाहीं. ह्या दोघांच्याहि पूर्वीं निवृत्ति, गैनी, हेमाडी, वगैरे सनातनधर्मीयांनीं व चक्रधरादि महानुभाव व जैन यांनीं ग्रंथरचना केली आहे; व त्यापैकीं निवृत्तीची गीता, हेमाडीच्या पद्धती, वगैरे ग्रंथ उपलब्ध आहेत. तेव्हां ज्ञानेश्वर व मुकुंदराज ह्यांच्यावर आद्यग्रंथकर्तृत्वाचा आरोप करणें केवळ अप्रस्तुत आहे. ह्या दोघांपैकीं ग्रंथकर्तृत्वांत पूर्वापर कोण, हा प्रश्न मात्र, प्रस्तुत असून, सोडविण्याला शक्य आहे.

२ तंजावरांतील पुस्तकालयांत मुकुंदराजाचे विवेकसिंधु, पंचीकरण व परमामृत, हे तीन ग्रंथ आहेत. पैकीं पंचीकरणांत मुकुंदराजाची गुरु-परंपरा दिली आहे, ती अशीः—

१ श्रीआदिनाथ
|
२ श्रीहरिनाथ
|
३ श्रीरघुनाथ
|
४ श्रीमुकुंदराज

३ ज्ञानेश्वराची गुरुपरंपरा येणेंप्रमाणेः—

१ आदिनाथ
|
२ मत्स्येंद्रनाथ
|
३ गोरखनाथ
|
४ गैनीनाथ
|
५ निवृत्तिनाथ
|
६ ज्ञाननाथ ( ज्ञानेश्वर )

४ पैकीं निवृत्तिनाथ व ज्ञानेश्वर ह्यांच्या वयांत दोन चार वर्षांचेंच अंतर असल्यामुळें, त्यांची पिढी वस्तुतः कालगणनेंत एकच धरणें भाग आहे. ह्मणजे आदिनाथापासून मुकुंदराजाची चवथी पिढी व ज्ञानेश्वराची पांचवी पिढी होते. दर पिढीस वीस वर्षें धरलीं तर ज्ञानेश्वराहून मुकुंदराज वीस वर्षांनीं वडील ठरतो. ज्ञानेश्वराचा सर्व कारभार विशीच्या सुमारास आटोपला. मुकुंदराज राजयोगी असून तो जोगाईच्या अंब्यास पर्वतांतील गुहेंत योगसाधन करून पूर्ण शंभर वर्षें जगला, अशी आख्यायिका मुकुंदराजाच्या आंबें येथील शिष्यशाखेंत प्रचलित आहे. त्यावरून असें ह्मणावें लागतें कीं ज्ञानेश्वरानंतर चाळीस पन्नास वर्षें मुकुंदराज होता. ह्याचा अर्थ असा होतो कीं, ज्ञानेश्वर जन्मण्याच्या पूर्वीं चाळीस वर्षें व मरण्याच्या नंतर चाळीस वर्षें मिळून शंभर वर्षें मुकुंद-दराज जगला. ह्मणजे मुकुंदराज ज्ञानेश्वराच्या आधींहि होता व मागूनहि होता.

५ मुकुंदराज शैव होता व द्वारसमुद्राच्या शिवोपासक बल्लाळ राजांचा त्याला आश्रय होता. द्वारसमुद्राच्या बल्लाळांचें राज्य शक

१२३२ च्या सुमारास अस्त पावलें. त्यानंतर पंचवीस तीस वर्षांनीं मुकुंदराज वारला.

६ आतां एक प्रश्न राहिला. ज्ञानेश्वरी आधीं किंवा विवेकसिंधु वगैरे ग्रंथ आधीं. विवेकसिंधूची एक बरीच जुनी पोथी–सुमारें ३०० वर्षांची जुनी—तंजावरांतील सरस्वतिमहालांत आहे. तिची भाषा मज-जवळील मुकुंदराजाच्या ज्ञानेश्वरीच्या पोथींतल्यासारखी आहे. जोगा-ईच्या आंब्यास जी जुनी पोथी आहे ती तर तेथील शिष्यमंडळीस वाचतांहि येत नाहीं व अर्थात् समजतही नसावी. ह्यावरून असें एक अनु-मान करतां येतें कीं ज्ञानेश्वरीच्या सुमारास–किंचित् अगोदर—विवेक-सिंधु लिहिला गेला असावा.

७ ज्ञानेश्वर भक्तिमार्गीत विठ्ठलभक्त होता व त्यानें अभंगादि लौकिक ग्रंथरचना केली आहे. तशी अभंगादि ग्रंथरचना मुकुंदराजानें केलेली प्रसिद्ध नाहीं. शिवाय, विठ्ठल हें विष्णुदैवत आहे; व मुकुंदराज शिवो-पासक होता. हाच ज्ञानेश्वर व मुकुंदराज ह्यांच्यांतला मुख्य भेद होय. दोघेहि आदिनाथसंप्रदायांतील होते. परंतु एक केवळ शिवोपासक होता. व दुसरा शिव व विष्णु ह्या दोघांचा उपासक होता. ज्ञानेश्वराची मुकुंद-राजापेक्षां जास्त थोरवी जी आहे ती ह्याच गोष्टींत आहे.

———

# रघुनाथपंडित

१ मद्रास इलाख्यांत आरणी ह्मणून जें शहर आहे त्यांत चार मराठी कवी झाले; पहिला आनंदतनय, दुसरा रघुनाथपंडित, तिसरा सुभानराव व चवथा गोसावीनंदन. आरणीचे महाराष्ट्रब्राह्मण त्या प्रांतीं धिप्पाडपणा, राकटपणा व शूरपणा ह्या तीन गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत.

कंगाल हे ब्राह्मण आरणीचे।
परंतु ते शूर रणांगणीचे ॥

हा श्लोकार्ध सर्वांमुखीं त्या प्रांतीं असलेला आढळून येतो.

२ रघुनाथपंडिताचें दमयंतीस्वयंवर प्रसिद्ध आहे. त्याखेरीज रामदासवर्णन व गजेंद्रमोक्ष अशीं दोन पद्यें तंजावरास भाऊस्वामींच्या मठांत सांपडलीं. पैकीं रामदासवर्णन येणेप्रमाणें:—

आह्मांतुह्मांस भववारिधिमाजि तारूं
जे वाचितां परिसितां मग होय तारूं।
जे दासबोधरचना घडली जयाला
वंदूं निरंतर तया गुरुराजयाला ॥ १ ॥

वैराग्यभाग्य भरलें असतां अनन्या
आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्तिकन्या।
चौथी तयांत वरिली उरल्या न पाहे
तो आमुचा गुरु समर्थ समर्थ आहे ॥ २ ॥

श्रीरामदासगुरु शांतिवधूस अंगीं
अंगीकरूनि मिरवे स्वसुखांतरंगीं।
रंगी उभा कर उभारुनि वंदनाचे
नाचे मुखीं गुण वदे रघुनंदनाचे ॥ ३ ॥

खेळावयास हनुमंत गडी जयाचा
जो या महीवरि वतंस जितेंद्रियांचा ।
ज्याचीं पदें प्रणमिताति कवींद्र राजे
श्रीरामदास गुरु तो अमुचा विराजे ॥ ४ ॥

जो डोंगरी गिरिदरीं फिरतां न भागे
ज्याची पवित्र घन कीर्ति जनीं विभागे ।
जो तत्वबोधकविता करिता न मोजी
तो रामदास गुरुवर्य नमो नमो जी ॥ ५ ॥

शोभे शतद्वय समास समासभारीं
जो दासबोध निजबोधसुखा उभारी ।
त्या सेवटीं दशक जोडित जो विसावा
श्रीरामदासगुरु तो अमुचा विसावा ॥ ६ ॥

चिद्बोधसेज अरुवार नव्या फुलांची
सायुज्यमुक्ति ललना असतां जयाची ।
तो रामदास अकळत्र असें गणावें
अज्ञान होत जन, काय तयां ह्मणावें ॥ ७ ॥

जो लेखणीसहित कागद दौति वाहे
तो दंड सद्गुण उदंड जयांत आहे ।
हस्ती तयासि मिरवी फिरवी विनोदें
श्रीरामदासगुरु तो नमिला प्रमोदें ॥ ८ ॥

जो भर्जरी सरस पाटलवर्ण चेलें
शोभे जयास लघुसें निटळीं अवाळें ।
बोले समर्थ रघुवीर समर्थ ऐसें
तो मी स्तवीन निजसद्गुरु वाग्विलासें ॥ ९ ॥

जेणें प्रशिष्य निजशिष्य अनेक केले
देतां प्रसाद कफनी कफ नीट जाले ।
लोकाभिराम गुण बोलत राम कर्ता
साष्टांग वंदन करीन तया समर्था ॥ १० ॥

श्रीरामदासगुरुवर्णनरूपपद्यें
वृत्तें वसंततिलका सुजनैकहृद्यें ।
संख्या करूनि दशकावरि एकतेनें
केली अपूर्व रघुनायकपंडितानें ॥ ११ ॥

३ ह्या वर्णनांत कवि आपणां स्वतःस रामदासाच्या शिष्यवर्गांत गणतो; व वर्तमानकालाचा उपयोग करून वर्णनसमयीं समर्थ जिवंत होते, असें दर्शवितो. ह्यावरून रघुनाथपंडिताचा समय शक १५८२ पासून १६४२ पर्यंत असावा, असें निश्चयानें विधान करणें शक्य होतें.

४ हा कवि बराच वयातीत वारला, असें ह्याच्या खालील उक्तीवरून दिसतेंः—

ह्यातारा बहु जाहलों, कवण ही त्राता नसे भेटला
भाताची तजवीज ते च उदरीं भाता गमे पेटला ।
हातामाजि नसे च येक कवडी हा ताप आतां हरी
दातारा मज वाचवी सदय हो माता पिता तूं हरी ॥ १ ॥

हा श्लोक रघुनाथपंडितांचा ह्मणून तंजावरांतील बहुश्रुत लोक सांगतात. श्लोकावरून असें दिसतें कीं, इतर अनेक कवींप्रमाणें रघुनाथपंडित फुटक्या कवडीलाहि महाग होऊन, उतार वयांत वारला. ह्याचा मृत्युकाल सुमारें शक १६४२ धरावा.

५ पंडितांचें गजेंद्रमोक्षकाव्य दमयंतीस्वयंवराइतकेंच हृदयंगम आहे. वाचकांच्या रंजनार्थ तें येथें देतों. अंतर्गत सौंदर्यामुळें तर तें प्रिय होईलच. पण नावीन्यामुळें जनांच्या कृपादृष्टीस तें पात्र होईल, अशी खात्री वाटते.

# गजेंद्रमोक्ष

कोठें वैकुंठ कोठें गजपतिस बळें नक्र वोढी तटाकीं
तेथें जो लागवेगेंकरुनि पवनसा धावला पावला कीं ।
तो स्वामी स्मर्तृगामी निरवधिकरुणासिंधु बंधू प्रणामी
लक्ष्मी वत्सें लक्षामीं स्मरुनि निजमनामाजि गायीन नामी ॥ १ ॥

कैसा तोयचरें गजेंद्र धरिला तो हीं तया माधवें
कैसा सोडविला करूनि करुणा भक्तैकहृद्बांधवें ।
हें आह्मीं परिसूं परीक्षिदवनीनाथें असे बोलता
जाळा श्रीशुक बोलता परिसता राजा सुखें डोलता ॥ २ ॥

उंच योजनशतें शत साजें
लांब रुंद हि तसाच विराजे ।
तो त्रिकूटशिखरी वरि तुंगें
स्वर्णलोहरजतात्मक शृंगें ॥ ३ ॥

शृंगाभिधानक विशाळ धरूनि भाला
तेणेंकरूनि गिरि तो गिरितो नभाला ।
जोपा झरे-जल-तृणें करितो मृगांचीं
जो पाझरे निजतटाकतटांत सांची ॥ ४ ॥

ज्यावरी होय निगा नगांची
सदैव विश्रांति खगामृगांची ।
जागे जयाचे उदरीं दरींचे
विळास तेथें सुरसुंदरींचे ॥ ५ ॥

नदीनद तयावरी सजल जे तयांचे तटीं
पटीरनिकटीं वटीं जटिलतांदलांचे पुटीं ।
कटीं धरुनि गोमटीं हरिवधूटिका लेंकरें
फलें भरुनि तन्मुखें करिति सन्मुखें ही करें ॥ ६ ॥

उद्यान येक ऋतुपाख्य तया त्रिकूटीं
केलें स्वतंत्र वरुणें निजकेलिसाठीं ।
नाना फुलीं विकसतां सकळांस भासे
हे या मिसेंकरुनि चैत्ररथास हांसे ॥ ७ ॥

चिगुरले, फुलले, फळले तसे
तरु च भूषण तें वन लेतसे ।
सकळिकां कळिकांस विकासवी
मधु सुवासनिवास विकासवी ॥ ८ ॥

लतेतळीं रुंदनिरुंद कालवे
गळोनि तेथें मकरंद कालवे ।
परागही सांद्र तयांत रंगती
फुलांसवें भृंगतती तरंगती ॥ ९ ॥

रुचति मधुर जैसीं चांगली तूपकेळें
सुरुचिर रचितैसी लागलीं तूपकेळें ।
शिवति गगन तैशा नारिकेळी रसाळें
सहित फळकदंबे सांद्र केळी रसाळें ॥ १० ॥

उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसांचे ॥
घोस तसे फणसांचे षण्मासांचे तसे च वरिसांचे ॥ ११ ॥

विख्यात नामें लवलीलता जे
फलावलीनें लवली विराजे ।
चंद्रोदयीं घोंस तिचे फुलांचे
होती विसांवे अलिनीकुलांचे ॥ १२ ॥

दालिंबें स्वादु लिंबें कुरवक–बदरी–वृक्ष सीताफळांचे
जेथें जंबूफळांचे समुदय पिकले घोंसही श्रीफळांचे ।
वेळाचे वेल वाचे न वदवति जसे ते तसे वेलवांचे
शाखीं वायू जयांचे विवर रव करी जोड जे पावयांचे॥ १३ ॥

तया वनीं एक तटाक तोयें
तुडुंबलें तामरसानपायें ।
निरंतरामंद मरंद वाहे
तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ १४ ॥

पीतां मरंद उदरंभर बंभरांचें
जे होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ।
तें पद्म जेथिल सहस्र दलां धरीतें
प्रत्यक्ष सूर्यकिरणास विसांववीतें ॥ १५ ॥

तया वनसरोवरीं उमलतां सरोजें रजें
मिळोनि मिरवे दळीं सलिल मोक्तिकाकार जें ।
तयास सम आणिकें कवण माणिकें मोकळीं
असोत जरि पोवळीं दिसति कोवळीं कोवळीं ॥ १६ ॥
मधुपांचीं खिल्लारें सरोवरामाजि कुमुदकल्हारें ।
इंदुविकासविलासें होतीं सकळा समान सोल्लासें ॥ १७ ॥
अमृतही पयही ह्मणवीतसें
मधुर सारसतें जल गातसें ।
मधुरसा रस यास्तव गातसे
उभय होय तसी रुचि वीतसे ॥ १८ ॥
राजहंसा तया तोयीं राजहंस विसावती
चक्रें हीं चक्रवाकांचीं चक्राकार विराजती ॥ १९ ॥
ऐसे तटाक वरुणोपवनांत जेथें
पूर्वोक्त पर्वतवनस्थ गजेंद्र तेथें ।
येतो कुटुंबसमवेत तृषार्त जाला
मार्तंडचंडकिरणीं अति तप्त केला ॥ २० ॥
सखे मायेभाचे चुलतपुतणे आणि चुलते
सखे ही सांगातें सळमिसळ जाले सकळ ते ।
स्त्रिया ही जावांयी तनुज निज सायींत दडती
सतीचे बोलावे कळतिल गजेंद्रास पुडती ॥ २१ ॥
जो काननीं विचरला चरला तृणातें
धुंडीतसे तृषित चिल्लर थिल्लरातें ।
तो श्रीगजेंद्र जललोभ मनीं धरोनी
दानांबुपान करवी मधुपांकरोनी ॥ २२ ॥
फिरत फिरत ऐसा येत होता पुढारीं
तंव वल वरुणाचें लक्ष जालें निडारीं ।
त्वरित सिरुनि तेथें उंच वाहेस वाहे
तृषित गज तटाकीं तुंबळें अंबु पाहे ॥ २३ ॥

तटाकाचे तोयीं हळुच उतराया चतुर तो
पुढारीं दो पायीं तनुभर उपायीं उतरतो ।
जलातें आरंभीं स्वकरविवरामाजि भरितो
मुखापासीं नेतो गजवर पितो तैं वरपतो ॥ २४ ॥
धाला जलेंकरुनि सिंपितसे कपोळीं
दानोदकावरिल भृंगकुळें उडालीं ।
आले सर्वे निजकुलोद्भव जे तिहींशीं
क्रीडा करूं उतरला गज निम्न देशीं ॥ २५ ॥
वोढी सनाळ कमलांस तटीं झुगारी
हस्तींद्र शैवललतेस उरें विदारी ।
माथां निमग्न करितां उदकीं उदेले
दानांबुतैलज तवंग सवंग जाले ॥ २६ ॥
ऐसा करी जलविहार करी तटाकीं
बाहेर सत्वर मदांध निघेच ना कीं ।
नक्रें तया अवचितेंचि धरोनि पायीं
आकर्षिलें करुनि शक्ति अगाध तोयीं ॥ २७ ॥
गजबजोनि घनध्वनिभैरवें
गरजला गजराज घनारवें ।
निजबळें पद वोढुनि झाडि तो
प्रबळ नक्र मिठीस न सोडि तो ॥ २८ ॥
जें ग्रस्त तें पद सुटूं गज युक्ति दावी
नक्रावरी पद दुजें उचलोनि रोवी ।
तैं कंटकौघ रुपतांच तळांतरंगीं
माथा करी चपळ तोयतरंगसंगीं ॥ २९ ॥
सोंडेनें सुसरीस वोढुनि जळाबाहेर काढूं तटीं
पाषाणावरि आपटूनि रगडूं पाहे धरी सेपुटी ।
तेथें कंटक टोंचले सिरकले पानीय नासापुटीं
श्वासोच्छ्वास न होयसा गंवसला हस्ती तशा संकटीं ॥ ३० ॥

गजेंद्राचे बंधू कवळुनि गजेंद्रा निजकरीं
कडे काढूं वोढूं सकळ सिणले ही बहुपरीं ।
तया नाटोपेसें करुनि सुसरीनें बळ तसें
दिले झोले नेला गजवर जळीं जेवि न दिसे ॥ ३१ ॥

कांहींसा उफळे जळीं गज बळें कांहीं तळा लागतो
हा बाहेर निघोनि येइल असा लागे च ना लाग तो ।
वर्षांचीं शतकें दहा ढकललीं तीरस्थ होते करी
जे ते ही सुसरीस तो निरखितां गेले क्षणाभीतरीं ॥ ३२ ॥

विचारी तैं हस्ती दृढ मज जयांचे भरवसे
तसे ही गेले कीं विषमसमयीं सोडुनि कसे ।
असो आपद्बंधू यदुपति कृपेचा जलनिधि
स्मरूं, बाहूं, पाहूं धणि वरि उभा राहिल कधीं ॥ ३३ ॥

परविदारविलासविशारदें
क्रकचदारुण नक्र तशा रदें ।
चगळितो गिळितो घन वेदना
न वदवे मज येक मधुसूदना ॥ ३४ ॥

श्रुतिपुटीं नयनीं नयनांतरीं
मज करीं जल हें भरलें तरी
भरतसे वरिचेवरि नावरे
जलचरें धरिलें हरि धांव रे ॥ ३५ ॥

पुच्छकंटककठोरखुरीनें
घोर घाय रचिले सुसरीनें ।
तेवि तीस ही करी करवाळी
श्रीहरी मज करीं कुरवाळी ॥ ३६ ॥

वोणवा करुनि वांस गिळीसा
वोणवा गिळिसि गोपविलासा ।
जो मदीयविपदग्नि उभा रे
तोतसा गिळि तसा न उभारे ॥ ३७ ॥

ज्यांत कालियविषौघ उदेले
तोय तें पिउनि गोप निजेले ।
ते हरी तव कृपारस सेखीं
वाचले त्रिजग ही परिसे कीं ॥ ३८ ॥

नाच कालियफणांवरि टांचे
कीं जसान माणि ते पिल टोंचे ।
तद्वधू तुज असे विनवींसें
नाचलास यदुराज विलासें ॥ ३९ ॥

माधवा मृदुरवें भरलीनें
मोहिलें जग तुवां मुरलीनें ।
ते उगाचि अधरीं न धरावी
एक वेळ मज ते विकरावी ॥ ४० ॥

चोज काय भुवनत्रयपोटीं
वाहसी नगतसा नग बोटीं ।
तें असो अणुसमान मनाया
वागवी निजपदीं यदुराया ॥ ४१ ॥

हे रजोयुत इला न शिवावें
हेम मानुनि तुवां निजभावें ।
द्रौपदी पटशतावृत केली
बा तुझी अतुल कीर्ति उदेली ॥ ४२ ॥

पद

प्राणविसाव्या रामा येरील कधीं निरखति जैं तुज डोळे ॥
विश्रांति तयीं ॥ धृ ॥
कोणी रामरवृत्तमराघव वदतां ऐसी वाणी ॥
गमतें मजला आला कार्मुकपाणी ॥
निरखु तुजला हृदयिं धरुनि सिराणी ॥
धांवें उगला ॥ १ ॥

निटिल तटीवरि ठेउनि बाहे भरल्या नेत्रनिडारें ॥
मी वाट तुझी पाहतसे अविचारें ॥
ये राघवजी तुजविण असुनिहि सारें ॥
हा जीव न जी ॥ २ ॥
रघुपतिपंडित भज अखंडित असतां नुसतां रुससी ॥
या कोपभरें किति मान वरवत अससी हें सांग खरें ॥
भावें धरितां दिससी हें काय बरें ॥
प्राणविसाव्या रामा ॥ ३ ॥

## श्लोक

देवेंद्र जैं रिचवला च बलाहकांतें
तैं गोकुळावरि तुवां धरिलें नगातें ।
केले सुखी सकळ गोकुळ गोप पाहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४३ ॥
पोहे पसाभर करीं तुज दे सुदामा
पोहे तयास्तव तया सदनीं सदामा ।
तो नांदला सम जया सुरराज कांहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४४ ॥
वांचावया विजयवीर उपाय केला
भीष्मासमीप पण ही तृणतेस नेला ।
सारथ्य सांग रचिलें च रथीं तुवां ही
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४५ ॥
नाटोपतां मगधराज वृकोदरानें
पाहून खूण समजूनि तुझ्या करानें ।
केला पदीं मग धरूनि विदीर्ण देहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४६ ॥
जागा तुवां करविला मुचकुंद तो कीं
काळास ही करुनि भस्म निजावलोकीं ।

राहे सुखी तुज विलोकुनि मुक्तिगेहीं
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४७ ॥

पद

थोर हे उपेक्षा माझी आदरिली काय मुकुंदा ॥ धृ ॥
धांवलासि सजणा स्मरतां संकटीं प्रल्हादासाठीं ॥
पावलासि पांचाळीतें नेसविल्या अंशुककोटी ॥
न दिसे ते तांतडि मोटी ॥
करुणा ये ना कां पोटी ॥
करणावरुणालय हे गोविंदा ॥ धृ ॥
इंदिराकळत्रा इंद्रें वर्षता घनघनधारा ॥
गोवर्धन उचलुनि केला त्वा गोकुळलोकां थारा ॥
रजनीनायक कुलहीरा ।
रजनीदिन मी यदुवीरा ॥
भजनीं तंव तत्पर टाकुनि धंदा ॥ २ ॥
जेवढीं अगण्यें दुरितें म्यां केली प्रतिफळ घटिका ।
तेवढीं हि जरि भोगविसी तरि कैसी मा मज सुटिका ॥
कमलासनमन्मथजनका ॥
कमलानन यादवतिलका ॥
विमला परिपालितनृपमुचकुंदा ॥ ३ ॥
वंचनाचि अवघी मजसी करिसी तुं सुरवरवरदा ॥
कांचनांबरा हरि आतां ये रे बा नवकुंदरदा ॥
दीनोद्धारक या बिरदा ॥ राखी गतिविजितद्विरदा ॥
रघुनायकपंडितचित्सुखकंदा ॥ ४ ॥

श्लोक

नाहीस काय मजमाजि जगन्निवासा
हा मान तो तुज अलिप्तपणें तमासा ।

येणें परी परिसतां अति दीनवाणी
भक्तापुढें प्रगट होय रथांगपाणी ॥ ४८ ॥
लक्ष्मीतें हृदयीं धरी तिजसवें श्रीवत्स ही श्रीहरी
हस्तीं कंबुसुदर्शनांबुजगदा हे आयुधें स्वीकरी ।
शोभे विद्युर थावरी निवसला सोनेसळा नेसला
आला नीरधराभिराम निकटीं हस्तींद्र उल्हासला ॥ ४९ ॥
माथां दिव्यीं करीरनीरनिटळीं कस्तूरि विस्तारली
कंठीं कौस्तुभकांति शार्ङ्गलतिका अंसस्थळीं थारली ।
सांगाती चतुराननादि बिरुदें गाती असा भासला
आला भक्तजनैकबांधव हरी हस्तींद्र उल्हासला ॥ ५० ॥
कर्णीं कांचनकुंडलें तळपती तेजें कपोलांकणीं
केयूरें भुजपारिजात फुलले माजी क्वणत्किंकिणी ।
पायीं नूतन नूपुरें कलरवें भासे सवें बोलिला
आला भक्तजनैकबांधव हरी हस्तींद्र उल्हासला ॥ ५१ ॥

## पद

श्रीहरि धणिवरि देखिला ॥ मनिं रेखिला ॥
सखा लेखिला माझा भक्तिरसें केला अखिला राजि राखिला
आजि यादवराजा ॥ धृ ॥
पुनवेचा चांद विराजतो ॥
तन्हि लाजतो मुखदर्पण तैसा कुंडलमणिगणिं साजतो करुनि
साज तो ॥ यदुराज तो ऐसा ॥ १ ॥
गीतगमकगति सुंदरि कंबुकंधरि त्रिवळी धरिताहे ॥
हार उरीं सरसोदरीं शशिसोदरीं ॥ तीस आदरि पाहे ॥ २ ॥
सरळ भरि भुजालता ॥
सविशा लता फुलता तिनगानी कल्पतरूसम शोभता
कर लाभता लोभतावरदानी ॥ ३ ॥

उदरीं जगत्रय धारलें नवल थोरलें ॥
त्रिवळीस्तव भासें ॥ नाभिसरोज विकासलें ॥
ज्यातें पोसलें विधिलेंकरूं हांसे ॥ ४ ॥
कास कसुनि सोनेसळा बाप नेसला ॥
तेणें गुल्फपावेतों मुदा मुनिजनिं सेविला ॥
हृदयीं ठेविला ॥ पद झेंपावेतों ॥ ५ ॥
सुमसम कोंवळें पावलें ॥ भक्ता पावले ॥
ज्यांच्या निजनखचंद्रें ॥ संतचकोर भले ॥
भलें सुख पावले ॥ रघुनाथकवींद्रें ॥ ६ ॥

तो पूजिला गजवरें वारि वारिजातें
देवें करी उचलिला करपारिजातें ।
चक्रेंकरूनि खळनक्र विदारिजेला
आत्मानुरक्त निजभक्त विमुक्त केला ॥ ५२ ॥
इंद्रद्युम्नाभिधानद्राविडकुळमणी पांड्यराजा हरीतें
ध्यातां मौनस्थ होतां तंव घटजमुनी क्रुद्ध बोले तयातें ।
माझें आतिथ्य कैसें न करुनि धरिलें ध्यान हे काय मस्ती
यासाठीं शाप घेयीं विचरसिल वनीं मत्त होसील हस्ती ॥ ५३ ॥
राजेंद्रें नम्रभावें उपरि विनवितां बोलिजेतें ऋषीनें
हूहूगंधर्व कांहीं चुकत तंव तया शापिलें देवलानें ।
तो जाला नक्र तोयीं धरिल तुज तदा मुक्ति दोघां तुह्मातें
शौरी देयील ऐसें कलशभव वदे जाइ हो स्वस्थळातें ॥ ५४ ॥
तो हा श्री गजराज यासि दिधली देवें सरूपस्थिती
नक्रातें शिवतांच होय मग तो गंधर्व दिव्याकृती ।
स्वामीचे गुण गाय पाय नयनीं पाहे धरी अंतरीं
पावे उत्तम लोक पाहुनि तया आश्चर्य केलें सुरीं ॥ ५५ ॥
तैं समुदाय सुमनाचे ।
हरिवरि वरिसाव करि सुमनाचे ॥

भेरीसख कराया ।
विलंब कैंचा असेल नृपराया ॥ ९६ ॥
गजवर निजरूपें धन्य केला मुकुंदें
स्ववसतिसहि नेला चित्सदानंदकंदें ।
इतर गज पळाले साधिलें काय तेहीं
सुलभलभ तयांला श्रीहरी होत नाहीं ॥ ९७ ॥
श्रीमद्भागवतांतरंगचतुराध्यायीं महाकौतुकें
राजेंद्रास गजेंद्रमोक्ष पहिलें जो बोलिजेला शुकें ।
जो गातां अवधारितां सुखकरी ते मुक्ति नांदे करीं
तो शोभे रघुनाथपंडित निजव्याहारकाव्यांतरीं ॥ ९८ ॥

## श्रीगजेंद्रमोक्ष संपूर्ण.

---

## शके १२८९ तील यादवांचा एक

# शिलालेख



१ अलीबागेच्या दक्षिणेस तीन मैलांवर नागांव ह्मणून एक गांव आहे. तेथें भीमेश्वराच्या देवळाच्या उत्तर बाजूच्या पायऱ्यांवर एक शिलालेख आहे तो संस्कृतभाषेंत लिहिला आहे, असें कुलाबा गॅझेटियरांत ह्मटलें आहे. परंतु, तो इसवी सनाच्या चवदाव्या शतकांतील मराठी भाषेंत लिहिला आहे, असें वाचनांतीं मला आढळून आलें. शिलालेखाची लांबी रुंदी कुलाबा गॅझेटियरांत दिली असल्यामुळें, ती मापणी मी येथें नमूद करीत नाहीं. त्यांतील मजकूर मात्र येथें जशाचा तसाच देतों. लेखाच्या एकंदर अठ्ठाविस ओळी आहेत. पैकीं पहिल्या ओळीच्या शेवटलीं तीन व सहाव्या, सोळाव्या व सतराव्या ओळींच्या प्रारंभीचें एकेक अक्षर, मिळून एकंदर सहा अक्षरें कपऱ्या निघून खोल फुटून गेलीं आहेत. बाकीचीं अक्षरें स्वच्छ व सुबोध आहेत. शिला स्वच्छ करून, लेखाची नक्कल घेतली आहे. पांच चार अक्षरें नीट लागलीं नाहींत.

२ शिलालेखाची नक्कल

१ ६ स्वस्तिश्री हिजरत ६९ सकु संवतु १२८९ पळवंग सवंसरे आधेअ + +

२ श्रीमत्य प्रौढिप्रतापचक्रवर्त्ति माहाराजाधिराज श्रीहंबिरु राओ

३ ठाणें कोकणराज्यं क्रोति सत्ये–तस्मिन् काळे प्रवर्त्तमाने धरमादि–

४ –पत्र लिखितं यथा सर्वव्यापारिसिहिप्रो तंनिरोपित अठागरअधि–

५ –कारिआ कुसना अहासण नाकाचा सेणवै देऊं प्रोण्होन्ह वेळित स–

६ – + रंध चिचावाळित्राम पैकि तेथिळा मिजिगिति सिहिप्रो केळि तेथे मरंगी–

७ --आ ळावेयाळागी आठागर समंध मुख्य नागवें आगरुपैकि कोंतळवाडि

८ १ नारदे कवाळिआपैकि भाटाळि १ उरौ वाडिआ २ ससिम फळ भोगा स--

९ हित श्रीरायाजा प्रधानु सिहिप्रो विकति सडाउनि चिचबळिये चिये मिजिगिति

१० वर मीघा मळिया कातिळवाडी विक्रिता द्रामा १६० नारदे कवळिआ जि--

११ ये भाटाळैये विक्रिता द्रंम ४० उरैवाडिआ २ विक्रिता द्रामा सते २००

१२ हे द्राम वरत सकोश कवळिआ मुख्य करुनि समळि आग-रियांस मागिउ--

१३ डिळि घाअटा साळगोपाळवादनिचे तळे अठि अवाटातु राह नाहिं वाडि--

१४ --आ दातारें हिन करुनि जाळिआ ह्मणौनि समळिं आगरियांस त्याति वि--

१५ -कळि ते गुंतिकैवाह सोडवुनि सिहिप्रो ळागौनि वाडिआ विक्रिळि आहे

१६ + वाडिआ कोण्हि दातारु ठमठेळित गुंती करि तर समष्टि आगरियांहि प्रति--

१७ (का) रा वें हा धरमु सिहिप्रोचा तितीवड समष्टि आगरियाहिं समाग्नि प्रतिपाळावें

१८ झाडेआचिं जमेतिस जेतुके आगर साहिआ डंखे पाठे तेतुके आगरास आ प्र-

१९ झाडावें ति रोपडवा वाडि सिहिप्रो सासनविषय भोगवारी हा धरमु समग्नि प्र--

२० --तिपाळावा आघाटाणें पूर्व दिसें नाउ ह्मातारेयाचि वाडि उत्तर दिसे चोरलेवाडि पष--

२१ निम दिसे पठिआगावडि दक्षिण दिसे कोणिष्टियाची वाडी ऐसि आघाटणें चि–
२२ --आ। रविवार तिआहि पाळक वरतअ काण्हा कवळिआ पोगुवाअ रास देऊ–
२३ वेदह्मातारियाचा धरमुदेउ विउह्मातारेआचा वाडेरपैकि वावंदेउ कवाट–
२४ --आ अंबेबारि सोम्हाळ ह्मातारा राढत नागदेउ भाई दायिम्सदे सेटि–
२५ साउ ह्मातारा ताहदेउ कावंद ह्मातारा सवद ह्मातारा गोरु ह्मातारा–
२६ साजकार सोमदेअ जोटादेअ वारैकरु वरतअ मुपल पाटैलु नागळा पाटैलु–
२७ वैजकरु हे जन १८ मुख्य करुनि समग्रि प्रतिपाळावें अंप्राचें साक्षिता–
२८ नागावं जमतेपैकि प्टैगु माहामद्र दाउवार आया शाजि दाउवार आया–

३ हा शिलालेख शालिवाहन शक १२८९ व हिजरी ६९ ह्मणजे ७६९ ह्या वर्षी कोरवलेला आहे. संवत्सर प्लवंग दिला असून महिन्याच्या नावाचीं अक्षरें तीन फुटून गेलीं आहेत. बहुशः महिना अश्विन असावा. शालिवाहनशक नंतर व हिजरी सन आधीं दिला आहे. ह्या वर्षी कोकणांतील ठाणें शहरीं हंबिरराओ राज्य करीत होता. हा हंबिरराव ठाणें--कोकणचें राज्य करीत होता, सबंद कोंकणचें राज्य करीत नव्हता. डाहाणूपासून गोव्यापर्यंतचा जो समुद्रकाठचा मुलूख त्या सगळ्याला कोंकण ही संज्ञा होती; व संजान-डहाणूपासून चेउलपर्यंतच्या मुलखाला ठाणेंकोकण अशी संज्ञा असे. इसवी सन १३४० च्या सुमारच्या इब्न बतूता नांवाच्या एका अरबी प्रवाशानें ‘कोकणठाणा’ असे शब्द या प्रांतासंबंधानें योजिलेले आहेत. इ० स० १३४०

पासून १३६८ पर्यंत ठाणें–कोंकण असें ह्या प्रांताचें नांव होतें, हें ह्यावरून उघड आहे. ह्या हंबिरराओचें बिरुद " श्रीमत्यप्रौढिप्रतापचक्रवर्ति महाराजाधिराज " असें प्रस्तुत शिलालेखांत दिलें आहे. प्रौढप्रतापचक्रवर्तिमहाराजाधिराज हें बिरुद देवगिरीच्या यादववंशांतील भिल्लम ( शक १११०–१११३ ), जैतुगि ( १११३–११३२ ), सिंघण, ( ११३२–११६९ ), कृष्ण ( ११६९–११८२ ), महादेव ( ११८२–११९३ ), रामचंद्र अथवा रामदेव ( ११९३–१२३१ ), ह्या साहाही राजांच्या ताम्रपटांवर सांपडतें. तेव्हां हा हंबिररावहि देवगिरीच्या यादववंशांतलाच असला पाहिजे, हें उघड आहे. " प्रौढ " बद्दल " प्रौढि " अशीं अक्षरें प्रस्तुतच्या शिलालेखांत आहेत खरीं. परंतु तीं चुकीनें पडलीं आहेत असें दिसतें. शिवाय, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं प्रस्तुत शिलालेख मराठींत लिहिलेला आहे त्यांत शुद्ध संस्कृत लिहिण्याचा बाणा कोठेंच दिसत नाहीं. " श्रीमत् " बद्दल " श्रीमत्य " अशीं अक्षरें ह्या लेखांत आहेत. त्यावरून लेख कोरणाराचें संस्कृतानभिज्ञत्व मात्र स्पष्ट दिसून येत आहे. सारांश, बिरुदावरून हा हंबिरराव देवगिरीच्या जाधव अथवा यादववंशांतला होता, असें ह्मणण्यास कांहींच प्रत्यवाय दिसत नाहीं. हंबिररावानें आपल्याला प्रौढप्रताप चक्रवर्ति महाराजाधिराज असें स्पष्ट ह्मटलें असून, लेखाच्या प्रारंभीं हिजरी सन कसा दिला, हें एक विचार करण्यासारखें गूढ आहे. शके १२८९ त बहुतेक सर्व महाराष्ट्रांत, निदान त्यांतील अर्ध्याअधिक भागांत, बेदरच्या बाहमनी पातशाहांचें राज्य प्रचलित होतें. त्यांचा मांडलिक जर ठाण्याचा हंबिरराव असता, तर त्यानें आपल्याला " सामंत ", " महासामंत ", " महामंडलेश्वर ", वगैरे अंकितत्वदर्शक पदव्या घेतल्या असत्या. परंतु, तसा कांहीं एक प्रकार त्यानें केलेला नाहीं. त्यानें महाराजाधिराज व चक्रवर्ति हीं बिरुदें खुशाल योजिलेलीं आहेत. ह्यावरून तो बाहमनी पातशहांचा अंकित नव्हता, हें उघड आहे. मग आपल्या राजलेखावरती त्यानें हिजरी सन, आणि तोहि शालिवाहनशकाच्या आधीं, कसा घातला? शके १२८९ च्या

सुमारचा बाहमनी पातशहांचा इतिहास पहातां, ह्या दशनाशंकेच निरसन होण्यासारखें आहे. शके १२८९ त बेदरच्या तख्तावर महमदशहा पातशाहा होता. त्याकालीं ब्राह्मनी पातशाहीची मर्यादा उत्तरेस नर्मदा, दक्षिणेस कृष्णा, पूर्वेस तेलंगण व पश्चिमेस सह्याद्रि, अशा होत्या. पैकीं सह्याद्रिलगत मावळ ह्मणून ज्या प्रांताला ह्मणतात तो प्रांत पातशाही अंमलाखालीं आला नव्हता. आणि तळकोंकण ह्मणजे डहाणूपासून गोव्यापर्यंतच्या मुलखांत तर ब्राह्मणी पातशाहीचा स्पर्शहि झाला नव्हता. परंतु, अशी जरी स्थिति होती, तत्रापि उत्तरेस गुजराथेंत व पश्चिमेस सह्याद्रिपलीकडे सर्वत्र मुसलमानी झाल्यामुळें, तिचें आवरण मोठ्या प्रयत्नानें स्वातंत्र्य राखून राहिलेल्या ह्या ठाणेंकोंकणावरहि पडून पातशाही सनानें काल-मापन करणें हळू हळू अत्यवश्यक झालें. इ. स. १८१८ त दक्षिणेंत इंग्रजाचें राज्य झाल्यावर, मराठी संस्थानांतून दहावीस वर्षांतच इसवी सनाचा प्राधान्यानें उपक्रम झाला. तोच प्रकार १३१८ त देवगिरीचें राज्य मुसुलमानानीं घेतल्यावर पाचपंचवीस वर्षांनीं कोंकणांत झाला. भोंवतालील बहुतक सर्व प्रांतांतून मराठी भाषा बोलणारे लोक ज्या सनाचा उपयोग करूं लागले तो सन कोंकणांतील ह्या स्वतंत्र राजाऌाहि सुरू करणें अपरिहार्य झालें. शिवाय, ह्याहिपेक्षां एक बलवत्तर कारण आहे. प्रस्तुत शिलालेखांत प्टैगु माहामद्द दाउवार आया व शजिवार दाउवार आया अशा दोन मुसुलमानांची व दार्युभ्सदे सेटि ह्या पारशाचें नांव आलें आहे. त्यांतील दोन मुसुलमान नागाव येथें असणाऱ्या शिपा-यांच्या जमेतेचे ह्मणजे भाडोत्री फौजेचे अधिकारी होते असें दिसतें. दुसऱ्या बाजीरावानें जसें इंग्रजी अधिकाऱ्यांच्या हाताखालीं महाराष्ट्रेतर लोकांचें भाडोत्री सैन्य ठेविलें, तसें हंबिररावानें मुसुलमानांचें भाडोत्री सैन्य ठेविलें, असें शिलालेखांतील जमेत ह्या फरशी शब्दावरून अनुमान करावें लागतें. ह्या अनुमानाचा अर्थ असा होतो कीं हंबिररावाच्या राज्यांत बरेच मुसुलमान लोक येऊन राहिले होते. त्यांना समजण्याकरितां हिजरी सनाचा उपयोग करणें जरूर पडलें. शिवाय, मुसुलमान लष्करी अधि-काऱ्यांचे जोरावर जेथें राजसत्ता अवलंबून राहण्याचा समय आला तेथें

त्यांचा सनहि योजिला जावा, हेंहि योग्यच होतें. हंबिररावाच्या प्रधानाचें नांव सिहिप्रो असें होतें. हें नांव आर्य किंवा द्रविड नसून, परकी, बहुशः मुसुलमानी, असावें. कारण हा सिहिप्रो सर्व प्रकारचा व्यापार करणारा होता असें लेखांत म्हटलें आहे, आणि तत्कालीन दर्यावरचे व्यापारी बहुतेक अरब वगैरे मुसुलमान असत. एवंच हंबिररावाचा मुख्य प्रधानच जर मुसुलमान होता तर त्याच्या शिलालेखावर प्रथम हिजरी सन यावा, ह्यांत कांहीं मोठें नवल नाहीं. ६९ हा आंकडा अरबींत लिहिला आहे हीहि बाब विसरण्यासारखी नाहीं. ह्या शिलालेखांत सेणवै शब्द आलेला आहे व त्याचा अर्थ फौजदार असावा असें वाटतें.

४ येणेंप्रमाणें शक १२८९ त ह्मणजे इ० स० १३६७ त सध्यांच्या उत्तर कोंकणांत यादववंशांतील हंबिरराव याचें स्वतंत्र राज्य होतें, हें या शिलालेखावरून स्पष्ट होत आहे. डॉक्टर फ्लीट Dynasties of the Kanarese Districts ह्या ग्रंथांत ह्मणतात कीं, For the period after A. D. 1298, no epigraphic records, throwing any light on the history of this dynasty, have as yet come to notice ( D. K. D. Chap VII ). History of the Dekkan. ह्या ग्रंथावरून डाक्टर भांडारकर यांचेंहि असेंच मत आहे असें दिसतें. परंतु, नागावच्या ह्या शिलालेखावरून, शक १२८९ ह्मणजे इ० स० १३६७ पर्यंत देवगिरीच्या यादवांचा वंश कोंकणांत ठाण्यास राज्य करीत होता, असें स्पष्ट होत आहे. हंबिरराव ठाण्याच्या गादीवर कधीं आला व त्याचा अंत केव्हां झाला, ह्या बाबी समजण्यास अद्याप कांहीं एक साधन उपलब्ध नाहीं. परंतु इ० स० १३१८ त देवगिरीचें मुख्य राज्य गेल्यावर, इ० स० १३६७ पर्यंत ठाण्यास कोण कोण राजे झाले त्याचा पत्ता किंचित् लागण्यासारखा आहे. तो खालीं देतों.

५ शके १८०६ रूबाईत रा० रा० नारायण वैद्य पुरंदरे पुणतांबेकर यांनीं ‘ शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मण यांची खरी माहिती ’ हा ग्रंथ छापिला

आहे. त्यांत ठाणेप्रांतीं पळशे ब्राह्मण ह्मणून ज्यांना ह्मणतात त्यांची पूर्वपीठिका देण्याचा प्रयत्न केला आहे.त्या ग्रंथाच्या परिशिष्टांत ऐतिहासिक महत्त्वाचे बरेच कागदपत्र छापिले आहेत, पैकीं परिशिष्ट अ, परिशिष्ट ऊ, व परिशिष्ट ऋ, हे तीन लेख प्रकृत विषयाला बहुत उपयुक्त आहेत. ह्या तीन लेखांत वैगुण्य इतकेंच आहे कीं, संपादक रा० पुरंदरे यांनीं या लेखांतील सन व शक काळजीपूर्वक तपासून घेतले नाहींत. अ हा लेख ११२४ हिजरींत ह्मणजे शक १६३४ त ह्मणजे इ० स० १७१२ त लिहिलेला आहे. ( पुरंदऱ्यांच्या चुक्या साक्षेपी वाचकांनीं त्यांच्या पुस्तकांतून दुरुस्त करून घ्याव्या. ) ह्या लेखांत ठाणें येथील भीमदेवाच्या मूळ जुन्या मराठी आज्ञापत्राचें फारशी भाषांतर शक १६३४ त केलेलें आहे, व त्याबरोबर मूळ जुन्या मराठी आज्ञापत्राचें शक १६३४ तील मराठी भाषेंत तात्पर्य दिलें आहे. ह्या तात्पर्यांत शार्वरी संवत्सराला शक १२२२ व प्लवसंवत्सराला शक १२२३ पाहिजे. कारण, शक १२२२ च्या माघानंतर एक वर्ष व तीन महिन्यांनीं ह्मणजे शक १२२३ च्या वैशाखांत भीमराजानें दानपत्र दिलें, असें फारशी व मराठी तर्जुम्यांत ह्मटलें आहे. वरच्याप्रमाणेंच, फारशी भाषांतरांतील फसली सनाच्या आकड्यांतहि दुरुस्ती केली पाहिजे. ह्या दुरुस्त्या फार खोल विचार करून करावयाला नको आहेत. वरवर पाहणाऱ्यालाहि त्यांची अवश्यकता दिसेल. फारशी व मराठी भाषांतर करणाऱ्यांना मूळ जुनें ज्ञानेश्वरकालीन मराठी अक्षर व आंकडे नीट वाचतां न आल्यामुळें ही गफलत झालेली आहे. हा लेख येणेंप्रमाणें दुरुस्त करून घेतला ह्मणजे आंतील मजकूर पूर्णपणें विश्वसनीय आहे असें दिसून येतें. ह्या अ लेखांतील मजकुराच्या सत्यतेला प्रत्यंतरभूत असा स्वतंत्र पुरावा ऊ ह्या लेखाचा आहे. ऊ हा लेख भाषांतर नसून स्वतंत्र फारशी फरमान आहे. ऊ लेख बेदरचा बाहमनी पातशाहा अल्लाउद्दीन दुसरा ह्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षीं लिहिला. हें वर्ष हफ्त् सद् व हफदह् ह्मणजे ८१७ हिजरी ( ह्मणजे शक १३३६ व इ० स० १४१४ ) होय. ह्यासालीं ( ह्मणजे अ लेख तयार होण्यापूर्वीं ३०० वर्षें ) बेदरच्या पातशाहापुढें

भीमदेवाचें मूळ आज्ञापत्र प्रतिवादीनें मांडलें होतें. त्यांतील मजकूर ऊ लेखांत दिला आहे व तो पूर्णपणें विश्वसनीय आहे. अ ह्या लेखाला दुसरा प्रत्यंतरपुरावा ऋ ह्या लेखाचा आहे. हा लेख मूळचा ९०१ हिजरींतला ( ह्मणजे शक १४१७ व इसवी १४९५ तला ) असून त्याची नक्कल ११२४ हिजरींत ( ह्मणजे शक १६३४ व इसवी १७१२ त ) झालेली आहे. फारशी नक्कल अस्सलबरहुकूम असून मराठी तर्जुमा शक १६३४ तला आहे, शक १४१७ तलें मराठी नाहीं. तत्रापि आंतलि मजकुराला धक्का बिलकुल बसलेला नाहीं. असे हे तीन लेख आहेत; व ते एकमेकाला पोषक व एकमेकाच्या स्वतंत्र आहेत. त्यांवरून भीमदेवासंबंधानें खालील हकीकत सजवता येते.

६ देवगिरीच्या रामदेवराव जाधवास शंकरदेव व भीमदेव असे दोन पुत्र होते. पैकीं भीमदेवास शक १२१० च्या मार्गशीर्षमासीं रामदेवानें गुजराथेवर स्वारी करण्यास पाठविलें. ह्यावेळीं गुजराथेंत अन्हिल-पट्टणच्या गादीवर कर्णवाघेला राज्य करीत होता. हा कर्ण विशेष शूर नसून बराच भित्राहि होता. ह्याच्या प्रांतावर दिल्लीच्या गुलाम पात-शाहांचे खिलजी सरदार स्वाऱ्या करीत. कर्णवाघेल्याचा प्रांत मुसुल-मानांच्या ताब्यांत जाण्यापेक्षां आपल्या ताब्यांत येणें जास्त योग्य समजून रामदेवराव जाधवानें भीमदेवाला त्या प्रांतावर पाठविलें. त्याच्या बरोबर ११ उमराव व पुरुषोत्तमराव राजगुरु होते. ह्या सर्वांनीं मिळून लवकरच डभई सर केली आणि शक १२१२ त सबंद अन्हिलपट्टण आपल्या अमलाखालीं आणिलें ( परिशिष्ट ऊ ). परिशिष्ट ऊं त कृष्ण वाघेल्याला करसन ह्मटलेलें आहे. शक १२२१ त कृष्णदेव नावाच्या एका जाधव सरदाराकडे कोंकणचा कारभार रामदेवरावानें सोपविलेला होता. तो शक १२१२ पासून भीमदेवाकडे सोपविलेला दिसतो. शक १२१२ तील भीमदेवाच्या ह्या चळवळीची हकीकत ऐकून, अल्लाउद्दीन खिलजीस कळून, यादवांच्या राज्यावर स्वारी करण्याचा त्यानें निश्चय केला व तो शक १२१५ व १२१६ त अंमलांत आणिला;

अल्लाउद्दीनाची १२१६ तल्या दक्षिणेवरील स्वारीची हकीकत फेरिष्तानें दिलेली प्रसिद्ध आहे. तेव्हां ती देऊन येथें जागा अडवीत नाहीं. गुजराथेवर अंमल करूं पहाणाऱ्या यादवांची व्यवस्था लावल्यावर, अल्लाउद्दीनानें शक १२१८ व १२१९ त गुजराथेवर स्वारी केली. तेव्हां कर्णवाघेला बागलणांत आपली मुलगी देवळदेवी इजसह लपून बसला. इकडे खिलजीनें कर्णाचें राज्य व बायको कमळादेवी हस्तगत केली. नंतर कमळादेवीच्या सांगण्यावरून देवळदेवीस पकडून दिल्लीस नेण्याकरितां व देवगिरीचा रामचंद्रदेवाकडून थकलेली खंडणी वसूल करण्याकरितां, अल्लाउद्दीनानें शक १२२८ त मलिक काफूर यास दक्षिणेंत पाठविलें. अशा प्रसंगीं देवळदेवीला सुरक्षितपणें देवगिरीस घेऊन जाण्याचें काम भीमदेव यादवानें पत्करिलें. परंतु देवगिरीच्या खालून देवळदेवीसह जात असतां, काफूराच्या हातीं देवळदेवी लागली. रामचंद्र यादवाशींहि पुढें तह होऊन, गुजराथेंतील नवसरी प्रांत देवगिरीकरांना मिळाला. तेणेंकरून देवगिरीकरांच्या तर्फेनें कोंकणांतील राज्याचा बंदोबस्त करणाऱ्या भीमदेवाच्या हातीं नवसरी प्रांत आला आणि तो आपल्या प्रांताला अन्हिलवाड व ठाणें अशा दोन नांवानें नांवाजूं लागला. शक १२३९ त देवगिरीचें मुख्य राज्य नष्ट झाल्यावर, भीमदेव कोंकणांत ठाणें येथें राहिलेलें राज्य स्वतंत्रपणें करूं लागला. भीमदेवाला ह्यापुढें बरींच वर्षें मुसुलमानांकडून फारसा त्रास पोचलेला फेरिष्ताच्या इतिहासांत नमूद नाहीं.

७ भीमदेव ठाण्यास यादवांची सुभेदारी करीत असतां शक १२२१ च्या माघांत चांगुणाबाई मिटकरीण इजकडून देशपांड्येपणाचें वतन विकत घेऊन, तें एक वर्ष व तीन महिन्यांनीं ह्मणजे शक १२२३ च्या वैशाखांत पुरुषोत्तमपंत कावळे राजगुरु यास दान देता झाला.

८ अशी एकंदर हकीकत भीमदेवाची आहे. परिशिष्ठ अं त फारशी तर्जुम्यांत याला यादवांचे महाराजाधिराज हें विरुद लाविलेलें आहे.

भीम या शब्दाचा उच्चार व लेख मुसुलमान लोक बिंब करीत असें दिसतें.

९ भीमदेवानें ठाण्यास किती वर्षे राज्य केलें तें निश्चित नाहीं. त्याला केशवदेव नांवाचा एक पुत्र होता, व त्या केशवदेवाला प्रतापदेव नामेंकरून एक पुत्न होता, असें बिंबाख्यानांत ह्मटलें आहे. त्यावरून भीमापासून हंबिररावापर्यंतची वंशावळ अशी रचतां येते.

रामचंद्र देव ( देवगिरी ) १२३१ शक
|
भीमदेव ( ठाणें ) शक १२३९
|
केशवदेव ( ठाणें )
|
प्रतापदेव ( ठाणें )
|
हंबिरराव ( ठाणें ) शक १२८९

पैकीं भीमदेव व हंबिरराव हीं दोन नावें अस्सल फरमानें व शिलालेख यांत येतात त्याअर्थी बिलकुल संशयित नाहीं. केशवदेव व प्रतापदेव हीं दोन नावें प्रमाणभूत कागदपत्रांत, शिलालेखांत, ताम्रपत्रांत किंवा ग्रंथप्रशस्तींत सांपडेतोंपर्यंत संशयित समजणेंच रास्त आहे. आजपर्यंत भीमदेव हें नांवहि संशयित समजत असत. कारण, त्याला आधार एकट्या बिंबाख्यानाचाच होता. परंतु आतां अस्सल फर्मानांवरून तें नांव पक्कें प्रमाणभूत व ऐतिहासिक झालें. तितकींच प्रमाणभूत केशव व प्रताप हीं नावें ठरण्यास किती काळ लागेल तो लागो. हिंदुस्थानांत व विशेषतः महाराष्ट्रांत निश्चित ऐतिहासिक ज्ञानाची व त्याच्या साधनांची वृद्धि होत आहे त्याहून शीघ्रतर झाल्यावांचून जिज्ञासूंचें समाधान होणार नाहीं.

१० नागावच्या ह्या शिलालेखांतील भाषेचा विचार पुढील एका निबंधांत स्वतंत्र करणार आहे.

११ " शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मणांच्या खऱ्या माहिती " च्या परिशिष्ट ऊंत ब्राह्मणी पातशाहा अल्लाउद्दीन दुसरा ह्याच्या कारकीर्दीचें पहिलें वर्ष ८१७ हिजरी होतें असें ह्मटलें आहे. ८१७ हिजरी ह्मणजे १४१४ इसवी. ऊ हें फर्मान अस्सल असून पूर्णपणें विश्वसनीय आहे. फेरिप्ता दुसऱ्या अल्लाउद्दीनाची कारकीर्द इसवी सन १४३९ पासून १४५७ पर्यंत झाली ह्मणून लिहितो. ऊ फर्मान ही कारकीर्द इसवी सन १४१४ त सुरू झाली असें ह्मणतें. येथें फेरिप्ताहून ऊ फर्मानांतील सनच जास्त प्रमाणभूत समजणें जरूर आहे. दुर्गादेवीच्या दुप्काळाच्या फर्माना-संबंधानें लिहितांना फेरिप्ताची अशीच एक चूक दाखविलेली आहे. तेव्हां ह्या दोन चुकांवरून असा निश्चय करावा लागतो कीं सध्यां छापून प्रसिद्ध झालेलें फेरिप्ताच्या बखरीनें मूळ जितकें विश्वसनीय असावें तितकें नाहीं.

---

# आनंदतनय

१ तंजावर शहरीं भाऊस्वामीच्या मठांत आनंदतनयाचा आठवा वंशज बावा या नांवाचा आहे. ह्याचें वय सध्यां साठींच्या सुमाराचें आहे. गोत्र भारद्वाज, शाखा आश्वलायन. प्रस्तुतचे बावा अरणी-कर नाट्य व नृत्य ह्या दोन कलांत प्रवीण आहेत. आनंदतनयाचें काव्यकर्तृत्व ह्या गृहस्थांचे ठायीं नाहीं; परंतु तत्संलग्न ज्या नाट्य व नृत्य ह्या कला त्यांचा छंद ह्यांना फार आहे. बावांचें बायकापोर कांहीं न राहिल्यामुळें, ह्यांच्यापुढें आनंदतनयाचा निर्वंश होणार आहे.

२ आनंदतनय हा मूळचा राहणार अरणीचा. विजापूर दर-बारांतील प्रसिद्ध मुत्सद्दी व योद्धा वेदो भास्कर याला शिवाजीचा बाप शहाजी यास धरून विजापुरास आणण्याकरितां पाठविलें. ही काम-गिरी त्यानें उत्कृष्ट बजाविल्यामुळें, त्यास विजापूरच्या दरबारांतून अरणी हा प्रांत जहागीर मिळाला. वेदो भास्कराच्या बराबर आनंदतनयाचा बाप आनंदराव आरणीस आला. आनंदराव चांगला शिपाई असून उतारवयांत संन्यस्त झाला. ह्यानेंच आपल्या मुलाला गुरूपदेश दिला. आनंदतनयाचा जनक पिता त्याचा गुरू होता, ह्या अर्थाची आरती आरणीस एका वृद्ध गृहस्थानें ह्मटली ती अशीः--

संसारार्णवतारक संशयतमसूर्या ।
सज्जनमुकुटालंकृत चिन्मयवैडूर्या ।
धार्मिकजनघन वर्णिति तव चर्या ।
स्वानंदैकविहारा स्वामी गुरुवर्या ॥ १ ॥
जय देव जय देव जय जी आनंदा ।
जय परमानंदा ।
ज्ञानोज्ज्वलनीराजन तुज निजसुखकंदा । ६० ।

नमितां तुझियां पायां न दिसे भवममता ।
रमतां निजात्मबोधें जगीं भरली समता ।
श्रमतां बहुविधजन्मीं जाली विश्रमता ।
दमितां मन मग कैंची भवभयविभ्रमिता ॥ २ ॥
अपाप तव पदभजनें अपाप मी जालों ।
कृपापांगें तुझिया उदारा मग आलों ।
अपाय गेले उपाययोगें बहु धालों ।
आनंदनंदन विनवी परिपूरण जालों ॥ ३ ॥

३ वरील आरतीवरून हें निश्चयात्मक सिद्ध होतें कीं आनंदतनयाचा गुरू त्याचा बापच होता. आनंदतनय रामोपासक होता. त्याचें नित्य-पूजेचें रामपंचायतन त्याच्या प्रस्तुतच्या वंशजाजवळ अद्यापि तंजावरास आहे.

४ तंजावरप्रांतीं सध्यां जे महाराष्ट्रब्राह्मण व महाराष्ट्रक्षत्रिय आहेत त्यांची त्यांच्या मूळ तंजावरांत आलेल्या पूर्वजांपासून बहुतेकांची आठवी नववी पिढी आहे. दरपिढी २५ वर्षांची धरली तर आनंदतनय शके १६२२ च्या सुमारास हयात होता असें ठरतें. शके १५७२ च्या सुमारास वेदो भास्करानें शहाजी महाराजास पकडून विजापूरास नेलें. त्यावेळीं आनंदतनयाचा बाप आनंदराव वेदो भास्कराबरोबर होता. शके १५७२ तील जर आनंदरावाची हयात, तर शके १६२२ त आनंद-तनय होता हें निश्चित आहे.

५ आरणींतील वृद्ध लोक सांगतात कीं आनंदतनय, गोसावीनंदन व रघुनाथपंडित ह्यांचा समकालीन होता. रघुनाथपंडिताची मुलगी आनंद-तनयाच्या मुलाला दिली होती. तेव्हां हे दोघे कवी व्याही होते अशी जी आजपर्यंत समजूत होती ती ही खरीच आहे. रघुनाथपंडित व आनंदतनय हे दोघेहि कीर्तन करीत असत.

६ आनंदतनयकृत कित्येक पद्यांच्या शेवटीं " आरणीचा शिपाई " अशीं अक्षरें आल्यावरून आनंदतनय आरणीच्या लढाईत होता, असा

कित्येकांनीं निराधार तर्क केला आहे. इंग्लिश लोक जींत होते ती आरणीची लढाई आनंदतनयानंतर पन्नास वर्षांनीं झाली. आनंदतनयाच्या अगोदर पन्नास किंवा शंभर वर्षें जीं गेलीं त्यांत आरणीस एखादी लढाई झाल्याचें प्रसिद्ध नाहीं. आणि यदाकदाचित् एखादी अप्रसिद्ध चकमक झाली असली तत्रापि ती आनंदतनयाच्या आधीं बरींच वर्षें झाली असल्यामुळें तिचा व आनंदतनयाचा संबंध जुळवूं पहाणें अगदीं निराधार आहे. " आरणीचा शिपाई " हीं पदें योजण्यांत " आरणीच्या शूर ब्राह्मणापैकीं एक " असा अर्थ ध्वनित करण्यापलीकडे आनंदतनयाचा कांहीं एक हेतु नाहीं.

७ तिकडील प्रांतांत आनंदतनयास " आरणीबावा " " आरणीकर " असेंही ह्मणण्याचा प्रघात आहे.

८ काव्यसंग्रहांत छापलेल्या प्रकरणाखेरीज ह्या कवीचीं गर्भगीता, पदें, आख्यानें, वगैरे नवीन प्रकरणें नुकतींच उपलब्ध झालीं आहेत.

---

# एकनाथी संतमालिका

विठ्ठल संतांचें रूपडें । प्रत्यक्ष उघडें नेत्रापुढें
तयासि न जाणती मूढें । विषयजाळीं गुंतलीं ॥ १ ॥
मुक्ताबाई ते सकळ तनू । दीप्ति सांवळी तोचि भानू ।
उभा वटेश्वर जगजीवनू । अति लावण्य शोभतसे ॥ २ ॥
ज्ञानदेव तो श्रीमुखकमळ । वरि निवृत्ति मुकुट झळाळ ।
सोपानदेव तो निढळ । आदिपुरुषरायाचें ॥ ३ ॥
मुकुंदराज पारिसा अवधारीं । श्रवण देवाचे निर्धारी ।
नेत्र विसा चांगा खेचरी । निरंतरीं तिष्ठती ॥ ४ ॥

वडवाळसिद्धनागनाथ ।
नासा, पुढें नामा कबीर दोनि होंट ।
आणि जिव्हा मुद्गलभट ।
निंबा भाट गर्जतसे ॥ ५ ॥
बाहुदंड चोखामेळ ।
बहिरा पिसा वक्षःस्थळ ।
जगमैत्र नागा कंठनाळ ।
जोगा माळ प्रेमाचे ॥ ६ ॥
हृदयीं नांदति दोघे जण ।
अच्युतानंत दोनी स्तन ।
उदर रेणुकानंदन ।
नाभी नृसिंहभारती ॥ ७ ॥
नामापाठक कटिप्रदेशीं । मुधो पीतांबर सुरेशी ।
चरणीं अलख रोहिदास । आणि दुसरा सुरदास सांवता ॥८
नारा म्हादा गोंदा विठा । या देवापाईच्या क्षुद्रघंटा ।
ज्योतिरानंद वाजटा । तोडरि येका जनार्दनु ॥ ९ ॥

इति श्री संतमालिका संपूर्णास्तु । श्रीरामार्पणमस्तु ।

(१) ह्या संतमालिकेंत (१) मुक्ताबाई, (२) भानुदास, (३) वटेश्वर, (४) ज्ञानदेव, (५) निवृत्ति, (६) सोपान, (७) मुकुंदराज, (८) परिसा, (९) विसा खेचर, (१०) चांगा, (११) वडवाळ सिद्धनागनाथ, (१२) नामा, (१३) कबीर, (१४) मुद्गलभट, (१५) निंबाभाट, (१६) चोखा–मेळा, (१७) बहिरा पिसा, (१८) जगमैत्र नागा, (१९) जोगा माळ, (२०) अच्युत, (२१) अनंत, (२२) रेणुकानंदन, (२३) नृसिंहभारती, (२४) नानापाठक, (२५) मुधो, (२६) अलख, (२७) रोहीदास, (२८) सुरदास, (२९) सांवता, (३०) नारा, (३१) म्हादा, (३२) गोंदा, (३३) विठा, (३४) ज्योतिरानंद, (३५) जनार्दन, (३६) एकनाथ, इतक्या संतांचीं नांवें आलीं आहेत. छत्तिसांपैकीं एकनाथ शेवटला आहे. ह्मणजे हे सर्व संत शके १५३२ च्या पूर्वींचे होत.

---

# गद्यराज

ग्रंथमालेच्या ११९ व्या अंकांत मानभावाचें एक अपूर्ण काव्य प्रसिद्ध केलें होतें. त्याचे प्रारंभींचे १८ श्लोक व शेवटचे २९८ पासून ३०० पर्यंतचे श्लोक, श्रीपरमार्गसेवक दत्तराज आराध्ये महानुभाव, पेशावरकर, ह्यांच्यापासून मिळालेल्या पोथीवरून, सध्यां येथें देत आहों. ह्या काव्याचें नांव **गद्यराज.** ह्याचा कर्ता बोपदेवशिष्य भीष्ममुनी. ह्या काव्याच्या कालाचा निर्णय महानुभावांचीं आणीक कांहीं प्रकरणें छापल्यावर नंतर करण्याचा विचार आहे.

**श्रीपरेशाय नमः**

श्रीगौरचक्रकरबोधकुळावतारा
वंदौनियां हरिमुनींद्रमुखाधिकारा ।
पंचाष्टसप्तनवराजकथा उदारा
गौरीवसंततिलका निगदीन सारा ॥ १ ॥

हरितयदुवरातें पीतदत्तात्रिजातें
हरिहारिपुरपातें लोहिताश्रीप्रभूतें ।
सुरवरमुखरातें दिव्यजांबूनदातें
नमुनि अरधरातें माळिनीचित्पदातें ॥ २ ॥

श्रीमच्चक्रेश लीळा स्फुरितनिजकळा उद्धरूं जीवकीळा
साकारादिस्वलीळा धरुनि निजकळा भूतळीं व्यक्त जाला ।
तद्गीतोकळिगाथा हरिजवळि कथा पंचकृष्णाधिनाथा
बांधो बंधीं सुगीता विदितपरपथा स्रग्धरा तापमंथा ॥ ३ ॥

पूर्वीं पैं सामवंशीं यदुकुळकळशीं सूरसेनुप्रकाशीं
स्वर्गीं तो सूरु बैसे प्रतुनुवसुदसें घेतलें राज्य कंसें ।
कन्या पैं सूरपोता प्रणयविनिहिता दीधली योग्यजाता

राजेंद्रँ उग्रसेनें नुवर मिरवणें अंबरीं वाणि वाणें ॥ ४ ॥
ईच्या पोटीं कुमारू उपजइल वरू आठवा कंसमारू
ऐसी वाचा कराळा श्रुतदनुजकळा भोजराजा नृपाळा ।
मारूं धांवे सरारां सकरुणितगिरां वोहरां कंसुधारां
बोले शौरी नयार्था सजनि मज वृथा मारिसी भोजनाथा ॥ ५ ॥

भावी पुत्रांसि मारी निर्णी मज कुइरीं मानिलें तें मुरारी
बंदीं पुत्रांसि साता उपजत वधिता कंसु जाला दुरंता ।
जाला शौरी वधूटीविभुउदरपुटीं कृष्ण संभूतसृष्टी
देवींसंबंधशब्दीं जयरवनिनदीं दुंदुभीभेरिनादीं ॥ ६ ॥
देवाज्ञा गोकुळासी जनकु--गतकुशी नेणतां तें जनांसी
ने पैं कृष्णासी नेता व्रजपतिदुहिता आनिली भूतमाता ।
देवी पैं पुत्र जाला ह्मणउनि वाहिला येथें तो कंसु आला
देखे कन्या तियेतें धरि पद निरुतें उपटूं पैं शिळातें ॥ ७ ॥

यावत्ते ऊपटावी तवं गगन जवीं बोलिली शब्दु देवी
थोर्थी जो बाळू वाढे तुज वधिल पुढें पापिया दैत्य गाढे ।
प्रातःकाळीं व्रजासी प्रहितरिपुऋषि विप्रु गेला छळासी
नंदा हा मूळ टाळीं अजितु परकळीं ह्मावळा पाय घालीं ॥ ८ ॥

त्या भाषी गर्गुनामा वधि रिठु महिमा पूतनामोक्षदाम
मोही रक्षांकुळारी शकटवधु करी पैं तृणावर्तु मारी ।
माता पैं चक्रपाणी वदन वहरुणी दाखवी चक्रपाणी
भौती चेष्टा विशाळा करुनि विधिकळा शांति केली समूळा ॥ ९ ॥
गोविंदा मंतु माता श्रुतबहुकुळता बांधतां दामजातां
बोटां दों पूर्णहीना अनुशयविमना जाणुनी खेददीना ।
संपादी तत्कृतीतें नगयुगनिरुतें पाडिलें पादघातें
तेथें ते दिव्य जाले हरिसि विनविलें देवलोकासि गेले ॥ १० ॥
मंथारीं स्तन्य पीतां हरि निजजनिता टाकुनी तेथ जातां
उह्याळे दुग्धजाळा ह्मणुनि दधिकुळा कोपता भेदु केला ।

गोविंदातें विनोदें नवनितकरदें गोकुळीं हास्यवादें
गातां कीशौरगीतीं धिमिधिमि ह्मणती गौळणी नाचवीती ॥ ११ ॥
कोपे शौरीसि माता मृदशन करितां कांपतू भीतभीतां
अंबे पाहे ह्मणौनी वदन विहरुनी दाखवी चक्रपाणी ।
अंबा देखे मुखारीं त्रिभुवनविवरीं त्या कराळा मुरारी
देखौनी भूलिपारा फिरत गरगरां दृष्टि अंबे विसारा ॥ १२ ॥
खेळे गोविंदु लीळा प्रतिवन सकळां गोकुळीं बाललीळा
काकाचे सीस मोडी बकमुख उघडी वत्स मारूनि फेडी ।
नेतां पैं चक्रवाळीं हरिवर जवळी पैं प्रलंबासि फाळी
गोविंदें भूधरातें उचलुनि निरुतें झाडिलें इंद्रमत्तें ॥ १३ ॥
त्रासी शौरी त्रिनेत्रें व्रजजनविधुरें मगजाघातुमारें
गोगोपीगोपजातां गरळनिपतितां कालिया-दर्पुहंता ।
शौरी दावानळातें गिळितु सुखरतें जाळितां गोकुळातें
लीळा मुंजाटवीसी गिळितु परवशी दावदग्धा जनासी ॥ १४ ॥
व्योमारिष्टासि मारी खरदळन करी धेनुकाप्राण हारी
ब्रह्मयाचा गर्वु झाडी अवतनु उघडी केशियादेह मोडी ।
कृष्णातें विप्रजाया भजति फळ तयां नंदभुक्सर्पदाया
नंदा वैकुंठ दावी वरुणपदभवी गोकुळीं दिव्य दैवी ॥ १५ ॥
काळिंदीमाजि बाळी हरि वसनकळी अंजळीबद्धभाळीं
गोपी पैं लज्जमाना हरिकरवसना याचिता वस्त्रदाना ।
गोविंदा रासकेळी रमत विधुकळीं पूर्णवृंदावनाळीं
आनंदें वेणु वाजे हरि-मुरहर-वजें मंगलालाप गाजे ॥ १६ ॥
विंबोष्टीं वेणुनादें जनु सकळ मुदे स्थावरा जंगमा दें
आनंदा गोपनारी चळनमुखकरी मन्मथा बाण मारी ।
संभोगी त्यक्तकांता व्रजजनदयिता सांडुनी बाळपोतां
वेधें विद्धा मुरारी निगति वनचरी आलिया रंगनारी ॥ १७ ॥
तत्तच्छेयीतिशब्दीं धिमिधिमिनिनदीं टाळिया वाति वादीं
नाचे गोविंदु रागीं थयिथयितपगां थाक तोडी तुरंगी ।

गोपीसौभाग्यगर्वा ऱ्हदि धरुनि सदा दैव भावीति देवा
ऐसें जाणोनि शौरी त्यजितु वन वरी राधिके गोपनारी ॥ १८ ॥

\+ + + +

अमितजळदमाळा सागराळीविशाळा
ज्वलनपवनकीळा वेधलीया सुलीळा ।
अचपळगतिनीरा लोळगंगाअपारा
परतरगतिसारा वेधविद्धा सुचारा ॥ २६८ ॥

गौरीहरें सुललितें निजदृष्टिपातें
प्रेमामृतें सुभरितें भुवि सर्वभूतें ।
शर्मीकृतें स्थितिगतें अचळांगवंते
सानंदभावभरितें परबोधवंते ॥ २६९ ॥

चक्रेश्वरें निजगिरा हरिलें सुघोरां
तापत्रयां भुवि नरां कृतबोधसारा ।
आनंदबोधविकरा दिधलें विचारा
सन्मानवां परिकरां स्थितिवेधभारां ॥ २७० ॥

संस्फारती निजकळा सकळा विशाळा
चक्रेश्वरा सुविमळा सुखदा सुकाळा ।
आनंदवीचि भुजनां अतिदुःखमाना
तें जाणवे मुनिजनां सुजनां समानां ॥ २७१ ॥

जांबूनदा परिकरा विभुमूर्ति गौरा
आनंदु दे जनिवरां निजभक्तधीरां ।
संदर्शनें द्विजवरां मनुजां अपारां
कैवल्यनिर्गुणसुरां असुरां विखारां ॥ २७२ ॥

पीतांबरें परिकरें परिधानसारें
सन्मेखळा वरि भरे वरि किंकिणीरे ।



धाम स्फुरे सुमहता सकळ प्रभाता
आच्छादितें परमता वर दिव्यकांतां ॥ २७३ ॥

संभूतिरंगा जनिसंघरंगा
योगींद्ररंगा कमळासुरंगा ।
आनंदरंगा निजभक्तरंगा
श्रीरंगरंगा प्रणतोस्मिरंगा ॥ २७४ ॥

जय जय शितिकीळा पीतधामा विशाळा
जय जय सित-कीळा हल्लकारंगमाळा ।
जय जय वरशोभा दिव्यजांबूनदाभा
जय जय निजशोभा चक्रभारावभारा ॥ २७५ ॥

भावी देवा सुजनु बरवा त्यांसि देतो विसावा
आनंदाचा मिरवत रुचि ब्रह्म दिव्यादिकांचा ।
मुख्या तुल्यां मुदितसकळां अंशरश्मीसुढाळा
लीळादाता अतुळसुखता ज्ञानियां भक्तजातां ॥ २७६ ॥

मुख्या लीलामहंता अमितविभुगता साधनें साध्यहंता
सामर्थ्ये देवनेता प्रसदनगमिता आर्जवें हीन पांतां ।
जैसा भुंडाळ झाडा करितु चिरगडा थोर हीनां निवाडां
संधी त्या संधिमोडा सह मद सतडा तेवि अंधा समीडा ॥ २७७॥

आठांही साध्यहीनां सकळसुरजनां गौरिवर्यांतताना
आनंदाचा सुकाळू विहितु परिबळू त्यां नसे मूर्तिमेळू ।
त्यां ऐसें सर्वदेवीं वसत सुविभवीं तेथ ही साध्यभावीं
नाहीं गौरीसि ऐसें असत परि नसें साध्य जीवावकाशें ॥ २७८ ॥

भ्रमदमदमदांधध्वस्तसंबंधबंध
प्रततततततांधध्वांतसंध्वांतरुद्ध ।
अगसुगविगरागप्रागरंगप्रसंग
प्रजकजभजभोज त्राहि मां देवराज ॥ २७९ ॥

चक्रेशा नामसारा सकळभयहरा नाम तूझें उदारा
सर्वा सिद्धी प्रकर्तें मुनिजननिरुतें ध्याति सानंदगीतें ।
लीळा तूझी विशाळा वितरित सकळां प्रेमबोधा सुकाळा
तूझी दिव्यादिमूर्ती भवभयहरिती सौख्यचेष्टासुदाती ॥ २८० ॥
चक्रेशें निजभक्तधाम सुजनां ज्या दीधलें सज्जना
त्यां हानि प्रभवाभवावरजनां जाली सदा दुर्जना ।
गौरीबोधसुबोधबोधकसतां विस्तारिली योग्यता
ज्ञानप्रेममयीं महाभवहता गौरीपदापादिता ॥ २८१ ॥

खेळे लीळा क्षौणी हेळा
केला बाळा भक्तां शीळां ।
मोदामोळा नंदोध्दूळा
दंतां कीळा विद्युन्माळा ॥ २८२ ॥
मायावेषाविद्यानाशा
विद्याभाषा देवाधीशा ।
गौरीकाशाकांतावासा
पीताभासा रक्षी केशा ॥ २८३ ॥
गौरीनाथा विद्यामंथा
भव्या पंथा पापा कुंथा ।
तापा लोथा कर्मा कोथा
दैन्या पोथा रक्षी नाथा ॥ २८४ ॥
सर्वा प्राणा देवा राणा
वेदा माणा बोधा भाणा
मंदा काणा शून्या बाणा
मोक्षा दाणा रक्षीं वाणा ॥ २८५ ॥
महाशक्तिमाता विचित्रा अनंता
भवा मूळहंता महाबोधकर्ता ।
सुखानंददाता समस्तां सुजातां
भुजंगप्रयाता प्रभू रक्ष शांता ॥ २८६ ॥

शुभानंदबोधा अविद्याविरोधा
भवारिनिषेधा निजां प्रेमवेधा ।
अचिंत्यादिसाधा अनंतादिराधा
सदा आर्तशोधा प्रभू रक्ष मेधा ॥ २८७ ॥

महानंदमंदा सुखानंदमोदा
महाशक्तिनंदा सदाबोधवृंदा ।
महादिव्यचंदा मलाभावकंदा
सदानंदवृंदा प्रभू रक्ष वेदा ॥ २८८ ॥

अचिंत्या निरंता महाशक्तिकांता
आगाधा महंता सदा सर्वभूता ।
सदा दिव्यमूर्ता जनानंदकर्ता
महातापहर्ता प्रभू रक्षा भर्ता ॥ २८९ ॥

अपारा बिसारा महापारसारा । पराभावहारा विचित्रा विहारा ॥
धराभारहारा महामोहसारा । वरा शर्मकारा प्रभू रक्ष धीरा ॥ २९० ॥
सुकीळा सुलीळा महाशक्तिमाळा । विलोळा विशाळा सुकाळा सुहेळा ॥
अजा दिव्यजाळा महाशक्तिमूळा । विचित्रप्रखेळा प्रभू रक्ष दोळा ॥ २९१
दयादिशक्तिभूषिता । मयादिशक्तिराजिता ॥
कृपादिशक्तिशोभिता । प्रमाणिकादिभारता ॥ २९२ ॥
सदारदारराजिता । विहारहारमंडिता ॥
विचारचारपंडिता । ममेश रक्ष देवता ॥ २९३ ॥
अपारपराभूतळा । अनंतगोपगोकुळा ॥
अचिंत्यचिंत्यसंकुळा । ममेश रक्ष कोशळा ॥ २९४ ॥
अगाधबोधबोधका । अगाधवेधवेधका ॥
अगाधनंदनंदका । ममेश रक्ष मोदका ॥ २९५ ॥
कैवल्यरूपा निजबोधरूपा । आनंदरूपा परमोदरूपा ॥
कारुण्यरूपा सदयस्वरूपा । भावेंद्रवज्रा मळजाळवज्रा ॥ २९६ ॥

गौरीनिधाना समरानिधाना । दिव्यानिधाना करुणानिधाना ॥
विद्यानिधाना सगुणानिधाना । कैवल्यधाना प्रभु रक्ष मेणा ॥ २९७ ॥
नमो परेशा परमेहिनीशा । नमो महेशा शिवशंकरेशा ॥
नमो सुरेशा परमेश्वरेशा । उपेंद्रवज्रा मळ जाळवज्रा ॥ २९८ ॥
नमो चळेशा यदुनाथराया । नमो मुनीशा ऋषिवेषकाया ॥
नमो द्विजशा गतचारुमाया । नमो कृपेशा प्रभुगुंडमाया ॥ २९९ ॥
चक्रेशा नागदेवा प्रणतपरभवा भावमोक्षा स्वभावा
कंजाव्हायोगिनीसी नतविभुपुरुषीं पौष्यसंज्ञेवरेसी ।
न्यायाख्या मंगसूरी प्रणत ममवरी शुंगयोगींद्रसूरी
गोपेंद्रा नागदेवा प्रणतपरभवा बोपदेवा सदैवा ॥ ३०० ॥
इतिश्रीमहोपाध्यायाम्नायदीक्षितविराटमहामुनिश्रीबोपदेवमहात्म-
मदाचार्यशिष्यभीष्ममुनिविरचितो गद्यराजः समाप्तः ॥ छ ॥ छ ॥ छ

---

# जयपूरच्या राजांची आधुनिक वंशावळ



१ उज्जनीस वे. शा. सं. रा. रा. दामोदर भट्ट बिन त्र्यंबक भट्ट जोशी ह्यांच्या ग्रंथसंग्रहांत देवभट्टतनय रत्नाकर ह्यानें जयसिंहकल्पद्रुम नांवाचा संवत्सरकृत्यांवर जो ग्रंथ केला तो आहे. हा रत्नाकर काशींतील रामोपासक नारायणभट्टांच्या कुळांतील आहे. प्रसिद्ध नारायणभट्टीचा कर्ता नारायणभट्ट शक १६१२त होता. रत्नाकरभट्ट जयपूरच्या वेळीं ह्मणजे शक १६२१ पासून १६६५ पर्यंतच्या काळांत होऊन गेला. ह्यानें जयसिंहाच्या आज्ञेवरून जयसिंहकल्पद्रुमग्रंथ लिहिला. सदर ग्रंथाच्या प्रारंभीं कर्त्यानें जयसिंहाची वंशावळ प्रशस्तींत दिली आहे. ती प्रशस्ति येणेप्रमाणें:—

करींद्राननं चारुचंद्रावतंसं
स्रवद्गंडपालीमिलद्भृंगमालम् ।
अपर्णासुतं विघ्नपूगं हरंतं
गणेशं सुरेशं तमाद्यं प्रपद्ये ॥ १ ॥
श्रीजानकीशं शरणागतैक-
दुःखापहं श्रीगिरिजाधवं च ।
स्मृत्वाथपूज्यौ पितरौ गुरूंश्च
श्रीभ्रातरौ सूर्यसमानरूपौ ॥ २ ॥

आसीद्ब्रह्माद्वितीयं त्रिगुणविरहितं निष्कलं निर्विकारं
यच्चिन्मात्रं तदेव प्रलयजलनिधौ विष्णुरूपं बभूव ।
जातस्तन्नाभिनालाद्विधिरमितमतिस्तत्प्रपौत्रो विवस्वान्
तस्माद्वैवस्वतोभून्मनुरखिलगुणस्तज्ज इक्ष्वाकुभूतः ॥ ३ ॥

इक्ष्वाकोस्तु कुले गिरीशसदृशो राजा ककुत्स्थो ह्यभूत्
तद्गोत्रात्ततनुर्दृढः समजनि श्रीधुंधुमादो नृपः ।
मांधाता च तदन्वये समभवत्तस्यान्वयेऽभून्महान्
ताताधेम–विवृद्धये किल हरिश्चंद्रः सुरेंद्रोपमः ॥ ४ ॥

पूते हरिश्चंद्रकुले विशिष्टे
गरेण युक्तः सगरोहि जातः ।
भगीरथस्तत्कुलजः प्रसिद्धः
श्रीजान्हवी येन महीमनायि ॥ ५ ॥

तत्पुत्रः कुश इति विश्रुतः पृथिव्यां
तद्वंशे विपुलयशा बृहद्बलोऽभूत् ।
युद्धे यः कुरुकुलनाशके प्रसिद्धे
भित्वार्कं परमपदं समाजगाम ॥ ६ ॥

तद्वंशे वितते महाभवनुते धर्मैकसेतुर्महान्
पृथ्वीराज इति प्रसिद्धमहिमा सत्सात्वतामग्रणीः ।
राजा क्षत्रधुरंधरः समभवद्यस्याभवद्गोचरो
वाचां यो मनसाप्यगोचरतरो विष्णुः कृपावारिधिः ॥ ७ ॥

तद्वंशे मानसिंहः समभवदतुलः प्रत्यहं दानमत्तो
+ + + गजेंद्रानभिनवतुरगान्याचकेभ्योऽददाद्यः ।
यश्चोर्वीशाननेकानुदधिजलगतान्खंडशः स्वैर्बलोघैः
कृत्वा साम्राज्यलक्ष्मीं समहरदमितो भारतं मत्स्यदेशे ॥ ८ ॥

मानसिंहादभूतस्माज्जगत्सिंहो महाबलः ।
जगत्सिंहान्महासिंहो जयसिंहस्तु तत्सुतः ॥ ९ ॥

येन श्रीजयसिंहेन दिल्लींद्रपदलिप्सवः ।
शिवप्रभृतिभूपाला वशं नीताः स्वतेजसा ॥ १० ॥

राजाग्रणीः श्रीजयसिंहपुत्रः
श्रीरामसिंहोऽज्वनिपालपालः ।
कौर्मे कुलेऽभूद्विजितारिवर्गः
श्रीरामपादाब्जविलग्नचित्तः ॥ ११ ॥

तत्पुत्रः कृष्णसिंहः प्रथितगुणगणः कृष्णवत्सौत्सवाद्यो
जातः पृथ्व्यां पृथुश्रीररिगणतिमिरध्वंसने भानुरुग्रः ।
तस्माच्छ्रीविष्णुसिंहः क्षपितरिपुगुणः पालकः सज्जनानां
राजा राजीवनेत्रः समजनि मथुरा पालिता येन पूर्वम् ॥ १२ ॥
तस्माच्छ्रीविष्णुसिंहाख्याद्राजा राजीवलोचनः ।
जातः श्रीजयसिंहोऽसौ क्षीराब्धेरिव चंद्रमाः ॥ १३ ॥
प्रोद्यच्छ्रीमदसीमराज्यविलसद्दिल्लींद्रसेनाचल-
दृप्यद्योधगणे हुसेनसहितान्म्लेच्छान् क्षयं योऽनयत् ।
स्वं राज्यं परिगृह्य खड्गसचिवी राजा गृहे संवसन्
सामंतेष्वतपत्सहस्रकिरणो ग्रैष्मो यथा दुःसहः ॥ १४ ॥
रामाङ्घ्रिप्रवणः सुकर्मनिरतः शांडिल्यगोत्रोद्भवः
काशीस्थद्विजदेवभट्टतनयः सम्राट् सुविद्यान्वितः ।
संलब्धैर्धनसंचयैर्बहुविधैः सर्वान्क्रतूनाचरन्
तत्प्रीत्यै व्रतकल्पशाखिनममुं निर्माति रत्नाकरः ॥ १५ ॥

२ ह्या प्रशस्तींत जयसिंहाची वंशावळ येणेंप्रमाणें दिली आहे :—

१ ब्रह्म
|
विष्णु
|
ब्रह्मदेव
|
विवस्वान्
|
वैवस्वतमनु
|
इक्ष्वाकु
|

ककुत्स्थ
|
धुंधुमार
|
मांधाता
|
हरिश्चंद्र
|
सगर
|
भगीरथ
|
कुश
|
बृहद्बल
|
|
|
|
पृथ्वीराज
|
( तद्वंशे ) मानसिंह
|
( पुत्र ) जगत्सिंह
|
( पुत्र ) महासिंह
|
( पुत्र ) ( मिर्झाराजा ) जयसिंह ( शिवाजीचा समकालीन )
|

( पुत्र ) रामसिंह
|
( पुत्र ) कृष्णसिंह
|
( पुत्र ) विष्णुसिंहः
|
( पुत्र ) जयसिंह (शक १६२१—१६६५)

३ ही वंशावळ शक १६२१ पासून १६६५ पर्यंतच्या काळांत केव्हां तरी लिहिलेली आहे. ह्या वंशावळीहून कर्नल टॉड् यानें " राजस्थानच्या बखरींत " दिलेली वंशावळ भिन्न आहे. टॉड्नें आपला ग्रंथ शके १७५१ त लिहिला; ह्मणजे रत्नाकर भट्टाच्या नंतर सुमारें शंभर वर्षांनीं लिहिला. रा० रा० सरदेसाई यांनीं आपल्या " मुसुलमानी रियासतींत " टॉड्च्या अनुरोधानें जयपूरच्या राजांची वंशावळ दिली आहे ती येथें * कामापुरती देतों व दोहोंतील तफावत दाखवितों.

( १ ) रा० सरदेसाई ज्यास पृथुराज ह्मणतात त्यास टॉड् प्रिथीराज ह्मणतो व रत्नाकरभट्ट पृथ्वीराज ह्मणतो. येथें रत्नाकरभट्ट प्रमाण धरावा हें स्पष्ट आहे.

( २ ) रत्नाकरभट्टाच्या मतें भगवानदास हा गादीवर नव्हताच. मानसिंहाचें नांव रा. सरदेसाई देत नाहींत. भगवानदासाचें रत्नाकरभट्ट देत नाहीं. भगवानदासानें आपली मुलगी जहांगीराला दिली असें टॉड ह्मणतो. बिहारिमल्लानें आपली मुलगी अकबराला दिली असें रा. सरदेसाई ह्मणतात; कोणत्या आधारावर तें नमूद नाहीं. टॉड् आपल्या एका टिपेंत ( Annals of Amber, Chap. 1 ) लिहितो कीं, मानसिंहाला

* पृष्ठ ६ पहा.

## मुसलमानी रियासतींतील वंशावळ

- धवलराय
  - पंजून
    - पृथुराज
      - भीम
      - बिहारीमल्ल
        - जगत्सिंह
          - जयसिंह (मिर्झाराजा १६२१-१६६८)
            - रामसिंह (१६६८-१६९९)
            - कीरतसिंह
        - भगवानदास इ. स. (१५८९)
          - मानसिंह (१५८९-१६१५)
            - भावसिंह (१६१५-१६२१)
              - महासिंह (दुर्बल)
                - जयसिंह दुसरा (१६९९-१७४३)
          - मुलगी (जहांगीरशीं लग्न)
        - मुलगी (अकबराशीं लग्न)

फेरिष्ता कुंवर ह्मणतो; आणि कुंवर या शब्दाचा अर्थ ( Heir apparent ) देतो. फेरिष्ता व टॉड यांची लटपट झाली ती येथेंच. कुंवर या शब्दाचा अर्थ राजघराण्यांतील एक राजपुत्र एवढाच आहे; युवराज ( Heir apparent ) असा नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेतली ह्मणजे बराच उलगडा होतो. बिहारीमल्ल ( सरदेसायांच्या मतें ), भगवानदास व मानसिंह ह्यांनीं आपल्याकडील मुली मोगलाला दिल्या. त्यामुळें त्यांची जात कलुषित व पतित झाली. अर्थात् रजपुतांच्या मतें त्यांचा अंबरच्या गादीवर बसण्याचा हक्क नाहींसा झाला. मोंगलाच्या मतें गादीवर बसण्याचा हक्क दृढतर झाला. मोगल लोक आपल्या मेव्हण्यांना अंबरचे राजे ह्मणूं लागले व सत्तेच्या जोरावर त्यांना अधिकारही कदाचित् देऊं शकले. परंतु अस्सल क्षत्रियांच्या दृष्टीनें अंबरचे राजे निराळेच होते. पृथ्वीराजापासून बिहारीमल्ल, भगवानदास, मानसिंह इत्यादि भ्रष्टांचा वंश निराळा; आणि पृथ्वीराजापासून मानसिंह, जगत्सिंह वगैरे अस्सल क्षत्रियांचा वंश निराळा. फेरिष्ता भ्रष्ट वंशाचे राजे देतो; व रत्नाकरभट्ट शुद्ध वंशाचे राजे देतो. त्यामुळें एकाचा मेळ दुसऱ्याला बसत नाहीं. एकाच कालीं अंबरच्या गादीला कच्छवाहांच्या दोन शाखा शुद्ध व भ्रष्ट—हक्क सांगत होत्या, ही गोष्ट टॉडच्या लक्षांत आलेली नाहीं.

( ३ ) भ्रष्ट भगवानदासाचे अनुगामी मानसिंह, भावसिंग व महासिंग इ० स १५८९ पासून १६२१ पर्यंत राज्योपभोग घेते झाले. त्यांत मानसिंह व महासिंह हे दोघेहि दत्तकच होते. त्यानंतर महासिंहाचा बेवारसा होऊन सबंद अंबरची गादी जहांगीरची राणी जोधाबाई इच्या अनाहूत कृपेनें राजा जयसिंह यास मिळाली. हा जयसिंग जगत्सिहांचा मुलगा व शुद्ध मानसिंहाचा नातू. जयसिंहाचा वंश भ्रष्ट झालेला नव्हता. आपण शुद्ध व पवित्र राजकुलांतील आहों, ह्या बाण्यानें जहांगीरशीं लग्न लावून भ्रष्ट झालेल्या जोधाबाईला जयसिंगानें सलाम केला नाहीं. हाच बाणा मनांत जळत असल्यामुळें जयसिंगानें

शिवाजीला कानाडोळा करून अवरंगझेबाच्या हातावर तुरी देऊन निसटण्याची सोय रामसिंहाकडून करून दिली.

४ रामसिंहाच्या पाठीमागून बिसनसिंग अंबरच्या गादीवर आला, असें टॉड ह्मणतो. परंतु तें अविश्वसनीय आहे. कारण, रामसिंहाच्या पाठीमागून कृष्णसिंह व कृष्णसिंहाच्या पाठीमागून विष्णुसिंह गादीवर आला असें रत्नाकरभट्ट ह्मणतो. रा० सरदेसाई कृष्णसिंह, विष्णुसिंह किंवा Bishen Sing यांपैकीं कोणाचेंच नांव देत नाहींत.

५ सवाई जयसिंह कोणाचा पुत्र तें टॉड् सांगत नाहीं. तो दुर्बल महासिंहाचा मुलगा होता असें रा. सरदेसाई वंशावळींत दाखवितात. सवाई जयसिंह विष्णुसिंहाचा मुलगा होता, असें रत्नाकरभट्ट लिहितो. रत्नाकरभट्टाला आपल्या आश्रयदात्याचा बाप कोण, हें ठामपणें ठाऊक असण्याचा निश्चय जास्त संभवतो. सबब, येथें रत्नाकरभट्ट प्रमाण-समजणें जरूर आहे.

टॉडनें आपली बखर फेरिष्ता व मेवाडी टिपणें ह्यांच्या आधारानें परंतु तीं दोन्हीही अव्वल प्रमाणांचीं स्थानें नाहींत. सवाई जयसिंगाच्या आज्ञेवरून त्याची वंशावळ लिहिणारा रत्नाकरभट अव्वल दर्जाचें प्रमाण स्थान आहे, हें उघड आहे.

७. रत्नाकरभट्टाच्या प्रशस्तींतील दहावा श्लोक महाराष्ट्रेतिहासाला विशेष महत्वाचा आहे. तेथें शिवछत्रपतीला ‘ दिल्लींद्रपदलिप्सु ’ ह्मणजे ‘ दिल्लीच्या पातशाहाची गादी पटकावूं पहाणारा ’ असें विशेषण दिलें आहे. यावरून शिवछत्रपतीची महत्त्वाकांक्षा कोणत्या प्रतीची होती तें उत्तम तऱ्हेनें व्यक्त होतें.

८. प्रशस्तीच्या दहाव्या श्लोकांत सवाई जयसिंगानें सय्यदबंधूंच्या मनोरथांचा व दिल्लीच्या पातशाहीचा क्षय केला, ह्मणून ह्मटलें आहे. यावरून पहिला जयसिंग व दुसरा जयसिंग ह्यांच्या मनाचा व मनोरथांचा कल स्वातंत्र्येच्छु शिवराजादि मराठ्यांच्या बाजूला कधीं उघड व कधीं लपून किती होता, तें स्पष्ट होतें.

---

# मंगळवेढें येथील एक मराठी शिलालेख



१ सांगली संस्थानांतल्या मंगळवेढें गांवांत काशीविश्वेश्वराचें देऊळ आहे. त्या देवळाच्या सभामंडपाच्या दरवाज्याजवळील डाव्या बाजूच्या पहिल्या खांबाच्या बैठकीच्या वरल्या शिळेवर चारी बाजूंनीं व तिसऱ्या खांबाच्या एका बाजूनें मिळून पांच बाजूंनीं एक मराठी लेख लिहिलेला आहे. लेखाचा शक १४९४ आंगिरस आहे. अक्षरें सरासरीनें एक इंच व्यासाचीं असून, एकंदर ओळी ६० आहेत; पहिल्या बाजूवर १७, व दुसऱ्या बाजूवर ११, तिसऱ्या बाजूवर १२, चवथ्या बाजूवर १२ व पांचव्या बाजूवर ८. शिलालेख एकनाथस्वामीच्या वेळेस लिहिला असल्यामुळें त्याची भाषा एकनाथकालीन भाषेची बव्हंशानें मापक आहे. ह्या शिलालेखांतल्या भाषेतील शब्दांच्या, प्रत्ययांच्या व विभक्त्यांच्या रूपांसारखीं रूपें एकनाथाच्या भाषेंत असलीं तरच ती भाषा एकनाथाची होय. हिपरग्याचा कुलकर्णी मंगळवेढची मजमू करीत असतां त्यानें देवालयाचा जीर्णोद्धार केल्याचा हा लेख आहे. लेखाचा काल मुल्ला याकुबानें काढला असें म्हटलें आहे.

## शिलालेख

### बाजू १ उत्तरेकडील

१ श्रीगणेसा—
२ यनमः ॥ आदौ
३ कर्ता ततो भर्त्ताऽसौ
४ हर्ता तदनंतरं ॥
५ जीवानां जठरं भर्ताॅगौरी भर्त्ता
६ पुनातु मां ॥ १ ॥ स्वस्ति श्री जया—
७ भ्युदय शालिवाहनश—
८ के १४९४ प्रवर्त्तमाने

९ आंगिरसनामसंवत्स—
१० रे दक्षिणायनवर्षरुतौ भा—
११ द्रपदमासि शुक्ल पक्षे तृतीया—
१२ यां ३ चंद्रवासरे तात्काळे ह—
१३ स्तनक्षत्रे साध्य नाम योगे तै—
१४ तिळा करणे धनळाढे सि—
१५ व पुण्य दिवसे ॥ निजभोक्तृत्वे
१६ श्रीमत् भारद्वाजगोत्र वा—
१७ त्स्यायनसूत्र शुक्लयजुः—

**बाजू २ पूर्वेकडील.**

१८ शाखाध्यायी वळा हर्मा—
१९ जी धरणी हिपरगे कळै—
२० य देव तेथिळ कुळकर—
२१ णि विजापुरदेशाचे पर—
२२ गणे मंगळवेढेयाचे स्थ—
२३ ळि मजमु करीता वेळे
२४ कसबे मधे जोगी बावी—
२५ संनिधाने डावे देउळ पडि—
२६ ळे होते जीर्णोधार
२७ करुनु विश्वनाथ—
२८ ळिंगप्रातिस्टा करु—

**बाजू ३ दक्षिणेकडील**

२९ नु तिमणभट उपाध्ये सि
३० णगरकारासि देवाचे पु—
३१ जा वा अध्यायन सांगा—
३२ व्या कारणें ठेविळे त्या—
३३ सि स्वास्ती देसाई हिरा—
३४ जि वा केसव माउहा वा मळि—
३५ सयिहोंम वा उवा मळको—

३६ जी वा आनंद पटेळासि
३७ सांगीतळे त्याणें त्यासि मु-
३८ स्टिका धरम + प्रजभाग-
३९ मधे चाळवुनु ह्मणु-
४० नु वाक् सुकृत दिधले

वाजू ४ पश्चिमेकडील

४१ असे पुढे यासि जो को—
४२ णि ईरे येईळ स + वें
४३ न चालवि त्यासि ब्रह्म-
४४ हत्यापातक त्याचे सुकु-
४५ तहानि यासि साक्षी बो-
४६ पाजि भगवा वा तिमाजि
४७ सोमदेउ कुळकरणी
४८ कसबेचे पूजा गुरोसि
४९ समंध नाहि त्याणें धूपा-
५० रतिचे वेळे मांधळ वाजउ-
५१ नु नैवेद्य घेवि वींघे बत्तीस
५२ यासि समंध नाहि हे बोळे-

दुसऱ्या खांबाची वाजू ५ उत्तरेकडील

५३ सि विळहोबा चौधरि
५४ वा नरसो पटेळु अं-
५५ गीकारु असे यासि
५६ जो ईरे येईळ त्याचे
५७ वांशवरी गाढव असे
५८ मुळा याकुबाहि कवु-
५९ ळ काडळे असे तुको+
६० + रे + र कुळकरणी

२ लेख शक १४९४तील आहे. त्यावेळीं विजापुरास आदिल-शाही होती. देवगिरीच्या जाधवांचें राज्य शक १२३९त गेल्यापासून

शक १४९४पर्यंत देवचाची हेळसांड होऊन तें पडून गेलें. त्याचा जीर्णोद्धार मंगळवेढच्या मुजुमदारानें केला. हा मुजुमदार दामाजीपंताची चहाडी ज्या मुजुमदारानें पातशहापाशीं केली त्याचाच वंशज होता, असें ह्मणतात. देसाई ( देशपति=देसवई=देसाई ), कुलकरणी, चौधरी, पाटील, ह्या चार गावकामगारांबरोबर मुल्लाची हि गणना होऊं लागून शक १४९४ त बरींच वर्षे लोटलीं होतीं. हिंदूंच्या देवळाचा जीर्णोद्धार करण्याच्या कामीं कौल काढणारा मनुष्य मुल्ला होता, हें लक्षांत घेतलें पाहिजे. विजापुरशाहींत हिंदुमुसुलमानांचें गावगन्ना ऐक्य होतें, असें ह्या वरून ह्मणतां येईल. परंतु, देवळाचा हि कौल करण्यास मुल्लाची जरूर लागावी, हिंदू मिळूं नये, ह्याचा अर्थ असा होतो कीं कोण्या तरी मुसुलमानाचें अनुमोदन जीर्णोद्धाराला आहे, असें दाखवणें मुजुमदाराला इष्ट वाटलें. मुजुमदारांनीं छळलेल्या दामाजीपंतांचे वंशज सध्या गुलबुर्ग्यास आहेत, असें ह्मणतात. लेखांत करुनु, चालवुनु, ह्मणुनु, वाजवुनु वगैरे ऊन प्रत्ययान्त धातुसाधितांचीं उकारान्त रूपें आलीं आहेत. " आणि " ह्या अर्थीं ' वा ' शब्द योजला आहे. ह्या ' वा ' मध्यें व फारशी ' व ' मध्यें एका कान्ह्याचाच कायतो भेद आहे. ह्या लेखानंतर शंभर वर्षांनीं ' वा ' चा लोप होऊन ' व ' हें उभयान्वयीच त्याची जागा पटकावून राहिलें. ' मंगळवेढेयाचे ' असें रूप प्रस्तुतच्या ' मंगळवेढ्याचे ' ह्या रूपा ऐवजीं त्यावेळीं प्रचलित होतें. परंतु ' त्याणें ', ' त्यासि ', ' त्याचे ' हीं रूपें ' तेणें ', ' तयासि ', ' तयाचे ', ह्या ज्ञानेश्वरकालीन रूपांच्या ठिकाणीं रूढ झालेलीं दिसतात—प्रस्तुत लेखांत ' ल ' च्या ऐवजीं सर्वत्र ' ळ ' चा उपयोग केलेला आहे. मजजवळील ज्ञानेश्वरींत हि ' ल ' कार नाहीं. ह्यावरून ' ल ' उच्चारच त्यावेळीं नव्हता, असेंच केवळ ह्मणतां कामा नये. ल व ळ हे दोन्हीं उच्चार एका ' ळ ' नेंच दर्शविण्याचा प्रघात पडला होता. बाकीं देवनागरींत हीं दोन्हीं चिन्हें होतीं, हें प्रसिद्धच आहे. लेख जशाचा तसाच अस्सल बरहुकूम नकल केला आहे. त्यावरून तत्कालीन म्हस्नदीनांचा प्रकार पहातां येईल.

---

# शिवगण येथील सेंगर राजांची वंशावळ



१ उज्जनीतील वे० शा० सं० रा० रा० दामोदरभट्ट बिन त्र्यंबकभट्ट जोशी ह्यांच्या ग्रंथसंग्रहांत शंकरभट्टात्मज नीळकंठभट्ट यानें केलेला भास्कर नावाचा धर्मप्रकरणीं ग्रंथ आहे. त्याच्या प्रारंभीं शिवगणपुरच्या सेंगर वंशाची याद दिली आहे ती अशीः—

ग्रंथारंभे प्रशस्तिः— श्रीगणेशायनमः।

पद्मिनीवल्लभं भाभिर्भूषयंतं जगत्रयम्।
त्रयीमहमहं नौमि स्तौमि त्रिदशवंदितम्॥ १॥
जज्ञे पितामहतन्तोः खलु कश्यपोय
स्तमाजायत मुनिस्तु विभांडकाख्यः।
तं पुत्रिणां धुरमरोपयदप्यश्रृंगः
तस्यान्वयेप्यजनि श्रृंगिवराभिधानः॥ २॥
तस्मिन्वंशे महति वितते सेंगराख्ये नृपाणाम्
राजा कर्णः समजनि यथा सागरे शीतरश्मिः।
कीर्त्या यस्य प्रथिततरया श्रोत्रजातेऽभिपूर्णे
कर्णस्यापि प्रविततकथा नावकाशं लभंते॥ ३॥
विशोकाख्यदेवस्ततस्तत्सुतोभूत्।
विशोकीकृता येन सर्वा धरित्री॥
ततोऽप्यास राजाऽस्तशत्रुस्ततोभूत्।
रयाख्यो रवेणैव सर्व्वाहितघ्नः॥ ४॥
बभूवाऽथ वैराटराजस्ततोभूत्
नृपो मेदिनीवल्लभो वीढराजः।
नरब्रह्मदेवस्ततो मन्युदेवः
ततोभून्नृपश्चंद्रपालाभिधानः॥ ५॥
शिवगणाख्यनृपः समजन्यथो
शिवगणाख्यपुरं प्रचकार यः।

शिवगणेन समः सकलैर्गुणैः
शिवशिवप्रथमो गणनासु यः ॥ ६ ॥
रोलिचंद्र इति तत्तनयोभूत्
कर्मसेननृपतिस्तमथाऽनु ।
लोकपो नरहरिर्नृपराजो
रामचंद्र इति तत्तनुजातः ॥ ७ ॥
यशोदेवस्ततो जातस्ताराचंद्रनृपस्ततः ।
चक्रसेनस्ततो राजा राजसिंहनृपो यतः ॥ ८ ॥
ततोप्यभूद्भूपतिसाहिदेवः
स्वकीर्तिभिर्निर्जितदुग्धसिंधुः ।
अभूत्ततः श्रीभगवंतदेवः
सदैव भाग्योदयवान् क्षितीशः ॥ ९ ॥
यद्दानद्रविणाद्रिनिर्जितवपू रत्नाचलो लज्जया
दूरे स्तब्ध इलावृते निविशते नो यत्र पुंसां गतिः ।
किं च त्रस्यदरातिवामनयना नेत्रांबुभिर्वर्द्धित-
तेजोभिर्वडवामुखोत्थहुतभुक्तुल्यः कथं नो भवेत् ॥ १० ॥
आज्ञप्तस्तेन राज्ञा विबुधकुलमणिर्दाक्षिणात्यावतंसो
भट्टश्रीनीलकंठः स्मृतिषु दृढमतिर्जैमिनीयेऽद्वितीयः ।
आज्ञामादाय मूर्ध्ना सविनयममुना तस्य सर्वान्निबंधान्
दृष्ट्वा सम्यग्विविच्य प्रविततकिरणस्तन्यते भास्करोऽयम् ॥ ११ ॥

२ ह्या प्रशस्तीवरून वंशावळ येणेप्रमाणें:—

पितामह
|
कश्यप
|
विभांडक
|

शृंगिवर
|
कर्णसेंगर
|
विशोकदेव
|
अस्तशत्रु
|
रयदेव
|
वैराटराज
|
वीढराज
|
नरब्रह्मदेव
|
मन्युदेव
|
चंद्रपाल
|
शिवगणदेव
|
रोलिचंद्र
|
कर्मसेन
|
नरहरि
|
रामचंद्र
|

यशोदेव
|
ताराचंद्र
|
चक्रसेन
|
राजसिंह
|
साहिदेव
|
भगवंतदेव

३ हा भगवंतदेव नीळकंठभट्टाचा समकालीन होता. नीळकंठभट्ट नारायणभट्टीचा कर्ता जो नारायणभट्ट त्याच्या वंशांतील होता. नारायणभट्टाचा पुत्र शंकरभट्ट व शंकरभट्टाचा पुत्र नीळकंठभट्ट. नारायभट्ट संवत् १६२४ त हयात होता. दर पिढीस वीस वर्षें धरलीं तर, नीळकंठभट्ट संवत् १६६४त हयात होता असें ठरतें.

---

## माढें येथील विठोबाच्या हृदयावरील लेख

१ सोलापूर जिल्ह्यांत माढें ह्मणून तालुक्याचें गांव आहे. तेथील विठोबाच्या देवळांतल्या विठोबाच्या मूर्तीच्या हृदयावर खालील श्लोक कोरला आहे:—

१ श्रीस्पर्शाद्यं सत्यनामाद्यं
२ षणषट् सद्विवेकं ॥ ष
३ ट्षट् दिनंत्यंतं स
४ सारं तं विदुर्बु
५ धाः ॥ श्री
६ वत्स

२ देवळाच्या उंबरठ्याच्या कीर्तिमुखाच्या पायरीवर खालील ओळी आहेत:—

१ राव माहादाजी निंबा
२ ळकर शेरणांगत पांडुरंग चेर
३ णी

३ अर्थात् हें देऊळ माहादाजी निंबाळकरानें बांधलें.

---

## होळकरकुलप्रशस्तिः

१ महाराज तुकोजीराव होळकर यांचे कुलोपाध्याय सदाशिवभट्ट ह्मणून झाले. त्यांनीं ही प्रशस्ति रचिली. ही गद्यपद्य असून हिचे सहा उच्छ्वास आहेत. सहाव्या उच्छ्वासांत, तुकोजीरावापर्यंत कथाभाग आला आहे. काव्य बऱ्यापैकीं असून, एकदा प्रसिद्ध करण्यासारखें आहे. हें काव्य सदाशिवभट्ट उपाध्ये व त्यांचे कोणी मित्र यांणीं दोघांनीं मिळून रचिल्यामुळें कर्ते आपणास समाप्तीला समविषमकवि असें ह्मणवून घेतात. समाप्ति अशी:—

इति समविषमकवेः होलकरमहाराजपुरोहितस्य सदाशिवभट्टस्य कृतौ होलकरकुलप्रशस्तिभणितिकथायां महाकाव्ये षष्ठः उच्छ्वासः समाप्तः ॥६॥

हें काव्य सदाशिभट्टाचे चिरंजीव प्रस्तुतचे उपाध्येबोवा यांचेकडून सबंद मिळालें.

# विजयव्यवहारसेतु

१ वरील नांवाचा कायद्याचा ग्रंथ विष्णुशास्त्री वेलनकर ह्या नांवाच्या गृहस्थानें बुंदेली भाषेंत स्मृतींच्या आधारानें विजयबहादूर-नामक राजाच्या हितार्थ रचिला. चाळीस अक्षरांची एकेक ओळ, अशा तेरा ओळी ज्यांत आहेत, अशीं २६ सव्वीस ओळींची पाठपोट पानें ह्या पोथींत १०६ आहेत. १०७ व्या पृष्ठावर अंताच्या दहा ओळी आहेत. ह्या ग्रंथाचा आदि व अंत येणेप्रमाणें.

श्री.

आदि

श्रीमद्बुंदेलखंडाभिधजनपदभूकांतवंशावतंसः<br>
श्रीकांतैकांतभक्तः प्रबलरिपुशिरोहीरनीराजितांघ्रिः।<br>
धन्यो राजन्यमान्यो निहतरिपुभटाशून्यजन्यो वदान्य-<br>
श्रीमद्राजाधिराजः शमितरिपुगणः सत्रजिद्विश्रुतोभूत् ॥१॥<br>
तस्माद्वोविप्रपालः सकलरिपुमहीपालकालांतकालः<br>
शांतो दांतो नितांताहितहरिचरणस्वांतशांताघसंघः।<br>
श्रीमद्राजाधिराजः सकलनृपमहाराज आविर्भुवश्री<br>
श्रीमत्पारीक्षिताख्यः पृथुलतरयशोराशिविद्योतिताशः ॥२॥<br>
तस्माद्राज्ञां राजा राजेंद्रो राजराज आविरभूत्।<br>
श्रीमद्विजयबहादुर बहादुरजूदेवविख्यातः ॥३॥

यः सांयुगीनप्रमुखेषु गण्यो<br>
ह्यगण्यगांभर्यिसुधैर्यशौर्यः।<br>
श्रीमन्महाराजकुमार एष<br>
बाहादुरः सद्दलसिंहदेवः ॥७॥

वेलणकरोपनामककृष्णात्मजविष्णुशास्त्रिशर्माहम्।<br>
विजयव्यवहातिसेतुं ग्रंथं कुर्वे मिताक्षराधारम् ॥२९॥

अंत

इति श्रीमत्पंडितसार्वभौमश्रीमत्कृष्णाशास्त्रिशिष्येंद्रवेलनकरोपनामकश्रीमत्कृष्णात्मजश्रीविष्णुशास्त्रिकृतौ मिताक्षराधारश्रीविजयव्यवहारसेतुनामको भाषाग्रंथः समाप्तः ॥ श्रीरस्तु ॥

# गुंडम

१ श्रीपरमार्गसेवक दत्तराज आराध्ये, पेशावरकर, यांजकडून आत्मतीर्थप्रकाश व ऋद्धपूरमाहात्म्य, असे दोन मराठी ओवीबद्ध ग्रंथ मिळाले. आत्मतीर्थप्रकाशाचे बारा प्रसंग असून ६७७ ओव्या आहेत. आत्मतीर्थप्रकाशाचा शेवट असा:—

शके पंधरासे एक्याशी । विकारी संवत्सर ज्येष्टमासी ।
सुक्रवार अष्टमीसी । कृष्णपक्षीं ॥ १ ॥
ग्रामनेर खटावदेश । तेथ वैराटोपनाम मुनि कृष्णदास ।
तयाचेचि करणें आत्मतीर्थप्रकाश । संपला तद्धस्ताक्षर ॥ २ ॥

इति श्रीमन्महोपाध्यायदीक्षितवैराटदेशोपनामाळंकृतमयेकराजशिष्य-कृष्णमुनिना विरचितेः सिद्धयामळेः ग्रंथे सैहाद्रिखंडेः आत्मतीर्थप्रकाशग्रंथे अवतारत्रययोगनामः द्वादशप्रसंगः ॥ १२ ॥ श्रीमंगळमस्तु ॥

२ ऋद्धपुरमाहात्म्याच्या ६२७ ओव्या असून १० प्रसंग आहेत. याची समाप्ति अशी:—

ऋद्धिपुरमाहात्म्यें शिष्यें । कविडिंभ मुनि कृष्णदासें ॥
श्रीप्रभूचीं चरणसारसें । चिंतिलीं हृदयीं ॥ १४ ॥

इति श्रीमन्महोपाध्यायाम्नायदीक्षितविराटदेशोपनामाळंकृतः मयेकराजशिष्यें कृष्णमुनिना विरचितेः सिद्धयामळे सैहाद्रिखंडेः ऋद्धिपुरमाहात्म्येः लक्ष्मीधरशारंगपंडितदर्शनाख्यायिकाकथनं नाम दशमप्रसंगः

शके पंधरा सते आठ्यासी । पराभवसंवत्सरीं ज्येष्टमासीं ।
शणिवार सुध दशमिसी । कुरळाद्रपत्तनी ॥ १ ॥ छ ॥ छ ॥

३ ह्या दोन्ही ग्रंथाच्या समाप्तीवरून दिसतें कीं या ग्रंथांचा कर्ता कृष्णमुनी होता. त्याचा गुरु मयेकराज. कृष्णमुनीचे आडनांव वैराट. रहाणार खटाव देशांतल्या ग्रामनेरचा. आत्मतीर्थप्रकाश ग्रंथ शक १५८१ त व ऋद्धपुरमाहात्म्य १५८८ त याच्या हातून अनुक्रमें रचले गेले. ह्या दोन्ही ग्रंथांत मानभावांच्या क्षेत्रांचीं वर्णनें व पौराणिक उत्पत्त्या

दिल्या आहेत. हीं वर्णनें लोककथा व दंतकथा ह्यांच्या आधारानें लिहिलीं असल्यामुळें, फारच महत्त्वाचीं आहेत.

४ मानभावांचें मूळदैवत जें गुंडम त्याची हकीकत ऋद्धपुर-माहात्म्याच्या नवव्या प्रसंगांत येणेंप्रमाणें दिली आहे:-

द्राविडदेशीं जाण । कृष्णशर्मा नामें ब्राह्मण ।
तेणें भविष्यपुराण । वांचिलें देखा ॥ १९ ॥
तेथें निगालें ऐसें । जे कळियुगीं परमेश्वरकृपावशें ।
अवतरैल मनुष्यवेशे । वैदर्भदेशी ॥ २० ॥
शालिवाहणशके । सहस्त्रवर्षानंतरे आइके ।
विश्वावश वत्सरीं कैवल्यनायक । तिये ऋद्धपुरीं ॥ २१ ॥
कणवशाखेजाण । अनंतनायक नांवें ब्राह्मण ।
नेमांबिकेच्या उदरीं आपण । अवतरैल कैवल्यपति ॥ २२ ॥
गुंडिवेष्ठण ऐसें धात । हे व्याकर्ण जाणावें संस्कृत ।
वेष्टण ह्मणिजे निभ्रांत । व्यापकत्व तें ॥ २७ ॥

५ विदर्भदेशांत काटकसर नावाचें एक गव्हाण ऊर्फ लहानसें गांव आहे. तेथें अनंतनायक नामें कण्वशाखीय ब्राह्मण रहात असे. त्याची स्त्री जी नेमांबिका तिच्या उदरीं गुंडम अवतरला. अवतारशक १०४७ विश्वावसु संवत्सर. शालिवाहनाच्या या शकापासून मानभावांच्या पंथाला प्रारंभ झाला. गुंडमाला होऊन आज शके १८२७ त बरोबर ७८० वर्षे झालीं. गुंडमाच्यानंतर १५० वर्षांनीं ज्ञानेश्वर झाला.

६ ऋद्धपुरमाहात्म्यांत महाराष्ट्रदेशाच्या सीमा येणेंप्रमाणें सांगितल्या आहेत:—

विंध्याद्रिपासौनी दक्षणदिशेसी ।
कृष्णानदीपासौनी उत्तरेसी ।
झाडीमंडापासौनी पश्चमेसी ।
कुंकणपर्यंत ॥ ६६ ॥
माहाराष्ट्र बोलिजे यातें ।

हें वर्णन शके १५८८ तील आहे. परंतु या वर्णनाचा संबंध शक १०४७ च्या कालाला अनुलक्षून आहे.

७ ऋद्धपुरमाहात्म्यांत कृष्णमुनीनें ( १ ) मुद्री, ( २ ) लिंगी, ( ३ ) कुंची, ( ४ ) जाटी, ( ५ ) दंडी, ( ६ ) मुंडी, ( ७ ) शोफी, अशा सात पंथांचीं तीर्थें वर्णिलीं आहेत. शोफी ह्मणजे मुसुलमानी धर्मांतील सूफी लोक. ह्यांची गणना कृष्णमुनी हिंदूंच्या पंथांबरोबर करतो.

मशीद निमाज पीर आस्थानें ।
हीं शोफीतीर्थ जाणें ।
तयाचि ओळख चर्णें ।
लिप्त असती ॥ ५१ ॥

अल्ला व अलक या शब्दाच्या कांहींशा उच्चारसाम्यावरून एक विनोदपर ओवी कृष्णमुनीनें रचिली आहेः--

शोफी आणि नाथपंथी ।
या दोंतें मुद्रिदर्श ऐसें ह्मणती ।
आंल्लां नाथ दैवत जपती ।
मनोभावें ! ॥ ४५ ॥

भानुदत्तकृत रसमंजरीवर

अनंत पंडितकृत

# व्यंगार्थकौमुदी टीका

## अंत

अब्दे लोचनरंध्रषड्विधुलसत्प्रस्तारसंलक्षिते
मासे माधवसंज्ञके हरिदिने पक्षेवलक्षे भृगौ ।
पुण्यस्तंभनिवासिना बुधमुदेनंताभिधेनादरात्
काश्यामीशकृपावशाद्विरचिता व्यंगार्थसत्कौमुदी ॥

इतिश्री गौतमीयतीरपुण्यस्तंभस्थितिमितिविलासशालिनीलकंठपंडित तनुजबालोजीपंडितांगजश्रीमत्र्यंबकपंडितात्मजानंतपंडितविरचिता श्रीमहा-राजाधिराजप्रभुकुलतिलकायमानश्रीवीरसिंहदेवतनुजप्रौढप्रतापद्युमणिमरीचि-निरस्तसकलजनदुःखौघध्वांतश्रीचंद्रभानुकुतूहलकुमुदवनीविकासिना रस-मंजरी व्यंगार्थकौमुदी संपूर्णतामगमत्

नीळकंठ
|
बाळ
|
त्र्यंबक
|
अनंत
१६०२

---

गोवर्धनसप्तशतीवर

# व्यंग्यार्थदीपन

नामक

अनंतकृत टीका

अंत.

अब्दे लोचनबिंदुसप्तशशभृत्प्रस्तारसंलक्षिते
चैत्रे मासि सिते शिवस्य दिवसे मार्तंडसद्वासरे ।
पुण्यस्तंभनिवासिना सुमतिनाऽनंताभिधेनादरात्
काश्यां सद्विदुषांमकारि कुतुकाद् व्यंग्यार्थसंदीपनम् ॥ ३ ॥

इतिश्रीमद्गोदावरीपरिसरालंकृतपुण्यस्तंभस्थितिविराजमाननीळकंठपंडित तनुजबाळोजीपंडितांगजतिमाजीपंडितात्मजानंतपंडितविरचितं गोवर्धनसप्तशतीव्यंग्यार्थदीपनंसमाप्तिमगमत् ।

नीळकंठ
|
बाळोजी
|
तिमाजी
|
अनंत
१७०२

---

## योगरत्नमाला.

अंतः

आत्मस्मरणाय मया विवृता नागार्जुनप्रणीतेयं ।
आश्चर्यरत्नमाला अग्रेतनवृद्धटीकातः ॥ १ ॥
श्रीनृपविक्रमसमये द्वादशनवषड्भिरंकिते वर्षे ।
रचिता गुणाकरेण श्वेतांबरभिक्षुणा विवृतिः ॥ २ ॥

नागार्जुनानें योगरत्नमाला केली. तिच्यावर विवृति गुणाकरनामक जैनानें संवत् १२९६ त लिहिली. ह्मणजे आज बरोबर ६०६ वर्षें ही विवृति रचून झाली. हींत नाना प्रकारचे जारणमारणादि योग आहेत.

---

कविकौस्तुभ

## साहित्यग्रंथ

अंत

इतिश्रीकविकौस्तुभे महाकाव्ये कविकुलावतंसमनोहरोपनामककृष्ण-पंडितसूनुश्रीमद्विकंभटसूरिसुतश्रीमद्रघुनाथपंडितकविकृतौ दूषणकथनं नाम द्वितीयं रत्नम् ।

रघुनाथपंडित मनोहर हा ग्रंथकार महाराष्ट्रीय आहे.

---

# एकचक्रानगरींतील राजांची
# प्रशस्ति
## अल्लाडनाथकृत निर्णयामृत

( पहिले ११ श्लोक फाटून गेले आहेत. )

× × × × प्रोतसेकेशकुंती
कुंभाभर्नारैः समचिंतयेरन् ॥ ११ ॥
प्रव्यक्तमामुक्तमहेशकुंभ
मुक्ताद्यमुक्ता गणपोयमुक्ता ।
रक्तासवैः संयति येन काळी
व्यालीव विश्वाप्यभिदर्पते स्म ॥ १२ ॥

उद्धरणं नुद्धरणं भुद्धरणं विद्विषां समुद्धरणम् ।
सुहृदां पुरानतहृदां नमतितमां केन नाम तमनामः ॥ १३ ॥

सौंदर्येण विजृंभितो रतिपतिः शौर्येण च श्रीपतिः
गांभीर्येण सरित्पतिर्विलसिताश्वैर्येण भूभृत्पतिः
सत्कांत्योडुपतिः श्रिया धनपतिर्यस्तेजसाहर्पतिः
तेनार्योद्धरणेश्वरेण सुमतिः स्पर्धेत कः क्ष्मापतिः ॥ १४ ॥

असावसावाहितसत्प्रतापः
स्वयं निवेशोचितरम्यदेशं ।
अध्यास्तरुध्यास्तसमस्तशक्रा–
स्पदां पुरं सादरमेकचक्राम् ॥ १५ ॥

राजते यत्पुरं रम्यं राजमंडलपंडितम् ।
कमलोल्लासिसद्रत्नरत्नाकरविभूतिमत् ॥ १६ ॥

लसद्दिनासनीसेजं नुपूरं भाति यत्पुरम् ।
पुरं पुरंदरस्येव भूरिसुंदरमंदिरम् ॥ १७ ॥

तस्योपकंठे शितिकंठकंठ–
स्पर्द्धिप्रभा भानुसुता वहंती ।
तदुच्छवेदध्वनिसन्निकर्षा–
दभ्यस्यतीवाखिलपावनत्वम् ॥ १८ ॥

यत्रानिशं सत्रकृताः पवित्राः
सत्राः स्वगोत्रैर्गृहिणो वसंति ।
यद्धोमधूमः कुरुतेतिभूमां
घनाघनैर्मेदुरमंतरिक्षम् ॥ १९ ॥

पुरं शशासैष पुरंदराभः
तदेकचक्राख्यमनेकचक्रः ।
असंख्यसंख्यारिजयोर्जिताख्य–
विख्यातभूमोद्धरणः क्षितीशः ॥

गुणरत्नाकराच्चंद्रः चंद्रसेनस्ततोभवत् ।
महामहामहादेवशाळिमौळिविभूषणम् ॥ २९ ॥

तस्यार्थजन्मा चरितार्थजन्मा
श्रीसूर्यसेनो जयति क्षितींद्रः ।
सुदर्शनेनैव बिभर्ति गोपान्
नारायणत्वं भुवि यः प्रसिद्धं ॥ ३१ ॥

चकास्ति यस्यातिततः प्रतापः
प्रतापसेनो वरजः प्रसिद्धः ॥ ४० ॥

श्रीदेवसेनस्तनयोपि गो +
नारायणस्याजनि कामरूपः ॥ ४२ ॥

देवसेनकुमारस्य कुमारस्य वनांतरम् ।
आर्यानंदकृतोतीव बिभ्रतः शक्तिमुत्तमाम् ॥ ४३ ॥

श्रीसूर्यसेनः पुरमेकचक्रम् ।
वरांगमध्यास्य जयत्यजस्रम् ॥ ४४ ॥

विद्वत्सुसत्स्वपि महत्सु समाश्रितेषु
श्रीसिद्धलक्षणसुतः सुतराजनुष्य ॥
श्रीसूरसेननृपतेरुपतेजसोभू—
दल्लाडनाथमतिमानतिमानपात्रम् ॥ ४५ ॥

एनं कदापि सुमतिर्नृपतिः स्वनाम्ना
श्रौतादिकर्मसुसुकाळविनिर्णयाय ।
आदिक्षदृक्षपतिसाच्छयशानिशात—
शस्त्राहताहितशतः शतमन्युकल्पः ॥ ४६ ॥

अगाधग्रंथपाथोधिमथालोड्य मयाधिया ।
समुद्धृतं नृपादेशात्तेनेदं निर्णयामृतम् ॥ ४७ ॥

मनुस्मृतिं विष्णुपराशराप—
स्तंबस्मृतीर्वीक्ष्य मिताक्षरां च ।
तथापरार्कार्णवपारिजातान्
स्मृत्यर्थसारं स्मृतिचंद्रिकाश्च ॥ ४८ ॥

माच्छं कौर्मं वराहं च दृष्ट्वा वैष्णववामने ।
मार्कंडेयपुराणानि भविष्योत्तरभारते ॥ ४९ ॥
परिशिष्टं हेमाद्रिमनंतभट्टीयगृह्यपरिशिष्टे ।
काळादर्शं चिंतामणिं त्रिदंडीं च कृत्यकल्पतरुम् ॥ ५० ॥
धवळपुराणसमुच्चयदुर्गोत्सवरामकौतुकानि तथा ।
संवत्सरप्रदीपं सभोजराजीयदेवदासीयम् ॥ ५१ ॥
रूपनारायणीयविद्यापट्टपद्धतिं नितताम्
वीक्ष्य महादेवीयं शुभनिबंधंच विश्वरूपकृतम् ॥ ५२ ॥
श्रीसूर्यसेननृपतेरादेशात्सिद्धलक्षणतनूजः ।
अल्लाडनाथसूरिः संग्रहमिह काळनिर्णयं कृतवान् ॥ ५३ ॥

इति ग्रंथावतारः ।

२ ह्या ग्रंथावताराचे पहिले ११ श्लोक नाहींत. बाकीच्या श्लोकांवरून एकचक्रराजांची वंशावळ अशी




३ ग्रंथाची नकल शक १४९१ शुक्लसंवत्सर भाद्रपद दशमी सोमवारी गोपीनाथसुत दाद शुक्लानें केली.

---

# भगवानलाल इंद्राजीचा
# पांडुरंग निळो



१ पंढरपूरीं श्रीपांडुरंगाच्या देवालयाच्या पुढें सोळखांबीच्या पूर्वेस गरुडमंडप आहे. त्या मंडपांतील उत्तर बाजूच्या वोवऱ्यांपैकीं दोन वोवऱ्या त्र्यंबकराव मामा पेठे व दोन वोवऱ्या पांडुरंग शिवदेव व निळो शिवदेव ह्या दोघा बंधूंनीं बांधिल्या. ह्या तिघांनीं तीन शिलालेख लिहून ठेविले आहेत. पैकीं पांडुरंग शिवदेव व निळो शिवदेव यांचा लेख येणेंप्रमाणें:--

१ श्रीविठ्ठलचरणि दृ--
२ ढभाव पांडुरंग निळो
३ सिवदेव ॥ शके १६६०
४ काळयुक्त उ र्जमासे । पांडुरं--
५ गनिळाभिधौ ॥ वोवरिणां
६ द्वयंचैतत्कृतवंतौ सि--
७ वात्मजौ ॥ १ ॥ श्रीराम

२ त्र्यंबकराव मामा पेठे यांचा एक लेख असा:--

१ सोळाशतांवरि अ ॥
२ धीकहि साठि पाहा ॥
३ त्या काळयुक्त वरषां--
४ त ही मास दाहा ॥ जा--
५ ले तधी त्र्यंबकराव

६ पेठे ॥ दों वोवरेया

७ करि संतपठे ॥ १ ॥

त्र्यंबकराव मामाचा दुसरा लेख असा:--

१ श्रीपांडुरंगचरणीं तत्पर त्रिंबकराव विश्वनाथ

२ पेठे निरंतर ॥

३ हे लेख पाहून डाक्टर भगवानलाल इंद्राजीनें सोलापूर गॅझेटियरांत विठ्ठलमंदिराचें वर्णन देतांना खालील विधानें केलीं आहेत:--

The (above) inscriptions seem to show that the right cloister and probaly also the left cloister rooms were built by two sons of a man named शिव and the next four were made in the same year by Trimbakrav Pethe, better known as Trimbakrav Mama, a distinguished general under the fourth Peshwa Madhavrav (1761—1772). Both inscriptions show that the temple was then called Pandurang Nilo, that is, the *nilaya* (Sk.) or residence of Pandurang, a name of Vithoba which occurs in several old songs or *abhangs.*

४ ह्या इंग्रजी वाक्यांत भगवानलाल ह्मणतो कीं, (१) शिव नांवाच्या मनुष्याच्या दोन मुलांनीं उजव्या व डाव्या बाजूच्या वोवऱ्या बांधल्या, आणि (२) त्र्यंबकराव मामानें पुढच्या चार वोवऱ्य बांधल्या. हीं निराधार विधानें केल्यावर, भगवानलाल चापून ह्मणतो कीं, (३) शिलालेखावरून दिसतें कीं देवळाला त्या कालीं " पांडुरंग निलो " ह्मणजे " पांडुरंगनिलय " ह्मणत असत. आतां हीं तिन्ही विधानें अगदीं निराधार आहेत. कांकीं:— (१) शिव नांवाचा मनुष्य नसून, शिवदे अथवा शिवदेव हें महाराष्ट्रांत मोठें प्रख्यात आडनांव आहे. ' शिवात्मजौ ' ह्मणजे शिवदेवकुलोत्पन्न. (२) शिवद्यांनीं डाव्या व उजव्या बाजूच्या वोवऱ्या बांधल्या नसून

फक्त दोन उजवीकडील बोवऱ्या बांधल्या. ( ३ ) त्र्यंबकरावमामानें चार बोवऱ्या बांधल्या नसून फक्त दोनच बोवऱ्या बांधल्या. ( ४ ) विठ्ठलमंदिराचें नांव " पाडुरंगनिलो " त्या काळीं होतें, असें ह्या तिन्हीं लेखांत कोठेंच म्हटलेलें नाहीं. शिलालेखांतील " पांडुरंग निळो शिवदेव " ह्या तीन शब्दांवरून देवळाचें नांव ' पांडुरंग निळो ' होतें अशी विचित्र कल्पना डाक्टर भगवानलालाच्या डोक्यानें घेतली. परंतु ती निराधार आहे, हें जो कोणी हा शिलालेख वाचील त्याला सहज कळेल. ह्या निराधार कल्पनेच्या मूळांशीं भगवानलालाचें मराठ्यांच्या इतिहासाचें अज्ञान आहे.

---

# पंढरपूरच्या विठोबाच्या देवळांतील चौऱ्यायशीचा शिलालेख

१ प्रस्तुत शिलालेख भगवानलाल इंद्राजीनें पाहिला होता व त्याचें त्रोटक वर्णन त्यानें सोलापूरच्या गझेटियरांत दिलें आहे. परंतु एक दोन ओळी वाचण्यापलीकडे त्यांतील मजकूर त्यानें कांहींच दिला नाहीं. हा शिलालेख शक ११९४ त खोदला गेला असें तो ह्मणतो; परंतु तसा प्रकार नाहीं. हा शिलालेख खोदण्यास प्रारंभ शक ११९५ श्रीमुख संवत्सरीं झाला, व ११९९ त खोदणें समाप्त झालें. ११९५ च्या अगोदर दहापांच वर्षें विठोबाच्या देवळाचा जीर्णोद्धार झाला व नवें देऊळ ११९५ च्या सालीं तयार झालें. शक ११९५ च्या नव्या देवळाच्या देवडीवर प्रस्तुतकालीं ज्याला चौऱ्यायशीचा दगड ह्मणून ह्मणतात तो होता असें वाटतें. हें ११९५ तील देऊळ ह्मणजे ज्यांत सध्यां विठोबाची मूर्ति आहे तो गाभारा होय. गाभाऱ्यावरील कळस बाळाजीपंत नातूनें चढविला आहे. गाभाऱ्यापुढील सोळखांबी व त्याच्या पुढील गरुडमंडप हे पेशवाईत व तिच्या अगोदर कांहीं वर्षें बांधले गेले. नामदेवाची देवडी चौऱ्यायशीच्या शिलेच्या किंचित् बरोबरची आहे.

२ चौऱ्यायशीच्या शिलेची लांबीरुंदी सोलापूर गझेटियरांत दिली असल्यामुळें ती येथें देण्याची जरूर दिसत नाहीं. शिलेवरील बहुतेक सर्व अक्षरें शाबूत आहेत. फक्त माथ्याच्या पहिल्या ओळीवरील दहा बारा अक्षरें व अधूनमधून कांहीं अक्षरें गेलीं आहेत. परंतु ही पहिली ओळ सर्व लेखाच्या शेवटली ओळ आहे. सर्व शिला लिहून झाल्यावर वर्गणीदारांचीं नांवें लिहिण्यास जागा राहिली नाहीं, सबब प्रशस्तीचा जो पहिला श्लोक त्याच्यावरती ही ओळ

खोदली आहे. सबंद शिळेचे एकंदर आठ रकाने केले आहेत; व त्यांत देवाच्या पूजेअर्चेकरितां पैसे व फुलें देणाऱ्या भक्तांचीं नांवें एकाखालीं एक दिलेलीं आहेत. ह्या आठ रकान्यांवरती शिळेच्या सबंद लांबीभर तीन ओळी खोदल्या आहेत. पहिल्या ओळींत शेवटल्या वर्गणीदारांचीं नांवें खोदलीं आहेत ह्मणून वरती सांगितलेंच आहे. दुसऱ्या ओळींत श्रीविठ्ठलाच्या प्रशस्तीचा एक संस्कृत श्लोक दिला आहे. आणि तिसऱ्या ओळींत खालील आठ रकान्यांत कशा-संबंधीं वर्गणी गोळा केली तें सांगितलें आहे. एका रकान्याखेरीज करून प्रत्येक रकान्याच्या वरती ज्या पुढाऱ्याच्याकडे वर्गणीदारांनीं आपली वर्गणी भरली त्याचें नांव व खातें दिलें आहे. आठ रकाने व वरील तीन ओळी मिळून शिळेवरील लेखाची आकृति येणेंप्रमाणें आहे.

१ शेवटल्या वर्गणीदारांचीं नांवें ——————
२ प्रशस्तिपर श्लोक ——————
३ मथळा ——————
४

| पुढाऱ्याचें नांव रकाना १ | पुढारी २ | .... ३ | .... ४ | .... ५ | .... ६ | .... ७ | ८ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |

३ मूळ शिळा चौकोनी असून, प्रस्तुत कालीं तिचा उजवेकडील वरचा व खालचा असे दोन्ही कोपरे फुटून गेलेले दिसतात. परंतु अक्षरें फुटून गेल्याचें किंवा वाक्यें तुटल्याचें कांहींच चिन्ह दिसत नाहीं. तेव्हां कदाचित् सध्यां जशी शिला दिसत आहे तशीच ती पूर्वीपासून असेल, असेंहि मानण्याकडे प्रवृत्ति होते. शिळेवरील सर्व अक्षरें सारख्या आकाराचीं नाहींत. कांहीं अक्षरांचा व्यास ½ इंच, कांहींचा ⅞ इंच, कांहींचा ½ इंच व कांहींचा ⅜ इंच आहे. शक ११९५ पासून शक ११९९ पर्यंत पांच वर्षे जसजशी वर्गणी आली तसतशीं वर्गणीदारांचीं नावें खोदलीं गेलीं, त्यामुळें अक्षरांचा आकार एका सांचाचा राहिला नाहीं. ह्या लहान मोठ्या अक्षरांचें वळण मात्र महाराष्ट्रांतील तत्कालीन इतर शिलालेखांतल्या अक्षरांच्या सारखेंच आहे.

४ प्रशस्तींतील श्लोकाखेरीज शिळेवरील बाकी सर्व मजकूर तत्कालीन मराठींत आहे. ज्ञानेश्वरानीं आपली ज्ञानेश्वरी शक १२१२ त लिहिली; तिच्या अगोदर १२ पासून १७ वर्षे ही शिळा खोदली जात होती. ह्मणजे ज्ञानेश्वरीच्या भाषेची मापक ह्या शिलालेखाची भाषा समजणें रास्त आहे.

# शिलालेख

( १ ) + + रूपवां[१][२][३]डि लाखं[४]णनायकें दे[५] । गं[६] १ + + दे[७] ॐ-

---

१ ही ओळ शिळेच्या सबंद लांबीभर खोदली आहे. आठव्या रकान्यांत वर्गणीदारांचीं नावें खोदून शिळेवरील जागा संपल्यावर, नंतर प्रशस्तीच्या वरील जागेवर ही ओळ खोदिली आहे. प्रशस्तींतील अक्षरांपेक्षां ह्या ओळींतील अक्षरें निम्यानें बारीक आहेत. दगडाचे कवचे निघून जीं अक्षरें अजीबात नाहींशीं झालेलीं आहेत त्यांच्या बदला, अदमासानें जितकीं अक्षरें फुटून गेलीं असें वाटलें, तितक्या फुल्या घातल्या आहेत. ही ओळ सरासरी चार फूट लांब आहे.

माइतिमालगोष्टी द । ग १ [९]+ + + + + + + + कुमारें व-[१०]णेजें दत्तः ग १ देयं[११] दांडा १ फु[१२]०

---

२ ह्या दोन फुल्यापैकीं पहिल्या फुलीच्या जागीं एकाचा आंकडा असावा. ह्या शिलालेखांत बहुतेक वर्गणीदारांच्या नांवापाठीमागें खात्यांत किंवा रोजकीर्दीत घालतात त्याप्रमाणें एकाचा आंकडा घातलेला आढळतो. दुसरी फुली रूपवाडि ह्या ग्रामनामाच्या पहिल्या अक्षराच्या बदला आहे. कदाचित् तें अक्षर सु असेल. ह्मणजे गावाचें सबंद नांव सुरूपवाडि होतें.

३ " रूपवाडि लाखणनायकें " ह्या दोन शब्दांचा अर्थ " रूपवाडीच्या लाखणनायकानें " असा आहे. कर्नाटक, तैलंग, वगैरे देशांत तन्नामधारी इतर व्यक्तींपासून भेद दाखविण्याकरितां व्यक्तीच्या नांवापाठीमागें गांवाचें नांव जोडतात. तोच प्रकार शक ११९९ च्या सुमारास महाराष्ट्रांत प्रचलित होता असें दिसतें. ज्याअर्थी " रूपवाडि " व " लाखणनायकें " ह्या शब्दांच्यामध्यें विभक्तिप्रत्यय नाहीं, त्याअर्थी हे दोन शब्द मिळून एक सामासिकपद धरणें प्राप्त आहे.

४ " लाखण " हें लक्ष्मण शब्दाचें प्राकृत रूप आहे. नायकें ही तृतीया आहे. ह्या शिलालेखांत पुल्लिंगी अकारांत नामाच्या तृतीयेचें एकवचन ईं हा अनुनासिक प्रत्यय लावून होतें.

५ ' द । ' = दत्तः अथवा दत्त. संक्षेपाचें चिन्ह आतांच्याप्रमाणें त्यावेळींहि । अशी उभी रेघ होती. कोणत्याहि शब्दाचा संक्षेप शब्दाचें आद्यक्षर व उभी रेघ यांनीं दर्शवीत.

६ ' ग ' हें अक्षर गद्यान शब्दाचा संक्षेप आहे. हा संक्षेप कधीं नुसत्या ' ग ' नें, व कधीं ' ग० ' नें दाखवीत. ह्मणजे ० शून्यानेंहि संक्षेपाचें सूचन होत असे. गद्यान हें एक तत्कालीन सोन्याचें किंवा रुप्याचें नाणें होतें. सध्यां गुजराथेंत गध्यान, गद्धा नांवांचीं नाणीं अद्यापहि ऐकण्यांत येतात. येथें सोन्याचा गद्यान विवक्षित आहे किंवा रुप्याचा आहे, तें निश्चयानें सांगतां येत नाहीं. बहुशः सोन्याचा असावा.

(२) [13] स्तुत्यंनित्यमरोपसिद्धविबुधैः भूत्या विपृष्टं परं
श्रीकांतं कमलेक्षणं सुरगणैं गेयं मुदा कोमलं ।
कीर्त्यं भक्तजनैर्भृशं पुलकितानंदांबुपूर्णेक्षणैं
वंदे नंदतं[14] मुदा घननिलं भक्तानुगं श्री[15]विट्ठलं[16] ॥

---

कारण गद्यान देणारा गृहस्थ नायक ह्मणजे अधिपति आहे. गद्यानाचें वजन एक तोळा असून, किंमत १५ किंवा १५॥ रुपये असे.

७ ह्या दोन फुल्या ' फु० " ह्या दोन अक्षरांबद्दल बहुशः असाव्या असें पुढील संदर्भावरून वाटतें. ' फु० " ह्मणजे फुलें शून्य. एकंदर वाक्याचा अर्थ असाः— रूपवाडी येथील रहाणाऱ्या लाखणनायक सावकारानें सोन्याचा १ गद्यान दिला; फुलें मुळींच दिलीं नाहींत.

८ देओमाइ = राजाची आई. दे ॐ माइ = देवमातृ. तिमाल = त्रिमल्ल. गोष्ठी = समुदाय. तिमालगोष्टी नावाची राजमाता. हिनें एक गद्यान दिला. ही लाखणनायकाची आई दिसते.

९ ह्या ९ फुल्यांच्या जागीं खालील शब्द असावेः—

देय दांडा १ फुलें ०

१० कुमार = राजपुत्र. वण्णैजें = वण्णैजानें. वण्णैज हा लाखणनायकाचा मुलगा दिसतो. वण्णैज = वर्णयज.

११ दांडा = फुलांचा झुबका, तुरा अथवा काठी.

१२ कुमार वण्णैजानें एक गद्यान दिला; त्याच्या खर्चानें एक दांडा द्यावा, आणि फुलें मुळींच देऊं नये.

१३ ह्या दुसऱ्या ओळींत पुढील सबंद प्राशस्तिक श्लोक खोदिला आहे.

१४ ' नंदतं ' ह्या तीन अक्षरांऐवजीं ' नंदसुतं ' अशीं चार अक्षरें हवीं होतीं.

१५ श्री हें अक्षर वृत्तदृष्ट्या फाजील आहे. परंतु विठ्ठल या नांवापाठीमागें श्री लावण्याची वहिवाट पडल्यामुळें या चवथ्या चरणांत श्री दकलून दिली आहे. वृत्तसुखापेक्षां भक्तिसुखाकडे लक्ष विशेष आहे.

( ३[१७] ) स्वस्ति श्री सकु ११९५ श्रीमुखं संवत्सरे फागनिपुर

१६ विठ्ठल ह्या शब्दाचें खरें रूप विठ्ठुल. गौड भाषांत विष्णु या शब्दाचें विट्ठु; व कृष्ण या शब्दाचें किट्ट किंवा किष्ट अशीं रूपें होतात. विट्ठु या शब्दाचें प्रेमळरूप विठ्ठुल. त्याचा सामान्यजनांच्या बोलण्यांतील व्यावहारिक उच्चार विठ्ठल. विष्णु हा शब्द नामदेव विठ्ठलाला सदा लावतो व स्वतःला विष्णुदास आग्रहानें ह्मणवितो. विष्णु, विट्ठु, विठू, विठोबा, विठाई, विठ्या, विठबा, विठ्ठल, इठाल, इटाल, ठाल, विठाबाई असे एकंदर १२ उच्चार ह्या नांवाचे साधुसंतांच्या ग्रंथांतून व पंढरीच्या यात्रांतून ऐकूं येतात.

१७ शिळेच्या ह्या तिसऱ्या ओळींत ‘स्वस्ति’ पासून ‘विवरु’ पर्यंतचा सबंद मजकूर खोदला आहे. मजकूर संपल्यानंतर जो भाग राहिला त्यावर एका वर्गणिदाराचें नांव खोदलें आहे.

१८ ‘स्वस्ति’ शब्दाच्या पूर्वीं ॐकार किंवा ध्र दकार प्रायः बऱ्याच शिलालेखांवर सांपडतो. ॐकाराचा अर्थ काय तें सर्वत्र महशूर आहे. दकाराचा अर्थ इतका प्रसिद्ध नाहीं. सबब तो येथें देणें योग्य होईल असें वाटतें.

खं ब्रह्म निर्गुणं प्रोक्तं रेषा हरहरिद्वयोः।
दकारात्स्नेहमाप्नोति यावल्लक्ष्मीः स्थिरा भवेत्॥१॥

१९ ‘शक’ च्या बद्दल सकु हें मराठी रूप महाराष्ट्रांतील इतर कित्येक शिलालेखांत व ताम्रपटांतहि येतें. प्रो० काशिनाथपंत पाठक ह्यांनीं मुंबईच्या आशिआटिक सोसायटीच्या २१ व्या खंडाच्या ५९ व्या अंकांत— १९०४ त प्रसिद्ध केलेल्या—शक १०४९ चें शिलारांचें एक ताम्रपट छापलें आहे. त्यांत खालील शब्द आहेतः—

“शकनृपकालातीतसंवत्सरशतेषु दशस्वेकोनपंचाशदभ्यधिकेषु प्लवंग संवत्सरान्तर्गत कार्तिक शुद्ध पंचदश्यां शुक्रे यत्रांकतोपि सकु संवतु १०४९ कार्तिक सुद् १५ शुक्रे”---- तसेंच ग्रंथमालेच्या १३० व्या अंकांत छापलेल्या हंबिरराव यादवाच्या शक १२८९ तील शिलालेखांतहि सकु हें मराठी रूप आलें आहे.

श्रीविठ्ठलदेवरायांसि[22][23] तिसां[24]सिति फुलें दांडे आचंद्रार्क चालावेआ[25][26]

---

२० मूळांत ' ख ' च्या ऐवजीं ' प ' खोदला आहे.

२१ पंढरपुराला फागनिपुर असें दुसरें एक नांव होतेसें दिसतें. परंतु, आतांपर्यंत जेवढे ह्मणून ज्ञानेश्वरापासून महीपतीपर्यंत साधुसंत झाले तेवढ्यांच्या ग्रंथांत किंवा इतर ताम्रपट, शिलालेख, संस्कृत ग्रंथ किंवा प्रशस्त्या ह्यांत फागनिपुर असें एखाद्या गांवाचें नांव आढळांत आलेलें नाहीं. ' फागनि ' हें फाल्गुनि ह्या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप आहे. फाल्गुन महिन्याला हिंदी भाषेत फागन ह्मणतात. फाल्गुनि हें सध्यांचें पंढरपुर व गोपाळपुर यांच्यामधील ओढ्याचें अथवा नदीचें नांव असावें. त्या ओढ्याच्या जवळ असणारें जें गांव तें फागनिपुर. परंतु फागनिपुर हें नांव पंढरपुर ह्या नांवापेक्षां फार जुनें दिसतें, इतकें जुनें कीं ११९५ त प्रौढ भाषेनें गांवाच्या नांवाचा उच्चार करावयाचा असला ह्मणजे पंढरी, पंडरिगे, पंढरपुर, ह्या सापेक्षतेनें आधुनिक नांवांना टाकून, फागनिपुर असें जुनें अतएव प्रौढ नांव उच्चारीत व लिहीत. बाकी शक ११९५ त फागनिपुराचें लौकिक व व्यावहारिक नांव ' पंडरिगे ' होतें, असें ह्मणण्याला आधार आहे. विठोबाच्या देवळांतील सोळखांबीच्या पुढें गणपतीच्या पुढील दोन खांबांवरील एका आडव्या शिळेवर तिन्ही बाजूंनीं कोरलेला एक लेख आहे; व चौऱ्यायशीच्या शिळेच्या पांचपन्नास वर्षें पूर्वींचा आहे. त्यांत श्रीविठ्ठलाचें देऊळ ज्या गांवांत आहे त्याला पंडरिगे ह्मणून ह्मटलें आहे. ह्मणजे ११९५ च्या पूर्वीपासून ह्या गांवाचें नांव पंडरिगे असें होतें, हें उघड आहे. हिपरगे, कवलगे, बिळगे, वगैरे कर्नाटकी ग्रामनामांप्रमाणेंच हें पंडरिगे नांव कानडी आहे. त्यावरून " पंडरिगे विठाबाई । मला ठाव द्यावा पायीं ॥ " ह्या अभंगांतील " पंडरिगे विठाबाई " ह्या शब्दांचा अर्थ यथास्थित लागतो. " पंडरिगे विठाबाई " ह्मणजे " पंडरिगे गांवची विठाबाई. " त्रावणकोर माधवराव, तांजोर गोपाळराव, कुंभकोण वामनराव, वगैरे कर्नाटकी

समासाप्रमाणेंच पंडरिगे विठाबाई हा एक समास आहे. " पंडरिगे विठाबाईचा " " पांडुरंगे विठाबाई " असा वारकरी लोकांनीं अलीकडे अपभ्रंश केलेला आहे. कारण, पंडरिगे व पांडुरंग हे दोन शब्द उच्चारण्याला जवळजवळ भासतात. पंडरिगे ह्या कानडी शब्दावरून शास्त्री लोकांनीं पांडुरंग हें संस्कृत नांव तयार केलें, असें भगवानलाल इंद्राजी ह्मणतो; व हें त्याचें ह्मणणें सकृद्दर्शनीं साधार दिसतें. पांडुरंग ह्मणजे गोऱ्या कातडीचा, गौरांग, असा अर्थ आहे; आणि पंढरपुरच्या विठोबाला तर त्याचे प्रेमळ भक्त हि लडिवाळ क्रोधाभासानें काळ्या ह्मणून हाका मारतात. परंतु विठोबा हें विष्णुदैवत आहे आणि विठ्ठ हें विष्णूचेंच प्राकृतरूप आहे, ही बाब लक्ष्यांत घेतली व विष्णुदेव गौरांग आहे, ह्या गोष्टीशीं तिचा मेळ घालूं गेलें, ह्मणजे पांडुरंग हा शब्द पांडु व रंग ह्या दोन संस्कृत शब्दांपासून स्वतंत्र रीतीनें निर्माण झालेला आहे, असें कबूल करावें लागतें. एकंदरींत, ' पंडरिगे ' पासून पांडुरंग शब्द शास्त्र्यांनीं बनवला, ही जी भगवानलालाची कोटी तिला फारसा आधार आहे, असें दिसत नाहीं. पंडरिगे ह्या कानडी शब्दाच्या शेवटला गे काढून टाकला ह्मणजे पंडरि असा शब्द रहातो. तो किंचित् कठोर व ठसकेदार उच्चारला ह्मणजे पंढरी शब्द तयार होतो. कदाचित् ' पंढरी ' ह्या मराठी शब्दाचें कानडी लोकांनीं आपल्या चालीप्रमाणें ' पंडरिगे ' बनविलें असेल. ' पंढरी ' मूळ, किंवा ' पंडरिगे ' मूळ, हा वाद जास्त पुरावा मिळेपर्यंत असाच राहील.

२२ ' ठ्ठ ' बद्दल नुसता एकेरी ' ठ ' खोदला आहे.

२३ शक ११९९ त विठोबाला भक्तमंडळी श्रीविठ्ठलदेवराय असें प्रेमानें ह्मणत. सि हा चतुर्थीचा प्रत्यय त्या कालीं रूढ होता; ला प्रत्यय नव्हता.

२४ हीं चार अक्षरें नीट वाचतां आलीं नाहींत; किंवा वाचतां आलीं असल्यास, अर्थ लागत नाहीं.

२५ चालावेआ ह्मणजे चालविण्याकरितां, सतत लावले जाण्याकरितां. चालणें ह्याचें प्रयोजक चालावणें. चालावणेया असें रूप न करतां,

नाना भक्तिमालिंआं[२६] दत्त पैकांचा[२७] विवरु[२८]॥[२९]

---

चालावेआ असें रूप त्या कालीं करीत. मंगळवेढच्या काशीविश्वेश्वराच्या देवळांतील शक १४९४ तील शिलालेखाच्या ३१ व ३२ ओळींवर " सांगाव्या " असें रूप आलें आहे; तें ' सांगावेआ ' या ज्ञानेश्वर-कालीन रूपाचें एकनाथकालीन रूप आहे. तसेंच, नागावांतील शक १२८९ तील शिलालेखाच्या ७ व्या ओळीवर " ळावेया " असें रूप आलें आहे.

२६ भक्तिमाला, तींतील जे लोक ते भक्तिमालि. " भक्तिमालि " शब्दाचें तृतीयेचें अनेकवचनी रूप भक्तिमालिआं. एकवचनी रूप ' भक्तिमालिआ ' असें होत असे. ' आ ' वर अनुनासिक दिला ह्मणजे अनेकवचन होत असे.

२७ पैक = द्रव्य; षष्ठी पैकाचा. पैका असा मूळ शब्द असता तर त्याची षष्ठी ' पैकेयाचा ' अशी झाली असती.

२८ विवरु=तपशील.

२९ अर्थः-- शक ११९५ श्रीमुख संवत्सरीं फागनिपुरच्या श्रीविठ्ठल-देवरायास फुलें व दांडे यावच्चंद्रदिवाकरौ समर्पण करण्याचें काम चालू रहाण्याकरितां भक्तसमूहांतील नाना व्यक्तींनीं दिलेल्या द्रव्याचा तपशील.

ह्यावरून स्पष्ट आहे कीं शक ११९५ त विठोबाचे आतांप्रमाणेंच असंख्य भक्तजन होते. ज्ञानेश्वर व नामदेव ह्यांच्यापासून पुढें विठोबाचें माहात्म्य वाढलें असा प्रकार नाहीं. ११९५ त ज्ञानेश्वर लहान पोर होते; तें वयांत आल्यावर विठोबाच्या असंख्य भक्तजनांत शिरलें व आपल्या तपस्तेजानें भक्तशिरोमण्यांत अग्रगण्यत्व पावलें. भक्तिमार्गी भक्तजनांची छाप ज्ञानमार्गी ज्ञानेश्वरावर बेमालूम बसली.

---

## रकाना पहिला



( ४ )[३०] मालि[३१] वामैआं[३२] दत्त पाते[३३] पैकु[३४] ॥

( ५ ) १ श्रीपतिदें[३५] णाकें[३६] दत्त ग० १ देय दांड० फुलें १०० वां[३७]०

---

३० वरील तीन ओळी शिळेच्या सबंद लांबीभर खोदल्या आहेत. ह्या चवथ्या ओळीपासून शिळेचे आठ रकाने केलेले आहेत. तिसऱ्या सबंद ओळीच्या खालीं सहा लंब रेषा शिळेच्या तळापर्यंत समांतर काढून सात रकाने विभक्त दाखविलेले आहेत. आठवा रकाना सातव्या-पासून लंबरेषेनें विभक्त केलेला नाहीं. त्या रकान्यांतील वर्गणी-दारांचीं नावें अतिबारीक अक्षरांनीं सातव्या रकान्याच्या पुढें राहिलेल्या शिळेच्या भागांत लिहिलीं आहेत.

३१ मालि ह्मणजे भक्तिमालि. भक्तिमालि=भक्तिमालेंतील एक इसम.

३२ वामैआ शब्दांतील ऐआ हा तेलंगी प्रत्यय आहे. वामय्या असें प्रस्तुतकालीन रूप होईल. वामैआ हें तृतीयेचें एकवचन आहे. आकारांत पुल्लिंगी नाम असल्यामुळें आ प्रत्यय मूळ शब्दाच्या अंत्य ‘ आं ’ त लोपून गेला.

३३ पाते = खाते

३४ पैकु = द्रव्य. ओळीचा अर्थ:—भक्तिमालेंतल्या वामैआनें दिलेल्या यादींतील द्रव्य.

३५ श्रीपतिद यानें.

३६ णाकें = नायकें–णाक ( नाईक याअर्थीं ) शब्द प्रस्तुत कालीं रामणाक, हरणाक वगैरे अतिशूद्रांच्या नांवांत मात्र सध्यां राहिला आहे.

( ६ ) १ मांघोलि[38] बाबा[39] सेणवै[40] दत्त ग० १ देय दां १

फु + +[41] वौ १

( ७ ) १ गंगाधर[42] नायकें दत्त ग० १ देय दां ३ फु० वौ०

---

शक ११९९ त तो सावकारांना व ग्रामाधिपतींना लावीत असें दिसतें. " श्रीपतिर्दे णाकें " हे शब्द भगवानलाल इंद्राजीनें " श्रीपतिदृण्णा " असे वाचले ( सोलापूर गझेटियर—पंढरपूर ). अर्थ कांहीं एक लागला नाहीं व लागल्यासारखा वाटला तो चुकला, हें उघड आहे. " श्रीपतिद्ण्णा " असें पद पाडल्यावर, पुढें ' कें ' चें काय करावयाचें तें सुचेना. डा० भगवानलालनें ही एक ओळ व पुढील ३१ ' ओळ, अशा दोन ओळी अर्ध्यामुर्ध्या वाचल्या, असें सोलापूर गझेटियरांतील वर्णनावरून दिसतें.

३७ ' वौ० ' हा संक्षेप वौसर ह्या शब्दाचा आहे. वौसर=पुडा किंवा हार.

३८ गांवाचें नांव.

३९ हा शब्द शुद्ध प्राकृत आहे. बप्प = बप्पक = बापअ = बावअ = बावा = बाबा.

४० सेणवै = फौजदार. ब्राह्मण, मराठा, वगैरे वाटेल त्या चातुर्वर्ण्यांतील जातीचा जो कोणी इसम फौजेचा विवक्षित अधिकारी तो सेणवै. कुळांत कोण्या नामांकित पुरुषानें सेणवैपणा केला ह्मणजे त्याचे वंशज सेणवै हें आडनांव लावीत. ओळीचा अर्थ उघड आहे. सेणवै ह्याची एकवचनी तृतीया सेणवैएं अशी पाहिजे होती. परंतु, ती येथें केली नाहीं. सेणवैदत्त असा समास केला आहे.

४१ ह्या दोन फुल्यांच्या ठिकाणीं " लें० " अशीं दोन अक्षरें असावीं.

४२ गंगाधरनायक हें सावकाराचें, सराफाचें, ग्रामाधिपतीचें किंवा अधिकाऱ्याचें नांव. श्रीपतिदनायक व गंगाधरनायक ह्यांच्या नावांपाठीमागें गांवांचीं नांवें नाहींत. त्या अर्थीं राज्यांतील हे कोणी

(८) १ विजेपुर[४३] गौरु[४४]-बाहूवा द । ग० १ देय दां० फुलें[४५]० वौ १

(९) १ माहूय[४६] नामदेवें द । ग १ देय दां १ सेवंत[४७] वौ १

(१०) १ कोकणाँ[४८] कें[४९]सेंवदेवें द । ग १ देय दां० १ फु० वौ०

(११) १ तअंघा[५०] अद्वैतै द । ग १ देयं दा १

(१२) १ मांइबांइ[५१] दामोधर भटीं द । ग २ वौ०

---

द्रव्यानें किंवा अधिकारानें प्रसिद्ध पुरुष आहेत असें दिसतें. अप्रसिद्ध असते तर ग्रामनामानें विशिष्ट झाले असते.

४३ विजयपुर ह्या शब्दाचें विजेपुर, बिजेपुर, असें प्राकृत रूप होतें. तेव्हां विजापुर ह्या शब्दाचें विजयपुर हें मूळसंस्कृत रूप नव्हे. मूळ संस्कृत रूप विद्यापुर. विद्यापुर = विज्जापुर = विजापुर. सध्यांच्या विजापुर शहराच्या ठिकाणीं शक ११९९ त विजापुर ह्मणून एक मोठेंसें गांव होतें असें दिसतें. हें गांव मुसुलमानांनीं बसाविलेलें नव्हे; त्यांच्या पूर्वींचेंच आहे.

४४ गौरुबाहु = गौर आहेत बाहु ज्याचे. एकवचनी तृतीया = गौरुबाहूवा.

४५ 'फुलें०' हीं अक्षरें मूळांत फुल अशींच आहेत. पुढील शून्य व वरील मात्रा व अनुनासिक यात्रेकरूंनीं पाठी घासघासून गुळगुळीत करून सोडलीं.

४६ गांवाचें नांव

४७ सेवंतीच्या फुलांची माळ

४८ कोकण्या

४९ 'कें' वर अनुनासिक आहे.

५० गांवाचें नांव

५१ "मांइबाइ" व "दामोधर" या दोन शब्दांमध्यें 'तथाच' हे शब्द अध्याऱ्हृत आहेत. मांइबाइ व दामोधर भट यांनीं. तृतीयेचें एकवचन = भटें. तृतीयेचें अनेकवचन भटीं.

( १३ ) १ साहादेवपंडितीं द। ग १ देयं दां २

( १४ ) १ मुद्गहस्त[53] सोमनाथें द। ग १ देयं[54] दां॰ तुल[55] वौ १

( १५ ) १ कुंभमूर्ति[56] रूपदेवें द। ग १ देयं दां १ तुल वौ १

( १६ ) १ तथा सेम्रुवेल[57] भूमिदेवें द। ग १ देयं दां १ तुल वौ १

( १७ ) १ बामरसाचा[58] जोइसि[59] नावैएं[60] द। ग २ देयं दां २ वौ॰

( १८ ) १ विद्याधर[61] सरस्वति भटीं द। ग १ देयं दां १ वौ॰

( १९ ) १ चल्हादेवी[62] द। ग १ देय दा ॰ फुलें २९

---

५२ साहादेव याचें मूळ रूप सहदेव. ‘ पंडितीं ’ हें बहुमानार्थी तृतीयेचें अनेकवचन आहे.

५३ गांवाचें नांव.

५४ देय, देयं, दे। अशीं तीन रूपें ह्या शब्दाचीं ह्या शिलालेखांत येतात.

५५ ‘ तुल ’ हें तुलसीचें संक्षिप्त रूप आहे.

५६ हें आडनांव असावें.

५७ गांवाचें नांव.

५८ बामरस हें गांवाचें नांव.

५९ ज्योतिषी = जोइसी = जोइसि = जोशी = दोशी ( गुजराथी )

६० नामअय्या = नावअय्या = नावैआ = नावैएं ( एकवचनी तृतीया )

६१ आडनांव.

६२ ह्या शब्दाची तृतीया केली नाहीं. चल्हादेवीदत्त असा समास केलेला दिसतो. चल्हादेवीआ अशी एकवचनी तृतीया होईल.

( २० ) १ विठनायको[63] विनायको देऊबाई द । ग १ देय दा० फुलें २५

( २१ ) १ कविठेली[64]ये सेता १ ( द । ) ग देय दां १

( २२ ) १ कांमेगो[65] कान्हू[66] नायकें द । खेतांसो[67] देय दां २

( २३ ) १ किरिकांम[68] भत्कावें[69] ( द । ) ग ६ देय दां ६ वौ०

( २४ ) छं आद्रुसंवाडि सोंईदे ॐ पंडि—

---

६३ विष्णुनायक = विट्ठनायक = विठनायक = विठनायको ( प्रथमेचें एकवचन ) विठनायक, विनायक व देऊबाई ह्या तीन व्यक्तींनीं मिळून एक गद्यान दिला. त्याच्या खर्चानें आचंद्रार्क २५ फुलें विठोबाला दररोज देत जावीं; दांडे, वौसर, वगैरे इतर वस्तु देऊं नये.

६४ या अक्षरांचा कांहीं एक अर्थ कळला नाहीं. ' सेता ' पुढील १ आकड्याचाहि अर्थ कळला नाहीं.

६५ गांवाचें नांव

६६ कृष्ण = कण्ण = कण्ह = काण्ह = कान्ह = कान्हु ( ममतादर्शक )

६७ खेता सो = शंभर खेत. खेत हें एका लहान नाण्याचें नांव असावें. सो = शंभर

६८ गांवाचें नांव

६९ वर्गणीदाराचें नांव

७० २३ व्या ओळीच्या खालीं २६ वी ओळ खोदिली आहे. शक ११९६ भावसंवत्सरांत ज्यांनीं वर्गणी दिली त्यांचीं नांवें २६ व्या ओळीपासून दिलेलीं आहेत. परंतु आद्रुसवाडीच्या सोंईदेॐनें शक ११९५ त वर्गणी भरली होती. सबब, ११९५ च्या खात्यांत त्याचें नांव भरणें जरूर होतें. परंतु २३ व २६ या ओळींच्यामध्यें जागा राहिली नव्हती. ह्मणून २६ व्या ओळीचीं अक्षरें लिहून बाकी जी ओळीची पुढील रिकामी जागा राहिली तीवर २४ व २५ ह्या ओळी बारीक अक्षरांनीं तिरक्या खोदल्या आहेत. व हें नांव मागून लिहिलें हें

( २५ ) त मालि[७२] राघो द ग १ दे० तु वों १

( २६ ) भाव[७३] संवछरे जेष्ट[७४]मासे

( २७ ) १ आंवढा[७५] जाइदेवें[७६] दत्ता ग ४ देय दां १८

( २८ ) १ आंबेकारा[७७] दोंढं[७८] पंडीतु ग १ दांडा ३ फु २२

( २९ ) १ चांदोर[७९] रामेन सार्वन्हाग्नी ग २ दांड १ ग्राहे[८१] १८

---

दर्शविण्याकरितां खात्यांत लिहितात त्याप्रमाणें ७ अशी खूण त्या वर्गणीदाराच्या नांवापाठीमागें काढिली.

७१ गांवाचें नांव.

७२ मालि राघो याच्या द्वारा. मालि = भक्तिमालि. राघव = राघो.

७३ शक ११९६- ' संवत्सरे ' बद्दल संवछरे असें मराठी रूप खोदलें आहे.

७४ ' ज्येष्ठ ' बद्दल जेष्ट.

७५ गांवाचें नांव आंवढें. त्यांत रहाणारा तो आंवढा. आम्र. स्थक = आंवठअ = आंवठा = आंवढा. ग्रामस्थ = गांवठ = गांवढ- ग्रामस्थक = गांवठअ = गांवठा = गांवढा.

७६ जातिदेव = जाइदेअ = जाइदेवें ( तृतीयेचें एकवचन )

७७ आंबे गावचा रहिवाशी.

७८ दुःस्थ = दोट्ठ = दोंट्ठं ( अनुनासिकीकरणानें ). मागें १० व्या ओळींत केसव या शब्दांतील ' के ' चें अनुनासिकीकरण होऊन केंसव असें रूप आलेलें आहे.

७९ ग्रामनाम. राम या शब्दाची तृतीया रामेन. रामेण (संस्कृत); त्याचें प्राकृत रामेन. ' न ' चें अनुनासिकीकरण होऊन रामें असें रूप मराठींत होई व पद्यांत सध्यांहि होतें.

८० ह्या अक्षरांचा अर्थ कळला नाहीं; किंवा अक्षरें नीट लागलीं नाहींत.

८१ अक्षरें नीट लागलीं नाहींत; किंवा अर्थ कळत नाहीं.

( ३० ) श्रीविठलांचा[82] फलखंड[83] ओं[84] दामो +[85] यरें द । द्रां[86]
१० दे फु १

( ३१ ) सकु ११९८ धाता संवत्सरे माग वदि ३ वृषें[87]
सोडवी[88]—

( ३२ ) कार हेमांडी[89] पंडीतीं बामनां[90] दत्त ग १ देय दांडा १

---

८२ ‘ विठल ’ याची षष्ठी विठलाचा.

८३ अर्थ कळत नाहीं.

८४ अर्थ कळत नाहीं.

८५ अक्षर फुटून गेलें आहे.

८६ द्राम. ह्या वर्गणीदारानें गद्यानाच्या ऐवजी द्राम दिले आहेत. दहा द्राम दिले आहेत, त्या अर्थी गद्यानाहून द्राम हें लहान नाणें होतें. कदाचित् १० द्राम ह्मणजे एक गद्यान होत असेल. गद्यानाची किंमत १५ रुपये धरली, तर एका द्रामाची किंमत १॥ रुपया होत.

८७ वृष ह्मणजे सोमवार असावा. हा शब्द भगवानलालानें निराळाच कांहीं वाचला आहे.

८८ “ सोडवीकार ” बद्दल भगवानलाल “ यादवीकाल ” ह्मणून वाचतो. परंतु तें सर्वस्वीं चूक आहे. “ सोडवीकार ” असाच पाठ आहे. ह्या शिलालेखांतली भगवानलालानें जी दुसरी ओळ वाचिली ती हीच. सोडवी हें गांवाचें नांव आहे. तेथील रहिवाशी जो तो सोडवीकार.

८९ प्रसिद्ध हेमाद्रिपंडित. हा रामचंद्रदेव जाधवाचा श्रीकरणाधिप.

९० “ बामना ” बद्दल भगवानलाल इंद्राजी “ धामना ” वाचतो. परंतु “ बामना ” हाच खरा पाठ आहे. बामना = वामनाला. वामन किंवा बामन हें वर्गणी गोळा करणाऱ्याचें किंवा फुलें देणाऱ्या माळ्याचें नांव असावें.

(३३) स्वस्ति श्री सकु ११९९ ईस्वर संवछरे मार्गसिर सुदि १९ सुक्रे[91] ॥ श्री- विठलदेवराया —

(३४) सि पांडरी[92] – फड – मुख्य समंतात्भाग आचंद्रार्क श्री –जादवनारायणप्रौढ–प्रता[93]—

(३५) प–चक्रवर्ति श्रीरामचंद्रदेवेंराएं[94] द।+ [95] + श्रीसर्वाधिकारी श्रीविठ्ठ—

(३६) लदेवा मेहत[96] ग[97] क्षेर[98] वलदेव वायकें[99] बाव[100] भद्गूसी[101] दत्त = श्रीमंगलमहाश्री[102]

---

९१ ११९९ ईश्वर संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध १९ ला शुक्रवार येतो. सकु, ईस्वर, मार्गसिर, सुक्रे, ह्या चार शब्दांतील मूळ शकाराबद्दल सकार आला आहे. कित्येक लेखांत ह्या नियमाप्रमाणें श्रीबद्दल स्री आढळतो. परंतु प्रस्तुत लेखांत श्री असेंच अक्षर आहे.

९२ पांडरी ह्मणजे प्रस्तुतकालीन पांढर. फड ह्मणजे कचेरी. पांडरीफडमुख्य = राज्यांतील सर्व पांढऱ्यांच्या कचेऱ्यांचा अधिपति = ग्रामसंस्थांचा अधिपति.

९३ रामचंद्रदेवाला जादव ह्मणून या शिलालेखांत ह्मटलें आहे. रामचंद्राच्या संस्कृत शिलालेखांत व ताम्रपटांत यादव असा शब्द येईल. श्रीजादवनारायणप्रौढप्रतापचक्रवर्ति हें रामचंद्रदेवाचें बिरुद आहे.

९४ देवराय याचें तृतीयेचें एकवचन देवराएं.

९५ ह्या दोन फुल्यांच्या जागीं कोणतीं अक्षरें आहेत तें नीट वाचतां आलें नाहीं. बहुशः गद्यान किती दिले त्यांचा आकडा असावा.

९६ एका प्रकारच्या गद्यानाचें नांव असावें.

९७ गद्यान

९८ क्षेर हें गांवाचें नांव असावें.

९९ बलदेवाच्या बायकोनें.

१०० विहीर

१०१ उपायन

( ३७ ) १ आंबेकारें[103] क्रिष्णदेवें द । ग १ दे । फुलें ३०
( ३८ ) भांवसंवत्सरे[104] आस्विन सुध १ रवौ श्रीविठ—
( ३९ ) लदेवरायासि श्रीपतिदेवें[105] वक्रिवेकारु[106]—

---

१०२ ३३ पासून ३६ पर्यंतच्या चार ओळी पहिल्या व दुसऱ्या रकान्याभर खोदल्या आहेत; व त्यांतील अक्षरें वरील ३२ ओळींतील अक्षरांच्या अडीच तीन पट मोठीं आहेत. महाराष्ट्राचा तत्कालीन चक्रवर्ति राजा जो रामचंद्रदेव जादव त्याची देणगी येथें नमूद करावयाची असल्यामुळें, अक्षरें मोठीं व ठळक अशीं लिहून, शिवाय ओळी एकाच रकान्यांत न आटोपतां दोन रकान्यांभर लिहिलीं आहेत. ( १ ) रामचंद्रराव जाधवानें अमुक गद्यान दिले, ( २ ) त्याच्या सर्वाधिकाऱ्यानें अमुक गद्यान दिले, व ( ३ ) बलदेवाच्या बायकोनें एक विहीर दिली. हा बलदेव राजकुळांतील कोणी पुरुष असावा. राजकुळांतील मंडळीची देणगी आहे सबब श्रीमंगलमहाश्री अशी मंगल शब्दांनीं समाप्ति केली आहे.

१०३ आंबे येथील रहिवाश्यानें.

१०४ शक ११९६

१०५ " श्रीपतिदें " असें नांव ९ व्या ओळींत आलें आहे. त्याचेंच श्रीपतिदेव हें पूर्ण नांव असावें. ह्या श्रीपतिदेवाचें नांव प्रस्तुत शिलालेखांत पाच चार वेळां आलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं हा विठ्ठलाचा मोठा भक्त होता; व ह्याच्याच पुरस्कारानें देवाला देणग्यांची वर्गणी जमली होती. हा श्रीपतिदेव सावकार किंवा जहागीरदार किंवा सामंत होता असें दिसतें; परंतु निश्चित कोण होता, तें सांगतां येत नाहीं. ह्या श्रीपतिदेवाचें " वक्रिवेकारुक " असें एक विशेषण ३९ व्या व ४० व्या ओळींत आलें आहे. त्यावरून, हा कोण होता, हें निश्चयानें कळावयाचें. परंतु, " वक्रिवेकारुकें " ह्या शब्दाचा अर्थ मला लागला नाहीं. अर्थ न लगण्याचें कारण असें कीं " वक्रिवकारुक " ह्या शब्दांतील दुसरें अक्षर मला नीट वाचतां आलें नाहीं. अनुमानधक्क्यानें तें मी " क्रि " ह्मणून वाचलें आहे. तें अक्षर जर नीट लागलें तर सबंद शब्दाचा अर्थ बहुशः समाधानकारक लागेल.

१०६ शब्द नीट वाचतां न आल्यामुळें, अर्थ लागत नाहीं.

( ४० ) कें हस्तोदक करुनु केशुत्रि[107] ग ५ मेहा[108]—

( ४१ ) जना ग ५ ऐसे वकिवेकोरुक[109] में[110] ग द—

( ४२ ) त्त आचंद्रार्क हस्तोदककृत

( ४३ ) श्रीसकु ११९८ धातासंवत्सरे चैइत्र[111] सुध १५

( ४४ ) सोमे हाबुगेल[112] मलोदेवें[113] द । ग १ आचंद्रार्क

( ४५ ) नभेमासे[114] ललाम + + +[115] + + + + +

( ४६ ) नमह[116] द । + + + + + + तुलसीच[117] वौस—

( ४७ ) र १ चंद्रार्क

( ४८ ) सांगवी[118] रामणुरी केसेव[119]सुत माधवदेवें

( ४९ ) दत्त ग १ दे । फुलें २५

---

१०७ एका प्रकारचा गद्यान.

१०८ एका प्रकारचा गद्यान असावा.

१०९ हा शब्द व त्याचा अर्थ नीट कळत नाहीं.

११० ‘ महाजन ’ याचा संक्षेप.

१११ चैत्र ( सं ) = चइत्त ( प्रा. ) = चइत किंवा चइत्र (मराठी)

११२ गांवाचें नांव.

११३ ‘ मल्ल ’ याचें ममतादर्शक मल्लु, यापासून मलो, मलो + देव = मलोदेव.

११४ श्रावण.

११५ अक्षरें लागलीं नाहींत.

११६ मागील न लागलेल्या अक्षरांशीं संबंध आहे.

११७ तुलसीच हें षष्ठीचें एकवचन आहे. तुलसीस्थ = तुलसीचच = तुलसीच.

११८ सांगवी--रामणुरी हें गांवाचें संयुक्त नांव आहे.

११९ येथें ‘ केसव ’ शब्दांतील के अनुनासिक केला नाहीं.

## रकाना दुसरा.

( ५० )[120] पाटोला[121]मातासुत राघेण[122] दत्त षांत पैकु

( ५१ ) १ श्रीपतिदें णायकें[123] दत्ता[124] ग० देय दां १

( ५२ ) १ गंगाधर नायकें[125] दत्ता ग० देय दां १

---

१२० येथपासून दुसरा रकाना सुरू. रकान्यांत वर्गणीदारांची जी यादी दिली आहे त्या यादींतील इसमांनीं पाटोलामातासुत राघ याजकडे वर्गणी भरली.

१२१ पाटोला नांवाची बाई जिची माता ती पाटोलामाता. तिचा मुलगा.

१२२ ' राघ ' शब्दाची तृतीया राघेण. ' ण ' चा अनुनासिक होऊन ' राघें ' असें रूप होतें. शक ११९९ त अकारान्त पुल्लिंगी शब्दांची एकवचनी तृतीया इन किंवा ईँ या प्रत्ययांच्या जोडणीनें विकल्पानें होत असे, असें दिसतें. परंतु इन प्रत्यय लागून होणारी तृतीया आस्ते आस्ते लोपत चालली होती.

१२३ पहिल्या रकान्याच्या पांचव्या ओळींत हें नांव " श्रीपतिदें णाकें " असें आलेलें आहे. येथें ५१ व्या ओळींत " णाकें " च्या ऐवजीं " णायकें " असें स्पष्ट आहे.

१२४ दत्ता हें अनेक-वचन आहे. परंतु दिलेले गद्यान शून्य आहेत. ५२ व्या व ५४ व्या ओळींतहि दत्ता असें अनेकवचनच आहे.

१२५ येथें नायक असें स्पष्ट आहे. ५१ व्या ओळींत णायक आहे. नायक व णायक या दोन हरफांत कांहीं तरी भेद आहे, ह्यांत संशय नाहीं. " श्रीपतिद णाक " किंवा " श्रीपतिद णायक " हा ब्राह्मण नसून मराठा किंवा वैश्य असावा. " गंगाधर नायक " ब्राह्मण असावा. " श्रीपतिद णायक " किंवा " णाक " ह्याच्या नांवाचा जो रूढ उच्चार होता तोच येथें दिला आहे व देणें जरूर होतें. त्याच्या नांवाचें संस्कृत रूपांतर करून भागण्यासारखें नव्हतें.

( ५३ ) १ लंनुसेठिं[126] दत्ता ग १ देय दां १
( ५४ ) १ गणपति नायकें दत्ता ग १ दे । दां १
( ५५ ) १ रुविलेंद्र[127] गुद्देन[128] द । ग १ दे । दां १
( ५६ ) १ पैठण[129] चांगदेवें[130] द । ग १ दे । दां १
( ५७ ) १ कोटौन[131] हेमडिपंडितें[132] द । ( ग ) १ दे दां १
( ५८ ) १ तथा[133] विहरे ( स्वर[134] ) देवें द । १ दे दां १
( ५९ ) १ सिधनायकें[135] द । ग १ दे । दां १

---

१२६ " लंनु " हें कोणत्या संस्कृतशब्दाचें प्राकृत किंवा मराठी रूप तें समजत नाहीं. श्रेष्ठी=सेट्ठी=सेठि=सेठिं ( एकवचनी तृतीया )

१२७ रुविल हें गांवाचें नांव असावें. तेथील अधिपति तो रुविलेंद्र.

१२८ व्यक्तीचें नांव.

१२९ प्रतिस्थान=पइठाण=पैठाण=पैठण. पैठण असा उच्चार शक ११९५ च्या आधीं बरींच वर्षें कायम झाला होता.

१३० चंगदेव=चाँगदेव. ' चंगदेव ' या शब्दांतील ' च ' वर अनुस्वार आहे. ' चाँगदेव ' या शब्दांतील ' चा ' वर अनुनासिक आहे.

१३१ गांवाचें नांव

१३२ ' हेमडी ' च्या ऐवजीं हेमाडी असें पाहिजे आहे. पंडित याची एकवचनी तृतीया पंडितें. पंडितीं अशी बहुमानार्थी तृतीया येथें लिहिली नाहीं. कारण कोटौन गांवचा हा हेमाडीपंडित रामराजाचा श्रीकरणाधिप जो सोडवीकार हेमाडीपंडित त्याच्या इतका प्रसिद्ध व सर्वमान्य नव्हता.

१३३ तथा= तसेंच कोटौन गावच्या

१३४ ' स्वर ' हीं अक्षरें किंचित् पुसट झालीं आहेत. ' श्वर ' बद्दल ' स्वर ' खोदलें आहे.

१३५ सिद्ध= सिध= सिधु= शिदू ( अर्वाचीन मराठी )

(६०) १ मलिवा[१३६] तपोलालें[१३७] द। ग १ दे। दां १

(६१) १ उभेमार्गे[१३८] निंबदेवें द। ग १ दे। दां १

(६२) १ सालिवें[१३९] यादो[१४०] सेणवैएं[१४१] (द) ग १ दे। दां १

(६३) १ ईस्वरस्वामी[१४२] पेदि[१४३] द। ग ३ दे। फुलें ५००

(६४) १ आवडें[१४४] रासपंडितें[१४५] द। ग १ दे। दांडा १

(६५) १ आंघोलि[१४६] जंतोविमाएं[१४७] द। ग १ दे। दां १

---

१३६ आडनांव असावें.

१३७ लाल हा शब्द त्याकाळीं मराठींत होता. लाला असा हिंदींत याच अर्थाचा एक व्यक्तिनामवाचक शब्द प्रस्तुत काळीं आहे.

१३८ गांवाचें नांव.

१३९ सालिव गांवांत रहाणाऱ्या

१४० यादव = यादओ = यादो

१४१ 'सेणवै' शब्दाचें तृतीयेचें एकवचन

१४२ 'ईश्वर' या शब्दाचा उच्चार शक ११९९ त 'इस्वर' करीत. महाराष्ट्रांतील गांवढे सध्याहि 'इस्वर' असाच उच्चार करितात. इस्वरस्वामी हा मनुष्य कानडी किंवा तेलगु कुळांतला असून महाराष्ट्रांत बऱ्याच पिढ्या राहिलेला दिसतो.

१४३ धंदावाचक शब्द

१४४ गांवाचें नांव. 'आंवढा' असा शब्द २७ व्या ओळींत आला आहे. त्याचाच हा दुसरा हरफ आहे.

१४५ राशि = रासि = रास

१४६ गांवाचें नांव

१४७ जंतोवि माय ज्याची तो जंतोविमाय. (एकवचनी तृतीया) जंतोविमाएं. जंतोवि हें कोणत्या संस्कृत शब्दाचें प्राकृत रूप न कळे.

( ६६ ) १ दांथिद[148] पदुमै[149] द । ग १०१ दे । दां १

( ६७ ) १ पुराणिक हायोवाहया[150] ग० ॥ दे। सेव वौ १ तु वौ १

( ६८ ) श्री सकु ११९८ धाता मार्गसिर वहुल[151] ५

( ६९ ) १ रवौ श्रीविठेलेरावा[152] अर्थे द । दंडा[153] १ ग ॥[154]

( ७० ) १ गुरुवें[155] वाडदेवें[156] वाजसनेयें सुतें चंगदेव[157]—

( ७१ ) १ सुतें दत्त माला पाच धंद्दृ[158] गंधाण[159] १

---

१४८ गांवाचें नांव

१४९ पदुमै हें व्यक्तीचें नांव

१५० हयवाहअच्या = हयकवाहय्या = हयोवाहया. तृतीया न करतां समासच केला आहे.

१५१ शक ११९८ धाता, मार्गशीर्ष वद्य ५ स रविवार येतो.

१५२ ' राऊ ' किंवा ' राऊ ' याचें चतुर्थीचें एकवचन रावा. रावा अर्थे=रावा करितां.

१५३ दंडा = दांड. येथें दांडाच्या मागून अर्ध्या गद्यानाचा उल्लेख केला आहे.

१५४ पाव, अर्धा, पाऊण, सवा, दीड, वगैरेकरितां ।, ॥, ।॥, १।, १॥ अशा खुणा शक ११९९ त होत्या. ह्मणजे रेघांनीं चातुर्थिक अपूर्णांक दर्शविण्याची त्याकाळीं चाल होती.

१५५ गुरु ( प्रथमा, एकवचन ); गुरुवें ( तृतीया एकवचन )

१५६ वाटदेव = वाडदेव.

१५७ ' चंगदेव ' या शब्दांत ' च ' वर अनुस्वार आहे. ( १ ) वाडदेव गुरु, ( २ ) वाजसनेय सुत, व ( ३ चंगदेवसुत, ह्या तिघांनीं मिळून.

१५८ धद्दृ ह्मणजे एक प्रकारचा गद्यान.

१५९ येथें गद्याण असा सबंद शब्द आला आहे. आतांपर्यंत ग असा संक्षेप येत होता.

( ७२ ) १ ईश्वरदेवाचा ग १ दंडा १ जैतको[160]

( ७३ ) लपुविदेवाचा[161] ग १ दंडा वे + ता

( ७४ ) मांईदेवाचा[162] ग १ दंडा १ लपुमा

( ७५ ) १ आपदें[163] पावीषोता[164] रणेरा घोडा[165] ग १॥ दांडा १

( ७६ ) १ श्रीसिवनाथा[166] बोनें[167] नित्य साती[168]

( ७७ ) पा०[169] ॥ गोधूमा पा० । तूपा० + हे पडि[170]

---

१६० ७२।७३।७४ ह्या ओळींच्या शेवटलीं " जैतको, " " वे+ता, " " लपुमा " हीं अक्षरें काय अर्थाचीं तें कळत नाहीं.

१६१ लपुविदेव हें व्यक्तीचें नांव

१६२ मांईदेव हें व्यक्तीचें नांव. येथें " मा " वर अनुनासिक दिला आहे.

१६३ " आपदेव " या शब्दाचें मराठी आपदे; त्याचें तृतीयेचें एकवचन आपदें

१६४ " पावीखोता " व " रणेरा " या दोन शब्दांचे अर्थ कळत नाहींत किंवा अक्षरें नीट लागलीं नाहींत.

१६५ घोडा गद्यान ह्मणून एका प्रकारचा गद्यान.

१६६ विठोबाच्या ११९५ तल्या देवळाच्या जवळच ' शिवनाथ ' नांवचें लिंग होतें. हें लिंग मुसुलमानांनीं फोडलें. तेव्हां लिंगाला भोंक पडलें, तें अद्याप आहे. भोंक फार खोल आहे व त्याच्याखालीं भुयार आहे, असें सांगतात. सिवनाथा ( चतुर्थी एकवचनी )

१६७ बोनें = नैवेद्याचा खाद्य पदार्थ.

१६८ साती = सातू

१६९ ' पा० ' हा संक्षेप ' पाव ' याचा आहे. शेराचा पाव कीं कशाचा पाव तें स्पष्ट होत नाहीं.

१७० ' + हेपडि ' या अक्षरांचा अर्थ लागत नाहीं.

( ७८ ) कोटारि[१७१] ठाकवी[१७२] तेयासि[१७३]

( ७९ ) श्रीविठलाची[१७४] आण[१७५] [१७६]

( ८० ) १ पुरुषोत्तम पंडितिं[१७७] ग १ पाटोला[१७८] राघो दत्त ग १

---

१७१ कोटार = कोठार = कोष्ठगृह = खाद्यादि द्रव्याचें संग्रहस्थान. तेथील व्यवस्थापक जो तो कोठारी.

१७२ ठाकवी = फसवी.

१७३ तेयासि = त्यासि. 'तेयासि' 'जेयासि' वगैरे रूपें मजजवळील ज्ञानेश्वरींत नित्यानें येतात.

१७४ 'विठल' या शब्दाची स्त्रीलिंगी षष्ठी 'विठलाची'.

१७५ आण = शपथ. आज्ञा = आण्णा = आण. आण याचा मूळ अर्थ हुकूम असा होता. तो सध्यां शपथ असा झाला आहे.

१७६ सातू, गहू व तूप हे जिन्नस पावशेर पावशेर देण्यांत जो कोठारी फसवील त्याला श्रीविठ्ठलाची शपथ आहे, असा ह्या वाक्याचा अर्थ आहे. ह्या वाक्यांत ठाकवी हें क्रियापद आलें आहे व तेयासि हें सर्वनाम आलें आहे. नाम, सर्वनाम, क्रियापद, ह्या तीन घटकांनीं बनलेलें असें वाक्य ह्या शिलालेखांत हें एवढें एकच आहे. "श्रीसिवनाथा" या शब्दापासून 'आण' या शब्दापर्यंत जें वाक्य आहे तें शक ११९९ तील मराठी वाक्य कसें असे तें उत्तम दाखवितें. ह्या वाक्यांतल्या रूपांसारखीं रूपें ज्या ग्रंथांत येतील तो ग्रंथ शक ११९९ च्या सुमारचा खरा. मजजवळील ज्ञानेश्वरींतल्या वाक्यांतील शब्दांचीं रूपें अशींच आहेत. नामदेवाच्या अभंगांतही अशींच रूपें असलीं पाहिजेत. परंतु, सध्यां जे नामदेवाचे अभंग छापलेले मिळतात त्यांत हीं रूपें (विशेषतः क्रियापदांचीं व सर्वनामांचीं) नाहींत. अर्थात्, हे अभंग जसे मूळांत नामदेवानें ह्मटले तसे छापलेले नाहींत.

१७७ ३२ व्या ओळीवर "पंडीतीं" असे हरफ आले आहेत.

१७८ ९० व्या ओळीवर "पाटोलामातासुत राघेण" असे शब्द आले आहेत. तेथला राघ व प्रस्तुत पंक्तींतील राघ एकच होत.

( ८१ ) आचंद्रार्क देयदांडा १ आहेचे[179] फुला[180]

( ८२ ) १ मांईदे ॐ बांईआ[181] दत्त ग १ दे० फु ४०

( ८३ ) १ गोईंददेवें[182] दत्त ग १ दे० फु ४०

( ८४ ) १ सेठवल[183] जाईदेवें दत्त ग १ दे० दांडा १

---

१७९ " आहे " हें एक प्रकारच्या झाडाचें नांव असावें.

१८० " फुला " पुढें कांहीं तरी मजकूर लिहावयाचा राहिला आहे, असें वाटतें.

१८१ " बाई " ची एकवचनी तृतीया " बाईआ ".

१८२ गोइंद = गोविंद.

१८३ श्रेष्ठिआवलि = सेठिआवलि = सेठिवल = सेठवल = सावकारांच्या वर्गांतील एक.

## रकाना तिसरा

( ८५ ) + +[184] + + + + + + दत्त पैकु

( ८६ ) १ श्रीपतिदे[185] णायकें द । ग २ फुलें ख १

( ८७ ) १ गंगाधर[186] नायकें द । ग १ दे । दांड १

( ८८ ) १ वासक[187] नायकें द । ग १ दे । दां १

( ८९ ) १ देंपरु[188] हलिकें[189] द । ग १ दे । दां १

( ९० ) १ एसरें[190] नरहरिएं[191] द । ग १ दे । दां १

( ९० ) १ सिंवैएं[192] द । ग १ दे । दां १

( ९१ ) १ पुजापुर[193] तानुबाहूणे[194] द । ग १ दे । दां १

---

१८४ खातेदाराचें नांव पुसलें जाऊन दुर्बोध झालें आहे.

१८५ हें नांव पहिल्या व दुसऱ्या रकान्यांत आलें आहे.

१८६ हें नांव ७ व्या व ९२ व्या ओळींवर आलें आहे. हाहि गृहस्थ श्रीपतिदेवासारखाच श्रीमान व प्रमुख दिसतो.

१८७ वासु ( देव ) = वासुक = वासक

१८८ तेलगू नांव.

१८९ शेतकऱ्यानें. हलिक = हलिअ = हल्या ( पशु )

१९० " एसर " हें गांवाचें नांव

१९१ " नरहरि " ची एकवचनी तृतीया " नरहरिएँ "

१९२ ' सि ' अनुनासिक केली आहे. " सिवैआ " ची एकवचनी तृतीया " सिंवैएं "

१९३ गांवाचें नांव

१९४ " तानुबाहूणा " याची एकवचनी तृतीया. तानुबाहू + अण्णा = तानुबाहूण्णा = तानुबाहुणा = ( एकवचनी तृतीया ) तानुबाहूणें. ८ व्या ओळींत " गौरुबाहूवा " असें रूप आलें आहे.

( ९२ ) १ तेलंग[१९५] विफ्फुराजें द । ग १ दे । दां १

( ९२ ) १ सांये[१९६] बोपिसेठी[१९७] द । ग १ दे । दां १

( ९३ ) १ ह्मसगी[१९८] जगदेवराणेन[१९९] ( द । ) ग १ दे । दां १

( ९४ ) १ पैठण चांगदेवें[२००] द । ग १ दे । ग १

( ९५ ) १ कोहोर[२०१] हेमाद्रि पंडि[२०२] पंडि ग १ दि दा १

( ९६ ) १ संत्तिलाल[२०३] नारणना[२०४] द । ग १ दे । दां १

( ९७ ) ( १ ) चांगणें[२०५] मांइनायकें द । ग १ दे । दां १

( ९८ ) ( १ ) अर्जुनभटी द । ग १ दे । दां १

( ९९ ) ( १ ) जैजवल[२०६] विक्कुदेवी द । ग० । दे । तु वौ १

---

१९५ देशांचें व लोकांचें नांव.

१९६ सांय गांवचा रहाणारा.

१९७ बोप हें नांव बोपदेव, बोपिसेठी, वगैरे शब्दांत शक ११९९ त व तत्पूर्वी मराठींत होतें.

१९८ गांवाचें नांव.

१९९ इन प्रत्यय लावून एकवचनी तृतीया केली आहे.

२०० हें नांव ९६ व्या ओळींत आलें आहे.

२०१ गांवाचें नांव.

२०२ " पंडि " हीं अक्षरें दोनदां पडलीं आहेत; व जागा न राहिल्यामुळें " दत्त " हीं अक्षरें खोदतां आलीं नाहींत.

२०३ आडनांव.

२०४ नारण = नारायण. नारायण + अण्णा = नारायणण्णा = नारणण्णा = नाराणना ( अशुद्ध परंतु लौकिक ) किंवा, नारायण नायक याचा संक्षेप नारणना असूं शकेल.

२०५ आडनांव गांवावरून.

२०६ " सेठवल " प्रमाणें " जैजवल " जैजवल = जयजय आवलि = जैजैवल = जैजवल.

( १०० ) ( १ ) रामेस्वरभटी द । ग० । दे । वो १

( १०१ ) स्वस्ति श्री सकु ११९८ धाता संवत्सरे ।

( १०२ ) असवन सुध १० सुक्रे कायतु[२०७] संग[२०८]

( १०३ ) हलीककीएं[२०९]

( १०४ ) द (।ग) १ तथाच[२१०] पुवुष[२११] जगुदेॐ ताहे[२१२] श्री—

( १०५ ) विठलदेवरायासि वर्षप्रतिवदीं[२१३]

( १०६ ) देआ पुष्पासमाला[२१४] १ मापेता[२१५]

( १०७ ) दत्त ग १ सोनेडा+कर[२१६] महाजना

( १०८ ) ग १ पारैकार[२१७] राकणे[२१८] द । १ एकु[२१९]—

( १०९ ) कुंभ विष्णुभटी ग १ रसमाळि[२२०]

---

२०७ कायस्थ = कायथ = कायत = कायतु

२०८ " सग " हें व्यक्तीचें नांव आहे.

२०९ हलीकाकि = शेतकरी. ( एकवचनी तृतीया ) हलीककीएं

२१० तसें च.

२११ गांवाचें नांव असावें. जगद्देव=जगुदेव.

२१२ अर्थ कळत नाहीं.

२१३ प्रतिपदीं=प्रतिवदीं.

२१४ पुष्पास नांवाच्या फुलांची माळा.

२१५ व्यक्तीचें नांव.

२१६ " सोनेडा+ " हें गांवाचें नांव. तेथील राहणारा जो तो सोनेडा+कर.

२१७ पारै गांवचा रहाणारा तो पारैकार.

२१८ राकण्णा = राकणा = ( एकवचनी तृतीया ) राकणें.

२१९ ग्रामनाम.

२२० ग्रामनाम.

( ११० ) वींवकें[221] ग १ मुद्रहस्त[222] सेणवै[223]--

( १११ ) आ ग १ विपांतिता[224] ग १ भैरव —

( ११२ ) देव चांगप्रज्ञा[225] ग १ । एवंम[226] १० ॥

( ११३ ) ७[227] आचंद्रार्क देया ॥

( ११४ ) १ पुरुषोत्तम पंडितीं[228] विनायकी[229] वीरा--

( ११५ ) इया[230] मालो दत्ता दे । ग १ आचं--

( ११६ ) द्रार्क देआ दाम[231] १ आहे[232] फुलं

( ११७ ) १ मलीमालेआ[233] सहदेव

---

२२१ पुरुषनाम.

२२२ ग्रामनाम. हा शब्द १४ व्या ओळीवर आला आहे.

२२३ " सेणवै " ची एकवचनी तृतीया " सेणवैआ. " इतरत्र " सेणवैएं " असें रूप आलें आहे.

२२४ सहज.

२२५ पुरुषनाम.

२२६ एकंदर.

२२७ ७ ही खूण टींपेची आहे.

२२८ हें नांव ८० व्या ओळींत आलें आहे.

२२९ स्त्रीचें नांव. विनायकाचें स्त्रीलिंग विनायकी

२३० वीर + आर्यी = वीरार्यी = वीरायी = वीराई. " आर्य " चें स्त्रीलिंग आर्या असें पाणिनीय संस्कृतांत होतें. परंतु " आर्यी " असें हि एक रूप असावें; व तें संस्कृतांत लुप्त होऊन प्राकृतांत म्हणजे विशेषतः जुन्या मध्ययुगीन मराठींत राहिलें. वीराइया ( एकवचनी तृतीया )

२३१ द्रम्म = दाम

२३२ हा शब्द ८१ व्या ओळींत आला आहे.

२३३ ११७।११८।११९ ह्या तीन ओळींतल्या शब्दांचा अर्थ लागत नाहीं.

( ११८ ) लषुमीदेवाचीआ + [२३४] सीरे

( ११९ ) उघाडआ द । ग १ दे से [२३५] वौ १

( १२० ) तथाचा आम्ययक [२३६] वेसु [२३७] —

( १२१ ) वाळ ॥ द । ग १ दे॰ से

( १२२ ) वौ १

( १२३ ) १ केतार [२३८] प्रस [२३९] विठलदासें द ।

( १२४ ) मालीमालासि [२४०] ग १ दांडा १

( १२५ ) १ वैजाहसिं [२४१] श्रीविठला रा-

( १२५ ) यासी आचंद्रार्क व—

( १२६ ) लावेआ [२४२] दत्त ग १ माले

( १२७ ) औ [२४३]

---

२३४ अक्षर पुसटून गेलें आहे.

२३५ सेवंती.

२३६ वैदिक तऱ्हेवर ' च ' चा उच्चार ' चा ' केला आहे.

२३७ ग्रामनाम

२३८ ग्रामनाम

२३९ अर्थ लागत नाहीं.

२४० पुरुषाचें नांव. " मालीमालासि " हें " मालीमाल " याचें चतुर्थीचें एकवचनी रूप.

२४१ " वैजाहस " पुरुषाचें नांव; ( एकवचनी तृतीया ) वैजाहसिं

२४२ हा शब्द तिसऱ्या ओळींत " वालावेआ " असा आला आहे. तो मी तेथें " चालावेआ " असा वाचला आहे. तेथले हें माझें वाचणें जर बराबर असेल तर येथें हि " चलावेआ " असें वाचणें जरूर आहे. परंतु दोन्ही स्थलीं ' वा ' आणि ' व ' हीं अक्षरें स्पष्ट आहेत. शिलालेखांत ' च ' कधीं कधीं ' व ' सारखा दिसतो, हें खरें आहे. परंतु, येथें दोन्ही ठिकाणीं शंकेला जागा नाहीं. ' व ' स्पष्ट दिसत आहे.

२४३ ह्या पुढील अक्षरें पुसून गेलीं आहेत.

# रकाना चौथा

( १२८ ) १ जाठैमासुत[२४४] राघा ग २ दत्त पैकु

( १२९ ) १ वाखें[२४५] नायकें द । ग २ दे० दां २

( १३० ) १ गंगाधर नायकें द । ग १ दे । दां १

( १३१ ) १ अंघोलि[२४६] यत्नवेसि द । ग २ दे । दां २

( १३२ ) १ पैठणें[२४७] चांगदेवें द । ग १ दे । दां १

( १३३ ) १ त्रिवुरुस[२४८] गोविंदें द । ग १ दे । दां १

( १३४ ) १ एकुंठ[२४९] पुलन[२५०] द । ग १ दे । दां १

( १३५ ) १ तंवरखेड[२५१] भाहूदैं[२५२] द । ग १ दे । दां १

( १३६ ) १ ताटांवाअ[२५३] लोलअदेव ( द । ) ग २ दे । दां ३

---

२४४ जाठैमा हें स्त्रीचें नांव. जाठो + अम्मा ( आवा ) = जाठैमा. तिचा मुलगा जो तो जाठैमासुत.

२४५ पुरुषनाम. वक्ष = वख्ख = वाख = वाखें (एकवचनी तृतीया)

२४६ हा शब्द ६९ व्या ओळींत आला आहे.

२४७ हें नांव मागें अनेक वेळां आलें आहे.

२४८ ग्रामनाम.

२४९ ग्रामनाम.

२५० " पुल " ची एकवचनी तृतीया.

२५१ ग्रामनाम.

२५२ भाहूदेव = भाहूदे = भाहूदैं (एकवचनी तृतीया). " भाहूदें " अशी वस्तुतः एकवचनी तृतीया व्हावयाची. एक मात्रा जास्त दिली आहे. बहुमानार्थी आहे.

२५३ ग्रामनाम.

( १३७ ) १ कोकणा माहादेवें द । ग १ दे । दां १
( १३८ ) १ महादेवभटी द । ग १ दे । दां १
( १३९ ) १ श्रीपतिदण्णायकें द । ग १ दे । फुलें १००
( १४० ) भावसंवत्सरे आषाड मासे + + ` [२५४] ड
( १४१ ) रूपदेवसुत तारदेवें दत्त ग १॥ दे । दां १
( १४२ ) पिंपरवंडि[२५५] विद्वत[२५६] पंसत
( १४३ ) १ पुरुषोत्तम नायकें द । ग १॥ दे । दां १
( १४४ ) १ वैराग दांठीनायकें ( द । ) ग १॥ दे । दां १
( १४५ ) १ तथा चा दे + देवें[२५७] द । ग १। दे । दां १
( १४६ ) १ वीकटकौरवा[२५८] द । ग १ फु २२
( १४७ ) १ मालिमालो[२५९] दत्त येकु ॥ करणिक[२६०]
( १४८ ) १ गिरिपंडितीं[२६१] पदुवाईया[२६२] ग १ दे । दां १
( १४९ ) १ रामंणदेवा[२६३] ढतगीदेवें[२६४] द । ग १ दे । दां १

---

२५४ येथें ' खे ' असें अक्षर असावें. ' खेड ' हें ज्याचें अंत्य अक्षरद्वय आहे असें ग्रामनाम.

२५५ ग्रामनाम.

२५६ विद्वत्सभा.

२५७ एक अक्षर गेलें आहे.

२५८ पुरुषनाम, एकवचनी तृतीया.

२५९ हें नांव ११७ व्या ओळींत आलें आहे.

२६० श्रीकरणाधिपाच्या कचेरींतील कारकून. हें आडनांव प्रभू लोकांत अद्यापि हि आहे.

२६१ बहुमानार्थी तृतीया.

२६२ एकवचनी तृतीया.

२६३ राम + अण्णा = रामण्णा = रामंणा. रामंणा + देव = रामंणदेव. एकवचनी चतुर्थी रामंणदेवा.

२६४ पुरुषनाम.

( १५० ) १ विजापु ( र )[265] एकदेवें द । ग १ दे । दां १

( १५१ ) १ श्रीपतिदें णायकें द । ग २ दे । फु २००

( १५२ ) १ बागरसै[266] करणीक[267] द । ग १ दे । दां १

( १५३ ) १ + कुतु[268] पंडितकें[269] द । ग १ दे । दां १

( १५४ ) १ विजापुर बळिदेवपंडितें ग १ दे । दां १

( १५५ ) १ तो + + +[270] पंडितीं द । ग १ दे । दां १

( १५६ ) १ गरजमाच[271] णिवासिं[272] गी[273] द । ग १ दे । दां १

( १५७ ) १ कोंकणा[274] गणपतिभटी ( द । ) ग १ दे । दां १

( १५८ ) १ केषदें[275] पंडितें द । ग १ दे । दां १

---

२६५ हें अक्षर पुसून गेलें आहे.

२६६ १७ व्या ओळींत " बामरसाचा " असा शब्द आला आहे. येथें बागरसै असा शब्द आहे. कदाचित् ' म ' ' ग ' सारखा दिसून पाठ बामरस असा वाचला जाण्याचा संभव आहे. बागरसै=बागरसाचा.

२६७ करणिक = कुळकरणी. शक ११९९ त कुळकरण्याला करणिक ह्मणत असावे.

२६८ अक्षर पुसून गेलें आहे.

२६९ पंडित याचें ऱ्हस्वत्वदर्शक रूप पंडितक.

२७० अक्षरें पुसून गेलीं आहेत.

२७१ गरजमाच हें गांवाचें नांव. डोंगराच्या माचीवर वसलेलें ह्मणून गरजमाच.

२७२ रहाणाऱ्यानीं.

२७३ ' गी ' हा कोण्या तरी शब्दाचा संक्षेप आहे.

२७४ कोंकणचा रहाणारा तो कोंकणा. ह्या शब्दाची एकवचनी तृतीया कोंकणा अशीच केली आहे.

२७५ केशवदेव = केसवदे = केसदे = केषदे = ( एकवचनी तृतीया ) केषदें.

( १५९ ) १ मतुब[276] नायकें द । ग १ दे । दां १

( १६० ) १ पडिवार[277] कुद्रत्रिद्रकें[278] द । ग १ ॥ दे । फु १००

( १६१ ) १ माहूदेवो विलकिलपुर[279] द । ग १। दे । दां १ वौ १

( १६२ ) १ आवोलि[280] विरमदेवें द । ग १ दे । दां १

( १६३ ) १ नारण[281] नायकें द । ग १ दे । दां १

( १६४ ) १ बाप्ररसा[282] सेणवै जादेएं[283] ग १ दे । दां १०

( १६५ ) १ विजापुर ठामिदेव[284] पंडितें ग १ दे । दां १

( १६६ ) १ दोर्घीवा[285] माहादेवें द । ग १ दे । वौ १

( १६७ ) १ वाटीवा[286] राजोमिस्पांउ[287] द । ग १ दे । दां १

---

२७६ पुरुषनाम.

२७७ ग्रामनाम.

२७८ बहुशः तेलगु नांव असावें.

२७९ येथें गांवाचें नांव पुरुषाच्या नांवापुढें आलें आहे.

२८० ग्रामनाम.

२८१ ९६ व्या ओळींत " नारणना " असा शब्द आला आहे. तो " नारणनायक " याचा संक्षेप आहे. नारायण याचें ऱ्हस्व रूप नार. नार + अण्णा = नारण्णा = नारण्ण = नारण.

२८२ हें ग्रामनाम १९२ व्या ओळीवर आलें आहे.

२८३ जातदेव = जाअदेअ = जादे = ( एकवचनी तृतीया ) जादेएं.

२८४ स्थामि = ठामि.

२८५ ग्रामनाम.

२८६ ग्रामनाम.

२८७ पुरुषनाम.

( १६८ ) १ गाईतीआई[२८८] चेपिण्णदेउ[२८९] ठाकु[२९०]--
( १६९ ) क्रामुल्हाहू द । ग १ तस्य दांड
( १७० ) देवा ॥ वरानाफ[२९१] ॥ १

---

२८८ ग्रामनाम.

२८९ पुरुषनाम.

२९० पुरुषनाम.

२९१ शब्दाचा अर्थ संदिग्ध.

## रकाना पांचवा



( १७१ ) १ जाठौआसुत[२९२] मैना[२९३] दत्त पैकु

( १७२ ) १ रेहूं[२९४] पोरेसकें[२९५] द । ग २ दे । दां २

( १७३ ) १ कोंकणा महुसुदेव[२९६] द । ग १ दे । दां १

( १७४ ) १ लेवूगीदासी[२९७] दत्त ग १ दे । दां १

( १७५ ) १ कानौआ[२९८] दत्त ग १ देय दां १

( १७६ ) १ महदेवभटि ग १ दे दां १

( १७७ ) १ शोर्कितनरा[२९९] महांजनी[३००] १ दे । दां १

( १७८ ) १ कालिंद[३०१] शास्त्रतमालोन[३०२] ग १ दे । दां १

( १७९ ) १ कोंकण स्तुंद्रस[३०३] द । ग १ दे । दां १

( १८० ) १ माहादेव लघुबाया[३०४] ग २ फु ४० बौ २

---

२९२ जाठौआ इचा मुलगा.

२९३ पुरुषनाम.

२९४ पुरुषनाम.

२९५ आडनांव.

२९६ पुरुषनाम.

२९७ स्त्रीनाम.

२९८ पुरुषनाम. कृष्ण = कान = कानोबा = कानौआ.

२९९ पुरुषनाम.

३०० एकप्रकारचा गद्यान.

३०१ कलिंद गांवचा रहाणारा तो कालिंद.

३०२ “ मालोन ” ही “ माळो ” ची एकवचनी तृतीया.

३०३ पुरुषनाम.

३०४ लघुबा = लखुबा = लखुबाया ( एकवचनी तृतीया. )

( १८१ ) १ कादप[305] आपंणे[306] द । ग दे । दां १

( १८२ ) १ महदेव[307] पंडितें द । ग १ दे । दां १

( १८३ ) १ वोडवंग[308] भणगें[309] ग १ दे । दां १

( १८४ ) १ मुऱ्हदे[310] लपुवा ग २ दे । दां १ तु वौ १

( १८५ ) १ ह्मसाल[311] लपुमीए[312] द । ग १ दे । दां १

( १८६ ) १ ईस्वर स्व+भि[313] द । ग १ दे । दां १

( १८७ ) १ भिवुदेव[314] पंडिति द । ग १ दे । दां १

( १८८ ) १ कौलिरअें[315] द । ग १ दे । वौ १ फु ९०

( १८९ ) १ मौलि[316] वेसुनायकें द । ग १ दे । दां १

( १९० ) १ वागुरसाचा सेणवै पिंतें ग १ दे । दां १

---

३०५ ग्रामनाम.

३०६ आप + अण्णा = आपण्णा = आपण्णें = आपंणें ( ए. तृ. )

३०७ पुरुषनाम " माहादेव " ह्या शब्दाहून निराळा ' महदेव ' शब्द आहे.

३०८ ग्रामनाम.

३०९ आडनांव. हें आडनांव अद्यापहि आहे.

३१० पुरुषनाम.

३११ ग्रामनाम.

३१२ लक्ष्मी = लषुमी = लषुमीए ( ए. तृ. ) पुरुषनाम.

३१३ एक अक्षर पुसटलें आहे.

३१४ भिक्षुदेव = भिकुदेव = भिऊदेव = भिवुदेव.

३१५ कालरक = कालरअ = कालरअें ( काळर गांवचा रहाणाऱ्यानें ).

३१६ ग्रामनाम.

( १९१ ) १ पुजारिणीदासें द । ग १ दे । दां १

( १९२ ) १ देअरपेटि द । ग १ दे । फुलें १००

( १९३ ) १ अंदरूपेया[318] द । ग १ दे । फुलें १००

( १९४ ) १ मैरेया[319] वीसास्तू[320] द । ग १ दे । तु वौ १

( १९५ ) १ युग्रचाति[321] मंबदि[322] द । ग १ दे । दांडा १

( १९६ ) १ दलवै[323] झिंबदेवें[324] दत्त ग १ दे । दांडा १

( १९७ ) १ भिंगीआर[325] हत्तीदेवें[326] द । ग १ तु वौ २

( १९८ ) १ धातासंवत्सरे[327] पोष वदि ३० के--

( १९९ ) शवु[328] पंडितिं द । ग १॥ सिं १ दे । दां १

( २०० ) १ मंले[329] ओपास्तीदेवें[330] फुल १

---

३१७ पुरुषनाम.

३१८ पुरुषनाम.

३१९ मैरेय गांवांतील रहाणारा.

३२० पुरुषनाम.

३२१ ग्रामनाम.

३२२ पुरुषनाम.

३२३ हा शब्द ह्या एकाच स्थळीं आला आहे. दळपति = दलवइ = दलवै = सैन्याचा अधिकारी.

३२४ पुरुषनाम.

३२५ ग्रामनाम.

३२६ हस्तिदेव = हत्तीदेव

३२७ शक ११९८.

३२८ 'केशव' याचें शक ११९८ तील उकारान्त रूप 'केशवु'.

३२९ ग्रामनाम.

३३० उपास्तिदेव = ओपास्तिदेव.

( २०१ ) १ स्वस्ति श्री सकु ११९८ ध[331] ( । ) ता अषेढ[332] सुध ११
( २०२ ) भौमे दिवि लखुबाई[333] दत्त ग
( २०३ ) १। तुलसी वौसर १
( २०४ १ सेतुगुडेन[334] द । ग १ दे । दांड १
( २०५ ) १ मालिमालोवा[335] पैकु[336] १
( २०६ ) १ रागभीज्यनी[337] नारायण श्री कु—
( २०७ ) वरदेवनायकें[338] द । ग १ दंडा १
( २०८ ) १ श्रीसकु ११९८ वर्षे आषाड[339] बहुल ११ गु—
( २०९ ) रौ श्रीविठलराया श्रीपतें[340] द । ग १ फुल १
( २१० ) १ लखनायकें[341] सेंवति २९ तुलसी वौसर १
( २११ ) दत्त ग १ द्रोण १।।। मालि[342]
( २१२ ) आचंद्रार्क ईस्वर संवत्सरे का—
( २१३ ) र्तीक सुधी १२
( २१४ ) लाहीलिटिं[343] द—
( २१५ ) त्त ग १ दे । दां १

---

३३१ काना काढलेला नाहीं.
३३२ आषाढ असें पाहिजे.
३३३ तृतीया केली नाहीं.
३३४ पुरुषनाम. तृतीया.
३३५ ' मालिमालो ' ची तृतीया मालिमालोआ = मालिमालोवा.
३३६ पैकु = द्रव्य. हें एक लहानसें नवें खातें आहे.
३३७ ग्रामनाम.
३३८ पुरुषनाम.
३३९ २०१ ओळीवर ढ आहे.
३४० मागें अनेक वेळा वर्गणी देणारा श्रीपतिदेव नायक.
३४१ लक्ष्मण = लाखण = लख = लखु.
३४२ " मालिमालो " बद्दल संक्षेप.
३४३ पुरुषनाम.

# रकाना सहावा

(२१६) १ सेंडा[३४४] सेट्ठया[३४५] दत्त पैकु

(२१७) १ सांगाणदेव[३४६] ग १ देयदांडा १

(२१८) १ श्रीपतिदें णायकें द । ग २॥ दे । फुलें २५०

(२१९) १ गंगाधर नायकें द । ग ४ दे । फु ४ (००)

(२२०) १ कोंकणें विष्णुभटें द । ग १ दे । दां १

(२२१) १ बामिदेवें[३४७] द । ग १॥ दे । दां १ ह वौ १

(२२२) १ मांईआं[३४८] द । ग १ दे । दां १

(२२३) १ हेआंभपेदि[३४९] द । ग १ दे । दां १

(२२४) १ मेहकर[३५०] नागणें द । ग १॥ दे । दां० फु १०

(२२५) १ ब्रह्मसमुद्र[३५१]लिंगैयें[३५२] ग १ दे । दां १

(२२६) १ तथा बामंणें द । ग १ दे । दां १

(२२७) १ बामरसा बीकरुकें द । ग १ दे । दां १

---

३४४ आडनांव. प्रस्तुतकालीन शेंडे हें आडनांव ह्या शब्दाचेंच एकरूप आहे.

३४५ श्रेष्ठी = सेट्ठी = सेट्ठ = सेट्ठे (बहुमानार्थी) = सेट्ठया (तृतीया).

३४६ पुरुषनाम.

३४७ ब्रह्मी = बम्मी = बामी = बामि.

३४८ एकवचनी तृतीया.

३४९ पुरुषनाम.

३५० ग्रामनाम.

३५१ ग्रामनाम.

३५२ पुरुषनाम.

(२२८) १ वालेषाद्रि केतुगौडे द। ग १ दे। दां १

(२२९) १ आंघोलि बोलें द। ग १ दे। दां १

(२३०) १ पेत्त ++ कुकें [३५३] द। ग १ दे। दां १

(२३१) १ भमतिज २ [३५४] द। ग २ दे। दां २

(२३२) १ भावसंवत्सरे [३५५] चैत्र सुदि १९ रवौ

(२३३) १ उभेमार्गी [३५६] तिंगवेदेंव द। ग १ दे। दां १

(२३४) १ वणखेड महादेवपंडितिं द। ग १ दे। दां १

(२३५) १ भावसंवत्सरे [३५७] आस्विन सुदि रवौ

(२३६) मनुर्ष्यंनायकें [३५८] द। ग १ दे। दांडा १

(२३७) १ साहोये [३५९] फुलचौडभटिं द। ग १ दे। दां १

(२३८) १ श्रीपतिदेवीं [३६०] ग १ दे। दां १ आचंद्रार्क

(२३९) १ विष्णुदत्त [३६१] ग १ दे। तु वौ १

(२४०) १ हरिचंद्रे द। ग २ फुल ौ १

---

३५३ दोन अक्षरें गेलीं आहेत.

३५४ २ या आंकड्याचा अर्थ दोन भमतिज नांवाचे मनुष्य.

३५५ शक ११९६

३५६ उभेमार्ग गांवचें रहाणारे. उभात्र या नांवाचा गांव हर्णेजवळ आहे.

३५७ शक ११९६.

३५८ पुरुषनाम.

३५९ साहो गांवचा रहाणारा (एकवचनी तृतीया) साहोए, साहोये.

३६० बहुमानार्थी तृतीया. श्रीपतिदें असें इतरत्र रूप आहे.

३६१ तृतीया न करतां समास केला आहे.

( २४१ ) १ दुंता[362] संवत्सरे कार्तिक सु १९ सुक्रे सु—
( २४२ ) लिमकरें[363] देवमालियें त ( न[364] ) य दत्त
( २४३ ) ग १ देय दांडा १ आचंद्रार्क
( २४४ ) १ मार्ग वदि ७ तपो[365] काडबांग[366] १ देव
( २४५ ) णे दत्त ग १ सोत[367] वौ २ झांव—
( २४६ ) मुकजेकारे[368] लषण्मिदेवें[369] द । ग १ दे । फु ३०
( २४७ ) १ मरवाडी[370] बादेवंणे[371] द । ग० ॥
( २४८ ) १ कुक[372] सीवा वे[373] ॥ १ आजन्मांतिके
( २४९ ) १ माली सेतेआ दत्ता ॥
( २५० ) १ बव[373] धाता संवत्सरे कार्तिक सुध १ भौमे

---

३६२ धाता, शक ११९८.

३६३ सुलिम गांवचा राहणारा तो सुलिमकर.

३६४ ' न ' खोदावयाचा राहिला आहे.

३६५ तपो काडबांग हें गांवाचें नांव.

३६६ एकदेव+अण्णा=एकदेवण्णा=एकदेवण=एकदेवणें ( एकवचनी तृतीया ) = १ देवंणें.

३६७ पुष्पनाम.

३६८ झांवमुकजे गांवचा रहाणारा.

३६९ लक्ष्माणि = लषण्णि = लखण्मि.

३७० ग्रामनाम.

३७१ बादेव + अण्णा = बादेवण्णा = बादेवण्ण = बादेवंणें ( ए. तृ. ).

३७२ अर्थ लागत नाहीं.

३७३ ववकरणे.

( २५१ ) मेजक्षसिजोषावा[३७४] देवमालिसेटिआ ग १ म १ दे-

( २५२ ) य दांडा १ पुत्रपौत्रीकीं आचंद्रार्क

[ २५३ ] १ कुमरपदु[३७५] मैयणें तेणें दत्त ग १॥ देय दां.

( २५४ )[३७६]

[ २५५ ] १ सोमनाथें द । ग १ दे । फुलें

[ २५६ ] १ लितिलें द । ग १ दे । दां १

---

३७४ ग्रामनाम.

३७५ ग्रामनाम.

३७६ ही सबंद ओळ लागली नाहीं.

## श्काना सातवा

( २५७ ) नामासुतु[३७७] हमेआ[३७८] दत्त पैकु

( २५८ १ कतवरमें[३७९] गणपतिनायकें द । ग १ दे । दां १

( २५९ ) १ विजापुर पुरुषोत्तमें द । ग १ दे । दां १

( २६० ) १ दामोधर पंडितें द । ग १ दे । दां १

( २६१ ) १ लांड[३८०] हरीदेवें द । ग १ दे । दां १

( २६२ ) १ नाराषितट[३८१] कालुगावें कारातें कोर्त

( २६३ र दोनिं देमा सुवेता[३८२] दत्त ग० होण १

( २६४ ) १ धाता संवत्सरे कार्तिक सु १५ सुक्र

( २६५ ) वदेस समंध[३८३] सीमुषेण[३८४] केसवें द । ग दे । दां १

( २६६ ) १ चौसाठिणु[३८५] ताडाति[३८६] दत्त वृत्ति २ सी + + + +

---

३७७ हा वर्गणिचें खातें ठेवणारा एक गृहस्थ.

३७८ पुरुषनाम.

३७९ कतवरम गांवांत रहाणारा तो कवतरम. ( ए. तृ. ) कतवरमें.

३८० लाट = लाड. लाट देशांत रहाणारा तो लाड.

३८१ नाराष नदीच्या तटावर असणाऱ्या कालुगांवांत रहाणाऱ्यानें.

३८२ ' कारातें ' पासून ' सुवता ' पर्यंत व्यक्तीचें वर्णनात्मक नाम.

३८३ समंध = विषय, प्रांत.

३८४ वेदस प्रांतांतील सीमुषेण गांव.

३८५ ग्रामनाम.

३८६ पुरुषनाम.

( २६७ ) १ माधव आमंणं[387] दत्त ग १ देय दां १

( २६८ ) १ तरंतु[388] मैअ।णसे[389] द । ग १ दे । दां० फुलें ३०

( २६९ ) १ श्रीपतिद नायकें द । ग १॥ फुलें २५०

( २७० ) १ ममंती[390] द । ग १ दे । दां १

( २७१ ) १ देईवनी[391] सोवनी[392] वैजुगीदेव[393] मालो[394] लषुमण द । ग १

( २७२ ) सांदेआ[395] तुलासि वौसरु १ आचंद्रार्क ॥

( २७३ ) १ फुगमु[396] कान्हो[397] राई आपा होण दे । दा ४० फु २५ वौ १

( २७४ ) १ भाव संवत्सरे वैसाख वदि ११ सुक्रे

( २७५ ) वेंकुण[398] मालो कानड द । ग १ देय दांडा १

---

३८७ आम्र = अण्णा = आम्रण्णा = आमण्णा = आमंण. तृतीया केली नाहीं.

३८८ ग्रामनाम.

३८९ पुरुषनाम ( ए. तृ. ).

३९० समास.

३९१ ग्रामनाम.

३९२ आडनांव.

३९३ पुरुषनाम.

३९४ पुरुषनाम.

३९५ ‘ सां ’ च्या पाठीमागें कांहीं तरी अक्षर असावें

३९६ ग्रामनाम.

३९७ कान्हो राईआपा हें कानडी नांव आहे.

३९८ वेंकु + अण्णा = वेंकुण्णा = वेंकुण.

( २७६ ) १ श्रीधरदासी सदेसेदसी[399] द । ग १ दे । दांडा
१ वौ २

( २७७ ) १ देईपदी[400] द । ग १ दे । दां १ हेम—

[ २७८ ] १ विलावाहूसुत[401] म्हालैयापा[402] वौ १

( २७९ )१ ह्मैसालेसरा[403] श्रीतिलखलभटी ग १ दे । दां १ आवांग

[ २८० ] १ सेंदुकार्ती[404] पेईदेव पंडितें द । ग १ ++[405]

( २८१ ) ती २९ तुलसी वौसरु १ आचंद्रा—

[ २८२ ] के द[406] ॥ धाता संवत्सरे मालिवासे ह देवमालि—

[ २८३ ] णिविष्टा दत्त ग १ देय दांडा १ आचंद्रार्क

( २८४ ) १ माली[407] लषमणज संवंतासुत पेईदेवे द । ग १ दे । दां १

[ २८५ ] [408]

---

३९९ स्त्रीनाम.

४०० पुरुषनाम.

४०१ हेमविलवाहूसुत = हेमविलवाहूचा मुलगा.

४०२ म्हालेय+आपा = म्हालेयापा.

४०३ ह्मैसालेश्वर = ह्मैसालेसर = ह्मैसालेसरा ( ए. तृ. )

४०४ ग्रामनाम.

४०५ ' सेंव ' बद्दल या फुल्या आहेत. अक्षरें पुसून गेलीं आहेत. पुढल्या ओळींतील ' ती ' सुद्धां " सेंवती " असा शब्द होतो.

४०६ दे हा देआचा संक्षेप.

४०७ मालि लक्ष्मणसुत सवता; त्याचा मुलगा पेईदेव.

४०८ ओळ लागली नाहीं.

[ २८६ ] [409]

[ २८७ ] [410] तुलसी वौ १ आचंद्रार्क

[ २८८ ] १ माहादेवें द । ग २ दे । दां २ आचंद्रार्क

( २८९ ) १ दोंखठेकारे[411] लटि—

( २९० ) देवें द । ग १ दे । फु २०

( २९१ ) १ देमो[412]दत्त [413]

---

४०९ ओळ लागली नाहीं.

४१० ओळीचा पूर्वभाग लागला नाहीं.

४११ दोंखटे गांवचा रहाणारा.

४१२ देमो हें पुरुषाचें नांव.

४१३ येथें गद्यान वगैरे चालीप्रमाणें मजकूर खोदावयाचा राहिला आहे.

[414]

# रकाना आठवा

( २९२ ) १ माधव[415] मवाहआ

( २९३ )  दत्त ग १ देआ वौ ?

( २९४ ) १ यादो गणसेण[416] द ।

( २९५ ) ग १ मालि गधाण[417]

( २९६ ) ग १ मं० । आचंद्रा-

( २९७ ) के ॥ देय दांडा १

( २९८ ) एल्हुबाइआ[418] हिमो[419]

---

४१४ हा रकाना फार बारीक अक्षरांनीं सातव्या रकान्याच्या कोपऱ्यावर खोदला आहे.

४१५ माधव मवाहआ यानें.

४१६ गणसेण = गणसेन.

४१७ गधाण = गद्यान

४१८ " एल्हुबाई " ची एकवचनी तृतीया.

४१९ पुढील शब्द फुटून गेले आहेत.

९ येणें प्रमाणें ह्या शिलालेखांत ३ ओळी आहेत. ह्याला चौऱ्याय-शीची शिला किंवा दगड वारकरी लोक ह्मणतात. कां ह्मणून शोध करतां, असें कळतें कीं, ह्या शिळेवर वारकऱ्यानें पाठ घासली असता तो चौऱ्यायशीच्या फेऱ्यांतून ह्मणजे चौऱ्यायशी लक्ष योनींत जन्म घेण्याच्या खटाटोपांतून मुक्त होतो. परंतु, ही शिळा अनेक शतकें विठोबाच्या आवारांतील एका कोपऱ्यांत लोळत पडली होती; पुढें गेल्या पांचपन्नास वर्षांपूर्वीं कोण्या द्रव्यदृष्टि बडव्यानें तिला प्रस्तुत स्थळीं आणून तिच्या वर एक देवीची मूर्ति स्थापन केली, त्या मूर्तीला चौऱ्यायशीची मूर्ति ह्मणून नांव दिलें, आणि जो कोणी मूर्तिची पूजा करील व शिळेवर पाठ घाशील त्याचा चौऱ्यायशीचा फेरा चुकेल अशी अफवा उठविली ती भाविक वारकऱ्यांना फारच पसंत पडली. हें एक कारण झालें. दुसरें एक कारण असें देतात कीं, ह्या शिलालेखाच्या प्रारंभीं शकाचा जो ११९९ चा आंकडा आहे त्यांतील ९९ अनभ्यस्त वाचकाला ८४ सारखे दिसतात. पांचाचा आंकडा अर्धवट उमटल्यामुळें तो चारा सारखा दिसतो व १२ व्या शतकांतील नवाचा आकडा प्रस्तुतकालीन अनभ्यस्त वाचकाला सध्याच्या आठासारखा दिसतो. त्यामुळें शक ११८४ ची शिळा अथवा संक्षेपानें चौऱ्यायशीची शिळा असें नांव नांव प्रचलित झालें. ह्या कारणांत बराच सयुक्तिकपणा दिसतो. तिसरें एक कारण असें देतात कीं, ह्या शिळेवर प्रथम चौऱ्यायशी नामांकित वर्गणीदारांचीं नांवें खोदिलीं गेलीं. त्यावरून चौऱ्यायशी पुण्य पुरुषांची शिळा अथवा संक्षेपानें चौऱ्यायशीची शिळा अशी प्रख्याति ह्या दगडाची झाली. हेंहि कारण दुसऱ्या इतकेंच, कदाचित् त्याहूनहि जास्त सयुक्तिक आहे. परंतु आठी खात्यांतील एकंदर नांवें पहातां तीं चौऱ्यायशीच्या दुपटीहूनहि जास्त आहेत. तेव्हां हेंहि कारण पूर्णपणें सयुक्तिक दिसत नाहीं. ह्यांपैकीं सगळींहि कारणें खोटीं असलीं, तरी सध्यां ह्या दगडाला चौऱ्याशीचा दगड ह्मणतात, हें मात्र खरें आहे व ह्याच्या उत्पन्नावर एका ब्राह्मणाचें पोट चालतें हें निर्विवाद आहे. शिळेवर लाखो लोक पाठी घाशीत असल्यामुळें व वरल्या देवीला

धूप, दीप, नैवेद्यहि समर्पण होत असल्यामुळें, घामाचें व तेलाचें बोट बोट कीट मी गेलों त्यावेळेस चढलें होतें. शिवाय उजव्या व डाव्या अशा दोन्ही बाजूला अर्धी अर्धी वीत शिळा भिंतींत गाडून गेली होती; आणि माथ्याला व पायथ्याला शेंदराचा व तेलाचा भक्कम गिलावा झाला होता. भगवानलाल इंद्राजीनें लेख पाहिला तो ह्या अशा स्थितींत पाहिला. भगवानलालाच्या पुढें दोघातिघांनीं ह्याचे फोटो घेतले, ते हि ह्या अशाच स्थितींत. ह्या शिळेचा एक फोटो बडवे व बेणारी यांच्या खटल्यांत कोर्टापुढें पुराव्या करितां नेला होता. समजूत अशी कीं, ह्यांत बडव्याच्या किंवा बेणाऱ्यांच्या पूर्वजाचें नांव असावें. परंतु, कोर्टाला, वकिलांना किंवा फोटो काढणाऱ्यांना लेखांतील अक्षरांचा बोध झाला नसल्यामुळें, लेखाचा कांहींच उपयोग झाला नाहीं. लेखांतील कांहीं नांवें बडव्यांच्या व बेणाऱ्यांच्या पूर्वजांचीं असूं शकतील. परंतु ह्या दोघांच्याहि वंशावळी सात आठशें वर्षांच्या सांपडल्या पाहिजेत. आख्यायिका अशी आहे कीं, बडवे व बेणारी दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर आले. कारण दुर्गादेवीच्या दुष्काळानंतरचे कागदपत्र ह्या लोकांजवळ आहेत; आधींचे नाहींत. पण ह्यावर अशी एक शंका येते कीं, दुर्गादेवीच्या दुष्काळापूर्वीं ह्या देवळांत बडवे व बेणारी असलेच पाहिजेत. बडवे व बेणारी हीं दोन्हीं नांवें सात आठशें वर्षांचीं जुनीं दिसतात. बडवे हा शब्द बडवै, बडवइ, बडपति, अशा परंपरेनें बडपति ह्या शब्दापासून निघालेला दिसतो. बड ह्या शब्दाचा अर्थ शालिवाहनाच्या बाराव्या शतकांत स्तुति असा होता. ह्याच बड धातूपासून बडबड, बाड, वगैरे शब्द निघाले आहेत. एवंच बडवइ, बडवै, बडवे ह्मणजे स्तुतिपाठक होत. त्याचप्रमाणें बेणारी हा शब्द वेणुहारी, वेण्हारी, बेणारी, ह्या परंपरेनें वेणुहारी ह्या शब्दापासून उपजलेला आहे. असे हे दोन्ही शब्द फार जुने आहेत. अर्थात्, ह्या आडनांवाचे लोकहि तितकेच जुने कां नसावेत हें सांगणें मुष्किलीचें आहे.

६ आतांपर्यंत सांपडलेल्या मराठी लेखांत,—पोथ्या, कागद, ताम्रपट व शिलालेख—ह्यांत हा लेख बराच जुना आहे. ह्याहून जुने असे मराठी शिलालेख एक दोन आहेत. ते मी लवकरच प्रसिद्ध करणार आहे; व नंतर ह्या सर्वांच्या भाषेसंबंधानें संकलित असें एक टिपण करावें असा बेत आहे. तोंपर्यंत मला जीं अक्षरें लागलीं नाहींत तीं दुसऱ्या कोणाला लागतील; कित्येक स्थलीं मी शद्बांचे जे अर्थ केले आहेत त्याहून उत्तम अर्थ दुसरा कोणी करील; आणि ह्या सगळ्याचा फायदा आणीक जुने लेख वाचण्याला होईल.

७ शक ११९९ त रामचंद्र यादव किंवा जादव राज्य करीत असतां, विठोबाच्या देवळाची मोठी चलती होती, हें ह्या शिला लेखांतील देणग्यावरून स्पष्ट आहे. यादवांचें राज्य शक १२३९ त गेल्यावर नामदेव, गोरा कुंभार, सांवता माळी वगैरे कनिष्ठ प्रतीच्या लोकांच्या हातीं हें देऊळ गेलें असें दिसतें. पुढें शंभर दीडशें वर्षांनीं यवनांनीं ह्या देवळाचा व आंतील मूर्तीचा भंग करण्याचा प्रयत्न केला; तेव्हां अनागोंदी येथील तत्कालीन राजानें विठोबाची मूर्ति हंपीस नेली व तिची स्थापना त्या शहरीं केली, अशी एक लोकवार्ता आहे. ही लोकवार्ता खरी आहे असें हंपी येथील खालील शिलालेखावरून दिसून येते.

स्वस्तिश्रीविजयाभ्युदय शालिवाहन शक वर्ष १४३९ नेय श्रीमुखि संवत्सर चैत्र शुद्ध ९ यल्लू श्रीमन्महाराजाधिराज परमेश्वर गल्लू वीरप्रतापश्री+ वीर कृष्णराय महारायतू श्रीठिल देवर अमृतपडि नैवेद्यक्के अंगरंग वैभोग फाल्गुण मास दरथोत्सवनित्योत्सव पक्षोत्सव मासोत्सव संवत्सरोत्सव नित्यनैवेद्यादिदीपाराधानमदलाद पुण्यतिथिगळाल्लि महापूजामहानैवेद्यक्के समर्पिशिद हुलगीमागाणीन हरिहरपुरग्राम १ वंदु होसूरमागाणी वळागिनविरु-पाक्षहग्रामवंदु १ मोसलहासिकेवळगादगोडविळागिनगद्दे बीजवरीपंचशी मी वळागिनगांपीशादियहळ्ळेग्राम १ अंतूग्राम ३ गोडीतेलगिनघट्टीबीजवरी मोहेरीग्राम गळिगेसल्लुव तळवारिकी सुंकजूडीत्रिराडा साम्य सकलसंव-

गौदायसकल भत्तादायतु उंटादवु नम्म तंम्मदि नरसण्णनायक वडियरिग्यू नम्म तायिगळुनागलादेवी अम्मनवरिग्यूई घर्मवागि सूर्यग्रहणपुण्यकालदाल्लि सर्वमान्यवागि आचंद्रार्कस्थायि आगि नडियुवमर्यादियाग्गि धारापूर्वकवागि समर्पिशि श्रीकृष्ण महारायर पषदेवि यरूचिन्नादेवि अम्मन तिरुमलादेवि अम्मनवरू श्रीविठल देवरिगे गोपुरकादीशिदेव नैवेद्य आरोगणिदृदयचित्तैसुव-दक्के समर्पिशि द चिन्नदहारिवाण १ कव्विणतूक १९९० बळीनीरांजनद हालिग्यार्ति ९ वंटि आरुती ८ पुरुषमृगद आरुती ३ नागावरू १ धूपार्ति १ प्रतिमार्ति १ अंतू २९ आरुतीदीपाराधनिगे समर्पिशिद हासलु ई २०० माडशिदन्न आचंद्रार्क स्थायि आगिनडियोदु ई धर्म आरु तप्पिदवरु व तम्मतं दियन्नुवाराणाशीयल्लिकां दवरपापके होरगुवत्तू गोहत्याब्रम्हत्यामाडि-दपाप क्केपात्ररागुवरू ॥ मंगळश्रीः ॥ १२ ॥ ७

७ ह्या शिलाशासनावरून असें दिसतें कीं, शक १४३९ श्रीमुख-नामसंवत्सराच्या पूर्वीं वर्ष दोन वर्षें पंढरपुराहून विठोबाची मूर्त विजय-नगरच्या कृष्णदेवानें आणून हंपीस स्थापन केली. त्यावेळीं एकनाथाचा आजा भानुदास चांगला वयांत आलेला असावा. पुढें यवनांची क्रूर-दृष्टि किंचित् कमी झाल्यावर भानुदासानें हंपीहून ती मूर्ति परत आणिली असावी. कर्नाटकांतील इतर मोठमोठ्या क्षेत्रांतून विठोबाचीं देवळें फारच विरळा आढळतात. प्रख्यात असें विठोबाचें देऊळ हंपीसच तेवढें एक आहे. तें कृष्णदेवानें शक १४३९ त बांधून त्याच्या अर्चेची व उत्सवाची व्यवस्था लावून दिली. हंपीच्या देवळांत पंढर-पुराहून नेलेली विठोबाची मूर्तिच बसविली किंवा दुसरी एखादी मूर्ति बसविली ह्याचा निश्चय भानुदासाच्या हकीकतीवरून करतां येतो. भानुदासानें विठोबाची मूर्ति परत आणिली ही गोष्ट जर खरी मानिली, तर हंपीच्या देवळांत दुसरी एखादी मूर्ति बसविली असावी असेंच मानणें भाग पडतें.

८ पंढरपुरच्या विठोबाच्या मूर्तीला शक १४३९ च्या पुढें दुसरें मोठें गंडांतर शक १५८१ त अफजलखानाच्या हातें येण्याचा समय

आला होता. परंतु असें सांगतात कीं बडव्यांनीं ऐन वेळीं मूर्ती पंढरपुराहून वीस मैल असणाऱ्या माढें गावीं नेऊन ठेविली. पुढें अफजलखानाचा वध झाल्यावर, ती मूर्ती परत आणिली; व ह्या गंडांतराच्या स्मरणार्थ माढ्यास विठोबाचें एक स्वतंत्र देऊळ व मूर्ति स्थापण्यांत आली.

९ अफजलखानानंतर विठोबाच्या मूर्तीला तिसरें गंडांतर, अवरंघझेब पंढरपुरापासून १९ मैलांवर असणाऱ्या माचनूर नामक गावीं येऊन राहिला तेव्हां, येण्याचा समय आला. त्यावेळीं प्रल्हाद बडव्यानें मूर्ति जवळच्याच एका गावीं नेऊन बचाविली.

१० मूर्तीला चवथें गंडांतर २९ वर्षांपूर्वीं एका माथेफिरू वैराग्याच्या द्वारा आलें होतें. त्यापुढें आजपर्यंत विशेष कांहीं गंडांतर आलेलें नाहीं.

११ पंढरपूरच्या विठोबाची मूर्ति १५०० किंवा १६०० वर्षांची जुनी असावी असें अनुमान आकार, अलंकार, ढब व ध्यान ह्यांवरून भगवानलाल इंद्राजीनें काढलें आहे. पंधराशें किंवा सोळाशें वर्षांचा पदार्थ मूर्तीखेरीज दुसरा पंढरपूरच्या देवळांत नाहीं. ज्ञानेश्वर व हेमाद्रि यांच्या अगोदर पुंडलीक झाला. त्याच्या आईबापांचीं नांवें शुद्ध मराठी आहेत. तीं पंढरीचीं रहाणारीं होतीं. चौऱ्यायशीच्या शिळेच्या अगोदरच्या एका लेखांत पुंडरीकाचें नांव व गोष्ट आलेली आहे. हा अगोदरचा शिलालेख चौऱ्यायशीच्या शिळेच्या पूर्वी ३०।४० वर्षें खोदला गेला होता. तेव्हां जर पुंडरीकाची गोष्ट कथारूप झालेली होती, तर पुंडरीकाला लौकिकांत संतपणा प्राप्त होऊन बरींच म्हणजे पांच पन्नास कदाचित् शंभर दीडशें वर्षें झालीं असलीं पाहिजेत. म्हणजे पुंडरीक शक ११९० च्या पूर्वीं पन्नास शंभर वर्षें झाला असला पाहिजे. पुंडरीकाचा समय शक १०७९ धरला तर युक्तीला फारसा बाध येईल असें वाटत नाहीं. पुंडरीक हा अर्वाचीन मराठी संत मंडळांतला पहिला होय. त्याची समाधि व त्याच्या मातापित्यांच्या समाधी

सध्या पंढरीस वाळवंटांत आहेत. त्यावरून हा ऐतिहासिक पुरुष होता ह्यांत संशय नाहीं. “ पुंडलिकवरदे हरिविठ्ठल ” हा पुंडलिकाच्या नांवाचा गजर समाराधनांतून दररोज गांवगन्ना अठरा पगड जातींत दुमदुमत आहे. अभंग, ओवी, आर्या, श्लोक, चरित्र, भूपाळी, संस्कृत शिलालेख वगैरे नाना स्थलीं ह्या भगवद्भक्ताचें नांव पदोपदीं आढळत आहे. अशा ह्या महान् पुरुषाचा काल ठरविणें अत्यंत अगत्याचें आहे.

१२ विठोबाच्या मूर्तीची विटेवरती मूळ स्थापना पुंडरीकानें केली, अशी एक लोककथा आहे. ती जर खरी धरिली तर श्रीविठ्ठल हें दैवत शक १०७९ च्या सुमारास पंढरपुरीं पुंडरीकाच्या हस्तें स्थापलें गेलें असें ह्मणणें संभाव्य होतें. शिवाय विठ्ठल हा शद्ब कांहीं शुध्द संस्कृत नाहीं; इतकेंच नव्हे तर शुध्द जुना प्राकृत हि नाहीं. बंगाली, मराठी वगैरे अर्वाचीन गौडी भाषा प्रचलित होत असतां हा शब्द तयार झालेला आहे. ह्या भाषा शक ९०० च्या सुमाराला जुन्या प्राकृतापासून चांगल्या भिन्न होत चालल्या होत्या. अर्थात्, त्यानंतर थोड्याच अवकाशानें पंढरीच्या विठ्ठलाची स्थापना अर्वाचीन पहिला मराठी संत जो पुंडरीक त्या हातून साध्या विटेवर झाली. आणि नंतर विठोबाचें माहात्म्य हळूहळू वाढत जाऊन सामान्य भक्तजनांबरोबर देवाच्या पूजेअर्चेकरितां वर्गणीदारांच्या पटांत कोठेंहि आपलें नांव खोदूं देण्यांत रामदेवराव जाधवा सारखे चक्रवर्ती राजेदेखील परम भूषण मानूं लागले.

# पंढरपूर येथील शक १२३३ तील शिलालेख



१ पंढरपुरास विठोबाच्या देवळाच्या बाहेर चोखामेळ्याच्या समाधी-पाशीं महार लोक बसत असतात. तेथें कोण्या आधुनिक गृहस्थानें एक लेखशिळा दगड ह्मणून आपल्या भिंतींत लाविली आहे. ह्या लेखाला चोखामेळ्याचा शिलालेख ह्मणतात. परंतु, ह्यांत चोख्याचें नांव नाहीं. शके १२३९ त देवगिरीच्या यादवांचें राज्य गेलें त्याच्या अगोदर सहा वर्षें हा लेख खोदला आहे. चौऱ्यायशीच्या लेखाहून हा लेख ३४ वर्षांनीं अलीकडला आहे. लेखांतील कांहीं अक्षरें फुटून गेलीं आहेत, कांहीं झडलीं आहेत व कांहीं पुसट होत चाललीं आहेत. लेखाच्या एकंदर १२ ओळी सध्या उपलब्ध आहेत. बाराव्या ओळींत वाक्य संपूर्ण झालेलें नाहीं. सबब लेख आणीकहि पुढें असावा, असें दिसतें. पंढरपुरास सात आठशे वर्षांचे जुने शिला-लेख घरांच्या पायांत, भिंतींत व शौचकूपांच्या चिरेबंदींत आपण प्रत्यक्ष गाडले ह्मणून सांगणारे कित्येक लोक मला भेटले. असल्या कुस्थळीं पडलेल्या शिळांचा उद्धार हीं घरें पडतील तेव्हां होण्याचा संभव आहे. अशीं घरें कोणतीं व शिलालेख कोठकोठें असण्याचा संभव आहे, तें कोणी साक्षेपी गृहस्थ तपशीलवार लिहून ठेवील, तर पुढें मागें कदाचित् उपयोग होईल.

## शिलालेख

१ स्वस्तिश्री सकु १२३३ विरोधीकृत संवत्सरे मार्गसिर सुध ५

२ गुरौ। श्रीमद्दक्षिणद्वारावति पंडरिपुरवराधिश्वर पुंडरि—

३ कवरद पांडवप्रजापालक। भगतजनसेवित। सदाप्रसन्न—

४ समुज्जीवलोक। त्रिविक्रम। व + + + + नैकनाथ। वै—

५ कुंठाधिपति। देवराय। दे + + + बोविं। श्रीविठ्ठलदेव।

६ रवलदेव । मूर्ति । मेमागिकेसवदेवे । श्रीविठलसंनिध केल धर्म । पैकु

७ श्रीविठलकें ग । कार्त्तिकिकं ग १ चैत्र कांतोण द । ग ० । विकारी द । ग १ मा--

८ घे + + + + देया ग १ वसंत + + + + + श्रीपतिदै णा द ग १

९ + + + + + + + ग २ देय दा + + + + संप्रति क्रिष्णे आंबेकारे

१० य दा २ श्रीपातिदेव द्रा १

११ आयास श्री पारंटाडे मराठे ग १

१२ विठलदेवा सेपपतित्प दे--

# मिरजेच्या किल्ल्याचा ताम्रपट
## शक १४११ तला



१ हा ताम्रपट मिरज येथील रा. रा. बळवंतराव गोगटे यांनीं मिळवून दिला. मिरजेपासून चार मैलांवर शेडवाळ स्टेशनानजीकच्या नरवाड नावाच्या एका गांवांतील एका पाटलाजवळ हा ताम्रपट होता. आपल्या पूर्वजांचा कांहीं पराक्रम ह्यांत नमूद केलेला असावा, अशी ह्या पाटलाची समजूत आहे. परंतु, तसा कांहीं एक प्रकार नसून, ह्या ताम्रपटावर एका चांभाराला दीड चाहूर जमीन दिल्याची सनद कोरली आहे. सनदेची लिपी सबंद मराठी मोडींत आहे. सनद पत्र्याच्या दोनी बाजूंनीं लिहिली असून, पोटावर मथळ्यावरील श्रीकाराखेरीज तीन चौकोनी शिक्के व खालीं मजकुराच्या बारा ओळी आहेत. पाठीवर मजकुराची एक ओळ असून, खालीं दोन शिक्के आहेत. पांचही शिक्के सनद मिळविणाऱ्या चांभाराच्या कुलदेवतांचे आहेत. सनदेंतील मजकूर येणेंप्रमाणें:— शामण्णा मेत्री चांभार, नरसाजी मेत्री व आसतखान लोहारी दिवाण मिरजेचा किल्ला बांधूं लागले. किल्ल्याची जी जागा पसंत केली तीवरून दबाडे आडनांवाच्या चांभारा जात होता. किल्ला बांधत असतां, सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत जितका बुरूज वर चढवावा तितकाच रातोरात खचून जमीनदोस्त होई. हा चमत्कार पाहून, आसतखान वगैरेनीं असें मनांत आणिलें कीं, कोणी तरी मनुष्य बळी दिल्याशिवाय हें काम चढतां दिसत नाहीं. किल्ल्याच्या जागेच्या भोंवतील कुरणाच्या वाटेंत दबाडे चांभार होता, त्यालाच मेत्री व खान यांनीं धरून, बुरुजाच्या पायाखालीं लोटलें व तिखट तरवारीच्या वारांनीं ठार केलें. उपरांतिक, त्यास ह्मणजे त्याच्या बायकापोरांस दीडचावर जमीन इनाम दिली. ही हकीकत यूसफ आदिलशाहा पातशाहाच्या राज्यरोहणाच्या दुसऱ्या सालीं ह्मणजे ८९५ हिजरींत झाली. यूसफ आदिलशाहा ८९३ हिजरींत ह्मणजे शक १४०९ त मसनदीवर आला.

## ताम्रपट

( एकबाजू पोट )

श्री

| प्रशान शांत प्रभू | श्रीवि शावा जि | श्रीगन माता पृ-सन्ना |
|---|---|---|

१ तमुशारानोमा पिशर्‍रा
२ शामाणा मेत्री चाबार नरसाजी मेत्री व आशतखण
३ लोहारी दीवाण गाजी कील दबाड चाबार भवत कुरण
४ वाटत होता आमतखण लेहारी मी ( र ) जत येऊन कीला सुरेय
५ उदेय होऊन आमतमाणापरयत मौणवे अमतमाग जाहा—
६ ला ह्मणज भुरज जमणीमारक्या होवेयासी लागले दवाड चाबार
७ यासी जीवत पायात घातले तेज तरवारी भोसून किलेयाचे
८ पायात घातले उतरतीक त्यामी दीड चावर इनाम दीले मेलीमो-
९ सा दील्हा चैन व मेलीउलाही ला चीजवसी दील्हा खण त्याचे नावे
१० तुक्याबारकीमहीत मेत्रावर एक कोशाळू लुगडे आस्वी—
११ नाने मत्रीवर सात रुपये चावडीवर तरपुनीट शगावर प—
१२ सोळी रुपये ११ मगतुलावर सोली रुपये जीमीनदावर एक रा—

( दुसरी बाजू पाठ )

१३ गोटापेटाय पायली तेरीख २५ माहे जीलकाद सन्न २

| श्रीगन पति ह्मा दाणा | श्रीमान वीरा मंगळ |
|---|---|

२ ह्या ताम्रपटांत अनुस्वार किंवा अनुनासिक कोठें हि दिला नाहीं. ताम्रपट कोरणारा कारागीर फार गचाळ होता, असें अक्षराच्या खोडीवरून दिसतें. ताम्रपटांतील मराठी भाषेचें रूप भानुदासाच्या भाषेंतल्या रूपांसारखें आहे. “ होवेयासी ”, “ किलेयाचे ”, वगैरे रूपें जुनीं आहेत.

# जगन्नाथ

## शक १६६९ प्रभव

१ जगन्नाथ कवीचे खालील ग्रंथ संग्रहास आहेतः—

१ बोधवैभव
२ अखंडसहजावस्था
३ वाक्यसुधेवर टीका
४ मारुतिजन्म
५ महाभारतावर व रामायणावर लावण्या
६ ज्ञानबत्तिशी
७ शशिसेनाकाव्य.

२ पैकीं बोधवैभव कवीनें शक १६६९, प्रभव संवत्सरीं लिहिला, असें ग्रंथसमाप्तीस ह्मटलें आहे. ह्या कवीचा गुरु ऋषीश्वर नांवाचा कोणी सिद्ध पुरुष होता.

३ पंडित वामनशास्त्री इस्लामपूरकर यांजकडून शशिसेना काव्याची एक प्रत मला मिळाली आहे. तिच्या शेवटीं " ॥ श्रीसंवत् ॥ १८९० ॥ द्वितीय वैशाख कृष्णः ॥ ११ ॥ चंद्रवासरे तद्दिणे ग्रंथ संपूर्णम् ॥ श्री ॥ ॥ श्री ॥ " असा ग्रंथलेखन-काल दिला आहे. लेखकाचें नांव गंगाराम खापडे. १८९० हा चैत्रादि विक्रमसंवत आहे, तेव्हां लेखक नर्मदेपलीकडला होता, हें स्पष्ट आहे.

४ शशिसेना काव्यांत खालील श्लोक आहेः--

अशी हे कथा शारदेच्या कृपेनें
जगन्नाथ-लाहापुरी—सत्कवीनें ॥
बरी वर्णना प्रांतपर्यंत केली
जगीं आठवायास हे वस्तु केली ॥ ९८० ॥

अर्थात्, जगन्नाथकवी लाहापुरीचा रहिवासी होता. लाहापुरी उमरावती व नागपूर ह्या प्रांतांत कोठें तरी असावी. तिचें प्रस्तुतचें नांव काय तें तत्रस्थ कोणी शोधक कळवील तर ह्या प्रश्नाचा उलगडा सहज होईल.

९ शशिसेनाकाव्य स्कॉट किंवा बायरन ह्या मध्यम प्रतीच्या कवींच्या उत्तम काव्यांच्या बरोबरीचें आहे. त्याचें कथानक कविकल्पित असून, रचनाहि सुंदर आहे. शृंगाररस किंचित् उत्तान आहे, पण भारतवर्षांतील संभोगलोलुपकवी सीतानें थिजून गेलेल्या उत्तर यूरोपियन कवींच्यापेक्षां पंचबाणाच्या तडाक्यांत उत्कटत्वानें सापडतात, हा गुण समजावा किंवा दोष समजावा, तें निश्चित करण्याचें काम सहृदयांच्या रुचीवर सोंपविणें बरें. हें काव्य मराठी काव्यांतील उत्तमांत मोडण्यासारखें आहे. एक लहानसा उतारा मासल्याकरितां देतों:—

बाळे! सदैव पतिचे हृदयानुसारें
आत्मीय आचरण गे! करिजे उदारें! ॥
जें नावडे प्रियतमास न ते करीती
साध्वी अशांस इहलोक जगीं वदंती ॥ १४४ ॥

भर्तारकोप कवणास कळूं न द्यावा
चित्तांत खेद पण तो न कधीं धरावा ॥
वेगें करावं मनरंजन गे पतीचें
हें जाण लक्षण विशेष पतिव्रतेचें ॥ १४५ ॥

संपत्ति आपुलि विचारुनि भक्तिभावें
आतिथ्य भिक्षुकजनास सदां करावें ॥
वित्तानुसार करिजे पतिचे व्ययातें
येणेंकरून यश होय कुळस्त्रियांतें ॥ १४६ ॥

सासेची बहु करिजे सदैव सेवा
पाहावा सखि! न कधीं समोर भावा ॥
जावांशीं निज समशीलता धरावी
मर्यादा आशि सखि सासुरां धरावी ॥ १४७ ॥

स्नेहानें वश करिजे सखे ननंदा
नाहीं तो करितिल त्या सदैव निंदा ॥
ठेवावें निजपतिप्रेम अंतरंगीं
संकोचा श्वशुर प्रसन्न गे! कृशांगि! ॥ १४८ ॥

भुजंगमफणेवरी झटति पाय गे ठेवणें
अकारण घराहुनी तशिच देहली लंघणें ॥
समान कुलयोषिताहृदयिं यास गे! जाणती
प्रयाणसमयीं तुला अधिक नीति सांगूं किती? ॥ १४९ ॥

६ जगन्नाथ बाळाजी बाजीरावाच्या ह्मणजे पेशवाईच्या ऐन अमदानींतल्या गृहस्थितीचें वर्णन करीत आहे. सुखवस्तु घराण्यांत सुनांनीं कोणत्या नीतीनें वागावें, ह्याचें शक १६७० च्या सुमाराचें हें चित्र आहे. ह्या काव्याच्या मुद्रणानें तत्कालीन समाजस्थितीवर फारच प्रकाश पडेल, असा अंदाज वाटतो.

७ "शशिसेनेनें" तत्कालीन समाजस्थितीवर प्रकाश पडेल, हा तर एक विशेष आहेच. परंतु, ह्या काव्याचा मुख्य विशेष असा आहे कीं त्याचें संविधानक इतर मराठी कवींच्याप्रमाणें इतिहास किंवा पुराणें ह्यांतून घेतलें नसून, कवीनें स्वतः कल्पिलेलें आहे. संविधानक फारच मौजेचें असल्याकारणानें तें येथें सविस्तर देतों.

८ उत्कलदेशांत अमरावती नामेंकरून एक शहर आहे. त्याच्या अनेक पेठा असून, तें इतक्या कुशलतेनें बसविलेलें आहे कीं गंधर्वांची प्रत्यक्ष अलकानगरीहि त्याच्यापुढें तुच्छ वाटते. तेथील स्त्रीपुरुष अत्यंत सुशील असून परोपरीचे वस्त्रालंकार लेऊन नटण्यामुरडण्याची तेथील स्त्रियांना फार हौस आहे. त्या नगरांतील पाण्यानें तुडुंब भरलेले कुवे, विस्तीर्ण तलाव व खोल विहिरी जलविहार करणाऱ्या नवयुवतींच्या कुसुमगंधानें भ्रमरांनाहि भ्रम पाडतात. शहराभोंवतील आमरायांत व जाईजुईच्या कुंजांत कोकिला व कामिनी ह्या सदैव वनविहार करीत असतात. अशा त्या अनुपम नगरीला कोणी एक तरुण, स्मरचारु व

सुंदर राजा सुखानें राज्य करीत होता. त्याचा प्रधानहि त्याच्या-सारखाच गुणवंत होता. राजाचा विश्वास व प्रजेचें प्रेम एकाच चातुर्यानें आकर्षण करणारा तो प्रधान सौख्यसागरांत केवळ डुंबत होता. परंतु त्यालाहि एक दुःख असे :—

सर्व संपत्ति तयास असे गे !
पुत्रलाभ कमनीय नसे गे !

हें अपुत्रिकत्वाचें दुःख त्याच्याहूनहि त्याच्या स्त्रीला अति होई. तिनें एके दिवशीं महाराष्ट्रांतील क्षत्रियांची कुलदेवता जी भवानी तिची षोडशोपचारें पूजा केली आणि

उभी राहिली हस्त जोडूनि बाला ।
ह्मणे " अंबिके ! मागते पुत्र तूला ॥
समस्तांशि तूं इच्छिले देशि माते ।
सदा पावशी पालिशी तूं जनातें ॥
मला पाव तूं शीघ्र आतां कृपाळे ।
मनासारिखा पुत्र देई दयाळे ! " ॥

ही तिची करुणाभाक ऐकून देवी प्रसन्न झाली आणि ह्मणाली " तुझें पूर्वसंचित असतें तर तुला पुत्र केव्हांच झाला असता. पण,

भालसंस्थ लिहिल्याऽक्षरपंक्ति
अन्यथा मग कदापि न होती ॥

तरि, ज्या अर्थीं तूं मला शरण आलीस त्या अर्थीं तुझ्या मनींचा हेतु पुरवितें. नागलोकीं माझा मुलगा आहे तोच तुला देतें. " हें वरदान ऐकून, प्रधानस्त्रीनें

गाठि सुंदर बरी पदराची
दीधली निजकरीं शकुनाची ; ॥

आणि झालेला वृत्तांत आपल्या नवऱ्याला सांगितला, आणि तो सांगतां सांगतां, त्या नगरांतील सुशील व कुलीन स्त्रियांच्या सार्वत्रिक रीतीला अनुसरून

सावरी पदर वामकरानें !

प्रधानस्त्रीला भवानीचें बोलणें खरें वाटलें. परंतु प्रधान इतका भोळा नव्हता. तो ह्मणाला, " रसातळीं जो अंबिकेचा सुत नागांवरती राज्य करतो तो आह्मांला कसा बरें मिळेल!

आह्मी असो ह्या क्षितिमंडलीं गे !

तो पुत्र आह्मांस कसा मिळे गे ? "

परंतु देवांची करणी मानवांना कशी उकलावी ? प्रधानस्त्रीला वर देऊन, भवानी जी उठली ती बोलला बोल खरा करण्याच्या पंथाला लागली. नागलोकीं आपल्या पुत्राकडे जाऊन, तिनें त्याला चंपकहाराचें रूप घ्यावयाला हुकूम केला आणि आपण स्वतः माळीण बनली. देवांना वाटेल तें रूप घेतां येतें, हें वाचकांना अनुभवानें माहीत आहेच! सोंगाडी माळीण तो चंपकहार घेऊन, नगरांत विकावा

ह्या मिसें त्रिपुरराजसुंदरी

पावली तंव प्रधानमंदिरीं ॥

त्यास बाहिर सभेंत देखुनी

दीधला कुसुमहार त्या क्षणीं ॥

तो हार प्रधानानें घरांत पाठवून दिला. प्रधानस्त्रीनें तो कौतुकानें पाहून पलंगावर ठेविला आणि फिरत फिरत अंगणांत ती कांहीं कामानिमित्य आली. कालान्तरानें पुनः जाऊन जों पलंगापाशीं पहाते, तों तेथें चंपकहार नसून, एक सुकुमार बाळ लीलेनें खेळत आहे! ईश्वराचीच करणी ती! दृष्टादृष्ट होतांच मायलेकरांना मायेचा पाझर फुटला आणि

बाळ तें अति क्षुधातुर आंगीं

नेतसे मुख पयोधरभागीं ॥

लावितां मुख सरोजकुचातें

निर्मिलें पय सखे! भगवंतें! ॥

रात्रीं घरीं आल्यावर, प्रधानाला हा सर्व चमत्कार कळून चुकला. तेव्हां, शहाण्यामाणसाप्रमाणें तो आपल्या स्त्रीला ह्मणाला कीं, " वेडे! तुला

असा भ्रम कसा पडला? ही सर्व भवानीची कृपा आहे." हाच प्रधान पूर्वी भवानीचा वर खरा कसा होईल, ह्याबद्दल संशय दाखवीत होता. पण तो खरा झाल्यावर, उलटून आपल्या भाविक स्त्रीलाच वेड्यांत काढूं लागला. असो. गोष्ट झाली नाहीं तोंपर्यंत तिच्या होण्याची शंका दाखविणें व झाली म्हणजे इतरांच्या नसत्या मूर्खपणाला दोष देण्याला आपणच प्रारंभ करणें, हा ज्ञात्या मुत्सद्यांचा मार्गच आहे! येणेंप्रमाणें पुत्रप्राप्ती झाल्यावर, प्रधान व त्याची स्त्री सुखानें काल-क्रमणा करूं लागली. पुत्र मूळचा नागलोकचा, म्हणून त्याचें नांव अहिमाणिक असें ठेविलें.

अहिमाणिक वर्षसहा महिन्यांचा होतो न होतो तों अमरावतीच्या राणीला मुलगी झाली. तिचें नांव शशिसेना. जन्मतः च तिचें रूप असें दिव्य होतें कीं त्यानें

मोहिली सकल ही स्मरसेना!

सौंदर्याप्रमाणें तिचे मानसिक गुणहि वाखाणण्यासारखे होते. तेव्हां पांच वर्षांची झाल्यावर, तिच्याकरतां राजानें एक अध्ययनशाला बांधिली आणि एका महापंडिताला अध्यापक नेमून, सुमुहूर्तानें शिकण्यास प्रारंभ झाला. बरोबर कोणी तरी सहाध्यायी असावा म्हणून, प्रधान-पुत्र जो अहिमाणिक त्यालाहि पंडितांच्या स्वाधीन केलें.

नाटकें आणि सुभाषित नाना ।
पंचकाव्य अवघें शशिसेना ॥
चोप लाउन मनाप्रति वेगें
सर्व नीट पढली अनुरागें ॥
वेद चार उपवेद विधीनें
आदि प्रांत षट्शास्त्र गुरूनें ॥
ह्यापरी अहिमणीप्रति विद्या
शिक्षिता निज चतुर्दश विद्या ॥

शशिसेना व अहिमाणिक शास्त्रसंधानाप्रमाणें शरसंधानहि उत्तमोत्तम जाणत.

देखतांच गगनांतरिं पक्षी
वेधिते निजशरें हरिणाक्षी ॥
शब्दवेध अहिमाणिक जाणे
सप्रमाण गुरुराजकृपेनें ॥

दोघांनांहि शिकारीचा नाद असे.

कधीं कधीं जाति वनाप्रती गे!
शिकार नाना परि खेळती गे! ॥
समान शोभा बरवी तयांची
निशामुखी गे! जशि पौर्णिमेची ॥
चंद्रप्रभा पूर्व दिशेस जैसी
तसाच शोभे रवि पश्चिमेसी ॥

शिकारीहून ही चंद्रसूर्यांची जोडी येतांना पाहून,

अत्यंत संतोषिति योषिता गे!

त्यांच्या मातापितरांना जो आनंद होई तो पुसूंच नये!

जीवाहुनी वाटती थोर त्यांला
ओवाळिती त्यांवर आपणाला! ॥

असा अध्ययनक्रम चालला असतां, अहिमाणिकाला दहावें वर्ष लागलें. शशिसेनेला त्याच्याहून दहापांच महिने कमी. दोघेंहि लहानच, परंतु यौवनवाटिकेच्या पारिसद्प्रदेशांत डोकावून पहाण्यास तयारी करूं लागलीं होतीं. एके दिवशीं, लिहितां लिहितां शशिसेनेची लेखणी हरवली, ती कोठें सांपडेना. धुंडाळून पोरीनें जंगजंग पछाडले, परंतु लेखणीचा पत्ता नाहीं. बाब क्षुल्लकच. परंतु, गुरुजी रागावतील, ह्या भीतीनें ती उद्विग्न झाली. लहान वयांत क्षुल्लक कारणेंहि संतापाला कारण होतात. तेव्हां अहिमणीला लेखणी शोधून देण्यास तिनें बोलाविलें. तें त्यानें कबूल केलें. परंतु लबाडानें अट अशी घातली कीं, लेखणी शोधून दिली, तर शशिसेनेनें आपली बायको व्हावें.

ऐकून त्याचे वचनास बाला
स्नेहातुरें त्यास ह्मणे सुशीला ॥
जे तूं करीशी मजलागि आज्ञा
करीन ते निश्चय मी प्रतिज्ञा ॥

शशिसेनेनें संकटसमयीं प्रतिज्ञा केली खरी. परंतु,

जे कन्यका राजकुळांत होते
प्रधानपुत्रास कशी घडे ते? ॥

अशी तिला शंका आली. पण, केल्या प्रतिज्ञेला बाध येऊं नये ह्मणून, ती ह्मणाली,

स्वाधीनता होय जरी मला रे!
वरीन मी प्रेमबळें तुला रे! ॥

आणि

माझा स्वकीय सहसा वर तूंच होशी
अंगीकरोति यदि गौरि मयार्चिताशी ॥

हें ऐकून, अहिमाणिकानें तिची लेखणी तिला परत दिली. कवि ह्मणतो:—

मोहिली वनलता विटपानें!
पद्मिनी भुलविली मधुपानें!
रोहिणीसह सखे! शशि झाला!
कृष्णसार हरिणीस मिळाला!

हा प्रसंग होऊन, पांच सात वर्षें लोटलीं. दोघांचाहि काल विद्याभ्यास करण्यांत सुखानें गेला. कालान्तरानें मनुष्यधर्माचा संचार होऊन, दोघेहि एका महान राजाचे मांडलिक होण्याचा रंग दिसूं लागला.

प्रथम नविन राज्यीं धाडिलें यौवनासी
मनसिज मग आला राज्य भोगावयासी ॥

मराठेशाहींत नवीन प्रांत जिंकावयाचा झटला ह्मणजे प्रथम सेनापति पाठवीत आणि त्यानें प्रांत आक्रमण केल्यावर, राजा राज्य करावयाला जाई. तीच गत येथें झाली. लहानपणापासून एके ठिकाणीं शिकलेलीं, परस्परांचें परस्परांवर सहज प्रेम वाढलेलें, आणि दोघेंहि तारुण्याच्या भरांत आलेलीं. अशांच्या मनोगतांना प्रतिबंध कोण करूं शकेल ? अशांचा हात कोण धरील ?

परंतु, शेराला सवाशेर आहेच ! ह्या न्यायानें, कौलीन्य मध्यें येऊन उभें राहिलें. मातापितरांच्या आज्ञेशिवाय व अधिकारावांचून महाराष्ट्रांत कुलहीनांचाहि लग्नसंबंध होत नाहीं, मग कुलीनांचा तर व्हावयाची वार्ताच नको. आपलें लग्न अमुक्याअमक्याशीं करून द्या, असें आई-बापाना विचारण्याची किंवा विचारण्याचा सामोपचार करण्याचीहि चारगट चाल महाराष्ट्रांत नाहीं, तशांत मुलगी पडली राजकन्या व मुलगा पडला प्रधानपुत्र. दोघांच्या स्थितींत महदन्तर. तेव्हां, तेंहि लौकिकाला वाईटच. अशा विवंचनेंत हीं दोघें पडलीं. काय करावें हें सुचेना ! कोठें जावें हेंहि कळेना ! अशा स्थितींत बराच काळ गेला. दोघेंहि विरहानळानें करपून गेलीं.

तूं प्राण माझा, सगुणे ! तुझा मी
तूं चंद्रमा, कौमुदिनी तुझी मी ॥
सुगंध तूं, मी वनपुष्पवल्ली
जशी सुरंगी सम युक्त लाली ॥

लहानथोरांपैकीं कोणाशींहि बोलण्याची सोय नाहीं. सगळाच प्रकार देशाचार, धर्माचार व लौकिक यांच्याविरुद्ध ! अशा संकटांत, अहिमाणिकाला एक युक्ति सुचली. तो ह्मणाला, " तुझ्याशिवाय मला तर गति नाहीं, परंतु लग्नावांचून आपणा कुलीनांना कोणताच व्यवहार शक्य नाहीं. तेव्हां, कोणाला विशेष कळूं न देतां गुप्तपणें लग्न करून चालावें, हें उत्तम. " परंतु, सगळाच चोरटा व्यवहार ; तेथें लग्न लावणारा तरी कोणी भेटणार ? एका विवंचनेंतून सुटावें तों दुसरी दत्त ह्मणून पुढें उभी ! संकटकंटकजालांतून

हरिणांनीं तरी मार्ग कसा काढावा? तेव्हां दोघांनीं असा बेत केला कीं, आपल्या गुरुजींना संगनमतांत घ्यावें.

तयाची असे प्रीति आम्हांवरी गे!
स्वयें जाणतो प्रेम भावान्तरीं गे! ॥
वियोगीं जसें दुःखसंसार आहे
सखे! तें हि गे! ठाउकें त्यासि आहे ॥

मग तीं दोघें गुरुजींकडे गेलीं आणि त्यांना आपलें संकट सांगतीं झालीं. तो गृहस्थ प्रेमाचें रहस्य जाणणारा होता आणि जातीचा दयाळू होता. गुह्याचा स्फोट करून आपला शहाणपणा मिरविणारा नव्हता. त्याला त्या विपन्न प्राण्यांची दया आली.

अवलोकुनि त्यांस लहान वयीं
बहु स्नेह परस्पर गे! हृदयीं ॥
जंव देखिलि फाराशि काकुळती
तंव मानुनि घेतलि ते विनती ॥
उचलुनि मग त्यांला लावियेले उराशीं
सकळ नृपकुळाची नीति सांगे तयांशीं ॥

कुलीनत्वाची नीति सांगून, गुरुजी ह्मणाले:—

मानाल बोल मम दारुण एक आतां
होईल कार्य तुमचें न करावि चिंता ॥
सोडूनिया स्वकियदेशनिवासआशा
दोघे जणें त्वरित जाल जरी विदेशा ॥
देईन मी करुन लग्न विधीप्रमाणें
येना कदापि मजला अपवाद याणें ॥

प्रेमळ सखेसोयरे व आवडता देश सोडणें दोघांच्याहि जीवावर आलें; पण प्रेमपाशापुढें कांहीं उपाय नव्हता. होतीं तेथेंच राहिलीं तर इष्टहेतु सफळ होईना; आणि देशान्तर केलें तर मातापितरांना दुःखांत टाकावें लागतें. अशा दुहेरी पेंचांत तीं सांपडलीं. शेवटीं जीवाचा निर्धार करून

गुरुजींच्या ह्मणण्याला त्यांनीं रुकार दिला. मग शहराजवळच एक अरण्य होतें तेथें शशिसेना, अहिमाणिक व गुरुजी, अशीं तिघें मुहूर्त पाहून एके दिवशीं गेलीं आणि लग्नविधि आटोपितीं झालीं.

जेथें सदैव वनपल्लवतोरणें गे !
नाना परी रुखवतें असती फळें गे ! ॥
गाती विलोल पिक मंगळगीत जेथें
कन्याकरग्रहणसंभ्रम होय तेथें ॥
पावली लगिनवेळ विचारें
अंतपाट धरिती वनमोरें ॥
चंद्रिका अवचिता पसरीती
कन्यकेस वर पाहुं न देती ॥
माळ घेउन उभी हरिणाक्षी
सावधान ह्मणती वनपक्षी ॥
चिंतुनी स्वकुळदैवत बाळा
घातली कुसुममालतिमाळा ॥
देठ तोडुन सये ! कमळांचे
तंतु काढिति मराळ जयांचे ॥
कौतुकें धरिति गे ! मुखिं दोरे
घालिती वधुवरांप्रति फेरे ॥
अशा परी वेदस्मृतिप्रमाणें
वऱ्हाड लाहानपणीं गुरूनें ॥
करून दिल्हें गहनप्रदेशीं
नृपात्मजेचें अहिमाणिकाशीं ॥

येणेंप्रमाणें गुरुजींच्या साहाय्यानें दोघांचा गुप्त विवाह झाला. शशिसेनेचें हें सौभाग्य मोठें विचित्र झालें. यद्यपि तें अलौकिक होतें, तथापि कवीला तें फारच पसंत पडलें. तो ह्मणतो:—

आजन्मांत सुवासिनींत अवघ्या सौभाग्य शोभे तिचें !

यांचें लग्न लागलें, परंतु जनाला तें न लागल्यासारखेंच होतें. आकृति, अवयव, व हावभाव यांवरून आपली मुलगी प्रौढ होत चालली असें राजाराणीलाहि वाटूं लागलें. मग

प्रतिदिनिं शशिसेनेला बहू बोलती गे !
अहिमणिसह आतां फार खेळूं नको ग !

अशी शशिसेनेला मर्यादा घालून, तिला वर पहाण्याचीहि योजना होऊं लागली. तेव्हां पुनः विंवचना प्राप्त झाली. देशत्याग करण्याची युक्ति गुरुजींनीं पूर्वींच सांगितली होती, तिचा आश्रय हा वेळपर्यंत करण्याचें लांबणीवर पडलें होतें. पळून जाण्यानें जी अपकीर्ति होते ती टळेल कशी, हा येथवर प्रश्न होता. ह्मटलें आहे

संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ।

शेवटीं शोधतां शोधतां, अपकीर्ति पाठीमागें न ठेवतां, देशत्याग करण्याची एक युक्ति निघाली. शशिसेनेनें व अहिमाणिकानें असें ठरविलें कीं अहिमाणिकानें नदींत बुडून नाहींसा झाल्याचा बहाणा करावा आणि शशिसेनेनें शिकारींत वाघानें खाल्ल्याचें नाटक साधेल तितकें बेमालूम करावें, आणि नंतर दोघांनीं अरण्यांतील एका संकेतस्थानीं येऊन भेटावें. त्याप्रमाणें लवकरच एक दिवशीं अहि आपल्या संवगड्यासह नदींत पोहावयाला ह्मणून गेला आणि जो बुडाला तो निघून ठरलेल्या ठिकाणीं रानांत जाऊन बसला. चाकरमाणसांनीं नदींत पुष्कळ शोध केला; पण कांहीं एक पत्ता लागला नाहीं. इकडे शशिसेनाहि त्याच दिवशीं वाघाच्या शिकारीस गेली आणि जी निसटली ती शिकाऱ्यांच्या पुनः दृष्टीस पडली नाहीं. वाघानें खाल्ली अशी त्यांची खात्री झाली. ही बातमी नगरांत राजाला कळली. मग त्या दुःखाला व शोकाला पारावार काय विचारावयाचा आहे? राजा व प्रधान दोघेहि समदुःखी झाले आणि अपत्यनाशानें हताश होऊन कसे तरी काळ कंठित राहिले. गुरुजीलाहि झाली गोष्ट अश्रुतपूर्वच वाटली. पोरांचा असा अंत होईल, हें त्या बिचाऱ्याच्या स्वप्नींहि नव्हतें.

इकडे राजकन्या व प्रधानपुत्र यांनीं संकेतस्थळीं अरण्यांत पहाटेपर्यंत राहून, अरुणोदय होतांच लगबगीनें पाऊल उचलतं घेतलें. भय कीं कोणी येऊन गांठील.

चला चाऊं वेगें, अरुणकिरणाली उगवला.

चालतां चालतां, दोन प्रहरच्या सुमारास तीं एका शहरापाशीं आलीं व एक सुरेखसें देवालय पाहून त्यांत उतरलीं. मग,

ह्मणे प्रियतमास ते वचन त्या क्षणीं साजेरें ।
अहार नगरांतुनी त्वरित आज आणा त्वरें ॥

प्रेमभरानें अहिमणीनें राजकन्येला घेऊन देशान्तर केलें खरें. पण त्यामुळें त्याच्या पाठीमागें बायकोचा जो आणा लागला त्यानें त्याची व तिची संकटपरंपरा दुणावली. अहिमणी बाजारांत पाकसामग्री विकत घेऊन, हार खरेदी करण्याच्या निमित्तानें एका माळिणीच्या दुकानापाशीं आला. ती माळीण त्या शहरांत ग्यानी या नावानें महशूर असे. ती मोठी जादूगार होती. कोणी देखणासा पुरुष पाहिला, ह्मणजे ती मंत्रविद्येच्या बळानें त्याला बैल, घोडा, मेंढा वगैरे करून आपल्या घरीं बांधी व रात्रीं पुनः त्याला पुरुषाकार देई. अशा त्या ग्यानीच्या दुकानीं प्रधानपुत्र गेला मात्र, कीं त्याच्यावर ह्या कवटाळणीची दृष्टि गेली आणि तिनें त्याला एका क्षणार्धांत मेंढा बनविलें! विचारा मुका शशिसेनेची आठवण करीत ग्यानीच्या गोठ्यांत राहिला!

देवालयांत शशिसेना वाट पहातां पहातां दमली व शेवटीं कुररी-प्रमाणें रडूं लागली.

प्रियतम मज कोठें टाकुनी दूर गेला?

असा शोक करीत,

अहर्निशि निराशशी ताशि च त्या स्थळीं बैसली ।
सचिंत पतिहीनशी बहुत दीनशी देखिली ॥

शेवटीं क्षत्रियांना सकल संकटांतून मुक्त करणारी जी अंबाबाई तिचें तिनें ध्यान केलें तेव्हां,

तृतीय दिवशीं निशासमयिं स्वप्न झालें तिला.

स्वप्नांत अंबेनें येऊन सांगितलें कीं "बेटा! भिऊं नको. ह्या हि संकटांतून पार पडशील. पुरुषवेष घेतला आहेस तो तसाच ठेव आणि ह्या शहरच्या राजकन्येचें पाणिग्रहण कर, लाजूं नको. अशा रीतीनें,

बाळे होइन मी प्रसन्न तुजला भेटेल भर्तार गे !"

अंबेचे हे बोल शिरसा मान्य करून, पुरुषवेषधारी ती राजकन्या शहरांत गेली व तेथील कांहीं लोकांशीं लौकिक स्नेह करून, एका घरीं बिऱ्हाडानें राहिली. नंतर प्रधानाची भेट राजसभेंत घेऊन, राजाच्या पदरीं शिलेदारी करूं लागली. ह्या नवीन शिलेदाराचें चातुर्य, बाणा व शहाणपण पाहून, त्याला सर्व लोक व खुद्द राजा प्रसन्न झाला.

बहुत जनपदाची वासना पूरवीली ।
हळुहळू पदवी गे आपली वाढवीली ॥

इतकें होत आहे तों बरेच दिवस लोटले. एके दिवशीं अशी बातमी आली कीं, एका माणुसमाऱ्या वाघानें शेकडों माणसें मारलीं व तो कोणाला आटोपत नाहीं. तेव्हां राजा स्वतः शिकारीला निघाला. बरोबर शिपाई व सरदार बरेच होते. त्यांपैकीं बरेच त्या वाघानें मारले. दिवस संपून संध्याकाळ झाला. तेव्हां राजानें प्रतिज्ञा केली कीं, जो कोणी हा वाघ मारील त्याला मी आपुली कन्या देईन. तेव्हां,

ह्मणे नरपतिलागी तो विदेशी शिपाई
किमपि अझुन स्वामीकार्य म्या केलें नाहीं ॥
निजसनमुख पाहा चाकरी आज स्वामी !
बहुत दिवस जाले जीविका पावतो मी ॥

असें ह्मणून, शिलेदारानें वाघावर एक अचुक बाण असा सोडला कीं त्यानें वाघ खिळून गेला. मात्तयान् भाला व तरवार यांचा उपयोग करून, शिपायानें त्या दुष्ट पशूला पंचत्वाप्रत पाठविलें.

अघटित जय होतां वाजती शादियानें
नरपति हंवसेनें त्यास भेटे सुखानें ॥

वसतुन गजअंबारींत तो शस्त्रधारी
परतलि दिवसांतीं राजधामास स्वारी ॥

मग वचनाप्रमाणें, सुमुहूर्तावर शिलेदाराचा व राजकन्येचा विवाह झाला. सोहळे व्हावयाचे ते सर्व झाले. राजकन्या शृंगार करून एकान्तास आली. तेव्हां तिला शिलेदार ह्मणाला :—

भैसा न होय वध ज्यासमयीं वनाचा
केला तईं नवस म्यां जगदंबिकेचा ॥
जेव्हां सुरालय करीन अपूर्व येथें
कांते तुशी करिन भोगविलास तेव्हां ॥

शिलेदाराची ही प्रतिज्ञा राजास कळली.

राजा ह्मणे मजहि निश्चय सत्य वाटे
दैवी बलाविण असा पुरुषार्थ कोठें? ॥

चार आठ महिन्यांनीं शिलेदाराच्या मनाप्रमाणें देऊळ तयार झालें व अंबेची प्रतिष्ठापना झाली. आतां मात्र फलशोभन करावयाला कोणतीच सबब सांगतां येण्यासारखी नव्हती. शिलेदाराच्या सोंगाची बतावणी येथपर्यंत बिनचूक झाली. ह्यापुढें निभाव कसा लागावा? आणि हें सर्व नाटक केलें कशाकरितां, तर अहिमाणिकाची भेट व्हावी ह्मणून. तो तर अजून भेटेना. पुढें कसें करावें? अशा विवंचनेंत शशिसेना पडली.

क्षणभरहि सतीचें अंतर स्थीर नाहीं!

इकडे,

अहिमणि असे ग्यानी माळिणीचे घरीं गे!
निशिसमइ मनुष्याकार त्याचा करी गे!

शिलेदारानें बांधलेल्या अंबाबाईच्या देवळांत नवरात्राचा उत्सव चालला होता. त्याचा गलबला प्रचंड होई तो अहिमणीला ग्यानीच्या गाठ्यांतून ऐकूं येई. कसला गलबला तें मात्र उमजेना. तेव्हां एके रात्रीं सलगीचा समय पाहून, अहिमणी ग्यानीला ह्मणतो, " प्रिये, शहरांत हा गलबला कसला बरें होतो? " ग्यानी ह्मणाली, " शहरांत राजाच्या

नव्या जावायानें दुर्गोत्सव मांडला आहे, त्याचा हा गलबला आहे. " तें ऐकून, अहि ह्मणतो " सखे! आज वर्षदीडवर्षांत घराच्या बाहेर कसा तो पडलों नाहीं. अगदीं कंटाळून गेलों आहे. रात्रीच्या घटकाभर जर मला बाहेर घेऊन गेलीस, तर आई अंबेचें एकदां दर्शन घेईन ह्मणतो. " एकान्तसमयीं कठोर मनाच्याहि स्त्रिया कधीं कधीं पुरुषांच्या दासी बनून जातात, व ह्मणावें तें करतात. अशांतलाच हा समय होता. ग्यानीला एकाएकीं काय वाटलें न कळे, ती अहिमणीला ह्मणाली, " स्त्रीवेष करून आतांच्या आतां दुर्गोत्सव पहावयाला चल. " प्रसंगीं अर्जुनासारख्यानाहि बृहन्नडा व्हावें लागलें, तेथें अहिमाणिकाची कथा काय? तो लुगडें नेसला, चोळी ल्याला आणि टोप घालून ग्यानीबरोबर अंबेच्या देवळांत आला. ग्यानीनें देवळांतली सर्व मजा त्यास दाखविली आणि शेवटीं वेदीच्या आंत जाऊन त्यास,

जावाई अस हाच छत्रपतिचा, पाहा ह्मणे स्वेच्छया!

जावायाकडे अहिमाणिकानें पाहिलें मात्र, तंव ती शशिसेना आहे असें त्यानें सर्वेच ओळखिलें. पण करतो काय? ग्यानीचा जादूटोणा, आपला स्त्रीवेष, शशिसेनेचा पुरुषवेष, असा त्रिविध प्रकार पडल्यामुळें, तोंडांत मारल्याप्रमाणें त्याला चूप बसावें लागलें. स्फोट करावा तर सर्वच विचका होतो! तेव्हां गाभाऱ्याच्या दारावर शशिसेनेला व त्यालाच माहीत अशा गुप्त लिपींत आपलें ठिकाण, स्थिति वगैरे हकीकत ग्यानीचा डोळा चुकवून त्यानें संक्षेपानें लिहिली व ग्यानीबरोबर गोठ्याला तो निरुपायानें परत गेला.

अंबाबाईच्या उत्सवाची ती शेवटची रात्र होती. दुसऱ्या दिवशीं प्रसाद वाटला जाऊन, राजकन्येचें फलशोभन व्हावयाचें. अंत पहाण्याची कमाल झाली. तेव्हां मनांतल्या मनांत तिनें अंबेचा धांवा केला.

हृदइं धरून होतें आजपर्यंत आशा<br>
जननि! तव कृपेनें पावते जीवितेशा ॥<br>
अझुन प्रियतमाशी भेट कां होत नाहीं<br>
अवधि सरत आली, पाहि अद्याप पाही ॥

इतक्यांत, तिचेंहि नष्टचर्य संपून,

अशी प्रार्थना जौं करी अंबिकेची
कवाडावरी दृष्टि गेली तियेची ॥
जशीं अक्षरें देखिलीं कामिनीनें
पतीचा लिहीला सुसंदेश जाणें ॥

मग काय विचारता? तावडतोब त्या माळिणीला धरून आणिलें आणि शिक्षा करून जबाब घेतला. तिनें सर्व कबूली दिली. नंतर त्या मेंढ्याला आणून, माळिणीनें आपली मंत्रशक्ति ओढून घेतली. त्याबरोबर, अहिमाणिक पूर्वीप्रमाणें जशाचा तसा झाला. पांच पाट काढून त्या माळिणीला गांवाबाहेर नेऊन शासन केलें. त्या माळिणीच्या नांवानें त्या गांवांतील लोक अजूनहि खडे फोडतात.

मार्गीं पांथ गतागतीं श्रवणिं हे वार्ता स्वयें ऐकिती,
ठेले मारिति त्या स्थळीं तिजवरी, अद्याप ही निंदिती ॥

अहिमणीला पुरुषवेषधारी पाहिल्याबरोबर, शशिसेना आपला शिलेदारी बाणा विसरली. जी उघडीक करण्यास अन्यथा ती कधीं हि न धजती, ती करण्यास नवऱ्याचा आधार मिळतांक्षणींच शशिसेना एकदम तयार झाली.

एकान्तीं नृपकन्यकेप्रति तिणें वेगें कथा आपली
आदिप्रांत परंपरेण अवघी तत्काळ सांगीतली! ॥

ती कथा ऐकून दगडालाहि पाझर फुटता! राजा, राणी व राजकन्या हीं तर माणसेंच. त्यांना शशिसेनेची हृदयद्रावक कथा ऐकून फारच वाईट वाटलें. राजानें देशोदेशींच्या राजांचे व सामंतांचे चित्रपट चित्रागारांतून आणविले आणि आपली खात्री करून घेतली.

पाहे जौं अमरावतीपतिसभा संपूर्ण चित्रांतरीं
राजाची अवशेषदृष्टि पडली सामंतपुत्रावरी ॥
देखे तद्वत रूप, कांति, समता प्रत्यक्ष चित्रांशिं गे!
भेटे संशय टांकुनी अहिमणीला तौं नराधीश गे! ॥

अहिमणि अमरावतीकाराच्या प्रधानाचा पुत्र आहे व शशिसेना अमरावतीकारांची कन्या आहे, अशी त्या राजाची खात्री झाली. मग राजानें अहिमणीला आपला जावाई केलें.

सन्मानना करुनियां अहिमाणिकाला
वेगें समर्पिलि तया मग राजबाला ॥
राणी अणी नृपति दोघइं वीनवीती
" अंगीकृतं सुकृतिनः परिपालयंति " ॥

येणेंप्रमाणें ह्या सगळ्याचा शेवट गोड झाला !

राज्यांत त्या नृपतिस्नेहवशात्सुखानें
दोघां स्त्रियांसहित गे ! अहिमाणिकानें ॥
नाना विलाससुखसंभ्रमराजलीला
भोगूनियां कितिक वासर वास केला ॥

पण, निरतिशय सुखांत हि दुःख कालविण्याची दुष्टा दैवाला खोडच लागलेली आहे. अहिमणी अमरावतीस अवतरण्यापूर्वी नागलोकीं होता, असें पूर्वी सांगितलेंच आहे.

पाताळीं पहिली वधू अहिमणीचीं नागकन्या असे
भर्तारास न देखुनी विरहिणी व्याकूळ झाली असे ॥

तिनें सर्व त्रिभुवन धुंडाळलें. शेवटीं अमुक अमुक स्थलीं अहिमाणिक आहे असें तिला कळलें. तेव्हां तेथें तिनें त्याला गांठलें व पूर्वीचा वृत्तान्त ती त्याला सांगूं लागली. अंबेनें जेव्हां त्याला अमरावतीस जन्मास घातलें तेव्हां असा शाप देऊन ठेविला होता कीं,

जेव्हां ऐकाशि पूर्वजन्मकथन प्रायेण संभाषणीं
जाशी सत्वर तूं रसातळिं तईं ह्या मृत्युलोकाहुनी ॥

नागकन्येनें सांगूं घातलेला पूर्वजन्मवृत्तान्त अहिमणी जसजसा ऐके तसतशी त्याची मानवी वासना लोप पावत चालली व तो तिच्याबरोबर वेड्याप्रमाणें जाऊं लागला. नागकन्या मानवांना दिसत नाहींत. तेव्हां शशिसेनेला ती दिसली नाहीं, ह्यांत कांहीं नवल नाहीं. अहिमाणिक मात्र

भ्रमल्यासारखें करीत आहे, असें तिला दिसलें. अहिमणिकासाठीं जिणें इतकीं संकटें भोगिलीं तिच्या कपाळीं त्याला भ्रम झालेलाहि पहाण्याचें होतें. दैव हात धुवून पाठीस लागतें ह्मणतात तें हेंच! संध्याकालच्या शांतसमयीं अहिमणी घरांतून जो निघाला तो कोणाचें कांहींएक न ऐकतां तडक नदीवर गेला. त्याच्या पाठीमागून शशिसेनाहि बिचारी गेली. पण तिशीं एक अक्षरहि न बोलतां, तो नदीच्या थडीवर उभा राहिला आणि " तुझी माझी हीच शेवटची भेट " असें बोलून डोहांत गडप झाला. मागच्याप्रमाणें ह्याहि वेळीं कोण्या चंडाळिणीनें कांहीं जादूटोणा केला असावा, असें शशिसेनेला वाटलें.

विहाय परदेशि ह्या निखिल प्रेमपाशाहुनी
निराश मज शेवटीं करुन जाशि तूं टाकुनी ॥
निराश्रित मि येकुली युवति जाउं कोणीकडे
असें शशिमुखी ह्मणे अणि बसूनि तीरीं रडे ॥

शशिसेना जातीनें मनाची बळकट खरी, पण ह्या अनन्वित गहजबानें तिच्याहि मनाची सांखळी तुटली आणि ती भ्रमानें इतस्ततः हिंडूं लागली. अन्न नाहीं, पाणी नाहीं, आंथरुण नाहीं, पांघरुण नाहीं, अशी ती

जातां जातां कितिक दिवसां एकली शीणलीसी
पाहे गंगातट सुघटसा वृक्षछाया बरीशी ॥

आणि तेथें बसून,

अति कातर होउनियां रडते!

तों कांहीं काळानें तेथें एक वृद्ध तपस्वी स्नानार्थ पातला. स्नान, संध्या व समाधि आटोपून परत जाणार तों त्याची नजर इच्याकडे गेली. विचारपूस करतां, तिचा सारा वृत्तांत त्याला कळला, व त्याला हिचीं दुःखें पाहून पराकाष्ठेचा कळवळा आला! ह्मटलें आहे,

ब्राह्मणस्य हृदयं नवनीतम्!

वृद्ध ब्राह्मण ह्मणाला, " मुली, भिऊं नकोस, धीर धर, तुला एक मंत्र देतों, तो जप, ह्मणजे ह्या हि संकटांतून तरून जाशील ".

अर्से वाक्य ऐकूनियां त्या ऋषीचें
तिणें त्या क्षणीं स्नान केलें नदीचें ॥
तपस्वी मनस्वी दयावंत जाला
तयापासुनी मंत्र घे राजबाला ॥
चहूंकडे घोर अरण्य मोठें
मनुष्य जेथें दिवसा न भेटें ॥
नदीतटीं रात्रि न चंद्रवंती
तेथें जपे मंत्र सकामवंती ॥
नदंति निःशंक वनांत शृंगी
तरी न मानी भय अंतरंगीं ॥
विहाय आहार, तहान, निद्रा
सकाम ध्याते कृतयोगमुद्रा ॥
आराधितां इष्ट अतिप्रयासें
तपस्विनी दुर्बळशी विभासे ॥
दिसंदिसा क्षीण शरीरवल्ली
अरुंधतीहून विशेष जाली ॥

उग्र तपाची अशी ही सीमा झालेली पाहून, त्या अरण्यांतल्या वनदेवता प्रसन्न झाल्या आणि त्यांनीं तिला सर्वांची आदिमाता जी त्रिपुरसुंदरी तिच्याकडे नेलें. त्रिपुरसुंदरी ही वनदेवतांची मुख्य राणी. त्यांची भीड तिला कधींहि तुटत नाहीं. त्यांनीं शशिसेनेच्या वतीनें त्रिपुरसुंदरीची बहुत विनवणी केली, तेव्हां,

वरं ब्रूहि होतांच आकाशवाणी
नरेंद्रात्मजा कांत देहीति मागे ॥
त्याक्षणीं मग तथास्तुहि वाणी
ऐकिली अवचिती अवसर्णी ॥

अंबाबाईनें वनदेवतांना शशिसेनेचा नवरा नागलोकांतून शशिसेनेला आणून देण्याला सांगण्याचा अवकाश, कीं त्या दयाळू देवता झटकन नागलोकीं गेल्या आणि अहिमाणिकाला शशिसेनेकडे घेऊन येत्या झाल्या!

फिरून नृपसुता जों आपुला कांत पाहे
कुवलयदलनेत्रीं अश्रु अत्यंत वाहे ॥
विगलित जलधारा लोचनीं नावरीत
विरहदहनज्वाला आपुल्या वीझवी ते ॥

हा चमत्कार केल्यावर, वनदेवता शशिसेनेला विचारतात कीं " बाई, तुला आणि तुझ्या नवऱ्याला येथून आतां कोठें पोचतें करावें, तें सांग. "

ह्मण मग शशिसेना सादरें भक्तिभावें
निरवधि मम भागीं सानुकूलीं असावें ॥
प्रियतम मम जेथें गुप्त झाला भुताेई
पतिसहित करावें पावतें त्याच ठायीं ॥

ही इच्छा ऐकतांच,

तेथेंच यक्षयुवती उपकारवंती
दोघां जणांसहि प्रविष्ट करून देती ॥

मग

विदा झाल्या तेथें झटिति अवघ्या यक्षवनिता
करूनीयां आशीर्वचन कृपया रात्रि सरता ॥

दिवसा मनुष्यांच्या वाऱ्याला हि उभें राहावयाचें नाहीं, असा वनदेवतांचा नियमच आहे. तो प्रतिभावान कवींनाच तेवढा माहीत असतो.

नदीतीराला पुनः परत येईतोंपर्यंत काय झालें त्याचें भान अहिमाणिकाला यत्किंचित्हि नव्हतें. नागलोकची स्मृति निराळी व मनुष्यलोकची स्मृति निराळी. नंतर शशिसेना व अहिमाणिक नदीवरून नगरांत गेलीं आणि राजा, राणी व राजकन्या ह्यांना भेटलीं. त्यांना ह्या दोघांचा चमत्कार कांहींच कळेना. मग नागलोकींचा वृत्तांत, तेथें गेलों कसें व परत आलों कसें, वगैरे अहिमाणिकानें सर्वांना सांगितला. तो ऐकून, सर्व लोकांना परम आश्चर्य वाटलें.

नाना उत्सव सर्व लोक करिती गावांत गे! त्या दिशीं!

इतकीं लोकप्रिय शशिसेना व अहिमाणिक तेथें झालीं होतीं. त्यांच्यावर ओढवलेल्या संकटानें तीं जनपदांच्या प्रेमाला जास्तच पात्र झालीं.

नंतर कांहीं काळ त्या नगरींत राहून, शशिसेना व अहिमणी अमरावतीला जाण्याची इच्छा दर्शवूं लागलीं. आईबापांना भेटून बरींच वर्षें लोटलीं होतीं आणि आतां त्यांना भेटण्यासहि कांहीं हरकत नव्हती. राजाराणी यांचा निरोप घेऊन, नव्या नवरीसह अहिमणी व शशिकला थोडक्याच दिवसांच्या प्रवासानें अमरावतीत पोंचली आणि आपल्या मातापितरांस आपल्या आगमनाची वार्ता पाठवितीं झालीं. शशिकलेचें विलक्षण वर्तन अमरावतीकर राजास जरासें आवडलें नव्हतें. पण राणीनें त्याची समजूत केली.

कन्यका हरुन पार्थिव नेती
सर्वथा प्रकट दान न घेती ॥
सर्व राजकुळसंभवदारा
स्वेच्छया वरिति राजकुमारा ॥
राजवंश अति उत्तम क्षत्री
बंधुवर्ग तुमचा असे मंत्री ॥
आपुल्या मनिं विचार कराना
यांत कांहीं अनरीति दिसेना ॥

राणीचें हें बोलणें ऐकून राजा संतोष पावला आणि शशिसेना व अहिमाणिक यांस सामोरे जाऊन घेऊन येण्यास त्यानें कित्येक सरदार पाठविले. वाजतगाजत वाड्यांत आल्यावर सर्वांच्या भेटी झाल्या आणि सर्वांस आनंदाचें एकच भरतें आलें. कवि ह्मणतो:—

झालें तयांस मग जें सुख सर्व भावें
तैसेंच हें जगत सर्व सुखी करावें ॥

९ काव्य इतकें साधें, सोपें, सरळ, रसाळ, व अकृत्रिम आहे कीं, महाराष्ट्रांतील सन्हृदयांच्या प्रीतीला तें सर्वथा पात्र होईल. इतकें

दिवस हें काव्य अज्ञात रहावें, ही मोठी दुर्भाग्याची गोष्ट होती. महाराष्ट्रसारस्वताच्या संशोधनाची अद्याप बाल्यावस्था आहे, ह्यांत काहीचाहि संशय नाहीं. स्वतंत्र काव्यें, व स्वतंत्र नाटकें मराठींत नाहींत, असें विधान करणें, ह्यापुढें निव्वळ निराधार होय.

१० " शशिसेने " चे एकंदर ९८२ श्लोक आहेत. ह्मणजे रघुवंशादि महाकाव्यांच्या सहा किंवा सात सर्गांइतका मजकूर ह्या काव्यांत आहे. कवि वर्णनें करण्यांत हात इतका आखुडता धरतो कीं तो जास्त विस्तार करता तर बहार झाली असती, असें वाटूं लागतें. सबंद काव्यांत एकहि ओळ अशी नाहीं कीं जी सन्हृदयांना नकोशी वाटेल. प्रत्येक शब्द व प्रत्येक ओळ इतक्या चतुराईनें गोंविली आहे कीं अध्याहृत अर्थाचे पूर मनांत वाहूं लागतात व त्यांची शब्दद्वारा कवीनें व्यक्ति केली नाहीं ह्मणून कवीवर रागावावेंसें वाटतें. मोठीं यमकें, विचित्र श्लेष, हटादाकृष्ट अलंकार, ह्या काव्यांत एकहि नाहीं. येथून तेथून सर्वत्र स्वभावोक्ति आहे.

११ ह्या काव्यांत एक मात्र दोष आहे. संभोगशृंगारपर दहा पंधरा श्लोक कवीनें रचिले आहेत. त्यांतहि काव्य आहेच. परंतु सभ्यांना क्षणभर असभ्यपरिचय झाल्याचा खेद होतो. हें जर गालबोट ह्या काव्याला लागलें नसतें, तर कुलीन स्त्रियांच्या उत्संगप्रदेशावरीहि बिनबोभाट खेळण्यास हें पात्र झालें असतें. अथेन्समधील देवादिकांच्या नग्न मूर्ति पहातांना पाश्चात्त्य कुलस्त्रियांना जो नेत्रसंताप होईल त्याच्या शतपट प्रस्तुत काव्यांतील संभोगपर अश्लील पद्यें ऐकून महाराष्ट्रीय कुलवधूंना होईल. परंतु, त्याला उपाय नाहीं. निरंकुशा हि कवयः । घरचें गुणवान पण किंचित् भकलेलें माणूस आहे. त्याला संभाळून घेतलें पाहिजे.

---

# सोनगीरच्या किल्यावरील शिलालेख

१ खानदेशांत धुळें शहाराच्या उत्तरेस सहा कोसांवर आग्रा रस्त्यावर सोनगीर नावाचें एक मोठेंसें गांव आहे. गांवाला त्याच नांवाच्या किल्याचा आश्रय आहे. किल्याच्या उत्तरेकडील तटाच्या बुरुजाच्या आंत एक मराठी शिलालेख आहे. शिलालेखाच्या चार ओळी शाबूत असून, पुढील ओळी ज्या दुसऱ्या शिळेवर खोदल्या असाव्या ती शिळा दुसऱ्या जागीं कोठें तरी पडली असावी असा तर्क करावा लागतो. सध्यां किल्ला पडकळ स्थितींत असून, त्यावर एकहि इमारत नाहीं. फक्त दोन विहिरी आहेत, त्यांना नवरानवरीच्या विहिरी ह्मणतात. किल्ला शंभर सवाशे फूट रुंद, सवा फर्लांग लांब व पांचशे फूट उंच आहे. शिलालेख येणेंप्रमाणें:—

१ श्रीशकें १४९७ युवा नाम संवत्सरे मार्गशिर शुद्ध पंच—
२ मी शोभनदिने राजश्री उग्रसेन रविरावो सेणी—
३ यें हुडा केना जयश्री शुभं भवतु श्रीरस्तु ॥ ॰
४ तत्सुत मानसिंगुजी महाप्रतापी अभूत विरजी ( + )

२ उग्रसेन रविराव सेणीय ह्मणजे सैनिक ह्मणजे सेनानायक ह्यानें १४९७ त हुडा ह्मणजे बुरुज केना ह्मणजे ( खानदेशी भाषेंत ) केला. त्याचा पुत्र मानसिंगुजी मोठा प्रतापी होता. तो १४९७ त वारला होता "विरजी" पुढील एक अक्षर फुटलें आहे. "मानसिंगुजी" नें काय पराक्रम केला तें पुढील शिलेवर तपशिलवार खोदलें असावें. पुढील शिला उपलब्ध नाहीं. शिला सुमारें अडीच फूट लांब व $\frac{3}{4}$ फूट रुंद आहे. प्रत्येक अक्षर एक इंच रुंद व दीड इंच उंच आहे. अक्षराचें वळण एकनाथाच्या वेळचें आहे. रविराव हे उग्रसेनाचें अडनाव असावें. उग्रसेन त्याकाळचा कोणी एक मराठा सरदार असून, पराक्रमी होता त्याचा मुलगा मानसिंगुजी त्याच्याचसारखा प्रतापी होता, असें अनुमान होतें.

# बाहाळ येथील गढीवरील लेख



१ चाळीसगावाच्या उत्तरेस पंधरा मैलावर बाहाळ ह्मणून एक गाव गिरणेच्या काठीं आहे. तेथील मोडक्या व पडित गढीच्या दगडी भिंतीवर खालील शिलालेख आहे.

१ श्रीगणेशायनमः ॥ श्रीमंत राजे—

२ श्री राव केरोजी पंवार वीश्वासराव

३ जागीरदार प्रांत बाहाळ सुरसन सबै—

४ न मया अलफ सन ११७९ सके

५ १६९१ विरोधी नाम संवत्सरे मार्गे—

६ स्वर शुध ८ अष्टमी माहाकाळ किले

७ मजकुरास कानूनविले विद्यमान

८ घनः शाम त्रिंबक फौजदार प्रा मजकूर

९ सरकार कसबे करमडू कारीगर मौजे वाघळीची उत्तर.

२ शक १६९१ त केरोजी पवार बाहाळचा जागीरदार होता व घनः शाम त्रिंबक फौजदार होता. चाळीसगावापासून १०।१५ मैलावर असणाऱ्या वाघळी गांवाच्या कारागिरांच्या हातून किल्ला बांधून घेतला. किल्याचें नांव माहाकाळ. करमडू हें गांव चाळीसगावाच्या उत्तरेस वीस पंचवीस मैल आहे.

३ ह्याच गढीवर एक जुनें हेमाडपंती देऊळ आहे. त्यावर शक ११४४ चा यादवांचा एक संस्कृत शिलालेख आहे. तो छापलेला आहे.

# लक्ष्मीनारायणकल्याण
# नाटक



१ प्रस्तुत नाटकाची पोथी तंजावर येथील एका रामदासी मठांतील आहे. ह्याची एक नक्कल तंजावरच्या सरस्वतीमंदिरांत ह्मणजे ग्रंथ-संग्रहांत आहे.

२ हें नाटक एकांकी आहे. हें तंजावरच्या शाहुराजाच्या वेळीं झालेलें आहे. ह्यांत " भोंसलकुलशाहदेवत्रिलोचन " असा शाहूराजा-संबंधानें उल्लेख आला आहे. हा शाहूराजा व्यंकोजीराजाचा वडील मुलगा. व्यंकोजी शक १६०४ त वारला. त्यानंतर शाहू राज्यावर आला. प्रस्तुत नाटक शाहूराजानें रचिलें, असें सांगतात. कदाचित् कोण्या राजाश्रित कवीनें हें नाटक करून शाहूराजास अर्पिलें असेल. परंतु तंजावरचा शाहूराजा उत्तम व्युत्पन्न होता, असें त्यानें रचलेल्या इतर संस्कृत प्राकृत ग्रंथांवरून दिसतें. तेव्हां हें नाटकही त्यानेंच रचिलें असेल. नाटकांत एका पदाच्या शेवटीं शाहूचें नांव आलें आहे. त्यावरून नाटककर्तृत्व शाहूकडे जातें, असें ठाम विधान करितां येत नाहीं, हें खरें आहे. तें कांहीं असो. हें नाटक शक १६०४ च्या नंतर दहापांच वर्षांत रचलेलें आहे.

३ ह्या नाटकास नाटक ही संज्ञा द्यावी किंवा नाहीं, ह्याचा संशय उत्पन्न होण्यासारखा आहे. परंतु ज्याअर्थीं दोन पात्रांची संभाषणें ह्यांत दहा पंधरा स्थलीं आलीं आहेत—व पात्रांचें संभाषण, गद्य व पद्य, नाटकाच्या घटकावयांपैकीं आहे—त्याअर्थीं नाटक ही संज्ञा ह्या वस्तूस देणें जरूर आहे. ह्यांत इतर पात्रांपेक्षां सूत्रधाराचें काम फार आहे. स्थलोस्थलीं संविधान जुळविण्याकरितां सूत्रधार कथाभाग सांगत आहे.

हें काम यूरोपियन नाटकांत कंसांत सूचनारूपानें गद्यांत लिहून भागवितात. यूरोपीयन नाटकांतील ही सूचना नाटकाचा कर्ताच करीत असतो. येथें सूत्रधार करीत आहे. कारण यूरोपीयन नाटकांत सूत्रधार नसतो.

४ सांगलींतील विष्णुदास भाव्यांच्या पूर्वीं मराठींत नाटककार, ज्ञानदेवापासून विष्णुदास भाव्यांपर्यंत अनेक झालेले आहेत. तुकारामानें स्त्रीचें सोंग घेणाऱ्या नटाचें तोंड पाहूं नये ह्मणून उद्गार आपल्या अभंगांत काढिले आहेत—ज्ञानेश्वरानें काव्यनाटकांचा मोठ्या आदरानें उल्लेख केला आहे. कर्नाटकासंबंधानें व्युत्पत्ति करताना रामदासानें नाटकांचा उल्लेख केला आहे. ह्यावरून महाराष्ट्रांत नाटकें आज सहाशें वर्षें होत आलीं आहेत, असें दिसतें. कवींच्या उल्लेखावरून नाटकांची अनुमानसिद्धि केव्हांहि करतां येण्यायोगी होतीच. सध्यां हें नाटक छापल्यानें, प्रत्यक्षसिद्धि होत आहे. हें दृश्य नाटक आहे—श्राव्य नाहीं. सबब, संवादापेक्षां सूत्रधाराच्या सूचनाच ह्या नाटकांत अति आहेत.

---

नाटक

# लक्ष्मीनारायणकल्याण.

श्रीगुरुभ्योनमः । शुभमस्तु । श्रीरस्तु ।

## नांदी.

जय जलधिगंभीर ।
जय सुरुचिराकार ।
जय सकलजनाधार ।
जय रघुवीर ।
जय शामलशरीर ।
जय रूपजितमार ।
जय असुरसंहार ।
जय जयावीर ॥ १ ॥

जय अंबुजनेत्र ।
जय इंदुनिभवक्त्रा ।
जय पावनचारित्र ।
जय सुचारित्र ।
जय जनजलजमित्र ।
जय जानकीकलत्र ।
जय तारितगोत्र ।
जय नम पवित्र ॥ २ ॥

जय दशरथबाल ।
जय कीर्तिविशाल ।
जय कविजनलोल ।
जय सुशील ।

जय शमितअरिजाल ।
जय शशिनिभफाल ।
जय करुणाविशाल ।
जय भक्तानुकूल ॥ ३ ॥

## मंगलम्

जय महादेव शंकर ते मंगलम् ।
जय महनीयचरित ते मंगलम् ।
जय कर्पूरगौररूप ते मंगलम् ।
जय कल्याणबलचाप ते मंगलम् ।
जय सूर्यमालाभूष ते मंगलम् ॥ १ ॥

इंदुशेखर ते मंगलम् ।
इभमुखजनक ते मंगलम् ।
वंदितसुरवृंद ते मंगलम् ॥ २ ॥

पार्वतीप्राणनाथ ते मंगलम् ।
पालितनिजदास ते मंगलम् ॥ ३ ॥

सूत्रधारवचनः—

येणें रीती नांद्यारंभ करून लक्ष्मीनारायणकल्याणनाटक निर्विघ्नसिद्धि सर्व जनांस संतोष होयाकारणें इष्ट देवतांची प्रार्थना करितो पद्यः—

वंदितो मी एकदंताचे पाय ।
अनेकदंत तो मज, सहाय ।
हरितसे सर्व विघ्नें अपाय ।
दया करी तो सुप्रसन्न गणराय ॥

येणें रीती विघ्नेश्वराची प्रार्थना केल्यानंतर सरस्वतीप्रार्थना करितो. पद्यः—

विश्ववंद्यजननी सरस्वती
वीणापुस्तक धरी दोनी हातीं ।

वंदितों तिचे चरण ध्यानातें ।
दया करिते मजवरि याजनातें ॥

येणे रीती सरस्वतीची प्रार्थना केल्यानंतर ईश्वराची प्रार्थना करितो. पद्य:—

वंदितो महदद्भुत देवता ।
अर्धतनु स्त्रीपुरुषार्थ संयुता ।
येकपार्श्वे व्याघ्रचर्मान्यकनकांबरा ।
वामपार्श्वे नीलकेश सव्य जटाभरा ॥
सानंदगिरिजायुक्तः सस्मितप्रियभाषणः ।
शिवः करोतु कल्याणं चंद्रार्धकृतशेखरः ॥

येणें रीती ईश्वराची प्रार्थना केल्यानंतर महाविष्णूची प्रार्थना करितो. पद्य:—

नमो वेदैकवेद्याय अवन्युद्धरणाय च ।
आपदामपहर्त्रेऽस्मै वासुदेवाय मंगलम् ॥

येणें रीती निर्विघ्नसिद्ध्यर्थे लक्ष्मीनारायणकल्याणातें आदिभक्तें निजभक्तीं करुन वाङ्माधुरी अर्थपुष्टीकारणें प्रार्थना केली अस्तां आनंदेकरून विघ्नराज नाट्यरंग नृत्य करीत येतो. पद्य:—

॥ दरु ॥

संतोषे नृत्य करी ।
शमवुनि विघ्नसरी ।
दंतीमुख आला देव ।
दनुज संहारी ॥ १ ॥
सिंदूर माथा धरी ।
शशिकला शोभे बरी ।
मंद मदधार कपोलीं ।
मधुकर हारी ॥ २ ॥
पाशांकुश परुष धरी ।
पापसंख्या सकल हरी ।
मूषकवाहन मोदक करीं ॥ ३ ॥

सर्वदा दया करी ।
सर्प शोभे दोंदावरी ।
पार्वतीशिवसुत पहा रंगांतरीं ॥ ४ ॥

येणें रीती विघ्नेश्वर आल्यानंतर कथा ऐसीजे. श्रीमन्नारायण जगदाधार निजसभास्थलास आनंदेकरून येताति ह्मणवून सभास्थांस सावध करावयाकारणें कंचुकिराय विनोदी येतो. पहाः—

॥ दरु ॥

पट्टे नाम धरी ॥
अट्टाहास करी ॥
काठी घेवुनी करी ॥
कंचुकी आला सभांतरी ॥ १ ॥
विकटा बहुत करी ।
विष्णुध्यान करी ।
सकळा सेंदूर करी ।
संतोषानें उड्या मारी ॥ २ ॥

**सूत्रधारः**— ( नालगु भाष लटिके वानिनि अडिगेदि ), तूं कोण रे ?

**कं० वि०ः**— तूं कोण रे ?

**सूत्रधारः**— आह्मीं भागवत.

**कं०ः**— भाग्यवंत जाले तरी, मंदिल कोठें ? चादर कोठें ? झगा कोठें ?

**सूत्र०ः**— अरे, भाग्यवंत नव्हे रे. आह्मी दशावतार.

**कं०ः**— अरे, दश जाले तरी कोठें रे ?

**सूत्र०ः**— हेंगे तरु बुरु नट्टु मुट्टु हेंगे मृदंग.

**कं०ः**— तरु बुरु नट्टु मुट्टु मीरु देंगु.

**सूत्र०ः**— अरे, आह्मांस पुसतोस कां ? तू कोण ? तुझें नांव काय ? सांग.

कं०:— माझें नांव कंचुकीराय विनोदी.

सूत्र०:— काशास आलास रे?

कं०:— मी, श्रीमन्नारायण जगदाधार सभेस येताती, सभा सिद्ध करायाकारणें आलों.

सूत्र०:— सभासिद्धि काय करावी रे?

कं०:— पाणी बांधावें! तोरण सिंपावें! केळीचे खांब घालावे!

सूत्र०:— तसें नव्हे रे, कंचुकी. तोरणें बांधावीं; पाणी सिंपावें; केळीचें खांब लावावे.

कं:०— अरे! तसेंच धगडीच्या तसेंच.

सूत्र०:— अरे कंचुकी, तूं सांगितल्याप्रमाणें सभासिद्ध केलीहे. तूं जावून, विष्णूस सांगून, बोलावून आणि.

कं०:— अवश्य. तसेंच करितों.

सू०:— येणें रीती कंचुकीराय विनोदी येवून सभास्थांस सावध केल्यानंतर, श्रीमहाविष्णु सकलालंकारभूषित होवून संतोषेकरून सकल जनास दर्शन द्यायास निज सभा शोभिवंत करावयाकारणें येतील पहा.

सजलजलदशामा सर्वलोकाभिराम
सुरुचिरगुणधामा शत्रुसंघासुभीमा ।
स्वजनजलधिसोमा शांतमूर्तिर्महीमा
सललितगुणसोमा वंदितो सार्वभौमा ॥

॥ दरु ॥

भजारे जन हो देवाधिदेवा ।
भजा रे जन हो ।
चंदनाची घेऊनि उटी ।
चक्रपाणी रत्न मुकुटी ।
मंदस्मित मुखभर विटी ।
वंदितो देव कोट्यानुकोटी ॥ १ ॥

अंगद भुजयुगला ।
अमूल्य कौस्तुभ गळा ।
मंगलमय पुतळा ।
शृंगारिला पहा डोळा ॥ २ ॥
कासे पीतांबर पिवळा ।
कस्तूरीचा कपाळीं टिळा ।
दासजनासि सकळा ।
आशा पुरवी वेळोवेळा ॥ ३ ॥
मकर–कुंडलें कानीं ।
मदनजनक सारंगपाणी ।
अकलंक गुणखाणी ।
आरूढ गरुडवाहनी ॥ ४ ॥

**कटिव०:**— स्वामी, सभा सिद्ध केलाहे.

**विष्णुवचन:**— अरे कंचुकी, नृत्य पहावयाची वासना आहे; देवांगनास बोलावून आणी.

**कटिवचन:**— स्वामी, आज्ञेप्रमाणें बोलावून आणितो.

**सूत्रधार:**— येणें रीती महाविष्णु सभेस आल्यानंतर सभारंजन-कौतुकासाठीं अप्सरा नृत्य दाखवायास येताति. पहा:—

पीनस्तनी ते पिकभाषणी ते ।
पद्मानना ते पल्लव आधरा ते ॥
नीलालका ते नीरजपत्रनेत्रे
सुशोभिते पाह सुरांगनाते ॥ १ ॥
टिळा लाविला कस्तुरीचा ललाटीं
मुखीं घेतसे कापुरें युक्त वीटी ।
नानाविधें भूषण लेत कोटी
सुशोभिते नेमुनि पाह धट्टी ॥ २ ॥

॥ दरु ॥

देवांगना येताति पहा ।
विष्णुसभेसी ।
लेउनि वस्ता सकळा ।
लाउनि कस्तुरिटिळा ॥ १ ॥
चंदन चर्चुनि उटी ।
मंद गात कलकंठी ॥ २ ॥
मंदहास कुंदरदनपंक्ती ।
इंदुमुखी तनु कटितटीं ।
अकलंकनिजरूपां सकलजनमनमोहने ।
सकला यांच्या विद्यापरिमाणें ।
व्याकुल करितां मुनि जन मानें ॥ ३ ॥

॥ दरुवु ॥

मंद हंसगमना त्या ।
कुंदरदना इंदुमुखी शोभना त्या ।
नयनकटाक्षबाण मदनास्त्रदेवता त्या ।
संगीतनिपुण मंदराद्रिकुचोपमा त्या ।
भूषणाचें भूषण त्या ।
शृंगारुनि भूमंडळीं शोभती त्या ।
हरण करिती सकलजनमना ।
सभेसि आल्या आनंदहरिणलोचना ।

कटिमुखात्:—सलामुदरु ।

जयजलदनिभ शरीरा ।
जय जलनिधिगंभीरा ।
जय असुरकुलसंहारा ।
जय आदिमत्स्यावतारा ।
निसरिरिसमगागरिरिस ।

गमपदथपमगामापानिसरिरिस ।
निरिसानिधधपसानिधपमपध ।
पमगामगागरिस ।
सल्लामुसल्लामुरे ।
देवादिदेवा ।

॥ चोलु ॥

तधिंद्ताहत्त किंटतकझन् ।
तहतधिंद्त्तकझेनुता ।
तदिमिधिमिततक ।
धल्लांगुत्ताकिटतक ।
तांदित्ताहतकीटकजनु ।
झनुधणधिमितक ।
तोंगडकिडतकितधिंगिणतों ।
सल्लामुसल्लामुरे ।

॥ अभिनयपदालु ॥

मन माझे मोहिलें त्यानें
मन माझें मोहिलें त्यानें मदनजनकानें ।
अनंगताप न सोसे देहासि ।
आणि तूं आतां ॥ १ ॥
कर आलिंगूं इच्छितातीं ।
कमलनेत्र अनिमिष पाहतातीं ।
वरस्तनाय जृंभतातीं ।
आणि तूं आतां ॥ २ ॥
तनिं रोमोद्गम होतातीं ।
तरुणी अधरामृत भरितातीं ।
मनीं नाहीं विचारितीं ।
त्यासि तूं आणि आतां ॥ ३ ॥

कधीं येईल दया त्यासी ।
मन माझे उल्हासे ।
आधिं आलिंगन दे ह्मण तूं त्यासि ।
आणि तूं आतां ॥ ४ ॥
माझी बाधा विनवी त्यासि ।
माझे प्राणनाथासि ।
आजिया ह्मण रामा यासी ।
आणि तूं आतां ॥ ५ ॥

॥ दरुदु ॥

आणि जागे सखितूं आतां मज राहवेना ।
अनंग ताप करतो मजला ।
मनि किति धैर्य धरावें ।
माझी बाधा सांगेल कोण ।
मदन गोपाळाला ॥ १ ॥
मलयानिल बहु बाधा करि, माझे सखिये ।
मधुकर झंकार निवारी ।
लौकरि चंद्रकिरणभय निवारी ॥ २ ॥
सरसशृंगार मजला काशासि ।
पतिवांचुन साजेना माझिया देहासि ।
वरप्रीतीनें ये ह्मणे वासुदेवासि ।
मजसी रमया ॥ ३ ॥

**स्वामीः**-- अरे कंचुकी, जेठ्यांचा तमाशा पहायाची वासना आहे. मल्ल पाचारुनि ये.

**कंचुकीः**-- अवश्य तसेचि करितों.

**सूत्रधारः**— येणें रीती विष्णूचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन मल्ल पाचारिले अतां आपाल्ले पराक्रम दाखवायास मल्ल येताति पहाः—

॥ दरु ॥

तांबडि माती ते तालिमि करुनि ।
तांबडि वोलि रुमाल बांधुनि ।
रवाब अंतर पिगडी फिरुन ।
काचे कमेरेसि घट्टि बांधुन ।
मल्ल आले सभेसी ॥

येणें रीती जेठी आले. तदनंतर विष्णुसभेस ब्रह्मा अकस्मात् आला. पद्यः--

॥ दरु ॥

ब्रह्मा आला विष्णुसभेसी ।
जपमाळ हातीं धरी ।
जया हरीचे स्मरण करी ।
कपाळीं गोपीचंदन धरी ।
कमलासन कमंडल कारी ॥ १ ॥
चारी मुख स्फुट मोहने ।
चारी वेद एकसमयानें ।
वारिजासन वेग कानें ।
वंदिती हरिचरणा ॥ २ ॥

येणें रीती ब्रह्मा येवून विष्णुस वंदितो. पद्यः--

शांताकारं भुजगशयनं इ. इ. इ.

**विष्णुः**— कुमारा! चिरंजीव. निज उद्योग टाकून येथें यायास कारण काय? सचिंतसें तुझें मुख दिसतें. यास कारण काय हें सांग.

**ब्रह्मा**:-- सर्वा जनांत अपवाद एक निर्माण जालाहे आइकून न सोसावति. तुम्हांपासी येऊन त्याचा परिहार करावा, ह्मणोन आलों. अभय दिल्ह्या बोलेन.

**विष्णुः**—अवश्य. भिऊं नको. सांग–

ब्रह्मा:— ॥ दरुवु ॥

अभय मज दिल्हा ।
अंतस्त सांघेन विष्णुदेवा ।
अति शुभकार्यसिद्धि करी ।
शुभोदय करी ॥ १ ॥
मायेविण पुत्र मज ह्मणताति जाण विष्णुदेवा ।
यासि काय उपाय करावा म्या विष्णुदेवा ॥ २ ॥
विनति आइक वरी ।
विवाहसिद्धि करी विष्णुदेवा ।
आजि मन माझें स्वस्थ करी ।
माझी माय दाखवा हरी ।
विष्णुदेवा ॥ ३ ॥

॥ यादरुचें वचन ॥

सूत्रधार:— येणें रीती विष्णू ब्रह्मासि बोलतो. पहा.

॥ दरु ॥

उत्तम गोष्टि सांगितली त्वां चतुर्मुखा ।
माझें उचितसें आलें मना चतुर्मुखा ॥ १ ॥
माझें मनीं ऐसेंचि होतें चतुर्मुखा ।
माझे महत्वयोग्य स्त्री नाहीं ह्मणून होतों चतुर्मुखा ॥ २ ॥
वय रूप गुणयुक्त असेल चतुर्मुखा ।
अवश्य विवाह करीन मी तीसीं चतुर्मुखा ॥ ३ ॥

॥ यादरुचें वचन ॥

ब्रह्मा:— अवश्य. तुह्मीं संमत जाला तेंच पुरें. तुह्मीं जैसी इच्छिता तैसीच तुह्मां योग्य स्त्री, आह्मां योग्य माता, मी पाहून आलों आहें. तुह्मीं पाहून मनल्या करा.

विष्णु:— त्वां पाहिलें असेल ते उचित उत्तम असेल तथापि, तूं पाहा ह्मणतोसि तरि अवश्य दाखीव, चतुर्मुखा.

सूत्रधारः— येणें रीतीं विष्णु आणि ब्रह्मा कन्या पहावयास चालिले.

॥ दरु ॥

वारिजासनेयानंदे ।
वासुदेवासहित मुदे ।
सरसाक्षिज गोविंदे ।
सादर पाहूं आले लोकवंदे ॥

येणें रीतीं ब्रह्मा विष्णू कन्या पाहून आले तदनंतर कथा ऐसी जेः— समुद्रराजकन्या लक्ष्मीदेवी सखीसहवर्तमान संतोषेकरून उद्यान वनास येते पहाः—

लेवुनी जडित सर्व भूषणें
नेसुनी कनकमयी वासनें ।
इंदु जिंकित दिनेश कांतिकरुनें
सिंधुकन्या येते क्रीडेकारणें ॥ १ ॥
सखीजन समुदाय घेउनें
लक्ष्मी कसी सादर संतोषानें ।
वन शोभिवंत करायाकारणें
मंद येते मदजगातिकरुनें ॥ २ ॥

॥ दरु ॥

कंदलित आनंदकरुनें मंदमंद ।
लक्ष्मी वंदितसे सकलसखीजन वर बंदे ॥ १ ॥
सकल शृंगार करुनि सादर ।
सादरकन्या येतसे ।
अकलंका सौंदर्यरूपा अखिलमान्या ॥ २ ॥
चंदन, कर्पूर, कस्तुरी चर्चुनी उटी घेउनी ।
इंदुवदना मंदहासमुख वेल्हाळ वीटी ॥ ३ ॥

॥ दरु ॥

राजहंसगमना ते ।
राजीवपत्रनेत्री ते ।

राजमुखी शोभते ते
रमारमणीते ॥ १ ॥
कलकंठी मृदु वचनी ।
कस्तुरीतिलक धरुनि ।
अलिकुलनील वेणी ।
अंबुजपाणी ॥ २ ॥
सादर शृंगार वानी ।
सकल सौंदर्य खानी ।
मुदें आली राजगमनी ।
मोरावानी ॥ ३ ॥

**सूत्रधारः**— येणें रीती लक्ष्मी देवी सखी सहवर्तमान उचित रम्य प्रदेशीं संतोषें येवून बसली. तें पाहून ब्रह्मा, विष्णुस दाखवितो. पहाः—

**ब्रह्माः**— स्वामी, म्या सांगितली ते कन्या सखीमध्यें मदनसायकसी दिसते तेच लक्ष्मी नामांकित समुद्रराजकन्या ते हेच.

**विष्णुः**—तों पहिलें सांगितलें तेव्हांच म्यां ह्मटलें कीं, तों पाहिलें असेल तें उचित उत्तम असेल तथापि, आतां पहातां, तों सांगितल्यापेक्षांहि यौवनरूपगुणाधिक हे स्त्रीरत्न आहे!

अकलंका हे कन्या रूपा अपूर्व आहे ।
सर्वा लोकीं इचे सारखी कवण स्त्री ती आहे ॥ १ ॥
इंदुमुखीचे स्तन इभकुंभ जणु वानी ।
मंदगतीनें जिंकिते मदगजगामिनी ॥ २ ॥
कलकंठा खंजना जिंकी कमनीयेनेत्रकरुन ।
अलिनीलवेणी जिंकी अमृत आपलें अधरानें ॥ ३ ॥
इला पाहिले आतां माझे मन न राहे येक क्षण ।
आलस्य करूं नको अति त्वरा करीं अंबुजासन ॥ ४ ॥

**सूत्रधारः**— येणें रीती लक्ष्मीस पाहून, वर्णून, विष्णू विरहाभिहत पहाः—

॥ दरु ॥

माझ्यानें न राहवे येक क्षण ।
हरिलें सतीनें माझें मन ।
तुझे यत्नेकरुन लवकरि करि हे संघट्टन ।
कामबाणें माझें तन अनुक्षण ।
पीडिताति बहु सोमाकिरण तपनासमान ।
तावितें माझें हेमपरि द्रवतें माझें मन ।
काय मी करूं ।
रमारमणी कधीं भेटेल रहस्यें मजसि येउन ॥ १ ॥
मलयानिल प्रलयानिलपरि उपद्रव करी ।
मलयजचंदन ताप करी ।
न रहे क्षणभरी ।
अलिकुल झंकार निवारी ।
किती मी सोसूं ।
सलालित तांबूल न साहे विडी भारी ॥ २ ॥
धीर धरूं किती? भेटेल केव्हां नारी रमणी मजसी येऊन।
करिन केव्हां वारिजासन तीचें अधरपान बहु संतोषानें।
सारा स्तन धरून कामक्रीडा सादर कधीं तिसी करीन ॥ ३ ॥

**सूत्रधारः**— येणें रीती विष्णूचें वचन आइकून ब्रह्मा बोला. पहाः—

**ब्रह्माः**— ऐका, स्वामी, काशास इतकी चिंता करितां. तुह्मास मानल्यां लग्नसिद्धी होयसा मी जावून यत्न करितो.

**विष्णुः**— अवश्य. याहून काय पाहिजे? विलंब न करितां बोलिल्याप्रमाणें शीघ्र जावून कार्यसिद्धि करून ये.

**सूत्रधारः**— येणें रीती विष्णूची आज्ञा घेऊन ब्रह्मा कन्येसी बोलायास येतो. पहाः—

॥ दरु ॥

अतिसंतोषेंकरून आला वारिजासन ।
मतिमंता कन्येचें मन घ्यायाकारणें ॥

येणें रीती ब्रह्मा लक्ष्मीपासीं गेल्यानंतर विष्णूचा विवाह होतो ह्मणून, वडे, पोळ्या, घारिगे यथेष्ट मिळेल ह्मणून, ब्राह्मण येतो. पहाः----

॥ दरु ॥

पट्टे वर्धन लाऊन ।
पचांग घेऊन ।
काठी टेकीत ।
बोचरा काशीभट्ट आला ।

**सूत्रधारः**— येणें रीती आपला भर्तार अगोधर येऊन, वडे, पोळ्या यथेष्ट खाईल ह्मणोन, ह्मातारी सवाष्णी येते. पहाः----

॥ दरु ॥

वांकडे बोचरे दांत वांकून चालते ते खोकित काठी हातीं ।
खाल बोलें बोलते ।

येणें रीती ब्रह्मा दुरून येतां पाहून सखी कन्यांसी बोलेत. पहाः--

**सखी**:—समुद्रराजकन्ये, त्रैलोक्यपितामहा कधीं येणार नव्हे. तो आजि इकडे येतो. काय आश्चर्य आहे, न कळे. उठायास सामोरे चला, नमस्कार करूं.

**सूत्रधार**:—येणें रीती सखीवचन आइकून, ब्रह्मयास सामोरी जाऊन, लक्ष्मीदेवी नमस्कार करून बोली. पहाः—

**लक्ष्मी**:—वंदिते तुझे पाय लोकपितामहा ।
**ब्रह्मा**:—वंदन ह्मणिजे काय? ।
तूं माझी माय ।
**लक्ष्मी**:—आश्चर्य हें! काय न कळे आह्मां!
**ब्रह्मा**:—आश्चर्य नव्हे, माय.
**लक्ष्मी**:—तुझा कोण पिता, कोठें आहे, तूं मज सांग.
**ब्रह्मा**:— कोण ह्मणजे विष्णु.
**लक्ष्मी**:—हें कौतुक पहा.
**ब्रह्मा**:—कौतुक कैचें?

लक्ष्मी :—येथें याया हेतु काय, हें सांग आह्मां.

ब्रह्मा :—येथें याया हेतु हा, माय. तूं आम्हुची माय. सांगसी निश्चो काय?

सूत्रधार :—येणें रीती ब्रह्मचानें विष्णूस लक्ष्मीतें दाखविलें, तें पाहून, लज्जानम्रमुखी होऊन, उभी रहाते. तें पाहून ब्रह्मा बोलता जाला.

ब्रह्मा :—कां लाजिल्यात. तुमच्या अंतःकरणीचा हेतू काय असेल तो सांगा. तसेंच करितों.

लक्ष्मी :—हें आह्मांस काशास सांगतां. आह्मीं कन्या पित्या-अधीन. जें बोलणें तें त्यासी बोला. त्यांच्या चित्तास येईल त्यास देतील.

ब्रह्मा:—अवश्य हें वर्तमान विष्णूस सांगून, त्यांचे आज्ञेनें समुद्र-राजास बोलावून, त्यांस या कार्यास अनुकूल करून घेऊन येतो.

लक्ष्मी:— अवश्य. तसेंच करा.

सूत्रधार:— येणें रीती ब्रह्मा लक्ष्मीची आज्ञा घेऊन विष्णुसमीप गेल्यानंतर कथा ऐसीजे. लक्ष्मीनें विष्णूस सादर पाहून तदेक अंतः-करण होऊन, मदनबाधेस वश होऊन, विरहाभिनय केला. पाहाः—

॥ दरु ॥

लक्ष्मी:— सर्वाधिक्य पहा सर्वातिशय सखि सर्वाधिक्य पहा सर्वातिशय।
चंद्रा जिंकिलें याचे मुखानें ।
सखि इंद्रा जिंकिलें याचे वैभवानें ॥ १ ॥
नेत्र जिंकी याचे शतपत्रकोटि सखि ।
गात्र जिंकी याचे मेघशतकोटि ॥ २ ॥
मदना वोवाळावें याचे रूपावरी सखि ।
कदनिं जिंकितसे हा सर्व असुरां ॥ ३ ॥
मन माझें तदधीन जालें सख्ये ।
रूप पहातां रोमाद्गम जाला ।
ताळा स्तन उज्जृंभतात पहा ।

सरस सल्लाप करिन कधीं ।
अधरामृतपान वामाक्षी मी करीन कधीं ।
कर आलिंगन करीन कधीं ।
उत्तम पुष्प सारा हारा कटि तुरे सादर मी देइन कधीं ॥ १ ॥
त्याला दया येइल कधीं ।
येऊन यथ मला जवळ बोलावून माझे स्तन धरिल कधीं ।
मला विडे दे ह्मणेल कधीं ।
जडित उंच मोलाचा टिळा लाउन मोद करून असो कधीं ॥ २॥
माया उपजेल त्यास कधीं ।
पुष्पाची शय्या करुनि वास सजणी शमवील विरहबाधा कधीं ।
अगे मदनक्रीडा करिल कधीं ।
आलिंगुनि काया, सुख पाउनि, कांक्षित लाभ होइल कधीं ॥ ३ ॥

**सूत्रधार**:— तदनंतर कथा ऐसी जे:----ब्रह्मा येऊन लक्ष्मीचा सील वृत्तांत सर्वहि विष्णुपासी सांगता जाला.

**विष्णु**:-- आइक ब्रह्मा. तूं गेल्याचें कार्य काय करून आलास तें सांग.

**ब्रह्मा**:— स्वामी, गेल्या कार्याची अनुकूलता करून आलों. परंतु त्यांनीं आपले पित्याची आज्ञा पाहिजे ऐसें ह्मटलें आहे. हें वृत्त तुह्मांस सांगून तुमचे आज्ञेनें समुद्रराजास येथेंच बोलावून, त्यास या कार्यास अनुकूल करून लग्नसिद्धि करावी ह्मणून आलों.

**विष्णु**:— अवश्य तसेंच करा.

**ब्रह्मा**:— अरे कंचुकी, समुद्रराजासी जाऊन विष्णूनें ब्रह्मानें कार्यानिमित्त तुह्मास बोलाविलें ह्मणून शीघ्र जाऊन बोलावून आणि.

**कंचुकी**:-- अवश्य. स्वामीची आज्ञा तसेंच करतो.

**सूत्रधार**:-- येणें रीती ब्रह्मचाचे आज्ञेवरून कंचुकी जाऊन समुद्रराजास बोलाविलें. संतोषेंकरून समुद्रराजा विष्णुदर्शनास येतो पहा:—

॥ दरु ॥

सकल रत्नें उपहारा सादर घेऊन आला अकलंक सिंधुराजा । मकरकेतनपितामहा विष्णुचे दर्शना एकमनेकरून ध्यात यशस्वी अपांपति.

**समुद्रः—** देवदेवोत्तमा ।
देवतासार्वभौमा ।
अखिलांड कोटिब्रह्मांडनायका ।
स्वामि मज बोलाविलें ।
आज्ञेप्रमाणें मी आलों ।
जे आज्ञा करणें असेल ते करा ।

**विष्णुः—** आईक, समुद्रराजा. सर्वहि ब्रह्मचास सांगितलें आहे. तो सांगेल तसी वर्तणूक करा.

**ब्रह्माः—** समुद्रराज, स्वामीस काय पुसता. सर्वहि स्वामीची आज्ञा मी सांगतों. तुमची कन्या लक्ष्मीदेवी तिचा पाणिग्रहणाचा स्वामीनें अंगीकार केला आहे. त्यास तुह्मीं संमत होऊन, लग्नसिद्धि महोत्सवाचा अंगीकार करा.

**समुद्रः—** ॥ दरु ॥

ऐकिलें तुमचें वचन ।
ऐसें गोड अमृताहून ।
काय वर्णूं याचे गुण ।
धन्य जालों ।
धन्य जालों ।
मान्या, धन्य जालों या जना ।
हें कन्या नारायणा देणें काय मानूं या संतोषातें ॥ १ ॥

जामात जाला नारायण । जन्म माझा सफळ जाला ।

अमूल्य रत्न कन्यादान ।
अनंतकमलासन करीन ॥ २ ॥

**ब्रह्मा**:— समुद्रराजा, तुह्मांस उचित तें तुह्मीं बोला. ते ऐकून आह्मास संतोष अपार जाला. सकल देवतांस ऋषींस बोलावून येथेंच लग्नसिद्धि महोत्सव आतां सुमुहुर्ती करा.

**समुद्र**:— अवश्य तसेंच करा.

**ब्रह्मा**:— कंचुकी! विष्णूच्या विवाहानिमित्त ब्रह्मयानें पाचारिलें ह्मणून बृहस्पतीस बोलावून आणि.

**कंचुकी**:— स्वामी, बरें.

**सुत्रधार**:— येणें रीती विष्णूच्या विवाहानिमित्त ब्रह्मयानें पाचारिलें असतां सानंदें येतो. पहा.

॥ दरु ॥

कमलासन बोलाविला ।
हरिचे दर्शनाला ।
बृहस्पति आला ।
देवगुरू ।

**ब्रह्मा**:— बृहस्पति यावे. अरे कंचुकी, नारायणस्वामीचा विवाह होतों कीं, सकल सामग्री सिद्ध करायास, अनामधेय बाप्कळपंतास बोलावून आणि.

**कंचुकी**:— स्वामी, बरें.

**ब्रह्मा**:— बृहस्पति मी जाऊन सकल देवतांस ऋषींस बोलावून येतो. काशीभट्ट तुह्मीं गणितार्थ पहात असा.

**बृहस्पति**:— बरें.

**ब्रह्मा**:— ( विष्णूस ) काशीभट्ट, बृहस्पति गणितार्थ पाहताती. मी जाऊन सकल देवतांस ऋषींस बोलावून येतों.

**विष्णु**:— अवश्य तसेंच करा.

**सूत्रधार**:— येणें रीती विष्णूच्या विवाहानिमित्त सकल सामग्री करायाला अनामधेय बाप्कळपंत येतो पहा.

॥ दरू ॥

पंत येताति पहा ।
बाप्कळपंत येताति पहा ।
पोळ्या खाउनि सोळा ।
पोटावरि हात फिरवित आला ।
काळे मैशीचा टिळा ।
कपाळी मुद्रा लाविलेला ।
कानीं लेखणी खोऊन ।
कागद हातीं घेऊन ।
कानभर कुडिक्या घालून ।
कार्यास आला आपून ।

येणें रीती विष्णूच्या विवाहानिमित्त ब्रह्मचार्नें पाचारिलें अस्तां देवेंद्र सानंदें येतो पहा:---

॥ दरु ॥

ऐरावतावरि बैसून ।
अखिल देवगण घेऊन ।
वीर आला असुरा जिंकून ।
देवेंद्र तो संतोषानें ।
नारायणाचे विवाहाकारणें ।
वेगेकरून ॥ १ ॥

येणे रीती विष्णुनें आपला विवाह करायानिमित्त पार्वतीपरमेश्वरांस ध्यान केलें अस्तां, उत्साहेकरून विष्णुच्या विवाहानिमित्त पार्वतीपरमेश्वर येताति पहा.

॥ दरु ॥

भावेंकरून इच्छित उत्साहा ।
भक्तवत्सल श्रीमहा ।
कर्पूरगौर तान ।
करुणार्द्र चित्तें करून ।

सर्पमाला भूषण ।
सादर गौरीसी इशान ॥ १ ॥
वेगें करुन ।
वृषभावरि बैसुन ।
वेदैकगम्य ।
आला आला आपुण ।
भोगपतिभूषण ।
भोंसलकुलशाहदेवत्रिलोचन ॥ २ ॥

**ब्रह्मा**:— समुद्रराजा, सकलदेव, ऋषीश्वर आले कीं. कन्येस बोलाऊं आणा, ह्मणा.

**समुद्रराज**:---- कंचुकी, या शृंगारवनीं पहिलें ते रम्यप्रदेशीं सखीसह वर्तमान कन्या मणिक्रीडा करीत होती. सखीस सांगोन कन्येस बोलाऊन आणा.

**कंचु**:---- अवश्य. आज्ञेप्रमाणें तसें करितों.

**सूत्रधार**:---- येणें रीती समुद्रराजाचे आज्ञेवरून कंचुकी जावून, सखीस सांगून कन्येसी बोलाविलें अस्तां, लक्ष्मीदेवी संतोषेंकरून पित्यासमीप येते. पहा:—

॥ दरु ॥

अलिकुलनीलवेणी ।
अंबुजदललोचनी ।
कलकंठी कीरवाणी ।
कल्याणीं आलां संतोषानीं ।

येणें रीती लक्ष्मीदेवी आल्यानंतर, सकलदेव, ऋषीश्वर लक्ष्मी-नारायणास विवाह करितातिं. पहा:----

॥ **मंगलाष्टकें** ॥

येणें रीती लक्ष्मीचें पाणिग्रहण नारायणानें केलें. तें पाहून सकल देव, ऋषीश्वर, नारद, किन्नर, किंपुरुष मंगलें गाति ऐसीः----

जयमंगलं शुभमंगलं ।
मंगलं मंगलाकारमूर्तिस ।
मंगलं विशाल कीर्तिस ।
मंगलं निजभक्तपालनैकप्रीतिसं ।
मंगलं पांडवसारथीस ।
मंगलं जयशीललक्ष्मीकांतास ।
मंगलं लोकवनचरितास ।
मंगलं सुरमुनिजनवृंदवंदितास ।
मंगलं महाविष्णुआदिदेवतांस ।
मंगलं खगपतिविवाहउत्सवास ।
मंगलं श्यामदेहास ।
मंगलं श्रीवैकुंठवरगेहास ।
मंगलं नित्योत्सवास ।

श्रीरामप्रसन्न ॥ गुरुभ्योनमः ॥ श्रीरस्तु ॥

---

# एक जुनें मानभावी काव्य

१ मानभावांच्या जुन्या ग्रंथापैकीं अद्यापि एकहि छापून प्रसिद्ध झाला नाहीं. पेशावरास मानभावांचे कित्येक अर्वाचीन लहानसहान ग्रंथ छापलेले विकत मिळतात. परंतु शालिवाहनाच्या बाराव्या किंवा तेराव्या शतकांतील मानभाव लोकांचा एकहि ग्रंथ अद्याप प्रकाशला गेला नाहीं. ह्याचें कारण, दुसरें तिसरें कांहीं एक नसून, प्रायः आपली अनास्था आहे. मानभाव लोक आपले ग्रंथ इतर लोकांस बघूं देखील देत नाहींत, आपले ग्रंथ गुप्त रहावे अशी त्यांची समजूत आहे, बहुतेक मानभावी ग्रंथ गुप्तलिपींत लिहिलेले आहेत, ती गुप्तलिपी त्या पंथांतील विद्वान् शास्त्र्यांखेरीज इतरांना शिकविली जात नाहीं, वगैरे अनेक कुत्सित कल्पना आज कित्येक वर्षे प्रचलित आहेत. परंतु, माझा जो कांहीं थोडासा ह्या लोकांशीं परिचय झाला त्यावरून ह्या कल्पनांना कांहीं आधार आहे असें बिलकुल दिसलें नाहीं. मानभाव लोक आपले बहुतेक ग्रंथ पंथबाह्य लोकांना दाखवितात, इतकेंच नव्हे तर ते प्रसिद्ध करणारा कोणी भेटल्यास त्यांत ते समाधानच मानतात. त्यांच्या पंथांतील गुप्तलिपींत लिहिलेले बीजात्मक जे ग्रंथ आहेत ते मात्र पंथबाह्य लोकांना ते दाखवीत नाहींत. बाकीचे कोणतेहि ग्रंथ कोणाहि योग्य व श्रद्धावान हिंदूला दाखविण्यास त्यांची यत्किंचित् अडचण नाहीं.

२ मानभावी जुन्या ग्रंथांचें माहात्म्य दोन प्रकारचें आहे. अर्वाचीन मराठी भाषेचे बरेच जुने मासले म्हणून ह्या जुन्या ग्रंथांचें महत्व जितकें मानावें तितकें थोडेंच आहे. हे ग्रंथ ज्ञानेश्वरीच्या बहुतेक समकालीन असल्यामुळें त्या थोर ग्रंथाचें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें निर्वचन करण्यास ह्या ग्रंथांचें बरेंच साहाय्य होणार आहे. आणि ह्या मानभावी ग्रंथांची

भाषा त्या वेळच्या मराठीच्या अनेक पोटभेदांपैकीं असल्यामुळें, कोंकणी, देशी, वऱ्हाडी, वगैरे पोटभाषांशीं तुलना करण्यास हे ग्रंथ साधन होणार आहेत. ह्या ग्रंथांचें हें एक माहात्म्य झालें. दुसरें माहात्म्य धर्मविषयक आहे. श्रीमत् शंकराचार्यांनीं पंचायतनपूजेचा प्रघात पाडून, शैव, वैष्णव, शाक्त वगैरे एकेक देवतांच्या उपासकांस इतर दैवतोपासकांशीं स्पर्धा व द्वेष न करण्याचें शिकविलें. परंतु आचार्यांच्या नंतर कांहीं शतकांनीं केवळ शिवाचीच उपासना करणारा असा बसवब्राह्मणप्रणीत लिंगायतपंथ निघाला. प्रारंभीं ह्या बासवी पंथांत जातिभेद बिलकुल नव्हता. त्यामुळें ब्राह्मणक्षत्रियेतर जातींतील अनेक लोक ह्या पंथाचे अनुयायी झाले. शिवाय, जातिहीन असे जैन, बौद्ध वगैरे लहान मोठे पंथ ब्राह्मणक्षत्रियेतर लोकांत प्रचलित होतेच. लिंगायत, जैन, वगैरे पंथांनीं महाराष्ट्रांतील खालच्या प्रतीचे लोक आकर्षिलेले पाहून, कृष्णोपासक व दत्तोपासक अशा कित्येक ब्राह्मणांस स्वदैवतोपासनावर्धनार्थ जातिहीन असा एक नवीनच पंथ काढण्याची अवश्यकता भासली. तोच हा महानुभाव किंवा अपभ्रंशानें मानभाव पंथ होय. लिंगायत पंथ निघाल्यावर थोड्याच कालानें हा कृष्णोपासक व दत्तोपासक पंथ निघाला. महाराष्ट्रांत किंवा हिंदुस्थानांत जे अनेक जातिहीन पंथ आहेत त्यापैकींच हाहि एक असल्यानें व ह्या पंथाचा प्रारंभ साडेसहाशे वर्षांच्या पलीकडील नसल्यानें, एका जातिहीन हिंदुधर्मपंथाचा आद्यन्त इतिहास तपशीलवार समजला असतां, तो स्वदेशांतील विचारी लोकांस फारच विचारणीय होतो. धर्मदृष्ट्या ह्या पंथाचें माहात्म्य हें असें आहे.

३. हें दोन्हीं प्रकारचें माहात्म्य लक्षांत आणून इतर ग्रंथांबरोबर मानभावी ग्रंथांचाहि शोध केला. शोधून काढिलेल्या ग्रंथांपैकीं जुन्या मानभावी काव्यांचा नासला म्हणून खालील काव्य छापलें जात आहे. ह्या काव्याचा कर्ता कोण तें माहीत नाहीं. काव्याचे पहिले १७ $\frac{1}{2}$ श्लोक व शेवटले दहा पांच श्लोक नाहींत. काव्यांत चक्रधर व तच्छिष्य

नागदेवभट्ट ह्यांचा उल्लेख आहे. नागदेवभट्ट हा महानुभावांचा ब्राह्मण आचार्य शक ११५८त जन्मला. हा पन्नास किंवा साठ वर्षे वाचला असें धरलें तर ह्याची एकंदर हयात शक ११५८ पासून शक १२०८ किंवा १२१८पर्यंत असावी असें दिसतें. नागदेवभट्टाच्या पुतण्याची हयात, दरपिढी तीस वर्षांची धरली तर, शक ११८८ पासून शक १२४८ पर्यंत असावी असें दिसतें. अर्थात् नागदेवभट्टाचा पुतण्या कवीश्वर शक १२१८च्या सुमारास ग्रंथलेखनास लागला असावा. शक १२४८ पर्यंत कवीश्वर होता असें वर अनुमान केलें आहे. तें अनुमान जर खरें असेल तर प्रस्तुत अपूर्ण काव्य शक १२४८ च्या सुमाराचें असावें असा तर्क होतो. ह्या काव्याचा कर्ता खुद्द कवीश्वर जर नसेल तर तत्कालीन कोणी तरी कवी असावा.

४. ह्या काव्यांत स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, मालिनी वगैरे गणवृत्तें आहेत, व बऱ्याच श्लोकांत अंत्य यमक नाहींत. ह्मणजे संस्कृताप्रमाणें ह्या काव्यांतील बरीच कविता निर्यमक आहे. रामदास, वामन, विठ्ठल ह्यांनीं गणवृत्तें मराठींत प्रथम सुरू केलीं असा सार्वत्रिक समज आहे. हा समज, शक १२४८च्या सुमाराचें हें काव्य पाहून, टाकून देणें भाग आहे. विष्णुशास्त्री चिपळोणकर ह्मणतात त्याप्रमाणें श्लोकबद्ध काव्यरचना वामन व विठ्ठल ह्यांच्या आधीं महाराष्ट्रांत प्रचलित होती; इतकेंच कीं यमकप्रचुर रचना प्रकर्षानें करण्याचा प्रघात वामनादि मंडळीनें पाडला.

५. ह्या काव्याची भाषा ज्ञानेश्वरीच्या भाषेहून अर्वाचीन आहे ह्मणजे ज्ञानेश्वरीनंतर तीस चाळीस वर्षांनीं हें काव्य लिहिलें गेलें. ह्या काव्यांत फारशी शब्द एकहि नाहीं.

६. ज्ञानेश्वरीच्या भाषेचें निर्वचन करतांना ह्या काव्याचा उपयोग करून घेण्याचा विचार आहे.

— — — — ⏑ — — —र्हृदि धरुनि सदा दैव भावीति देवा ॥
ऐसें जाणोनि शौरी त्यजितु वन वरी राधिके गोपनारी ॥ १८ ॥
पांता श्रीकृष्णराणा शशधरकिरणा व्याकुळा कामबाणा ।
चैतन्यें धुक्ष्यमाणें हरिहररमणें जर्जरें दीनवाणें ॥
दैवें गोविंद पांतां रमण अवचितां देखिला भावभूता ।
तेथें आनंद जाला सुखकर सकळा वल्लभें गोपबाळा ॥ १९ ॥
गोविंदें गोपिकांतें प्रमुदित निरुतें पावविलें सुखातें ।
कंदर्पाचा विहारी रुचिरवनकरी यामिनीसंघसारी ॥
रामू साजात्य वेधी अजितनिरवधी जातिवैजात्य वेधी ।
गोपाळामाजि रासा विहरत सरसा दे हरी वेठि कंसा ॥ २० ॥
अक्रूरा भोजराजा करवि बळ अजा आणवी गूढ वोजा ।
शौरी चाले सगोपां बळ सहितनृपां मारणा क्रोधदीपां ॥
डांगा पिंडार कोंडें सबळ निजगडे वाणिती पैं पवाडे ।
सिंधें पैं वाति वादें प्रबळबळमदें गर्ज्जती मेघनादें ॥ २१ ॥
आलें पैं सिंधुतीरा सकुमति कुचरा गाढ निर्णेजकारा ।
मारी थापा मुरारी रिगत मधुपुरी जात शाळेसि शौरी ॥
तेथें कोदंड मोडी नरवर रगडी रामु कोदंड खंडी ।
मार्गी कुब्जा कुरूपा उजरुनि मधुपां योग्य केली सरूपा ॥ २२ ॥
संध्याकाळीं पुरान्तीं वसतु मधुपती मेलिकारीं निशान्तीं ।
आला शौरी रणान्तीं घनघन वरुती भोजवीरासि घाती ॥
मोडी शुंडाळ दाढा हरि सबळु पुढां मुष्टिघातीचि बाढा ।
हाणे कुंभा उद्दा अरिदळनदृढा मारिला हस्ति गाढा ॥ २३ ॥
रंगा मल्लारि गेला पशुप सह बळा देखिला लोकमाळा ।
ज्या जैसा भाव तैसा हरि दिसतु रसामाजि पैं काळ कंसा ॥
राजा दुर्गाधिरूढू क्षणकसमचढू पैं तुरा होत गाढू ।
शौरीची आर्द्र भू रे घडघडिति वरें वैरिया भीतिकारें ॥ २४ ॥
आज्ञापी भोजराणा वरुणि कर खुणा मल्लवर्या वदाणा ।
तेथें चाणूर शौरी ह्मणतु हरि हरी थीर राहे रणारी ॥

झोंबी दोघांसि जाली चटचट सुटली भीडतां मल्लचाली ।
चाणूरा मुष्टिकातें धबधब विरुतें मारिलें मुष्टिघातें ॥ २५ ॥
तेथें तो रामु घातें घनघन विरुतें तो शळासी शळातें ।
मारी मालासि एरा बळ हरि कुचरा संगरीं थोरथोरा ॥
गर्जे गोविंद सादें रणरण समदें मेघगंभीरनादें ।
जेथें तो भोज होता चकित अवचिता तेथ गेला दुरंता ॥ २६ ॥
देखौनि भोज शौरी चळचळित करी प्राण सांडी मुरारी ।
कोपें तैसाचि हाला जटयिं धरियला भूतळीं ऊपटीला ॥
हाहाकारू प्रवर्ते अरिवरदाळितें राख पैं बोलती ते ।
होते कंसानुसारी रिपुवरसमरीं मारिले ते मखारी ॥ २७ ॥
फोंडी कारागृहांतें हरि निजजनितें भेटलीं क्षेमभूतें ।
जाली संतोषपूर्णे तनयवरगुणें लाधले मोदराणें ॥
अर्पी गोविंद वीरा स्ववसति मथुरा उग्रसेनातिसारा ।
राज्या संस्था करीतु यदुकुळमुदितू उद्धवा प्रेम देतू ॥ २८ ॥
शौरी पैं उद्धवासी प्रचळतु कळसीं कुब्जिकामंदिरासी ।
तेथें कुब्जा प्रधानासह हरि सुमना पूजिला रम्यमाणा ॥
तेथें रात्रीं मुरारी बहुत मधुपुरीं राहिला केळिकारी ।
घोषीं गोपी अपारा हरिविरह झरा जालिया खेदसारा ॥ २९ ॥
संभाऊ गोपिकांतें मधुपति निरुतें पाठवी उद्धवातें ।
तेणें संभाविलीया हरिविरहलया गोपिका गोकुळीया ॥
तेथौनि मंत्रिराणा प्रचळतु चरणा माधवा नम्रमाणा ।
शौरी यात्रेसि गंता कुरुसमरगता गोपिका वेधु दाता ॥ ३० ॥
विद्याअभ्यास सीरीसहित हरि करी पूर्ण जात्रा मुरारी ।
पुत्रां पैं काळ नेता त्वरित गुरुमता दक्षिणा दे विधाता ॥
शौरी पैं शंखचूडावध करित फुडा सागरीं कंबुक्रोडा ।
मागे पुत्रासि माता बळिभुवनगता देवकी पुत्र दाता ॥ ३१ ॥
अक्रूरें निर्विषादें हरिसि यदुमुदें पूजिलें भक्तिवादें ।
देवें अक्रूरसूरा कुरुपतिनगरा पाठवीलें सुसारा ॥

संभावी पांडवातें मधुवचनरुतें सांगतू कौरवातें ।
सर्वे निर्वैर वर्ता मधुपुरिं निरुजा येतु अक्रूर शांता ॥ ३२ ॥
देवस्थापक साधुपाळनरता कैवल्यनाथा गता ।
चिद्ब्रह्मप्रमुखादिदैवतमता भक्तानुरागांकिता ॥
चैतन्यागमभूमिलोक विगता शार्दूलविक्रीडितां ॥
लीळा पांडवरक्षणा खळहना श्रीवासुदेवा नमो ॥ ३३ ॥

॥ इति बाळक्रीडा ॥

गेलीया कंसजाया स्वजनकविषयां कांतनाशान्ति सूयां ।
मारिला कंस शौरी अरिदळन करी सांघती माघधारी ॥
थोरू तो चि प्रतापें रणभुवि तळपे मारिले दैत्य झेंपे ।
पक्षीन्द्रा पक्ष झंपा मशकसमकु पा तू तया होसि बापा ॥ ३४ ॥
अस्तिप्राप्तिप्रवादा श्रुत अतिदरदा तो जरासंधु रोदा ।
प्रज्वाळे अग्नि जैसा घृतनिहितरसाज्वाळकल्लोळभाना ॥
बोले पैंजा तिला हें करिन रण-महें भूमि निर्यादवी हे ।
ऐसें जै पान जोडे वसति बन फुडें लागि सेवी नखाडें ॥ ३५ ॥
सैन्यातें मेळवा रे निबर रणतुरें वाजवा दुंदुभी रे ।
ऐसे सांघे प्रधाना मगधपति दुना आणिली वीरसेना ॥
आले थोरा स्फुराणी अदट भट रणीं रायिके राजधानीं ।
ढाला भाला फरारे तळपत घसरे चातुरंगें बिरारें ॥ ३६ ॥
चौमेरी सैन्य दाटे रविरज झगटे लोपले दिक्पाट ।
नादींवाद्यांत्रजातां श्रवणबधिरतां होत पैं लोकजातां ॥
तेवी साक्षौहिणी रे प्रचळतु मथुरे तो जरासंधु भारें ।
वाद्यांत्रें वाति गाढा करिति वरफुढां भाट कैवार बाढा ॥ ३७ ॥
पांतां डोंळा चिताडा अहितखरबडा चातुरंगा उफाडा ।
उद्दाळे जेथ घोडा सुभट निबरडा हस्तिकिंकारवाडा ॥
भेरीभांकारसूडा करभजरबडा नाचती नाट धेंडा ।
वेढी गांवांस पाडा करि भट-रगडा संगरीं माधवेडा ॥ ३८ ॥

ऐसें देखोनि गोची जनहरुषमुचीं वास पाहे नभाची ।
धाडी वैकुंठवासी रथयुग हरिसी दिव्य दिव्यायुधीसी ॥
रामेंसी शौरि बोले करिकुटमुसळें मागधा सैन्य आलें ।
क्रोधें त्या कंपु चाले बळ हरि वहिलें स्यंदनारूढ जाले ॥ ३९ ॥
वृष्णीचा भारु चाले रणतुर सबळें पांचजन्या वरीलें ।
फुंकीलें वृष्णिपाळें खळबळिति बळें मागधाचीं विशाळें ॥
भुं भुं भुं शंखनादें गिरिचय निरुदे कूर्म वाराह खोदे ।
सैन्या मूर्च्छा विशेखें वसुमति तरखे रुद्र भोगा विरोखे ॥ ४० ॥
ज्याचा दैत्या दरारा चळत सरसरा चालिले ते समोरा ।
वृष्णी कृष्णानुसारा दळिति झरझरा वैरिसैन्यासि घोरा ॥
घे घे जातील धीटा रिपुरण सुभटा बोलती मारि फेंटा ।
हां हां हां पाडि चाटा समर बळकटा तोडि दे घाव मोटा ॥ ४१ ॥
कोपें काळाग्नि जाला मगधजगदळा यादवा मोडु केला ।
वीरां विंधौनि वाणीं यदुबळ धरणीं पाडिलें गर्ज्जऊनी ॥
हांका पैं देतु आला जवळि हरिबळा वर्म बोले उखाळा ।
त्याच्या प्रत्युत्तरातें निगदुनि निरुतें शौरिं चाले रणान्ते ॥ ४२ ॥
गर्ज्जे पैं सिंघ हाके मगध पसरके वीज जैसी घनांके ।
गेला सैन्या निजांतु दडदड करितु चातुरू तोरणांतू ॥
दो भारा जुंझ भारी प्रकटत समरीं हाक बोंबांति घेरी ।
जाली झोंबी विशाळा रणमदतुमुळा मागधायादवांला ॥ ४३ ॥
दों सैन्या जुंझ भाके महितळ थरके देखतां काळ शंके ।
तेव्हां तो वृष्णिराणा अरिदळितरणामाजि जुंझी सिहाणा ॥
भूतांतू जेवि भूतां प्रदळन करितां तेवि गोपाळ हंता ।
विंधे वाणीं तिखारीं रिपुवर समरीं दाटगे सैन्य भारी ॥ ४४ ॥
टंकारू कार्मुकाचा रणभटसमचा भेडवी राउळाचा ।
जुंझंती ते कबंधें भडभड वसुधें धावती वृष्णिवंधें ॥
शुंडांळा कुंभभाळें हयरथ कुटिले फूटिलीं पैं सिसाळें ।
रामें सौनंदघातें हळबळकाळितें टीकरी होात भूतें ॥ ४५ ॥

मोदाडी नागशुंडा मुडति कडकडा मोहडें पैं दुफोडां ।
भूपा वीरा वितंडा कुपितफडफडा चाखवी मागधाडा ॥
ऐसे ते दोघ शौरी खवळत समरीं मारिले वैरि घेरी ।
घायीं डाडाति वैरी कसकसित खरी हुंबतां कुंथ भारी ॥ ४६ ॥
हों हों होंकार नादी भडभड निनदी भुंक किंकारशब्दीं ।
फुं फुं फुकार नादी कडकड निनदी घाय वाजेति भेदी ॥
फं फं फुंकार फुरी फरक फरफरा फुरे बरी भरारा ।
काळिंदीरक्तपूरा जळमळितभरा भूतकंकाळभारा ॥ ४७ ॥
सैन्या देखौनि आटू रिपुरणसुभटू यादवां घेत घोंटू ।
क्रोधें कां काळ जैसा करि रणवळसा हांक दे सिंह जैसा ॥
शौरी दंडायुधातें ध्रुवशरधियुतें छेदिलें कार्मुकातें ।
सूता बाणीं तिखारीं मगधपदचरी चालिले हांक मारी ॥ ४८ ॥
सांडौनि राम बाणा झडकरित रणा हाकिला वैरिराणा ।
तो ही तैसांचि मांडे सरसरित उडे कोपला दे सिहाडे ॥
एकैका झोंबती रे कडकडित करें स्वर्गपाताळखोरें ।
त्या दोघां चंड हांके थरथर थडके सर्व भूगोळ शंके ॥ ४९ ॥
दांवैं वज्रांग ळाठे अतिबळकुरठे भांडतां थोर ताठे ।
रामें कष्टी सुभट्टा त्रिभुवन अदटा पाडिलें मागधाटा ॥
सोली बांधे सुताडा सबळ तडतडां तोंडि तों दोरखंडा ।
तेव्हां त्यापासु बांधे वरुणिकवसुधे बांधला नागबंधें ॥ ५० ॥
रामा पैं कोपु आला झळफळ मुसळा घावया ऊचलीला ।
घावों हां हां मुरारी ह्मणतु च न मरी सोंडिला सोंड शौरी ॥
ऐसे ते जैत्य वादि स्तवजति सुविदीं वाणिती कीर्तिबंदी ।
रामू कृष्णा — तिशौरे प्रविशति मथुरे वृष्णिवीरी बिरारें ॥ ५१ ॥
शौरी पैं मागधातें कुवचन विरुतें नोकिलें थोर होतें ।
त्यांतें तो आठऊनी बहु झुरतु मनीं फार पैं दैन्य मानीं ॥
लज्जा तो दंडपाणी प्रविशतु गहनी काननी पैं निराणी ।
मंत्री पैं तेथ गेले गिवसुनि बहिलें मागधा काढियेलें ॥ ५२ ॥

संभावीला मुनीती सुकविमनुकृती बोधिला राजनीती ।
त्यातें नेलें पुरासी प्रबळनयवशीं वैदुरी धामराशी ॥
राजे पैं मेळवीले पुनरपि वहिले मागधें झुंझ केलें ।
शौरी पैं मारिले ते सकलदळशतें मोडिलें मागधातें ॥ १३ ॥
धाडी पै सर्प कुंभा हारि रिपुरुषभा मुंगिया तेथ लंभा ।
धाडी घालूनि अंते हारि मृत अहितें देखिलें यादवीतें ॥
राजा गाऊनि दानें श्रमिशतकरणें तो गदाघाततानें ।
लागे दुर्गीं यदूंचा पडत जळमुचा गाढ गर्ज्जीं घनाचा ॥ १४ ॥
ऐसें देखौनि शौरी बळ महित करी दक्षिणे यान वैरी ।
तेथें मारी सुकाळा रविरुध अचळा भूतळीं पात केला ॥
आला गावां मुरारी तवं मधुनगरी वेढिली पैं महारी ।
देवें मारूनि घातें रिपुदळ निरुतें भंगिलें मागधातें ॥ १५ ॥

पुरजन यदुराया भेटि आणीति दाया ।
यदुवरजनजाया सर्व वोंवांळिती या ॥
अदट--मगध--कीळा कंसचाणूरकाळा ।
असुरचयनिदाळा गोपिनाथा नमोस्तु ॥ १६ ॥

॥ एवं जरासंध पराभव ॥

ऐसा तो नयमंत्रकार्यसुमना ये मागधु पत्तना ।
राया तो विजिगीषु तेविस गणा अक्षौहिणीसीं रणा ॥
आला तो मथुरे यदूसह सळें तैं एकलव्या बळें ।
मारीलें मगधा हरी पळविलें संग्रामरंगीं बळें ॥ १७ ॥
ऐसा तो दशसप्तवार विकळा शौरी रणीं भंगिला ।
रुद्रातें विनवी महाव्रतकळा तेणें वरू दीधला ॥
कैळासाधिप---दत्त--सद्वरबळें चाले तदा कासिलें ।
कृष्णेंसी यवनाधिपें सुतुमुळें ज्या नारदें प्रेसिलें ॥ १८ ॥
निद्रावेष्टितमाथुरा हरिजना नेलें सदानंदना ।
श्रीमद्द्वारवतीपुराहसदना सौवर्णभूसद्मना ॥

आला म्लेच्छपती हरी मग पळे पैं पर्वतासी बळें ।
तेथें तो मुचुकुंद नेत्रअनळें पैं भस्म जाला हळें ॥ ५९ ॥
शौरी तो मुचुकुंद सद्गतिगता पैं पाववीला मता ।
म्लेच्छा सैन्य तदा रणीं हळभृता ते मारिलें काळता ॥
आले ते बळदेवकृष्ण मथुरे मारूनि वैरी खरे ।
पांती ते जव पश्चिमे बहुतरें देखेति सैन्यें परें ॥ ६० ॥
शौरी झुंकतु रामुरुद्रवचनीं पैं मागधा देखुनी ।
वेघे पर्वत रामयुक्तदहनीं जाळी तया वेढुनी ॥
शौरी रामु न भोगिती यदुपुरा गेला यशेंसी वरा ।
— — —⌣⌣—⌣—⌣⌣⌣— — — ⌣— — ⌣— ॥६१॥
शौरी द्वारवतीसि राज्य करितां श्रीरेवतीयोषितां ।
आली ते प्रणिली हळी विधियुता काळिंदिये भेदिता ॥
देवा तें श्रुतदेव विप्र मिथिले पूजी यथा गोकुलें ।
तेथें पैं जनकें हरीसि विमळें पैं यादवां पूजिलें ॥ ६२ ॥
पार्था सेतुनिभंजनी हनुमता दर्प्पासि तो हारिता ।
धर्मा दर्प्प हरीत भूमि वसता नर्कासुरा घातिता ॥
व्यासा दर्प्पु हरी हरी यदुरुषी मार्कंडदर्प्पा दुषी ।
भीमा दर्पु हरी तमोहन वशी कंदर्पदर्प्पा मुषी ॥ ६३ ॥
शौरी पैं तुळसी प्रणूनि गहनी पैं सूचवीली वनीं ।
जे वृंदागतजान्मिची सुदहनी लावण्य वृंदावनी ।
देवें पैं जनकासि बोध दिधला गर्भीं शुकू वेधिला ।
बोधीले विदुरासि कोमळकळा कुंतीसि दे सावळा ॥ ६४ ॥
विद्या संजययोगियासि दिधली अंधा रुषी कौशळी ।
देवातें सुर मानवी मुनिकुळीं संस्ताविलें गोकुळीं ॥
गोविंदें शिशुपाळ बाळकपणीं पैं पाहिला जाऊनी ।
झांके नेत्र तयां तिजाचि जननी अभ्यर्थिलें ते वनी ॥ ६५ ॥
सांघे नारद रुक्मिणीगुणकळा तेणें हरी तोखला ।
बोले सुंदर योग्य तें चि अबळा तुझा हरी कोमळा ॥

तेथें किन्नर गात मंजुळ रवें कल्याण कीर्तीसवें ।
वासें भूषण वस्तुजात बरवें त्या दीधलें केशवें ॥ ६६ ॥

सकल विषय बंदीं हिंडतां किन्नरादि ।
हरिगुणगणमोदी मंगळा धामदादी ॥
विहगसहित रंभा भाट ये पैं विदर्भा ।
नरवरकुळशोभा भीमराजेंद्रदर्भा ॥ ६७ ॥

॥ एवं द्वारकाप्रवेश ॥

वैदर्भाधिपकिन्नरा गुणवरा पूसे कुमारी वरा ।
सांघे किन्नरु भूतळीं नृपवरा कीर्तीकुळें चातुरा ॥
अंगा वंगकळिंगमागधभुवां पैं चौडगौडा नवां ।
पांचाळा कुरुकैकयामरुभुवां पैं नैषधाराघवां ॥ ६८ ॥
आभीरा कुशसोरठा रणवटां कांबोजचीनाभुटां ।
बाल्हीका नडगुर्ज्जरा घनवटां कार्णाट आंध्रा नटां ॥
काश्मीरा मधुमाळवां पुरुमसा पैं पांडुतुंडां दशा ।
कौशांबा करहाटसैंभ्रक रुषा पैं दंडका वेतसा ॥ ६९ ॥

वैदर्भराज कुळभूतळभूमिपाळा ।
अंकाधिरूढतनया मळलोकपाळा ॥
श्रोता विदर्भतनयादरहीनहेळा ।
जाणोनि किन्नरकळाविद नेत्रलीळा ॥ ७० ॥
श्रीद्वारकानगरमंगळधामरोहीं ।
शोभे मनोहरसुकांचनभूसमूहीं ॥
गोविंद तेथ मधुमाधवराजलीळा ।
राजा अशेषनरदेवसुराधिपाळा ॥ ७१ ॥

श्रीकृष्णें असुरा भयासुरघना गाढेपणें दुर्ज्जना ।
केला घातु हटें कुठारघटना कोदंडकांडारणा ॥
ब्रह्मांडाधिप देवरक्षणघटा पापांडमार्गावटां ।
दंडादंडन दंडपाणि सुभटा तातंड फेडा धटां ॥ ७२ ॥

कांती चंदनचंद्रकांतिवदना लावण्यलक्ष्मीवना ।
कांती दिव्यकळापकंठकळनासौंदर्यशोभागुणा ॥
शोभे लक्षणलक्षणा वरगुणी चातुर्यचिंतामणी ।
दाता दानमहापद्मा गुणमणी भूपाळचूडामणी ॥ ७३ ॥
दैत्या दारणचक्र शोभत करीं कौमोदिकी श्रीहरी
भुंभुंभुंकृत पांचजन्य समरीं जो त्रासिता पैं अरी ॥
शोभे नंदकखड्ग उज्वळ घनी जैसी चि सौदामिनी ।
शोभे सुंदर पुंडरीकरमणी तुंडोपहासावनी ॥ ७४ ॥
टंकाराख शत्रुजीव मुषितें कोदंड सारंग तें ।
शोभे पैं वनमाळिका गळगतें जे वैजयंती रुतें ॥
शोभे कौस्तुभमुक्तरागरचना हारावळीकांचना ।
कर्णीं कुंडल माजयुग्म रसना चूडा हरीशोभना ॥ ७५ ॥
बासें वेदित सुंदरें रुचितरें जे दिव्य पीतांबरें ।
ज्याचा दिव्य रथीं बळाकु बिचरें सुग्रीव घोडा तुरें ॥
सैन्यु वर्तत मेघपुष्परसना हिंकारकाळा रणा ।
शोभे ज्या गरुडध्वजी घनघना ज्या पक्षझंपाटणा ॥ ७६ ॥
ऐसा तो हरि वेद नेणति जया वाणू रुषी धीर या ।
शेषाहिप्रमुखा सुरा सुरवयां पैं कोण जाणे तया ॥
राया तो हरिवल्लभू गुणमणी पैं योग्य ये रुक्मिणी ।
नाहीं आन दुजा कदापि धरणी लावण्यचूडामणी ॥ ७७ ॥
ऐसा किन्नरु शौरिकीर्ति अबळा वाणी हरी सांवळा ।
त्या दे त्यागु अनर्घ्य भीमु सकळा भांडार देशां बळा ॥
ते गेले मग भीम बोलतु सभे ये रुक्मिणी वल्लभे ।
द्यावें माधवपाळका तवं रभे हुंकार रुक्मी सुभे ॥ ७८ ॥
डोळे रक्त करूनियां थरथरा कांपेति कोपें खरा ।
रुक्मी गर्ज्जतु उत्तरी खडतरा गोपाळ तो माजिरा ॥
घोषीं गोपवधू सदा व्यभिचरे काळातिरूपें धरे ।
धाकें मागधपाळका द्वरदरें रीगे समुद्रांतरें ॥ ७९ ॥

वेडा जल्पतु विप्र किन्नरपणें दाना सदा ठेंगणें ।
जाने काइं उदार पौरुषखुणे जो देतयां तू ह्मणे ॥
वंशे शुद्ध कुळें नसे नृपधरे ज्याचा प्रतापा पुरे ।
ऐसा तो शिशुपाळ नोवर वरे ये रुक्मिणी सुंदरे ॥ ८० ॥
भीमें पुत्रभिडे सभे ह्मणितलें तें पाहिजे नुष्टिलें ।
तेणें चैद्यपतीसि वाडवकुळें पैं मूळ हो धाडिलें ॥
वैदर्भी निजमंदिरा सहचरी गेली महा दुःकरी ।
पावौनि विरहानळा हरि-हरीसंयोग भावी करी ॥ ८१ ॥
जाणौनि विरहासि भावकळना दामोदरा सूचना ।
धारासीतळता करी सुदहना नेली तया हीगुणा ॥
तेथें तीसि सुखा न ये मग पुसे देवी स्वभावावशें ।
सांघे कृष्ण मिळैल दैवतवशें जीवा घडे संवशें ॥ ८२ ॥
पाचारी द्विजराज भावकळिका त्या मानु दे पैं निका ।
देवी क्षेम पुसे प्रधानवटुका सांघे तया कासिका ॥
संतोषें द्विजराज भीमदुहिते गोविंदवेधांकितें ।
देवा आणिन चौ दिसा चि निरुतें निभ्रांत जाणै सुते ॥ ८३ ॥
गेला तो द्विजराज यादवपुरा श्रीकृष्णनाथा वरा ।
भेटे वंदितपादपद्ममधुरा वाणी वदे संवरा ॥
अर्ची त्या द्विजनायका सुरगुरू एकान्त मागे परू ।
दे तो त्या विनती करी द्विजवरू वाची गिरे गोचरू ॥ ८४ ॥
श्रीमन्मंगळमूर्ति माधववरा श्रीकृष्णनाथा परा ।
पादांभोरुहकिंकरे पटुतरा अभ्यर्थना संवरा ॥
वैदर्भिप्रणये प्रणाम बहुधा साष्टांगपांती बुधा ।
लावण्यामृतचंद्रचंदनविधा मी लब्ध जी कामधा ॥ ८५ ॥

श्रीकिन्नरें तवं कथा कथितां सुगाथा ।
ते कर्णरंध्र सुरथा मम वृष्णिनाथा ॥
त्या लाविलें तवं पथा मन मे अनाथा ।
ने सर्वथा मज रथा न द्वि चेदसूथा ॥ ८६ ॥

आराधनाधनधनागमलभ्य तू जी ।
जन्मी सती सकळजीवितदान मी जी ॥
देईन मी तुज चि जीवनजीवना जी ।
जानें अनन्यशरणांगत किंकरी जी ॥ ८७ ॥
गोविंद आर्त्तजनचातकमेघलीळा ।
हे योगिवाणिविफळा न करी सुशीळा ॥
सांडीन किंबहु तवागमलोकहीना ।
या जीविता हरि मना तुज ये तदी ना ॥ ८८ ॥
केलें तवेश पितरें मज दान येरें ।
भावें निषेधुनि शरें वचनें प्रघोरें ॥
चैद्यासि मानिल वरें तुज लाज पारे ।
कंठीरवा बळि हरे जरि फेरु सारें ॥ ८९ ॥
मंदाक्रांता विरहदळिता स्वामि तू रक्ष आतां ।
मातें नेता स्वचरणगता होसि तू सर्ववेत्ता ॥
देवाधीशा सकळकळशा केवळा केशवेशा ।
भावानाशा सदयपुरुषा माधवा माधवेशा ॥ ९० ॥
यदुकुळप्रतिभाषी वाचिलें पत्रिकेशी ।
हरि समय तयासी पूसतू विप्र भाषी ॥
करदळचय पोळें अंग दावाग्नि जाळे ।
लवकरि हरि बोले पाहिजे तेथ गेले ॥ ९१ ॥
शौरी दारुक योजिता रथवरा आरूढ चाले तुरा ।
कोण्हासी चि न जाणता सरसरा संगें--सुदेवा वरा ॥
घोषें वाजति किंकिणी घणघणा शोरीरथा चाळना ।
वेगां सागरतीर लंघितवना द्रोणी बहू योजना ॥ ९२ ॥
होते हेर समैं तिये हळधरा सांगेति विश्वेश्वरा ।
याना जाणुनियां नृपा यदुवरा संभाउनी ते त्वरा ॥
चाले आहुक मूसळी निजदळें मागें तदा भूतळें ।
भारी भंजित कूर्मदाढ सकळें पैं कांपविलें बळें ॥ ९३ ॥

टाकूनी मधुमाधवा झडकरी ते भेटले श्रीहरी ।
बोले राम भलें विजें कृत हरीलागोनियां नोवरी ॥
शौरी आहुकरामयादववळें पीढी नदी पातले ।
वैदर्भीकुशळा द्विजासि वहिलें देवें पुढें धाडिलें ॥ ९४ ॥
आनंदें द्विज जात ऊभुनि गुढी देत्या नृपाची बढी ।
सैन्यें ते न समाति भूतळमढी देखे दुनी देव्हढी ॥
गेला रुक्मिणिमंदिरा द्विज जवें घेऊनि गूढी सवें ।
आला विप्र गुढी करी सखि लवे माये सजीवें रवें ॥ ९५ ॥
द्वारस्था पद पैं द्विजा नृपसुता वंदी सुखाल्हादिता ।
बाष्पा गद्गदकंठ संपुळकिता आनंदलाभांजिता ॥
सांघे विप्र तिये तदा नृपसुते येथें हरू वो रुतें ।
आला दैत्यकराळकाळ नविते सौभागिनी देवते ॥ ९६ ॥
वैदर्भी कुशळा ह्मणे द्विजवरा तूं जीवदाता परा ।
आतां किंबहुना ह्मणौनि चतुरा लागे पदी भूसुरा ॥
घोडे भूषण वस्तुजात लुगडी विप्रासिं दे ते फुंडी ।
लागे पैं चरणा द्विजा घडिघडी प्रेमादरां वाकडी ॥ ९७ ॥
देवी पैं ककुदाधिरूढमुखरा बोले द्विजा श्रीधरा ।
वेगां पैं मज दावि दावि चतुरा मुद्रांकिता सुंदरा ॥
तेथें विप्र सुदेव सुंदर गिरा बोलौनि दावी धुरा ।
रामा आहुक उद्धवार्ज्जुनवरा चिन्हीं निजा विस्फुरा ॥ ९८ ॥

शोभे विहंगपति कांचनवर्णधामा ।
रत्नध्वजि स्फुरित हारितपिच्छ वामा ॥
पिच्छाळि नीळ मधुमाधवराजि--रोमा ।
तो वैनतेयखग देख विशाळधामा ॥ ९९ ॥
श्रीकांत तेथ ककुदी अधिरूढ पाहीं ।
सीतांशु चामर पदी विजिजे सुरांहीं ॥
पीतांशुकेतु विशदी कळशी ध्रुवाहीं ।
छत्रातळीं घनपदीं घननीळदेही ॥ १०० ॥

वैदर्भराजदुहिता प्रणमूनि कांता ।
घालू रथी चि तुकिता धरिली द्विजाता ॥
कौळीनकर्म करितां अपवाद होतां ।
एंसें झणें करि गतागत कार्य होता ॥ १०१ ॥

वैदर्भाधिप माधवा झडकरी भेटी निगे श्रीहरी ।
क्षेमाळिंगन दे तया नरहरी भीमु स्तवी सद्गिरी ॥
पूसे माधव राजया स्थळ निकें वस्तीसि तो अंबिके ।
सांघे यादवसैन्य तथ असिकें पैं उत्तरे साटके ॥ १०२ ॥

पाठी ब्राह्मण रुक्मिणी रुखवता देऊनि धाडी नुता ।
धाडीले परिचारिका द्विजसुता तो होय आरोगिता ॥
जाली भोवरि यादवासि सकळा देवें विडा घेतला ।
सर्वा देउनिया वधूहृतिकळा विप्रा पुसे सांवळा ॥ १०३ ॥

सांघे विप्र कळा हरी निज दळें बीजें करा पाहिलें ।
होतां होइल अंबिकेसि वहिलें येणें विदर्भी भलें ॥
पाठी श्रीहरि रुक्मिणी जनिहरा रायाजि नावें परा ।
विप्रा मानवला हरी हय तुंरी दे वस्तुजातां वरा ॥ १०४ ॥

आज्ञा घेउनि मंदिरा द्विज निगे देवीचयां सानुगे ।
आरोगी पतिचा प्रसाद सुभगें पैं रुक्मिणी सामगें ॥
निंद्रा भीमकिये न ये निशिभरी एरीकडे श्रीहरी ।
पाचारूनि दळाधिपा झडकरी आर्यीति सांघे करी ॥ १०५ ॥

रात्री मागधु रुक्मिया पुसतसे हा कृष्ण आला असे ।
का ह्यां बोलत रुक्मिया कुहवशें हा धीट आला असे ॥
निंद्राभूत झनी हुवाल सुभटा पैं यादवां राणटा ।
गोपां अंभनका धरू बळकटा मारा बळें सानटा ॥ १०६ ॥

पाठी पैं मधुमाधवी चि सवळें तें सैन्य पाळानिलें ।
वाद्यें वाजति वैरिमानसदळें वृष्णी महा गर्जले ॥
पाताळांबरभूतळे गिरिदरे वेळे तिये घंभरे ।
वृष्णिध्वानितवाद्यवादनभरें गंभीरधीरें खरें ॥ १०७ ॥

घेरी वाजति दुंदुभी धमधमा भांकार भेरी धुमा ।
घांघाळा तुररी बळें धिमिधिमा सिंघें तुरें डिंडिमा ॥
वाजेती घन तांबकी घणघणा घंटा गजा ढंढणा ।
भुंभुंभुंकृत शंख पैं झणझणा त्या जेगटा दारुणा ॥ १०८ ॥
कासोळी रणवेणु मांदळ खुळा भोंमोहरी काहळा ।
डौंडी ढोल सुबोंवडी सुटिवळा गिड्डी हुडुका दळा ॥
शौरी फुंकित पांचजन्य सबळे पक्षी कपी गर्ज्जले ।
पार्थू फुंकित देवदत्त तुमुळें तेणें अरी कोपले ॥ १०९ ॥
तेथें सांघति मागधा चर बळे जी वृष्णि पाळानले ।
तेथें हूलि पडे नृपा खळवळे सैन्यासि भै वर्त्तलें ॥
राजे माधवपाळका चळचळा कांपेति पैं दुश्चळा ।
आला कृष्णु परस्परें फळफळा आळोंचिती ते पळा ॥ ११० ॥
वृष्णी अंधक भोजकां चपरडे कोसांत्वतां पैं पडे ।
जुंझी ऊडति जुंझतां झपरडे गादा दळाचे फुडे ॥
दाशार्हा मधुकुकुरां दड फडे गुंडांसि साळा उडे ।
खांडे अर्वुद माथुरा कडकडे बाणा पटंगा झडे ॥ १११ ॥
कैचा हा शिशुपाळु नोवरु फुडा घातासि हो बापुडा ।
जाला राजदळा नव्हे धडफुडा झुंकेल आधी कुडा ॥
चांडाळें नचलें परी अतिबळें थोताउनी आणिलें ।
गावां जाउनि कैसया परि खळें काळापुढें घातलें ॥ ११२ ॥
आह्मां मागधवीर चांग करडा त्या गर्व गेला फुडा ।
केला पैं दश सात वेळ रगडा यांचा रणी रोकडा ॥
ए वेळे जरि वाचलों तरि कदा कोठें न जावों सदा ।
गावीं बाइल वाट पाहिल मुदा आह्मासि हे आपदा ॥ ११३ ॥
तेथें मागधु शाल्वपौंड्रकबळी चैद्यादिराजे दळी ।
राया जे करडे भयासुर फळी शस्त्री महा दुश्चळी ॥
हो रे हो ह्मणती धरा थिर रणी वीरासि पाचारुनि ।
जाले सावध वीर दुंदुभि धनी आस्फाळिले तत्क्षणी ॥ ११४ ॥

आले हेर जरासुतासि कथिती आनीक शीघ्रा गती ।
जी जी एथुनि जातुसे यदुपती द्वारावतीये प्रती ॥
पाठी आनिक हेर सांघति तया जी दीढ गावें रयां ।
गेले यादव पैं निभे मग तयां जालें भलें राजयां ॥ ११५ ॥
बोले मागधु राजयां यदुपती एऊनि गेला कृती ।
हें आह्मां न कळे पुढां ग्रहगती होईल कैसी स्थिती ॥
पूसे भीमकपुत्र एउनि नृपां हें वर्त्तलें कायिं पां ।
सांघे मागधु रुक्मियां विवर पां वृष्णीमता सांघ पां ॥ ११६ ॥
रुक्मी बोलतु मागधा मधुपती भेऊनि गेला कृती ।
तो जी राणटु गोवळू रणगती पैं कायिं जाने धृती ॥
ऐसा ही जरि गोवळेनि बरळें जुंझा रणी कासिलें ।
त्यातें मी पळवीन जी निजदळें बाळौनि ऐसें चले ॥ ११७ ॥
श्रीउग्रसेनयुत यादवभार गेले ।
श्रीकृष्ण राम तिघ अर्ज्जुन तेथ ठेले ॥
आच्छादुनी निजटके बहु लीन जाले ।
अंबाळयां चरम बाह्य पदींद्रुमूळें ॥ ११८ ॥
सूर्योदयीं द्विज निबोधित भीमपुत्री ।
यां त्रैंबिके निजगता पुसिलें जनित्री ॥
वैदर्भराजतिलका निगदी सवित्री ।
राजेनिया चि विधितें पुसिला सुमंत्री ॥ ११९ ॥
मंत्री ह्मणे नरपती जवं एथ नाही ।
रुक्मीकुमार झडती तवं काज पांही ॥
होईल हें नरपतिकुमरीसि लाही ।
जी पांठवा दळपती दळैव सवें ही ॥ १२० ॥
वैदर्भराजसुभटा रणरंगधीरा ।
मत्तायिता गजघटा नरदेववीरा ॥
धाडी सवें घनवटा कुळजा कुमारा ।
भाऊसरादि अदटा दळित प्रवीरा ॥ १२१ ॥

एरीकडे वरपदी दमघोषु राजा ।
आर्यीति पैं करि सदी कमनीयवोजा ॥
वैदर्भिये वरमुदी घनसारतेजा ।
सेलावरोध सुपदी प्रयुजी सपूजा ॥ १२२ ॥
राजा विदूरथ जरासुत सौमवाणु ।
काशीश्वरू करुष शौभपती प्रवीणु ॥
पैं दंतवक्र मुर वल्वल पीटगाणू ।
कालिंग पौंड्रक सभासद एति वेणू ॥ १२३ ॥
ऐसा होतु महा घमंडु सकळा वैवाहिके सोहळा ।
बोले भीमकु रुक्मिणीसि वहिला न्या अंबिके संकुळा ॥
पाळाणौनि दळाधिपादिश रणी पैं दोनि अक्षौहिणी ।
हस्ती गूढर घातले हयगणी ते वाति वाद्यें घनी ॥ १२४ ॥
सांघे पैं सखियासि भावकळना वेगां करा चाळना ।
उल्लिंगें प्रकळीति चंद्रवदना त्या सादरा सद्गणा ॥
वैदर्भी कळधौतरत्नकळसी संमार्जिली उन्निशी ।
काळी सौधगृही विधान सुवशी साध्वी पुरंध्री वशी ॥ १२५ ॥
कासी सेला सुकासे अतिधवळ कूशे मेखळा हंस कासे ।
गाढी मंजीर पादीं नवकरजपदीं मुद्रिका रत्नमोदी ॥
मुक्तें घाली गळांगी पदकठि कलगी कुंडलें कर्णभागीं ।
शोभे भासा कपोळी प्रचळत युगुळी गुच्छ कर्णीं झळाळी ॥ १२६ ॥
देवीहस्तारविंदी रुचिसरळ मुदी कंकणे हीरवृंदी ।
देवीपादारविंदी मिरवत सुमुदी तूळ नूपूरमोदी ॥
चाले हंसागतीतें रुणझुण विरुतें देवके अंबिकेतें ।
माळा हातीं दळातें यदुवरदयितें देखती वीरकांते ॥ १२७ ॥
देखौनी भीमबाळी मदनशरदळी विंधिलें भावकीळीं ।
शस्त्रें त्यांची गळाली त्रपित पळपळी मानवें भ्रांत जाली ॥
देवी देवेश मोदें प्रमुदितसुन्हृदें पातली अंबिकें दें ।
तीतें पूजी प्रमोदें सुरभिमृगमदें गंधधूपादिचंदें ॥ १२८ ॥

देवीभूषांबराळा द्विजरुषि अबळा वाण दे दानलीळा ।
देती आशीर्विशाळा भवदरिमहिळा आमचा पुण्यमोळा ॥
देवी यांत्राविधाना करुनि चुळ मना अंबिके बाह्य वाणा ।
आली पैं विप्रयुक्ता तवं दरि निरुता देखिला तेथ होता॥ १२९॥
बोले शौरी द्विजाता हरि निज जनिता हे हरावी महंता ।
ऐसे बोलौनि गेला द्विज सहसकळा कुंडना पैं निजाळा ॥
शौरी नोदी रथातें जनिकरकळिते वाइली स्यंदनी तें ।
गोविंदा भीमबाळी प्रमुदित सकळी रुक्मिणी माळ घाली॥ १३०॥
सुखरनरकोटी देवता पैं वधूटी ।
शरगिरिदिनदाटी वर्षती पुष्पवृष्टी ॥
ऋषिमुनिवनचारी अंतराळी विहारी ।
अतिनिगमविचारी वाणिती पैं मुरारी ॥ १३१ ॥
सचिवगण सुगीती गाति विद्याधरांती ।
यदुपतिसमयांती अप्सरानाच होती ॥
धमधमधमनादी दुंदभी देव वादी ।
घिमिंधिमिधिमिनादी मौरजा वाद्य वादी ॥ १३२ ॥
जयजयजयकारी वर्णिती पैं मुरारी ।
सुरनरमुनिसूरी मेघगंभीरवीरी ॥
यदुपति-सुरमाळालोकनानंद केला ।
प्रकटित वर हेंळा देवता दिव्य लीळा ॥ १३३ ॥
स्फुरउनि निज शंखा बोलिला शौरि देखा ।
घडघडित रणांचा मेघगंभीरवाचा ॥
जनि हरुनि निनूहें आइका वीर हो हें ।
जरि बळ तुमतें तें सोंडवा रुक्मिणीतें ॥ १३४ ॥
विहगनृपतिकेतू माधवामाजि जातू ।
हळधरकपिकेतू राहिले पैं रणांतू ॥
सुभट सुभट पंथा वेढिलें रामपार्था ।
घडघड रणमाथां गर्जती मेघ गाथा ॥ १३५ ॥

मिळउनि रणधीरा वर्षती शस्त्रधारा ।
तळपत शरपूरा हाणती युग्मवीरा ॥
घडघडित विशाळें आणि शस्त्रें विलाळें ।
कडकडित कराळें विद्युतास्त्रें शिखाळें ॥ १३६ ॥
हळधर रणमोदें गर्ज्जला सिंहनादें ।
रगडित रिपुवृंदें पीठ केली विनोदें ॥
धवळतुरगसादें वाजवी शंखभेदें ।
प्लवगपतिनिनादें भुंकभुंकारशब्दें ॥ १३७ ॥
वरुषत शरधारा पार्थु वैदर्भवीरा ।
विगडित गजभारा बाण जाळीति खारा ॥
रगडित नरवीरा चालिला पायभारा ।
मुगवित असिवारा स्यंदनास्थासि धीरा ॥ १३८ ॥
हरिहय हळपाणी मारिलें सैन्य राणी ।
दळपति मुसऊनी तैं पडे बाण हाणी ॥
नृपति अनुजबाणी वर्षला शस्त्रयोनी ।
घनु थिर निगदौनि गर्ज्जला मेघवाणी ॥ १३९ ॥
हरि हय निज कांडी पैं तयां बाण तोंडी ।
विघडुनि रथ धोंडी मारिली काप खंडी ॥
नरपतिअनुजातें खीळिलें बाणघातें ।
उडउनि शरपातें पाडिलें पैं पुरातें ॥ १४० ॥
हरिहयबळभद्रू शब्द गर्ज्जेति मंद्रू ।
घनरवजयभद्रू कोपला काळरुद्रू ॥
यदुपति निजभारें तेथ आला विरारें ।
सुरवरजयकारें वाद्यनादें प्रघोरें ॥ १४१ ॥
सचकित रिपुलोका पूसती काइ हांका ।
निगदति हरि हों कां नोवरी नेतु पां कां ॥
मगधपतिनृपाळी आयिकीलें विशाळी ।
गजबज बहू जाली राजयां तेचि काळी ॥ १४२ ॥

नृप सकळ मिळाले सिंहनादें निगाले ।
न गणित वरि आले यांदवा वेढियेलें ॥
घनघनघननादें मारि घेंघेति शब्दें ।
बळिबळिरववादें हांकिती वैरिवृंदें ॥ १४३ ॥
अरिवर शरधारी वर्षती शस्त्रपूरी ।
रविकर शर—सारी लोपले पैं रणारी ॥
रणपट—हरिनादें दुंदुभीचे निनादें ।
स्फुटत न्हृदय भेदें अंबरी नाद कोंदे ॥ १४४ ॥
यदुवरपतिसेना बाण जाळी विलीना ।
खिळितु मगधु राणा जुंझवादी प्रवीणा ॥
गगनगतयदूतें त्रासवी शाल्वपातें ।
शरजउपरमातें पावले प्राणकांतें ॥ १४५ ॥
रिपुवरचय ऐसे भीडतां थोर कासे ।
रणमद रणघोषें खीळिलें सैन्य कैसें ॥
यदुपति निजवीरा देतु आज्ञा प्रवीरा ।
समरसमरमारा वैरियां धीरवीरा ॥ १४६ ॥
ऐसे यादववीर लोटति रणा गर्जिन्नले दारुणा ।
हांका देति रणी महाघनघना वाद्या सुटे गाजणा ॥
वीरा हस्तधृतायुधें लखलखा सूर्यासमें पैं उखा ।
कोंदंडें तिर कांपखंड दुमुखा बीटी त्रिगेडी नखा ॥ १४७ ॥
भाले सायक वोडनें रणगदा कुंतें कटारा रदा ।
खड्गें मुद्गल शूळ साबळ गदा चक्रें भुशुंडी कुंदा ॥
कांती दीघळ गोफणा टळहुडी ईटी छुरी तर्वडी ।
दांडे मूशळ दुःकुंठार उफडे पैं कोल चेंडू खडे ॥ १४८ ॥
भाले तोमर कत्रि सूळ परिघा वर्शे चिरे शत्रुघा ।
खांडे अंकुश कातरी करकघा ऊफांग थाटे प्रघा ॥
पूढां वावडले वळी उखरडे काळानुगा सांगडे ।
राया सैन्य विदारिलें धडफुंडे आंधारु तेथें पडे ॥ १४९ ॥

तेथें वीर परस्परें खर रणीं बोलेति वर्मे उणी ।
बाणी विंधति पाडितातिं धरणी वीराशिरें दारुणी ॥
बाणीं अंबर दाटलें कडकडा घालीति शस्त्रें तडा ।
आंगी आदळती तिये थडथडा डोळा पडे झांपडा ॥ १९० ॥
तेथें तो बळभद्रवीरु मुशळें झोंडी रिपूचीं दळें ।
कोंपें हांकितु मागधा निजबळें ते दोघ हि गर्ज्जेले ॥
बाणीं विंधतु पैं जरासुतु तया तो जायें धावौनियां ।
मारी तुंड रथा बळें धरुनियां त्या सारथी घोंडयां ॥ १९१ ॥
हाने घाव दुजा रथा कडकडा मोडी रथू देव्हडा ।
कोपें मूशळु ऊचली धडफुडा हाने तया देव्हडा ॥
तेथें तो मगधेश्वरू पळतुसे भारांतु पैं जातुसे ।
धाकें झांकविला टका दळितसे एरू दळें धापसें ॥ १९२ ॥
विंधे पौंड्रक अर्जुना सणसणा बाणी महादारुणा ।
एरू तोंडित जायें फाल्गुनघना तोंडी रथा पैं दुना ॥
बाणी पौंड्रकु खीळिला मग पळे भारांतु पैं ते व्हेंळे ।
तेथें उद्धववीर मुख्य तुमुळें राजे रणी भंगले ॥ १९३ ॥
तेथें मागध मुख्य पैं नृप सळें गर्ज्जौनियां चालिले ।
घेघेमारि करीत मारित दळें वृष्णीसि ते भीडले ॥
त्यातें यादववीर विंधति बळें घाइ रणी मातले ।
जुंझी वीर अभंग पैं खवळले ते यादवां झोंबले ॥ १९४ ॥
ऐसें देखुनि रुक्मिणी अतिभियां चिंतातुरा वैरियां ।
बोले देखुनि शौरि वृष्णिदळयां जिंकैल ना भी रयां ॥
शौरी चक्र विडाळिलें अरिदळें तोडीत ते चालिले ।
टंकारूनि धनुः स्वहस्तकुशळें त्रासी अरी मातले ॥ १९५ ॥
क्रोधें तो बळभद्रु वोढुनि हळें झोंडी अरी मुशळें ।
तेथें अर्ज्जुनबाणजाळतुमुळें राजे रणी भंगले ॥
ऐसें माधव अर्ज्जुना हळधरा त्या जुंझतां पैं शुरा ।
जाला मोड्ड महा रणी नृपवरा ज्या मागधाचां वरा ॥ १९६ ॥

हस्ती अश्व उलंडले रथ भले बाणी रणी मोडले ।
नावांचे नरवीर पैं पडिनले लोंढे सृजा लोटले ॥
बारा वाट महाबळीनृपदळें पायीं पळाले भले ।
जातां वाट हि भूलले हुरळले राणें गिरी लंघिले ॥ १५७ ॥
ऐसे जाउनि हेर सांघति नृपा वैदर्भदेशाधिपा ।
तेथें चालतु रुक्मिया अति च पा कल्लोळ अग्नी कुपा ॥
क्रोधें मत्त अनीकिनी दशगुणा सैन्यें निगे तो रणा ।
टाकी यादवसैन्य पै झनझना देखौनि गर्ज्जे वना ॥ १५८ ॥
राहे तू स्थिर गोवळा जनिकळा चोरा सदा मोकळा ।
साहे रे मज रुक्मिया अतिबळा जासील कोठें खळा ॥
ऐसें नोकुनि विंधतु सणसणा बाणी महादारुणा ।
शौरी त्या दशसप्तबाणघटना विंधे रणी खंडना ॥ १५९ ॥
कोदंडध्वजसारथी रथहरी चक्रावकाष्टैा हरी ।
एकैकें चि शरें विदारतु दरी अक्षौहिणी नागरी ॥
रुक्मी वीरथु धावतू पदचरी क्रोधें जवें अंतुरी ।
बोले उद्धट उत्तरी अतिखरी घेऊनि खड्गा करी ॥ १६० ॥
साहे रे मज गोवळा ह्मणुनिया प्रेरीतु खड्गा तयां ।
बाणी तोडुनि चक्रपाणि समयां कोदंडकोटींरया ॥
बोढी भीमसुता धरूनि धमनी बांधे ध्वजी ताडुनी ।
माथा काढुनि पांच पाटसरणी नोकी विटंबी रणी ॥ १६१ ॥
कोपें रामु हरीसि भीमकुमरा पैं सोडवी सत्वरा ।
वस्त्रें देउनि पाठवी निजपुरा संबोखिला सद्गिरा ॥
शौरी मंगळदुंदुभी निजपुरा चाले सुखें संवरा ।
पुष्पी वर्षति देवमाधववरा वाद्यंतनादी सुरा ॥ १६२ ॥
चैद्यू तदा नोवरचिन्हहीनू ।
पळौनि गेला उपजातिलीनू ॥
संबोखुनी मागधराज चैद्या —।
देशासि ने पौरुषहानिखिद्या ॥ १६३ ॥

वैदर्भराजा हरि मूळें वोजा ।
धाडी महौजा मुनिराजराजा ॥
वैदर्भ चाले निजसैन्यमेळें ।
हरीसि जालें कुशळातिशीळें ॥ १६४ ॥
द्वारावतीनगर मंगळतूर्यघोषी ।
शौरी प्रवेशतु विदर्भ सुयादवीसी ॥
गर्गादिवर्य रुषि मंगळमंत्रघोषी ।
लावीति लग्न मधुपाळकरुक्मिणीसी ॥ १६५ ॥
आनंदसंभ्रम जगत्रय होत लीळा ।
वैवाहिका परम मंगळ गाति बाळा
स्वर्गी सुरेंद्रमुनिनारद हे चि केळा ।
पाताळवासि फणिराज विरिंचिबाळा ॥ १६६ ॥
सूर्यो दे मणिरत्न तुष्ट तपसा सत्राजिता सद्रशा ।
त्यें लेऊनि वना प्रसेनु महसा मारी हरी दुर्दशा ॥
सिंहा मारुनि जांबवंतु सुमणी ने तेथ गेला रणी ।
जिंके त्या हरि जांबवंतु सुमनी दे जांबवंती वनी ॥ १६७ ॥
क्षाळीतां अभियोग यादव हरी सत्राजिता दुःकरी
गाळी देति कदुत्तरी मनि हरी दे सत्यभामा वरी ॥
शौरी सप्तकडंगरीयकळिका केली बळें काशिका ।
तेथें पैं मधुपासि नाग्न जितिका ते माळ घाली सुका ॥ १६८ ॥
शौरी उज्जयिनी स्वयंवर चरी जिंके नृपा दुःशरी ।
घाली माळ हरीसि मंगळकरी ते मित्रविंदा वरी ॥
राधायंत्र दुवाड भेदुनि हरी तो लक्ष्मणेतें वरी ।
भद्रा अर्पित माळ कंठ समरी भद्रा हरी श्रीहरी ॥ १६९ ॥
काळिंदी प्रणिली हरी सुगहनी पार्थासवें नेउनी ।
मारीले मुरुपीठ दुर्जय रणी प्राग्ज्योतिषा जाउनी ॥
मारी भौमु हरी हरी वरतनू साहस्र सोळा घनू ।
मारी शंबर शौरिपुत्रमदनू जो आनिला चोरुनू ॥ १७० ॥

वैदर्भीकळही प्रियोन्नति उते भामा हरी दान ते ।
देवी प्राखर गर्वहानि तुळंत जाली वधूभूषिते ॥
भामेलागुनि पेरि जातु हरिला प्रद्युम्नभू जन्मला ।
शौरी सागरवारिखेळनकळा प्रेमोदयो दाविला ॥ १७१ ॥
भामासौंदर्यगर्वा सगरुडविरवा धापसी पाणिभावा ।
मोही तो नारदातें प्रकटितु निरुतें ब्रह्मचर्येष्टिकातें ॥
पावी राज्या सुदामा मदनसुत रमा नीत मोन्नूं सुधामा ।
जृंभाखें शूलपाणी भुलउनि धरणी तोडिले बाण पाणी ॥ १७२ ॥
गेला कोशासि शौरी स्वपद--अनुकरी मारिला पौंड्रकारी ।
पांडीलें काशिराजा शिर हरि सहजा विस्मयो वृष्णिराजा ॥
धाडी सौदक्षिणू ते सुकृति मखकृतें द्वारके अग्निभूतें ।
ते शौरीचक्रभीता दहिनिजनुदिता भस्म काशी समस्ता ॥ १७३ ॥
रामें पैं युद्धलीळा द्विविधु वधिला रुक्मियां घातु केला ।
मारीलें बल्बलातें मुनिजन निरुतें पाववीलें सुखातें ॥
गंगांती कामपाळें कुरुनगर हळें निक्षिपा उच्चटीलें ।
शांबा सांडौनि योषा प्रणत गतरुषा देतु दुर्योधनूषा ॥ १७४ ॥
अक्रूर आज्ञापित सत्युधाना ।
सत्राजिता मारितु वृष्णिराणा ॥
मारी तयां एरु मुनींद्रनेता ।
संबोखिता त्या हरि होयें होता ॥ १७५ ॥
गोविंदें दैवभूता जतुगृह दहता रक्षिलें पांडुपोतां ।
पांता पांचाळदेशी जनिहरणरसी भेटला पांडवासी ॥
त्या अर्धे राज्य जालें मग हरि वहिलें खांडवप्रस्थ केलें ।
स्वर्गा सामान्य शौरी निगतु यदुवरी द्वारके पैं मुरारी ॥ १७६ ॥
छेदी सौभद्रहस्तां हरि जठरगता दांगविलासकर्ता ।
वज्रा आऊठ योगें सुरयुवति निगे स्वर्गलोकासदंगें ॥
क्षीराब्धी पार्थयोगें गतु हरि सुभगें वंदिला सानुरागें ।
लक्ष्मीनारायणें तो द्विजसुतहरि तो साज्र्जुनू कृष्णु देतो ॥ १७७ ॥

पार्थेसी देवराणा प्रचळतु गहना खांडवां दानदूना ।
देता तो पैं मुरारी शिखि दहन करी खांडवां भस्म भूरी ॥
इंद्रेंसी युद्ध जालें मग हरि वहिलें द्वारके यान केलें ।
गोविंदा राजसूया कुरुपतिसमयां नेतुसे वृष्णिवर्य्या ॥ १७८ ॥
सकळधरणिपाळा पांडवी भंगु केला ।
विन मगधनृपाळा अर्ज्जुना मोडु जाला ॥
द्विजनट अवगौनू श्रीहरीभीमसेनू ।
हरिहय झडकौनू मागधा जातिलीनू ॥ १७९ ॥
सृतिवचनरवातें आइकें पैं घनातें ।
मगधपति तयातें हांकरी तो सभातें ॥
मगधनृपति बोले एथ कां यान केलें ।
मधुपति मग बोले युद्ध याचें युगाळें ॥ १८० ॥
ह्मणतु मगधुराणा अर्ज्जुना पाडहीना ।
हरि तुज रणहीना पांडु नाही वदाना ॥
मज हरि समजा ना पांडु पैं भीमसेना ।
सगरसमरबाना चालिला वैरिराणा ॥ १८१ ॥
प्रकटत रणवीरा कांपली भूमि धीरा ।
तनु हतखरसारा जर्ज्जरा लोहधारा ॥
विघडिति गिरिकूटें पां पराघात नेटें ।
घनवनरव फूटे अंबरी सादु ऊठे ॥ १८२ ॥
दोघा निर्घात शंका कडकड थडका हानती एकमेका ।
ब्रह्मांडा संधि खंडे फणिनृपति--फडे जर्ज्जरीभूत पींडे ॥
हांका देती प्रचंडा सुतडक निविडा हांणती ते फडाडा ।
तेनें भूगोळ नादें बधिर रणमदें गर्ज्जती शैळवृंदें ॥ १८३ ॥
दोघांचा टंकघाती कुधर तडकती जानुदघ्नां उडंती ।
भूगोळी धूळि दाटे रविकिरण झटे अंधकारी विलोटे ॥
भीमा गोविंदु खूणा करधृतइशना दावि चीरूनि दूणा ।
कोंपें त्या भीमु भीडे करि विषम धडे मागधा प्राण सांडे ॥१८४॥

हांहाकारें प्ररोदें हितजनुदरदें मागधा पुत्रखेदें ।
त्याचें त्या राज्य देतु प्रभुनत बहुतु बंदिशाळे प्रगंतु ॥
रायां सोंडी तदंता अयुतयुगशता आठ गोविंदु शांता ।
सांघे संविात्ति ज़ालें मुनिनृप उरले धर्मयज्ञासि आले ॥ १८५ ॥
यज्ञांती फणि दाटि दुर्ज्जय यती ते उत्तरी श्रीपती ।
राजा धर्म करी हरी ऋषि स्तुती पैं अग्रपूज़ा मती ॥
वृष्णींद्रा शिशुपाळु गाळिशत दे तो मारिला श्रीपदें ।
धर्मा यज्ञु करूनियां हरि पदें द्वारावती ये मुदें ॥ १८६ ॥
रुद्रातें शोभ राणा खरविधिकळना तोख विज़ृंभमाणा ।
त्यातें पैं शूळपाणी वरितु वरु रणी यादवां जुंझ हांनी ॥
यज्ञा गेला मुरारी मग मधुनगरी वेढिली पैं महारी ।
गर्ज्जे आकाश--खोरा घडघड समरा हांकरी वृष्णि वीरा ॥१८७॥
तेथें प्रद्युम्नवीरा यदुवर समरा चालिला युद्धपारा ।
विंधीला शाल्वु बाणी गगनगतुगणी कार्मुका टंकरूणी ॥
वृष्णी पैं सिंहनादें रणरभसमदें हांकिती वैरिवृंदें ।
कुंती खड्गी कराळी प्रदळिति तुमुळी वैरियां अंतराळी ॥ १८८ ॥
खीळीलें शाल्ववीरा दळसहित खरा जर्ज्जरीभूतसारा ।
संग्रामी पैं समोरी नुपरवति अरी ते तिरोभूतचारी ॥
विस्मो दाशार्हवीरां प्रकटत विधुरा सागरी वैरिवीरा ।
वृष्णि देखौनि कीळा खिळिति सरकळा सागरी छद्मलीळा ॥१८९॥
त्यातें विंधेति बाणी मग गतगगनी भूतटी देखऊनी ।
पांतां ते वृष्णिवीरा न दिसति मिहिरा पातले अंधकारा ॥
अंधारें घोर जालें नयनगति गळें वर्षती ते सिसाळें ।
रक्ता पर्ज्जन्यधारा भय धडनिकरा यांदवां कंसकारा ॥ १९० ॥
वर्षे दंता शिळौंका द्रुम घनकरका देखतां कोपशंका ।
पावे प्रद्युम्न रोखा कपटपटुमुखा मायिकावर्य देखा ॥
मायाविक्षोभनाथा दळि कपटपथा दारुकू गोपिनाथा ।
शाल्वें प्रद्युम्न हाला विधुरशरकळा गर्ज्जला मेघलीळा ॥ १९१ ॥

शौरीं निश्चेतु जाला मग रथु वहिला धूर्धरें काढियेला ।
संग्रामीहूनि चेतोहरिसुतु नयेता बोलिला वाक्य सूता ॥
संग्रामी पाठि देणें अनुचित करणें लंघिली नीति येणें ।
आतां संग्रामभूमी मज निनिविदमी ने रथा तेथ कामी ॥ १९२ ॥
शाल्वा प्रद्युम्न हाने घडवडित रणें दुर्गदाघातुतानें ।
शाल्वा मूर्छा न संटे अवनिसि झगटे तो तिरोभूत नेटे ॥
ऐसा प्रद्युम्न तेरा दिन करि समरा शाल्वराजें प्रघोरा ।
ऐसा काळी मुरारी गरुडतनुचरी द्वारके एतु शौरी ॥ १९३ ॥
शौरी देखौनि वीरां हरिसुतमुखरा यांदवा तोख धीरा ।
टाकौनी शाल्व गेला यदुचय त्यजिला कृष्णु शोंभेचि हेळा ॥
शोभस्था शाल्ववीरा खिळितु सरसरा बाणजाळी तिखारा ।
शाल्वें शौरी त्रिशूळें धगधगितबळें सिंथिला पैं विलोळें ॥ १९४ ॥
गोविंदें त्या त्रिशूळा तळपत चि झळा तोंडिलें बाण लीळा ।
शाल्वू धोंडी प्रचंडा वरुषतु झगडा चूर्ण शौरी थड़ाडां ॥
केलीया पैं कुठारी खळबळ समरी तोंडिलें बाण भारी ।
रक्ताचा पूरु वाहे भडभड निवहें कोपला शाल्वु लाहे ॥ १९५ ॥
सैन्या देखौनि आटू अतिरणसुभटू जे गदा देव ताटू ।
त्या हाला शौरि रोखें हरि--करु तरखे कार्मुका पातु देखे ॥
संतोषे शाल्वु तेथें यदुवर दुरथें वैरिभारा सुखार्थें ।
कोपें गोविंदु चाले रगाडित सकळें वैरिसैन्यें विशाळें ॥ १९६ ॥
संग्रामी धीरवीरा हरि दळितु वरा एकला वैरिभारा ।
तोडी चक्रें मुरारी खरतर समरी नंदकें वैरि मारी ॥
गर्ज्जे निर्घातनादें हरि समरमदें मारिली वैरिवृंदें ।
तेथें कौमोदकीतें प्रहरुनि निरुतें भंजिलें वैरियातें ॥ १९७ ॥
ऐसा शौरी विशाणें तवं गतु गगनें शाल्वु अंतर्दधानें ।
तेथें मध्यान्हकाळीं रिपुवरकुटिळी संगरी माव केली ॥
देखे तो चक्रपाणी स्वजनकुजननी बांधली दैन्यवाणी ।
अंवा भाषी कृपेतें हरि हरि निरुतें सोंडवी दंपतीतें ॥ १९८ ॥

शौरी पैं दैन्य मानी प्रवदतु वचनी हांकटा चक्रपाणी ।
वेषा दे मानु भूरी ह्मणतु हरि हरि कायिं कीजे मुरारी ॥
ते भावी थोर शंका त्रिसपदघटिका ते तिरोभूत लोकां ।
अबे तातासि मा भी यदुनृपति न भी देखिला शाल्वु शोभी ॥ १९९ ॥
शौरी विंधौनि बाणी कडकडित रणी अंबरा गर्ज्जऊनी ।
शोभाचें चूर्ण केलें तडतड शकलें अर्णवी पाडियेलें ॥
शाल्वाचें शीर दारी नवनिशितशरी अंबरी पैं मुरारी ।
पुष्पा वर्षाव जाला हरिविजयकळा द्वारकेमाजि गेला ॥ २०० ॥
पाठी गोविंदु मारी बळकटु समरी दंतवक्रा सुरारी ।
जीवज्योतिःप्रसारी चरणगत सुरी देखिली पैं मुरारी ॥
वैकुंठी वृष्णिमौळी जयविजयफळी घातले दैत्य केळी ।
शापें ते दैत्य मूळी जनित ऋषिकुळी चैद्यु काळिंग काळी ॥२०१
देवादैत्यासि काळू प्रतिरणसबळू लोकपाळा कराळू ।
जुंझी बाणी तिखारी वधि हरि समरी तो विदुर्यानबैरी ॥
भ्रातृव्या पूतनाधी वधितु निरवाधि तो विदुर्यान युद्धी ।
सर्वांती उग्रसेना सकळनृपजना निम्न केलें सुजीर्णा ॥ २०२ ॥
सौभद्रा नीळकेतू करि बळसहितु वत्सळा दानदातू ।
धर्में पैं द्यूत खेळें सकळ गमविलें द्रौपदीबंधुशीळें ॥
हीरे वस्त्रें समाजी कुरुपति सरजी द्रौपदीची दुरौजी ।
तेथें पावे मुरारी वसन वसकरी राखिली कीर्ति शौरी ॥ २०३ ॥
सौभद्रें वत्सळेतें मधुपुरगमितें भंगुनी कौरवातें ।
नेलें त्या दे मुरारी प्रवणविधि वरी वत्सळा पैं कुमारी ॥
दुर्वासा द्रौपदीतें कुटिळ वनगतें मागतू भोजनातें ।
हारी दुर्वासगर्वा मधुपति बरवा पांडवा देतु जीवा ॥ २०४ ॥
कांतारी द्रौपदीसी हरि कुटिळ वशी सिंधुराजु प्रवासी ।
त्यातें पैं भ्रांत केलें मधुपति वहिलें रक्षिलें सत्व बाळें ॥
कर्मीरें पांडुपोतां धरुनि अवचितां चाळवीलें समस्तां ।
त्यातें मारी मुरारी रिपु दहन करी भीमसंयुक्त शौरी ॥ २०५ ॥

शौरी वैराटदेशी शिवतरकळशी भेटला पांडवासी ।
शिष्टायीलागि वीरा कुरुपतिनगरा जातुसे नीतिसारा ॥
तेथें दुर्योधनातें शिकवितु निरुतें राज्य दे पांडवातें ।
त्या शब्दा तो न मानी मग हरि सरणीं लागतां घाट वाणी ॥२०६
तेथें विज्ञान केलें हरि कुरुजवळें राजया ताडविलें ।
घे तेथें भाव कर्णा निजविदुरवना चालिला वृष्णिराणा ॥
वृष्णीतें दे सहाया हळधर समया कौरवा शौरि माया ।
नोदी ताळध्वजातें वृक जठरगतें मारवी बभ्रु घातें ॥ २०७ ॥
विपरित तिथिवेळा तो करी आजि लीळा ।
समरगत नृपाळा भेदु सैन्यासि केला ॥
रणपटहतुरादी शंखभेरीनिनादी ।
प्रकटत रणभेदी हल्लकाल्लोळ शब्दी ॥ २०८ ॥
प्रचळत घनधारा शस्त्रसंपात वीरा ।
हरिहयरथ सूती ठेविला पैं रणांती ॥
निजसख कुरुवीरा पार्थु देखे समोरा ।
सकरुणरवबादा थोर पावे विषादा ॥ २०९ ॥
हरिहरिहयवीरा मोह नाशी विपारा ।
प्रकटुनि कळरूपा दाखवी विश्वरूपा ॥
बहुत मुकुटमाळा भीमदाढा कराळा ।
कळकळ बहु भूतें खेचरें वीर्यवंतें ॥ २१० ॥
विकट भट सिशाळा देखिलें रुंडमाळा ।
तळपत रविमाळा कोटिसंख्या विलोळा ॥
हरिहययदुनाथा उत्तमाश्लोकनाथा ।
विनवितु तवं पंथा जी न लंघी निजार्थां ॥ २११ ॥
ऐसा संग्राम होतां यदुपति निरुता मारवी भौमपोता ।
पार्थेसी भीष्म भींडे दिनकर खिरडे बाण जाळी वितंडे ॥
त्या दोघा बाणजाळी खगत पळपली ते विमानें पळाली ।
गर्जे भीष्मू रणांती घनघनविरुती वृद्धजुंझारनीती ॥ २१२ ॥

पार्थे संधान केलें खर सर दळिलें विंधिला भीष्म काळें ।
त्या बाणा भीष्म तोडी रणभट रगडी कोपला कापखंडी ॥
घाली अंबापतातें हरिहय निरुतें वन्हिकल्लोळवातें ।
आलें भीष्मा न संटे निजतनु झगटे गर्ज्जले थोर नेटें ॥ २१३ ॥
तेथें तो भीष्मुराणा गुरुशरकळना शस्त्र तोडी सीहाणा ।
काढी वाणा तिखारी रिपुदळन करी ज्याप्रतीकारहारी ॥
पैंजा सांडौनि शौरी अरकळन करी मारवी भीष्मु भारी ।
भीष्मू कोदंडपाणां अमित सरवणी मोरु केला खिळौनी ॥ २१४॥
सांभाळी भीष्मुवीरा हरिशराविधुरा तो स्तवी वृष्णिवीरा ।
द्रोणेंसी पार्थु जुंझे सुरनवट बुझे फेडितू भूमि वोझें ॥
मारी कैवर्तवीरा हरिहयसमरा व्यूह भेदी कुमारा ।
सौभद्रा घातु जाला कपिपद विकळा पैंज घे शत्रुहोळा ॥२१५ ॥
सातां अक्षौहिणीतें वधउनि निरुतें सांध्यकाळी दहातें ।
शौरी पैं पार्थराजा करवि शररुजा मारवी सिंधुराजा ॥
तेथें पैं पार्थवीरा करवि अरिशिरा पाटवी बाणधारा ।
ते गेले शीघ्र चोरी निज जनक करी तो पडे सिंधुतीरी ॥ २१६ ॥
पाचारी भीमपोता मधुपति निरुता पाठवी कौरवांता ।
तो रूपें घोर जाला गिळितु रिपुकुळा राक्षसाधीशलीळा ॥
त्यातें आदावळीतें प्रहरुनि निरुतें कर्णु मारी रणांतें ।
शौरी पार्था विशाळा अतिकुटिलकळा द्रोण पैं मारवीला ॥ २१७ ॥
कुंतीया वन्हिचीरा हरि वितरि खरा आणवी बाणसारा ।
कर्णापासूनि पार्था करवि रणपथा मारवी कर्णु मंथा ॥
संग्रामी पार्थ रायां करवि हरि तया मारवी शैल्यरायां ।
शौरी पैं कर्णपोता वधु करि निरुता घोररूपें दुरंता ॥
लोहाचा भीम अंधें कवळुनि वसुधें चूर्ण केला वरोधें ।
कृष्णें कौशल्य केलें मरण चुकविलें अंधहातें विशाळें ॥ २१८ ॥

॥ षट्पदी ॥

स्तब्धी सूर्यासि शौरी कुरुपतिसमरी भीमसेना मुरारी ।
आज्ञा दे वैरिघाता वधि समरगता कौरवां तो समस्तां ॥

वंची दुर्योधनातें हरि कुसुमवृतें चालिला तो रणातें ।
तेथें संघर्ष जाला विधुररणकळा भीमसेना नृपाळा ॥ २१९ ॥
आरंभें झुंज्ञ दोघां प्रतुमुळ अरिघा कौरवा भीमराघा ।
शस्त्रास्त्री घातभेदा दळित रणगदा पातली भूमि खेदा ॥
दोघैं वज्रांगदेही रगडिति निवही पर्वता भारवाही ।
धोंडी घांती विशाळा दळदणितकुळा भूतळा कंपु जाला ॥२२०॥
दोघा आंगी विशाळा स्फुटति गिरिशिळा चूर्ण होऊनि हेळा ।
लोहाचें चूर्ण जालें उपरि भिडिनले मल्लविद्याकराळें ॥
शौरी भीमासि दावी करखुण बरवी पाडिला मल्ल गोवी ।
राजा भीमें विसोंद दळित रणगदें होत भग्नोरुखेदें ॥ २२१ ॥
ते रात्री कृप मूसळी निशिभरी द्रोणात्मजू प्रोत्तरी ।
मारी सुप्तदळा युधिष्ठिरपुरी शस्त्री तिखारी शरी ॥
तेथें वारित माधवू हळधरा त्या पांडवां संगरी ।
सर्वां ऐक्य करूनियां निजपुरा धाडी हळी तें वरा ॥ २२२ ॥
क्रोधें फाल्गुणबाळ कौरवकुळा मारी शरी दुःकळा ।
रक्षीला वृषकेतु निर्ज्जरकळा तैं कुंतियां पाळिला ॥
शौरी कौरवअंबिकेसि समरी संबोखिलें उत्तरी ।
राजा धर्मु नृपासनी नृपवरी पैं बैसवीला हरी ॥ २२३ ॥
अश्वत्थामा विशाळी कुरुजपतिकुळी ब्रह्मशस्त्रासि घाली ।
संहारी तें समस्तां कुळजननगता पांडवीया सुपोता ॥
तेथें वैराटबाळा स्मरत घनकळा पावला दिव्यलीळा ।
रक्षी गर्भस्थितातें अरशयनिरुतें संकटी नंदनातें ॥ २२४ ॥
जाला नामु स्वजातां कुरुसमरगतां भारतां पैं समस्तां ।
पूसे भीष्मासि राजा विकळित विरजा मोक्षधर्मा महौजा ॥
गंगेचा पुत्र बोले अतिकुशळ भले मोक्षसाधर्म्य काळे ।
शौरी पैं आदरंते कुरुसह निरुते आयिकीलें महांते ॥ २२५ ॥
व्यासा धर्में सुशीळा कुळवध समळा शाळना प्रश्नु केला ।
त्या सांघे अश्वमेधा बहुकरणविधा राजया पुण्यराधा ॥

त्या सिद्धी नेतु शौरी नृपवर समरी जिंकवीले मुरारी ।
यज्ञाचा अंतु जाला कुशळविधिकळा द्वारके कृष्णु गेला ॥२२६॥
शौरी पैं वज्रनाभा वधि दनुजसभा पातले देव शोभा ।
केलीयां पुष्पवृष्टी मधुपतिमुकुटी वंदिती पैं किरीटी ॥
सांघे गोपाळ मंत्रा हरि अतिरुचिरा भीमकीये सुनेत्रा ।
वारी पैं पुत्रजातां मधुभुजि बहुतां यादवां देव नेतां ॥ २२७ ॥

॥ एवं भारतकथा ॥

॥ आतां लीळापंचविशी ॥

यदुपति निजभक्ता राजदाता प्रसक्तां ।
पुनरपि विदिवक्तां अर्ज्जुना विस्मृतोक्तां ॥
विनवि हरि विधाता देवराजा प्रयाता ।
विषयविनयगीता श्वेतवाजीसि हूता ॥ २२८ ॥
वाग्वज्रें विप्रजातां यदुकुळकळितां मैाशळा या महंता ।
जाला घातु प्रभासे यदुकुळ विनशे एरिकां जाळ हासे ॥
योगाभ्यासें तनूतें हळधरु निरुतें त्याजिता सागरातें ।
योगाग्नी कृष्णराणा निजतनुदहना तो करी धामधाना ॥ २२९ ॥
धर्माकुंती समस्ता श्रुतबहुदरतां कुंतिये प्राण गंता ।
वज्रा राज्याभिषेषू करित कुरुवसू यादवां भूतशेषू ॥
स्थापी सौभद्र गोदी निजविषयपदी पांडवां यान सादी ।
जाले हैमाचळासी व्यसु सजनिवशी धर्मु गेला दिवासी ॥ २३० ॥
दैत्या मारूनि शौरी कुरुपतिसमरी पांडवां व्याज भारी ।
विप्रा शांपें मुरारी दळित यदु हरी उद्धवा बोध कारी ॥
बीजें पैं स्वीयधामा करित निजरमा रुक्मिणी सशुधामा ।
कुंती धर्मादि धामा निनितु सुभसमा गोपिका स्वीय रामा ॥२३१॥
श्रीमल्लीळारसारा परशरणपरा गोपगोपीविहारा ॥
कैवल्यासारकारा परतवमिहिरा नामलीळानुसारा ॥
मायाविघ्नप्रहारा विगळितविसरा मानिनीमोहसारा ।
दिव्या चित्तानुकारा सकळसुरवरा त्वां नमो वृष्णिवीरा ॥ २३२ ॥

लीळैकविग्रहमघा वरदा अमोघा ।
सद्विग्रहा सदनघा कळिदोषलंघा ॥
दत्तात्रिपुत्र सरघा श्रुतिमूळराघा ।
शुभ्रप्रकाशकरघा प्रणतोस्मि रंघा ॥ २३३ ॥
भूकार्त्तवीर्यवरदा यतिमार्गमोदा ॥
नेळर्कतापकरदा मितवेषसादा ॥
शार्दूळवेषतनुदा प्रभुचारुवेदा ।
पीताख्यदत्तसुविदा प्रणतोस्मि गोदा ॥ २३४ ॥

तूं मूळपीठ सुंदरा प्रभु एकवीरा ।
संस्थापका परिकरा परशर्मकारा ॥
सैंहाद्रिचूळवसरा रुषिवेषधारा ।
संसारदारणकरा प्रणतोस्मि सारा ॥ २३५ ॥
देवेंद्रवंद्यपदकामितभूमहौका ।
कारुण्यशक्तितनुका धृतसप्तशाका ॥
मध्यें परावरवृका सफळा रतैका ।
सुद्धेश्वरा शजनका प्रणतोस्मि लोकां ॥ २३६ ॥
वर्याबिकाजतनुता परलक्षणांता ।
सादिव्यशक्तितनुता धृतशक्तिवीता ॥
सृष्टयंतकाळतनुता वरदिव्यमूर्त्ता ।
स्वीयां निजांतु गमिता प्रणतोस्मि कांता ॥ २३७ ॥
लीळा देहा विदळित दहा रक्षिता जो समूहां ।
जीवां मैाहा भवनभयहा खेळनें देवमोदां ॥
खेळे लीळा वरित सकळा द्वारके चारुमाळा ।
नामा काळा दळित समळा सन्नतोहं सुलीळा ॥ २३८ ॥
क्षेपी पुंजे सरिति विरजे मार्ज्जनी हस्त सज्जे ।
झाडी वीथी परिसरपथीं सुर्पहस्ती प्रमंथी ॥
हाने धीरा हरि जनिभरा मार्ज्जनी सुर्पसारा ।
विद्यामार्गा वितरि सुभगा सन्नतोहं त्र्यनंगा ॥ २३९ ॥

तीरी गंगे सदन सुभगे गुंडमेशा विरागे ।
सुर्पे हाने वरपरखुणे देतु जाज्वल्यमाने ॥
शुक्ला दुंडी वितरि उघडी मार्गमंत्रा मुताडी ।
देवाधीशा परमपुरुषा सन्नतोहं परेशा ॥ २४० ॥
संख्याहीना नरवरजना सिद्धि दे देवराणा ।
विद्यादाता भवगजहता बावना देव नेता ॥
योगीलोका चरणभजकां देत आनंदतंका ।
नामें पीता प्रमुदितगता सन्नतोहं सदंता ॥ २४१ ॥
मायावेषा कळितपरुषा सत्फळा सर्वभाषा ।
लीळाखेळा द्विजकुळकळा केळिहेळा मुलीळा ॥
चित्रालीळा दळितसमळा केवळा दिव्यकीळा ।
देवीवेषा दळितपरुषा सन्नतोहं सुवेषा ॥ २४२ ॥
चरणकमळलीळानंद दे योगिमाळा ।
जळधरतनुमाळा शामळा मूर्त्तिशीळा ॥
लपननयनलोळा रुद्धिपुर्ष्या विशाळा ।
सुरनरमुनिकेळा त्वां नमो गुंडकेळा ॥ २४३ ॥
क्रिमिविधिपददाना भावमूळप्रहाणा ।
कळितलळितगाना बाळलीळाविमाना ॥
परमफळविशाणा केवळा कर्मभिन्ना ।
प्रभुपरतरकाना सन्नतोहं सदन्ना ॥ २४४ ॥
गगनकरजशाखा दावि टाळी सुरेखा ।
घटित वदत लेखा आत्मना आत्मभाखा ॥
प्रतिसदनसुलीळा खेळु खेळे सुबाळा ।
प्रभु कारि पद मेळा सन्नतोहं सुकाळा ॥ २४५ ॥
विभुचरमसुदेहा श्लेपकारी विदेहा ।
अमळनरसमूहा सेव्य देवेंद्रवाहा ॥
करधृतसुभखाद्या देतु संवित्ति आद्या ।
प्रभुपरतरविद्या सन्नतोहं सुवंद्या ॥ २४६ ॥

गळितगुणसमूहा ब्रह्मविद्यावराहा ।
हरिपर गुरुलेहा पंकजामोदमोहा ॥
अकळवदनभाशा माधवा गुंडमेशा ।
प्रभु जयजय केशा सन्नतोहं कृपेशा ॥ २४७ ॥
श्रीमच्चक्रेशराणा निजपरमखुणा भूतळीं सेव्य जाणा ।
खेळे लावण्यहेळा विदळित समळा नागरा आर्यलीळा ॥
संवर्य्यो नागदेवा करुनि निजभवा वर्य्यबोधप्रभावा ।
स्थापीलें ज्ञानमार्गा परतरसुभगा नेत पैं दोष भंगा ॥ २४८ ॥
मार्गी मार्गीण भूता अवरगतिरता पंचविशा फळांता ।
जीवा संसाध्य दाता उपरि निगमिता साधनें साध्य घेता ॥
वेधें विद्धा अनंता अवतरुनि रता कर्मभूमीसि संता ।
संपादी केवळांता प्रभुसदयमता चारिभेदा महंता ॥२४९ ॥
एका उत्कर्षकारा विमळरतिपरा देतु कैवल्य धीरा ।
शुद्धा चौं जों प्रकारा गाळितगुणपरा सद्गती दे प्रकारा ॥
एका पंचप्रकारा भवनिपुणपरा शक्तिरूपाविकारा ।
संबंधाप्राप्तसारा हरुनि हरि वरा देतु युग्मप्रकारा ॥ २५० ॥
ऐसें प्रापंचिकांतें प्रभु नर निरुतें पावऊनी तदंतें ।
त्या दे कैवल्य वेधा सुरचिरविविधा आनिका ब्रह्मबोधा ॥
वर्य्या साध्यासि दाता सकळगतसता सृष्टिमध्यें सुनेता ।
जीवा साध्या समर्था प्रगतपरपथा कारुणामुख्यअर्था ॥ २५१ ॥
तेथौनी देवराणा निनितु वरजना साधनें साध्य जाणा ।
ऊर्ध्वा साध्यासि दाता प्रमुदितमहता मुख्य आब्रह्मभूता ॥
ज्याची संख्या न वर्णे उदितपरखुणे भूति पैं कोण जाणे ।
ज्ञानी संभ्रांत जाले उभयज उगले एर ते अंध जाले ॥ २५२ ॥
सप्तांगी सप्तभूती मुनिवरसुगती पावती भिन्न जाती ।
एकी आप्राप्त सर्वा सुरवरविभवा तेथ नाही रिगावा ॥
शुद्धा ब्रह्मानुभूती न पवति निरुती दुर्लभा ते तदंती ।
एकाधा भाग्यवंतू प्रगतअनुमतू प्राप्तियोग्य प्रसक्तू ॥ २५३ ॥

आनंदा सानुभूता अरकर निरुता योग्य तेथे चि पांतां ।
सद्विद्या योग्य तेथें गामितपरपथें ज्ञानियां भ्रांति जेथें ॥
तीभागीं वर्त्तमाना परतरगहना पंचपंचांगभिन्ना ।
पंचांगी सप्तभाषा युगयुगपरिशा अंगमुख्या विभाषा ॥ २५४ ॥
आनंदें पूर्ण शोभे अविकर सुलभे देवराजे सुदर्भे ।
एराचा पाडु कोठें विभु वदन पठे कर्मभूमींसि पेठें ॥
थोरा जें थोर सर्वां अजनिजविभवा वर्यवर्या सुहावां ।
ऐसें तें ब्रह्मवेदा विभुभवन सदा ज्ञेय नान्या सुवादा ॥ २५५ ॥
दिव्यां दिव्या प्रसिद्धा मुनिजन विविधा पावले प्रेमवेधा ।
आठातें एकि वर्य्या वरजनिनिचया दिव्यदिव्यां महार्या ॥
जीचा वृंदावनांती जनिचय मिळती त्या समावेश होती ।
ऐसी ते दिव्य मिश्रा सकळपरतरां मुख्य सोळासहस्रा ॥ २५६ ॥
कैवल्या मुख्यवर्य्या मुनिवरसमयां प्राप्त जाले वरायां ।
अष्टांगा अष्टभेदा नवनवसमुदा एकका मुख्यभेदा ॥
त्यातें कोण्ही चि नेणें विन परमखुणे शक्तिसंघू न जाणे ।
जानासि भ्रांतचित्ती अविदितसुगती जाणिजे ते महांती ॥ २५७ ॥
आठां ही मुख्य गौरी त्रिविधतनुहरी मुख्य हें रीति आरी ।
एरी गौरी अपारा प्रभुवरितवरा मुख्य आरावधारा ॥
चित्संज्ञा चित्रवेषा अमितविभुवशा साध्यदाती मुनीशा ।
आरां पंचांगमाळा सकळनिजकळा तेथ जीवांसि कीळा ॥ २५८ ॥
गौरीनामा धरुनि विनमा चक्रपाणी सुशर्मा ।
आनंदातें करित निरुतें सर्वशक्तींसि अंतें ॥
वेधें वेधी सकळ अवधी प्राणसर्वांगसंधी ।
द्रावी चेता सुरवरगतां थोरु आल्हाद कांतां ॥ २५९ ॥
लीळायुग्में सकळ सुगमें मोदवी देव वामें ।
तेथें रामा प्रगत विरमा नीववी वर्य्य वामा ॥
दग्धें चेतें मुदितजनितें तो करी गौरीभूतें ।
भूतां शांती निजपरगती पाववी लोकयुक्ती ॥ २६० ॥

सृष्टीमाजी परविभु अजी नीववी त्यक्तिराजी ।
सुद्धानंदी महितसुपदी मुख्य कारुण्यमोदी ॥
देवां योगें परमसुभगें सर्व ही दुःख भंगे ।
कारुण्यातें जनितमुदितें माति ना भूतळातें ॥ २६१ ॥
आना सांतां विभु निववितां एकिवाचूनि कांता ।
देता मोदा प्रमदसुमदा आनिकां ही सुनंदा ॥
खेळे लीळा प्रमदसकळाकेळिकारा सुहेळा ।
आनंदा दे धवळित मुदे केवळे बोधवेदे ॥ २६२ ॥
पांचा भामां सुकरपरमा येउनी तेथ वामा ।
सौख्या पादी गततळपदी मानिनी मुख्यवेदी ॥
राहे राता विभु निज पिता पावला काळिमाता ।
सर्वां जीवां सुलभविभवां तेथ भेटे विशावां ॥ २६३ ॥
चाले राजा सहगतअजा भक्त ते मुख्यभाजा ।
सर्वा वामा कळितनिजमा उज्ज्वळा दिव्यधामा ॥
त्रैधा मायापुरहरिमया स्वीकरी दिव्यमाया ।
सर्वां जीवां प्रकटितभवां उद्धरी तो सदैवां ॥ २६४ ॥
जय सकळसुतंत्रा भावसूळादिमंत्रा ।
मुनिवरजनगोत्रा पापसंघाळिदात्रा ॥
कमळदळसुनेत्रा चारुसर्वांगगात्रा ।
जनितसकळसत्रा रक्ष मातें विचित्रा ॥ २६५ ॥
करित अचळ वेधें चेतनें वेधविद्धें ।
द्रुमगिरिनरसिद्धें स्थावरें जंगमाधें ॥
सुरनरमुनिमौनीदर्शनें देवयोनी ।
स्थगितगतिविमानी होति वेधें सुमौनी ॥ २६६ ॥
अवनिगतनवीना देवतादेवलीना ।
खगपशुफणिमीना वेधु वेधी विताना ॥
अतनुतनुजनातें वेधिलें गौरिकांतें ।
अरिभवगतभूतें वैरशून्यें महांतें ॥ २६७ ॥

७ हें काव्य इतकेंच अपूर्ण सांपडलें. मूळ पोथींत अनुस्वार, मात्रां वगैरे चिन्हें ज्याप्रमाणें होतीं तशींच तीं येथें छापलीं आहेत. सध्यां प्रचलित नसणाऱ्या शब्दांची सूचि देतां आली असती तर फार बरें होतें. सध्यां प्रचलित नसणारे असे सुमारें १००० शब्द ह्या काव्यांत आहेत. नामें, अव्ययें, क्रियापदें ह्यांची रूपें, समासांची पद्धत, वगैरे बरेच प्रकार विवेचनीय आहेत. व, कीं इत्यादि फारशी उभयान्वयी अव्ययें; त्याप्रमाणेंच चतुर्थीचा ला प्रत्यय ह्या काव्यांत नाहीं. नासु, पार्थु, कृष्णु, कंपु, वगैरे नामांचीं उकारान्त रूपें; देतु, प्रचळतु, मारितु, वगैरे क्रियापदांचीं उकारान्त रूपें; चोरुनु, झडकौनु, अवगौनु, वगैरे ऊन प्रत्ययान्त धातुसाधितांचीं उकारान्त रूपें ह्या काव्यांत बरींच आहेत. एकंदरींत भाषेच्या जुनेपणाचा मासला ह्या काव्यांत सडकून सापडतो. मुसलमानांच्या संसर्गानें भाषेवर कांहीं परिणाम होण्यापूर्वीची भाषा ह्या काव्यांत दृष्टीस पडते. काव्यांत म्लेछ शब्द तिरस्कारार्थी आला आहे. मानभावाचा मुख्य देव जो गुंडमेश, गुंड ( कृष्ण ) त्याच्या उल्लेख येथें दोन तीन ठिकाणीं केलेला आढळतो.

---

# ज्ञानाचीं सहा द्वारें.

आज ज्या विषयासंबंधीं मी माहिती देणार आहे, त्याला लहानसें नांव शोधून काढण्यासाठीं मी पुष्कळ खटपट केली, तथापि " ज्ञानाचीं सहा द्वारें " ह्यापेक्षां लहान व सुलभ नांव मला सुचेना. दररोज ज्या वस्तू आपण पहातों, ज्या विषयांचा अभ्यास आपण शाळेंत करतों, व ज्या अभ्यासाबद्दल आपणांस वारंवार बक्षिसें मिळतात, त्या सर्वांचा, माझ्या आजच्या व्याख्यानाशीं अत्यंत निकट संबंध आहे. ज्या प्रश्नासंबंधीं मी तुह्मांस विचार करण्यास विनंति करणार आहे, तो प्रश्न हा:— मनुष्यास दृश्य वस्तूंचें ज्ञान होण्याचीं साधनें कोणतीं?

जॉन बन्यननें असें ह्मटलें आहे कीं, मनुष्याचा आत्मा हा एका उंच पर्वतावरील किल्ल्यांत बसलेला असून, त्याच्या भोंवतीं तटबंदी असल्यामुळें बाह्य सृष्टींशीं त्याचें दळणवळण फक्त कांहीं नियमित द्वारांनेंच होतें. हीं द्वारें अथवा ह्या किल्ल्याच्या वेशी पांच असून, त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें आहेत:– नेत्रवेश, कर्णवेश, मुखवेश, नासिकावेश व स्पर्शवेश. बन्यनच्या मताप्रमाणें जरी आत्माच्या किल्ल्यास पांचच दरवाजे आहेत, तथापि मला वाटतें कीं आणखी एक ह्मणजे सहावा दरवाजा आहे, तो बन्यनच्या लक्षांत आला नाहीं. आह्मांस सहा इंद्रियें आहेत, व त्या सहांच्या साहाय्यानें आपणांस ज्ञान प्राप्त होतें, हें सिद्ध करण्याचा ह्या लेखाचा हेतु आहे.

आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं ज्ञानेंद्रियांची गणति केली आहे, त्या सर्वांच्या मतें, इंद्रियें पांचच आहेत. आयरिशमननें मात्र इंद्रियांची संख्या सात केली आहे. आयरिशमनचें सातवें इंद्रिय बहुतकरून 'धोरण' अथवा ज्याला आपण तर्क अथवा तारतम्य ह्मणतों तें असावें. आयरिश लोक फार धोरणी आहेत. नेहमींच्या वर्तनांत धोरणांचा वारंवार उपयोग करण्याची त्यांना संवय असल्यामुळें, धोरण हें एक सातवें व वेगळें इंद्रियच आहे, असा त्यांचा समज होणें साहजिक

आहे. नाहीं तर सहापेक्षां इंद्रियांची शास्त्रोक्त संख्या अधिक कशी होते हें मला समजत नाहीं. सवड झाल्यास ह्या सातव्या इंद्रियाचा पुढें आपण थोडासा विचार करूं. ‘आकर्षण’ ज्ञानाचें एखादें इंद्रिय आहे किंवा काय, ह्या प्रश्नासंबंधीं थोडेबहुत विचार प्रगट करण्याची खटपट करण्याचा माझा हेतु आहे, त्यावेळीं सातव्या इंद्रियासंबंधीं आपण बोलूं. ‘आकर्षणें’द्रिय नांवाचें एखादें इंद्रिय असणें शक्य आहे, पण त्याचें अस्तित्व सिद्ध करण्याइतका पुरावा अथवा आधार कोठें दिसत नाहीं.

मी जीं सहा इंद्रियें येथें समजावून सांगणार आहे तीं हीं :– चक्षुरिंद्रिय, श्रोत्रेंद्रिय, घ्राणेंद्रिय, रसनेंद्रिय व दोन प्रकारचीं स्पर्शेंद्रियें. आपण एखाद्या जिनसास हात लावला, किंवा एखादी वस्तु हातानें अगर पायानें दाबली तर ती वस्तु ज्या मानानें घट्ट अथवा मऊ असेल, त्या मानानें ती आपल्या बोटांना उलट दाबील. ह्या कमी अगर अधिक दाबण्यास अडथळा असें ह्मणतात. कोणती वस्तु किती अडथळा करते, हें स्पर्शेंद्रियाच्या साहाय्यानें कळतें. त्याप्रमाणें एकादी वस्तु आपल्या हातास ऊन लागते किंवा थंड लागते; ऊन लागत असल्यास किती ऊन लागते हेंही ज्ञान स्पर्शेंद्रियानेंच होतें. आणि अडथळ्याचें ज्ञान व उष्णतेचें ज्ञान हीं दोन्ही एक नव्हत, हें कोणीही कबूल करील. स्पर्शेंद्रियाचे हे दोन प्रकार, ग्लासगो युनिव्हर्सिटींतील नीतिशास्त्राचे प्रोफेसर डाक्तर टॉमस रीड ह्यांनीं सुमारें शंभर वर्षांपूर्वीच उघडकीस आणले होते. पण ही त्यांची कल्पना जितकी लोकमान्य व्हावी तितकी झाली नाहीं, असें वाटतें. सृष्टिशास्त्रावर अथवा इंद्रियधर्मशास्त्रावर जे अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, त्यांमध्यें इंद्रियांची संख्या सहा लिहिलेली कोठें आढळा नाहीं. स्नायूंची शक्ति, व स्पर्शेंद्रिय हीं दोन वेगळीं आहेत, ह्या विषयींचा उल्लेख अनेक ठिकाणीं केलेला आढळतो, पण स्पर्शेंद्रियाचे हे दोन प्रकार कोठेंही सांगितलेले नाहींत. डाक्तर रीड ह्यांनीं स्पर्शेंद्रियासंबंधीं जी हकीकत लिहिलेली आहे त्यावरून मात्र हे दोन प्रकार नीट समजतात. तथापि त्यांच्यामधील भेद जितक्या स्पष्ट रीतीनें सांगावयास पाहिजे, तितक्या स्पष्टपणें त्यांनीं न सांगितल्यामुळें तें काम आज मी पतकरलें आहे.

स्पर्शज्ञान हातानें होतें असा साधारण समज आहे. तथापि केवळ हातानेंच स्पर्शज्ञान होतें असें नाही. शरीराच्या सर्व सजीव ( ज्यांच्या अंगीं बधिरपणा आलेला नाहीं, अशा ) भागांमध्यें स्पर्शज्ञानाचें सामर्थ्य असतें. नखें, केस, इ० भाग मृत अथवा निर्जीव असल्यामुळें, त्यांची स्पर्शेंद्रियामध्यें गणति करतां येत नाहीं. हें स्पर्शज्ञान दोन प्रकारचें असतें. आपण एखाद्या वस्तूस स्पर्श केला असतां आपणांस अनेक गोष्टींचा एकदम बोध होतो. ती वस्तु खरखरीत आहे किंवा गुळगुळीत आहे हें एक समजतें. ह्याशिवाय दुसरें एक प्रकारचें ज्ञान होतें, तें खरखरीत अथवा गुळगुळीतपणाच्या ज्ञानाहून अगदीं भिन्न असतें. तें कसें हें आपण पाहूं. हा एक ऊन पाण्यानें भरलेला पेला आहे. ह्यांत मी आपला हात बुडवितो. पाण्याला हाताचा स्पर्श होतांच चटका बसून एक प्रकारचें ज्ञान होतें त्याला आपण उष्णतेचें ज्ञान ह्मणतों. खरखरीतपणाचें किंवा गुळगुळीतपणाचें ज्ञान व उष्णतेचें ज्ञान हीं दोन्हीं एकच काय? नाहीं. तसेंच बर्फ घालून थंड केलेल्या पाण्यांत जर हात घातला तरीसुद्धां जें ज्ञान होतें, तेंसुद्धां खरखरीतपणाच्या अथवा गुळगुळीतपणाच्या ज्ञानापासून अगदीं भिन्न असतें. बरें, वरतीं जें उष्णतेचें ज्ञान होतें, ह्मणून सांगितलें त्यांत व बर्फाच्या पाण्यांत हात घातल्यानें झालेल्या ज्ञानांत कांहीं साम्य आहे काय? होय. हीं दोन्ही ज्ञानें जरी एकमेकाच्या अगदीं उलट दिसतात, तथापि त्यांच्यामध्यें परस्पर तुलना करतां येते. ह्मणून शीतस्पर्श व उष्णस्पर्श हें विजातीय आहेत असें मानतां येणार नाहीं. शीत अगर उष्ण हीं एकाच धर्माचीं प्रमाणान्तरें असल्यामुळें त्यांचें ज्ञानसुद्धां त्या एका सामान्य धर्माच्या प्रमाणान्तराचेंच ज्ञान होय हें पुढें आपणांस कळून येईल. तथापि तो सामान्य धर्म ( ह्मणजे उष्णता ) व खरखरीतपणा किंवा गुळगुळीतपणा हीं एक नव्हत. ती परपस्पराहून अत्यंत भिन्न आहेत. बरें आतां, खरखरीतपणाचें ज्ञान ह्मणजे काय? ह्याचें उत्तर देण्यास थोडा अवकाश लागेल; तथापि आगाऊ इतकें सांगतो कीं, शक्ति किंवा जोर ज्याला आपण ह्मणतों त्याचें तें ज्ञान होय. ह्याबरोबरच

आपणास आणखी एक गोष्ट आगाऊ सांगतों ती ही कीं, ज्यांला मी सहा इंद्रियें अथवा सहा प्रकारचें ज्ञान ह्मणतों व ज्यांविषयीं पुढें मी विशेष माहिती सांगणार आहें त्यांची नांवें येणेंप्रमाणें :—दृष्टिज्ञान, श्रोतृ-ज्ञान, रुचिज्ञान, घ्राणज्ञान, उष्णताज्ञान व शक्तिज्ञान ( स्नायुशक्ति ). शेवटचें जें शक्तिज्ञान तेंच सहावें इंद्रिय व ज्ञानाचें सहावें द्वार. उष्णताज्ञान व शक्तिज्ञान हीं दोन्ही मिळून स्पर्शज्ञानांत येतात.

कित्येक लोकांच्या मतें इंद्रियें सात आहेत, आणि सातवें ह्मणविणारें इंद्रिय बहुतकरून आकर्षणेंद्रिय असावें असें मी पूर्वी सांगितलें. ह्या सातव्या इंद्रियाविषयीं लिहित बसणें ह्मणजे माझ्या, व वाचकांच्या वेळेचा दुरुपयोग करणें आहे, किंवा विषयांतर करण्यासारखें आहे. तथापि प्राणिगत चित्ता-कर्षण ( Animal Magnetism ), मेसमिरिझम, जादू, अंगांत आणणें इ० मूर्ख कल्पना वाचकांनीं मनांत न आणाव्या ह्मणून येथें एवढेंच सांगतों कीं ' सातवें व अज्ञेय अशा तऱ्हेचें इंद्रिय मुळींच नाहीं. ह्या वर्गांत ज्या ज्या गोष्टी येतात त्या सर्व कोत्या ज्ञानाची व अपक्क अनुभवाचीं फळें होत. साध्या भोळ्या लोकांना फसविण्याकरितां, लुच्चे लोकांनीं केलेलीं हीं कृत्यें होत. तर मग ' आकर्षणेंद्रिय ' ह्मणून ज्याला ह्मणतात तें मुळीं अस्तित्वांतच नाहीं, असें कदाचित् ह्मणावें लागेल. पण तसें ह्मणावें तरी आश्चर्यच.

खलाशाचें होकायंत्र हें नांव आपण सर्वांनीं ऐकिलें आहे, व त्याचें थोडें-बहुत ज्ञानसुद्धां बहुतेक सुशिक्षित ह्मणविणारांना असेल. त्यांतील सुईचें टोंक नेहमीं उत्तरेकडे असतें इ० ठोकळ गोष्टी तरी निदान पुष्कळांच्या कानावरून गेल्या असतील. तथापि ह्या विषयींची सवि-स्तर माहिती असणारे किंवा विद्युच्छक्तीनें आकर्षणशक्ति कशी येते हें समजणारे फार थोडे असतील. मजजवळ जर पुरेशी यंत्रसामुग्री असती, तर विजेनें उत्पन्न होणाऱ्या आकर्षणशक्तिसंबंधीं एखादा प्रयोग करून दाखविला असता. मला लागणारी यंत्रसामुग्री फार मोठी आहे असें नाहीं. एक लोहचुंबक, किंवा ज्याच्या योगानें हा दिवाणखाना प्रकाशित झालेला आहे, असलें एखादें विद्युज्जनक यंत्र

असतें, तर तेणेंकरून एक विद्युच्चुंबक (Electro-magnet) मी तयार केला असता. तेवढ्यानें माझ्या यंत्रसामुग्रीपैकीं अर्धी अधिक उणीव दूर झाली असती. बाकीची उणीव दूर करण्यास एक तांब्याचा तुकडा मिळाला तरी पुरे. एवढ्या दोन वस्तू हातासरशीं असत्या तर फॅरॅडे ह्यांनीं शोध लावलेला व फोको ह्यांनीं ताळा करून पाहिलेला असा एक अद्भुत चमत्कार मीं आपणास दाखविला असता. मी वर सांगितलें कीं, मला एक तांब्याचा तुकडा पाहिजे पण तांब्याच्या ऐवजीं रुप्याचा तुकडा असला तरी चालेल. ज्या धर्मासंबंधीं मी आपणास माहिती सांगणार आहे, त्याचें सप्रयोग ज्ञान करून देण्यास, तांबें अगर रूपें ह्याखेरीज, इतर कोणत्याही पदार्थानें काम भागेल, असें मला वाटत नाहीं. सबब तांबें अगर रुपें ह्यांपैकीं कांहीं तरी एक धातू पाहिजे.

ज्या धर्मासंबंधीं मी आतां लिहिणार आहें, त्याचें नांव " विद्युद्वाहकत्व ". अथवा विजेची वाहण्याची शक्ति. आतां मी जर एखादा तांब्याचा अगर रुप्याचा तुकडा घेऊन लोहचुंबकाच्या दोन टोंकांच्या बरोबर मध्यभागीं टाकला तर तो एकदम खालीं न पडतां, चिखलांत रुतत गेल्याप्रमाणें सावकाश खालीं खालीं जाईल. एरवीं जर मी एखादा तांब्याचा तुकडा घेऊन नुसताच असा खालीं टाकला, तर त्याला एक फूट खालीं उतरण्यास, पुरें एक सेकंदसुद्धां लागत नाहीं अशी तुमची खात्री होईल. तोच तुकडा जर लोहचुंबकाच्या दोन टोंकांच्या मध्यावर टाकला, तर चार पांच इंच उतरण्यास त्यास निदान पांच पंचवीस सेकंद तरी लागतील.

हा प्रयोग लार्ड लिंड्से, व मि० व्हार्ले ह्यांनीं करून पाहिला. ज्याला इंग्रजींत 'मसमिरिझम' ('प्राण्यांचें परस्पर चित्ताकर्षण') ह्मणतात. त्यासंबंधीं शोध करण्याचा ह्या दोन विद्वानांनीं बेत करून, मोठ्या आस्थेनें प्रयोग करून पाहण्यास त्यांनीं आरंभ केला. त्यांनीं स्वतःस असा प्रश्न केला कीं, तांब्याचा तुकडा जर लोहचुंबकाच्या दोन अग्रांच्या बरोबर मध्यावर टाकला, तर त्याला हवेंतून खालीं उतरण्यास मोठीं

पंचाईत पडते. असें जर आहे तर, तांब्याच्या तुकड्याऐवजीं एकादा मनुष्य अथवा इतर जीवंत प्राणी तेथें उभा केला असतां, त्याच्यावर कांहीं परिणाम होऊं नये, हें होईल तरी कसें? एवढ्यासाठीं लार्ड लिंडसे ह्यांनीं एक प्रचंड, व विद्युत्शक्तिनें जागृत होणारा असा लोहचुंबक तयार केला. तो असा कीं, त्याच्या दोन्ही टोकांच्या मध्यभागीं मनुष्याचें डोकें सहज रहावें. अशा ठिकाणीं डोकें ठेवल्यावर लोहचुंबकांत विद्युत् सोडून त्यास जागृत केलें. अखेर ह्याचा परिणाम काय झाला असावा? कांहीं नाहीं असें जर मी ह्मणेन, तर तें न्याय्य होणार नाहीं. परिणाम फार आश्चर्य वाटण्याजोगा झाला. तें आश्चर्य हें कीं, डोक्याला कांहीं एक वाटलें नाहीं. ज्या ठिकाणीं तांब्याच्या तुकड्याच्या गतीला अवरोध होतो, तेथें मनुष्याच्या डोक्यावर कांहींच परिणाम होऊं नये, हें केवढें आश्चर्य. खरोखरीच फार मोठें आश्चर्य ह्मटलें पाहिजे; पण एवढ्यानेंच शोधांचें काम पुरें झालें असें मी ह्मणणार नाहीं. मूर्तपदार्थांच्या अंगीं असलेला जो चुंबकत्वाचा अथवा आकर्षणाचा धर्म, त्या धर्माचा जर तांब्याच्या तुकड्यावर परिणाम उघड उघड दिसतो, तर जीवंत प्राण्याच्या डोक्यावर मुळींच परिणाम घडत नाहीं, असें ह्मणून चालणार नाहीं. काय परिणाम होतो हें जरी अद्यापि समजून आलेलें नाहीं तथापि मुळींच परिणाम होत नाहीं, असें ह्मणण्यास सुद्धां आधार नाहीं. मुळींच परिणाम कां होऊं नये, ह्याचें मला इतकें आश्चर्य वाटत आहे कीं, पुनः पुनः तो प्रयोग करून पाहण्याची मला वारंवार इच्छा होते. अत्यंत जोरदार लोहचुंबकाचा परिणाम एखाद्या जीवंत वनस्पतीवर अगर प्राण्यावर काय होतो हें खरोखरी पाहण्यासारखें आहे. वर जें मी सातवें इंद्रिय सांगितलें तें हेंच. चित्ताकर्षण जेणेंकरून घडतें असें एखादें ‘ आकर्षणेंद्रिय ’ कदाचित् असूं शकेल. फारच प्रचंड असा जर लोहचुंबक तयार केला, व त्याच्या साहाय्यानें हा प्रयोग करून पाहिला, तर त्याजपासून जीवंत प्राण्यावर कांहीं तरी परिणाम झालाच पाहिजे, व तो उष्णतेपासून किंवा इतर शक्तीपासून होणाऱ्या विकारांपेक्षांही अगदीं भिन्न असूं शकेल.

दुसरा एक प्रश्न वारंवार मनांत उद्भवतो तो असा:—विद्युज्ज्ञान होण्याचें एखादें स्वतंत्र साधन अथवा इंद्रिय आपल्या शरीरांत आहे काय? हवेमधील विद्युतेचें ज्ञान मनुष्यास होत असेल काय? हें ठरविण्यासाठीं वरच्या प्रमाणेंच प्रयोग करून पहावेत अशा अर्थाच्या सूचना अनेकवार प्रसिद्ध झाल्या आहेत. पण विद्युत्शक्ति व लोहचुंबकांतील शक्ति ( आकर्षणशक्ति ) ह्या दोन्ही एकजातीय नव्हेत असें मला वाटतें. स्थलसंकोच्यामुळें माझ्या मताचीं कारणें देतां येत नाहींत, ह्याबद्दल मला फार दिलगिरी वाटते. बाह्य विद्युत्शक्तीचा त्वचेवर होणारा परिणाम, शारीरिक विद्युत्शक्तीच्या अगदीं उलट कदाचित् असेल तर, तीं दोन्ही परस्पराचा नाश करून टाकीत असतील, आणि ह्मणून कदाचित् बाह्य विद्युत्शक्तीचें कार्य चांगलेंसें भासत नसेल. तथापि स्पर्शेंद्रियावर कांहीं तरी बाह्य विद्युतेचा विकार विशिष्ट प्रकारचा होत असला पाहिजे असें वाटतें. विद्युज्जनक यंत्र चालू असतां त्याच्याजवळ जर तळहात किंवा गाल अगर मिशा नेल्या, तर आपणास कसेंसेंच चमत्कारिक वाटतें, व नीट न्याहाळून पाहिलें तर आपल्या केंसाजवळच्या हवेंत चलविचल झालेली आढळून येते, व आपल्या मिशाचे केंस ताठ, ( विद्युदाकर्षणामुळें ), उभा राहू लागलेले दिसतात. आपला हात जर यंत्राच्या बराच जवळ नेला तर यंत्रांतून हातांत ठिणग्या जाताना दिसतात. विद्युत्ज्ञान करून देणारें एखादें इंद्रिय आपणापाशीं आहे कीं नाहीं हें ठरविण्यापूर्वी, उष्णतेचें किंवा अडथळ्याचें ज्ञान करून देणारीं साधनें आपणाजवळ आहेत एवढें निर्विवाद वर कबूल केलें पाहिजे. आतां आकर्षणशक्तीचा परिणाम जीवंत देहावर कां असूं नये अथवा होत असेल तर तो कां दिसूं नये, हें मोठें गूढ आहे. निदान ही शोध लावण्यासारखी चीज आहे.' ह्यांत कांहीं शंका नाहीं. ह्यावरून मेसमेरिझमच्या वेडावर माझा भरंवसा आहे असें मात्र कोणी समजूं नये.

हा लेख संपविण्यापूर्वी, स्पर्शेंद्रियाचें जे दोन पोटभेद [ अडथळ्याचें ज्ञान करून देणारें व उष्णतेचें ज्ञान करून देणारे ] मी वर सांगितलें,

त्यासंबंधीं विशेष स्पष्टीकरण करण्याचा माझा हेतु आहे; पण त्याला सवड सांपडेल तेव्हां खरें. अडथळ्याचें व उष्णतेचें ज्ञान करून देणाऱ्या स्पर्शेंद्रियावरच जर मी माझा सर्व वेळ घालविला तर इतर इंद्रियांचा विचार अर्धवट सोडावा लागेल. सबब प्रथम त्यांचा अगोदर विचार करूं. प्रथम श्रोत्रेंद्रियाकडे आपण वळूं. अमुक गोष्ट मी ऐकली असें जेव्हां आपण ह्मणतों, तेव्हां आपल्याला काय वाटत असतें, हें पाहिलें पाहिजे. ध्वनिशास्त्र हें ऐकण्याचें शास्त्र होय. आतां ऐकणें ह्मणजे काय? ऐकणें ह्मणजे कानांनीं कशाचें तरी ज्ञान करून घेणें. कानानें आपणास कसला बोध होतो? ज्या वस्तूचा कानानीं आपणांस बोध होतो असें आपण ह्मणतों, ती वस्तू कानाशिवाय सुद्धां कळण्यासारखी असते. बीठोव्हेन नांवाचा एक प्रसिद्ध गायनशास्त्रपटु होऊन गेला. ल्हानपणीं त्याचें कान गेले असल्यामुळें, तो बहिरा झालेला होता. असें असून, गायनशास्त्रांत व वाद्यकलेंत त्याच्या जोडीचा दुसरा मनुष्य नव्हता. बहिरेपणीं त्यानें जे कांहीं बोल बसविलेले होते, ते अद्यापि बिनतोड मानले आहेत, व ते सर्व स्वतःस यत्किंचित्सुद्धां ऐकूं न येतां बसविलेलें आहेत, हे विशेष होय. जेथें पियानो किंवा बाजाची पेटी वाजत असेल, तेथें बिटोव्हेन जाऊन हातांत एक काठी घेऊन तिचें एक टोंक पेटीवर, व दुसरें दातांमध्यें धरून उभा राही. अशा रीतीनें त्यांला पेटींतून निघणाऱ्या सर्व गती ऐकूं येत व तो त्या सर्व हुबेहूब वाजवून दाखवी. एकंदरींत बन्यननें सांगितलेल्या पंचद्वारांपैकीं कर्णद्वाराखेरीज ऐकूं येण्याचें दुसरें अथवा सहकारी एक द्वार आपणांजवळ आहे, एवढें ह्यावरून सिद्ध होतें.

एखाद्या निरोगी मनुष्यास, ह्मणजे ज्यांचीं सर्व गात्रें चांगलीं आहेत, अशा मनुष्यास, कानानें ऐकून ज्या गोष्टीचें ज्ञान होतें, व जें ज्ञान कानाखेरीज अन्य मार्गानेंसुद्धां, होऊं शकतें, तें कशाचें अथवा कोणत्या प्रकारचें ह्मणावें? त्याला शब्दज्ञान ह्मणतात. शब्द ह्मणजे कमी जास्त होत जाणारा हवेचा दाब होय. वायुभारमापक यंत्रामधील पारा जेव्हां चढतो, तेव्हां कानांतील हवेचा दाबसुद्धां अधिक होतो. वायुभारमापक



यंत्रांतील पारा जेव्हां उतरतो, तेव्हां कानांतील हवेचा दाबसुद्धां कमी होतो, असें अनुभवावरून ठरलें आहे. बरें, घटकाभर अशी कल्पना करा कीं, पंधरा सेकंडाच्या अंतरानें हवेचा दाब एकाएकीं इतका अधिक किंवा कमी झाला कीं, तेणेंकरून वायुभारमापक यंत्रांतील पारा एकदशांश इंच चढला व उतरला, तर त्याचा जो परिणाम तुमच्या कानावर होईल तो तुह्मांस समजून येईल काय? मला शंकाच वाटते. मला वाटतें कीं तुह्मांस हा सूक्ष्म फरक सांगतां येणार नाहीं. तोच पारा जर अर्ध्या मिनिटांत दोन, तीन अथवा चार इंच चढला तर बहुतेकांना हवेंतील फरक सांगतां येईल, हें प्रत्यक्ष अनुभवावरून सिद्ध झालें आहे. पाणबुड्याच्या घंटेंतून पाण्यांत बुडणारे जे लोक आहेत ते जों जों पाण्यांत खालीं खालीं जातात तों तों त्या घंटेतील हवेचा दाब अधिक अधिक होत जाऊन, शेवटीं, एकाएकीं ह्मणजे साधारणपणें अर्ध्या मिनिटांत पांच सहा इंच पारा चढेल इतका हवेचा दाब वाढला असता पाण्याच्या बाहेर असतां त्यांच्या शरीरावर जो परिणाम व्हावा, तोच परिणाम पाण्याच्या सपाटीखालीं जाणाऱ्या पाणबुड्यावर होतो. वायूचा दाब समजण्याची शक्ति जरी आपणांस दिलेली आहे, तथापि त्या दाबामध्यें त्वरित होणारे सूक्ष्म फेरफार समजण्याइतकी शक्ति आपणापाशीं नाहीं. फार कशाला, उंच पर्वतावर जो हवेचा दाब असतो, तो समुद्राच्या सपाटीजवळील हवेच्या दाबापेक्षां कमी असतो, हें कोणीही कबूल करील. असें असून उंच पर्वतावर राहणारे लोक जर समुद्राच्या सपाटीजवळ आले, तर त्यांना जो थोडासा फरक वाटतो तो हवेच्या दाबामध्यें अंतर पडल्यामुळें वाटतो असें नाहीं. डोंगरावरची हवा, समुद्राच्या सपाटीवरच्या हवेपेक्षां थंड व कोरडी असते, ती कमी दाट असते, त्यामध्यें आक्सीजनचें प्रमाण कमी असल्यामुळें, शरीरास अवश्य लागणारा आक्सीजन मिळविण्यासाठीं मनुष्यास अधिक हवा श्वासोच्छ्वासाबरोबर फुप्फुसांत घ्यावी लागते, इत्यादि गोष्टी माझ्या वाचकांपैकीं, इंद्रियधर्मशास्त्र जाणणारांस माहित असेलच. हें शास्त्र जाणणारे वाचक बरेच असतील अशी माझी समजूत आहे. फुप्फुसामध्यें हवा शिरतांच तिचें जें कार्य व्हावयाचें, तें तिच्यामध्यें असणाऱ्या ऑक्सीजन वायूच्या प्रमा-

णावर मुख्यत्वेंकरून अवलंबून असतें. हवेचा दाटपणा नेहमींपेक्षां जर तीनचतुर्थांश कमी झाला तर रक्तावर व शरीरावर हवेपासून होणारा परिणाम कायम राखण्यास पूर्वींच्यापेक्षां चारतृतीयांशपट हवा, फुप्फुसांत घेतली पाहिजे. ह्या दृष्टीनें पाहूं जातां घाटमाथ्यावरील हवेचा परिणाम पायथ्याच्या, किंवा समुद्राच्या सपाटीवरील हवेच्या परिणामापेक्षां, प्राणिमात्रावर भिन्न प्रकारचा होतो, यांत शंका नाहीं. हा भेद शरीरप्रकृतीवर होणाऱ्या परिणामावरून सहज ओळखितां येतो.

असो; विषयांतर बरेंच झालें. आपण आपल्या विषयाकडे वळलें पाहिजे. हवेच्या दाबामध्यें फेरफार होतांच त्याचा परिणाम ध्वनीवर काय होतो ह्याविषयीं आपला विचार चालू होता. पाणबुड्याच्या घांटेनें एकाएकीं वाढलेला हवेचा दाब समजून येतो; पण तें ज्ञान स्पर्शेंद्रियानें होत नाहीं. एरवी हवेचा दाब दर चौरस इंचावर पंधरा पौंडप्रमाणें असतो. बुडण्याच्या घाटेमध्यें हा दाब दर चौरस इंचावर ३० पौंडापर्यंत सुद्धां वाढवितां येतो. पण ह्या दोहोंपासून होणारा परिणाम हाताला कळून येत नाहीं. बुडण्याची घांट घेऊन जर पाण्याच्या खालीं तुह्मी तेहत्तीस फूट खोल जाल, तर तुमच्या हातावर चोहोंकडून दर चौरस इंचावर तीस पौंड वजनाचा दाब पडेल. तथापि आपला हात दुप्पट जोरानें दाबला जात आहे, अशी कल्पनासुद्धां तुह्मांस येणार नाहीं. जें कांहीं तुह्मांस समजतें तें हें. कानाच्या द्वारापासून थोड्या अंतरावर एक वाटोळा, डफाच्या कातड्यासारखा ताणलेला पडदा आहे. ( आपल्या कानांत, एक सूक्ष्म डफ, कातड्याची बाजू बाहेर करून, बसविला आहे, अशी जरी क्षणभर कल्पना केली तरी चालेल. ) ह्या पडद्याच्या मागें, डफाच्या कातड्यांतील जागेप्रमाणें एक पोकळ जागा असून ती हवेनें भरलेली आहे. डफामध्यें ज्याप्रमाणें कातड्याच्या आंतून व बाहेरून हवेचा दाब सारखा असल्यामुळें कातडें सपाट ( एका पाणसाळींत )राहतें, व जिकडून दाब अधिक होईल त्या बाजूस पोचा येऊन उलट बाजूस फुगोटी येते, त्याप्रमाणें कानाच्या पडद्यावरसुद्धां आंतील व बाहेरील हवेचा दाब एकसारखा नसेल तर पडद्याला एका

बाजूनें खळगा पडतो, व दुसऱ्या बाजूनें फुगोटी येते, आणि कान ठणकूं लागतो. एका बाजूनें हवेचा दाब असाच वाढत वाढत गेला, तर कधीं कधीं पडदा फुटतो, व त्याला भोंक पडतें! पाणबुड्यांचे कान ह्या कारणामुळें वारंवार फुटतात. अशा रीतीनें एकाएकीं कान ठणकूं लागल्यास, किंवा, ठणका चुकविण्यास एक साधा उपाय करतात तो असा. तोंडामध्यें एक दगडी सुपारीचें खांड किंवा दुसरा कांहीं तरी घट्ट पदार्थ जवळत ठेवावा ह्मणजे झालें. सुपारी चघळल्यानें, ज्या मार्गानें कानांतील पडद्याच्या आड हवा जाते, तो मार्ग खुला राहतो, व पडद्याच्या आंत बाहेर हवेचा दाब एकसारखा होऊन ठणका बंद होतो. पानबुड्याच्या घांटेनें, पाण्यांत बुडतां बुडतां पुष्कळ वेळां कान ठणकतो ह्याचें कारणसुद्धां पडद्यावर एका बाजूनें हवेचा दाब वाढत जाणें हेंच होय. हा वाढत जाणारा दाब जों जों अधिक होईल, तों तों ठणका जास्त व असह्य होत जातो. अशाप्रकारें कानाला इजा करून घेणें धोक्याचें असतें. नीट काळजी जर घेतली नाहीं, तर कानाचा पडदा फुटण्याचा संभव असतो. व हा भयंकर परिणाम चुकविण्यास उत्तम उपाय ह्मणजे सुपारी चघळणें हा होय.

अमुक एक गोष्ट ऐकूं आली असें जेव्हां आपण ह्मणतों, तेव्हां आपणास काय वाटतें हें अद्याप तुह्मांस नीटसें समजलें असेल असें मला वाटत नाहीं. ऐकण्याची क्रिया चालू असतां आपणास जें कांहीं वाटतें तें हें. ऐकणें ह्मणजे, कानांतील पडद्यावर जो हवेचा दाब आहे त्या दाबामध्यें एकाएकीं फेरफार होणें. ते फेरफार इतके जलद व इतके सुक्ष्म असतात कीं, त्यांच्या योगानें कानांतील पडद्यास मुळींसुद्धां इजा होत नाहीं, तथापि श्रवणेंद्रियावर ( कानाची अंतर्रचना ) त्यांचा स्पष्ट परिणाम होण्याइतके ठोकळ ते फेरफार असतात. कर्णेंद्रियाची रचना समजणें हें जरी अशा वेळीं अत्यंत हितावह आहे, तथापि तिचें वर्णन करणें येथें अगदीं अप्रासंगिक होईल, व तसें करण्यास मला सवडही नाहीं. मी आजच्या विषयाचा फक्त पदार्थविज्ञानशास्त्रदृष्ट्या विचार करित-आहे. ह्या शास्त्रांचा संबंध निर्जीव वस्तूंशीं असल्यामुळें, सजीव वस्तूं

विषयीं लिहित बसणें ह्मणजे आपल्या हद्दीच्या पलीकडे जाण्यासारखें आहे. सजीव प्राण्यांचीं इंद्रियें हीं, आत्म्याला बाहेरील सृष्टींत काय काय चाललें आहे, त्याची वर्दी देण्याचीं साधनें आहेत, असें समजलें पाहिजे. सृष्टिशास्त्रवेत्त्याला सूक्ष्मदर्शक यंत्राचें जितकें महत्व वाटतें, तितकेंच आपल्या ज्ञानेंद्रियांचें महत्व वाटतें. तो त्यांच्या रचनेचा बिलकुल विचार करीत बसत नाहीं. तें काम इंद्रियधर्मशास्त्रवेत्त्यांचें होय.

ऐकूं येण्याची किंवा ध्वनीचा बोध होण्याची जी ही शरीरान्तर्गत क्रिया आहे, ती घडवून आणणारी बाह्यवस्तु कोणती? हवेच्या दाबामध्यें क्षणोक्षणीं घडणारा फेरफार हेंच शब्दोत्पत्तीचें व शब्दज्ञान होण्याचें बाह्य साधन होय. आतां ध्वनि ह्या शब्दाची व्याख्या कशी करावी? हा मोठा बिकट प्रश्न आहे. ज्याचा ध्वनीसारखा बोध होतो, त्याला ध्वनि ह्मणतात, ही व्याख्या पुनरुक्तीसारखी दिसते. हवेच्या दाबामध्यें एकाएकीं फेरफार होऊन जो आवाज होतो, किंवा जेणेंकरून ‘ आवाज झाला ’ असा आपणास बोध होतो, त्यास ध्वनि ह्मणतात. उदाहरण, ही पहा मी टाळी वाजवितों. ह्या टाळीला तुह्मीं ध्वनि हें नांव द्याल किंवा नाहीं? अर्थात् द्याल. जर तो तुह्मांस ऐकूं आला आहे, तर तो खचित ध्वनि होय. तुह्मांला जर तो ऐकूं न येईल, तर तुमच्या पुरतां तो ध्वनि नव्हे. ध्वनीच्या व्याख्येसंबंधीं ह्यापेक्षां अधिक मी कांहीं सांगूं शकत नाहीं. ह्याचें अधिक स्पष्टीकरण जर मला विचाराल तर ‘ हवेच्या दाबामध्यें एकदम होणारा फेरफार ’ हेंच मी पुनः सांगणार. वायुभारमापक यंत्रामध्यें जो हवेच्या दाबाचा फेरफार दिसतो, तो सावकाश होत असल्यामुळें त्याला ध्वनि हें नांव शोभण्यास, हवेचा दाब एकदम बदलला पाहिजे. तो इतका त्वरित झाला पाहिजे, कीं तेणेंकरून आपणांस ध्वनीचा बोध झाला पाहिजे. वायुभारमापक यंत्रांतील पारा आज एकदशांश इंच उतरला, हें जर तुह्मांला तुमच्या कानाच्या साहाय्यानें सांगतां येईल, तर त्याला ध्वनि हें नांव खुशाल दिलें तरी चालेल. पण वायुभारमापक

यंत्रांतील पारा उतरला किंवा नाहीं, हें कर्णेंद्रियानें कोणासही सांगतां येणार नाहीं, ह्मणून उतरणाऱ्या पाऱ्याचा ध्वनीसारखा बोध होत नाहीं. तोच पारा एका सेकंदाच्या हजाराव्या भागांत एकदशांश इंच उतरला, तर त्याचा टाळीसारखा आवाज होऊन, तो कानास ऐकूं येईल. आणि मग त्यांस ध्वनि हें नांव देतां येईल, व आपणांसही त्याचा ध्वनि-सारखा बोध होईल. वायुभारमापक यंत्रांतील पारा जरी एकदम चढला तरीसुद्धां त्याचा टाळी वाजविल्याप्रमाणें आवाज होईल. ध्वनीची व्याख्या ठरविल्यानंतर पुढें असा प्रश्न येतो कीं, गोंगाट व गाणें ह्यांच्यामध्यें फरक कोणता? हवेचा दाब नियमित प्रमाणानें व सारख्या कालांतरानें जेथें बदलतो, तेथें त्यापासून उत्पन्न होणारा आवाज कानाला मधुर लागतो ह्मणून त्यास गाणें ह्मणतात. हवेच्या दाबांत पाळी पाळीनें चढ किंवा उतार एकदम, व सारख्या अवकाशानें जर होईल, तरच त्यापासून उत्पन्न होणारा आवाज मधुर लागेल. ज्या ठिकाणीं कोणत्याच प्रकारचा नियमितपणा नाहीं, त्या आवाजास कर्कश ओरडणें अथवा गोंगाट असें ह्मणतात. गाण्यामध्यें असा अनियमितपणा जेव्हां होतो, तेव्हां त्यास बेसुर गाणें ह्मणतात.

हवेच्या दाबामध्यें त्वरित फेरफार झाल्यानें ध्वनीचा बोध होतो असें मी वर सांगितलें. हे फेरफार अतिशय त्वरित व अतिशय सावकाश ह्या दोन सीमांच्या दरम्यान किती जलद झाले असतां, मधुर ध्वनीचा किंवा गाण्याच्या आवाजाचा आपणास बोध होऊं शकतो हें आतां सांगितलें पाहिजे. वायुभारमापक यंत्रावर एका मिनिटांत एक वेळच पारा चढण्याइतका सावकाश जर हवेच्या दाबामध्यें फेरफार झाला, तर त्यापासून मधुर ध्वनीचें ज्ञान होणार नाहीं. पण समजा कीं, कांहीं युक्तिप्रयुक्तीनें, हवेच्या दाबामध्यें पुष्कळ त्वरित फेरफार करण्याची तजवीज तुह्मास करतां आली, व ती अशी कीं पाऱ्याची हालचाल डोळ्यानें पहतांसुद्धां येणें कठीण, तर ते फेरफार कानास खचित ऐकूं येतील. मात्र ते फेरफार दर सेकंडास २० वेळां तरी झाले पाहिजेत. हे फेरफार जोपर्यंत दर सेकंडास २० पासून ५० पर्यंत होतात, तोंपर्यंत

त्यापासून उत्पन्न होणारा आवाज नीच स्वरांत जातो; पण ते जर ५० पासून २५६ पर्यंत दर सेकंडास होऊं लागले, तर आवाज चढूं लागतो व त्यापासून होणारा आवाज उच्च स्वरांत जातो. सा, री, ग, म, प, ध, नी, हे स्वरसप्तक आहे, त्यांतील ज्याला पहिलें सप्तक ह्मणतात, त्यांतील नी ह्या संज्ञेखालीं येणाऱ्या ध्वनीमध्यें, दर सेकंडांत हवेच्या दाबामध्यें २५६ दोनशे छपन्न वेळा फेरफार होतात. दोन्हीं तोंडें उघडीं आहेत, असें दोन फूट लांबीचें अलगुज घेऊन जर त्यांत पहिल्या सप्तकांतील नी हा स्वर वाजवीला तर त्यापासून हवेच्या दाबांत दोनशे छपन्न वेळां चढउतार झालेला दिसून येईल. हे चढउतार कागदावर लिहितां येतात किंवा डोळ्यांनीं पहातां येतात. उदाहरणार्थ 'नी' हा स्वर जेथून निघतो त्या छिद्राच्या एकाद्या दिव्याच्या ज्योतीशीं संबंध जोडला तर ती ज्योत दोनशें छपन्नवेळां कमीजास्त होतांना दिसेल. हवेच्या दाबामध्यें होणाऱ्या चढउताराचा वेग दुप्पट आला ह्मणजे दर सेकंडांत ५१२ वेळां जर चढउतार झालें तर त्यापासून दुसऱ्या सप्तकांतील शेवटचा स्वर निघेल. येणेप्रमाणें १०२४ वेळां चढउतार होईल, तर त्यापासून तिसऱ्या सप्तकांतील 'नी' हा स्वर निघेल. ह्याप्रमाणें दर सेकंडास सुमारें १०,००० वेळां जर चढउतार झालें तर बहुतेक मनुष्यांना ध्वनि ऐकूं येईनासा होतो. सुमारें दहा हजार वेळां असें ह्मणण्याचें कारण, सर्वांचें कर्णेंद्रिय सारखें सशक्त अथवा तीक्ष्ण असत नाहीं, त्यामुळें कर्कश्य होत गेलेला आवाज कित्येकांना ऐकूं येतो, तोच बाकीच्यांना ऐकूं येत नाहीं. ह्मणूनच मी असें ह्मटलें कीं, मनुष्यमात्रांस ऐकूं येईल, असा अत्यंत कर्कश्य आवाज उत्पन्न होण्यास हवेच्या दाबामध्यें दर सेकंडास दहा हजार वेळां चढउतार झाले पाहिजेत. ह्या प्रत्येक चढउतारास जरी आंदोलन असें नांव दिलें तरी चालेल. आमच्या इंद्रियांना ज्यांचें ज्ञान होणें शक्य आहे, अशा हवेसारख्या, प्रवाही पदार्थांमध्यें दर सेकंडास तीसापासून कोठ्यावधि-पर्यंत आंदोलनें होऊं शकतात काय? दर सेकंडांत ३०,००० आंदोलनापेक्षां अधिक आंदोलनें ज्याच्यामध्यें होऊं शकतात असे पदार्थ

असल्याबद्दल कोठें आधार सांपडत नाहीं; तथापि सृष्टीमध्यें असे पदार्थ नसतीलच व त्यांचें कार्य घडून येण्याचे प्रसंग सृष्टींत येत नसतील, असें ह्मणतां येणार नाहीं. अमुक एका संख्येपासून ते अमुक एका संख्येपर्यंत. उदाहरणार्थ लाख, दोन लाख इ०. आंदोलनाची संख्या जर वाढली तर मनुष्याच्या ऐकण्याच्या शक्तीची सीमा ओलांडल्यासारखे होईल, व मनुष्यमात्रास त्या आंदोलनापासून ध्वनिचें ज्ञान होणार नाहीं, इतकेंच नव्हे तर तितक्या वेगानें आंदोलन पावणारे पदार्थ पृथ्वीवर असूं शकतील कीं नाहीं ह्याची शंकाच वाटते. पोलाद, हवा किंवा पाणी इत्यादि पदार्थांमध्यें असणारी आंदोलन शक्ति नियमित असल्यामुळें त्यांच्यामध्यें कांहीं नियमित संख्येपेक्षां अधिक आंदोलनें होणें शक्यच नाहीं; मग ती संख्या हजारानें मोजतां येवो अगर लाखानें मोजतां येवो. येथपर्यंत ध्वनिचा अथवा श्रोत्रेंद्रियाचा विचार झाला.

आतां आपण प्रकाशाविषयीं किंवा चक्षुरिंद्रियाविषयीं बोलूं. दृष्टिज्ञान व शद्बज्ञान ( ध्वनि ) ह्या दोन प्रकारच्या ज्ञानामध्यें पुष्कळ साम्य आहे; दोघांचेही मूल तत्व एकच. ध्वनीप्रमाणें दृष्टिज्ञान सुद्धां आंदोलनावरच अवलंबून असते. डोळ्याच्या गाभ्याची मागची अर्धी बाजू, नेत्र गत ज्ञानतंतू पापोद्यासारखा पातळ होऊन त्यानें मढविलेली असते. ह्या पापोद्यास “ रेटिना ” ह्मणतात. रेटिनावर प्रकाश किरणें पडल्यानंतर तेथें कांहीं एक प्रकारचें कार्य होतें. व त्या पासून नेत्रगतज्ञानतंत च्या सहाय्यानें प्रकाशाचें ज्ञान होतें. रेटीनावर प्रकाशाचें होणारें कार्य इथरच्या आंदोलनावर अवलंबून असते व ही आंदोलनें दर सेकंदांत चार जलधि ४००,०००,०००,०००,०००, पासून ते आठ जलधि ८००,०००,०००,०००,०००, पर्यंत होतात. साधारण उच्च स्वराची दर सेकंडांत अजमासे चारशें आंदोलनें जरी धरली, तरी ध्वनिची चारशे व प्रकाशाची चार जलधि ४००,०००,०००,०००,०००; ह्यांच्यामध्यें किती अंतर आहे पहा! ह्या शेवटच्या आंदोलन संख्येपासून, जो प्रकाश पडतो, तो इंद्रधनुष्यातील तांबड्या पट्यासारखा असतो. इंद्रधनुष्यातील तांबडा पट्टा पहाण्यास पावसाळ्यांतील इंद्रधनु-

प्याची वाट पहावयास नको. आपल्या इच्छेस वाटेल तेव्हां घरीं बसून इंद्रधनुष्य पहावयाचें असल्यास एक बिलोरी भिंग घेऊन त्याच्या एका बाजूस दिवा ठेवावा व बिलोरी भिंगांतून जाणारीं दिव्याचीं किरणें चुना लावलेल्या स्वच्छ भिंतीवर पाडावीं ह्मणजे भिंतीवर उत्तम इंद्रधनुष्य पडलेलें दिसेल. त्यांत सात रंगाचे पट्टे दिसतील ते अनुक्रमे येणेंप्रमाणें:— अस्मानी, निळा, जांभळा, हिरवा, पिंवळा, नारिंगी व तांबडा. ह्यांपैकीं पिंवळा रंग उत्पन्न करण्यास इथरमध्यें दर सेकंडांत पांच जलधि ५००,०००,०००,०००,०००, आंदोलनें व्हावी लागतात. अस्मानी रंगाची, दर सेकंडांत ८००,०००,०००,०००,०००, आंदोलनें होतात. ह्यापेक्षां, दर सेकंडांत होणारी आंदोलनांची शक्ति वाढत गेली तर डोळ्याच्या शक्तिला असह्य होऊन, त्यांपासून पडणारा प्रकाश अगदीं दिसेनासा होतो. किंवा जरी दिसला तरी स्पष्टपणें दिसत नाहीं. इंद्रधनुष्यांत जो अस्मानी पट्टा दिसतो त्याच्या अलिकडे सुद्धा एक प्रकारचीं प्रकाश किरणें असतात, पण त्यांची आंदोलन संख्या दर सेकंडांत ८ जलधिपेक्षां अधिक असल्यामुळें आपल्याला ती दिसत नाहींत. जी वस्तु आपणांस दिसत नाहीं, तिला अस्तित्व नाहीं असें समजूं नये. अशा वस्तूंचें अस्तित्व ओळखण्यास अन्य साधनें पुष्कळ आहेत उ० ही अदृश्य **अत्यस्मानी** ( ultra violet ) किरणें, फोटोग्राफवर त्यांजपासून होणाऱ्या परिणावरून मुख्यत्वेंकरून ओळखतां येतात. त्याशिवाय, गेल्या चाळीस पन्नास वर्षांत प्रकाश शास्त्रामध्यें ज्या नव्या नव्या अद्भुत प्रयोगाचा शोध लागला आहे, त्यांतील अनेक प्रयोगावरून ह्या **अत्यस्मानी** किरणांचें अस्तित्व सिद्ध करून दाखवितां येऊं लागलें आहे. उ० अदृश्य प्रकाश जर यूरेनियम धातुमिश्रित कांचेवर पाडला तर तो लागलींच दृश्य होऊं लागतो. ह्या कांचेला **क्यानरी ग्लास** किंवा **श्यामिलियन ग्लास** ह्मणतात. विद्युत्प्रकाशांत किंवा मेणबत्तीच्या प्रकाशांत, अथवा बिलोरी कांचेच्या योगानें पडलेल्या इंद्रधनुष्यांतील एखाद्या पट्ट्यावर जर युरेनियम युक्त कांच धरली तर ज्या रंगाचा प्रकाश तिच्यावर पडेल त्या रंगाची ती दिसूं लागते.

पण तीच कांच जर अदृश्य अशा अत्यस्मानी प्रकाशांत धरली तर तिचा रंग पालटून ती एका चमत्कारिक व सुंदर रंगाची दिसूं लागते, ह्याचें कारण अत्यस्मानी किरणांची आंदोलनसंख्या कमी करून अदृश्याचा दृश्य प्रकाश करण्याची शक्ति तिच्या अंगीं आहे ह्मणून. ह्या अत्यस्मानी किरणांत जर सफेत खडूचा एक तुकडा धरला तर तो अगदीं गडद काळा दिसतो. खडूचा तुकडा काढून घेतला तर तेथें मुळींच प्रकाश दिसत नाहीं. युरेनियम कांचेच्या अंगीं असलेल्या ह्या धर्माला " **अंधप्रकाशत्व** " ( फ्ल्यूओरिसन्स ) ह्मणतात. अंधारांत चकाकण्याचा धर्म पुष्कळ पदार्थांमध्यें असतो. उ० खडीसाखर, हाडें, फास्फरस, क्यालशियम–सल्फाईड इ०.

अदृश्य किरणांची आणखी एक जात आहे. त्यांना दृश्य स्वरूप देण्याचीं साधनें अद्यापि सांपडलीं नसल्यामुळें प्रकाशाच्या रूपानें त्यांचें अस्तित्व सिद्ध करितां येत नाहीं. तथापि त्यांच्या अंगीं उष्णता पुष्कळ असते, ह्मणून उष्णतेच्या परिणामावरून त्यांचें अस्तित्व दाखवितां येतें. ह्मणूनच त्यांना **उष्ण किरणें** असें ह्मणतात. एवढ्यावरून, प्रकाशकिरणांच्या अंगीं उष्णता नसते असें मात्र कोणी समजूं नये. सर्व किरणांच्या अंगीं उष्णता असते. आगीची धग व उन्हाची झळ हीं दोन्हीही उष्णच असतात. विस्तवापासून पसरत जाणाऱ्या उष्णतेला आपण धग ह्मणतों. पसरत जाणाऱ्या प्रकाशाच्या उष्णतेला आपण झळ ह्मणतों. ज्या अर्थी धग व झळ हीं उष्णतेचींच दोन नांवें आहेत, त्या अर्थी पसरणारी उष्णता व पसरणारा प्रकाश हींसुद्धां एकजातीयच होत. बुडाला काजळी आलेली व तापलेली अशी एक तपेली जर अंधारांत नेऊन ठेविली तर ती तुह्मांस दिसणार नाहीं. पण तिच्या जवळ जर हात नेला तर स्पर्शेंद्रियाच्या योगानें तिच्या उष्णतेचें ज्ञान होऊन ती कोठें आहे हें समजतें. कारण जों जों तिच्या जवळ जावें तों तों तपेलीच्या अंगांतील उष्णता भासूं लागते, तथापि तपेलीला प्रत्यक्ष स्पर्श करावा लागत नाहीं. स्पर्श करण्यापूर्वीच तिचें ज्ञान होतें. हें ज्ञान तळ हातास, हाताच्या पाठीस,

नेहऱ्यास, डोळ्यास, कानास इ० सर्वत्र होतें. डोळ्यानें किंवा कानानें उष्णतेचें ज्ञान होतें, तर मग डोळ्यास उष्णता कां दिसत नाहीं, किंवा कानानें ती ऐकूं कां येत नाहीं? खरें आहे. डोळ्यानें उष्णतेचें ज्ञान होतें ह्यांत कांहीं शंका नाहीं. डोळ्यानें तिचें ज्ञान होत असून उष्णता व प्रकाश हीं एक नव्हेत, हें निराळें सिद्ध केलें पाहिजे असें तुह्मांस वाटतें काय? उष्णता जर तुमच्या डोळ्याला दिसत नाहीं तर तिला प्रकाश हें नांव तुह्मी देणार नाहीं हें उघड आहे. कारण, डोळ्यास जो दिसतो तो प्रकाश व जो दिसत नाहीं तो प्रकाश नव्हे, अशी जर प्रकाशाची आपली व्याख्या आहे, तर उष्णतेला प्रकाश ह्मणत नाहींत, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पसरत जाणारी उष्णता जर दिसेल, तर तिला प्रकाश ह्मणतां येईल. न दिसेल तर ह्मणूं नये. हा फक्त नांव ठेवण्याचा प्रश्न आहे. फांकणाऱ्या उष्णतेच्या अंगीं अनेक गुणधर्म आहेत त्यांपैकीं कांहीं दृश्य आहेत, कांहीं अदृश्य आहेत. जे दृश्य आहेत तेवढ्यापुरतें, तिला प्रकाश ह्मणावें. जे अदृश्य आहेत त्यांची गणना प्रकाशांत करूं नये. तथापि फांकत जाणारी उष्णता हें तिचें नांव कायम असणारच. एकंदरींत फांकणारा प्रकाश व फांकणारी उष्णता ह्यांचा अशा रीतीनें अर्थ करणें हें विशेष व्यवहाराला धरून होईल असें मला वाटतें. पसरणारा प्रकाश व पसरणारी उष्णता हीं दोन्हीं जर एकजातीय किंबहुना एकच आहेत, तर पसरत जाणाऱ्या उष्णतेला दृश्यस्वरूप येण्यास किंवा तिजपासून प्रकाश पडण्यास काय केलें पाहिजे? अर्थात् उष्णतेच्या आंदोलनाची संख्या दर सेकंडांत चार जलधीपासून आठ जलधीपर्यंत वाढेल तेव्हां त्यापासून प्रकाश पडेल. चार जलधींपेक्षां जर आंदोलनें कमी पडतील, तर त्यांजपासून फक्त उष्णता मात्र उत्पन्न होईल, व प्रकाश मुळींच पडणार नाहीं. ह्या उष्णतेस, इंद्रधनुष्यांतील तांबड्या पट्याच्या पलीकडची, फांकत जाणारी उष्णता ह्मणतात. ८ जलधींपेक्षां अधिक आंदोलनें झालीं तरी त्यांचा प्रकाश अदृश्य असतो, व तो अस्मानी पट्टयाच्या पलीकडे असल्यामुळें त्यांस अदृश्य अत्यस्मानी किरणें असें नांव दिलें

आहे. त्यांना उष्ण किरणें असें नांव दिलें नाहीं. ह्याचें कारण तीं जरी उष्ण असलीं तरी त्यांच्या उष्णतेचा परिणाम फार सूक्ष्म, ह्मणजे एकदम न भासणारा असा असतो. इंद्रधनुष्यांत जे सप्तवर्णांचे पट्टे आहेत, त्यांतील प्रत्येकाची आंदोलनसंख्या वेगळी वेगळी असते. ह्या दृश्य इंद्रधनुष्याच्या अस्मानी बाजूच्या पलीकडे अदृश्य अशीं तीन इंद्रधनुष्यें आहेत, व त्यांतील प्रत्येकांत सात सात अदृश्य पट्टे असून त्यांची आंदोलनसंख्या उतरत्या प्रमाणावर असते. त्यांच्यापेक्षां खालीं आणखी एखादें वर्णसप्तक असावें असें वाटतें. कालान्तरानें तेंही सांपडेल, अशी शास्त्रज्ञ मंडळीस उमेद आहे. हीं जीं चार वर्णसप्तकें सांगितलीं, त्यांतील प्रत्येकाची आंदोलनसंख्या दुसऱ्याच्या दुप्पट असून, त्यांतील फक्त एक सप्तक तेवढें दृश्य अथवा प्रकाशित आहे. ह्या दृश्य वर्णसप्तकास इंद्रधनुष्य ह्मणतात. सप्तक हा शब्द गायनशास्त्रांतील असून केवळ सोयीसाठी प्रकाशशास्त्रांत तो उसना घेतलेला आहे. वास्तविक दोन्ही ठिकाणच्या त्याच्या अर्थांत कांहीं ऐक्य नाहीं. आतांपर्यंत उष्णतेचीं आंदोलनें दर सेकंडांत परार्धापर्यंत होत असल्याविषयींचा शोध लागला आहे. ध्वनीचीं आंदोलनें अवघीं दहा हजारापर्यंतच होत असल्याचें माहित झालें आहे. पहा, केवढें हें दोहोंमध्यें अंतर! असो.

शेवटीं एक कल्पना आपल्या मनावर पूर्णपणें ठसविण्याचा माझा हेतु आहे. ती कल्पना ही कीं, आपल्या सर्व ज्ञानेंद्रियांच्या कार्यांचा [ ह्मणजे ज्ञानाचा ] सृष्टींतील अनेक भौतिक प्रेरणांशीं प्रत्यक्ष संबंध आहे. ध्वनीचा संबंध हवेच्या दाबामध्यें होणाऱ्या फेरफारांशीं आहे. हवेचा दाब ही एक प्रेरणा अथवा शक्तिच आहे. कारण हवेच्या दाबानें किती मोठमोठालीं कार्यें सृष्टीमध्यें घडत आहेत, हें सर्वांना माहित आहेच. तोच हवेचा दाब ज्या प्रमाणानें आमच्या कानांतील पडद्यावर पडेल, त्या प्रमाणानें आपणास ध्वनीचें कमीजास्त ज्ञान होतें. त्याचप्रमाणें घ्राणेंद्रिय व रसनेंद्रिय ह्यांचीं कार्येंसुद्धां एका प्रकारच्या प्रेरणेवर अथवा शक्तीवर अवलंबून आहेत. त्या शक्तीला रासायनिक शक्ति ह्मणतात. घ्राण व रसना ह्या दोन इंद्रियांना रासायनिक इंद्रियें

ह्मटलें तरी चालेल. कारण, त्यांचीं कार्यें रासायनिक क्रियेवरच चाल-तात. उदाहरणार्थ एक मिठाचा खडा तोंडांत टाका व एक खडीसाखरेचा खडा तोंडांत टाका. त्यांच्या चवेमध्यें काय फरक आहे, हें तुह्मी चटदिशीं सांगूं शकाल, व हाच रुचिभेद समजणें ह्मणजे दोन भिन्न भिन्न रासाय-निक क्रियेमधील भेदाचें ज्ञान होण्यासारखेंच आहे. ह्या ज्ञानांत एक-प्रकारचें अणुगत स्पर्शज्ञानाचें थोडेंसें मिश्रण असतें. कारण, कोणत्याही पदार्थाचा जिभेला किंवा टाळ्याला स्पर्श होतांच त्याची रुचि कळते खरी; पण ही रुचि अंशतः स्पर्शजन्य आहे असें ह्मणावें लागतें. हें रुचि-मूलक स्पर्शज्ञान, एरवींच्या स्पर्शज्ञाना [ उष्णतेच्या किंवा खरखरितप-णाच्या ज्ञाना ] पासून फार निराळें आहे. आपल्या एकंदर ज्ञानेंद्रिया-मध्यें सर्वांत तीक्ष्ण, नेत्रेंद्रिय होय. त्याच्या खालोखाल घ्राणेंद्रिय व रसनेंद्रिय. प्रोफेसर स्टोक्स ह्यांचें असें मत आहे कीं, ज्ञानेंद्रियाचें वर्गीकरण करणें झाल्यास नेत्रेंद्रिय, घ्राण व रसना ह्या दोन इंद्रियांपासून वेगळें काढतां येणार नाहीं. तिन्हींचा समावेश एके ठिकाणींच केला पाहिजे. ठोकळ मानानें त्यांचीं कार्यें जरी अत्यंत भिन्न भिन्न दिसतात, तथापि पदार्थमात्राच्या अणुंच्या अंगीं जे धर्म आहेत त्या अणुगत धर्मांशीं ह्या तिन्ही इंद्रियांचा निकट संबंध आहे. ह्या दृष्टीनें पाहूं जातां सर्व ज्ञानेंद्रियें एकाच सदराखालीं घालावीं लागतील. पण इतकें खोल जाणें आज अवश्य दिसत नाहीं. ज्याला आपण शक्ति ह्मणतो, त्या शक्तीशीं सर्व ज्ञानेंद्रियांचा संबंध आहे एवढें मात्र खरें. ज्याला आपण रसायन-कार्य ह्मणतों, त्यालासुद्धां शक्ति पाहिजेच. कारण, रसायनक्रियेंत तरी दोन अथवा अधिक पदार्थांचे परमाणू वेगळे वेगळे तोडावे लागतात. व पुनः निराळ्या प्रकारानें जोडावे लागतात. ह्या तोडजोडीस शक्ति पाहिजेच. घ्राणेंद्रियाचा व रसनेंद्रियाचा परस्पर संबंध आहे, हें उघड आहे. दोन्ही मिळून शेवटीं एकाच प्रकारचें ज्ञान करून देतात अथवा एकाच ज्ञानाचे हे दोन मार्ग आहेत असें जरी ह्मटलें तरी इंद्रियधर्मशास्त्र-वेत्त्यांना राग येणार नाहीं असें मला वाटतें. त्यांची परस्परामध्यें तुलना करितां येतें, एवढें कोणीही कबूल करील. तशी तुलना इतर

कोणत्याही दोन ज्ञानेंद्रियांमध्यें करतां येणार नाहीं. लांकडाच्या चौकटीचा आकार, व वस्त्रीचा खरखरीतपणा अथवा कर्ण्याचा आवाज, पाण्याची उष्णता, फुलांचा रंग, इ० वस्तूंची परस्परतुलना करतां येणें शक्य नाहीं. कारण त्यांच्यामध्यें एकमेकांत कोठेंहीं साम्य आढळत नाहीं. तसा प्रकार वास व रुचि ह्यांचा नाहीं. दालचिनीच्या वासाप्रमाणेंच तिची रुचीही तिखट आहे असें आपण वारंवार ह्मणतों. हें आपलें ह्मणणें बहुतेकांस पटण्याजोगें आहे. कारण, प्रत्येकास त्याचा अनुभव आहे. मिरीं, मोहरी, लवंगा, इ० मसाल्याचे व खाण्याचे जे जिन्नस आहेत, त्यांची रुचि व वास ह्यांच्यामध्यें विशेषेंकरून साम्य आढळतें. शारीरशास्त्रवेत्त्यांना ह्या प्रत्येक ज्ञानाचें इंद्रिय वेगळें दिसतें. आणि ह्मणून ते त्यांच्यामध्यें भेद करतात, तथापि तत्वशास्त्रदृष्ट्या घ्राणेंद्रिय व रसनेंद्रिय हीं वेगळीं नव्हेत व एकाच ज्ञानाचे दोन मार्ग आहेत असें आपण कां ह्मणूं नये हें मला समजत नाहीं.

आतां प्रकाशज्ञान व उष्णताज्ञान ह्यांच्यामधील भेद अगदीं नेमक्या रीतीनें जरी आह्मास सांगतां येत नाहीं तथापि ती दोन्ही वेगळीं वेगळीं आहेत ह्यांत कांहीं संशय नाहीं. भाताचें तपेलें जर तापलें तर तें तुह्मास कळतें कसें? त्यापासून निघणारी उष्णता पसरत जाऊन ती आपल्या तोंडास लागते ह्मणून. हा एक मार्ग झाला. ह्यापेक्षां दुसऱ्या एका मार्गानें आपणास उष्णतेचें ज्ञान होतें. तो पहिल्या मार्गाहून भिन्न आहे. तो कोणता हें मी पुढें सांगेन. तापलेला पदार्थ पाहिला ह्मणजे त्यामध्यें उष्णता आहे, हें डोळ्यांनींसुद्धां कळतें. पण डोळ्यानें जिचें ज्ञान होतें ती उष्णता फांकत जाते, ह्मणूनच तिचें ज्ञान होतें. तीच उष्णता पुष्कळ वाढून भांडें जर लाल किंवा पांढरें झालें, तर तिचा प्रकाश पडतो व तेणेंकरून डोळ्यानें उष्णतेचें ज्ञान होतें. ह्या ठिकाणीं उष्णतेचें ज्ञान दोन मार्गांनीं होतें. एक दृष्टीनें व एक स्पर्शानें. फोडणीची पळी तापत घातली व तापून लाल झाल्यावर जर अंधारांत नेली, तर ती कांहीं वेळ अंधारांत दिसत असते, व पुढें तिची लाली जों जों कमी कमी होत जाईल, तों तों ती दिसेनाशी होते. तथापि तिच्या

जवळ हात धरला असतां तिच्या अंगांतील उष्णतेचा भास होतो. कारण तिच्या अंगांतील उष्णता फांकत गेल्यामुळें तिच्या सभोंवतालचा प्रदेश उष्ण झालेला असतो. ही फांकत जाणारी उष्णता कांहीं वेळ डोळ्यांनीं, हातांनीं वगैरे कळली. पण तिची लाली कमी होतांच अथवा नाहींशी होतांच तिचें ज्ञान केवळ स्पर्शेंद्रियानेंच ( उष्णतेचें ज्ञान करून देणाऱ्या स्पर्शेंद्रियानें ) झालें. एकंदरींत एवढें खरें कीं, एकाच जातीच्या ह्मणजे फांकत जाणारी उष्णता, ज्या प्रमाणानें दृश्य किंवा अदृश्य असेल त्या प्रमाणानें, तिचें ज्ञान आह्मास दोन मार्गांनीं होते. डोळ्यांतील रेटीना व अंगाचें कातडें ह्यांच्यामध्यें अत्यंत साम्य आहे किंवा ऐक्य आहे, असें जोंपर्यंत शारीरशास्त्रवेत्ते ह्मणत नाहींत, तोंपर्यंत दृष्टीनें होणारें उष्णतेचें ज्ञान, व स्पर्शानें होणारें उष्णतेचें ज्ञान हीं एकच आहेत असें ह्मणतां येणार नाहीं. शारीरशास्त्र अद्यापि वाढतें आहे. त्यामुळें पुढें कधीं तरी डोळ्यांतील रेटीना व अंगावरची त्वचा ह्यांच्यामध्यें ऐक्य सिद्ध केलें जाईल. त्यावेळीं दृष्टिजन्य ज्ञान व स्पर्शजन्य ज्ञान एकच ह्मणूं. डार्वीनच्या मताप्रमाणें रेटीना व त्वचा ह्यांच्यामध्यें ऐक्य आहे. तसें ठरेल तर दोन्ही मार्गानें जें उष्णतेचें ज्ञान होतें, त्यांतसुद्धां ऐक्य आहे हें कबूल करावें लागेल. तूर्त आपणास दृश्य उष्णता [ अथवा प्रकाश ] व अदृश्य ह्मणजे स्पर्शेंद्रियास भासणारी उष्णता ह्या दोन्ही उष्णतेचें ज्ञान भिन्न भिन्न प्रकारचें आहे असें ह्मणून समाधान मानलें पाहिजे. दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, ती ही कीं, उष्णतेचें ज्ञान होण्यास ती उष्णता फांकणारीच पाहिजे असें नाहीं. पण प्रकाशाचें ज्ञान होण्यास मात्र ती उष्णता ( जिच्यापासून प्रकाश पडतो ती ) अवश्य फांकत जाणारी असली पाहिजे. तशी नसेल तर डोळ्यांतील रेटीनाला त्या उष्णतेचें ज्ञान होणार नाहीं. मद्याशीं तापवून लाल केलेली लोखंडाची पळी आपण पुन: एकवार अंधारांत नेऊं. तेथें तिची उष्णता आपणास आपल्या डोळ्यांनीं दिसते व तिच्याखालीं कांहीं अंतरावर हात धरला तरी सुद्धां तिचा भास होतो. ह्याचें कारण दोन्ही ठिकाणीं फांकत जाणारी उष्णता होती ह्मणून तिचें ज्ञान आपणांस दुरून

झालें. त्या पळीवर जर आतां आपण आपला हातच ठेवला अथवा पळी हातांत धरली, तर ती आपल्या हातास पूर्वीपेक्षां अधिक ऊन लागेल. एकंदरींत आतां पळींतील उष्णतेचें ज्ञान तीन निरनिराळ्या तऱ्हेनें झालें:—( १ ) प्रकाशरूपानें डोळ्याला ती उष्णता दिसली ह्मणून. ( २ ) पळीच्या भोंवतालची हवा ऊन होऊन त्या हवेच्या योगानें, व प्रत्यक्ष स्पर्शानें. हे ज्ञानाचे मार्ग जरी भिन्न भिन्न आहेत तथापि ज्या अर्थीं उष्णता चोहोंकडे एकच, त्या अर्थीं तिचें ज्ञान कसेंही झालें तरी तें एकच.

आपल्या दंडातील स्नायुशक्तीच्या योगानें प्राप्त होणारें वजनाचें ज्ञान व हस्तस्पर्शानें प्राप्त झालेलें खरखरीतपणाचें ज्ञान, हीं दोन्हीं एकच, व स्नायुशक्ति हेंच आपलें सहावें ज्ञानेंद्रिय असें मी पूर्वीं एकवार सुचविलें आहेच. स्नायुशक्ति हें सहावें ज्ञानेंद्रिय आहे असें ह्मणण्याबद्दल मजवर फार लोकांनीं टीका केली, कारण तिचा अर्थच मला कळला नाहीं. तंट्याचें मूळ हें आहे कीं, इंद्रियधर्मशास्त्रवेत्त्यांना स्नायुशक्ति ( घटकाभर दंडांतील जोर कां ह्मणाना ) व ज्या शक्तिमुळें खरखरीतपणाचें ज्ञान होतें, ती शक्ति, ह्या दोन भिन्न भिन्न दिसतात. तत्वशास्त्रवेत्ते ह्मणतात कीं, दोन्ही एकच. त्यांच्या मतें खरखरीतपणाचें ज्ञान करून देणारी शक्ति ही स्नायुशक्तीचें केवळ रूपांतर होय. हें स्नायूशक्तीचें खूळ तरी काय आहे हें प्रथम पाहिलें पाहिजे. मी उजव्या हातानें हें माझ्या समोरचें टेबल असें दाबतों, अथवा अंधार कोठडींत हात पुढें करून चापसत चापसत डोळे मिटून चालू लागतो, अशी कल्पना करूं या. जातां जातां टेबलाचा कांठ हाताला लागल्याबरोबर कांहीं तरी कठीण पदार्थ वाटेंत आहे असें मला ज्ञान झालें. हें ज्ञान मला कसें व कोठें झालें? शारीरशास्त्रवेत्ते सांगतात कीं, हें ज्ञान दंडांतील स्नायूंमध्यें जी शक्ति आहे, तेणेंकरून झालें. दंडाच्या स्नायूंनीं जर हे ज्ञान करून दिलें, तर स्नायुशक्तीचें हें चांगलें उदाहरण आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. पण आतां आपण एक वस्त्री घेऊं व तिच्यावर हलकेंच आपलें बोट फिरवूं किंवा एक

लहानशी वज्री चिमटीमध्यें धरून पाहूं. आपल्या बोटाला कांहीं तरी ज्ञान होईलच. तें ज्ञान, व टेबलावर बोट दाबण्यानें झालेलें ज्ञान ह्या दोहोंमध्यें भेद वाटतो. तो भेद कोणता? एक हाताला खरखरीत लागलें, व दुसरे खरखरीत लागलें नाहीं हाच काय तो भेद. मला हा भेद मुळींच वाटत नाहीं. दोन्हीमध्यें शक्तीचें काम असल्यामुळें तेथें जातिभेद दिसत नाहीं. नुसता प्रमाणभेद मात्र दिसतो. तळहातानें किंवा बोटानें जेव्हां टेबलावर दाबतों, तेव्हां अधिक जोर खर्च करावा लागतो, व त्याचा परिणाम दंडांतील स्नायूंपर्यंत येतो. हा जोर एके ठिकाणींच लागतो. खरखरीत किंवा गुळगुळीत पदार्थावर जेव्हां हळूच बोट फिरवितों, तेव्हां सुद्धां थोडा बहुत जोर लावावा लागतोच; पण तो एके ठिकाणीं न लागतां शेंकडों ठिकाणीं लागतो व ह्यापैकीं प्रत्येक दोन ठिकाणामध्यें जितके कमी किंवा जास्ती अंतर असेल तितका तो पदार्थ गुळगुळीत अगर खरखरीत लागेल, व त्याप्रमाणें हात फिरवितांना कमी किंवा जास्त जोर खर्चण्याचें काम पडेल. एकंदरींत स्पर्शस्थानें जवळ असोत किंवा दूर असोत, स्पर्शानें तीन गोष्टींचें ज्ञान होतें. (१) जोराचें प्रमाण (२) जोर लावण्याचें स्थान (३) जोराची दिशा. हें जोराचें ज्ञान, स्पर्शजन्य उष्णतेच्या ज्ञानाहून अगदीं वेगळें आहे. खरखरीतपणाच्या ज्ञानांत व नुसत्या जोरानें दाबण्याच्या ज्ञानांत शारीरशास्त्रवेत्ते व इंद्रियधर्मशास्त्रवेत्ते एक फरक काढतात तो हा. पहिल्यामध्यें जें ज्ञान होतें तें, बोटाच्या टोंकाजवळ जे ज्ञानतंतू असतात त्यांच्या योगानें होतें. व दुसरें ह्मणजे दाबाचें ज्ञान मात्र स्नायूंनीं होतें. मला हा सुद्धां भेद मान्य नाहीं कारण, शारीरशास्त्रवेत्त्यांना बोटाच्या टोंकाजवळचे सूक्ष्म स्नायू वेगळे करितां येत नाहींत, एवढेंच त्यांच्या ह्मणण्यावरून सिद्ध होतें, असें जरी कबूल केलें तरी त्यांचा संबंध स्नायूंशीं असलाच पाहिजे. एकंदरींत स्नायुशक्ति हें सहावें ज्ञानेंद्रिय असून, तें उष्णतेच्या ज्ञानापासून अगदीं भिन्न आहे व दोन्ही स्पर्शेंद्रियांत गणलीं जातात एवढें ठरलें.

---

# ग्रंथमाला

मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.



# पुनर्विवाहप्रवर्तकाचा वृत्तांत.

हा

रा. रा. वामन विश्वनाथ जोशी,

सभासद, विधवाविवाहप्रतिबंधनिवारक मंडळी पुणें

यांनीं लिहिला,

तो

विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.

संपादक ग्रंथमाला

यांनीं

कोल्हापूर ' श्रीसमर्थप्रसाद ' छापखान्यांत छापिला.

सन १९०९.



किंमत ८।१०.

[ अर्पणपत्रिका. ]

हा ग्रंथ,

अल्पवयस्क गतभर्तृकांच्या मातापितरांना व तत्स्थानीयांना

त्यांनीं आपल्या पोटच्या गोळ्यांचें, व स्वाश्रयांतील

अनाथ मुलीबाळींचें कल्याण करावें या हेतूस्तव

सादर समर्पण केला असे.

# अनुक्रमणिका.



---

# पुनर्विवाहप्रवर्तकाचा वृत्तांत.

## उपोद्घात.

सामाजिक सुधारणांमध्यें अत्यंत कठिण विषय ह्मटला ह्मणजे पुनर्विवाह हा होय. ह्याच विषयाचे पायीं खुद्द सामाजिक परिषदेस-सुद्धां मोठाल्या शहरांतून धक्का मिळण्याची पाळी येते. ह्या विषयाला रूढि अनुकूल नाहीं, लोकसंमति नाहीं, शास्त्रसंमति नाहीं अशी जनतेची चुकीची दृढ समजूत, मनुष्यमात्राच्या नैसर्गिक मनोवृत्तीला ही गोष्ट रुचत नाहीं, ती ऐकतांच उलटी चिरड येते. ' आमच्या वडिलांनीं चौथें लग्न लाविलें ' असें विधान कोणीही हौसेनें, डौलानें व मोठ्या कौतुकानें करूं शकेल. पण तेंच ' आमच्या सापत्न मातोश्रीनें ' चौथें राहोच, पण ' दुसरें लग्न केलें ' हें सांगण्याला लहान मुलालादेखील लाज वाटेल. मग सख्या मातोश्रीच्या पुनर्विवाहाची गोष्ट तर दूरच! ह्याचप्रमाणें विधवेच्या सासरच्या मनुष्यांना नात्याच्या जवळदूरतेच्या मानानें, या विषयाबद्दल तिटकारा हा येणार. कां तें नीट समाधानकारक सांगतां यावयाचें नाहीं. कारण प्रस्तुत लेखकही असल्याच परिस्थितींत वाढलेला आहे. तथापि एक मात्र दिसतें कीं, पुनर्विवाह अत्यंत गौण पक्ष आहे, त्यामुळें तिन्ही कुळांस काळिमा येतो, कुटुंबांत वर्णसंकर होऊन अत्यंत हीनत्व येतें, इत्यादि अनिष्टग्रह लोकांचे फार पुरातन कालापासून होऊन बसले आहेत. फार तर काय, पण खुद्द विधवासुद्धां कीं ज्यांच्यासाठीं आह्मा सुधारकांची ही येवढी सारी खटपट चालू आहे, त्या बायादेखील उगीच वरकांतीं लोकलज्जेस्तव प्रथमतः नाकें मुरडतातच. इतका या विषयाला नसता कमीपणा प्राप्त झाला आहे. तेव्हां सगळ्या दुनियेनें वगळलेल्या अशा ह्या विषयाला वाली कोण? अशी देवाला काळजी पडली. आपगतलबी नरपशु विधवा पोरींचें पोतेरें करून टाकितात,

हें पाहून देवाला अनाथ मुलींची दया आली. त्यानें त्यांचा कैवारी उत्पन्न केला. त्याचा हा पुढील वृत्तांत होय. यांत सत्य, नीति, दया, परोपकार, समता, निःपक्षपातबुद्धि, इत्यादि अलौकिक व परमेश्वराला फार प्रिय अशा गुणांचें कथाप्रसंगानें वर्णन केलें आहे.

२. ह्या महाराष्ट्र देशांतील सामाजिक सुधारणेच्या पोटीं अनेक कलमें आहेत, व हीं कोणतीं तीं सर्व येथें नमूद करण्याचें प्रयोजन नाहीं. त्यांची चर्चा दरवर्षी सामाजिक परिषदेंत होत आली आहे. ह्या कलमांध्यें, आरंभीं ह्मटल्याप्रमाणें, सर्वांत अत्यंत बिकट पण आर्त-जनाबद्दल कळवळा बाळगणारा, व त्यांजविषयीं दया उत्पन्न करणारा विषय ह्मटला ह्मणजे **पुनर्विवाह** हा होय. सामाजिक परिषदे-मधील कांहीं प्रश्न असे आहेत कीं, त्यांबद्दल जुन्या नव्या पक्षांत मतभेद असण्याचा मुळींच संभव नाहीं. उदाहरणार्थ अतिरिक्त मद्यपान; अजीर्ण होई तों मांसभक्षण इत्यादि कांहींबद्दल अतिशय अनुकूल मत जुन्या पक्षाचें यद्यपि नसलें, तरी जातींतून काढून लावण्यायेवढा तिरस्कार त्या प्रश्नवाल्यांस सोसावा लागत नाहीं. उदाहरणार्थ स्त्रीशिक्षण. पण विधवास्त्रीपुनर्विवाह विषय आज प्राचीन कालापासून केवळ पुरुषांच्या मात्सर्यामुळें, इतका गर्ह्य व त्याज्य मानिला गेला आहे कीं, त्याबद्दल लोकांचा साधारणतः तिरस्कार असतो, येवढेंच नव्हे, तर पुनर्विवाहित व तत्संबंधी जन निष्कारण ज्ञातिबाह्य समजले जातात. ह्याकरितां पुनर्विवाहितांना आपल्या आप्तगणांस सोडून राहणें प्राप्त होतें. तात्पर्य ज्ञातिबहिष्कृततेयेवढी सामाजिक व धार्मिक **काळेपाण्याची शिक्षा** कोणत्याही प्रश्नास लागू पडत नाहीं. येवढा सारा विचार मनांत आणून, पुनर्विवाहहितचिंतकांनीं व त्यांतही विशेषतः खुद्द पुन-र्विवाहितांनीं आपलें **सर्व** तन मन धन **सर्वस्वी**, कडकडीत वैष्णवी एकनिष्ठेनें, फक्त **येवढ्याच** विषयाकडे, अर्पण करून **स्वज्ञातिसंर-क्षणार्थ** आणि **संवर्धनार्थ** सतत प्रयत्न करणें अत्यावश्यक आहे. त्यांस दुसऱ्या इतर कोणत्याही कार्याकडे लक्ष्य पुरविण्यास अवकाश सांपडला न पाहिजे; अहोरात्र अंगीकृत मंगलकृत्य डोळ्यापुढें एकसारखें

दिसत असलें पाहिजे; व आपल्या अल्प व नूतन ज्ञातीच्या कल्याणार्थ व वृद्ध्यर्थ नित्य झटलें पाहिजे. एवंच निदान पुनर्विवाहपद्धति चांगली रूढ होईपर्यंत, पुनर्विवाहितांनीं व पुनर्विवाहहितेच्छूंनीं आपले प्रयत्नांचा व पैशाअडक्याचा सगळा ओघ ह्या एकाच पुनरुद्वाह दिशेनें, तूर्त कांहीं काळपर्यंत, वाहवत नेला पाहिजे, त्यास सतरा फाटे उपयोगी नाहींत. अशा थाटानें व अशा हिंमतीनें ज्या पुरुषानें या मंगल-कार्याचा मंडप उभारिला, त्याचें अंशतः अनुकरण घडावें, व अशीच प्रांतोप्रांतीं ह्या सत्कार्याची स्थापना व्हावी, ह्मणून पुढील अल्प ग्रंथ लिहिला आहे.

३. सामाजिक परिषदेंत 'ज्ञातिभेद' या विषयाचा निषेध केला आहे; पण त्याच परिषदेंतील इतर विषय उदाहरणार्थ 'परदेशगमन' 'ऋतुप्राप्तीनंतर विवाह' व सर्वांत अग्रगण्य 'विधवापुनर्विवाह' हे विषय तर असे आहेत कीं, यांच्या विधीनें, ह्मणजे यांचें अनुसरण करण्यानें, अधिकाधिक पोटभेद पडत जाण्याची भीति वाटते. पण त्यास उपाय नाहीं. त्यांतही शेवटल्या पुनरुद्वाह विषयाचें काठिण्य अतएव माहात्म्यच तसें आहे. या विषयाचा सर्वथैव अंगीकार करणाराचेठायीं असामान्य धैर्य असावें लागतें; त्यांचे अंगीं अचाट चिवटपणा वसत असला पाहिजे; तेव्हां अशा अत्यंत विकट विषयाबद्दल खटपट करणें तर तीही तशीच दीर्घ पाहिजे. रात्रंदिवस हा विषय लोकांच्या दृष्टीसमोर मांडिला पाहिजे, सदोदित सभांतून व मुद्रणयंत्रांतून या गोष्टीचा कीस पडला पाहिजे, जनसमूहाचे कर्ण-रंध्रावर वारंवार या गोष्टी जाऊन आदळल्या पाहिजेत, तेव्हां कोठें त्यांच्या अंगवळणीं पडल्या तर पडणार, व या बिकट प्रश्नाचें कठीण स्वरूप कोठें थोडेंसें कमी झाल्यास होणार. तेव्हां हा विषय लोकांच्या परिचयांतला व्हावा, त्याबद्दलचा परकेपणा व तिटकारा कमी व्हावा, व क्रमाक्रमानें लोकांचे मनांत तत्संबंधीं आपलेपणा व आदरभाव उपजावा, आणि एणेंकरून बालविधवांच्या दुःखाचा अंशतः परिहार

व्हावा ह्मणून ईश्वरचंद्रासारख्या थोर महात्म्या पुरुषाचे चरित्राचा आश्रय करून हा **वृत्तांत** लिहिला आहे. करितां वरील हेतू अंशतः पूर्ण झाल्यास, पुस्तकरचनेचें साफल्य झालें, असें ह्मणतां येईल.

ज्या पुस्तकांच्या आधारानें हा ग्रंथ रचिला त्यांचीं नांवें:—

| | | |
|---|---|---|
| १ | बाबू सुबलचंद्र मित्र | कृत विद्यासागराचें चरित्र ( इंग्रेजी ) |
| १ | बाबू श्रीचरणचक्रवर्ती | ,, ,, |
| १ | बाबू प्रतापचंद्र मुजुमदार | केशवचंद्रसेननेंचेंचरित्र ,, |
| १ | पंडित नारायण केशव वैद्य | ५६ चा १५ वा ह्मणजे पुनर्विवाह कायदा व त्यावरील कौन्सिलांतील वाद. |
| १ | प्रो० भाटे | सुशिक्षितांस विनंति मराठी. |

इ० इ० इ०

हा ग्रंथ लिहिण्याचे कामांत वरील पुस्तकें मूळाधारभूत झालीं आहेत. या पुस्तकांपासून सर्व प्रकारें पुष्कळ मदत झाली आहे. तीबद्दल त्या त्या पुस्तककर्त्यांचे प्रस्तुत ग्रंथकारावर फार मोठे उपकार आहेत. तेव्हां ते कबूल करणें व त्यांचे त्याबद्दल आनंदानें अंतःकरणपूर्वक आभार मानणें हें मुख्य व अत्यावश्यक कर्तव्यकर्म होय. तें या ठिकाणीं बजावून ठेवणें अत्यंत इष्ट आहे. प्रो० पटवर्धन यांनीं ग्रंथकाराचे विनंतीवरून लेख तपासून पहाण्याचें संतोषानें पत्करिलें, त्याबद्दल त्यांचेही कृतज्ञतापूर्वक तो आभार मानीत आहे.

पुणें, नारायणपेठ.<br>
माहे जून, इ० स० १९०५

वा० वि० जोशी.

# पुनर्विवाहप्रवर्तकाचा वृत्तांत.

## जन्म व बाल्य.

१. पंडित ईश्वरचंद्र यांचा जन्म वीरसिंह[1] येथें, ता० २६ माहे सप्टेंबर इ० स० १८२० मध्यें एका कुलीन ब्राह्मणकुलांत झाला. यांच्या पूर्वजांचें मूलनिवासस्थान वनमालीपुर[2] हें होतें. यांचे वाडवडिलांची फार गरीबी होती, तरी पण ते चालीरीतीनें फार सालस, पूर्वींपासून विद्यासंपन्न, व स्वभावतः तेजस्वी अतएव सदा स्वावलंबी असे असत. विद्यासागरांच्या वडिलांचें नांव वंद्योपाध्याय ठाकूरदास, व मातेचें भगवती देवी. यांचें खरें उपनांव वंद्योपाध्याय[3] होय. वडील ठाकूरदास यांची माहेवारी अवघी दोन रुपये होती. पण त्याकाळीं, हल्लींच्या मानानें स्वस्ताई पुष्कळ असल्यामुळें, येवढ्या लहानशा मिळकतींत संसार सुरळीत चाले. पुढें तीन वर्षांनीं ठाकूरदासांचा पगार पांच रुपये झाला.

२. ईश्वरचंद्र हा एक प्रत्यक्ष ईश्वराचा अवतारच होऊन गेला असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. परमेश्वरानें ह्या अवतारामध्यें रुढि राक्षसीचा शिरश्च्छेद करून बालविधवांचें संरक्षण केलें आणि त्यांना त्यांच्या सौभाग्यसुखाचा मार्ग खुला करून दिला. यांना ईश्वरांश ह्मणण्याचें कारण येवढेंच कीं, इतर अवतारी पुरुषाप्रमाणें यांच्या आजोबास यांचा जन्म होणार ह्मणून पूर्वींच स्वप्नांत दृष्टांत झाला होता. तो मनोरम प्रकार असा.

---

१. वीरसिंह हें एक लहानसें खेडेंगांव कलकत्याच्या पश्चिमेस २५ कोस आहे.

२. येथून ईश्वरचंद्राचे पितामह रामजय तर्कभूषण हे कलहप्रिय बंधूशीं संबंध नको असें ह्मणून व वडिलार्जित वित्तविषयाची आशा सोडून वीरसिंह येथें आले. तेव्हांपासून त्यांचें हेंच रहाण्याचें ठिकाण बनलें.

३. याचाच अपभ्रंश **बानर्जी** असा व्यवहारांत प्रसिद्ध आहे. आणखी तुल्य उदाहरणें — चटोपाध्याय, चतर्जी; मूकोपाध्याय, मूकर्जी.

चिरंजीव ठाकूरदास चांगले कर्ते पुरुष झाल्यावर, त्यांजवर साऱ्या संसाराचा भार सोंपवून, तर्कसिद्धांत रामजय स्वतः संसारत्याग करून तीर्थयात्रेस निघून गेले. एके समयीं मार्गांत गिरिशिखरावर निद्रावश असतां रामजयानीं स्वप्न पाहिलें. साक्षात् कैलासनाथ त्यांना दर्शन देऊन ह्मणाला. "अरे, रामजया, तुझ्या कुलांत लवकरच एक सुलक्षण मुलगा उत्पन्न होईल. तो स्वदेशांतील लोकांचें अपरिमित कल्याण करील; आणि अलौकिक कीर्ति संपादन करील इतकी कीं, यद्यपि कालवशात् मूर्ति नष्ट झाली, तत्रापि कीर्ति यावच्चंद्रदिवाकरौ कायम राहील." असा साक्षात्कार झाल्यावरून तर्कसिद्धांत रामजय यांनीं यतिवेष टाकून देऊन, पुनः आपल्या कुटुंबांत परत जाण्याचा संकल्प केला. स्वगृहीं आले, आणि पहातात तों सूनबाई खरोखरच गरोदर आहेत. स्वप्न खरें होण्याचें पूर्वचिन्ह दिसूं लागलें. पण ह्या बाई गर्भार राहिल्या वेळेपासून अगदीं गुंग व अस्वस्थ. पुष्कळ औषधोपचार केले, पण गुणाचें नांव नाहीं. बाईची ही गुंगी आणि अस्वस्थता साऱ्या गर्भारपणभर एकसारखी जशीच्या तशी कायम होती. पण हें केवढें साल्हादाश्चर्य!! कीं, बाई भगवती देवी प्रसूत होतांच—ईश्वरचंद्र जन्म पावतांच—प्रकृतीस आपोआप आराम पडूं लागला; आणि कांहीं औषधपाण्यावांचून थोड्या दिवसांत भगवती बाई चांगल्या बऱ्या झाल्या.[४]

---

४ थोर विख्यात विभूतींच्यावेळीं त्यांची माता गरोदर असतांना, आयांच्या प्रकृतींत कांहीं चमत्कारिक विकार उत्पन्न होतात, किंवा त्यांची वृत्ति कांहीं विलक्षण प्रकारची बनते. अशा आणीबाणीच्या समयीं बहुश्रुत व अनुभवी वैद्यहकीमांचे उपाय थकतात. पण ह्याच बाया बाळंत झाल्या ह्मणजे त्यांना अनायासें सुखसमाधान वाटूं लागतें. यांचें कारण उदरस्थ ईश्वरांशभूतसत्त्वाचा स्वभाव, सामर्थ्य, तेज, इत्यादिकांचा अतिरेक, आधींच जडता पावलेल्या गरोदर स्त्रियांना सहन होईनासा होतो. हाच प्रकार सामान्य मुलांच्या वेळीं, त्यांच्या आया गर्भार असतांना, फार कमी प्रमाणावर दृष्टोत्पत्तीस येण्याचा संभव असतो असें अदमासानें वाटतें. खरें कारण काय आहे त्याचा छडा काढणें हा भिषग्वर्यांचा विचारणीय विषय आहे.

# विद्याभ्यास.

इकडे महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें कांहीं ब्राह्मणी चलाख मुलगे श्रीक्षेत्र-वाई, कऱ्हाड, माहुली, सांगली, इत्यादि ठिकाणांहून पुण्यास पायीं चालत आले, किंवा कोंकणपट्टींतून मुंबईस गेले, व मोठ्या ईर्षेनें त्यांनीं जसा येथील विश्रामबागेंतल्या पाठशाळेंत व मुंबईच्या एल्फिन्स्टन् स्कूलमध्यें अनुक्रमें विद्याभ्यास करून नांवलौकिक मिळविला; त्याचप्रमाणें ईश्वरचंद्र हे वीरसिंहाहून पायीं कलकत्त्यास आले, व तेथें संस्कृत शाळेंत त्यांनीं शास्त्राभ्यास करून उत्तम कीर्ति संपादन केली. पूर्वीं विद्ये-साठीं सर्व प्रकारें विद्यार्थ्यास फार कष्ट पडत. असें असतां, चमत्कार असा कीं, हल्लींच्यापेक्षां अधिक चांगली विद्या विद्यार्थ्यांच्या पदरांत पडे. आतांप्रमाणें वाहनादिकांचें वैपुल्य नसल्यामुळें, राहण्याशिकण्याच्या सोयी नसल्यामुळें, विद्यार्थ्यांना खेड्यापाड्यांतून मोठाल्या शहरास पायीं चालत यावें लागे, स्वयंपाक खऱ्या शब्दार्था-प्रमाणें अंगावर पडे, व छापील पुस्तकांचे महर्गतेमुळें, अगर अभावा-मुळें हस्तलिखित नकला करून घ्याव्या लागत. सांप्रत सर्व प्रकारची सिद्धता असून रेल्वे असून, बोर्डिंगें, हॉटेलें, इत्यादि असून, छापिल पुस्तकें सवंग झालीं असून, व रुक्ष विषय 'ईझीमेड' झाले असून, गेल्या दोनतीन दशकांत नांव घेण्यायोग्य विद्येंत तरबेज झालेला असा एकसुद्धां इसम आढळांत येत नाहीं, येवढेंच सखेदाश्चर्य वाटतें. कां, आरामव्यवस्था फार वाढल्यामुळें, 'सुखार्थिनः कुतो विद्या' या वचनाचा अनुभव येऊं लागला? खेरीज दुसरा एक विशेष असा आढळतो कीं, पूर्वींचे विद्यार्थ्यांची विद्यार्थिदशा मरेतागायत कायम राही. आणि हल्लीं, "विद्यालयाच्या काचांतून कधीं सुटतों, व पुस्तकें गुंडाळून केव्हां टाकतों" असें शाळेंत असतांनाच त्यांना होऊन जातें. मग, उपपद पदरांत पडतांच, बुकांना कायमची रजा मिळते, किंवा वाणीपसारी यांचे दुकानीं त्यांची बदली होते यांत नवल कसलें? अस्तु.

ईश्वरचंद्र कलकत्त्यास आले, त्यावेळीं कलकत्त्यास दोन प्रमुख शाळा होत्या. एक हिंदु कॉलेज, व दुसरें संस्कृत कॉलेज. पहिल्यांत इंग्रजी वळण होतें. तें गिरवून मुलांचे आचारविचारांत फेर पडूं लागला. तेव्हां ठाकूरदासांनीं आपल्या मुलग्यास-ईश्वरचंद्रास-दुसऱ्या शाळेंत घातलें. ईश्वरचंद्र संस्कृत कॉलेजाचे व्याकरण वर्गात बसले. ते समयीं या वर्गाचे शिक्षक पं० गंगाधर तर्कवागीश हे विख्यात वैय्याकरण होते. सुप्रसिद्ध संस्कृतज्ञ प्रो० वुइल्सन सो यांच्या पसंतीची शाळेंतील शिक्षक मंडळी होती. ही अध्यापकांची निवड आस्थेनें व मार्मिकतेनें केल्यामुळें, फार नामी झाली होती. ती अशीः—

| अंक | शास्त्रविषय. | विद्यागुरु. |
|---|---|---|
| १ | व्याकरणशास्त्र | पं० गंगाधर तर्कवागीश.<br>„ हरिप्रसाद तर्कालंकार<br>„ हरनाथ तर्कभूषण |
| २ | अलंकार—साहित्यशास्त्र. | „ नथुराम शास्त्री |
| ३ | स्मृति—धर्मशास्त्र. | „ रामचंद्र विद्यावागीश |
| ४ | न्यायशास्त्र. | „ निमचंद्र शिरोमणी |
| ५ | वेदांतशास्त्र. | „ शंभुचंद्र वाचस्पति |
| ६ | वाङ्मय—भाषाशास्त्र. | „ जयगोपाल तर्कालंकार |
| ७ | ज्योतिषशास्त्र. | „ योगाध्ययन मिश्र |
| ८ | आयुर्वेद संगीतशास्त्र. | „ क्षुधिराम विशारद |

ईश्वरचंद्राची विलक्षण बुद्धिमत्ता पाहून पं० गंगाधर तर्कवागीशांस फार संतोष होई. व्याकरणाचे रोजचे धडे झाल्यानंतर गुरुजी आणखी इतर श्लोक शिकवित. सहामाहीच्या परीक्षेत पहिले आल्यामुळें, ईश्वरचंद्रास पांच रुपये मासिक दक्षिणा मिळूं लागली. त्यांनीं व्याकरणशास्त्राचा तीन वर्षें अभ्यास केला. प्रत्येक वार्षिक परीक्षेत ते पहिले येत, व पारितोषिक पटकावीत. एका सहामाहीच्या अवधींत त्यांनीं अमरकोश अगदीं तोंडपाठ करून टाकिला. नंतर ते वरल्या वर्गात आपले वयाचे ११ वे वर्षी गेले. त्यावेळीं मदनमोहन तर्कालंकार व मुक्ताराम विद्यावागीश हे त्यांचे सहाध्यायी होते. ह्या वर्गाच्या पहिल्या वर्षामध्यें रघुवंश, कुमारसंभव, व राघवपांडवीय यांचा अभ्यास केला. वार्षिक परीक्षेत पहिली जागा व पहिलें बक्षिस. दुसऱ्या वर्षी माघ, भारवि, शाकुंतल, मेघदूत, उत्तररामचरित, विक्रमोर्वशीय, कादंबरी, दशकुमारचरित, मुद्राराक्षस, इत्यादि काव्य नाटकांचें त्यांनीं अध्ययन केलें. याही वर्षीच्या परीक्षेत पहिलें पद व अनेक उत्तम बक्षीसें त्यांनीं मिळविलीं. वरील ग्रंथांतील कित्येक भाग त्यांस तोंडपाठ ह्मणतां येत असत. या समयास अवघे १२ वर्षांचे असतांना—त्यांस संस्कृत भाषा चांगली अस्खलित बोलतां येत असे. यांचें नागरी हस्ताक्षर फार उत्कृष्ट असे. स्वच्छ वळणदार अक्षराबद्दल त्यांस नेहमीं बक्षिसें मिळत. कित्येक दुर्मिळ संस्कृत ग्रंथांच्या त्यांनीं हस्तलिखित नकला केलेल्या आहेत. त्यांतील मोत्यासारखें सुंदर अक्षर अद्याप बिनतोड आहे. आपले इकडे पूर्वी फक्त मोडी पुस्ती पाहून मुलगी देत. त्याचप्रमाणें सुरेख अक्षरावर प्रसन्न होऊन, व शिवाय संस्कृत ज्ञान अवलोकन करून, शत्रुघ्न भट्टाचार्य यांनीं आपली ८ वर्षांची कन्या श्रीमती दीनमाई देवी ईश्वरचंद्रास त्यांचे चौदाव्या वर्षी अर्पण केली. गरीब स्थितींत अल्पवयांत लग्न होणें हें चांगल्या अध्ययनाचें फल होय. असो; पंधराव्या वर्षी ईश्वरचंद्र साहित्यशास्त्राच्या वर्गात चढले. या वर्गाचे अध्यापक प्रेमचंद्र तर्कवागीश हे व्याकरण, काव्य, अलंकार, हे विषय शिष्यांना पढविण्यांत प्रवीण असत. वर्गातील साऱ्या मुलांत ईश्वरचंद्र

वयानें लहान खरे, पण भारी हुषार असत. त्यांनीं अवघ्या एका वर्षांत साहित्यदर्पण, काव्यप्रकाश, व रसगंगाधर व आणखी कित्येक अलंकारशास्त्रावरील ग्रंथ झपाटून टाकिले. वार्षिक परीक्षेंत पहिलें नांव येऊन, ७ संस्कृत ग्रंथ बक्षीस मिळाले, खेरीज रोख दक्षिणा मिळाली ती वेगळी.

शाळा सुटल्यावर घरीं जायाचे पूर्वीं, ईश्वरचंद्र दररोज तारानाथ तर्कवाचस्पति यांजपाशीं साहित्यदर्पण वाचीत. एकदां तत्कालीन नामांकित नैय्यायिक जयनारायण तर्कपंचानन वाचस्पतीकडे आले होते. येथें ईश्वरचंद्र नित्यक्रमानुरूप आधींच अलंकार ग्रंथ वाचीत बसले होते. सुबोध वाचन ऐकून तर्क पंचाननानी ईश्वरचंद्रास कांहीं प्रश्न पुसले. त्यांचीं बिनचुक, समर्पक व समाधानकारक उत्तरें मिळालेलीं पाहून पंचानन सुप्रसन्न झाले, त्यांनीं मान डोलाविली आणि ह्मणाले, ' हा मुलगा बंगाल्यांत एक मोठा नामांकित पंडित होईल ' यांत कांहीं संदेह नाहीं. हें या महापंडिताचें भविष्य खरें झालें. या सुमारास ईश्वरचंद्रास ८ रुपये दक्षिणा मिळूं लागली. ही ते वडिलांकडे धाडीत. ठाकूरदासांच्या मनांत ईश्वरचंद्रानीं पुढें टोलनामक विद्याश्रम स्थापावा. त्यासाठीं ते जमिनी व शेतें, या दक्षिणेच्या द्रव्यानें, थोडथोडीं खरेदी करूं लागले. हें झाल्यावर त्यांनीं विद्यासागरास दुर्मिळ व मौल्यवान् संस्कृत ग्रंथांचे हस्तलेख विकत घेऊन ठेवण्यास सुचविलें. वडिलांच्या आज्ञेप्रमाणें त्यांनीं पुष्कळ जुनाट संस्कृत लेखांचा मोठ्या आस्थेनें संग्रह केला. पैकीं कांहीं पुराणीं हस्तलिखितें अद्याप त्यांच्या ग्रंथालयांत कायम आहेत.

नंतर ईश्वरचंद्र न्याय व वेदांत या शास्त्रांचे दोन वर्ग ओलांडून एकदम स्मृतिशास्त्राचे वर्गांत शिरले. आणि ज्या वर्गांत, न्याय व वेदांत पढलेल्या विद्यार्थ्यांना, मिताक्षरा, दायभाग व मनुसंहिता यांसारखे अवघड ग्रंथ पढण्यास तब्बल दोन तीन वर्षें लागत, तेथें ईश्वरचंद्रास अवघे सहा महिने बस झाले. यावेळेस— ७ व्या वर्षीं—त्यांनीं मनुसंहिता समग्र तोंडपाठ केली. नुसती पोपटपंची नव्हे, तर वाटेल त्या श्लोकाचा अर्थसुद्धां फार समाधानकारक रीतीनें सांगत. अभ्यासाची

असली ही दांडगी तयारी पाहून, सहाध्यायींचें काय, पण तत्कालीन महापंडितही, तोंडांत बोटें घालून राहिले!

आतां संस्कृत शाळेंतील दोन वर्ग बाकी उरले. वेदांत व न्याय. १९ व्या वर्षी ते वेदांतशास्त्राच्या अभ्यासास लागले, व तेंही त्यांनीं यथासांग यथावकाश अभ्यासिलें. वेदांत वर्गाच्या अखेरच्या परीक्षेंत गद्यपद्यात्मक संस्कृत निबंध-लेखनाचा विषय ठेविलेला असे. ह्या दोन निबंधांस प्रत्येकीं ह्मणजे गद्यास व पद्यास १०० रुपयांचें बक्षीस ठेविलेलें असे. ज्याची निबंधरचना उत्तम ठरेल त्यास हें इनाम मिळायाचें. प्रत्येक निबंधास तीन तासांचा वेळ असे. १० ते १ गद्य व १ ते ४ पद्य. ईश्वरचंद्रास वाटलें कीं, आपल्याला चांगला निबंध लिहितां येणार नाहीं, कांहीं नाहीं, मग परीक्षेला बसण्यांत काय हंशील? बसूं नये हें बरें. असें ह्मणून वर्गांत जाऊन तो स्वस्थ बसला. परीक्षेच्या रंगणांत ईश्वरचंद्र नाहीं, असें पाहून प्रेमचंद्र तर्कवागीश आपल्या लाडक्या शिष्यास शोधूं लागले. पहातात तों, स्वारी वर्गांतील एका कोपऱ्यांत चूपचाप बसली आहे. अखेर गुरुजींनीं दोन गोष्टी समजुतीच्या सांगून, ईश्वरचंद्रास १२ च्या सुमारास परीक्षेच्या पटांगणांत आणून बसविलें. मुलगा मारूनमुटकून सजविलेला होता, व वेळ जेमतेम तिसऱ्या हिशानेंही राहिला नव्हता. गद्य निबंधाचा विषय 'प्रामाणिकपणा' हा होता. ईश्वरचंद्रानें तासाभरांत कसातरी निबंध भरकटला. पण नवल पहा, नंबर पहिला.

वेदांत विषयाचा अभ्यासक्रम आटोपल्यानंतर, ईश्वरचंद्र न्याय-शास्त्राचे वर्गांत बसले. येथेंसुद्धां पूर्वक्रमाप्रमाणें त्यांनीं वर्गांत श्रेष्ठस्थान संपादिलें व पुनः दोन्ही निबंधांत मिळून दोनशें रुपये बक्षीस मिळविलें.

याप्रकारें संस्कृत विद्यालयांतील सर्व शिक्षणक्रम संपूर्ण झाल्यानंतर, तत्रस्थ विद्याधिकाऱ्यांनीं ईश्वरचंद्रास मोठ्या समारंभानें **विद्यासागर** ही बहुमानाची व त्यांस अगदीं योग्य अशी पदवी अर्पण केली. ह्यावेळीं यांचें वय सगळें वीस वर्षांचें होतें. येवढ्या अल्पवयांत साऱ्या शास्त्रांचें आलोडन करणें ह्मणजे सामान्य गोष्ट नव्हे, पण ईश्वरचंद्राची बुद्धि फार प्रखर व मेहनत जबरी. या दोन साधनांच्या संयोगामुळें त्यांस येवढा विद्यापर्वत आटोपला, व त्याचे शिखरीं ते विराजमान झाले.

---

## राजसेवा.

'फारचि वरी निरय गति, परवशता शतगुणें करी जाच.'

हें मोरोपंतांनीं जें ह्मटलें आहे, तें अक्षरशः सत्य आहे. पण ह्या भरतभूमीस परकीयांचे पाय लागल्या दिवसापासून, सेवाधर्मास मोठा सन्मान प्राप्त झाला आहे; गुलामगिरीची फार बडेजावी वाढली आहे. वैद्यकविषयसंपन्न माणूस सरकारी नोकरी करायाची नसल्यास, औषधालय स्थापून, दवा विकून, निर्वाह करितो. कायदेपंडितास मुनसफी भावत नसली, तर भांडकुदळ लोकांस अवजड पुस्तकांतून कायद्याची पोक्त सल्ला देऊन, स्ववृत्ति चालवितां येते. पण याहीपेक्षां उत्तम प्रकारें धर्माचरणास न सोडितां, विद्यासागर यांस एखादा नवा विद्याश्रम स्थापून, कुटुंबपोषण करितां आलें असतें. ईश्वरचंद्रांनीं टोल नामक जेवणाच्या व राहण्याच्या बंदोबस्ताची अशी फुकट शाळा स्थापून, पुण्यकर्मांत आपलें आयुष्य घालवावें, अशीच त्यांचे वडिलांची इच्छा होती; व त्याप्रमाणें त्यांनीं शेतीवाडीची व पोथीपुस्तकांची थोडीशी जुळवाजुळवही करविली होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. पण इंग्रेजी अंमलांत वक्तशीर वेतन, व नोकरांना नसती प्रतिष्ठा मिळत असल्यामुळें, जे उठले ते सर्व चाकरीकडे वळले. जी गुलामगिरी जात्याच केवळ अप्रतिष्ठेची खाण, तीच मोठ्या बडेजावीची जागा होऊन राहिली आहे. दोनदा ठेंच लागून, जेव्हां चांगला अनुभव आला, तेव्हां ईश्वरचंद्रास चाकरीची पुर्ती किळस आली, व ते लोककल्याणाचे कामास आले.

संस्कृत कॉलेजांतली अत्युच्च पदवी मिळविल्यानंतर, ईश्वरचंद्र सन १८४१ त फोर्ट विल्यम कॉलेजांत ५० रुपयांवर हेड पंडित झाले. ह्या वेळीं आंग्ल भाषेचे ज्ञानाची अवश्यकता भासल्यामुळें, त्यांनीं इंग्रेजीचा अभ्यास सुरू केला. सुप्रसिद्ध देशाभिमानी व नाणावलेले

दक्ते बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांचे वडील डॉ० दुर्गाचरण हे विद्यासागरांस इंग्रजी शिकवीत. बुद्धि तल्लख पडल्यामुळें, ते अल्पकाळांत पुष्कळ इंग्रजी शिकले; त्यांनीं विश्वविद्यालयांत उपपदधाऱ्यांपेक्षां जास्त इंग्रजी भाषाज्ञान संपादिलें. इ० स० १८४६ त त्यांस संस्कृत कॉलेजच्या असि० सेक्रेटरीची जागा मिळाली. या समयास त्यांनीं संस्कृत कॉलेजांत भारी सुधारणा केल्या. उत्तम शिस्त बसविली, सारा अनियमितपणा मोडून टाकिला, पुष्कळ वाईट प्रघात अजीं बंद केले, आणि नव्या चांगल्या व्यवस्था अमलांत आणिल्या. पण यांपैकीं कित्येक गोष्टी एज्युकेशन कौन्सिलास पटल्या नाहींत. तेव्हां हा अपमान या मानी पुरुषास सहन न होऊन, त्यानें लागलाच राजीनामा दिला. चांगलें असो कीं वाईट असो, सत्यासत्य बिलकुल न पाहतां, वरिष्ठ अधिकाऱ्यांस रुचतील असेच रिपोर्ट खरडावयाचे, व त्यांना पसंत पडतील अशाच सुधारणादि व्यवस्था कायम करावयाच्या इत्यादि धूर्तपणाच्या व सावधगिरीच्या कुशल कल्पना ईश्वरचंद्रास मुळींच माहीत नव्हत्या. पं० रसमायादत्त व मिस्टर मोवट यांनीं राजीनामा माघारी घेण्या विषयीं विद्यासागरास पुष्कळ आग्रह केला, पण त्यांनीं कोणाचें ऐकिलें नाहीं.

इ० स० १८४९ त ते फिरून फोर्ट विल्यम कॉलेजांत ८० रु० वर हेड रायटर राहिले. पुढें '५० त संस्कृत कॉलेजांत संस्कृत वाङ्मयाचे विद्यागुरु झाले. रसमायादत्त यांनीं राजीनामा दिल्यावर ईश्वरचंद्र संस्कृत कॉलेजचे सन १८५५ त प्रिन्सिपाल झाले. ज्या विद्यालयांत विद्या मिळाली, त्याच ठिकाणीं प्रिन्सिपाल परांजप्यांप्रमाणें, अध्यक्षस्थान मिळविणें मोठें भूषणास्पद आहे. प्रिन्सिपालचे कामाखेरीज त्यांस ४ जिल्ह्यांच्या स्कूल इन्स्पेक्टराचें काम मिळालें. दोन्ही हुद्दे संभाळितां, त्यांस ५०० रु० दरमहा पडे. ते स्वतः फार विद्वान् होते. शिवाय स्वदेशांतील लोक विद्येच्यायोगानें सुबुद्ध व्हावेत, अशी त्यांची उत्कट ईच्छा होती. कामाकाजाची माहिती फार नामी असल्यामुळें विद्याविषयक कित्येक सूचना, वृत्तांत व निबंध शाळाखात्याचे प्रकरणासंबंधानें त्यांनीं फार उत्तम लिहून

ठेविले आहेत. शाळांतील मुलांशीं व खात्यांतील विद्यासेवकांशीं ते फार सभ्यतेनें व ममतेनें वागत. या सर्व गुणांमुळें ईश्वरचंद्र लोक-शिक्षणसूत्रधार होण्यास पूर्ण लायक होते. पण नेटिव कलेक्टरनें दुष्काळांत गरीब प्रजेबरोबर फाजील ममतेनें वागणें, अगर एज्युकेशन स्कूल इन्स्पेक्टरानें शाळापंतोजींशीं नुसतें सभ्यतेनें बोलणें ह्मणजे कलेक्टरी वा इन्स्पेक्टरी आपल्या हातानें दवडणें होय.

असो; ही राजसेवा ईश्वरचंद्रानीं थोडीं वर्षें केल्यावर, सन १८५८च्या अखेरीस, अरेरावी वरिष्ठांशीं न पटल्यामुळें, पुनः नोकरीचा राजीनामा दिला. हा परत घेण्याबद्दल प्रांताधिपतीनीं विनविलें असतांसुद्धां, त्यांनीं आपला झाला निश्चय सोडिला नाहीं. तथापि अखेरपर्यंत राजपक्षीय विद्याधिकारी विद्यासंबंधीं बाबतींत ईश्वरचंद्राची सल्ला मागत असत. आणि लोककल्याणाकडे नजर पुरवून ते मोठ्या आस्थेनें नेहमीं खरी मसलत देत असत. परमेश्वराच्या मनांतून ईश्वरचंद्रानीं नोकरीपेक्षां अधिक प्रतिष्ठादायक उद्योगांत, व लोकहिताच्या कामांत, विद्या व अनुभव यांहींयुक्त असें आपलें अवशिष्ट आयुष्य घालवावें, व तेणेंकरून त्यांच्या ज्ञानाचा व वयाचा स्वदेशबांधवांस फायदा मिळावा असें होतें. ह्मणूनच त्यांस वेळोवेळीं ताडकन् राजीनामा देऊन टाकण्याची तडफ साधून गेली, व शेवटचीं परिपक्व अशीं उमदीं ३३ वर्षें त्यांनीं अत्यंत पुण्यप्रद अशा देशसेवेंत घालविलीं. सुमारें १७ वर्षें नोकरी, तर पुढें त्याचे दुप्पट ह्मणजे ३३ वर्षें लोकसेवा, असा पुण्य योग किती पंडितांस साधला असेल बरें! अप्रतिष्ठा होण्याचा प्रसंग येऊन ठेपला असतां मग त्या ठिकाणीं क्षणभरही न ठरणारा असा पुरुष फक्त ईश्वरचंद्रच. आपला योग्य सन्मान राहत नाहीं असें भासतांच, या तेजस्वी पुरुषानें लागलाच राजीनामा द्यावा, असा दोनदा प्रकार झाला. नाहींतर पेन्शनची मुदत पार टळून गेली असतांही, केवळ बड्या तनख्याकडे द्रष्टि देऊन, गुलाम-गिरीच्या गटारांत लाथा खात पडणारे, व परदास्याची सीमा मुद्दाम वाढवून घेण्यासाठीं धडपडणारे, आमचे इकडे काय थोडे शहाणे होऊन गेले?

---

# ग्रंथरचना.

| | |
|---|---|
| इ० स० १८४१ | जीवनचरित. |
| ४२ | वासुदेवचरित. |
| ४७ | वेतालपंचविंशति. |
| ४८ | महाभारत. |
| ४८ | बंगालचा इतिहास. |
| ५१ | उपक्रमणिका-व्याकरण. |
| ५१ | बोधोदय. |
| ५४ | शकुंतला. |
| ५५ | विधवाविवाह-विचार. |
| ५६ | वर्णपरिचय भाग १. २. |
| ,, | कथामाला. |
| ,, | चरितावलि. |
| ५८ | सर्वदर्शनसंग्रह. |
| ६२ | सीतावनवास. |
| ६३-६४ | आख्यान मंजरी उत्तर चरित भ्रांतिविलास. ( ४ तासांत ) रचिला |
| ६६ | ऋजुपाठ भाग १. २. ३. |

ईश्वरचंद्र हे उत्तम ग्रंथकार होते. यांस वंग भाषेचे जनक ह्मणतात. यांना पूर्ववयांत गीर्वाण भाषेंत गद्यपद्यरचना करण्याचा छंद होता; पण तो अभ्यास त्यांनीं पुढें फारसा वाढविला नाहीं. मग त्यांनीं स्वभाषेच्या शुद्धतेकडे व तिच्या अभिवृद्धीकडेच मुख्यतः लक्ष्य पुरविलें. यांनीं देशी भाषेंत अनेक ग्रंथ लिहून तीस ऊर्जितकळा आणिली. त्यांचे हयातीपर्यंत व मागाहून देखील पुष्कळ चांगले ग्रंथकार झाले. पण ईश्वरचंद यांचा लेखनकलेंत पहिला मान अद्यापि अबाधित कायम आहे. यांनीं रचिलेल्या विविध ग्रंथांत ‘ वासुदेवचरित, ’ ‘ विधवाविवाह ’ व ‘ सीतावनवास ’ हे ग्रंथ फार सुंदर साधले आहेत; त्यांतही ‘ विधवाविवाह ’ पुस्तकाची योग्यता विशेष आहे.

राजाराम मोहनराय, अक्षय कुमारदत्त, बंकिमचंद्र चाटर्जी वगैरे गद्यग्रंथकार नामांकित होऊन गेले. पण लोकांची धारणाशक्ति, अभिरुचि इत्यादि गोष्टी ध्यानांत वागवून, लोकोपयोगी सुबोध ग्रंथ रचिले असे विद्या-

| | |
|---|---|
| ६९ मेघदूत राम-राज्याभिषेक. | सागरांनींच बंगाली वाङ्मयाच्या वृत्तीवर त्यांनीं ३० वर्षें मोठ्या थाटांत काढिलीं. त्यांचें एकट्या पुस्तकविक्रीच्या बाबीचें उत्पन्न दरमहा तीन ते चार हजार रुपये-पर्यंत येत असे. |
| ७१ बहुविवाह विचार. | |
| ७२ ,, पुरवणी. | |
| मुग्धबोध ( बं. सं. व्याकरण ) | |
| व्याकरणकौमदी. | |
| संस्कृतभाषा प्रस्ताव | |
| कादंबरी. | |
| वाल्मिकीरामायण. | |

## हा वृत्तांत लिहिण्याचा हेतु.



चरित्रनायकाच्या ज्या पराक्रमामुळें लेखकास हा वृत्तांत लिहिण्याची प्रेरणा झाली, तो येथपर्यंत वर्णिलेला बुद्धिपराक्रम नव्हे; किंवा राजसेवातत्परता नव्हे. वृत्तांत लिहिण्यास इतक्या दूरच्या प्रांतांतील मनुष्याची जी निवड केली, ती त्याच्या नुसत्या बुद्धिवैभवास भुलून नव्हे. कारण, प्रत्यक्ष विद्यादेवी ज्यांना प्रसन्न— साक्षात् सरस्वती ज्यांच्या जिव्हाग्रीं वास करीत होती— असे सुधारकबृहस्पति इकडे महाराष्ट्रांत काय थोडे होऊन गेले? पण कष्टार्जित विद्येचें आणि विद्यार्जित द्रव्याचें एकानें तरी चिज करून दाखविलें काय?

१ ईश्वरचंद्राची आई भगवतीदेवी फार दयाळु होती. स्वतः जातीनें अन्न शिजवून गोरगरीबांना आपल्या हातानें वाढून देणें, भिकाऱ्यांना चिरगुट पांघरूण वाटणें, इत्यादि तिच्या नित्यपरिपाठांतल्या गोष्टी पडून गेल्या होत्या. हीच दयाबुद्धि अतिशय वाढत्या प्रमाणावर ईश्वरचंद्रास, भगवती देवीकडून, प्राप्त झाली होती. ती इतकी कीं, बंगाल्यांतील अखिल कंगाल लोक ईश्वरचंद्र विद्यासागर यांस दयासागर ह्मणत असत. विद्येच्या जोरावर जेवढा वित्तविषय जोडिला, तेवढा सर्व परोपकाराच्या कामास लाविला. दयाबुद्धीच्या प्रभावामुळें, हीं मायलेक सर्वांस सारखीं प्रिय झालीं. ह्यांनीं पुढील वयांत मिळविलेला सर्व पैसा गरीब लोकांवर उपकार करण्यांत पार खलास केला, येवढेंच नव्हे, तर प्रसंगीं त्यांस ऋण काढावें लागे, व तदनुषंगिक अपमानही सहन करावा लागे; तरी पण मरे तागायत त्यांनीं परोपकार टाकिला नाहीं.

---

# पुनर्विवाहकार्योत्तेजक गोष्टी.

बंगाल्यांतील सुप्रसिद्ध सुधारक राजा राममोहनराय यांनीं सतीची— ह्मणजे मृतपतीच्या चितेवर त्याचे पत्नीनें क्रव्यादाग्नीच्या ज्वाळेला स्वतःचा बळी देण्याची—अमानुष चाल बंद केली. त्याप्रमाणेंच ईश्वरचंद्र यांनीं, असंमत वैधव्यानलांत विधवा मुलींना आजन्म होरपळत पडूं देण्याची दुष्ट चाल काढून टाकून, तिच्या ऐवजीं बाळविधवांचा पुनर्विवाह करण्याची नवीन, सुरेख चांगली चाल घालून दिली. ईश्वरचंद्र अंतःकरणाचे भारी मवाळ व कनवाळु असल्यामुळें, विधवांचीं विविध दुःखें त्यांच्याच्यानें बिलकुल पाहवेनात. आपल्या बायकामुलांच्या सोयीसाठीं, विधवाभगिनींना निरंतर यातना भोगीत ठेवणें त्यांना मुळीं खपेना. विधवांच्या हालअपेष्टा त्यांच्या दृष्टीस पडल्या कीं, त्यांचा जीव कसा माशासारखा तळमळे. ह्या जगांत साधारणतः असा प्रकार आढळतो कीं, ज्याला त्याला आपल्या पोळीवर तूप हवें असतें; दुसरा परका माणूस कोरडी कां खाईना, किंवा त्यास मुळींच न मिळेना; परका उपाशीं मेला तर याचें काय गेलें? परदुःख शीतल आहे. पण अशी विद्यासागरांची गोष्ट नव्हती. ते 'परदुःखेन दुःखित' होऊन विव्हळत, जणूं काय, त्यांनाच खुद्द दुःखाच्या वेदना होत आहेत. ही विधवांविषयींची कींव अगदीं लहान वयांतच त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली होती, अशाबद्दल तीन चार आख्यायिका आहेत, त्या येथें कथन करितों.

१ ली गोष्ट. वीरसिंह येथें त्यांच्या गांवीं त्यांची एक खेळगडीण होती. ही त्यांची फार आवडती मैत्रिण होती. पुढें हे थोडेसे मोठे झाल्यावर कलकत्त्यास संस्कृत कालेजांत शिकावयास गेले. नंतर सुट्टीमध्यें एका खेपेस आपले वीरसिंह गांवीं परत आले; तों त्यांस

समजलें कीं, आपल्या प्रिय सोबतीणीचें लग्न झालें. परंतु थोड्याच दिवसांनीं तिचा पति मरण पावला, आणि ती गतभर्तृका झाली. ही बातमी ऐकून त्यांस अतिशय दुःख झालें. ते तसेच तावडतोब तिच्या बिऱ्हाडीं तिची भेट घेण्यास निघाले. तेथें त्यांस कळलें कीं, या बालविधवेनें निरशन केलें आहे. कां तर त्या दिवशीं एकादशी पडली होती. येवढ्या लहान वयांत वैधव्य व तत्संबंधी उपास तापास त्या अनाथ पोरीच्या पाठीमागें एव्हांपासून लागलेले पाहून ईश्वरचंद्रास कसेसेंच झालें. त्यांस पोटांतून भडभडून आलें, त्यांस जें दुःख झालें तें सांगतां पुरवत नाहीं. तेव्हां त्यांनीं तेथेंच तत्क्षणींच ह्या दुःखाचे निवारणार्थ स्वतःचा देह झिजवायाचा असा दृढ निश्चय केला. या वेळीं यांचें वय अवघें १३।१४ वर्षांचें होतें. येवढ्या लहान वयांत खुद्द विधवांनादेखील त्यांच्या स्वतःच्या दुःखाची कल्पना असेल नसेल. तेव्हां इतक्या अल्प वयामध्यें ईश्वरचंद्राला दीन विधवांची करुणा येणें ही ईश्वराचीच करणी ह्मटली पाहिजे.

२ री गोष्ट. ईश्वरचंद्र संस्कृत कॉलेजांत विद्यार्थी होते. त्या वेळीं त्यांच्या एका विद्यागुरूची गृहिणी मरण पावली. तेव्हां गुरूंनीं गतानुगतिक रीतीस अनुसरून आपला दुसरा विवाह केला. बरें, करून केला, तो तरी एखादी साधारण सुशिक्षित व प्रौढ मुलगी पाहून करावा, पण तेंसुद्धां पत्करलें नाहीं; तर लखलखीत चांगली नात शोभेल, अशा अगदीं अल्पवयस्क परकरावरोबर! असल्या विवाहांत वधूवरांच्या वयांत अंतर अतोनात राहिल्यानें, वधू एक तर अल्पायुषी तरी झाली पाहिजे, ह्मणजे तिला सौभाग्यपणीं मरण येऊन जुन्या समजुतीप्रमाणें तिचें सोनें तरी व्हावयास पाहिजे, नाहींतर तिला हटकून विधवा तरी झालें पाहिजे, तिसरी घडगत नाहीं! गुरु मजकुरांच्या प्रकरणीं असा प्रकार झाला कीं, त्यांनीं यमाजीभास्करांचें घर गाठिलें, व आपल्या लहानग्या लाडक्या स्त्रीस विधवा करून ठेविलें. विद्यालयांतील गुरूंची खासगी वागण्याची तऱ्हा कशी असते, या गोष्टी-

कडे यच्चयावत् छात्रवर्गाची स्वभावतःच सकौतुक दृष्टि असते, मात्र गुरु या गोष्टीचा धाक बाळगीत नाहींत हा प्रकार वेगळा. हेच विद्यार्थी जरा धिटकुले असल्यास आपसांत असल्या गुरूंची गप्पागोष्टींत कुचेष्टा करण्यास आणि टर उडविण्यास चुकत नाहींत. आणि ते कट्टे सुधारणाभक्त असल्यास पत्रपुस्तकद्वारें त्यांजवर कडक टीका करण्यास काडीमात्र कमी करीत नाहींत. पण हें एकमार्गी पुस्तककीटकांचें काम नव्हे. ह्याला चांगला अष्टपैलू चेला लागतो. गुरूंच्या असल्या बाष्कळ कृतींतील ठळक चूक त्यांनीं आपण होऊन स्वसंतोषानें जरी **उपपत्तिपूर्वक** कबूल केली नाहीं, तरी ती गाढवाएवढी ढोबळ चूक ते आयतीच आपले मृतशरीरास अग्निसंस्कार करवून घेऊन, व स्वस्त्रीच्या जिवंत शरीराच्या शिरोभागास नापित-क्षुरासंस्कार करवून **प्रयोगद्वारा** सिद्ध करून देतात. तेव्हां **बालविधवा** ह्मणजे थेरड्यांच्या गाढवपणाच्या **स्वयंस्मारकाचा** चालता बोलता **पुतळाच** होय असें मानण्यास काय हरकत आहे? मरणानंतर जर हे **गाढव** पिशाचाचा जन्म घेऊन, आपल्या प्रियपत्नीची स्थिति पहातील तर त्यांना सारा तमाशा दृष्टीस पडेल. घरांत सर्व स्थिति अनुकूल असून स्वस्त्रीला एकवेळ अन्न आणि नेसण्यास एकच एक जाडेंभरडें वस्त्र, व तेंही कळाहीन. दागिन्याचें तर नांवसुद्धां नाहीं. तिनें सदासर्वदा परक्याचे कष्ट करावेत, व त्याबद्दल बक्षीस ह्मणून सरसकटा सगळ्यांनीं खांडगळी शिव्या द्याव्यात. फुकटचा सुखाचा शब्दही नाहीं. प्रत्येक गोष्टीवर सत्ता असून, कोणत्याही गोष्टीवर काडीचीही सत्ता नाहीं. तेव्हां उरली स्वाधीनची गोष्ट येवढीच कीं, पूर्वजन्मींच्या पापांची आठवण काढून, गुडघ्यांत डोकें अडकवून, कोणास नकळत, डोळ्यांतून टिपें गाळीत, दुर्दैवाची कहाणी गात बसावें. तात्पर्य, अशा स्थितींत या पिशाचास आपली पूर्वाश्रमींची पत्नी जिवंतपणींच हडळ झालेली दृष्टीस पडल्यावांचून रहाणार नाहीं. पिशाच झाला ह्मणून काय झालें? त्यास काय बरें वाटेल? असली अमंगळ अवस्था पाहून त्याला काय **संतोष** होईल? मुळींच नाहीं. स्वपत्नीनें आपले पश्चात् पुनर्विवाह करून सुखानें

कालक्रमणा करावी, असा सुविचार जरी न सुचला, व मृत्युपत्रांत ही गोष्ट, अगर वपननिषेधादि मजकूर यद्यपि नमुद न केला, तरी ती सुस्थितींत असावी, तिला खाण्यापिण्याची, वस्त्रप्रावरणाची आणि अनुकूळ तेवढ्या दागिन्यांची वाण न पडावी येवढें हें खास वाटेल. कारण पिशाच झाला तरी तो कांहीं मळमूत्र भक्षण करीत नाहीं. त्यास साधारणपणें अर्पण होत असलेल्या स्वादिष्ट पदार्थांवरून त्याची आवडनिवड जन्मांतरानें पालटली, असें कोठें आढळांत येत नाहीं. अस्तु; जेव्हां गुरूचें दुसरें लग्न ल्हान मुलीशीं झालें, तेव्हांच ईश्वरचंद्रास अत्यंत खेद झाला होता. कारण ते एकमार्गी अजागळ गरीब विद्यार्थी नव्हते. तर सुधारणाप्रिय, सुशिक्षित तरुण विद्यार्थ्यांत त्यांची अग्रत्वानें गणना होती. व जेव्हां हीच मुलगी-गुरुपत्नी-विधवा झालेली त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहिली, तेव्हां त्यांचे दुःखावेगास पारावर नाहींसा झाला. ते एकसारखे डोळ्यांतून अश्रू ढाळूं लागले. त्यांच्या कोंवळ्या व दयाळु अंतःकरणास मुकाट्यानें स्वस्थपणीं हें दुःख पहाणें सहन होईना. पुष्कळ लोक दुःखें गिळून टाकितात व पुढील प्राप्तक्रमास लागतात. कसें, त्यांनाच ठाऊक; + पण तसें ईश्वरचंद्राच्यानें घडेना. तेव्हां ह्या दुःखांचा प्रतीकार करावयाचाच असा त्यांनीं कृतसंकल्प केला.

गोष्ट ३री. ईश्वरचंद्र कलकत्ता येथें संस्कृत विद्यालयांत विद्यार्थी असतांना, असेच एकवेळ सुट्टीच्या दिवसांत, आपल्या वीरसिंह गांवीं गेले. तों त्यांस समजलें कीं, एका बाळबोध भिक्षुक घराण्यांतील बाळपणींच विधवा झालेल्या कोणा बाईला एका अधम व पाजी नरपशूची कुसंगत लागून ती बिघडली, तिचें वांकडें पाऊल पडलें; तो नामानिराळा राहिला, तो नराधम अजीबाद सुटला. पण बाई मुद्देमाल सांपडली. ह्या खराब सोबत्यापासून बाईस असा फायदा झाला कीं, नवस न करितां, सोन्यासारखें लेंकरूं होण्याचा अनायासें योग जुळून

---

+ दुःखें गट्ट करण्याची, व नाहीं त्या हालअपेष्टा सोसून घेण्याची, एकंदर ब्राह्मण स्त्रीपुरुषांना पूर्वीपासून खोडच लागून गेली आहे असें ह्मणावें लागतें. उपाय काढील तो पापी, दुराचारी व धर्मद्रोही.

आला; ही विधवा बाई गरोदर राहिली. देवाची करणी तरी किती विचित्र! ज्या सुवासिनी स्त्रिया वडपिंपळांचे पार झिजवितात, देवादिकांस प्रदक्षिणांच्या लाखोल्या घालितात, नाहीं त्या देवतांना नाहीं तसले नवस करितात, त्या सौभाग्य बायांचें गाऱ्हाणें देव मुळींच ऐकत नाहीं. आणि विधवाबायांना लोकलज्जेस्तव मूल नको असतें, पण त्यांचें वाकडें पाऊल पडण्याची जणूं वाटच काय पहात असतो. पाप घडण्याचा उशीर कीं, त्यांना प्रायश्चित्त हें हटकून ठेवलेलें. जिला मूल नको असतें, तिला देव आदरून देतो. मग ती गर्भ नष्ट करण्याचे औषधोपाय चिंतीत असते. तरी देव ऐकत नाहीं. अस्तु; पूर्वोक्त विधवाबाई जेव्हां गरोदर राहिली, तेव्हां तिनें वैद्यशास्त्रोक्त रीतीप्रमाणें गर्भपात करण्याचीं पुष्कळ औषधें घेतलीं, पण गुण पडला नाहीं. सरतेशेवटीं बाई बाळंत झाली, पुत्ररत्न प्रसवली; पण काय उपयोग? चोरीचा माल. याची काय वाट लावावी, याचें तिला फार भय पडलें. मोठी चिंता प्राप्त झाली. मग अंमळ विचार केल्यावर कांहीं वेळानें ती मागीलदारीं परसांतील बागेंत गेली. तेथें अगदीं एकीकडे, कोंपऱ्यांत, कोणाला न कळत, आपल्या पोटच्या गोळ्याचा गळा दाबून तिनें त्याचा प्राण घेतला. काय हें क्रूर राक्षसिणीचें कृत्य!

गोष्ट ४ थी. लहानपणीं संस्कृत पाठशाळेंत शिकत असतांना, विधवापुनर्विवाहप्रतिबंधाचे दुष्परिणाम अनेक वेळां त्यांचे दृष्टीस पडले. पण कार्यारंभ झाला नाहीं. ही फक्त पुढल्या कामाची सामग्री झाली येवढें ह्मणतां येईल. त्यांच्या मातोश्रीनें जेव्हां प्रोत्साहन दिलें, तेव्हां कोठें पुनर्विवाह प्रश्नाच्या संस्थापनेला खरा प्रारंभ झाला. तो प्रकार फार चित्तवेधक आहे. एकदा कोणी एक अतिशय अल्पवयस्क विधवा मुलगी श्रीमती मातोश्री भगवती देवी इच्याकडे कांहीं कामानिमित्त आली. देवी माजघरांत होती. ओसरीवर ईश्वरचंद्र व त्यांचे वडील बंद्योपाध्याय ठाकूरदास असे उभयतां पितापुत्र बोलत बसले होते. देवीकडे आलेल्या विधवा बालिकेचें काम

संपल्यावर ती तेथून निघून आपल्या घरीं परत गेली. पण तिची ती करुणा आणणारी, व दगडासमुद्धां पाझर फोडणारी, अशी दीन व उदास मूर्ति भगवती देवीच्या अंतःकरणांतून गेली नाहीं. त्या पोरीचें तें पांढरें फटफटीत कपाळ व तो बुच्चा गळा पाहिलेला आठवून देवीला फार वाईट वाटलें. तिच्या डोळ्यांस खळकन् पाणी आलें. ती तशीच ओसरीच्या दाराशीं आली, व ईश्वरचंद्रास ह्मणाली--" हे ईश्वरा, तूं संस्कृत पुष्कळ शिकला आहेस, शास्त्रपुराणांत चांगला जाणता आहेस, व वेदविद्येंत मोठा निपुण आहेस, असा तुझा सर्वत्र भारी लौकिक ऐकितें. पण कायरे, आपल्या शास्त्रांत येवढ्या लहान वयाच्या विधवा मुलींच्या पुनर्लग्नाला तुला आजपर्यंत कोठें कसला सुद्धां आधार सांपडला नाहीं काय? आपलें पूर्वीचें ऋषिमंडळ फार दयाळु होतें. स्मृतिशास्त्रकर्ता मुनिवर्ग अतिशय न्यायी व निःपक्षपाती होता. तेव्हां त्यांनीं धर्मशास्त्रांत बालविधवांविषयीं मात्र पक्षपात केला असेल, हें मुळींच संभवत नाहीं असें मला निदान वाटतें. " आपल्या प्रिय व परमपूज्य मातोश्रीच्या प्रश्नाचा रोंख लक्षांत घेऊन, व दीन विधवांची अत्यंत हीन स्थिति ध्यानांत आणून, आणि मातोश्री भगवती देवीची आज्ञा शिरसावंद्य करून, विद्यासागरांनीं प्रतिज्ञा केली कीं, आतां कंबर बांधून, डोळे नीट उघडून, पराकाष्ठेची काळजी घेऊन, शास्त्रशोधन करावयाचें; तोंपर्यंत विश्रांति ह्मणून कसली ती बिलकुल घ्यावयाची नाहीं. असा ह्या साधु पुरुषानें, ह्या मातृभक्तानें, आणि गतभर्तृकांच्या ह्या कट्टया कैवाऱ्यानें दृढ निश्चय केला. ' निश्चयाचें बळ ' तुका ह्मणें ' तेंचि फळ. '

---

# पुनर्विवाहशास्त्रशोधन.

कोणती एखादी गोष्ट नवीन चालू करावयाची तर ती सशास्त्र आहे कीं नाहीं, हें पहावयास हवें. कारण विद्यासागर ज्या मनूंत जन्मले होते, तो 'मनःपूतं समाचरेत्' या वाक्याच्या निवळ शुद्धार्थावर चालणाऱ्यांना चांगलासा अनुकूल नव्हता, व पुष्कळांशीं अद्याप नाहींही. शास्त्राधार सांपडल्यावांचून कोणतीही गोष्ट अमलांत आणणें किंवा नुसती ती बोलून दाखविणेंसुद्धां गैर आहे, असा ईश्वरचंद्राचा पूर्ण समज होता. धर्मशास्त्राला वेळ पडल्यास धाब्यावर बसविणारांपैकीं ते मुळींच नव्हते. कारण ते कसे झाले तरी पुराण्या-पद्धतीनें पाठशाळेंत शिकलेले शास्त्री होते. धर्मशास्त्रांविरुद्ध कांहीं गोष्ट करावयाची त्यांस बिलकुल खपत नसे. पण धर्मांत असून, व्यवहारांत नसल्यास, नवी रुढि पडण्यास सिद्ध असत, येवढेंच. ह्मणजे "यद्यपिशुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयम्" या बाबा-वाक्यास मान डोलावून तदनुसार वर्तन करणारे नव्हते. एवंच जुनें व नवें यांचे ते अद्वितीय प्रामाणिक व यथाभाग मिश्रण होते. शास्त्राधार सांपडल्यावर मग कोणास भीक घालणारे नव्हते; व घातलीही नाहीं. नाहीं नाहीं तसला छळ सोसला, सर्वस्व विधवापुनःसंस्काराच्या पायीं स्वाहा केलें, खेरीज डोक्यावर परक्यांचें ऋण करून घेतलें, कित्येकदा स्वतःचा प्यारा जीवही धोक्यांत घालून घेतला, पण सत्य व धर्मशास्त्र सोडिलें नाहीं. अंगांत बाणलेल्या धर्मबळामुळें, ते सर्व अरिष्टांतून पार पडले व एकाकी सगळ्या दुनियेला भारी झाले. तात्पर्य, यद्यपि विधवांचीं दीनावस्था पाहून यांचा जीव कळवळला, तथापि शास्त्राधार सांपडेपर्यंत, या अप्रिय विषयाची त्यांनीं अवेळीं लोकांत उतावीळपणें गोष्ट काढिली नाहीं, अगर कधीं निष्कारण चर्चा केली नाहीं; किंवा नुसतें आपलें अनुकूल मत आहे, असेंही तोंडावाटे उच्चारिलें नाहीं.

यानंतर ईश्वरचंद्र धर्मशास्त्रें शोधण्याच्या उद्योगास लागले. हिंदुधर्मशास्त्रसंबंधीं सर्व स्मृति संहिता पहात असतांना, त्यांना या वेळीं, भोजनासमुद्धां फुरसत होऊं नये. या समयास ते रात्रंदिवस धर्मपुस्तकें चाळण्यांत चूर असत. संस्कृत विद्यालयाचे समोरच, शामचरणबाबुजींच्या घरीं बहुधा ते रात्रीचा फराळ करीत, व शाळे-शेजारींच त्यांचे स्नेही राजकृष्ण बंद्योपाध्याय * यांचे येथें नित्य दुपारचें भोजन उरकीत. विधवा-विवाहास शास्त्राधार शोधून काढण्याचें त्यांस इतकें अपरिमित वेड लागलें होतें कीं, ते विद्यालयांतून कधीं घरीं गेले नाहींत. विद्यालयांतील खोलींतच पडावें, पण शास्त्रचिंतनामुळें कधीं धडपणीं पुरता डोळाही लागूं नये. शाळेच्या शेजारींच स्नेह्याचे घरीं जेवणखाण आटपून घ्यावें, परंतु कधीं अन्नाची रुचि कळूं नये. असा एकसारखा शास्त्रविद्येचा निदिध्यास लागून राहिला होता. बरें, हा क्रम एक दिवस नव्हे दोन दिवस नव्हे, तर अहोरात्र महिनेच्या महिने अव्याहत चालू होता. स्वार्थासाठीं विद्याभ्यास केलेल्या विद्यार्थ्यांचीं--- किंवा पोटार्थ्यांचीं—उदाहरणें पुष्कळ ठाऊक आहेत. पण केवळ परोप-कारार्थ, मातोश्रीच्या शब्दास मान देऊन, असा अविश्रांत शास्त्रव्यासंग केल्याचें उदाहरण दुसरें क्वचित्‌च आढळेल. पोकळ लौकिकासाठीं धड-पडणाऱ्या कांहीं दांभिकांनींही पुस्तकें चाळण्याचा खटाटोप केला आहे, पण ते किती झाले तरी पर्यायानें, स्वार्थकोटींतच येणार; पण उपहास होणार, लोक खास छळ करणार, हें भविष्य पक्केपणीं ठाऊक असतांना फक्त दीन वर्गाच्या दैन्यनिवारणार्थ, व्यर्थ पतितांच्या उद्धारार्थ, संकट-ग्रस्तांच्या मोक्षार्थ, अहोरात्र परिश्रम घेणारा प्राणी निराळा मिळणें मुष्कील आहे.

---

× हे सांप्रत बैठे पगारी आहेत. हे संस्कृत भाषेचे गुरु होते. व कांहीं काळ " विद्यासागर विधवाविवाह समिति " नामक पुनर्विवाह संस्थेचे अध्यक्ष होते.

## शास्त्राधार सांपडला.

याप्रमाणें पुष्कळ दिवसपर्यंत, जवळजवळ दोन वर्षे, अतिशय श्रम आणि पराकाष्ठेचे कष्ट घेतल्यानंतर, एके दिवशीं रात्रीच्या समयीं ९।१० चे सुमारास अकस्मात् त्यांस अत्यानंद होऊन एकाएकीं त्यांनीं ताडकन् उडी मारिली; व सहर्ष अवचित मोठ्या स्वरानें ह्मणाले " सांपडला, सांपडला, शास्त्राधार सांपडला !! " येवढा विलक्षण हर्ष होण्याचें कारण काय, अशी सहजच जिज्ञासा उत्पन्न होते. हा शास्त्राधार ह्मणजे खालीं लिहिलेले पराशरसंहितेंतील तीन श्लोक होत. हे त्या संहितेच्या चवथ्या अध्यायाचे शेवटीं दिले आहेत. या श्लोकत्रयींत विधवाधर्म नीट पद्धतवार, ह्मणजे आपत्तींचा यथान्याय क्रम लावून वर्णिला आहे. पहिल्या प्रथम पुनर्विवाह, मग ब्रह्मचर्य व अखेरीस सहगमन. हा क्रम वाचून जुन्यांच्या तळव्याची आग मस्तकास जावयाची.

* नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते[१] ॥
मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्ये व्यवस्थिता ।
सा मृता लभते स्वर्गं यथा ते ब्रह्मचारिणः ॥
तिस्रः कोट्यर्धकोटी च यानि लोमानि मानवे ।
तावत्कालं वसेत् स्वर्गे भर्तारं याऽनुगच्छति ॥

ह्या रात्रीं सदरहू श्लोक सांपडल्यानंतर मग त्यांस अर्थात्च निद्रा आली नाहीं. त्यांनींही बाकी उरलेली सारी रात्र पराशरस्मृतींत सांपडलेल्या ह्या संस्कृत वचनांचें, सर्वांना साग्र नीट समजेल, व सत्यास

* पत्यौ क्लीबेच पतिते नष्टे प्रव्रजिते मृते असा पाठ घातला असतां आपत्तींचा उत्तम क्रम लागतो, व दोन्हीं चरणांचे शेवटीं यमकही सारखें जुळतें.

साकीछंद

१ पती हरवला, मरण पावला, कीं, बैरागी बनला,
पंड, पतित कीं हो, तरि अनुमति पुनर्विवाहा स्त्रीला १००
घोरपडे प्रकाशित ' विधवांचीं दुःखें '

साजेल, असें सुबोध बंगाली भाषांतर करण्यांत घालविली. पुनर्विवाह-शास्त्रसंग्रहाचा ही श्लोकत्रयी मूळ पाया होय. बंगाल प्रांतांत मग जे पुनर्विवाहाविषयीं अनेकवेळा वाद झाले, त्यांची सर्व मदार ईश्वरचंद्रांनीं शोधून काढिलेल्या या श्लोकत्रयीवर होती. [५]

" वादे वादे जायते तत्त्वबोधः " या न्यायानें पुढें विचाराअंतीं व शोधाअंतीं तत्संबंधीं विविध धर्मवचनें क्रमाक्रमानें उपलब्ध होत गेलीं. शोध करण्याचा सतत प्रयत्न केला असतां, अबाधित सत्येंच आणि नीतिन्यायतत्त्वेंच आमच्या तत्त्ववेत्त्या मुनींच्या स्मृतिग्रंथांत पुष्कळ सांपडण्याजोगतीं आहेत असें हें प्रमेय पुनर्विवाहकोलंबसाच्या कृतीवरून सर्व जगास कळून आलें. पंजाब, संयुक्तप्रांत, गुजराथ, वऱ्हाड, मध्यप्रांत, महाराष्ट्र, कर्नाटक, मद्रास इत्यादि प्रांतांतमुद्धां मग जी पुनर्विवाहाची चर्चा झाली, ती सारी ईश्वरचंद्रानीं शोधिलेल्या आधारांवरच. आतां प्रांतोप्रांतींच्या कित्येक पंडितांनीं त्यांत यथाशक्ति थोडीबहुत भर घातली असेल, पण ती " यथाशक्ति " च. कारण, ईश्वरचंद्रासारखी बुद्धि त्यांजसारखा विद्याव्यासंग, अविश्रांत परिश्रम, अपरिमित शास्त्रग्रंथसंग्रह, व सगळ्यांत विशेष गोष्ट या विषयाविषयीं त्यांची स्वतःची अत्यंत कळकळीची भक्ति आणि ह्या सर्वांवर कळस मातापितरांचा या सत्कार्याबद्दल पूर्ण आशीर्वाद—इतकी उत्कृष्ट सामग्री ईश्वरचंद्राखेरीज आजतागायत कोणासही अनुकूल झाली नाहीं. सदय व सुज्ञ सरकार, किंवा कोणी सधन सावकार कधींकाळीं बक्षीस लावील तेव्हां विद्याटवींत तत्त्व शोधनार्थ भ्रमण करण्याची कोणास स्फूर्ति झाल्यास व्हावयाची! अस्तु, तेव्हां दौलतीची किंवा लौकिकाची अपेक्षा न करितां, पंडित ईश्वरचंद्र यांनीं या विषयाबाबद केवळ धर्म ह्मणून जी ग्रंथरचना केली, ती अद्यापि अद्वितीय आहे. ह्या त्यांच्या परोपकारकृतीस अजून तोड मिळत नाहीं.

---

५ सुमारें ३५ वर्षापूर्वी पुणें येथें श्री शंकराचार्यांसन्निध त्यांचे अध्यक्षतेखालीं झालेल्या लेखी वादप्रतिवादास ' नष्टे मृते ' पासूनच प्रारंभ झाला; व याचाच एकसारखा कीस चालला होता.

# शास्त्रप्रकाशनाची परवानगी.

पराशरस्मृत्यंतर्गत पुनर्विवाहविधायक श्लोकत्रयीवर ईश्वरचंद्र येऊन पोहोंचतांच, ही त्रयी पुनर्विवाहास पूर्णपणें अनुकूल, अगदीं अखंडणीय व स्वहेतूस सुरेख पुष्टि देणारी आहे, अशी त्यांची जी एकदम खात्री झाली व जो एक वेळ ग्रह होऊन बसला तो शेवटपर्यंत दृढ झाला. तो पुढें शास्त्रचर्चेंतही पालटला नाहीं. त्यांनीं ती सारी रात्र या तीन श्लोकांचें बंगाली भाषांतर करण्यांत घालविली; व हें जेव्हां त्यांच्या मनाजोगतें वठलें, तेव्हां त्यांनीं तें लोकांत प्रसिद्ध करण्याचा विचार केला. तरी पण लोकविरुद्ध गोष्ट त्यांस मातापितरांच्या संमतीवांचून करावीशी वाटेना. आईबापांच्या आज्ञेंत वागणें, त्यांचा सन्मान राखणें, त्यांची आवडनिवड पाहून वर्तन ठेवणें; इत्यादि कर्तव्यकर्मांची ईश्वरचंद्रास जात्याच मोठी आवड असे; व तदनुसार ते सदोदित वागतही असत. तेव्हां आपल्या नित्यपरिपाठाप्रमाणें त्यांनीं पित्याची भेट घेतली. या भेटीचा प्रसंग खालीं संवादरूपानें वर्णिला आहे:—

पंडित ईश्वरचंद्र— पिताजी, विधवापुनर्विवाहविधायक असा हा निबंध-ग्रंथ मी तयार केला आहे. व मी आपल्या मतांच्या समर्थनार्थ धर्मशास्त्रांतील प्रमाणवचनें उतरून घेतलीं आहेत. परंतु हा मजकूर आपण साद्यंत ऐकून घेऊन, पसंत केल्यावांचून तो मला प्रसिद्ध करितां येत नाहीं; कारण, आपल्या इच्छेविरुद्ध वर्तन करून, आपलें मन दुखवावें, हें माझ्या हातून कधींहि घडणार नाहीं.

बंद्योपाध्याय ठाकूरदास— पण, समज, जर हें पुस्तक मला आवडलें नाहीं, तर तूं त्याचें मग काय करणार?

पंडित ईश्वरचंद्र— हें पुस्तक आपल्यास नच रुचलें, तर आपण हयात आहांत तोंपर्यंत मी तें प्रसिद्ध करणार नाहीं. कांहीं एक

गडबड न करितां स्वस्थ बसेन; मात्र, आपल्या पश्चात् मला जसें योग्य व गोड दिसेल तसें मीं करीन.

ठाकूरदास---बरें तर फार उत्तम, उद्या मी तुझा सर्व निबंध ऐकून घेईन, आणि नंतर मी आपला अभिप्राय तुला कळवीन.

ईश्वरचंद्रानीं ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं आपला लेख वडिलांस वाचून दाखविला. मग ठाकूरदासांनीं शेवटीं मुलास पुसलें, " तूं जें काय ह्या निबंधांत विषयनिरूपण केलें आहेस, तें सर्व यच्चयावत् आपल्या हिंदुधर्मशास्त्रास धरून आहे असें तुझी मनोदेवता तुला सांगते काय? "

' होय, होय. त्याबद्दल तिळमात्र संशय नाहीं. मी जें लिहिलें आहे तें सर्व अक्षरशः खरें आहे. यांत सत्याचा बिलकुल अपलाप केला नाहीं, हें आपले पाय स्मरून मी सांगतों. '

ठाकूरदास—तुझी जर शास्त्राबद्दलची खरोखरच खात्री असेल, तर मग माझें कांहीं ह्मणणें नाहीं, तुझा स्तुत्य उद्योग खुशाल झपाट्यानें चालूंदे. माझी कांहीं एक आडकाठी नाहीं.

वडिलांची संमति मिळाल्यानंतर, ईश्वरचंद्र आपल्या मातोश्रीकडे गेले, व तीस ह्मणाले ' आई, तुला धर्मशास्त्राचें ज्ञान असण्याचा अर्थात्च संभव नाहीं. तुला शास्त्रार्थ कोठून ठाऊक असणार? पाहिलास हा निबंध? यांत मी पुनर्विवाह हा संस्कार धर्मशास्त्रसंमत आहे, असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. तथापि विधवांचें फिरून लग्न होणें हें प्रशस्त आहे, असें जर तुला वाटत असेल, तर हा निबंध मी छापून प्रसिद्ध करीन, दरम्यान करणार नाहीं. '

आई—माझी काडीमात्र हरकत नाहीं, येवढेंच नव्हे, तर ही गोष्ट पुनः सुरू होणें अगदीं अवश्य आहे, असें मागेंच मी एकदां तुला सुचविलेंसुद्धां. शिवाय ह्मटलेंदेखील कीं, बालविधवांबद्दल शास्त्रांत कांहीं तोड निघेल तर फार बरें होईल. बिचाऱ्या अनाथ पोरींचें नष्टचर्य संपेल

तेव्हां खरें. विधवा सध्या समाजाला फार जड झाल्या आहेत. त्या बापुड्या साऱ्यांना शत्रुसमान भासतात. प्रत्यक्ष वैऱ्याचेसुद्धां कोणी हाल मांडणार नाहींत, इतके त्यांचे हाल हल्लीं चालले आहेत. लहान मोठ्या यच्चयावत् सर्व विधवा मोठ्या संकटांत असून कंटाळवाण्या आयुष्याचा एकेक दिवस कसा तरी मोठ्या कष्टानें कंठीत आहेत. अशा विपन्न स्थितींत अनाथ स्त्रियांना ठेऊन, पुरुषांनीं मात्र तेवढी यथेच्छ मौज मारणें ह्मणजे केवळ राक्षसी कृत्य आहे; ह्यांत कांहीं मनुष्यपणा होत नाहीं. तेव्हां चिखलांत रुतलेल्या या दीन गाईंचें दैन्यविमोचन करणें, त्यांना संकटांतून सोडवून सुखाच्या वाटेस लावणें अत्यंत इष्ट आहे. आणि आतां तूं निबंधादि खटपट करून, त्या अबलांना सुखी करण्याचा उपाय काढीत आहेस, हें तर फारच उत्तम. हें तुझें परोपकाराचें कृत्य पाहून मला अतिशयित संतोष वाटतो. माझें दूध प्यायल्यासारखें तूं सार्थक करीत आहेस, माझ्या उदरीं जन्मास आल्याचें तूं चीज करीत आहेस, असें मी समजतें[६] तुझ्या ह्या उद्योगास माझें अंतःकरणापासून पूर्ण अनुमोदन आहे; ह्या कामीं हे प्रियवत्सा, माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे. अरे, पण संभाळहो अगदींच विसरलें, त्यांच्या कानांवर ही गोष्ट जाऊं देऊं नकोस; कारण, नजाणो ते कदाचित् फाटे फोडतील, व या मंगल कृत्यास विघ्न येईल.

ईश्वरचंद्र—आई, त्याबद्दल तुला तिळमात्र काळजी नको; बाबांनीं आधींच आपला रुकार दिला आहे. मी आतां तिकडूनच आलों. त्यांना हा नवीन प्रकार अगदीं मान्य आहे, व त्याप्रमाणें त्यांनीं आपला अनुकूल अभिप्राय पूर्वींच मला स्पष्ट सांगितला आहे.

ही गोष्ट त्यांना संमत आहे हें ऐकून, भगवती देवीस जो आनंद झाला, तो सांगतां पुरवत नाहीं. ती ह्मणाली ' मग तर फारच

६ ह्या प्रसंगीं ही बंगाली बाई सामाजिक सुधारणेच्या रणांगणांत एखाद्या मराठ्या अथवा रजपुत वीरस्त्रीप्रमाणें उद्गारली असें कोण ह्मणणार नाहीं?

चांगलें झालें, आतां तुला जें रास्त दिसेल तें बेलाशक कर. त्यांची काय ती भीति होती. त्यांचें जर या कार्यास तुला पाठबळ आहे, तर आतां कसलीच अडचण उरली नाहीं व कोणाचाही धाक बाळगायास नको. आतां विलंब लावूं नकोस, कार्य तडीस पोहोंचीव.'

ह्याप्रमाणें उभयतां मातापितरांची अनुज्ञा आणि आशिर्वाद मिळविल्यानंतर पं० विद्यासागर दुष्ट रूढिराक्षसीचा समूळ नाश करण्याच्या मोहिमेवर निघाले.

---

# विधवाविवाहग्रंथ.

पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं आपला " विधवाविवाह " नामक एक लहान ग्रंथ प्रथम बंगाली भाषेंत सन १८९९ च्या जानेवारींत छापून प्रसिद्ध केला. त्यासरशी चोहींकडे अतिशय चळवळ उडाली. या निबंधाच्या प्रकाशानें सर्व लोकांच्या अंतःकरणांत लख्ख उजेड पडला. या पुस्तकानें सगळें कलकत्ता शहर अगदीं हलवून सोडिलें. जुने लोक अज्ञानरूपी निद्रेंतून धडपडून उठले. डोळे चोळून पहातात तों पुनर्विवाह. पुराण्या अडाणी मंडळीस हा लेख विद्युत्पात अथवा धरणीकंप इत्यादि अवचित अनर्थाप्रमाणें भासला. विषयाच्या अपूर्वत्वामुळें, येवढी २००० ची दांडगी प्रथमावृत्ति, पण एका आठवड्याचे आंत पार उडाली. ह्या अपरिचित, अप्रिय व शास्त्रविरुद्ध भासलेल्या विषयावरील निबंधासंबंधानें ठिकठिकाणीं बरीच कडक टीका झाली. ह्या ग्रंथांतील मतांचे खंडणार्थ इतर बंगाली नामांकित विद्वान् शास्त्र्यांनीं अनेक निबंध लिहिले. ईश्वरचंद्राच्या कृतीवर चोहोंकडून सारखा भडिमार झाला. श्रीक्षेत्र वाराणशी येथील सुमारें बारा महापंडितांनीं मिळून गीर्वाणभाषेंत एक खंडणपर निबंध[७] लिहिला. परंतु विद्यासागराचा लेख सत्य, नीति, दया, शास्त्रप्रमाण्य इत्यादि गुणांनी ओतप्रोत भरला असल्यामुळें, सबंध ग्रंथांतील एका अक्षरालासुद्धां धक्का लागला

---

७ याचें नांव " पुनर्विवाहप्रतिषेध " होय. हा पुराण्या शास्त्रीपंडितांच्या परिपाठाप्रमाणें निव्वळ संस्कृत भाषेंत लिहिलेला आहे. ह्या निबंधाचें पुनः ईश्वरचंद्रांनीं प्रतिखंडण केल्याचें ठाऊक नाहीं. पुराण्या वितंडवादी पंडितांशीं तंडत बसण्याच्या वेड्या खुळांत ते पुढें फारसे पडले नाहींत असें दिसतें; ह्मणूनच त्यांना निव्वळ कोरड्या वादांपेक्षां अधिक महत्वाच्या गोष्टी करायास सांपडल्या. तथापि आमच्या इकडे पंडित विष्णुशास्त्री यांनीं " विधवोद्वाहविवेक " नामक साद्यंत संस्कृत ग्रंथरचना करून, वरील वाराणशीस्थ इज्ञन पंडितांचा एकट्या बहाद्दरानें फडशा उडविला आहे.

नाहीं. यावेळीं ईश्वरचंद्रानीं मोठ्या झपाट्यानें काम चालविलें. त्यांनीं विलक्षण परिश्रम केले. त्यांनीं अतोनात यातना सोसल्या. शास्त्रीय ग्रंथांत कोठें आधार सांपडला, ह्मणजे त्याच्या योग्यायोग्यतेविषयीं नीट विचार करण्यांत, आणि नंतर त्याचा मनाजोगता नीट नेटका बंगाली भाषेंत बरोबर अर्थ करण्याच्या कामांत त्यांनीं समग्र रात्रीच्या रात्री घालवाव्यात. इतकी त्यांची पुनर्विवाह विषयावर दृढ भक्ति बसली होती. अंतःकरणास जें एकदा सत्य असें पुर्तेपणीं भासलें, त्याचा दृढनिश्चयानें व सतत उद्योगानें प्रसार करायाचा, असा त्यांचा जन्मस्वभावच होता. सबब, यशःप्राप्ति होईपर्यंत त्यांनीं अंगीकृत कार्याचा कधींही पिच्छा सोडिला नाहीं. त्या कामाची त्यांनीं एकसारखी पाठ पुरवावी.

पहिला लेख छापून निघाल्यावर, त्यावरील साऱ्या आक्षेपांचें खंडन ह्मणून, पुढें लवकरच ह्मणजे त्याच सालचे आक्टोबर महिन्यांत, आणखी एक पूरणिका प्रकाशित केली. ह्या पुस्तकांत " विधवांचीं लग्नें करावींत कीं करूं नयेत " अशा शिरोलेखाखालीं पुनर्विवाह प्रश्नावर घेतलेल्या आक्षेपांचा साद्यंत विचार केलेला आहे. मूळांत याचीं एकंदर पंचवीस प्रकरणें झालीं आहेत. ह्या लेखामध्यें ईश्वरचंद्रांनीं आपलें ग्रंथरचनेचें अपार चातुर्य प्रकट केलें आहे. पहिला मूळग्रंथ सरळ व साधा साधला आहे. पण त्यावर लोकांनीं घेतलेल्या शंकांचें जें समाधान केलें आहे, तें मूळापेक्षां फार उत्कृष्ट वठलें आहे. चांगला प्रतिपक्षी भेटल्यावांचून अंगीं खरी वीरश्री चढत नसते, असा साधारण नियम आहे. तदनुसार जेव्हां लेखनसरस्वती ईरेस पडून प्रगट झाली, तेव्हां सर्व प्रतिपक्षिगणांचें यथास्थित कंदन निघालें. प्रस्तुत ग्रंथाची सुरस व चटकदार भाषासरणी, आणि एकंदर विषयाच्या अंगोपागांचें मुद्देसूद यथोचित निरूपण, आणि जात्या शास्त्रीय, अतएव अवघड, अशा विषयाची सुबोध मांडणी, या गोष्टींमुळें या ग्रंथाची सर्वत्र अतिशय वाहवा झाली; व अवघ्या आठ पंधरा दिवसांचे आंतच तीन

हजारांची नवीन दुसरी आवृत्ति हां हां ह्मणतां पार खलास झाली. व याच क्रमानें या जोडगोळीच्या—मूळ निबंध व पुरवणी—यांच्या अनेक आवृत्ती भराभर खपून गेल्या. या विलक्षण खपाचें कारण एक तर विषय नवीन; दुसरें, भाषा गोड; तिसरें, मुद्यांची जुळणी बिनचूक; चौथें, विचारसरणी सप्रमाण आणि प्रामाणिक; पांचवें, भाषा बालबोध बंगाली. त्यांत शेवटलें कारण मुख्य. विषय धर्मशास्त्रांतला कठिण असून, देशभाषेंत सगळ्यांना समजेल असा स्पष्ट करून दिला. प्रतिपक्ष्यांनीं उलट मजकूर लिहावा, पण तो बहुतेक पडला संस्कृत भाषेंत, व हा अर्थातूच सर्वांना समजण्यासारखा नसे. पण विद्यासागर यांचे लेख चांगले बंगालींत लिहिलेले, तेव्हां ते सहज समजण्याजोगते असल्यामुळें, लोक हौसेनें विकत घेऊन वाचूं लागले. लहान मुलांच्या तोंडींदेखील हाच विषय होऊन गेला.

---

# पुनर्विवाहशास्त्रवाद.



एके दिवशीं ईश्वरचंद्र हे राजा राधाकांत देवबहादुर यांचे राजवाड्यांत गेले. ह्या राजेबहादुरांचें हिंदुसमाजांत व तसेंच सरकारांत चांगलें वजन होतें; व सरकारदरबारांत यांस मोठा मानमरातब मिळत असे. तेव्हां अशा बड्या माणसाची सहानुभूति आणि साहाय्य मिळेल तर हें एक मोठेंच कार्य होईल, असा भरंवसा बाळगून ईश्वरचंद्र विद्यासागर त्यांचे भेटीस गेले. प्रथमतः त्यांनीं आपले स्नेही आनंदकृष्ण—ह्मणजे राजेबहादुरांचे नातू—यांची सल्ला घेतली, व काय करावें ह्मणून त्यांस पुसलें. परंतु असल्या लोकविरुद्ध सामाजिक अवघड विषयासंबंधानें आपल्या वयोवृद्ध आजोबापाशीं गोष्ट काढण्यास आनंदबाबूस धैर्य होईना. तेव्हां बाबूनीं पंडितजीस अशी पोक्त मसलत दिली कीं, विधवाविवाहग्रंथ पत्रासोबत राजाकडे पाठवून द्यावा. या युक्तीप्रमाणें विद्यासागरांनीं आपला ग्रंथ राजाकडे धाडिला. तो पाहून राजेसाहेबास मोठा संतोष झाला. त्यांनीं विद्यासागरांस बोलावून नेले, व त्यांस ह्मणाले—" पंडितजी आपला ग्रंथ मी समग्र वाचून पाहिला. त्यांतील विषयाची जुळणी चांगली पद्धतशीर आहे. परंतु आह्मी गृहस्थमनुष्य, त्यांत खटलापरिवार मोठा, आह्मांस वाडवडिलांपासून चालत आलेली ओळ सोडून तिचे बाहेर जातां येत नाहीं. खेरीज या विषयाची चर्चा करण्याचा आमच्यांत पराक्रम नाहीं. तथापि आपल्यास मी येवढें आश्वासन देऊन ठेवितों कीं, जर आपली मनीषा असेल तर, एखादा दिवस निश्चित करून, ह्या विषयाचा ऊहापोह करण्याकरितां आपण ठिकठिकाणच्या पंडितांची सभा भरवूं. ह्या ह्मणण्यास विद्यासागरांनीं आपला रुकार दिला. वादाचा दिवस ठरला. नेमिल्या दिवशीं सभेला पुष्कळ पंडित गोळा झाले. मोठ्या कडाक्याचा वादविवाद झाला; पण निर्णय कांहींच झाला नाहीं. विद्यासागराची वाद करण्याची अलौकिक शैली व शहाणपणाचा आणि चतु-

राईचा कोटिक्रम पाहून, राजेबहादुरांस फार समाधान वाटलें. त्यांची तब्येत खुष होऊन, त्यांनीं विद्यासागरांस एक बहुमोल शालजोडी बक्षीस दिली.

ही बक्षिसाची खबर सर्व शहरभर होतांच, साऱ्या जुन्या लोकांना भय पडलें. त्यांना वाटलें कीं, राजाराधाकांत हे पुनर्विवाहपक्षास सामील झाले. तेव्हां पुराणमताभिमान्या बाबूंची एक जंगी टोळी राजाकडे गेली. तींतील पुढाऱ्यांनीं राजास पुसलें. 'काय, राजेसाहेब, आपल्या हिंदुज्ञातींत पुनर्विवाहाचा भ्रष्टाचार सुरू करण्याचा आपला विचार आहे कीं काय? कारण तसें नसतें तर विद्यासागरास आपण शाल बहाल केली नसतीत.' राजेच ते. त्यांनीं मेषपात्री उत्तर दिलें. 'पुनर्विवाहाला आमचें मुळींच मत नाहीं. आह्मी पडलों गृहस्थभाई. आह्मास शास्त्र काय समजतें? परंतु आह्मी विद्यासागरास बक्षीस दिलें तें केवळ त्यांच्या सयुक्तिक व चतुरस्र कोटिक्रमाबद्दल. तुह्मांस पाहिजे असल्यास फिरून आणखी एक सभा भरवून त्या प्रश्नाचा पुनः एकवार खल करूं. मग तर कांहीं तुमचें ह्मणणें नाहींना?' पुढें दुसऱ्या दिवशीं आणखी एक सभा झाली. ह्या सभेंत पूर्वींच्या सभेपेक्षां पुष्कळ अधिक पंडितजन जमा झाला होता. मोठमोठ्या शहरांतून व काशी, नवद्वीप इत्यादि विद्यापीठांतून जगमान्य, उत्तम प्रकारें पढलेले, व विलक्षण तऱ्हेचे विद्वान् लोक चट सगळे गोळा झाले होते. धर्मशास्त्राच्या पद्धतीनें, पण जुन्या धर्तीवर बराच वादविवाद झाला. परंतु पुराणे शिस्तीच्या वादांत गैरशिस्तपणा फार. क्रोधावेशाचा विशेष भर, प्रांजळ बुद्धीनें सत्यान्वेषण करण्याची हौस कमी, कसा तरी परपक्षाचा पराभव करण्याकडे मोठें लक्ष, इत्यादि कारणांमुळें वादविषयक प्रश्नाचा जुन्या लोकांच्या नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें कांहींच निकाल लागला नाहीं. उलटा सभेंत सगळा गोंधळ झाला. या खेपेस जुन्या मताभिमान्यांच्या विनंतीवरून सभा भरविली होती. तेव्हां त्यांचे पक्षाचा संतोष व्हावा ह्मणून

ह्या वेळीं राजेबहादुरांनी तत्पक्षीय नामांकित पंडित नवद्वीपस्थ बृजनाथ विद्यारत्न ह्यांस एक शाल दिली. बृजनाथ तत्कालिन धर्मशास्त्रांत प्रमुख होते. तेव्हां त्यांचा बहुमान करून पुराणपक्ष तोषविला हें ठीकच झालें. पण ह्यायोगें राजेबहादुरांची कोणत्याच एका पक्षावर पुर्तेपणीं निष्ठा नाहीं, ही गोष्ट आतां दृष्टोत्पत्तीस आली. राम भला रावण भला असा त्यांचा अनिश्चित प्रकार पाहून, विद्यासागरांस फार वाईट वाटलें. त्यांना जी आशा वाटत होती कीं, ह्या वजनदार श्रीमान् माणसाच्या मदतीनें आपलें बरेंच काम साध्य होईल, ती निष्फळ झाली. तथापि ते काडीमात्र डगमगले नाहींत. कारण, ते अंतःकरणांत पूर्णपणें जाणून होते कीं, सत्य ह्मणून जें काय आहे तें सर्व पुनर्विवाहपक्षाकडे आहे. आपल्या प्राचीन पूर्वज ऋषिवर्यांनीं अगदीं निःपक्षपातपूर्वक चांगला स्पष्ट शास्त्राधार पुनर्विवाहाला देऊन ठेविलेला आहे. शिवाय ते निश्चयाचे व धैर्याचे पुरे होते. कोणाची सहानुभूति अथवा पाठबळ मिळेल तरच काम निभावयाचें, नाहींतर घोडें थकून बसावयाचें अशांपैकीं त्यांची गोष्ट नव्हती. पाठिंबाच हवा, हा सामान्य मनुष्यांचा प्रकार झाला. पण विद्यासागराची गोष्ट वेगळी. त्यांची सत्पक्षाचे ठायीं पराकाष्ठेची निष्ठा असे. खेरीज धर्मशास्त्राचें रहस्य त्यास चांगलें समजलेलें होतें. सबब, त्यांनीं एकट्यानीं कोणाचे मदतीची अपेक्षा न बाळगतां व कोणाचा आश्रय न घेतां या अवघड प्रश्नाची कड लाविली.

---

# पंडितपरिषद्ची कल्पना.

सांप्रत ज्याप्रमाणें एकाद्या विषयाची विचारणा करण्याकरितां, ' कमिशन ' नामक पंडितपरिषद् नेमितात, तसा पूर्वी प्रकार नसे. अगदीं आरंभींच दोन विरुद्ध पक्ष अशी दृढ समजूत करून घेऊन मग वादास सज्ज व्हावयाचें, असें झालें ह्मणजे जो तो स्वपक्षाची सरशी करण्यासाठीं व शत्रूस हाणून पाडण्यासाठीं झटणार हें अगदीं उघड आहे. पण स्वपक्षाची चूक वादाअंतीं उमगल्यास, पड खाऊन, सत्पक्षास संतोषानें सामील होणें हें पुराण्या पंडितांना ठाऊकच नाहीं. केवळ सत्यास स्मरून, विषयाचें तत्त्व न सत्यस्वरूप समजून घेण्याच्या आवडीनें जें स्वतःच्या मनोदेवतेस इष्ट वाटेल, तेंच प्रकट करायाचें, अशा सत्यजिज्ञासेच्या ईर्षेनें, जें पंडितमंडळ वादात प्रवृत्त होतें. त्याच्याच हातून कांहीं लोककल्याण झाल्यास व्हावयाचें. खरा प्रकार कांहीं कां असेना? आह्मी स्वपक्षाच्या समर्थनार्थ लढणार आणि परपक्षाचा येनकेन प्रकारेण पाडाव करणार, अशा ऐटीनें जीं पढिक माणसें वादास उभीं राहिलीं त्यांजकडून वर वर्णिल्याप्रमाणें वादग्रस्त प्रश्नाचा कांहींच निर्णय न होतां, उलटा अधिक बखेडा मात्र माजावयाचा. सदरहू सभेंत पुनर्विवाहप्रश्नास कोणतीच तड न लागतां, जास्त घोंटाळा झाला. जो तो पक्ष आपली सरशी झाली असें मानूं लागला. राजेबहाद्दर एकदां एकास व दुसऱ्या वेळीं दुसऱ्या पक्षास, शालजोड्या देऊन मोकळे झाले खरे ; पण अशानें कधीं सत्याचा उदय होत नसतो, व प्रामाणिक मनुष्यास प्रोत्साहन मिळत नसतें ; तसें होण्यास निःपक्षपाती, सत्यनिष्ठ, निष्कपटी पंडितपरिषदच भरविली पाहिजे. शालजोडी मिळाली तरी ईश्वरचंद्रांचा संतोष झाला नाहीं ; उघडच आहे, कारण जेथें देणारा परस्परभिन्न अशा दोन्ही पक्षास सरसकट बक्षिसें वांटतो, तेथें त्या पारितोषिकांची खरी योग्यता तितपतच ठरत असते, हें तत्त्व ईश्वरचंद्र समजून होते. असल्या बक्षिसांच्या तुकड्यांनीं अडाणी मनुष्याची समजूत व्हावयाची. अशीं सढळ हातानें उभयपक्षकारांस बक्षिसें वाटून देणें हें सधन संभावितांच्या थोरवीचें व फाजील भलेपणाचें लक्षण समजलें जातें येवढेंच ; बाकी ईश्वरचंद्रासारख्या प्रामाणिक मनुष्याचें अशानें तादृश समाधान कधींही व्हावयाचें नाहीं.

# प्रतिकूल टीका.

ईश्वरचंद्रकृत पुनर्विवाहविधायक ग्रंथ प्रसिद्ध होतांच, पुष्कळ सभांनीं व कित्येक व्यक्तींनीं यथामति या ग्रंथाचें खंडण करण्याच्या उद्देशानें पुनर्विवाहनिषेधपर पुस्तकें लिहिलीं. सभांमध्यें "जयशूर-हिंदुधर्मरक्षिणी सभा" आणि "कलकत्ता धर्मसभा" ह्या मुख्य होत्या. व व्यक्तिशः निषेध करणारांत, गंगाधर कविराज मुर्शिदाबादवाले यांचा लेख मुख्य होता. या सर्वांनीं ह्या नूतन पद्धतीचा अगदीं तिरस्कार केला. ईश्वरचंद्रानीं भाषांतररूप, टीकाटिप्पणीरूप, रूपांतर रूप आणि मूळरूप असे अनंत ग्रंथ लिहिले आहेत. त्यांचा नामकोश केला असतां एक लहानसें स्वतंत्र पुस्तक होईल. यांत पुष्कळ ग्रंथ शालोपयोगी व बाकी लोकोपयोगी असे आहेत. सर्वच एकजात चांगले आहेत. त्यांस नांवें ठेवण्यास जागा नाहीं. ह्या सगळ्यांत पुनर्विवाह ग्रंथाची योग्यता फार मोठी आहे. विषय शास्त्रीय व अवघड असून, त्यांनीं तो वंगवाणींत असा सुरेख गुंफिला आहे कीं, कांहीं सांगतां सोय नाहीं. यद्यपि ते दुसरे ग्रंथ न लिहिते, आणि येवढेच हे दोन पुनर्विवाहग्रंथ लिहून ठेविते व स्वस्थ राहते, तरी त्यांची ग्रंथकर्तृत्वाबद्दलची व लेखनचातुर्या-विषयींची कीर्ति अजरामर कायम राहती. इतकी ही पुनरुद्वाहपुस्त-काची जोडी नामी उतरली आहे. पण अशासुद्धां उत्तम ग्रंथाला खोडी ठेवण्यास जुन्या लोकांनीं कमी केलें नाहीं. बंगाल्यांतील नाणावलेल्या पंडितांनीं व वाराणशिस्थ विद्वान् ह्मणविणाऱ्या शास्त्र्यांनीं केवळ हट्टास पेटून प्रतिकूल मतें प्रकट करण्यास काडीइतका आळस केला नाहीं. दुर्व्यसनाला वाव न मिळावा ह्मणून सुरू होणाऱ्या नवीन चालीवर, व तिचेसाठीं खटपट करणाऱ्या सुज्ञ सुशील पंडितावर न घसरतां, गल्लोगल्लीं गटारांत घसरविणाऱ्या मद्यपानादि व वेश्यागमनादि दुष्ट चालीवर, आणि ह्या दुर्व्यसननरकांत वळवळणाऱ्या नरकीटकांवर जर पूर्वोक्त

नांवाजलेले विद्वान् घसरते, तर कालाचा किती सद्व्यय झाला असता बरें? पण अद्याप आमच्या समाजाचें नष्टचर्य संपलें नाहीं. तेव्हां सुबुद्धांनासुद्धां सद्बुद्धि सुचूं नये, असा सध्या योग आहे.

ह्याच सुमारास विधिपक्षाचे मंडणार्थ " वृजविलास ", " रत्नपरीक्षा " व " विनयपत्रिका " या नांवाचीं तीन निनांवी पुस्तकें प्रसिद्ध झालीं. यांत नवद्वीपस्थ व्रजनाथ विद्यारत्न व भुवनमोहन विद्यारत्न आणि मधुसूदन स्मृतिरत्न अशा प्रख्यात पंडितरत्नांवर भडिमार होता. पण या पुस्तकांची भाषा फार थट्टास्पद व कांहींशी अश्लील अशी होती. परंतु हाही प्रकार ' जशास तसें ' या महाराष्ट्र ह्मणीप्रमाणें, किंवा ' कंटकेनैव-कंटकम् ' या संस्कृत न्यायान्वयें, अगदीं तंतोतंत क्षम्य आहे. चेष्टास्पद ग्राम्यभाषा वापरूं नये हा साधारण नियम खरा; पण जेथें प्रतिपक्ष्यांनीं अगदीं ताळ सोडिला आहे, तोंडास येईल तें बडबडण्याचा सपाटा चालविला आहे, आणि अपशब्द उच्चारण्यानें जिव्हा कशी विटाळावी याची ज्यांना काडीचीही खंत नाहीं, अशा खाशा मंडळींशीं प्रसंग प्राप्त झाला असतां त्यांचा त्यांना नीट समजे अशा **संस्कृत** भाषेनेंच, एकादे वेळीं समाचार घेणें अगदीं अवश्य आहे. त्यांत कांहीं गैर नाहीं. पुनर्विवाह-निषेधक काय कमी **संस्कृत** वापरतात? कित्येक वयोवृद्ध निषेधक-बहाद्दरांचा फाल्गुनमासीय वाग्विलास चालू झाला, ह्मणजे सभ्य स्त्रीपुरुषांना कानांत बोटें घातल्यावांचून गत्यंतर नाहीं, अशी अवस्था होऊन जाते.

---

## तत्कालीन समाजस्थिति.

त्यावेळच्या बंगालप्रांतांतील समाजस्थितीचे तीन ठळक वर्ग पाडितां येतील. पहिला वर्ग ह्मटला ह्मणजे जुनें जरखड शास्त्रिमंडळ व तदनुयायी इतर अशिक्षित अंधळी मंडळी. हा वर्ग विधवापुनर्विवाहाचा कट्टा द्वेष्टा होय. पुनर्विवाहाचें नुस्तें नांव काढलेलेंही ह्यांना खपावयाचें नाहीं. ज्यांना आंग्लविद्येचा किंचित् संस्कार घडला आहे, व जे जेत्या राष्ट्राचे गुण नुकते कोठे उमगावयास लागून, त्या गुणांची आपलेकडे नक्कल करणें इष्ट आहे अशी ज्यांची समजूत झाली आहे, आणि ज्यांना अंतःकरणांतून पुनर्विवाह संमत आहे, पण वयपरत्वें व मनुपरत्वें ज्यांना कोणती एकादी नवीन गोष्ट बोलून अगर करून दाखविण्याची सवड नाहीं, अशा जरख खोडांचा दुसरा वर्ग कल्पितां येईल. बाकी उरला तिसरा वर्ग, हा आंग्लविद्याविभूषित सुजाण तरुणांचा होय. हा काय तो एकटा पुनर्विवाहकार्यास कांहीं उपयोगाचा. पण या वर्गाचें, एकंदर लोकसंख्येच्या मानानें, संख्याबल पडलें फार थोडें. खेरीज साऱ्या जनतेवर या छोटेखानी लोकांचें कितीसें वजन पडणार? आणि ही कायती मंडळी विद्यासागरास पुनर्विवाहाचे कामीं मदत देणार. पण याही मंडळींत बरीच जळ जाणार. तेव्हां अशा चमत्कारिक स्थितींत, केवळ निरुपायामुळें, विद्यासागरांना या कामीं राजाश्रय संपादणें प्राप्त झालें यांत त्यांचा दोष नाहीं. अनुज्ञापक राजनियमानें, जुन्यांचीं तोंडें बंद पडून बरेंच कार्य साधेल, असा त्यांनीं आपल्याशीं अदमास बांधिला. व तोच अखेर खरा ठरला.

पंडितापंडितांचा पुनर्विवाहसंबंधीं शास्त्रीय वाद चालला असतां, एकंदर समाजाला त्यावेळीं एक प्रकारची उकळी फुटली होती. गरीब श्रीमंत, लहानमोठे, बायकापुरुष चटसारे या वाग्युद्धांत आपापल्या शक्त्यनुसार सामील झाले होते. सगळ्यांची एकसारखी चर्चा चालू होती. बंगाली

वृत्तपत्राचे रकानेच्या रकाने ह्या विषयानें भरूं लागले. " तत्त्वबोधिनी " नामक तत्कालीन उत्तम मानिलेल्या मासिकांत विद्यासागरांच्या पुस्तकाचा समग्र उतारा केला होता. त्यावेळच्या बंगाल्यांतील कवींनीं व भाटांनीं कित्येक कविता व कवनें रचून प्रसिद्ध केलीं. जेथें तेथें ह्या कविता व गाणीं ऐकूं येऊं लागलीं. तीं ऐकून लोकांना फार गमत वाटे; घटकाभर त्यांची करमणूक होई. तत्कालीन बंगाली कवींतला अग्रणी ईश्वरचंद्रगुप्त हा विद्यासागरांचा परम मित्र होता. यानेंसुद्धां ह्या विषयासंबंधानें कवित्व-रचना केली. त्याचप्रमाणें आजपर्यंत होऊन गेलेल्यांत अतिशय विख्यात असा भाट दाशरथिराय यानें आपली अलौकिक कविताशक्ति प्रकट करून पुष्कळ लावण्या व चुटके रचिले, आणि ते तो गाऊन दाखवी व लोकांना हसवी. हेंचसें काय पण कोळीमाळी, कुणबमिजुर, चट साऱ्या लोकांना हीं गाणीं ह्मणण्याचा व चेष्टा करण्याचा छंदच लागला होता. ह्यापैकीं कांहीं कवनें शांतिपुरी सणंगावर झळकूं लागलीं. ह्याप्रमाणें सर्वांनीं चोहींकडून विद्यासागरावर कडाका उडविला. परंतु ह्या खोडसाळ मर्मभेदक टीकांना व चेष्टास्पद चुटक्यांना विद्यासागरानें भीक घातली नाहीं. विद्यासागर मोठा धैर्यवान्, दृढनिश्चयी, कार्यनिष्ठ, व अत्यंत दक्ष पुरुष होता. यत्किंचित्‌ही कच न खातां, त्यानें ह्या सत्कार्याचा अखेरपर्यंत पिच्छा पुरविला, व शेवटीं कार्य तडीस पोंचविलें. तोंपर्यंत ह्या प्राण्यानें क्षणमात्र विश्रांति अनुभविली नाहीं.

---

# पुनर्विवाहग्रंथाचें इंग्रजी भाषांतर.



पुनर्विवाह विषयावर विद्यासागरांचा देशी भाषेत दुसरा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर ते मग कधीं या विषयाच्या वादांत फारसे पडले नाहीत. त्यांनीं आपल्या ह्या दोन्हीही बंगाली ग्रंथांचा मजकूर आंग्लभाषेंत आणिला. इंग्रेजींत स्वकृतीचें भाषांतर करण्याचें कारण असें झालें कीं, कित्येक आंग्लभाषाभिज्ञ प्रतिपक्षीय बंगाली बाबूंनीं इंग्रेजी ' रिव्यूज ' आणि ' जर्नल्स ' कडे धांव घेऊन सुज्ञ इंग्रेजांची प्रस्तुत विषयासंबंधानें भलतीच समजूत करून सोडण्याची खटपट केली. तेव्हां जात्याच स्वातंत्र्यप्रिय व समंजस अशा सुशिक्षित इंग्रेजांचा विनाकारण गैरसमज न व्हावा व हिंदुधर्मांतील खरा शास्त्रार्थ ह्या प्रकरणीं त्यांस समजण्यास मार्ग व्हावा ह्मणून बंगाली ग्रंथाचाच इंग्रेजी तर्जुमा करणें पंडितजीस प्राप्त झालें. यांत जो विषय केवळ बाबूंना मात्र लागू, इतरांना ज्याचा तादृश उपयोग नाहीं असा भाग बाद करून जो परदेशीयांना उमगेल व फायदेशीर होईल त्याचेंच फक्त इंग्रेजींत भाषांतर केलें. मुळांतील चौदा प्रकरणें गाळून, परकीयांना समजतील अशीं फक्त अकरा, इंग्रेजी भाषांतरांत आणिलीं आहेत. ह्या इंग्रेजी भाषांतरामुळें बंगालीभाषा न जाणणाऱ्या बंगेतर प्रांतस्थ लोकांना मोठा लाभ झाला. इंग्लिशभाषा बहुतेक सर्व भरतखंडभर चालू असल्यामुळें ह्या शास्त्रीय ग्रंथाचा स्वाद घेण्यास सर्वांस सारखी सवड सांपडली आहे. हे पंडितजींचे सर्व प्रांतांतील पुनर्विवाहेच्छु गतभर्तृकांवर एकप्रकारें फार उपकार आहेत.

---

# राजशासनाचा विचार.



ह्या इंग्रजी भाषांतराच्या प्रती विद्यासागरांनीं प्रख्यात मुत्सद्दी लोकांकडे व राजतंत्री सभांकडे पाठवून दिल्या. त्यांतच एक प्रत " ब्रिटिश इंडियन ॲसोशिएशन " नांवाच्या राजकारणी मंडळीकडे त्यांनीं धाडली. शिवाय सोबत धाडलेल्या पत्रांत विनंति केली कीं, ॲसोसिएशननें आपल्या शिफारशीनिशीं हें भाषांतर विलायत सरकाराकडे रवाना करावें. कारण पुनर्विवाहप्रतिबंधक जुलमी व्यवस्था विलायत सरकारच्या न्यायी नजरेस आणणें अत्यंत अवश्यक आहे. कांतर आपल्या लोकांस आपला स्वत:चा दोष दिसत नाहीं. समाजांत असलेल्या दुष्ट चालीबद्दल कोणी दयाळू समजुतदार मनुष्यानें आर्जवानें नीट समजावून सांगितलें तरी त्यांना धड उमगत नाहीं. बरें, स्वज्ञातींतील लोकांनीं ऐकिलें नाहीं, त्यांनीं कितीही दुष्ट रुढीला पोटाशीं कवटाळून बसण्याचा हट्ट धरिला, तरी ज्ञातींतील शहाण्या समजुतदार समाजाग्रणीला उगें राहवेल काय? राक्षसी भयंकर चालींच्यामुळें नित्य घडत असलेल्या भ्रूणहत्या, बालहत्या, आत्महत्या, इत्यादि मोठालीं पातकें त्याला पहावतील काय? त्याला नकोका उपाय योजायाला? कारण लोककल्याणाची व्यवस्था व त्यांचे नुकसानीची जोखीम त्याचे शिरावर आहे. समाजाच्या बऱ्यावाईटाचा जाब कोणी झालें तरी या लोकनायकालाच पुसतील. निरंकुश फालतु लोकांना काय त्याचें? देशांतील समाज आपण होऊन नीट रीतीनें चालत नसला, व बऱ्या बोलानें सांगिल्याप्रमाणें वागेनासा झाला, ह्मणजे कर्त्या पुढारी पुरुषाला नाइलाजास्तव राजशासनाच्या आश्रयानें समाजाचें कल्याण साधणें भाग पडतें. देशाचें खरें हित करून देणें हेंच त्यांचें ब्रिद. तें करून सोडायाचेंच, ही त्यांची दृढ प्रतिज्ञा. आतां, हें हित सौम्योपायेंकरून साध्य झाल्यास ठीकच, तसें नच घडेल तर तीव्र उपायांची योजना करणें भाग आहे. शरीरस्थ रोग काढ्या-

पथ्यानें, बाटलींतल्या पाण्यानें, पुड्यांनीं गोळ्यांनीं बरा झाला तर बरेंच ; नाहीं तर, इंग्रेजी वैद्य तीक्ष्णशस्त्रांच्या मदतीनें, तो तावडतोब बरा करून सोडितो. ही आपल्या नेहमींच्या अनुभवांतली गोष्ट आहे. तद्वत्च समाजशरीरांतील रोग ह्मणजे फार दिवसांच्या अंगीं खिळून गेलेल्या घाणेरड्या वाईट खोडी, दुष्ट चालीरीती, अप्रशस्त व पक्षपाती प्रघात, इत्यादि पार एका निमिषार्धात बंद करून टाकण्यास राजशासन हेंच तीव्र शस्त्र पाहिजे. याखेरीज अन्य बलवत्तर व कार्यकारी उपाय आजपर्यंत उपलब्ध झाला नाहीं. तीव्र शस्त्रप्रयोगावाचून समाजांतील असले पिढीजादी घरंदाज रोग कधींही नष्ट व्हावयाचे नाहींत.

विद्यासागरांची प्रथम अशी समजूत होती कीं, समाजांतील एकंदर लोकांची केवळ धर्मशास्त्राबरहुकूम वागण्याची प्रवृत्ति आहे; त्यांचा शास्त्रान्वयें सदा वर्तन ठेवण्याचा कल आहे. तेव्हां तसा त्यांचा झोंक पाहून, धर्मशास्त्रांतील वचनांचा आधार दाखवून विषयप्रतिपादन केलें असतां, आणि पुनर्विवाह पूर्णपणें धर्मशास्त्रसंमत आहे, असा सप्रमाण सिद्धांत ठरविला असतां, हेच धार्मिक शास्त्री व त्यांचे अनुयायी पुनर्विवाहप्रकरण मुक्तकंठानें ग्रहण करतील. त्यांना पहिल्यांदा असें वाटलें कीं, शास्त्रांत पुनर्विवाहाला आधार आहे, ही गोष्टच या लोकांना ठाऊक नाहीं, ह्मणून हे प्रतिकूल आहेत; पण जर शास्त्राधार दाखवून दिला, तर हे पुनर्विवाहाला आनंदानें रुकार देतील. पण ही निर्मळ, भोळी, सरळ मार्गी समज काय कामाची? भल्यांची ही दुनिया नाहीं. लोक पडले मतलबी, कपटी, पक्षपाती, व स्त्रियांच्या स्वातंत्र्यसुखाचा हेवामत्सर करणारे! तेव्हां, अर्थात्च विद्यासागरांची अटकळ चुकली. त्यांस एक निराळेंच तत्व समजून चुकलें कीं, समाजाचें धोरण, आपल्यास चुकीनें भासतें तसें, धर्माकडे नसून, वेळेस पथ्यावर पडेल त्या रूढीकडे आहे. हें लक्षांत येऊन त्यांना अत्यंत विषाद झाला. जीवाचा चडफडाट होऊन त्यांनीं वारंवार ह्मणावें, ' अरेरे मुख्य दैवत धर्मशास्त्र; पण त्या धर्माला भिऊन वागणारीं हीं **माणसें** नाहींत; हीं

सारीं रुढी लांडगीनें भेडावून सोडिलेली, व तिच्या कह्यांत वागणारीं बिचारीं वेडींखुळीं मेंढरें आहेत. यांना स्वतःला धर्मशास्त्राचें ज्ञान नाहीं, यांना सांगितला अर्थ धड कळत नाहीं, उदार बुद्धीनें दिलेली मसलत यांना पटत नाहीं, यांच्या अंतःकरणांत दयेचा लेश नाहीं, यांना पुढाऱ्यांचें ऐकावयाचें नाहीं, तेव्हां अशा चमत्कारिक स्थितींतून ह्या आचरट लोकांना सन्मार्गावर आणून सोडण्यास कांहीं वेगळेंच संधान बांधिलें पाहिजे, तिऱ्हाइताकडून कान टोचविला पाहिजे, त्यावांचून सोय नाहीं, असा विद्यासागरांनीं आपल्या मनाशीं बेत ठरविला.

ह्या बेताप्रमाणें ईश्वरचंद्रानीं कलकत्त्यांतील मोठमोठ्या सरकारी कामगारांच्या व मुत्सद्यांच्या भेटी घेऊन पुनर्विवाह विषयाबाबद सल्ला-मसलत पुसली. कायदा करण्याविषयीं गोष्टी निघाल्या. सरकार-दरबारांत विद्यासागरांचें चांगलें वजन होतें. त्यांस मोठी मान्यता होती. दरबारांत वागलेल्या वजनदार साहेब लोकांशीं त्यांचा भारी परिचय होता. ह्यामुळें हें काम होण्यास त्यांस मुळींच अडचण पडली नाहीं. तथापि एकंदर लोकमताच्या विरुद्ध एकादा राजनियम मंजूर करणें राजपक्षास मोठें धोक्याचें असतें. आणि, बरें, इतकें संकट पत्करून व येवढें साहस करून, कायदा करावाच असा सरकारचा स्वतःचा कोणता त्यांत लाभ होता? तेव्हां अशा स्थितींत, सरकार-पक्षाची ह्या जनविरुद्ध विषयाविषयीं धर्मशास्त्राची संमति असल्या-बद्दलची पूर्ण खात्री करून देण्यास मूळ बंगाली ग्रंथाचें इंग्रेजी भाषां-तरच फार उपयोगी पडलें. खेरीज पूर्वीं वर्णिल्याप्रमाणें वंगेतर लोकांना पुनर्विवाहशास्त्रज्ञानाचा लाभ घडला तो वेगळाच.

ह्या भाषांतरामुळें, गुलामांचा व्यापार बंद पाडणाऱ्या व स्वभावतःच स्वातंत्र्यप्रिय अशा आंग्ल कामगारांना चांगल्या रीतीनें उमगलें कीं, एतद्देशी-यांना नुसत्या विद्यादानानें माणुसकी अगर मनुष्यास शोभा आणणारे सद्गुण प्राप्त होणें कठीण. यांना विद्येच्या दानाबरोबरच असाधुरीतिप्रतिबंधक आणि साधुरीत्युत्तेजक व अनुज्ञापक अशा कायद्यांचीं लोढणीं यांच्या

गळ्यांत बळेंच बांधिलीं पाहिजेत. सरकारपक्षास पूर्ण भरंवसा होता कीं, संस्कृतविद्या शिकविल्यानें लोक आपण होऊन धर्मशास्त्राधारें आपली नैतिक, धार्मिक, व सामाजिक सुधारणा करून घेतील असाच ईश्वरचंद्राचाही खास अभिप्राय होता; व आपल्या संस्कृत भाषेंत सांठलेले धर्म, नीति, गृहाचार इत्यादिविषयक ज्ञानभांडार आयतें आपल्या देशबांधवांस प्राप्त व्हावें व त्यांत कालानुरूप आणि स्थित्यनुरूप अवश्य व इष्ट असे फेरबदल करून नवीन रचलेले श्लोक त्यांना घालितां यावेत या हेतूंस्तव कलकत्ता विश्वविद्यालयांतून संस्कृत हद्दपार करण्याचा मार्गे एकदां प्रश्न निघाला असतां ईश्वरचंद्र गीर्वाण वाणीचा कैवार घेऊन भांडले. राजपक्षीय मुत्सद्यांस वाटलें कीं नेटिव लोक आपली सुधारणा करून घेतील व या असल्या किरकोळ घरगुती भानगडींत ढवळाढवळ करण्याची हे गरीब हिंदुलोक आह्मास नसती यातायात पडूं देणार नाहींत. ह्मणून ईश्वरचंद्राचे शब्दास मान देऊन संस्कृत भाषा विश्वविद्यालयांत तशीच चालू ठेविली. पण हा सरकारचा व विद्यासागरांचा दोघांचा अदमास अगदीं चुकला.

---

# पुनर्विवाहशासनाबद्दल विनंतिअर्ज.

ईश्वरचंद्रांनीं बंगाली भाषेंत पुनर्विवाह विषयावर समग्र ग्रंथरचना करून, आपल्या स्वदेशबंधुभगिनींना विधवाविवाह हा काय विषय आहे, धर्मशास्त्राचा त्याबाबद काय अभिप्राय आहे, हें दाखवून दिलें; आणि त्यांनीं प्रजापक्षाला या गोष्टीसंबंधानें नीट विचार करावयास लाविलें. त्याचप्रमाणें इंग्रेजी भाषांतराच्यायोगानें इंग्रेज लोकांचें मत या विषयासंबंधानें जागृत केलें. तदनंतर वर सांगितल्याप्रमाणें, सरकारी कामगारांचा विचार घेऊन, त्यांनीं पुनर्विवाहाचा कायदा हवा ह्मणून १०।११ कलमांचा एक विनंति अर्ज लिहून, ता० ४ आक्टोबर सन १८५५ रोजीं, हिंदुस्थान सरकाराकडे पाठविला. ह्या अर्जावर सुमारें हजार अधिक सुशिक्षित जबाबदार लोकांनीं सह्या केल्या होत्या, हें विशेष होय. कारण पुनर्विवाहाच्या कायद्याची मागणी ज्या कागदांत केली आहे त्यावर आपलीं नामाक्षरें लिहिणें कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. हें हात तोडून देणें बरेंच धोक्याचें व जोखमीचें काम आहे. असल्या अर्जावर सह्या देणारांची पुनर्विवाह कार्याविषयीं बरीच कळकळ व तदनुरूप प्रसंग पडल्यास वागण्याची सिद्धता असली पाहिजे हें उघड आहे. ही अर्जी व सही ह्मणजे गाजराची पुंगी नव्हे किंवा सहज चहापाणी झोंकून देण्याची गोष्ट नव्हे. नुसती कागदी संमति देणेंसुद्धां मोठें धाडसाचें आहे. असा विचार करतां आज ५० वर्षांपूर्वीं पुनर्विवाह कायद्याचें अर्जावर एक हजारापेक्षां जास्त सह्या झाल्या ही भारी मोठी गोष्ट समजली पाहिजे. ह्यावरून ईश्वरचंद्राच्या ग्रंथाची सुशिक्षितांच्या मनावर बरीच छाप बसली होती, असें निर्विवाद सिद्ध होतें. जी गोष्ट लोकांना आधींच पसंत आहे, तिच्याबद्दल सह्या घेणें कांहीं दुर्घट नाहीं. कांतर बाजार गुजरीच्या आधारांत, सरकारी वा सावकारी ऑफिसांच्या दारांत अगर स्कूलकॉलेजांच्या फाटकांत, दौत लेखणी घेऊन क्षणभर उभें राहिलें असतां, सह्याच सह्या! वाटेल त्या अर्जावर वाटतील तितक्या

सह्या मिळविण्यास कांहीं अडचण पडत नाहीं. पण हा प्रकार पुनर्विवाहादि जनविरुद्ध विषयास उपयोगी पडत नाहीं. कारण या विषयाचेसंबंधानें होय ह्मणण्याचा कोणासही झालें तरी अंमळ विचारच पडतो.

अस्तु; तेव्हां असा हजार सह्यांचा विनंतिअर्ज हिंदुस्थान सरकारच्या कायदे कौन्सिलांत रुजू केला. याचा सारांश येणेंप्रमाणें:—१ फारा दिवसांच्या प्रघातामुळें लोकांस पुनर्विवाहाची मनाई आहे. २ ह्या मनाईमुळें लोकांच्या नीतीस धक्का पोंचून समाजाचें नुकसान होईल, अशी धास्ती वाटते. ३ बालविवाहामुळें तर ह्या दुष्ट चालीचा खोडसाळपणा जास्तच वाढला आहे. कारण नीट समजूं लागण्यापूर्वींच कित्येक मुली विधवा होऊन बसतात. ४ ही पुनर्विवाहप्रतिबंधक चाल शास्त्राबरहुकूम नाहीं; अथवा हिंदुधर्माच्या खऱ्या अर्थास धरून नाहीं. ५ विधवांचीं लग्नें लावण्यास हरकत नाहीं असा पुष्कळांचा अभिप्राय आहे. धर्मशास्त्राचे भलते भलते अर्थ काढून पुनर्विवाहास कोणी नड आणल्यास ती दूर करण्यास अगर ती बाजूस ठेवण्यास बरेच लोक आज तयार आहेत. ६ न्यायाच्या कचेरींत असलीं पुनर्लग्नें बेकायदेशीर व त्यापासून झालेली संतती बेवारस ठरूं पाहते. ७ तेव्हां ज्या हिंदुलोकांना पुनर्विवाह करण्यास अडचण वाटत नसेल, व शास्त्राच्या जुन्या अर्थान्वयें पुनर्विवाह जरी पसंत नसला, तरी तो ज्यांना ह्मणून सुसंमत वाटत आहे, व तो करण्यास जे सिद्ध आहेत, त्यांना कायद्याची अनुज्ञा असावी. ८ लोकांस ज्या अडचणी वाटतात, त्या निवारण्यासाठीं सरकारानें झटणें इष्ट आहे. ९ बेकायद्याचा अडथळा दूर केल्यास, पुनर्विवाह अनिष्ट मानणारांस कांहीं अपाय न होतां, पुनर्विवाहेच्छूंस नवीन कायद्याची मदत मिळून त्यांचें कार्य साधेल. १० जगांतील कोणत्याही देशांत अथवा राष्ट्रांत, पुनर्विवाह निसर्गविरुद्ध अगर शास्त्रनिषिद्ध मानले जात नाहींत. ११ तेव्हां कायदा करण्याची किती अवश्यकता आहे याचा सरकारनें विचार करावा.

---

# कायदा मागणें भाग पडलें.

ईश्वरचंद्रांनीं श्रुतिस्मृतिपुराणांतून आधार देऊन, पुनर्विवाह सशास्त्र आहे असें सिद्ध केलें खरें; पण येवढ्यानें काम भागेना. कारण यद्यपि पुनर्विवाह, जिवापाड यातायात करून, धर्मसंमत ठरविला, तरी राजकीय न्यायासनासमोर तो धर्मशास्त्राच्या चुकलेल्या जुन्या अर्थान्वयें बेकायदेशीर ठरे. त्यामुळें एखाद्या क्षनें, समजा, पुनर्विवाह केला, आणि त्यास ह्या पुनरूढेपासून पुत्रसंतान झालें; आणि जर क्षच्या ह्या पुत्रांखेरीज इतर वारसानें हरकत घेतली, तर क्षचा वित्तविषय ह्या औरस परंतु पौनर्भव पुत्रांना मिळण्याची पंचाईत पडे. तसेंच एखाद्या स्वार्थसाधु दुष्ट आप्तास आपल्या नात्यांतील कोण्या सधन विधवेचा तिच्या मृतपतीच्या इस्टेटीवरील वारसा बुडवायाचा असल्यास, त्यानेंसुद्धां अमुक विधवाबाई पुनर्विवाहास सिद्ध आहे, सबब तिला इस्टेट मिळूं नये, असा न्यायासनीं खुशाल अर्ज पाठवावा; व पुढें तिची पुनर्विवाहाची सिद्धता--जुन्यामतें धर्मबाह्यता--जरकरितां सिद्ध झाली, तर त्या बिचारीचा ऐवज घोंटाळ्यांत पडावा. ह्या अन्यायामुळें, ह्या पक्षपातामुळें, ह्या पुरुषजातीच्या दुष्टपणामुळें, स्त्रीपुनर्विवाह कांहीं नियमित आपत्तींचे प्रसंगीं, धर्मपुस्तकांत सप्रमाण सिद्ध असल्याचें लिहिलें असून नसून सारखेंच होई. त्या लेखांचा विधवांस तादृश कांहीं उपयोग अगर फायदा होईनासा झाला. अशा अनेक अडचणी उत्पन्न होऊं लागल्यामुळें, सरकारापाशीं नवीन कायदा मागणें ईश्वरचंद्रास जरूर पडूं लागलें. पुनर्विवाहाबद्दल लखलखीत, स्वतंत्र, व स्पष्ट अशा कायद्याचे अभावी पुनर्लग्न बेकायदेशीर ह्मणजे विवाहसंस्कारच नाहीं असें ठरूं पाही. ह्या चमत्कारिक अन्यायाचा विलक्षणपणा मोठा लक्षांत घेण्यासारखा आहे. जर एखादी विधवा धडधडीत दुराचारी व बदफैली निघाली, तर तिचा पतिप्राप्त ऐवज तिच्यापाशीं कायम राहूं शकतो; पण तीच जर धर्मास

भिऊन वागेल, आणि पापाचरण न करितां, शास्त्राप्रमाणें देव, अग्नि व ब्राह्मण यांच्या समक्ष पुनर्विवाहसंस्कार करून घेईल, तर मात्र पूर्व-पतीच्या पैक्यास अलबत मुकेल. पण नवल कशाचें? विधुरांची गोष्ट घ्याना? जर ते परजातीची वेस्वा घरांत ठेवून राहतील, तर असले वेश्यागमनी पवित्र ब्राह्मण, वकील, वैद्य, वगैरे धर्मशास्त्रानें पंक्तीस उत्तम, प्रकारें चालतात; आणि उलट त्यांचे घरीं याज्ञिक, शास्त्री, पुराणिक आपण होऊन संतोषानें चालून जातात. तात्पर्य, थोडक्यांत अगदीं उघड करून लिहायाचें ह्मणजे असें कीं, लोकांस व्यभिचार खपतो, पण ऋषिप्रणीत धर्मसंस्कार रुचत नाहीं. हें दुर्व्यसनप्रेम व ही सद्धर्मावरील अश्रद्धा ज्या दिवशीं नष्ट होईल तो सुदिन समजायाचा. अस्तु, वरील चमत्कारिक अडचणीमुळें, कायदा मागण्याची स्वाभाविकपणें किळस येत असतां, तो मागावा लागला.

---

# पुनर्विवाहाचा कायदा झाला.

पुनर्विवाहाचा कायदा हवा, त्यापासून विधवा दुःखमुक्त होतील अशा अर्थाचे सुमारें २० अर्ज हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांतून आले. आणि सुमारें १० अर्ज स्त्रीजातीचा हेवा करणाऱ्यांकडून आले. येवढ्यांत जरी बहुमत पाहिलें तरी दुप्पटीचीं ठिकाणें पुनर्विवाहाला अनुकूल आहेत. नुसत्या स्थानसंख्येवर न जातां न्यायी व गुणी व भलीं माणसें ज्या पक्षांत आहेत तोच पक्ष दयाळु सरकार पत्करणार. याप्रमाणें हजारो लोकांकडून आणि विशेषतः ईश्वरचंद्राकडून आलेल्या अर्जाच्या धोरणानें नामदार ग्रँट साहेब यांनीं तारीख १७ नोव्हेंबर १८५५ रोजीं पुनर्विवाहकायद्याचा मसुदा तयार करून लेजिस्लेटिव कौन्सिलपुढें वाचून दाखविला व मसुद्यांतील मुद्यांचे समर्थनार्थ जुनीं व नवीं ऐतिहासिक प्रमाणें दिलीं. कायदा हवा अशाबद्दलची खटपट किती जुनी आहे हेंही त्यांनीं दर्शविलें. हल्लीं असलेला कायद्याचा प्रतिबंध दूर केला असतां, सुशिक्षित तरुणांना आपलीं नांवें सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत आणण्यास एक सुसंधि प्राप्त होईल. एक मोठा अन्याय होत असलेला दूर होईल. इतकी सवलत देऊन निष्ठुर पालकांच्या दुराग्रहामुळें फारसे पुनर्विवाह न झाले, व एकच एक जरी झाला तरी कायदा मंजूर केल्याचें साफल्य झालें. न्यायदेवता संतुष्ट झाली ह्मणजे सर्व भरून पावलें. अशा थोर व उदात्त तत्त्वांवर कायद्यांची मांडणी केली. कौन्सिलांत बराच खल झाला. मसुद्याचें तिवार वाचन होऊन, खालीं लिहिलेला कायदा तारीख २६ जुलै सन १८५६ रोजीं हिंदुस्थान सरकारनें पसंत केला.

## सन १८५६ चा १५ वा कायदा
## ( पुनर्विवाहप्रतिबंध निवारणार्थ. )

ईस्ट इंडिया कंपनीचे राजसत्तेखालीं आणि ताब्यांतील मुलुखामध्यें स्थापन झालेल्या दिवाणी कोर्टांत चालू असलेल्या कायद्याप्रमाणें ज्या

अर्थी असें सर्व लोकविदितच आहे कीं, कांहीं अपवाद खेरीजकरून, हिंदु विधवांना त्यांचा एकदा विवाह होऊन चुकला असल्यामुळें दुसरें कायदेशीर लग्न करितां येत नाहीं, आणि असल्या विधवांची फिरून एखाद्या दुसऱ्या लग्नापासून झालेली संतती बेकायदेशीर आणि वडिलार्जित वित्त-विषयास बेवारस अशी समजलेली आहे; आणि ज्या अर्थी पुष्कळ हिंदूंचा असा अभिप्राय आहे कीं, कायदेकानूमधील हा गणलेला कमी-पणा—हें मानीव व्यंग यद्यपि परंपरागत रूढीला धरून आहे, तथापि आमच्या हिंदुधर्मशास्त्रांतील विधिवचनांच्या सत्यार्थास धरून नाहीं व ज्या अर्थी त्यांची अशी इच्छा आहे कीं, ज्या लोकांना आपल्या सद्-सद्विवेकबुद्धीप्रमाणें नवीन निराळी पद्धति अनुसरणें असेल त्यांस तसें वागण्याचा अधिकार असणें इष्ट आहे, त्या अर्थी लोकांची नीतिमत्ता व सार्वजनिक हितसंबंध वाढत जाण्याकडे ज्या नियमांची प्रवृत्ति होईल असले नियम सिद्ध करणें अवश्य आहे.

१. एकदां पूर्वी लग्न लागलें होतें येवढ्याच कारणावरून कोणत्याही विधवेचा पुनर्विवाह बेकायदेशीर मानावयाचा नाहीं; मग हिंदुधर्म व कोणतीही परंपरागत चाल विरुद्ध असो; अशा पुनर्विवाहाची संतति पूर्णपणें कायदेशीर मानावी.

२. पुनर्विवाहानंतर विधवेचे पहिल्या घरचे सर्व अधिकार व हित-संबंध नष्ट होतील, मात्र पहिल्या नवऱ्यानें मृत्युपत्रांत तिला पुनर्विवाहाची स्पष्ट परवानगी दिली असल्यास मृत्युपत्राप्रमाणें तिचा मिळकतीवर अधिकार राहील.

३. पहिली संतति असल्यास पालकाचा अधिकार पहिले घरच्या मंडळीस राहील.

४. वारसपणाचे हक्क निपुत्रिक विधवेप्रमाणें पुनर्विवाहित विधवेला समजावयाचे.

५. वरील तीन कलमें वगळून पुनर्विवाहित विधवेस प्रथम लग्नाच्या स्त्रीप्रमाणें सर्व हक्क आहेत.

६. हिंदु स्त्रीच्या प्रथम विवाहाचे समयीं जीं विधिवचनें, जे मंत्र-संस्कार व जे कुलाचार इत्यादि प्रकरणें जीं जीं ह्मणून लागतात तीं तीं सर्व विधवेच्या लग्नाचे वेळीं यथासांग करून घेतलीं असतां असला विधवाविवाह बरोबर कायदेशीर होईल. मग ह्या गोष्टी विधवेच्या लग्नास लागू पडत नाहींत असली सबब बिलकुल चालावयाची नाहीं.

७. जर पुनर्विवाह करणारी विधवा वयांत आलेली नसेल, अथवा तीस पतिसंग घडला नसेल, तर तिला पुनर्विवाह करण्यासाठीं पिता, पितामह, माता, वडीलबंधू, किंवा कोणी नातेवाईक पुरुष यांची संमति घेणें अवश्य आहे; पण वयांत आलेल्या अथवा पतिसंभोग घडलेल्या विधवेस पुनर्विवाह करण्यास तिचें स्वतःचेंच मत बस्स आहे; तसें करण्यास ती जात्या पूर्ण अधिकारी आहे. असलीचा पुनर्विवाह कायदेशीर होण्यासाठीं इतर कोणाचा सल्ला घेण्याची आवश्यकता नाहीं.

---

## पहिला पुनर्विवाह.

पुनर्विवाहाचा कायदा मंजूर होऊन, नुकते कोठें चार महिने लोटताहेत नाहींत, तोंच कुलीन ब्राह्मणज्ञातींत एक पुनर्विवाह जमून आला. हा पहिला पुनर्विवाह तारीख ७ दिसेंबर १८५६ रोजीं ईश्वरचंद्राचे छत्राखालीं त्याचे आश्रयानें मोठ्या थाटानें करण्यांत आला. खरोखर पुनर्विवाहेतिहासांत हा दिवस मोठा संस्मरणीय व सोन्याचा होय. वर खंतुऱ्याचे विख्यात पंडित रामधन तर्कवागीश यांचे चिरंजीव पंडित श्रीशचंद्र विद्यारत्न हे होत. हे स्वतः मोठे विद्वान् होते. यांचें घराणें उत्तम कुलीन ब्राह्मणाचें होतें, व यांचा उद्योगधंदा सरकारी जज्जपंडितगिरीचा होता. ही इकडील शिरस्तेदाराप्रमाणें अथवा दप्तरदाराप्रमाणें मोठी हुद्याची व वजनदारीची जागा होती. वधू कुलीन ब्राह्मणज्ञातीची होती. ही पुनर्विवाह समयीं अगदीं लहान ह्मणजे अवघी १० वर्षांची होती. ह्या पुनर्विवाहांत विद्यासागरांनीं फार परिश्रम घेतले, व मोठा टोलेजंग समारंभ केला. हा पुनर्विवाह प्रोफेसर राजकृष्णबानर्जी यांचे वाड्यांत झाला. त्यावेळीं घरासमोर, आसपास व मिरवणुकीचे रस्त्यांवरून लोकांची अतोनात गर्दी झाली होती. सुकीच्या सडकेवर प्रेक्षकांची इतकी दाटी उसळली होती कीं, नवऱ्या मुलग्याच्या पालखीससुद्धां रीघ नाहीं. पालखीच्या दोन्ही बाजूनें कठड्यास धरून विद्यासागर व त्यांचे थोर अनुयायी चालले होते. मंगल वाद्यांचा घोष चालू होता. शोभेसाठीं व व्यवस्थेसाठीं दोन दोन हाताचे अंतरावर शिपाई उभे केले होते. अशी मोठी थाटाची मिरवणूक काढली होती. या प्रसंगीं उलट पक्ष पुंडावा करणार ह्मणून गप्प उठली होती, पण प्रत्यक्ष पंडितजींची कार्यनिष्ठ मूर्ति व काळीं डगलीं दृष्टीस

पडतांच बंडखोर बाबूंचें धैर्य मळालें. याप्रमाणें, हा विवाहसमारंभ निर्विघ्नपणें पार पडला. ह्या पुनर्विवाहाला कलकत्त्यांमधील मोठमोठे नामांकित गृहस्थ आले होते. सरदार रामगोपाळ घोष व नील कमल मूकर्जी, कलकत्ता हायकोर्टचे जज्ज न्यायमूर्ति द्वारकानाथ मित्र, व न्यायमूर्ति शंभुनाथपंडित, आणि बाबु हरचंद्र घोष इत्यादि ठळक मंडळींनी पुनर्विवाह मंडप आपल्या आगमनेंकरून मंडित केला होता. मात्र एक मोहरा हजर नव्हता. पण त्याची पंडित विद्यासागरांनीं त्याच्या तोंडावर चांगली फजीती केली. विद्यासागर रोखठोक बोलून ज्याची चुकी त्यास तत्क्षणींच दाखवून सोडण्यास भीत नसत. हे ह्या मंगलकार्यास गैरहजर रहाणारे गृहस्थ बाबू रामप्रसादराय होत. हे सुप्रसिद्ध सुधारक राजाराम मोहनराय यांचे चिरंजीव होत. रामप्रसादानें ठरीव सांप्रदायाप्रमाणें विवाहमंडपीं येण्याचें प्रथम आश्वासन दिलें. हे मोठ्या बड्या सुधारकाचे चिरंजीव, व ह्मणून सुधारणेच्या मंगलकार्यांत अगदीं घरच्यासारखे, असें समजून, ईश्वरचंद्र विद्यासागर पुनर्विवाह लागायाचे पूर्वीं, फिरून एकदा, रामप्रसादाचे घरीं गेले. रीतीप्रमाणें लग्ननिमंत्रणें झालींच होतीं, पण हा मोठ्याचा मुलगा अंमळ लवकर आला असतां खटपटीला उपयोगीं पडेल, ह्मणून त्यास अगत्यपूर्वक पुनः बोलवून व आर्जवून ह्मणाले “ रामप्रसाद, आटप आतां, लवकरच तूं ये, उगाच उशीर लावूं नकोस, आणि यायचा विसरूं नकोस हो, नाहींतर पहा दुसऱ्या कांहीं कामांत गुंतून राहशील, असें मात्र करूं नकोस; मी पुढें होतों, तूं येच मागोमाग. ” रामप्रसाद पुनर्विवाहाचें दुसरें बोलावणें ऐकतांच टंगळमंगळ करायास लागला. विद्यासागराशीं थोडा वेळ इकडे तिकडे पुनर्विवाहसंबंधीं बोलून झाल्यानंतर मग रामप्रसाद काय ह्मणतो ‘ आपल्याला माहीतच आहे कीं, जें माझे हातून होण्यासारखें आहे, तें करायाला मी सहसा आळस करणारा नाहीं; पण पंडतजी, कायहो करूं, मला पुनर्विवाहास यायचा धीरच होत नाहीं, मला आतां असें वाटतें, या कार्यांत मी पुढाकार न घ्यावा हें बरें. पानसुपारीला मी मुळींच न आलों तर नाहींकां चालणार? ’ हें घरसोडीचें व डळमळीत, भेकड-

पणाचें आणि पाणचटपणाचें बोलणें ऐकून विद्यासागरास मनस्वी चिरड आली. त्याजवर ते संतापून बोलले ' ही राममोहनाची तसबीर येथें भिंतीवर कशाला निष्कारण टांगून ठेविली आहेस, काढ खालीं, पहा-तोस काय, दे हपटून जमिनीवर, टाक फोडून, कर तुकडे; तसबिरी-वरून बापाचे गुण जर शिकावयाचे नाहींत, तर ती नुसती भिंतीस लटकावून ठेवण्यांत हांशील काय. ' एवंच, असले पुनर्विवाहादि सुधारणा-समारंभ ह्मणजे सुधारकांची परीक्षा होण्याचें नामी प्रसंगच होत, असें ह्मटलें पाहिजे. अस्तु.

## मुद्रायंत्राची टीका.

विधवाविवाहाचा प्रघात अगदीं नूतन असल्यामुळें सगळ्यांना एक-प्रकारचें विलक्षण कौतुक वाटे. अनुकूल व प्रतिकूल दोन्ही पक्षांच्या वर्तमानपत्रकारांनीं, व मासिकांच्या संपादकांनीं ह्या पहिल्या पुनर्वि-वाहाची खबर आपापल्या तब्येतीप्रमाणें वर्णिली होती. एकच समारंभ, पण परस्पर विरुद्ध पक्षीयांनीं रुचिपरत्वें खुलवून लिहिला असतां, वस्तु-स्थितीचा कसा विपर्यास घडतो, कसकसा गैरसमज होतो, बखेडा कसा माजत राहतो आणि परस्थ तिऱ्हाइतांना खरा प्रकार कळण्याला किती मुष्कील पडते, हें असल्यासारख्या कोणत्याही प्रसंगीं सहज समजून येतें. अशासमयीं सुज्ञ संपादक ह्मणविणारे गृहस्थसुद्धां सत्यास बेधडक बाजूस ठेवितात. उदाहरणार्थ साध्या ह्मणजे कुमारिका-विवाहांत जीं रणवाद्यें मंगल वाद्यांत मजेनें संपादून जातात, तींच विधवापुनर्विवाहामध्यें मात्र प्रमुखत्वानें रणवाद्यें बनतात. अधिक स्पष्ट करून लिहावयाचें ह्मणजे असें कीं, ताशा, बँड, इत्यादि वाजंत्री जर पुनर्विवाहसंबंधांतील मिरवणुकींत असेल, तर त्याचें वर्णन पुढीलप्रमाणें करण्यांत येतें. " पुढें रणवाद्यांचा घोष चालला आहे " तसेंच " वेश्यांचा नाच चालू आहे " जणू काय वारांगना जेव्हां साध्या

लग्नांत नृत्य करितात, तेव्हां सीतामंडोदरींत मोडतात. तात्पर्य ह्या प्रथमपुनर्विवाहाची वार्ता ' चंद्रिका, ' ' भास्कर, ' ' तत्त्वबोधिनी, ' ' प्रभाकर ' इत्यादि बंगाली पत्रपुस्तकांतून चालकांच्या लिहिण्याच्या निरनिराळ्या चटकदार शैलीप्रमाणें प्रसिद्ध झाली. प्रत्येकाची ढब वेगळी. गौरीशंकर भट्टाचार्य यांनीं पुनर्विवाह पक्षाचें तर्फे लिहावें, तर कवि ईश्वरचंद्र गुप्त यांनीं आपल्या कवित्वाचा अन्यथा उपयोग करावा. विषयाचें अपूर्वत्व व तत्संबंधीं मत्सर लक्ष्यांत आणितां, झाला तसा प्रकार न होता तर मात्र नवल वाटलें असतें.

## पुढील पुनर्विवाह व त्यांस मदत.

ह्या आदिमपुनरुद्वाहांत वधूवरांना वस्त्राभरणें सर्व ईश्वरचंद्रांनीं दिलीं. सगळा लग्नखर्चही पंडितजीनींच केला. येवढी त्यांना ह्या मंगलकार्याची हौस वाटत होती. **पहिला** पुनर्विवाह लागल्यावर दुसऱ्याच दिवशीं **दुसरा** पुनर्विवाह झाला. ह्यांत विधवावधू फक्त १२ वर्षांची होती. हाही मोठ्या थाटानें झाला. पुढें दोन महिन्यांनीं **तिसरा** पुनर्विवाह झाला. ह्या पुनर्विवाहांतील वधूचा प्रथम पति तिच्या वयाच्या दहावे वर्षी निवर्तला. व पुनर्लग्नाचेवेळीं तिला तेरावें संपून नुकतें कोठें चौदावें वर्ष लागलें होतें. फिरून एक महिना जातो नाहीं तोंच **चौथा** पुनर्विवाह झाला. ह्या लग्नांतील मुलगी चौदा वर्षांची होती. ह्या लग्नापासून आदि ब्रह्मसमाजाचे अध्यक्ष बाबू राजनारायणबसू यांनीं पुष्कळ मदत केली व ह्मणून तद्विषयक त्यांस लोकछळ सोसावा लागला. याप्रमाणें एका वर्षांत पहिल्या सपाट्यास चार पुनर्विवाह झाले. यांचा सारा खर्च ईश्वरचंद्रांनीं केला. दुसऱ्या वर्षी आणखी एक पुनर्विवाह झाला. यांतील वधूचें पाहिलें लग्न तिच्या तिसरें वर्षीं झालें होतें. पुढें लवकरच तिचा बालपति मरण पावला, आणि जेव्हां तिचा पुनर्विवाह झाला, तेव्हां तिचें वय पुरतें आठ वर्षांचेंही नव्हतें. ह्या क्रमानें, एकामागून एक असे अनेक पुनर्विवाह झाले. आणि

पुढें जेवढे ह्मणून २९।३० पुनर्विवाह त्यांचे हयातींत झाले त्या साऱ्यांचे प्रसंगीं ईश्वरचंद्र यांनीं कापडचोपड, दागदागिने, जेवणावळी वगैरेचा सर्व खर्च केला. कारण पुष्कळ लोकांनीं मदत देतों, असें ह्मणून ऐनवेळीं गोता द्यावा. बहुतेकांनीं पैशाचे कामांत माघार घेतली, एकजणदेखील आपले वचनास जागला नाहीं. खेरीज ज्यांना खास पुनर्विवाहामुळें, अगर पुनर्विवाहितांशीं संसर्ग ठेविल्यामुळें, अनेक अडचणी प्राप्त होत, त्यांनाही तन्निवारणार्थ द्रव्यादिद्वारा ईश्वरचंद्र नेहमीं मदत करीत ती वेगळीच.

## पुनर्विवाहनाटकप्रयोग.

१८५६ चा पंधरावा कायदा पास झाल्यानंतर, ईश्वरचंद्राच्या कित्येक मित्रांनीं पुनर्विवाहाची चळवळ योग्य दिशेनें चालू ठेवण्यासाठीं अनेक उपाय योजिले. पैकीं नाटकप्रयोग हा मुख्य होय. नामदार न्यायमूर्ति सर रमेशचंद्र मित्र यांचे बंधू बाबू उमेशचंद्र मित्र यांनीं पुनर्विवाह विषयावर एक नाट्यग्रंथ रचिला. याचें नांव विधवा-विवाह-नाटक. या नाटकाचा उद्देश असंमत व आजन्म वैधव्याची निष्ठुर चाल मोडून टाकावी असा होता, व त्याचप्रमाणें, त्याच्या संविधानकाची रचनाही केली होती. यांत प्रथम बंगाल्यांतील पडदा-पद्धतींत, ह्मणजे निरपराध्यांच्या बंदीखान्यांत दिवस कंठणारी एक बालविधवा कल्पिली आहे. मग तिची जाचणूक व हालअपेष्टा वर्णिली आहे. यांतून सुटण्यासाठीं धडपड करीत असतां, ती एका तरुण शेजाऱ्याच्या प्रेमपाशांत गुंतून व त्याच्या नादीं लागून फसलेली आहे. पुढें आपलें पाप लपविण्यासाठीं तिनें आत्महत्येसारखा घोर प्रयत्न केला, पण तोसुद्धां तिच्या दुर्दैवामुळें साधला नाहीं आहे. अशा वेळीं तिला कृतकर्माचा भारी पश्चात्ताप होऊन, व सामाजिक दुष्ट बंधनांचा व क्रूर रुढींचा संताप येऊन, कालग्रास दुःखभरांत भराभर सर्व गोष्टी पोटउकला करून ती बोललेली आहे. व शेवटीं असे अनर्थ अनाथ स्त्रियांवर इतउत्तर गुदरूं नयेत, या बुद्धीनें समाज-हितैषी देशबांधवाना करद्वय जोडून मोठ्या काकुळतीनें विनंति केली

आहे. हा अखेरचा भाग फार बहारीचा बनला असून, करुणरसानें नुसता ओथंबला आहे, व बराच बोधप्रद झाला आहे. या नाटकाचे अगदीं प्रथमचे प्रयोग ९९ च्या प्रारंभीं सुरू झाले. ह्या प्रयोगाच्या प्रसंगीं नाटकांतील रंगभूमीची व्यवस्था सुप्रसिद्ध ईशभक्त केशवचंद्र सेन यांजकडे सोंपविली होती. केशवाला या कार्याची अति कळकळ होती, तेव्हां या विख्यात तरुण वक्तचानें एक भूमिकादेखील घेतली होती. खेरीज या नाटकांत नरेंद्रनाथसेन, कृष्णविहारीसेन, प्रतापचंद्र मुजुमदार यांजसारखे लोकमान्य पुरुष नटले होते. साधारण नियम ह्मटला ह्मणजे, प्रोफेसर कर्वे यांजप्रमाणें, ईश्वरचंद्र नाटक, तमाशे पहाण्यास कधींहि जात नसत. गिरीशचंद्र घोष नामक एका नामांकित नाट्यग्रंथकारानें व नाणावलेल्या नटानें ‘ सीतावनवास ’ नांवाचें नाटक रचून ईश्वरचंद्रास समर्पण केलें होतें. या ग्रंथकार नटानें ईश्वरचंद्र यांस आपला ‘ सीतावनवास ’ प्रयोग पाहण्यासाठीं पुष्कळ वेळां आग्रह केला, पण हे एकदासुद्धां खेळ पाहण्यास गेले नाहींत. परंतु तेच विधवाविवाहनाटक पहाण्यास मोठ्या हौसेनें अनेक वेळां जात असत. ह्या वेळीं हा हृदयद्रावक तमाशा पहात असतांना या दयाळु महात्म्या पुरुषाच्या डोळ्यांतून एकसारखे पाण्याचे लोट चालावेत. इतकी या कार्यावर त्यांची भक्ति असे. या खेळाचें एकंदर संविधानक फार चटकदार साधलें असून, शिवाय खेळांत सोंगें घेणारीं माणसें, येथील माजी आर्योद्धारक मंडळीप्रमाणें साधारणपणें सुशिक्षित व नाट्यकलेंत चांगलीं जाणकार होतीं. ह्यामुळें विधवाविवाह नाटक पहाण्यास कोणी इसम गेला, आणि त्याचे डोळे पाण्यानें भरून आले नाहींत, असें क्वचित्च घडे. सारांश, या सर्वोत्कृष्ट नाटकानें लोकांच्या मनावर बराच अनुकूल परिणाम झाला. यांत केशवचंद्रसेन यांजसारख्या ब्रह्मनिष्ठ, महा साधु व ज्ञानी पुरुषानें पुढाकार घ्यावा हें विशेष होय. या एकाच गोष्टीवरून पुनर्विवाह कार्य किती परोपकारक आणि पुण्यप्रद आहे, ह्याची सहज कल्पना होते. कारण तसें नसतें तर, येवढालीं थोर माणसें पुनर्विवाह नाटकाचे खेळ कधीं खेळतींच ना.

# चिरंजीव नारायणाचा पुनर्विवाह.

चित्ते वाचि क्रियायां च महतां एकरूपता ।
बोले तैसा चाले त्याचीं वंदावीं पाऊलें.

या कोटींपैकीं ईश्वरचंद्र होते. लोक ह्मणत कीं, पुनर्विवाहाबद्दल पंडितजी बरेंच पांडित्य करितात, पण तशी कृति कोठें आहे? पंडितजींचा विवाह व त्यांच्या बंधूंचे विवाह, ह्या कार्याची त्यांचेठायीं आस्था उत्पन्न होण्यापूर्वीं, ह्मणजे बालपणींच होऊन चुकले होते. मुलींवर सुदैवानें व त्यांच्या पूर्वार्जित पुण्याईनें, अल्प वयांत वाईट प्रसंग आलाच नाहीं; येता, तर ते हटकून उपाय करिते. तेव्हां आतां राहिला एकुलता एक मुलगा. याचा प्रौढपणीं पुनर्विवाह होतो कीं, लहानपणीं लहंग्याबरोबर लग्न लागतें, इकडे लोकांचे डोळे लागले होते. मोठ्या लौकिकवान् माणसास, कांहीं बोलणें झालें तर, जपून सावधगिरीनेंच बोलावें लागतें; कारण, बोलल्याप्रमाणें आपले हातून उरकेल कीं नाहीं, याचा त्याला हिशेब पहावा लागतो; आणि समय येऊन ठेपल्यास, कितीही अडचणी असल्या तरी, ह्मटल्याप्रमाणें त्याला करून दाखवावें लागतें, त्यांवाचून त्याचे जिवास चैन पडत नाहीं. पण, हें सर्व खऱ्या थोर पुरुषाचें लक्षण झालें. खोटीं लबाड माणसें बोलण्याच्या कामांत कधींच कमी करीत नाहींत, कां तर, कांहींच करायाचें नसतें, हा मुळीं पूर्वींपासूनच दृढ संकल्प. जेमतेम चारचौघांत ड्डुड्डाचार्याप्रमाणें मिरविनां आलें ह्मणजे झालें. कांहीं करून दाखविण्याची पाळी आली कीं, पाय मागें. असला हा नामर्दपणा विद्यासागरास कधीं शिवलासुद्धां नाहीं. बंधूंची, मुलींची, अगर मुलग्यांची परस्वाधीनची गोष्ट. कारण विवाहाविषयीं त्यांचें मत असें असे कीं, वधू व वर यांनीं केवळ स्वयंप्रेरणेनें परस्परांचे रुचीप्रमाणें विवाह करावेत. त्यांस स्वयंवरपद्धति पूर्णपणें संमत होती असें दिसतें. ते हमेष ह्मणत कीं, वधूवरांच्या जुळवाजुळ-

वीचे कामांत इतरांनीं पडण्याचें प्रयोजन नाहीं. अन्योन्यास जो प्रकार इष्ट तो त्यांनीं करून घ्यावा. असे विवाहपद्धतीबद्दल त्यांचे पूर्ण उदात्त विचार असत. आतां स्वतः ते जर दुर्दैवानें विधुर झाले असते, तर त्यांनीं इकडील पंडित विष्णुशास्त्र्यासारखा पुनर्विवाह खास ठोकला असता. सारांश, पुनर्विवाहकार्याविषयींची त्यांची कळकळ केवळ वरकांती नव्हती, आणि ह्मणूनच त्यांनीं आपल्या एकुलत्या एक पुत्राला–हा प्रथमवर असूनही–पुनर्विवाह करण्याची अंतःकरणपूर्वक संमति दिली. पुनर्विवाहाबद्दल नुसता अनुकूल शास्त्रार्थ सांगणें वेगळें, व प्रथमवर आत्मजाच्या पुनर्विवाहाची मांडामांड करणें वेगळें. पहिलें काम जितकें सोपें आहे, तितकेंच दुसरें कार्य परम दुर्घट आहे.

श्रीसेल कनकल कृष्णनगर येथें पंडित शंभुचंद्र मुखोपाध्याय नांवाचा एक कुलीन, सुशील व पवित्र ब्राह्मण राहत होता. त्यास एक कन्या होती. ह्या कन्येचें लग्न अगदीं लहानपणीं झालें. पुढें दैव प्रतिकूल होऊन, ह्या कन्येचा पति गत झाला. तेव्हां ती गतभर्तृका ह्मणजे बालविधवा झाली. या अनाथ लेकरास बरोबर घेऊन, देवी मुखोपाध्यायी कनकलाहून वीरसिंह गांवीं आली. ह्या दयाळू बाईनें ईश्वरचंद्राचे धाकटे बंधू पंडित शंभुचंद्र विद्यारत्न यांची भेट घेऊन, आपल्या अनाथ कन्येस दाखवून, व मुलीवर पडलेल्या घाल्याची कच्ची हकीकत सांगून, हात जोडून विनंति केली कीं, जर या अनाथ पोरीचा पुनर्विवाह जमवून आणाल, तर फार उपकार होतील. मुलीच्या आईचें हें दत्हृदयद्रावक भाषण श्रवण करून, व या विधवा मुलीची दीन मूर्ति अवलोकन करून, शंभुचंद्र, पुनर्विवाहाचे कट्टे शत्रू असतांही, त्यांस क्षणमात्र दया आली. त्यांनीं पुनर्विवाहसंस्थेचे जनक आपले वडील बंधू विद्यासागर यांस कलकत्त्यास तावडतोब पत्र लिहिलें. त्याप्रमाणें ते तिकडे पुनर्विवाहेच्छु योग्य वराचे शोधास लागले. इतक्या दरम्यानें इकडे विरसिंह येथें अशी आयतीच मौज झाली कीं, ईश्वरचंद्राचे चिरंजीव नारायचंद्र विद्यारत्न यांचें या सुस्वरूप, सुलक्षण,

तरुण विधवाबालिकेवर प्रेम बसलें. परंतु स्त्रीचें सौंदर्य व यौवन यांस भुलून तिजबद्दल कामवशात् आवड उत्पन्न होणें हें निराळें; आणि अल्लड विधवा पोरींचे भयंकर वैधव्यहाल लक्षांत घेऊन, केवळ परोपकार बुद्धीनें प्रेरित होऊन, अशीबरोबर पुनर्विवाह लावणें निराळें. पहिल्याचा आश्रय करून, पुष्कळ पुराण्या पुराणिकांनीं व अर्वाच्य वैद्यवकीलांनीं पंढरपुरच्या यात्रेंत बरीच भर पाडिली आहे. पण दुसऱ्याच्या आश्रयानें, विधवा कन्येचें पाणिग्रहण करण्यास फारच थोड्यांची छाती झाली आहे. पुष्कळांना तसें करण्यास लोकभीति वाटते. पण नारायणास असली भलतीच भीड आवडत नव्हती. त्यानें आपला सुविचार व सद्धेतु प्रांजल बुद्धीनें प्रदर्शित केला. ह्या विधवामुलीबरोबर पुनर्विवाह करण्याचा त्यानें आपला थोर मानस आपले मित्रांपाशीं बोलून दाखविला. पुढें थोड्या दिवसांनीं ही सुवार्ता जेव्हां पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांना समजली, तेव्हां त्यांस जो आनंद झाला तो कांहीं पुसूं नये. लागलीच पुनर्विवाहसमारंभासाठीं, विद्यासागरांनीं मिरझापुर मोहल्यांत कालीचरण घोष यांची वाडी भाड्यानें घेतली. येथें लग्नसाहित्याची सर्व सिद्धता केली. वधू व वर यांस वीरसिंहाहून कलकत्त्यास बोलावून घेतलें.

पुनर्विवाहाचे पूर्वीं चिरंजीव नारायणचंद्र वडिलांस हाणाले—' पिताजी आपल्याप्रमाणें माझे अंगीं असा कोणता अपरिमित विद्यापराक्रम वास करीत आहे कीं, ज्या योगें आपले धवल कीर्तींत मी भर घालीन. मला पक्कें माहीत आहे कीं, पुनर्विवाहोपायेंकरून बालविधवांचें दुःखविमोचन करणें हेंच आपल्या आयुष्यांतील अत्यंत महत्कृत्य होय. आणि या शुभकार्याच्या सिद्ध्यर्थ मला जर हातभार लावितां आला, तर मी आपणा स्वतःला अतिशय कृतकृत्य मानीन. आपण आरंभिलेल्या ह्या पुण्य कृत्याची अशा रीतीनें सांगता झाल्यानें, आपणास अतोनात आनंद होईल, हें मी पूर्णपणें जाणून आहे. इतर गोष्टींत नसली तरी, या कामीं मदत करण्याची माझे

अंगीं अल्पशी पात्रता आहे. पुनर्विवाहसुधारणारणांत, मी कालत्रयींही शत्रूस पाठ दाखविणार नाहीं. तेव्हां निदान ह्या कामांत जर मला तुमचें साहाय्य करण्याचा सुदैवानें प्रसंग आला, तर आज मज-सारखा दुसरा कोण भाग्यवान आहे. शिवाय माझ्या पुनर्विवाहानें आपल्या तद्विषयक लेखांची, भाषणांची व प्रयत्नांची पूर्णता होऊन, आपल्या वैऱ्यांना आपले प्रामाणिकपणाबद्दल व निर्मळ हेतूंबद्दल संशय घेण्यास तिळमात्रही अवकाश उरणार नाहीं. त्यांचीं तोंडें आपोआप बंद होतील. असें हें आवेशयुक्त, सत्य व इष्ट भाषण श्रवण करून, ईश्वरचंद्रास केवढी धन्यता झाली असेल याची वाचकांनींच आपल्याशीं कल्पना बांधावी. छाव्यांचा युद्धोत्साह पाहून नरकेसरीला कौतुक वाटतें; तसाच हुबेहूब हा प्रकार झाला.

हा पुनर्विवाहसमारंभ गुरुवार ता० ११ माहे आगष्ट इसवी सन १८७० मध्यें झाला. विधवावधू श्रीमती भवसुंदरी देवी पुनर्लग्नाचेवेळीं केवळ १६ वर्षांची होती, आणि पंडित नारायणचंद्र विद्यारत्न हे २१ वर्षांचे प्रथम वर होते. ह्या योग्य जोड्याचा लग्नसमारंभ विद्यासागरांनीं मोठ्या थाटमाटानें केला. त्यांनीं आपल्या कुटुंबिनीस ह्मणजे वरमाय-दीनमाई देवी ईस कलकत्त्यास लग्नासाठीं मुद्दामच बोलाविली नाहीं. कारण, न जाणों, ती कदाचित् पुनर्विवाहकार्यास मोडता घालील घरची इतर मंडळी, व विशेषतः बंधू शंभुचंद्राची स्वारी, ह्या गोष्टीचे अगदीं विरुद्ध होती हें सांगायास नकोच. चिरंजीव नारायणाचा पुनर्विवाह करूं नये, त्यानें हट्टानें केल्यास त्यास सहानुभूति दाखवूं नये, आपली संमति देऊं नये, एतद्विषयीं शंभुचंद्रानीं ईश्वरचंद्र यांस आग्रहपूर्वक पत्र धाडिलें होतें. त्याचें उत्तर विद्यासागरांनीं, मंगलकार्य निर्विघ्न पार पडल्यानंतर, चार दिवसांनीं लिहून पाठविलें. हें उत्तर फार शांतरीतीचें, अतिशय सरळ, आणि बरेंच स्पष्ट आहे. कधींकाळीं आप्तइष्टांनीं पुनर्विवाहासारख्या परम शुभकार्यास हरकत आणिली असतां, त्यांस कसा चोख जबाब द्यावा, ही विद्या ईश्वरचंद्राच्या ह्या

एका पत्रावरून शिकण्यासारखी आहे. खालीं दिलेल्या पत्राचा नित्य प्रातःकाळीं पाठ केला असतां, रूढिहडळीची सहसा बाधा होणार नाहीं. तेव्हां पुनर्विवाहहितेच्छूंनीं या ईश्वरप्रणीत पत्राचें वारंवार पठण करीत असावें.

" चिरंजीव शंभुचंद्र यांस, अनेक आशिर्वाद; उपरि येथील क्षेम असो विशेष. आपलें पत्र चिरंजीव नारायणाचा पुनर्विवाह न करणें-विषयीं आलें तें पावलें; लिहिला मजकूर समजला. आपण पत्रीं लिहितां कीं, जर नारायणानें पुनर्विवाह केला, तर आपले स्वज्ञाति-बांधव व इष्टमित्र कोणीही आपल्याशीं पंक्तिव्यवहार करणार नाहींत. ते आपल्याला जातिबहिष्कृत करतील. तेव्हां यासंबंधानें मला येवढेंच लिहावयाचें कीं, नारायण जें विधवेबरोबर लग्न करीत आहे तें तो आपल्या अंतःकरणाच्या प्रेरणेनें करीत आहे, यांत माझे सांगी-शिकवणीचा मुळींच भाग नाहीं. आतां ज्यावेळीं माझ्या कानीं आलें कीं, नारायणाचा विधवेशीं लग्न करण्याचा निश्चय झालेला आहे, व त्यानें आपल्या पसंतीनें एका विधवावधूची निवडही केली आहे, तेव्हां ह्या योजनेला आनंदानें मान डोलविल्यावांचून माझ्यानें राहवेना. ह्या गोष्टीचा प्रतिकार करण्याची मला सोयच नव्हती. ह्या पुनर्विवाहांत मला कधींही खो घालतां आला नसता. कारण आपल्यास पूर्णपणें माहीतच आहे कीं, पुनर्विवाहसंस्थेचें जनकत्व मजकडे येतें, व त्या थोर पदास शोभेल अशा रीतीनें म्यां पुनर्विवाहशास्त्र सिद्ध केलें. येवढेंच करून स्वस्थ बसलों नाहीं, तर योग्य अशा वरांबरोबर पुष्कळ विधवांचीं लग्नें मोठ्या थाटानें व हौसेनें मीं आजतागायत लाविलीं आहेत. अशी खरोखर एकंदर स्थिति असतां, जर माझ्या मुलग्यानें आज पुन-र्विवाह न करितां, कुमारिकेशीं लग्न लाविलें असतें, तर मात्र मला या जगामध्यें चारचौघांत वर तोंड काढण्यास जागा न उरती. थोर संभा-वित लोकांनीं माझी छीः थुः केली असती. व साधारण बायकापोरांनीं-सुद्धां माझी फटफजिती करून माझे मुखीं गोमय कोंबलें असतें. माझे आचरणांत प्रामाणिकपणा बिलकुल नसून, माझें वर्तन दुटप्पीपणाचें आहे,

अशी साऱ्यांची एकसहा अनिष्ट समजूत झाली असती, हें बरें झालें नसतें. नारायणाचा विधवेशीं योग जुळून आल्यानें, एतत्कार्यसंबंधीं माझे लौकिकास अधिक खुलावट आली. माझा सत्पुत्र ह्मणवून घेण्यास तो या विधवोद्वाहानें पूर्ण अधिकारी झाला. कां ह्मणालं तर, माझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाचें, पुण्यकारक व परोपकारक धार्मिक कृत्य ह्मटलें ह्मणजे, ब्राह्मणज्ञातींत विधवा स्त्रियांच्या पुनर्विवाहाचें संस्थापन हें होय. ह्यापेक्षां अधिक चांगलें, अधिक लोकोपयोगीं, अधिक पुण्यप्रद इतर कांहीं कार्य इतउत्तर माझें हातून घडेल असें मला वाटत नाहीं. ह्या शुभकार्याच्या प्रसारासाठीं, मी आपला पैसानैपैसा खर्च केला आहे. फार काय प्रसंग पडल्यास, पुनर्विवाहाप्रीत्यर्थ आपला स्वतः चा मुखवटा खालीं उतरून ठेवण्यासही मी तयार आहे! मग यापुढें ज्ञातिबहिष्काराची व लोकप्रवादाची कथा काय? उलट लोकांस भिऊन, नारायणाचे पुनर्विवाहास म्यां हरकत घेतली असती, तर मजसारखा भेकड, लबाड व नीच मीच—दुसरा कोणी नाहीं, असें होऊन गेलें असतें.

सारांश, नारायणानें कोणाचे शिकवणीची वाट न पहातां, केवळ स्वयंस्फूर्तीनें पुनर्विवाह केला, याबद्दल मी आपणास बडा भाग्यवान समजतों. आपणास पक्कें कळूंद्या कीं, मी स्वदेशांतील दुष्टरूढीची गुलामगिरी करणारा माणूस नाहीं. तेव्हां आतां सरतेशेवटीं येवढेंच लिहावयाचें कीं, लोकभीतीस्तव अगर अन्य कारणास्तव, ज्या कोणास नारायणाशीं अन्नोदक व इतर व्यवहार करायाची खुषी नसेल, त्यांनीं खुशाल करूं नये. मला नाहीं वाटत, नारायणाला त्याबद्दल वाईट वाटेल. आणि मजविषयीं पुसाल तर, त्यासंबंधानें मला बिलकुल कसा तो विषाद वाटणार नाहीं. ह्या कामांत ज्यांनीं त्यांनीं आपापल्यापरी मतस्वातंत्र्य अनुभवावें. ह्यांत कोणास मानापमान किंवा वैषम्य वाटण्याचें कांहीं कारण नाहीं.

असो. गेल्या गुरुवारीं झालेल्या पुनर्विवाहाची मंगलवार्ता मातोश्री भगवतीदेवीस व घरांतील इतर मंडळीस कळवावी. कळावें हे आशिर्वाद.

आपला परमप्रिय बंधू,

( सही ) ईश्वरचंद्रशर्मा.

## पुनर्विवाहापायीं कर्ज.



स्वतःच्या खर्चानें अनेक पुनर्विवाह लाविल्यामुळें, झालें काय कीं, ईश्वरचंद्राची वाङ्मयापासून प्राप्ति येवढी जबर पण असल्या ह्या दांडग्या धर्मादाय खर्चास ती पुरेनाशी होऊन त्यांस परक्यांचें ऋण काढणें प्राप्त झालें. शेवटीं हें कर्ज वाढतां वाढतां एकेवेळीं ते ५०,००० पन्नास हजारांचे घरास गेलें व येवढ्या अभिमानानें सोडलेली सरकारी नोकरी नाइलाजास्तव पुनः पत्करण्याची बुद्धि होऊं लागली. अन्नें दिवस निभणें मोठें कठीण झालें आहे. परमेश्वरास आपल्या भक्तांची काळजी, त्यानें पारतंत्र्याचा पुनश्च आलेला कुयोग टाळिला, आणि ईश्वरचंद्रास दीर्घायुष्य देऊन, त्यास लोकांचे ऋणांतून मुक्त केलें. किंवा ' ऐश्वर्यमस्तु, आयुष्यमस्तु ' इत्यादि उपकृत व कृतज्ञ देशबंधुभगिनींनीं दिलेले आशिर्वाद कामास आले ह्मणायाचे.

## पुनर्विवाहामुळें होणारा छळ.



पुनर्विवाहग्रंथ, पुनर्विवाहराजनियम, आणि मग पुनर्विवाहसमारंभ असा एकसारखा या विषयाचा जेव्हां सपाटा सुरू झाला, तेव्हां जुने लोक संतापून फार चिरडीस पेटले. ईश्वरचंद्र रस्त्यामधून चालले असतां, त्यांचेभोंवतीं गर्दी करून लोकांनीं त्यांचे तोंडावर त्यांस लखलखीत शिव्या देण्याचा क्रम सुरू केला. कित्येकांनीं त्यांचे शरीरास दुखापत करण्याची दहशत घातली, आणि कोणी कोणीतर त्यांस ठार करण्याच्या दुष्ट प्रयत्नास लागले. ज्या समाजाच्या हितासाठीं ते इतके झटत होते, तोच एकंदर समाज ह्याप्रमाणें त्यांजवर

उलटून पडला. थोर पुरुषाचा असा नाहक छळ मांडून या कृतघ्न मंडळीस काय मिळालें? यायोगें लोकांनीं आपले मनाचा कोतेपणा मात्र व्यक्त केला. ‘ हिरा ठेवितां ऐरणी वांचे मारितां जो घणीं ’, या न्यायानें ईश्वरचंद्रानीं लोकांचा छळ शांतपणानें सहन करून घेऊन, आपण हिऱ्याप्रमाणें जास्त प्रकाशमान झाले. त्यांच्यावर ह्याप्रमाणें अपशब्दांचा येवढा भडिमार होत असतां, त्यांनीं कोणास एका शब्दानेंही कधीं दुखविलें नाहीं. केवढा मनाचा थोरपणा हा! असा छळ सोसणारा, क्षमाशील, सुशांत व समाजहितार्थ अहर्निश झटणारा मनुष्य विरळा.

क्षमा शांति ज्याचे चित्तीं तोचि देवाची विभूति ।

# मारामारीचे बेत.



आपल्या परोपकारी प्रिय पुत्रास लोकांपासून फार त्रास होतो आहे, व त्याचे जीवास एकादे दिवशीं मोठा अपाय होण्याचीदेखील भीति आहे असें जाणून, ठाकूरदासांनीं त्याचे शरीरसंरक्षणार्थ एक विश्वासू गडी वीरसिंहाहून धाडून दिला. हा श्रीमंता शरीरानें चांगला बळकट असून लाठी फिरविण्यांत मोठा पटाइत असे. एकदा सुकीचे रस्त्यावर ईश्वरचंद्रास दुखापत करण्याच्या दुष्ट हेतूनें कित्येक द्वाड लोक टपून बसले होते. पण श्रीमंता हा बरोबर होता, ह्मणून जीव बचावला, नाहींतर त्या दिवशीं कांहीं तरी खास विपरीत घडावयाचें. त्या नीच लोकांचा मनसुबा त्या समयीं साधला नाहीं, तेव्हां ते मुकाट्यानें आपल्या घरीं माघारे गेले. कित्येक वेळा ईश्वरचंद्रास मारेकरी घातले. एकदा एका धनाढ्य गृहस्थानें ह्या महात्म्याचा जीव घेण्याच्या इराद्यानें नाहीं तसल्या खटपटी सुरू केल्या. कांहीं बदमाष माणसांस पुष्कळ पैका देऊं करून त्यांची या कामाकडे यानें योजना केली. हे नीच लोक ईश्वरचंद्राच्या एकसारखे पाळतीवर हिंडूं लागले. ह्या भयंकर

खटाटोपाची गुणगुण जेव्हां पंडितजींचे कानीं आली, तेव्हां ह्या शूर व प्रामाणिक पुरुषानें काय केलें असावें असें तुह्मास वाटतें? ते भेकडासारखे सैपाकघरांत लपून बसले काय? नांव कशाला? किंवा जीव घेऊन कोठें पळून गेले काय? मुळींच नाहीं. त्यांनीं प्रामाणिक शूरपणाचा अंगिकार करून, थेट त्या धनाढ्याचे वाड्यांत गेले. येथें हा धनिक गृहस्थ आपल्या लाडक्या नीच सोबत्यांबरोबर माराहाणीचीं खलबतेंच करीत बसला होता. ईश्वरचंद्र नीट त्यांच्या साऱ्यांच्या समोर जाऊन उभे राहिले. ज्यांच्याविषयीं आपण बोलतों आहों, तीच स्वारी अकल्पित आलेली पाहून सर्व एकदम चकित झाले, आणि एकजात स्तब्ध राहिले. कोणी एकही ब्र काढण्यास धजेना. अंमळ कांहीं वेळानें त्यांपैकीं एकजण हळूच पुसतो, " पंडितजी, आपण इकडे कोणीकडे "? तेव्हां त्या कार्यनिष्ठ वीरानें स्पष्ट व सरळ उत्तर केलें. " मी असें ऐकतों कीं, आपण मला ठार मारण्याच्या भारी खटपटींत आहांत, आणि तेवढ्यासाठीं आपण मला एकटा गाठण्याच्या एकसारख्या मसलती करीत असता, व रात्रंदिवस सारखे शोधांत असता. तेव्हां आपली दगदग वांचवावी, ह्मणून मी आपण होऊन तुमच्यासमोर उभा राहिलों आहे. आतां क्षणमात्र विलंब न लावितां आपला कार्यभाग मनसोक्त उरकून घ्या " हें ऐकतांच बंडखोर, भेकड टवाळांचा कंपू क्षणांत अगदीं प्रेतवत् थंड झाला. सारे बेटे लाजले, खजील झाले. ईश्वरचंद्रास ठार करण्याची उकळी आपोआप नाहींशी झाली.

## बंडखोरांस माफी.

---

या दुष्ट लबाडांनीं लाजून आपलीं मुस्कटें खालीं गुडघ्यांत अडकविलीं. एकाही बाबूला पंडितजींच्या सत्य व सतेज मुखश्रीकडे वर डोकें करून पहाण्याचें धैर्य होईना. त्यांस पश्चात्ताप झाला.

त्यांनीं आपले घोर अपराध स्वमुखानें कबूल केले, आणि ईश्वरचंद्राचे चरणकमळीं लीन होऊन त्यांस शरण गेले. सारांश, ज्याचा जीव घेण्यास तयार झाले होते, त्याच्याच पायावर मस्तक ठेऊन पापमुक्त झाले, केवढा ह्या साधु पुरुषाचा प्रभाव, कीं ज्यानें सरळ मार्गानें दुष्टांस सहज शरण आणावे. शत्रूस मित्र करून सोडण्याची ही सोपी युक्ति ईश्वरचंद्रास चांगली साधली होती. अशा मार्गानें शत्रु चिरडीस जाऊन जास्त चेकाळत नाहीं, त्यांची चुकी त्यांना आपोआप उमगते. क्षमा मागण्याची त्यांना स्वयंप्रेरणा होते. आणि असल्या वाईट फंदांत पुनः न पडतां ते चांगल्या मार्गास लागतात. ईश्वरचंद्रांनीं या बंडखोर लोकांना माफी केली. ते जसे कृपावंत होते, तसेच क्षमाशील होते. दया माया परोपकार हा गुण ज्याप्रमाणें ते आपल्या मातोश्रीपासून शिकले, त्याचप्रमाणें क्षमा शांति हा थोर ईश्वरी गुण त्यांनीं आपले वडिलांपासून उचालिला होता. वडिलांच्या क्षमाशीलत्वाची अशी एक आख्यायिका सांगतात कीं, एकदा वीरसिंह गांवीं ठाकूरदासांस एका सरकारी अधिकाऱ्यानें पुसलें " ह्या गांवांत तुह्माला कोणी कोणी त्रास दिला, त्या सगळ्यांचीं नांवें गांवें सांगा. कलकत्त्यास असतांना मला कळलें आहे कीं, पुष्कळांनीं तुह्माला या पुनर्विवाहाच्या पायीं फार ताप दिलेला आहे, अतिशय छळिलें आहे. असल्या लोकांची नांवानिशी द्या, ह्मणजे त्यांचा सवडीनुरूप चांगला खरपूस समाचार घेतों, असा कीं, पुनश्च ते तुमच्या वाटेस न जात. " ठाकूरदास बोलले " ईश्वरचंद्र राहतो कलकत्यास. तेव्हां त्यानें कर्णोपकर्णी कांहीं तरी ऐकिलें असेल, आणि तुह्माजवळ सहज कधीं एरवीच बोलला असेल झालें; पण त्यांत खरोखर कांहीं हंशील नाहीं. मला या गांवांत कोणत्याही प्रकारचा कोणाकडूनही कधीं त्रास होत नाहीं. उलट सारे गांवकरी माझ्याशीं ममतेनें वागतात, माझे उपयोगीं पडतात. " साक्षात् धर्मराजाचाच अवतार ह्मणावयाचा. दुर्योधन न ह्मणतां सुयोधन ह्मणावयाचें हा नेहमींचा थाट. वरप्रमाणें ठाकूरदासानीं उडवाउडवीचें उत्तर देऊन, सगळ्या गांवगुंडास बोलावून घेतलें, आणि

ह्या सरकारी अधिकाऱ्यासमक्ष, या गुंडाचा गळेकापूपणा पोटांत घालून, त्यांचा नसता भलेपणा वर्णन केला. या सौम्य उपायाच्यायोगें झालें काय कीं, गांवकरी लोकांनीं विद्यासागरांचे वडिलाशीं पुनरुद्वाहनिमित्त जें वैर मांडिलें होतें तें सोडून दिलें, व त्यांची अलौकिक सहनशीलता अवलोकन करून, गांवकरी ठाकूरदासाशीं प्रेमभावानें वर्तूं लागले.

## सिंहावलोकन.



एकंदर चरित्राचें अवलोकन केलें असतां, असें दिसून येतें कीं, परमेश्वराचे मनांतून ईश्वरचंद्रास पूर्ण यश द्यावयाचें होतें. ह्याला निमित्त-मात्र करून त्याजकडून या पुनर्विवाह मंगलकार्याची संस्थापना करावयाची होती. ह्मणून त्याचीं कौटुंबिक सर्व मुख्य मनुष्येंही ह्या कार्यास अनुकूल अशींच परमेश्वरानें निर्माण केलीं. कारण हें खचित कीं, जर माता-पितरांची अनुज्ञा न मिळती तर ईश्वरचंद्र पुनर्विवाहाचे फंदांत न पडते. पहिली गोष्ट, शास्त्राधार शोधून काढण्याची मूळ प्रेरणा त्यांस त्यांचे मातोश्रीनेंच केली, ह्मणून या मातृभक्तानें श्रुतिस्मृति पुराणादि ग्रंथांचें आलोडन करून पुनर्विवाह शास्त्रसिद्ध केला. दुसरी गोष्ट, वडील ठाकूरदास यांची सहानुभूति. तिसरी गोष्ट, एकुलता एक पुत्र आपण होऊन, कोण्या मिशनरीच्या उपदेशाची अपेक्षा न बाळगतां, पुनर्विवाहासारखी लोक-विरुद्ध पण शुद्ध गोष्ट करण्यास सिद्ध झाला. समजा हाच जर राजा राममोहनराय यांच्या पुत्रानें ज्याप्रमाणें नुसत्या पुनर्विवाहसमारंभास येण्याचें नाकारिलें, त्याचप्रमाणें नारायण विधवाविवाहाच्या कामीं माघार खाता तर ईश्वरचंद्राच्या पुनर्विवाहासंबंधी धवल यशास केवढा कालिमा आला असता बरें? चौथी गोष्ट, नारायणाचा पुनर्विवाह झाल्यावर त्याची आई दीनमाई देवी मुलगा व पुनरूढा सून यांजबरोबर आनंदानें राहूं लागली. जर सर्वत्र आढळणाऱ्या अडाणी बायांप्रमाणें दीनमाई आडांत जीव देण्यास तयार झाली असती, तर ह्या सत्पुत्रास बापसे बेटा सवाई या न्यायानें, वडिलांनीं आरंभिलेल्या मंगलकार्याची कदापि प्रगति करितां

न येती. एवंच ईश्वरचंद्र एक परमेश्वरी अवतार असल्यामुळें, त्याचे मार्गांत असा कोणताही प्रतिबंध उरला नाहीं कीं, ज्यायोगें ह्या करारी पुरुषाची पीछेहाट होई. एक बंधु मात्र विरुद्ध होते; त्यांसही ह्या प्रकरणीं स्पष्ट जाब मिळून चुकला होता.

तात्पर्य ज्या मुख्य गोष्टी आज आह्मा सर्वांस मोठ्या अडचणीच्या वाटतात, त्या तशा ईश्वरचंद्रांवर सुदैवानें येऊन आदळल्या नाहींत. आई, बाप, बायको आणि मुलगा हीं सर्व माणसें अनुकूल असणें हें जबर पूर्वसंचित आणि क्रियमाण पुण्यकर्माचें साक्षात् फळ होय, असेंच ह्मणावयाचें. जवळ जवळ अशाच अर्थाचें वचन भर्तृहरीनें ह्मटलें आहे.

सुनुः सच्चरितः सती प्रियतमा स्वामी प्रसादोन्मुखः ।
तुष्टे विष्टपहारिणीष्टदहरौ संप्राप्यते देहिना ॥

आज कोणी इसम जर पुनर्विवाह करण्यास यदाकदाचित् सिद्ध झाला, तर त्याची आई किंवा बाप अगर दोघेही डोकें फोडून घेण्यास तयार होतात, किंवा विहीरींत जीव देऊं ह्मणून धाक दाखवितात.

आईबाप मयत असल्यास, व मुलगा अगर मुलगी प्रौढ आणि सुजाण असल्यास, हीं पुढें होऊन डोळ्यांत आंसवें आणून ह्मणतात. ‘ बाबा ’ आई आह्मास नुकतीच सोडून गेली, आणि आतां तुह्मीही आह्मां लेकरांस टाकून जातां काय? बहीण असल्यास तीही काकुळतीनें ह्मणते ‘ दादा ’ मला माहेर अंतरेल असें नका हो करूं ’ याप्रमाणें आईबापांचा, मुलामुलींचा, भावाबहिणींचा व आप्तइष्टांचा भोंवतालीं गराडा पडल्यावर त्यांतून हिकमतीनें अगर नीतिधैर्ययुक्त पराक्रमानें, हा सारा मायापसारा दूर करून— हा केवळ आपमतलबी नातलाइकांचा कोट फोडून अनंत अडचणींत रुतलेल्या, नानाविध संकटांत गटंगळ्या खाणाऱ्या दीन निराश्रित गतभर्तृकांस आश्रय देण्यास धांवून जाणारा महात्मा विरळाच. सामान्य मनुष्यें असल्या अडचणींच्या प्रसंगीं गांगरून जावयाचीं, हें सिद्धच आहे.

# बोधप्रद उदाहरणें.



पिता अत्यंत प्रतिकूल असतांही प्रल्हादानें ईशभजनाचा क्रम सुरूच ठेविला. हरिश्चंद्रानें सत्यव्रतपरिपालनार्थ पुत्राचें शवमुद्धां सुशांतवृत्तीनें अवलोकिलें. शरणागताचे रक्षणार्थ शिबिराजानें स्वशरीराचें मांस काढून दिलें. श्रियाळानें अतिथीचे संतोषार्थ पुत्राचें मांस शिजवून वाढविलें. ब्राह्मणपुत्राचे रक्षणार्थ मयूरध्वजानें आपलें अर्धांग कर्वतून दिलें. क्षात्रधर्मरक्षणार्थ बभ्रुवाहनानें प्रत्यक्ष पित्याचा वध केला. परशुरामानें पित्राज्ञाप्रतिपालनार्थ मातेचा वध केला. तद्वत् श्रीरामचंद्र व भीष्म यांचीं अवघीं चरित्रेंच करारी स्वभावाच्या चित्रांनीं ओतप्रोत भरलेलीं आहेत. ह्याप्रमाणें भारत, रामायण इत्यादि पुराणग्रंथांत अंगीकृत कार्याच्या, व्रताच्या, व धर्माच्या प्रीत्यर्थ स्वसुखाची पर्वा न बाळगितां वाटेल तसला स्वार्थत्याग करणारे, लागतील त्या हालअपेष्टा संतोषानें सहन करणारे, व देहाची दिक्कत न धरणारे अभिमानी, सोशिक व काटक पुरुष पुष्कळ आढळून येतात. असलीं दृढनिश्चयी कार्यनिष्ठ माणसें सुधारणेच्या वांट्यास शेंकड्यावारी आलीं पाहिजेत. व तीं ईश्वरचंद्रासारख्या महात्म्या पुरुषाच्या चरित्रपठणानेंच प्राप्त होणारीं आहेत. तेव्हां अनाथ, दीन, निराधार दुःखी अबलांच्या कल्याणार्थ आईबाप, भाऊबहीण, इष्टमित्र यांची काडीमात्र पर्वा न बाळगितां, जे उत्तम पुरुष आपत्प्रसंगीं पुनर्विवाहधर्म स्वीकारतील ते अवश्य सदरहू श्रेष्ठ कोटींत गणिले जातील; व त्यांचींच नांवें समाजसुधारणेच्या पुनर्विवाहप्रकरणी इतिहासांत चिरस्थायी होतील. पुराणग्रंथांतील थोर स्त्रीपुरुषांच्या चरित्रांतून हल्लींच्या काळाला तरुणांनीं हाच बोध घेण्यासारखा आहे.

यांत कमी दुःख व अधिक सुख कोणास होईल, सुखाची अवश्यकता जास्त कोणास आहे, निष्कारण पराकाष्ठेचे हाल जन्मभर कोणास सोसावे लागतात, इत्यादि गोष्टींचा सूक्ष्म न्यायदृष्टीनें विचार करावयास

हवा. मातापितरादिकांना कांहीं वेळ वाईट वाटेल, नाहीं असें ह्मणत नाहीं, पण कांहीं दिवसांनीं सर्व विसरून जाऊन ते पूर्वीप्रमाणें प्रेमानें वर्तू लागतील असा भरंवसा असतो. पण इकडे केवढा पुण्यकर्माचा ठेवा सांपडेल. नेहमीं मरेपर्यंत दुःखसागरांत बुडणाऱ्या दीन गतभर्तृकेस हात देऊन, वर काढून पुनश्च तिला संसारसुखांत आणल्याचें श्रेय मिळणार.

## शेवट.

ईश्वरचंद्र एकदा मुलींची शाळा तपासण्यासाठीं मिसकार्पेंटरबरोबर गाडींतून जात होते. त्यावेळीं गाडीचा घोडा बिचकून गाडी उधळली, तेव्हां ते खालीं पडले व बरीच दुखापत झाली; हें काय तें निमित्त. तेव्हांपासून पुढें त्यांची प्रकृति बिघडली. हवा पालटली, पुष्कळ वैद्यडॉक्टरांचीं सर्व प्रकारचीं औषधें घेतलीं, पण गुण आला नाहीं. त्यांची ज्येष्ठ कन्या भेमलता इनें सुमारें हजार आठशेचा दानधर्म केला, कीं प्रकृतीस आराम वाटावा. पण कांहीं नाहीं. अतिसार, खोकला, बरगडींत दुखणें हीं कधीं कमी तर कधीं अधिक, याप्रमाणें चढउतार होतां होतां शेवटीं ता० २९ जुलै १९०१ मंगळवारीं पहाटेस दोन वाजतां या महात्म्याचें देहावसान झालें. त्यावेळीं सर्व घरभर एकच आकांत झाला. कांहीं वेळानें मित्रांनीं पुढील तयारी केली. ज्या पर्यंकावर ते नेहमीं निद्रा घेत त्याजवर शुभ्र मृदुशय्या करून त्यांचें शव ठेविलें. मुलगा, नातू, बंधू व इतर नातेवाईक यांनीं पालटून खांदे देऊन स्मशानयात्रा निघाली. पहाटेचा चोहोचा सुमार झाला. हळूहळू पांचाच्या सुमाराला निमताला स्मशानघाटावर सर्व यात्रा जुळली. सकाळीं ही दुःखवार्ता सर्वांस समजतांच सगळे स्मशानाकडे थोर पुरुषाच्या अखेरच्या दर्शनासाठीं धावून निघाले. भागीरथीच्या स्नानार्थ आलेल्या स्त्रिया आपला उद्योग विसरून या प्रेतयात्रेस

मिळाल्या. साऱ्याजणींच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. विद्यासागर नव्हे दयासागर आज गेला असें बोलूं लागल्या. ६॥ वाजतां ती अमोल काया चंदनचितेवर ठेविली, आणि सत्पुत्र नारायणचंद्र यांनीं अग्नी दिला. ११ वाजतां भागीरथीच्या पवित्र जलानें त्या पवित्र देहाची रक्षा सिंचित केली.

या पुरुषाचें मरण ऐकून सर्व देशास अति दुःख झालें. पुढें स्मारकें झालीं. पण त्या महात्म्याचें मुख्य स्मारक ह्मणजे पुनर्विवाहकार्याचें विस्मरण होऊं न देणें हें होय, येवढें सर्वांनीं पूर्णपणें लक्षांत बाळगावें ह्मणजे झालें.

समाप्त.

## ( वंशवृक्ष. )

बंद्योपाध्याय

भुवनेश्वर विद्यालंकार.  उमापति तर्कसिद्धांत.

रामजय तर्कभूषण. × दुर्गादेवी. रमाकांत तर्कवागीश.

ठाकुरदासबंद्योपाध्याय × भगवती देवी. शत्रुघ्नभट्टाचार्य.

ईश्वरचंद्र विद्यासागर × दीनमाई

नारायणचंद्र विद्यारत्न.

